# महाराष्ट्र-ग्रंथ-प्रदीपावलि

## प्रदीप पहिला



प्रज्वालितो ज्ञानमयः प्रदीपः

# मराठी वाङ्मयाचा इतिहास

## तिसरा खंड

## [ रामदास-खंड ]

किंमत

चार रुपये


लेखक

ह. भ. प. ल. रा. पांगारकर, बी. ए.

## भाषाबंधूंस —

सुमारें १५० वर्षांपूर्वी मुद्रणकलेचा प्रवेश आमच्या देशांत झाल्यापासून इकडील—जुन्या नव्या विद्वानांस, आपण संपादन केलेलें ज्ञान आपल्या देशबांधवांस सुलभ करून द्यावें अशी इच्छा उत्पन्न होऊन त्यांनीं ग्रंथलेखन सुरू केलें; व ही ग्रंथनिर्मिति इतकी झपाट्यानें होत गेली कीं, वरील कालांत हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रमुख भाषांत झालेल्या ग्रंथांची संख्या एक लक्षाहून खात्रीनें कमी भरणार नाहीं. आपल्या महाराष्ट्रांतील विद्वान् लेखकांनींही या ग्रंथनिर्मितीस यथाशक्ति हातभार लावण्यांत अहंमहमिकेनें पुढाकार घेतला व वाङ्मयाच्या निरनिराळ्या शाखांत ग्रंथसंपत्तीची इतकी भर घातली कीं, आज आमचें मराठी वाङ्मय हा आपणास एक मोठा अभिमानाचा विषय झाला आहे. हिंदी व बंगाली भाषा बोलणाऱ्या लोकांपेक्षां मराठी बोलणाऱ्या लोकांची संख्या बरीच कमी असतां त्या दोन भाषांतील वाङ्मयापेक्षां आमचें वाङ्मय कोणत्याही बाबतींत मागें नाहीं, असें आम्ही आज मोठ्या अभिमानानें म्हणूं शकतों, आणि याचें सर्व श्रेय आमच्यांतल्या प्रथितयश लेखकांस आणि त्यांना उत्तेजन देऊन त्यांजकडून ग्रंथरचना करवून घेणाऱ्या प्रकाशकांस आहे. पण गेल्या युरोपिअन महायुद्धोत्तरकालांत धार्मिक, सामाजिक आर्थिक व राजकीय बाबतींत एकदम अशा कांहीं नवीन विचारांचीं आंदोलनें महाराष्ट्रांत सुरू झालीं कीं, त्यांच्या योगानें अकल्पित आणि अनपेक्षित अशी एक विचारक्रांति अकस्मात् घडून येत आहे. परंतु क्रांति म्हटली कीं इष्ट आणि अनिष्ट यांचें मिश्रण हें

व्हावयाचेंच. तेव्हां इष्ट असेल त्याचा पुरस्कार व अनिष्ट दिसेल त्याचा प्रतिकार करण्याच्या उद्देशानें ही नवीन ‘ ग्रंथप्रदीपावलि ’ प्रज्वलित करण्याचें आम्ही योजिलें आहे. जुनें तें सर्वच चांगलें आणि नवें तें सर्वच वाईट अशा मताचे आम्ही नाहीं; म्हणून दोहोंत जें चांगलें दिसेल त्याचा पुरस्कार करावयाचा, हें प्रस्तुत ‘ ग्रंथप्रदीपावलि ’ प्रकाशित करण्यांत आमचें उद्दिष्ट आहे.

हें उद्दिष्ट सिद्धीस नेण्यासाठीं महाराष्ट्रांतील नामवंत लेखकांकडून त्यांच्या आवडीच्या विषयांवर ग्रंथ लिहवून घेऊन ते प्रकाशित करण्याचा आमचा मानस आहे. पौराणिक, ऐतिहासिक, सामाजिक, धार्मिक, आर्थिक, शैक्षणिक, राजकीय, शास्त्रीय इत्यादि विषयांबरोबरच ललित विषयांचाही भारदस्तपणें परामर्ष घेणारे ग्रंथ त्या त्या विषयाच्या अधिकारी लेखकांकडून मुद्दाम लिहवून घेऊन प्रकाशित करावयाचे आहेत, आणि यांतला प्रत्येक ग्रंथ अशाच रीतीनें लिहिला आणि प्रकाशिला जाईल कीं, महाराष्ट्रांतील प्रत्येक साक्षर मनुष्यास सकृद्दर्शनींच तो आपल्या संग्रहीं असावा अशी इच्छा झाल्याशिवाय राहणार नाहीं; व ही इच्छा पूर्ण व्हावी म्हणून प्रत्येक ग्रंथाची किंमत इतकी माफक ठेविली जाईल कीं, तो कोणासही सुलभतेनें आपल्या संग्रहीं ठेवितां येईल.

तरी आमच्या सर्व भाषाबंधूंस आमची अशी सविनय विनंती आहे कीं, ह्या आमच्या अंगीकृत कार्यांत त्यांनीं आम्हांस ग्रंथप्रदीपावलीचे आश्रयदाते होऊन उत्तेजन द्यावें आणि ही वाङ्मयसेवा आमच्याकडून करवून घ्यावी.

वरील योजनेनुसार महाराष्ट्राचे आवडते प्रेमळ लेखक ह० भ० प० लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, बी. ए. यांनीं प्रज्वलित केलेला "**मराठी वाङ्मयाचा इतिहास, तिसरा खंड [ रामदास खंड ]** हा ८०९ पृष्ठांचा प्रदीपावलींतील पहिला प्रदीप आज प्रकाशित होत असून नवयुगधर्ममालाकार, रा० सदाशिव कृष्ण फडके यांचा '**हनुमंताशीं हितगुज**' हा दुसरा प्रदीप लवकरच प्रकाशित होईल.

याशिवाय रावबहादुर गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए.; प्रो० न. र. फाटक, बी. ए.; म० भा० भू० जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर; ह. भ. प. रा. कृ. कामत; प्रो० वसंत नारायण नाईक, एम्. ए.; प्रो० कृ. पां. कुळकर्णी, एम् ए.; प्रो. श्री० रा० पारसनीस, एम्. ए.; प्रो. ना. के. बेहेरे, एम्. ए., बी. एस्सी.; प्रो. वामन गोपाळ ऊर्ध्वरेषे, एम्. ए., काव्यतीर्थ; प्रो० प्र. वा. बापट, एम्. ए., बी. टी.; रा० विठ्ठल कृष्ण नेरूरकर, बी. ए.; रा० श्रीपाद रामचंद्र टिकेकर; कु. गार्गी भाटवडेकर, पी. ए. इत्यादि मंडळींस त्यांच्या त्यांच्या आवडीच्या विपयांवर प्रदीप उजळण्याची विनंती करण्यांत आली आहे.

श्रीसमर्थ–सदन, मुंबई ४;<br>
दासनवमी, शक १८६१

केशव भिकाजी ढवळे

## ग्रंथ-प्रदीपावलीसंबंधीं सर्वसाधारण नियम

( १ ) आश्रयदात्यांनीं आरंभीं फक्त एक रुपया प्रवेश फी द्यावयाची व नांव नोंदवून घ्यावयाचें.

( २ ) दर वर्षी साधारणपणें चार ग्रंथ प्रकाशित होतील. ग्रंथ प्रकाशित होतांच आश्रयदात्यांस सूचनापत्र जाईल. त्याप्रमाणें बाहेर-गांवच्या मंडळींनीं पोस्टेजसह किंमत पाठवावी म्हणजे त्यांस अनरजिस्टर्ड बुकपोस्टनें पुस्तक पाठवूं. स्थानिक आश्रयदात्यांनीं समक्षच घेऊन जावीं. व्ही. पी. उभयपक्षीं सोईची नाहीं.

( ३ ) आश्रयदात्यांस प्रदीपावलींतील पुस्तकें तर पाऊणपट किंमतीनें मिळतीलच; पण आमचीं इतर प्रकाशनेंही व्यापारी दरानें मिळतील.

( ४ ) आश्रयदात्यांनीं सोबतचें पत्रक भरून पाठवावें.

श्री

ता. १९४

व्यवस्थापक,

महाराष्ट्र–ग्रंथ–प्रदीपावलि,

श्रीसमर्थ–सदन, गिरगांव, मुंबई

सा० न० वि० वि०

आपल्या महाराष्ट्र–ग्रंथ-प्रदीपावलीची योजना व सर्वसाधारण नियम वाचले. योजना पसंत असून नियमही मान्य आहेत. प्रवेश फी * ............... पाठविली आहे. तरी माझें नांव नोंदून ग्रंथ जसजसे प्रसिद्ध होत जातील तसतसे माझेकडे पाठवीत जावे. कळावें हे विनंती.

आपला

सही

संपूर्ण नांव

मु० पो०

जि०

---

* मनीऑर्डरनें अगर सोबत

॥ श्रीविठ्ठल प्रसन्न ॥

# मराठी वाङ्मयाचा इतिहास

## तिसरा खंड

## [ रामदास–खंड ]

समर्थ सद्गुरु पूर्ण भावें सेविती ।
त्यांचे सर्वहि मनोरथ पुरती ।
सर्व कामना परिपूर्ण होती ।
सद्गुरुसमर्थप्रतापें ॥

—गिरिधर


ग्रंथकार

लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, बी. ए.



प्रकाशक

केशव भिकाजी ढवळे,

श्रीसमर्थ-सदन, बनाम हॉल लेन, गिरगांव, मुंबई

शक १८६१

किंमत चार रुपये

॥ श्री वि ठ्ठ ल प्र स न्न ॥

# प्रस्तावना

**मनीं धरावें तें होतें। विघ्न अवघेंचि नासोनि जातें।**
**कृपा केलियां रघुनाथें। प्रचीत येते ॥**

## १ कार्यारंभ

श्रीपांडुरंगाच्या कृपेनें मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचा हा तिसरा खंड आज मराठी वाचकांच्या हातीं पडत आहे. माझ्या चाळीस वर्षांच्या वाङ्मय-सेवेचा परिपाक ह्या इतिहासखंडांत वाचकांस अनुभवावयास सांपडत आहे. २५-३० मराठी ग्रंथ लिहून प्रसिद्ध केल्यानंतर व साठी उलटल्यावर ह्या इतिहासाचे खंड प्रसिद्ध करण्यास आरंभ केला. वयाच्या ६१ व्या वर्षीं ८३६ पृष्ठांचा पहिला खंड इ. स. १९३२ सालीं प्रसिद्ध केला. १९३५ सालीं म्ह० ६४ व्या वर्षीं दुसरा खंड प्रसिद्ध केला. पुढील दोन वर्षें ह्या तिसऱ्या खंडाच्या लेखनांत गेलीं व ग्रंथ बहुतेक लिहून तयार झाला, तो १९३८ सालीं प्रसिद्धही झाला असता, पण—

## २ विघ्नपरंपरा

१९३९ च्या प्रारंभापासून शरीरावर महान् अरिष्ट कोसळलें. माझी मूळची पित्तप्रकृति. विद्यार्थीपणात व काहीं काळ नंतर दरसाल पित्त प्रबळ होत असे. नाशिकला आल्यापासून मात्र गाईचें दूध भरपूर मिळूं लागल्यामुळें माझें पित्त व कुटुंबाचा दमा पार बसून गेला. वयाचीं ६० वर्षें एकंदरींत चांगली गेलीं. पुढें डॉक्टरांनीं मला मधुमेह आहे असें ठरविलें! कानांत आवाज, पायांत मुंग्या, दातदाढांचे दुःख, हीं वृद्धपणाचीं लक्षणें प्रबळ होऊं लागलीं. अशाही स्थितींत मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचे दोन खंड व

'चरित्रचंद्रां'त ६७ वर्षांचा त्रोटक इतिहास दिला आहे. ६८ व्या वर्षाचें किंबहुना १९३९ सालचें हें चरित्र ह्या ठिकाणीं देत आहें! चरित्रचंद्राला खग्रास ग्रहण लागलें होतें, पण रामकृपाप्रसादानें व संतांच्या आशीर्वादानें ग्रहण सुटलें. हृदय सुधारलें, रक्तदाबाचा विकार अजून आहे. व्याख्यानें, प्रवचनें, ग्रंथलेखन, प्रवास, यात्रा वगैरे कार्यक्रम यापुढें झालाच तर यथातथाच होणार. पूर्ण विश्रांतीचीच गरज आहे. मृत्यूच्या पोटांतून बाहेर आल्यामुळें पुनर्जन्म झाला. ह्या सर्व काळांत रामचिंतनसुख बरेंच मिळालें. चार प्रसंगीं पांडुरंगचरणीं मस्तक ठेवून त्याची पूजा करण्याचें स्वप्नसुख लाभलें. माशाचा जन्म, संसार, मृत्यु, सर्व पाण्यांत, त्याप्रमाणें आपलें होणें जाणें सर्व सर्वव्यापी विठ्ठलाच्या स्वरूपांत असल्यामुळें मृत्यूही त्याच्याच स्वरूपांत, या भावनेनें मरणाची कल्पना जरा विरली, व भगवत्प्रेमानें आपल्या पोटात घेतलें. 'आतां होणार तें होईना कां। आणि जाणार तें जाईना कां। तुटली मनांतील आशंका। सद्गुरुबोधें।' ह्या श्रीसमर्थांच्या वचनानुसार आनंदांत आहें. शरीरांतील परातभर रक्त पाण्याच्या किंवा घामाच्या रूपानें गेल्यामुळें अशक्तपणा मात्र फार आला आहे. चढउताराचें चालणें किंवा फार बोलणे सोसत नाहीं. १४ मिहने गादीवर लोळायचें व येतील त्यांशीं थोडें फार बोलायचें याशिवाय व्यवसाय नाहीं! (ख्रिस्तीशास्त्रांत) देवानें सहा दिवस सृष्टि निर्माण केली व श्रमपरिहारार्थ सातवा दिवस (रविवार) विश्रांतींत घालविला, त्याप्रमाणें ४०।५० वर्षें विद्याव्यासंगांत व वाङ्मयसेवेंत घालविलीं तरी हा देहाला व बुद्धीला विश्रांति देत नाहीं असें वाटून दयाघन परमात्म्यानेंच याला एक वर्षाची जबरीची सुट्टी देऊन गादीवर लोळायला लावले! देव करितो तें आपल्या हिताचें असते. मननचिंतनाला मुबलक वेळ मिळाला. संसारचलच्चित्रपटावरचे अनेक प्रसंग डोळ्यांपुढें आले. ज्या चुका, दोष किंवा अपराध घडले, त्यांचें सिंहावलोकन होऊन संसाराचें स्वरूप अधिक यथार्थपणें मनावर ठसलें व आत्मशोधन होऊन समाधान वाटले. निवांतपणें बसून चित्त शुद्ध केल्यानें अपार सुख होतें या तुकोबांच्या उक्तीचा अनुभव आला.

## ३ श्रीसमर्थ

श्रीसमर्थांची कामगिरी लोकांच्या नजरेत भरण्यासारखी ज्यांनीं आमच्या ह्यातींत म्हणजे गेल्या ५०।६० वर्षांत बजावली त्यांपैकीं तिघे पुरुष प्रशंसापात्र आहेत. श्रीगोंदवलेकरमहाराजांनीं रामनामाचा प्रसार समर्थसंप्रदायानुरूप करून लाखों लोकाना रामनामस्मरणाचें वेड लाविलें. चौंडेमहाराज यांनीं गोरक्षणद्वारा रामदासीसंप्रदायाचा प्रसार करून व समर्थशिष्यांच्या पालख्या सज्जनगडावर नेऊन तेथील सोहळा (वारकरीपंथाचें अनुकरण करून) वाढविण्याचें कार्य चांगलें केलें. तिसरे पुरुष म्हणजे धुळ्याचे श्री० शंकर श्रीकृष्ण देव हे होत. यांनीं समर्थांचे व सांप्रदायिकांचें वाङ्मय शोधून प्रकाशांत आणून आणि ठिकठिकाणचीं कागदपत्रें धुंडून समर्थसंप्रदायाच्या अभ्यासास चांगलीच चालना दिली. समर्थांचें वाङ्मय देवांच्या पूर्वी ज्यांनीं प्रसिद्ध केलें त्यांचेही उपकारच आहेत. समर्थचरित्रांपैकीं गिरिधरांचा समर्थ-प्रताप, हनुमानस्वामींची बखर व आळतेकरांनीं अर्वाचीन पद्धतीनें लिहिलेलें गद्यात्मक श्रीसमर्थचरित्र हीं विशेष महत्त्वाचीं व अभ्यसनीय आहेत. देवांनीं जांब व धुळें येथें जीं समर्थस्मारकें लोकसाह्याने उभारलीं आहेत तीं फार उत्तम आहेत व तेथील टापटीप व निरलसपणाची व्यवस्था प्रशंसनीय आहेत. देवांचे मराठी वाङ्मयावर व विशेषतः समर्थसांप्रदायिकांवर मोठे उपकार झाले आहेत. श्रीसमर्थांच्या विस्तृतचरित्राची घोषणा त्यांनीं १०।१५ वर्षें केली असून त्याकडे महाराष्ट्रीयांचें लक्ष लागून राहिलें आहे. ज्या पिढीच्या मनांत त्यांनीं समर्थचरित्राविषयीं उत्कट आकांक्षा उत्पन्न केली आहे त्या पिढीला देवकृत समर्थचरित्र वाचावयास मिळालें पाहिजे.

## ४ सुमनहार

'रामदास आणि रामदासी' ह्या मासिकाच्या द्वारें रा. देव यांनीं एक चांगला उपक्रम केला आहे. रामदासी वाङ्मयाच्या अभ्यासकांना एकत्र आणून त्यांचे चर्चात्मक व चिकित्सात्मक लेख ते 'सुमनहार' या नांवाखालीं प्रसिद्ध करितात व त्यांचीं पुढें पुस्तकें बांधतात. अशा दोन हारांचीं दोन पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत व तिसरा हार गुंफण्याचें काम चालू आहे. पहिल्या हारांत

३५ सुमनें गुंफलीं आहेत, दुसऱ्यांत १३ व तिसऱ्या हाराचीं आतांपर्यंत १६ सुमनें प्रगट झालीं आहेत. यांतील कांहीं सुमनें खरोखरीच चांगलीं आहेत. (१) श्रीभगवद्गीता व समर्थांची कविता– ज. स. करंदीकर, (२) महाराष्ट्रीय संतपरंपरा व श्रीसमर्थ रामदास– प्रो. मा. दा. आळतेकर, (३) भाग्यप्राप्तीचा समर्थोपदिष्ट मार्ग– अनंतदास रामदासी, (४–५) देव आणि देवालय व अध्यात्मनिरूपण— गोपाळराव गोगटे, (६) चढता वाढता देवाचा उत्सव, चढतें वाढतें राज्य–भास्कर वामन भट, (७।८) श्रीसमर्थांचे विद्यामठ व रामायण– त्रिंबक रामकृष्ण गद्रे, (९) श्रीसमर्थ व त्यांचा योग— त्र्यंबकशास्त्री खरे, (१०) श्रीसमर्थ मला कसे भासतात?– शंकर श्रीकृष्ण देव, (११) संगीतमूर्ति श्रीसमर्थ रामदास–गणपतराव सनईवाले, (१२ व १३) श्रीसमर्थोचा विद्याव्यासंग व श्रीसमर्थोची उपासना–बालस्वामी, (१४) वारकरी संप्रदाय व समर्थसंप्रदाय– प्रो. सोनोपंत दांडेकर. एकंदर ६४ लेखांपैकीं १५।२० लेख अभ्यासकांनीं लिहिलेले आहेत. कांहीं मारून मुटकून व 'देवांचा शब्द मोडवेना' म्हणून लिहिले आहेत! पण वरील सर्व लेख उत्कृष्ट असून ते समर्थवाङ्मयाच्या अभ्यासानेंच स्फुरलेले आहेत. कोठें कोठें मात्र सांप्रदायिक अभिमानाचा अतिरेक आढळतो!

हा अभिमान एका दृष्टीनें क्षम्य म्हणतां येईल. उपास्यदेवतेची स्तुति करण्याचा प्रत्येकास हक्क आहे, पण इतर उपास्यांवर शिंतोडे उडविल्या-शिवाय किंवा त्यांची निंदा केल्याशिवाय हें करितां येणें शक्य नाहीं काय? रामदासांची व त्यांच्या कामगिरीची महती कोण जाणत नाहीं? पण त्यांची प्रशंसा करितांना वारकरी संतांची व त्यांच्या कामगिरीची हेटाळणी कशाला करायला पाहिजे? ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकोबाराय हे काय महाराष्ट्रास समर्थांसारखेच प्रिय व पूज्य नाहींत? व त्यांची कामगिरी काय कमी महत्त्वाची आहे? आम्ही ह्या हेटाळणी करणाऱ्या विद्वानांच्या आक्षेपांस प्रस्तुत खंडांत (पृष्ठ १९४–२०४) उत्तर दिलें आहे. पहिल्या सुमनहारांत प्रो० दांडेकर यांनींही आमच्यासारखेंच उत्तर दिलें आहे. शंकरराव देव हुषार वकील व सात्त्विक कार्यकर्ते आहेत, ते स्वतः संतांच्या विरुद्ध कांहीं बोलत किंवा लिहीत नाहींत, तथापि त्यांचा एक लाडका सिद्धांत आहे. समर्थ हे महाराष्ट्रधर्माचे आद्य संस्थापक व दासबोध हा महाराष्ट्रधर्माचा आद्य ग्रंथ ते

मानतात व रामदास हे महाराष्ट्राचे एकमेव राष्ट्रगुरु आहेत असा पुकारा करितात. हें तत्त्व मान्य करणाऱ्यांचे 'समर्थसंघ' ते सांप्रत जागोजाग स्थापन करीत आहेत. देवांशीं माझा थोडा मतभेद आहे. समर्थांचें विशिष्ट कार्य मलाही मान्य आहे, तथापि मी ज्ञानेश्वरी हा महाराष्ट्रधर्माचा आद्य ग्रंथ मानतों व ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, रामदास व तुकाराम हे पांचही महापुरुष महाराष्ट्राचे राष्ट्रगुरु आहेत असें मानतों. ह्या महाराष्ट्रपंचायतनाच्या कर्तबगारीवर व पुण्याईवर महाराष्ट्राचा भाग्योदय आधारलेला आहे असें मला निश्चित वाटतें. कित्येक अभिनव रामदासाभिमानी देशभक्तांनीं तर वारकरी संतांवर हत्यारच उपसलेलें आहे. प्रथम सुमनहारांतील दहावें फूल लक्ष्मण बळवंत भोपटकर यांनीं गुंफलें आहे, त्यांत त्यांनीं शिवरामपंत परांजपे यांजप्रमाणें विठ्ठल देव व वारकरी संत यांच्याविषयीं इतके गलिच्छ व विषमय फूत्कार सोडले आहेत कीं, त्यांचा उल्लेख करणेंही माझ्या जिवावर येतें. त्यांचें खंडण करावयाचें तर एक स्वतंत्र ग्रंथच होईल. तितकी मला सवड व इच्छाही नाहीं. इतरही कित्येक सुमनांतून वारकरी संतांविषयींची तुच्छताबुद्धि प्रगट झालेली आहे. पण तो विषय मी येथें नुसता उल्लेखून सोडून देतों. देवांची समर्थविषयक कामगिरी फार मोठी आहे व सुमनहारांची कल्पना उपयुक्त आहे. त्यांत वरीलसारखीं घाणेरीचीं फुले त्यांनीं गुंफूं नयेत एवढीच मित्रभावानें त्यांना सूचना करितों.

## ५ श्रीसमर्थांची वाङ्मयसेवा

समर्थांच्या वाङ्मयाशीं माझा जिव्हाळ्याचा परिचय ४५ वर्षांचा म्हणजे जवळजवळ अर्धशतकाचा आहे! मी कॉलेजचा विद्यार्थी असतांनाच दासबोध माझ्या हातीं प्रथम १८९४ मध्यें पडला. १८९५ सालीं डेक्कन कॉलेजांत माझें रामदासांवर व्याख्यान झालें. १८९६ सालीं समर्थांची एक जुनी तसबीर माझे हातीं आली व ती पाहतांच उपासनाबुद्धीचें प्रेम चित्तांत प्रथमच उदित झालें. त्या वर्षी नारायणाच्या कृपेनें माझ्या विचारास परमार्थबुद्धीचें वळण लागलें व परमार्थबुद्धीनें दासबोध व तुकोबांचा गाथा मी वाचूं लागलों. हा सारा इतिहास मी 'चरित्रचंद्र' ह्या माझ्या आत्मचरित्रपर ग्रंथांत दिला असल्यामुळें ( पृ० ६९ ते ७२ ) येथें त्याची पुनरुक्ति करीत नाहीं. १८९९ सालीं मी बी. ए. झालों त्याच्या आधींच श्रीदासबोधाचीं १०८ पारायणें

झालीं होतीं व त्या वेळेपासून दासबोधाशीं माझा अंतरंगपरिचय होत गेला. माझ्या ‘ मुमुक्षु ’ साप्ताहिकांत ( १९०८ ) **रामदासी बुवा** ह्या मथळ्याखालीं मी ९ लेखांक लिहिले, त्यांत समर्थांचें राजकारण चालू परिस्थितींत कसें अमलांत आणावें हें संवादरूपानें सांगितलें होतें. ती लेखमाला फार लोकप्रिय झाली असें पाहून तिचें स्वतंत्र पुस्तक काढिलें. त्या पुस्तकाच्या ३ हजार प्रति ६ महिन्यांत उडाल्या ! पुढील वर्षीच सरकारनें तें पुस्तक जप्त केलें व त्या पुस्तकावरची जप्ती अद्यापीही उठली नाहीं ! त्याच वर्षी **‘ मारुतिउपासना’** प्रसिद्ध केली. तिच्या पाच आवृत्त्या निघाल्या आहेत ! १९१६ सालीं मनाचे श्लोक सार्थ व सभाष्य मीं तयार केले व ते पुस्तक पुढें ( १९३४ सालीं ) स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलें. शेवटीं ह्या **मनोबोधावर** समाप्तीचे वेळीं ५ श्लोक लिहिले. त्यांतील पहिले दोनच पुढें देत आहें —

**समर्थांचिया पूर्ण कारुण्य पोटीं**
**मुखीं वाहिली बोधगंगा चखोटी ।**
**जना उद्धराया मना बोध केला**
**भवभ्रांति-अंधार तो दूर नेला ॥ १ ॥**

**सुधेचे मुखीं दोनशें पांच घांस**
**कसे माउलीनें दिले चार मास ।**
**अवस्था मनीं लाविली सर्वसंगीं**
**रघूत्तंस खेळे सदा अंतरंगीं ॥ २ ॥**

नाशिक मुक्कामीं पंचवटींत श्रीरामसन्निधींत **श्रीदासबोधाचा समग्र अर्थ** एक वर्ष लिहीत होतों व तो **‘ सार्थ दासबोध ’** ह्या नांवानें प्रसिद्ध केला आहे. नुसता अर्थच क्रमानें अनेकवार वाचीत गेल्यामुळें दासबोध उलगडण्यास मदत झाली असें अनेक वाचक-पाठकांनीं मला कळविलें आहे. **‘ समर्थसंजीवनी ’** ऊर्फ **‘ रामदासी वेंचे ’** ह्या पुस्तकाची त्याच्या नांवावरूनच कल्पना येणार आहे. हें पुस्तक नागपूर युनिव्हर्सिटीनें बी. ए. च्या अभ्यासक्रमांत ४ वर्षें लाविलें होतें. त्याच्या प्रति सध्यां उपलब्ध नाहींत **‘ नवविधाभक्ति ’** हें पुस्तकही दासबोधांतील नवविधाभक्तीच्या निरूपणार्थच लिहिलें आहे. श्रीसमर्थ व दासबोध यांवर गेल्या ४० वर्षांत ठिकठिकाणीं माझीं

शेंकडों व्याख्यानें व प्रवचनें झालीं आहेत. अध्यात्मविषयाची मला चांगली ओळख प्रथम दासबोधानेंच करून दिली. पुढें तो ज्ञानभक्तीचा आनंद ज्ञानेश्वर व नाथतुकोबा यांच्या ग्रंथांच्या संगतींत मला पोटभर लुटावयास मिळाला. ह्या कारणास्तव ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम व रामदास हे सारेच मला अत्यंत प्रिय आहेत. ह्यांचे उपकारभार मजवर फार मोठे आहेत, व त्यांच्या चरणीं मस्तक लवविल्यावांचून त्यांचे उतराई होण्याचा दुसरा मार्ग नाहीं.

## ६ प्रार्थना

प्रस्तुतच्या 'रामदास–खंडा'चीं ५८० पृष्ठें लिहून छापूनही निघालीं आणि वरील भयानक आजाराचा प्रादुर्भाव झाला. त्यांतून अद्याप मी पूर्णपणें सुटलों नाहीं, पण श्रीरामकृपेनें सुटेन अशी उमेद आहे. 'समर्थांचें राजकारण' हें प्रकरण लिहावयाचें राहिलें होतें, तें गेल्या आश्विन महिन्यांत लिहून पूर्ण केलें; पण त्या परिश्रमानें दुखण्यानें पुन्हा उलट खाल्ली व २–३ जोराचे हल्ले आले, तथापि प्रस्तुत ग्रंथ लौकर पुरा करून द्यावा अशी प्रस्तुत खंडाचे प्रकाशक श्री. के. भि. ढवळे यांची मागणी आली त्यामुळें ग्रंथ पुरा करून द्यावा लागला. शेवटचें 'रामदासी कवि' हें प्रकरण माझे मित्र महाराष्ट्रभाषाभूषण **ज. र. आजगांवकर** यांनीं लिहिलें याबद्दल त्यांचाही मी फार आभारी आहें. प्रस्तुत रामदासखंड गेल्या दासनवमीला प्रसिद्ध व्हावयाचा पण प्रकाशक १ वर्ष थांबले हे त्यांचे उपकार आहेत. ग्रंथलेखनाची वृत्ति अद्याप जिरली नाहीं. वाङ्मयाच्या इतिहासाचे उर्वरित २ खंड लिहून प्रसिद्ध करावयाची इच्छा आहे. तसेंच माझ्या उपासनेच्या संतोषार्थ (१) श्रीरामचरितामृत व (२) श्रीकृष्णचरितामृत हे दोन गद्य ग्रंथ लिहिण्याची अत्यंत उत्कंठा आहे. तूर्त ही लेखणी श्रीरामचरणीं ठेवीत आहें, ती रामरायानेंच पुन्हा हातीं देऊन राहिलेलें काम पूर्ण करून घ्यावें अशी त्याच्या चरणीं नम्र प्रार्थना आहे.

श्रीक्षेत्र नाशिक,
श्रीरामदासनवमी,
शक १८६१

संतचरणरज
**लक्ष्मण रामचंद्र पांगारकर**

# विषयानुक्रमणिका

## ४. रामदासी कवि (पृ० ६६५-७९३)

# मराठी वाङ्मयाचा इतिहास

## तिसरा खंड

## [ रामदास-खंड ]

### १ तुकोबारायांची प्रभावळ

१ तुकोबांचे सोळा शिष्य. २ पहिले अकरा टाळकरी. ३ **बहिणाबाई**—बहिणाबाईची योग्यता, जन्मकथा, गोवत्साचा लळा, तुकोबांचा ध्यास व उपदेश, प्रत्यक्ष भेटीचा आनंद, मंबाजीबोवा, पतिभक्तीची कसोटी, गुरुपरंपरा व कवित्व. ४ **रामेश्वरभट**—चरित्र, भक्तिपंथ विरुद्ध कर्मठता, तुकोबांचें गुणगौरव. ५ **कचेश्वर ब्रह्मे**—चरित्र, चमत्कार व कवित्व. ६ **तुकयाबंधु कान्होबा**—पहिलें भांडण, पश्चात्ताप, शोक व देवाशीं प्रेमकलह, कान्होबाचे अभंग. ७ **निळोबाराय पिंपळनेरकर**—चरित्र, तुकोबांवरील निष्ठाप्रेम, कवित्वस्फूर्ति, गुरुपरंपरा, निळोबांची अभंगवाणी, निळोबांच्या पश्चात्, एक गोष्ट.

#### १ तुकोबांचे सोळा शिष्य

तुकोबांचा प्रभाव त्यांच्या हयातींतच अनेक भाविक लोकांवर पडला व पुढें तर साऱ्या महाराष्ट्रावर त्यांची कीर्तिप्रभा फांकली. सारा महाराष्ट्र त्यांच्या शिष्यवर्गात सामील झाला. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम व रामदास हें पंचक महाराष्ट्राला गुरुस्थानीं आहे. रामदासांचा संप्रदाय अंमळ वेगळा समजला जात असला तरी पहिले चौघे एकाच वारकरी संप्रदायाचे महामहंत आहेत. त्यांच्यांत वेगळीक नाहीं. असो. तुकोबांनीं अनेक कष्ट सोसून जें परमार्थधन मिळविलें तें त्यांनीं सर्व लोकांना उदारपणें दिलें. पुष्पाचा परिमळ बाहेर पडूं लागला, कीं त्याच्याभोंवतीं भ्रमरांच्या

झुंडी जमायच्याच, त्याप्रमाणें तुकोबांच्या मुखांतून अमृतवाणी स्रवूं लागली तोंच शिष्यवर्ग त्यांच्याभोंवतीं जमूं लागला. त्यांचे पहिले टाळकरी महादाजीपंत कुळकर्णी, गंगाराम मवाळ व संताजी तेली हे होत. त्यांच्या पाठोपाठ गवरशेट वाणी, कोंडोपंत लोहोकरे, मालजी गाडे हे आले. तुकोबांचें आजोळ लोहगांव येथील अंबाजीपंत कुळकर्णी, कोंडपाटील, नावजी माळी व शिवबा कासार हे चौघे मंडळांत सामील झाले. चिखलीचे मल्हारपंत कुळकर्णी हेही येऊन मिळाले. तुकोबांचा धाकटा बंधु कान्होबा पश्चात्ताप पावून तुकोबांच्या टाळकऱ्यांत समाविष्ट झाला. रामेश्वरभट अनुतापानें शुद्ध होऊन मंडळांत येऊन मिळाल्यावर तुकोबांची वाणी अधिकच प्रभावशाली झाली. ह्या तेरा मंडळीपैकीं तुकयाबंधु कान्होबा व रामेश्वरभट यांचे कांहीं कवित्व उपलब्ध आहे. बहिणाबाई व कचेश्वर ब्रह्मे यांची व यांच्या कवित्वाची माहिती अलीकडेच उपलब्ध झाली आहे. ह्या सर्वांवर कडी निळोबांची आहे. त्यांचे अभंग पहिल्या-पासून प्रसिद्ध आहेत, पण त्यांच्या चरित्राची माहिती पूर्वी नव्हती. हे एकंदर सोळा झाले. ह्या षोडशकलांनीं युक्त अशा तुकोबाचंद्राचा शीतल व सुखदायी प्रकाश जगतीतलावर पडला आहे. रामेश्वरभट, तुकयाबंधु, बहिणाबाई, कचेश्वर, निळोबाराय यांच्या चरित्राशीं तुकोबांचें चरित्र संलग्न असल्यामुळें व यांच्या मुखानें तुकोबांची कीर्ति अधिक प्रसृत झाल्यामुळें यांची व यांच्या कवित्वाची अंमळ विस्तृत माहिती देणे अवश्य आहे. पण तत्पूर्वीं आपण इतरांची थोडी तोंडओळख करून घेऊं. आपण प्रयासानें मिळविलेलें परमार्थधन जगाला वांटणारे व परंपरा चालविणारे शिष्य असावेत अशी तुकोबांना सहजच इच्छा होती. ‘ देवा ऐसा शिष्य देईं, ’ व ‘ कृपा करावी भगवंतें ’ ह्या २ अभंगांत ‘ ब्रह्मज्ञानी, भावाचा आगळा, भक्तिप्रेमाचा पुतळा, ’ ‘ माझें व्रत चालविणारा ’ असा शिष्य त्यांनीं देवापाशीं मागितला आहे ! ‘ व्हावा ब्रह्मज्ञानी गुंडा । ज्याचा तिहीं

लोकीं झेंडा ' असा शिष्य निळोबांच्या रूपानें त्यांना मिळाला, पण तो त्यांच्या हयातींत मात्र मिळाला नाहीं !

१ महादाजीपंत कुळकर्णी देहूकर, २ गंगाराम मवाळ कडूसकर, ३ संताजी तेली जगनाडे, ४ गवरशेट वाणी सुदुंब्रेकर, ५ मालजी गाडे येलवाडीकर, ६ मल्हारपंत कुळकर्णी चिखलीकर, ७ कोंडोपंत लोहोकरे, ८ शिवबा कासार, ९ नावजी माळी, १० अंबाजीपंत लोहगांवकर, ११ कोंडपाटील खांदवे, १२ बहिणाबाई, १३ रामेश्वरभट वाघोलीकर, १४ तुकयाबंधु कान्होबा, १५ कचेश्वर ब्रह्मे चाकणकर, १६ निळोबाराय पिंपळनेरकर.

ह्या १६ पैकीं ९ ब्राह्मण आहेत, तेव्हां एकादा दुष्ट मंबाजी निघाला तरी ' ब्राह्मणांनीं तुकोबांचा छळ केला ' हे म्हणणें अयथार्थ आहे. रामेश्वरभट व शिवबा कासाराची बायको या दोघांपासून त्यांना त्रास झाला म्हणून ब्राह्मण व कासार यांनीं त्यांना छळले असे जातितः म्हणणें अन्याय्य होय !

## २ पहिले अकरा टाळकरी

**१ महादाजीपंत देहूकर**—हा देहूचा जोशी कुळकर्णी तुकोबांचा पहिल्यापासूनचा निष्काम भक्त. याच्या व तुकोबांच्या घराण्याचा पूर्वापार स्नेहसंबंध होता. तुकोबांच्या संसाराकडे काळजीकाळ्यानें पाहणें, जिजाईला प्रसंगीं दाण्यागोट्याची किंवा पैशाअडक्याची मदत करणे, हरतऱ्हेची पूसतपास करून आपत्काळीं तुकोबांना सांभाळणें हें काम वडीलपणाच्या प्रेमानें महादाजीपंत करीत असत.

**२ गंगाराम मवाळ कडूसकर**—तुकोबांचे पहिले ध्रुपदी व अभंगलेखक दोन—एक हे गंगाराम मवाळ व दुसरे संताजी तेली. मवाळ हे देहप्रकृतीनें शांत, सोशिक व प्रेमळ होते. यांचें आडनांव महाजन होतें तरी यांच्या सौम्य स्वभावामुळें तुकोबा यांना प्रेमानें ' मवाळ ' म्हणत. हे

सावकारी सराफीचा धंदा करीत. हे यजुर्वेदी वत्सगोत्री ब्राह्मण तळेगांवीं राहत. यांची चुकलेली म्हैस तुकोबांनीं सांपडून दिली म्हणून यांचा प्रथम परिचय झाला. यांनीं सिद्धान्नाचें ताट डोक्यावर घेऊन तुकोबांस जेवपण्या-साठीं डोंगरावर नेलें पण तुकोबांनीं त्यांस हें पुन्हा करूं दिले नाहीं. तुकोबांस माघ शुद्ध १० स गुरूपदेश झाला. तन्निमित्त तुकोबांच्या आज्ञेनें यांनीं कडूस येथें १५ दिवस उत्सव सुरू केला तो अद्याप त्यांचे वंशज करीत असतात. या उत्सवाचे दिवसांत मत्राळांस सोयरसुतक येत नाहीं व त्यांचे घरांत मूल देवी येऊन मरत नाहीं असें म्हणतात. कडूस येथें दशमीपासून पांच दिवस पालखी, भजन, छबीना निघत असतो. गंगारामबोवांचे वंशज कडूस, तळेगांव व पुणें येथें आहेत. गंगारामबोवांच्या हातच्या वह्या मिळाव्यात म्हणून मी कडूस येथें जाऊन प्रयत्न केले पण सफळ झाले नाहींत !

**३ संताजी तेली जगनाडे**—यांच्या हातच्या वह्या उपलब्ध आहेत. भावे यांनीं त्यांवरून तुकोबांचे १३०० अभंग छापले आहेत. यांचें उपनांव सोनवणे. हे मूळ चाकणचे राहणारे. यांचे वंशज अलीकडे तळेगांवीं राहतात. गंगारामबोवा व संताजी यांचा स्वभावसादृश्यामुळें मोठा स्नेह होता. असे प्रेमळ, निष्ठावंत व दुराशारहित ध्रुपदे—प्रेमभरानें देहभान विसरून भजनांत नाचणारे व तुकोबांना जीवेंभावें अनुसरणारे—साथ देण्यास तयार झाल्यामुळें तुकोबांच्या कीर्तनास अधिकच रंग भरूं लागला. तुकोबा व संताजी यांची आपसांत आणभाक झाली होती कीं, ‘ आपणांपैकीं जो आधीं मरेल त्यानें मागें राहील त्यास मृत्युसमयीं मूठमाती द्यावी ! ’ तुकोबा अदृश्य झाल्यावर कांहीं वर्षांनीं संताजी वारले. त्यांचे आप्तेष्ट मूठमाती देण्यास तयार झाले तरी तोंड झांकेना तेव्हां तुकोबांस प्रगट व्हावें लागलें ! त्यांनीं संताजीपुत्र बाळाजी यास १३ अभंग दिले. यांतला एक अभंग असा आहे —

**चारितां गोधनें । माझें गुंतलें वचन ॥ १ ॥**
**आम्हां येणें झालें । एका तेलियाकारणें ॥ २ ॥**
**तीन मुष्टी मृत्तिका देख । तेव्हां लोपविलें मुख ॥ ३ ॥**
**आलों म्हणे तुका । संत न्यावया विष्णुलोका ॥ ४ ॥**

भंडारा डोंगराच्या पायथ्याशीं सुदुंब्रें गांवीं संताजींची समाधि आहे.

**४ गवरशेट वाणी सुदुंब्रेकर**—हा कानडा लिंगाईत वाणी सुदुंब्रें येथें राहत असे. प्रपंचव्यवहाराकडे दुर्लक्ष करूनही हा तुकोबांच्या सेवेंत रत असे. हा मोठा सत्त्वस्थ असे. तुकोबांच्या प्रयाणानंतर हा मृत्यु पावला. तत्पूर्वी त्यानें रामेश्वरभट व कान्होबा यांस बोलावून जवळ आणलें व त्यांच्या तोंडून तुकोबांचे अभंग ऐकत यानें सुखानें प्राण सोडला. त्या वेळीं तुकोबांच्या रूपाच्या ध्यासांत हा इतका मग्न झाला होता कीं शेवटीं तुकोबा प्रगट झाले. याने स्वहस्तानें त्यांचे कपाळीं बुका लावला व गळ्यांत हार घातला. तुकोबा दुसऱ्या कोणास दिसले नाहींत, पण सर्वांनीं अधांत्रीं हार लोंबतांना पाहून तुकोबांच्या नांवाचा जयघोष केला व तत्क्षणींच गवरशेटनें देह ठेवला !

**५ मालजी गाडे येलवाडीकर**—हा तुकोबांचा जावई म्ह० भागीरथीचा पति. उभयतांची तुकोबांवर अत्यंत भक्ति होती व देहूस गोपाळपुरा येथें भागीरथीची मूर्ति तुकोबांच्या प्रयाणस्थानाजवळ स्थापिलेली अद्याप आहे. तुकोबांनीं मालजीस पाठास गीता दिली होती.

**६ मल्हारपंत चिखलीकर**—हाही तुकोबांच्या नेमनिष्ठ टाळकऱ्यांपैकीं एक होता.

**७ कोंडोपंत लोहोकरे पुणेंकर**—हाही ध्रुपद धरीत असे. यानें एकदां आपला काशीयात्रेस जाण्याचा बेत तुकोबारायांस कळविला व 'तुमचें वचन मानणारे पुष्कळ सुखवस्तु गृहस्थ आहेत तरी त्यांजकडून मला देशावर करून द्या,' अशी त्यांची प्रार्थना केली. तुकोबांनीं आसना-

खालीं हात घालून त्यास एक होन दिला व तो खर्च करितांना त्यांतला एक पैसा ठेवीत जा म्हणजे त्या पैशाचा दुसऱ्या दिवशीं होन होत जाईल असें सांगितलें. याप्रमाणें त्याची काशीयात्रा झाली असें सांगतात ! त्याच्या-बरोबर तुकोबांनीं भागीरथी, विश्वेश्वर व विष्णुपद यांस अर्पण करण्यासाठीं तीन अभंग दिले ते गाथ्यांतून प्रसिद्ध आहेत. ते चांगले आहेत—

१

**परिसें वो माते माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवितसें ॥ १ ॥**
**भागीरथी महादोषनिवारिणी । सकळां स्वामिणी तीर्थांचिये ॥ २ ॥**
**जितां मुक्ति मोक्ष मरणें तुझ्या तीरीं । आहिक्य परत्रीं सुखरूप ॥३॥**
**तुका विष्णुदास संतांचें पोसणें । वाक्पुष्प तेणें पाठविलें ॥ ४ ॥**

२

**तुम्ही विश्वनाथ । दीन रंक मी अनाथ ॥ १ ॥**
**कृपा कराल ते थोडी । पायां पडतों बराडी ॥ २ ॥**
**काय उणें तुम्हांपासीं । मी तों अल्पचि संतोषी ॥ ३ ॥**
**तुका म्हणे देवा । प्रेम भातुकें पाठवा ॥ ४ ॥**

३

**पिंड पदावरी । दिला आपुलिये करीं ॥ १ ॥**
**माझें जालें गयावर्जन । फिटलें पितरांचें रिण ॥ २ ॥**
**केलें कर्मांतर । बोंब मारिली हरिहर ॥ ३ ॥**
**तुका म्हणे माझें । भार उतरलें ओझें ॥ ४ ॥**

महाशिवरात्रीच्या पर्वकाळीं वारकऱ्यांचें कीर्तन प्रायः यांतील ‘ तुम्ही विश्वनाथ ’ ह्या अभंगावर होतें; मी स्वतः चारदोन वेळां केलें आहे ! तुकोबांनीं मरणोत्तर होणारी क्रिया आपली आपणच केली याबद्दल तिसऱ्या अभंगाच्या जोडीला त्यांचे आणखी कांहीं अभंग आहेत !

**८ शिवबा कासार**—तुकोबांचें आजोळ लोहगांवीं असल्यानें व लोहगांवकरांची तुकोबांवर अत्यंत निष्ठा असल्यानें त्यांचें तेथें जाणें वारंवार होत असे. तेथें तुकोबांच्या कीर्तनास फार रंग चढे. सारा गांव व

आसपासचे शेंकडो लोक येत, पण शिवबा येत नसे—उलट घरीं बसून तुकोबांची यथेच्छ निंदा करी! त्याचा नष्ट, कृपण व कुटिल स्वभाव प्रसिद्ध होता; पण असाही मनुष्य कीर्तनगंगेंत शुद्ध होऊन तरून जावा असें तुकोबांच्या दयार्द्र अंतःकरणास वाटे. पहिल्या दिवशीं तो भिडेनें आला, दुसरे दिवशीं अर्धवट खुषीने, तिसरे दिवशीं आवडीनें व पुढील चार दिवस अत्युत्कटतेनें आला आणि सातवे दिवशीं त्यांचा भक्त बनला! तुकोबांच्या जिवंत वाणीचा प्रताप येवढा लोकोत्तर होता, कीं तिनें सातच दिवसांत एका कृपण जीवास भगवत्प्रेमरंगांत मिळवून घेतलें!

**गाढवाचें घोडें। आम्ही करूं दृष्टीपुढें ॥**
**तुका म्हणे खळ। करूं समर्यीं निर्मळ ॥**

* * *

**गर्जों हरीचे पवाडे। मिळवूं वैष्णव बागडे ॥**
**पाझर रोकडे। काढूं पाषाणांमध्यें ॥**

या त्यांच्या बाण्याप्रमाणें त्यांनीं ह्या पाषाणाला पाझर फोडले! तुकोबांच्या संगतीनें शिवबाचें रूपान्तर झालें. त्यामुळें शिवबाची बायको फार चिडली. आपला नवरा पैशाचा निदिध्यास करायचा सोडून विठोबाचा निदिध्यास करूं लागला हें त्या संसाररत स्त्रीस आवडलें नाहीं! तिनें तुकोबांचा सूड उगवण्याचा निश्चय केला. शिवबाने तुकोबांस सत्कारानें घरीं बोलावलें तेव्हां त्यांच्या स्नानाचे वेळीं ह्या कृत्येनें त्यांच्या अंगावर आधणाचें कढत पाणी ओतलें! लगेच त्यांचे अंगावर फोड आले, तेव्हां त्यांनीं देवाचा धांवा केला—

**जळे माझी काया लागला वोणवा। धांव रे केशवा मायबापा ॥१॥**
**पेटली सकळ कांति रोमावळी। नावरे हे होळी दहन झालें ॥ २ ॥**
**फुटोनियां दोन्ही भाग होऊं पाहे। पाहतोसी काये हृदय माझें ॥३॥**
**घेऊनी जीवन धांवें लवलाहीं। कवणाचें कांहीं न चले येथें ॥ ४ ॥**
**तुका म्हणे माझी तूं होसी जननी। आणिक निर्वाणीं कोण राखे ? ॥५॥**

पुष्पाहून अगर लोण्याहूनही मृदु अशा सत्पुरुषांचा खलदुर्जनांकडून अगर अज्ञजनांकडून असा छळ झालेला ऐकला किंवा पाहिला म्हणजे मनुष्यस्वभावाविषयीं काय वाटतें तें सांगतां येत नाहीं ! पण ईश्वरी योजनाच अशी आहे. आघात सोसल्याशिवाय हिऱ्याची पारख कशी व्हावी ? त्या मूढेनें या करुणानिधीच्या अंगावर कढत पाणी ओतल्याचें ऐकतांच आपल्या अंगाला चटके बसल्यासारखें होतें ! तुकोबांच्या मनाला क्रोध आला नाहीं पण देवाचें चित्त कळवळलें. तिच्या सर्वांगावर कोड फुटलें ! तुकोबांस स्नान घातलें होतें तेथील चिखल तिच्या सर्वांगास चोळण्यास रामेश्वरभटांनीं सांगितलें. त्याप्रमाणें शिवबानें केलें व ती बरीही झाली. पुढें अनुतापानें तप्त होऊन तीही तुकोबांच्या भजनीं लागली.

९ **नावजी माळी**—तुकोबांवर याची भक्ति बसल्यावर सुवासिक पुष्पांच्या उत्तमोत्तम माळा गुंफून हा नित्य कीर्तनसमयीं देवाच्या व तुकोबांच्या गळ्यांत घालीत असे ! ‘ नावजी माळी भक्त भोळा। अखंड गुंफून सुमनमाळा। घालीत तुकयाच्या गळां। सप्रेमकळा त्या अर्पिली ’ असें गोपाळबावांनीं म्हटलें आहे. ‘ सूत कांतून गोंवरीवर। पुष्पांच्या माळा करीतसे फार। कीर्तनीं बैसती द्विजवर। तयांसी हार ते घाली ’ असें महीपतबाबाही म्हणतात. तात्पर्य, प्रेमभावानें अनेक हार प्रत्यहीं गुंफून आणावे, पांडुरंगाच्या, तुकोबांच्या व प्रमुख श्रोत्यांच्या गळ्यांत ते घालावे व तुकोबांच्या मागें कीर्तनप्रसंगीं टाळ, ध्रुपद धरावें हीच त्याची सेवा होती. बागेंत खुरपतांना व झाडांस पाणी घालतांना हा नामस्मरण करी. हा आला, कीं आमचा प्राणविसांवा आला असें तुकोबा लडिवाळपणानें म्हणत व श्रोत्यांत विमलभावाच्या हास्यलहरी पसरत !

१० **अंबाजीपंत लोहगांवकर**—हा लोहगांवचा जोशी कुळकर्णी तुकोबांच्या चरणीं लागून कृतार्थ झाला. सर्व श्रोत्यांत तो मोठा एकाग्र

होत असे. तो लोहगांवीं कीर्तनांत गुंग झाला असतांना एकदां मध्यरात्रीं त्याच्या घरीं मुलानें राम म्हटला ! मुलाच्या आईला दुःखाचा उमाळा येऊन तिनें प्रेत कीर्तनांत आणून टाकलें व नवऱ्यावर व तुकोबांवर सडकून पुष्पांजळी वाहिली ! तेव्हां तुकोबांच्या तोंडून अभंग निघाला—

**अशक्य तों तुम्हां नाहीं नारायणा । निर्जीवा चेतना आणावया ॥१॥**
**मागें काय जाणों स्वामीचे पवाडे । आतां कां रोकडे दावूं नये ? ॥ध्रु०॥**
**थोर भाग्य आम्ही समर्थाचे कासे । म्हणवितों दास काय थोडें ? ॥२॥**
**तुका म्हणे माझे निववावे डोळे । दावूनि सोहळे सामर्थ्याचे ॥ ३ ॥**

कडाक्याचें भजन झाल्यावर तुकोबांच्या प्रेमळ विनवणीप्रमाणें देवाला तो मृतपुत्र उठवणें भाग पडलें ! भक्ताच्या चरित्रांत असले चमत्कार होतात, पण त्यांचें हें बीज लक्षांत ठेवले पाहिजे कीं, हें मी केलें किंवा माझ्यामुळें सिद्ध झालें अशा अभिमानाची लहरीही त्यांच्या चित्ताला स्पर्शत नाहीं, आणि भक्त जेव्हां पूर्ण निरभिमानी होतो व सर्व कार्य नारायणाचेंच समजतो, तेव्हांच त्याची वाणी देवाला खरी करून दाखवावी लागते !

११ **कोंडपाटील खांदवे**—तुकोबा लोहगांवास जेव्हां जेव्हां जात तेव्हां तेव्हां त्यांचें बिऱ्हाड याचे घरीं असे. हा टाळ धरणारा उत्कृष्ट होता. “ ज्याचे घरीं तुकयाचें बिढार । जो टाळ धरित्यांत परम चतुर । तो कोंडपाटील लोहगांवकर । ठेवून माथां कर पूर्ण केला ॥ ” असें गोपाळबावांनीं म्हटलें आहे.

## ३ बहिणाबाई

तुकोबांच्या शिष्यमंडळांत बहिणाबाईचें महत्त्व विशेष आहे. त्यांनीं आपल्या आयुष्याचीं कांहीं वर्षें देहूस तुकोबांच्या संगतींत काढलीं,

**बहिणाबाईंची योग्यता**

त्यांचीं कीर्तनें ऐकिलीं व त्यांच्या कृपेनें स्वानुभवसंपन्न होऊन आत्मचरित्रपर व उपदेशपर अनेक अभंगही लिहिले. निळोबा व महीपतबाबा यांच्यापेक्षांही बहिणाबाईंच्या वचनांना एका दृष्टीनें अधिक प्रामाण्य येतें, कारण तुकोबांच्या रूपगुणांचें वर्णन व त्यांचें स्तवन त्यांनीं तुकोबांना प्रत्यक्ष पाहून व त्यांच्या सत्समागमाचा आनंद स्वतः भोगून स्वानुभवाच्या वाणीनें केलें आहे. बहिणाबाईंच्या अभंगांचा गाथा रा. उमरखाने यांनीं छापला आहे पण मला अभंगांची मूळ वही बहिणाबाईंच्या गांवीं म्हणजे शिवपूर उर्फ शिऊर येथें बहिणाबाईंचे घरींच मिळाली आहे. शिऊर येथें बहिणाबाई व निळोबांचे शिष्य शंकरस्वामी यांच्या समाधि आहेत व त्यांचे वंशजही तेथेच राहतात. बहिणाबाईंचे नांव तुकोबांच्या शिष्यांत आहे व रामदासस्वामींच्या शिष्यांतही आहे; तेव्हां बहिणाबाई वारकरी कां रामदासी, कां बहिणाबाई दोन, अशा शंका निघाल्या होत्या; पण मी स्वतः शिऊर येथें तीन दिवस राहून सर्व पोथ्या व कागदपत्र पाहून आलों असून हा निश्चितार्थ सांगतों कीं, बहिणाबाई एकच आहेत. त्यांना तुकोबांचा उपदेश होता व उत्तरवयांत त्या समर्थांच्या संगतीला असून समर्थांनीं त्यांना दिलेली प्रादेशमात्र (वीतभर) दास–मारुतीची मूर्तीही त्यांच्या राममंदिरांत पूजेंत आहे. बहिणाबाईंनीं आपल्या अभंगांत तुकोबांचा अनुग्रह आपणास कसा झाला तें सविस्तर वर्णिलें आहे. बहिणाबाईंचा अधिकार फार मोठा आहे. त्यांची वाणी प्रासादिक व अनुभवाची असून तिच्यांत विलक्षण साधेपणा, प्रेमळपणा व ओज आहे. त्यांच्या गाथ्यांत त्यांच्या आत्मचरित्राचे ५३ व निर्याणाचे ३५ असे लहानमोठे ८८ अभंग आहेत व याशिवाय ज्ञान, भक्ति, वैराग्य, ब्रह्म-माया, विठ्ठल, पंढरी, त्रिगुण, अनुताप, संत, सद्गुरु, मनोबोध, ब्राह्मण व त्यांचें कर्म, पतिव्रताधर्म, प्रवृत्ति-निवृत्ति इ० विषयांवर

त्यांचे ४०० अभंग असून ही वाणी तुकोबांच्या शिष्याला शोभण्यासारखी प्रासादिक व निःस्पृहपणाची आहे. बहिणाबाई योगभ्रष्ट होत्या. पूर्वसुकृत-बलानें त्यांना या जन्मीं तुकोबांचा अनुग्रह व समर्थांचा समागम घडून त्या मुक्तकोटीस पोंचल्या. प्रयाणाच्या अभंगांत त्यांनीं आपल्या तेरा जन्मांची हकीकत सांगितली असून प्रयाणाच्या वेळच्या अवस्थेचें उज्ज्वल वर्णन केलें आहे. त्यांचे कांहीं श्लोक, आरत्या व पदेंही आहेत. 'ज्ञानप्रकाश,' 'वेद आणि ब्रह्म,' 'प्रवृत्ति-निवृत्तीचें भांडण,' 'कुडी आणि आत्मा यांचा संवाद' या विषयांवरील अभंगांत त्यांची तीव्र चिकित्साबुद्धि व परमार्थाचा श्रेष्ठ अधिकार स्पष्ट दिसतात. बहिणाबाई मोठी पुरुषार्थी होती. ज्ञानेश्वरांची बहीण मुक्ताबाई, नामदेवांची दासी जनाबाई, तुकोबांची शिष्यीण बहिणाबाई व समर्थांची वेणाबाई ह्या मराठी वाङ्मयाकाशांत चमकणाऱ्या चार तेजःपुंज तारका आहेत. आणखीही कांहीं स्त्रियांनीं पद्यरचना केलेली आहे, पण ह्या चौघींची अध्यात्मज्ञानदृष्टीनेंही योग्यता थोर आहे. त्यांत **मुक्ताबाई** व **जनाबाई** ह्या ब्रह्मचारिणी होत्या व **वेणाबाई** ही बालविधवा होती, पण **बहिणाबाईनीं** प्रपंच परमार्थ दोन्ही साधले. त्यांचा विवाह त्यांच्या वयाच्या पांचव्या वर्षीं ३० वर्षें वयाच्या बिजवराबरोबर झाला ! तोही स्वभावानें कोपिष्ट व थोडा तऱ्हेवाईकच होता. तथापि बाईनीं त्याची प्रसन्नता राखून व त्याला स्वतःचा त्याग करूं न देतां प्रेमानें संभाळून घेऊन थोडीफार परमार्थाची गोडी लावली व आपला पातिव्रत्यधर्म उत्तम प्रकारें जागवून परमात्मपद जोडलें यांत बहिणाबाईचा पराक्रम चांगलाच सिद्ध होतो. नाथांना स्त्री स्वभावतःच अनुकूल मिळाली होती. तुकोबांना 'कर्कशा' बाईलेच्या संगतींत व प्रतिकूल परिस्थितींत प्रपंच कसाबसा साखून श्रेष्ठपद गांठावें लागलें. जिजाबाईनें त्यांच्या स्वभावाशीं व त्यांनीं तिच्याशीं मिळतें घेतल्याचें दिसत नाहीं, पण बहिणाबाईनीं आपल्या अभिजात पातिव्रत्यधर्मानें वागून पतीशीं मिळतें घेतलें व प्रपंच

परमार्थ दोन्ही यथासांग साधले, यावरून त्यांच्या प्रेमळ विवेकविचारांची धन्यता वाटते.

बहिणाबाईचें आत्मचरित्र मोठें बोधक व मनोवेधक आहे. आपल्याकडे प्राय: आत्मचरित्र लिहिण्याची पद्धत नाहीं. शकमिति, गुरुपरंपरा व आईबापांचीं नांवें यांपलीकडे फारसें स्वत:बद्दल कोणी कांहीं लिहीत नाहीं. पण बहिणाबाईनीं आत्मचरित्र लिहिलें असून तें भाविकांना व विशेषत: स्त्रियांना मोठें उद्बोधक होणारें आहे म्हणून त्याचें त्यांच्याच वाणीनें विवेचन करितों. त्यांचा जन्म शके १५५० मध्यें वेरूळजवळ असलेल्या देवग्रामीं आउजी कुळकर्णी व त्यांची भार्या जानकीबाई यांच्या पोटीं झाला. ज्योतिष्यानें ही मुलगी ' देवलसी कांहीं होईल भाग्याची । आयुष्याचें बळ फार आहे ' असें जन्मकाळीं भविष्य वर्तविलें व त्याप्रमाणें बहिणाबाईंना ७२ वर्षांचें आयुष्य मिळालें. त्या शके १६२२ मध्यें आश्विन शुद्ध १ स मुक्त झाल्या. आउजी हा वाजसनी शाखेचा यजुर्वेदी ब्राह्मण. त्याचें गोत्र मौनस. त्याला बहिणाबाईच्या पाठीवर दोन पुत्र झाले. देवपूर ( देवगांव ) चे पश्चिमेस पांच कोसांवर शिवपूर ( शिऊर ) आहे. शिऊर येथें रत्नाकर पाठक नांवाचा एक बिजवर होता, त्यानें बहिणाबाई चतुर व चुणचुणीत पाहून तिला मागणी घातली. पण दोघांच्या वयांत अंतर २५ वर्षांचें होतें! पाठकांच्या घरीं शक्ति-उपासना होती व बहिणाबाईचे संस्कार भागवतधर्माचे होते. बहिणाबाई शाक्तांच्या घराण्यांत दिली गेली म्हणूनच बहुधा वारकरी मंडळांत तिच्या अभंगांची प्रसिद्धी नाहीं! घराणें शाक्तांचें तथापि बहिणाबाईची योग्यता तुकोबा व समर्थ ह्या सत्पुरुषांनीं जाणून तिच्यावर अनुग्रह केला. बहिणाबाईचा नवरा वयस्कर व मोठा कोपिष्ट होता, तथापि बहिणाबाईनीं आपल्या श्रेष्ठ पातिव्रत्यधर्मानें त्याला मार्गावर आणलें व उभयतांनीं तुकोबांचा अनुग्रह घेतला. सुशील व प्रेमी बायको नवऱ्याचे स्वभावदोष मनांत न आणतां

**जन्मकथा**

त्याला कशी ताळ्यावर आणते याचें बहिणाबाई हें एक उत्कृष्ट उदाहरण आहे. बहिणाबाईच्या लग्नानंतर ४ वर्षांनीं आउजीवर त्याच्या गोत्रजांनीं मोठा प्रसंग आणला. वृत्तीच्या संबंधाचा कांहीं कलह उत्पन्न झाला त्या वेळीं जांवयानें येऊन रिणबाकी फेडून सर्व मंडळींना घराबाहेर काढलें व बहिणाबाई, त्यांचे यजमान, आईबाप, भावंडें हीं सारीं मध्यरात्रीं घराबाहेर पडलीं व प्रवरासंगम क्षेत्र, नीरा नरसिंगपूर, पंढरपूर, सिंगणापूर, रहिमतपूर इ. स्थळीं राहत राहत कोल्हापुरास आलीं. बहिणाबाईनें आपला पति ' नेटका शाहणा विद्यावंत ' आहे असें म्हटलें आहे.

**ऐसीं वर्षें आकरा जालिया मजलागीं । वाटे संतसंगीं असावेंसें ॥१॥**
**कथा आइकावी पुराणश्रवणीं । ब्राह्मणपूजनीं चित्त रिझे ॥ २ ॥**

कोल्हापुरास ह्या मंडळीचा मुक्काम बहिरंभट अग्निहोत्री याचे घरीं होता. जयरामस्वामी वडगांवकर ह्या सत्पुरुषाचीं कीर्तनें कोल्हापुरास चाललीं होतीं. ' जयराम गोसावी त्याची हरिकथा । नित्य भागवता श्रवण करूं.' तेथें बहिणाबाईला सत्संग व सच्छ्रवण घडलें. जयरामस्वामीकडे मंडळी जातयेत होती. स्वामींनीं बहिणाबाईची निष्ठा व प्रज्ञा ओळखली. " पतिसेवा करीत जा, पतीचें नित्य चरणतीर्थ घेऊन समाधानानें रहा व गीतापठण करीत जा, ' असा त्यांनीं त्यांना उपदेश केला.

**गोवत्साचा लळा**

कोल्हापुरास बहिरंभटाकडे ह्या मंडळीचा मुक्काम असतांना कोणी त्या विद्वान् ब्राह्मणास एका सोमवारीं व्रतप्रसंगानें काळी कपिला गाय शृंगारून दान केली, त्या गाईचें वत्सही तिच्याचसारखें कपिल होतें. बहिरंभटानें ११ व्या दिवशीं ती गाय रत्नाकरपंतास अर्पण केली. गोसेवा घडेल या भावनेनें सर्वांस हर्ष झाला. त्या वत्साला बहिणाबाईचें व बहिणाबाईला वत्साचें परस्पर फार वेड लागलें. मोकळें सोडलें तरी वत्सानें गाईकडे जाऊं नये, सर्वदां बहिणाबाईला चिकटून

असावें, तिनें सोडलें तरच गाईकडे जावें, रात्रीं तिच्या सेजे निजावें, कथेला जवळ उभें रहावें व 'श्रवणकाळीं फुंजावें,' स्नानाला बरोबर जावें, असा त्या उभयतांचा प्रेमा पाहून हें वत्स योगभ्रष्ट असून बहिणाबाईचा त्याचा पूर्वजन्मींचा कांहीं लागाबांधा आहे असें लोक म्हणूं लागले. 'न देखतां वत्स हेही तळमळी' इतकेंच काय पण—

**दळितां कांडितां वाहतांही पाणी । वत्सेंवीण जनीं नावडे हो ॥ २७ ॥**

असा बहिणाबाईलाही त्या वत्साचा ओढा लागला. त्यांचा नवरा जरा रागीट असे. कांहीं रागाने व कांहीं विनोदानें त्यानें म्हणावें, 'बरं झालं, तुला नाहीं मूलबाळ, हाच खेळ खेळत बसा!' बहिणाबाईबरोबर तें वत्स देवळांत जात असे.

**हागे ना तें मुते उभेंचि श्रवण । आयके कीर्तन नामघोष ॥**
**आरती जालिया नमस्कार होती । आपणही क्षिती ठेवी डोकें ॥**

एकदां कांहीं श्रोत्यांनीं त्या वत्साला बहिणाबाईपासून हांकलीत हांकलीत दारापर्यंत नेलें व त्याला ते दाराबाहेर काढून देऊं लागले. तें वत्स बाहेर जाईना व ओरडूं लागलें. इकडे बहिणाबाईलाही रडूं आलें. त्या दोघांनाही एकमेकांपासून हलूं नयेसेंच वाटे, तेव्हां जयरामस्वामींचें चित्त कळवळलें व ते म्हणाले—

**म्हणे आणा त्यासी वत्सासी अंतरीं । काय नाहीं हरी आत्मवेत्ता? ॥**
**कथेलागीं जीव होतो कासावीस । पशू कीं तयास म्हणों नये! ॥**

यानंतर लोकांनीं वत्स बहिणाबाईजवळ आणून बसविलें. जयरामस्वामींना दोघांचेंही कौतुक वाटलें. बहिणाबाईचा पति त्यांजवर रागावला व त्यानें 'धरोनियां वेणी मारिलें यथेष्ट!' तेव्हां बहिणाबाईच्या प्रेमामुळें त्या वत्साला व गाईलाही दुःख झालें. 'न खाती ते तृण न घेती जीवन!' जयरामस्वामींनीं बहिणाबाईच्या नवऱ्यास सांगितलें कीं, 'ही योगभ्रष्ट आहे, हिचें साधनबळ मोठें आहे, तूं हिला कष्टवूं नकोस, ही पतिव्रताधर्मानें

तुझ्याशीं वागून उद्धरून जाईल.' यानंतर त्रयोदशीस वत्साचा देहान्त-समय प्राप्त झाला तेव्हां एक अपूर्व चमत्कार झाला.

**तेथें हिरंभट बोलियेला श्लोक। सहज स्वाभाविक 'मूकं करोति' ॥**
**पूर्वार्ध श्लोकाचा सरतांचि जाण। बोलिलें आपण वत्स तेव्हां ॥**
**'यत्कृपा तमहं वंदे' बोले शब्द। श्लोक उत्तरार्ध वत्स बोले ॥**

ज्ञानेश्वरांनीं रेड्याकडून वेद बोलविले त्यांतलाच हा प्रकार झाला. त्या वत्सानें प्राण सोडला व 'प्राणासवें प्राण जाऊं पाहे माझा' इतका बहिणाबाईस शोक झाला. दिंड्यापताकांसह वत्साचें प्रेत मिरवीत नेलें. वरील चमत्कारानें सर्व कोल्हापूर शहर हलून गेल्यामुळें त्या वत्साचा प्रेतसंस्कार अपूर्व थाटानें झाला. बहिणाबाई तीन दिवस अचेतन पडल्या होत्या. आईबाप व भ्रतार चिंताग्रस्त झाले, पुढे 'उघडोनियां नेत्र पाहे जंव पुढें। तंव दृष्टी पडे पांडुरंग!' देहूस गेल्यावर बहिणाबाईस मुलगी झाली– "बहेणी म्हणे वत्स मेले कोल्हापुरीं। तें आलें उदरीं ऐसें वाटे." मुलीचें नांव काशी ठेवले. पुढें त्यांस मुलगा झाला त्याचे नांव 'विठ्ठल' ठेवले.

**तुकोबांचा ध्यास व उपदेश**

तुकोबांची ख्याती देवानें उदकांत वह्या रक्षिल्या व रामेश्वरभटासारखें धेंड त्यांच्या पायाशीं आले, ह्या वेळेपासून महाराष्ट्रभर झाली. त्यांची कीर्ति व अभंग कोल्हापुरापर्यंत पसरले. जयरामस्वामींच्या कीर्तनांत तुकोबांचे अभंग ऐकून बहिणाबाईच्या विमल अंतःकरणावर त्यांचा ठसा उमटला. स्त्रिया स्वभावतः भावनाप्रधान असतात, त्यांत तुकोबांची जिवंत वाणी–पाषाणही उलविणारी--बहिणाबाईच्या कानांवर पडल्यापासून त्यांचें चित्त तुकोबांच्या चरणीं लीन झालें. तुकोबाराय त्या वेळीं (शके १५६२) देहूस आपल्या पुण्यप्रभावानें गाजत होते. तुकोबांच्या भेटीचा बहिणा-बाईस ध्यास लागला.

(१)

**तुकोबाचीं पदें अद्वैतें प्रसिद्धें । तयांच्या अनुवादें चित्त झुरे ॥**
**ऐसीं ज्याचीं पदें तो मज भेटतां । जीवास या होता तोष बहु ॥**
**तुकोबाचा छंद लागला मनासी । ऐकतां पदांसी कथेमध्यें ॥**
**तुकोबाची कानीं ऐकेन हरिकथा । होय तैसें चित्ता समाधान ॥**
**तुकोबाचें ध्यान करूनी अंतरीं । राहें त्या भीतरीं घरामाजी ॥**
**बहेणी म्हणे तुका सद्गुरु सहोदर । भेटतां अपार सुख आहे ॥**

(२)

**मत्स्य जैसा जळावांचुनी चरफडी । तैसी ते आवडी तुकोबाची ॥**
**अंतरींचा साक्ष असेल जो प्राणी । अनुभवें मनीं जाणेल तो ॥**
**संचितासी दग्ध करी ऐसा कोण । सद्गुरूवांचून जाण मना ॥**
**बहेणी म्हणे माझा जाऊं पाहे जीव । कां बा न ये कींव तुकोबा रे ॥**

आर्त चातकाची कींव करुणामेघाला येणार नाहीं असें कसें होईल ? सात अहोरात्र तुकोबांचें ध्यान चाललें तेव्हां ' सातविये दिनीं ' कार्तिक वद्य ५ रविवार ( शके १५६२ ) ते दिवशीं तुकोबांनीं त्यांना स्वप्नांत उपदेश दिला, व गीता हातीं दिली—

**आनंदलें मन चिद्रूप कोंदलें । उठोनि बैसलें चमत्कारें ॥**
**मंत्र आठवती तुकोबास्वरूपें । स्वप्नामाजी कृपा पूर्ण केली ॥**
**अमृत पाजिलें चवी अनारिसी । साक्षी ज्याची त्यासी मनामाजी ॥**
**बहेणी म्हणे ऐसी कृपा सद्गुरूची । तुकारामें साची पूर्ण केली ॥**

* * * *

**तयाचिया पदें होतसे विश्रांति । त्याची देहाकृति विठ्ठलची ॥**
**तुकोबाचीं सर्व इंद्रियें चालक । पांडुरंग देख सत्य आहे ॥**

**प्रत्यक्ष भेटीचा आनंद**—बहिणाबाईंना दुसऱ्यांदा तुकोबांचें स्वप्नदर्शन झालें. पुढें त्या पतिसह देहूस आल्या.

**मायबापबंधु भ्रतारासहित । इंद्रायणी जेथ तेथ आलों ॥**
**करूनियां स्नान पांडुरंगीं भेटी । आनंदली सृष्टि अंतरंगें ॥**
**तुकोबा आरती करित होते तेथें । नमस्कारें स्वस्थ चित्त केलें ॥**
**स्वप्नीं जो देखिला तेंचि ध्यान तेथ । देखिलें नेमस्त पूर्णदृष्टी ॥**

बहिणाबाईचें हृदय आनंदानें भरून आलें. वाटेंत तुकोबांचा शिष्य कोंडाजी लोहोकरे भेटला त्यानें त्यांना घरीं भोजनास बोलावलें व तुकोबांच्या गोष्टी सांगून 'नित्य हरिकथा होतसे देउळीं। तुकोबा माउली वैष्णवांची' असे उद्गार काढले. बहिणाबाई रोज तुकोबांच्या कीर्तनास जाऊं लागल्या. त्यांचें भाग्य उजळलें. त्यांच्या पतीनेंही तुकोबांस 'अंतरंग भावयुक्त' साष्टांग नमस्कार घातला याचाही बहिणाबाईस आनंद झाला.

**देउळांत कथा सर्वकाळ होत। श्रवण करित दिनराती ॥ १ ॥**
**तुकोबाची कथा वेदांतील अर्थ। पावे माझें चित्त समाधान ॥ २ ॥**
**तुकोबाचें ध्यान पूर्वी कोल्हापुरीं। जें स्वप्नामाझारीं देखियेलें ॥ ३ ॥**
**तेंच ध्यान डोळां प्रत्यक्ष देखोनी। आनंद लोचनीं हेलावत ॥ ४ ॥**
**दिनरात्रीं निद्रा नये तिळभरी। तुकोबा अंतरीं प्रवेशला ॥ ५ ॥**
**बहेणी म्हणे येती सुखाचे डोलावे। जाणती अनुभवें जाणती ते ॥६॥**

**मंबाजी बोवा**

पण सुखांत मिठाचा खडा असा मंबाजी देहूसच होता. मंबाजी-पासून तुकोबांना मनस्वी त्रास होत होताच. तुकोबांचें होतें निष्काम भजन व मंबाजीनें मांडली होती परमार्थाची दुकानदारी! त्याचें घर तुकोबांच्या घराला लागूनच होतें. तुकोबा लोकांचें हृदय भक्तिप्रेमामृतानें भरीत होते व हा आपलें घर पैशानें व हृदय लोकविद्वेषानें भरीत होता! 'वाईटानें भले। हीनें दाविलें चांगलें ॥ तुका म्हणे भले। ऐसें नष्टांनीं कळलें,' या तुकोबांच्याच उक्तीप्रमाणें मंबाजीच्या द्वेषामुळें तुकोबांचा संतपणा जगाच्या प्रत्ययास आला. तुकोबांची म्हैस एकदा कुडाला रेटून मंबाजीच्या बागेंत घुसली तेव्हां त्या चांडाळानें तें निमित्त करून तुकोबांस मरेमरेतों मारलें होतें. दुष्टांच्या कथा लिहितांनाही शिसारी येते! बहिणाबाईची मंडळी देहूस आली ती नेणतेपणानें मंबाजीच्या वाड्यांतच बिऱ्हाडानें राहिली! योगायोग.

त्यांची तुकोबांविषयींची पूज्यबुद्धि व मंबाजीच्या मनांत तुकोबांविषयीं मत्सर !

**मंबाजी गोसावी भ्रताराप्ती म्हणे । 'तुम्ही शिष्य होणें स्त्रियेयुक्त ॥**
**माझा हेत आहे तुम्हीही हरिभक्त । दिसतां विरक्त उभयवर्ग' ॥**

दोन चार वेळ हें ऐकून रत्नाकर पाठकांनीं 'आम्हीं पूर्वींच तुकोबांचे अनुग्रही आहोंत' असें त्यास सांगितलें ! मग काय मंबाजीच्या अंगाचा भडका झाला ! 'मारूं पाहे घात चिंतूनीयां.'

**म्हणे हे ब्राह्मण गुरु तरी शूद्र । हेंचि तया छिद्र सांपडलें ॥**

पुण्यांत आपाजी गोसावी नामक विख्यात पुरुष राहत असे त्याला मंबाजीनें पत्र पाठवून कळविलें कीं, तुकोबा शूद्र असून देवळांत कथा करितात व ब्राह्मण त्याच्या पायां पडतात.

**रामेश्वरभट अतियोग्य थोर। तेहि नमस्कार करिती त्यासी ॥**
**डोबाळे मांडून स्वधर्म लोपला। पाहिजे रक्षिला स्वामिराजें ॥**

असो. हे स्वामी व मंबाजी यांनीं त्यांचा फार छळ मांडला तेव्हां महादाजीपंत कुळकर्णी यांनीं बहिणाबाईच्या मंडळीस आपल्या घरीं बिऱ्हाडास नेलें. बहिणाबाईच्या गाईस मंबाजीने कोंडून ठेवलें व सोटे मारले ते वळ तुकोबांच्या पाठीवर उठले !

**तुकोबाचा पार वर्णीलसा कोण। कलियुगीं जाण प्रल्हाद हा ॥**
**सर्वांतरसाक्षी करूनियां स्तुति। स्वसुखे रमती आपुलिया ॥**
**बहेणि म्हणे लोक बोलती सकळ। तुकोबा केवळ पांडुरंग ॥**

बहिणाबाईचे भक्ताभक्तवर्णनाचे १४ अभंग आहेत ते पाहतां तुकोबा व मंबाजी ह्या दोन मूर्ति त्यांचेपुढें होत्या असें दिसते. 'निंदा वादभेद वाढवी मत्सर। नित्य करकर संतांसवें' हें मंबाजीचें वर्णन यथार्थ आहे ! त्या म्हणतात, 'निंदक हरिभक्त हे माझे सांगाती' व जो तो आपलें स्वभावकर्म करीत आहे म्हणून दोषी कोणीच नाहीं !

यानंतर बहिणाबाईच्या दर्शनास पुष्कळ लोक जमूं लागले. त्यांच्या

**पतिभक्तीची कसोटी**

नवऱ्यास हें विषम वाटूं लागले! ' म्हणे ही बाईल मरे तरी बरें। ईस कां पामरें भेटताती!' त्यानें तिचा त्याग करून अन्य तीर्थास निघून जाण्याचे मनांत आणलें! बहिणाबाईवर हा निकराचा प्रसंग आला. सुशील भार्या देवपिशी झाली तरी तिची पतिनिष्ठा कशी जाज्वल्य असते, हें ह्या वेळच्या अत्युत्कृष्ट अभंगांवरून कोणाच्याही ध्यानीं येईल. परमार्थासाठीं, देवासाठीं, जगदुद्धारासाठीं, पतिदेवतेचा अवमान करणारी एकही स्त्री आजवर हिंदु समाजांत झाली नाहीं. हिंदु राष्ट्रांत दैवी संपत्तीचें संगोपन व संवर्धन पुरुषवर्गापेक्षांही स्त्रीवर्गानें ज्यास्त कळकळीनें केले आहे. असो. पतीने आपला त्याग करावयाचा बेत केला आहे हें समजतांच बहिणाबाईच्या चित्तांत पतिप्रेमानें प्रचंड उसळी मारली, व त्या उसळीनें साक्षात् देवाला हलवून जागें केले व त्यांवरचा बिकट प्रसंग टळला! ह्या प्रसंगाचे बहिणाबाईचे तीन अभंग हीं तीन दिव्य मौक्तिकें आहेत व तीं आमच्या स्त्रीवर्गाने निरंतर कंठांत धारण करावींत. महाराष्ट्रवाङ्मयाचा रत्नहार या अभंगांवांचून अपूर्ण राहील!

१

**स्वधर्म आपुला रक्षूनीयां मनें। शास्त्राच्या श्रवणें देव साधूं ॥ ३ ॥**
**भ्रताराची सेवा तोचि आम्हां देव। भ्रतार स्वयमेव परब्रह्म ॥ ४ ॥**
**भ्रतारवचनासी उलंघीन जरी। पापें माझ्या शिरीं पृथिवीचीं ॥ ६ ॥**
**धर्म अर्थ काम मोक्षासी अधिकार। भ्रतार साचार वेद बोले ॥ ७ ॥**
**भ्रतारसेवनें सांग हा परमार्थ। भ्रतारेंचि स्वार्थ सर्व आहे ॥ ६ ॥**
**सद्गुरु भ्रतार साधन भ्रतार। हा सत्य निर्धार अंतरींचा ॥ ११ ॥**
**बहेणी म्हणे देवा भ्रताराचे मनीं। तुवां प्रवेशोनि स्थिर केलें ॥ १२ ॥**

२

**भ्रतार गेलीया वैराग्य घेऊनी। पांडुरंगा जनीं जिण काय ॥ १ ॥**
**प्राणेवीण देह काय पावे शोभा। रात्रीवीण प्रभा चंद्राचिये ॥ २ ॥**

**भ्रतार तो जीव देह मी आपण । भ्रतार कल्याण सर्व माझें ॥ ३ ॥**
**भ्रतार तो रवी मी प्रभा तयासी । वियोग हा त्यासी केविं घडे ॥ ५ ॥**
**बहेणी म्हणे माझ्या जीवाचा निर्धार । बोलें पैं विचार हरि जाणे ॥ ६ ॥**

३

**भ्रतारें वैराग्य घेतलियावरी । जीव हा निर्धारीं देईन मी ॥ १ ॥**
**वत्सासाठीं देह अचेतन पडे । हा तंव रोकडें परब्रह्म ॥ २ ॥**
**भ्रताराचें तीर्थ न सांपडे जरी । अन्न खाय तरी मांस आम्हां ॥ ३ ॥**
**भ्रतारदर्शनावीण जाय दीस । तरी तेची राशी पातकाच्या ॥ ६ ॥**
**बहेणी म्हणे मज आज्ञाचि प्रमाण । ब्रह्म सनातन स्वामी माझा ॥ ७ ॥**

बहिणाबाईना या एकनिष्ठ पतिभक्तीचें फळ मिळालें. त्यांच्या पतीचें जाणें त्याच्या आकस्मिक आजारामुळें राहिलें. सात दिवस तो बेशुद्ध होता. पुढें शुद्धीवर आल्यावर त्याला अनुताप झाला. एका वृद्ध ब्राह्मणानें त्यास येऊन सांगितलें कीं, ' निरपराधी स्त्रीचा त्याग व छळ करणें पापावह आहे.' त्याचा आजार पुढें नाहींसा होऊन तो खडखडीत बरा झाला.

**गुरुपरंपरा**

बहिणाबाईना उपदेश तुकोबांचा होता तेव्हां त्यांचे सद्गुरु तुकोबा होत हें आपण पाहिलेंच आहे, पण ही परंपरा मागें कोठपासून आली हें पाहिलें पाहिजे. त्यांचा गुरुपरंपरेचा अभंग प्रसिद्ध आहे त्यावरून त्या व अर्थात् तुकोबाही ज्ञानेश्वरांच्या परंपरेंतले होत हें दिसून समाधान होतें. त्या अभंगांत आदिनाथ-मत्स्येंद्रनाथ-गहिनी-नाथ-निवृत्तिनाथ-ज्ञाननाथ-येथपर्यंतची परंपरा ज्ञानेश्वरींत जशी दिली आहे तशीच दिली असून—

**तेथोनी ज्ञानेश पावले प्रसाद । झाले ते प्रसिद्ध सिद्धासनी ॥ ५ ॥**
**सच्चिदानंद बाबा भक्तीचा आगर । त्यासी अभयवर ज्ञानें केला ॥ ६ ॥**
**पुढें विश्वंभर शिवरूप सुंदर । तेणें राघवीं विचार ठेविलासे ॥ ७ ॥**
**केशव चैतन्य बाबाजी चैतन्य । झालेसे प्रसन्न तुकोबासी ॥ ८ ॥**
**एकनिष्ठ भाव तुकोबाचे चरणीं । म्हणोनी बहिणी लाधलीसे ॥ ९ ॥**

विश्वंभरापूर्वीचीं किंवा नंतरचीं ५।७ नांवें विशेष परिचयाचीं किंवा महत्त्वाचीं नसल्यामुळें गाळलेलीं आहेत हें उघड आहे. ज्ञानेश्वरपरंपरे-तलेच तुकोबा आहेत हें पाहून 'ज्ञानोबा माउली तुकाराम' हें भजन करणाऱ्या वारकऱ्यांस आनंदच होईल. ज्ञानेश्वर-नामदेव-एकनाथ-तुकाराम ही एकच परंपरा आहे असें सांगणारा बहिणाबाईचा एक अभंग आहे तो असा—

**संतकृपा जाली । इमारत फळा आली ॥ १ ॥**
**ज्ञानदेवें रचिला पाया । उभारिलें देवालया ॥ २ ॥**
**नामा तयाचा किंकर । तेणें रचिलें आवार ॥ ३ ॥**
**जनार्दनी एकनाथ । खांब दिला भागवत ॥ ४ ॥**
**तुका जालासे कळस । भजन करा सावकाश ॥ ५ ॥**
**बहेणी फडकती ध्वजा । निरूपण केलें वोजा ॥ ६ ॥**

यांतील पहिल्या पांच चरणांचाच एक अभंग कल्पून तो तुकोबांच्या नांवावर खपविला जात आहे, पण तुकोबा स्वतःसच या भागवतधर्मरूपी इमारतीचा कळस विनयामुळें कधींच म्हणणार नाहींत. यामुळें हा अभंग तुकोबांचा नसून बहिणाबाईचाच आहे असें वाटतें. तो बहिणाबाईच्या मूळ गाथ्यांत वरीलप्रमाणेंच दिला आहे. बहिणाबाईच्या अभंगांवर वरील संतांची थोडीशी पण तुकोबांची विशेष छाप पडलेली आहे. बहिणा-बाईच्या ज्या १० आरत्या आहेत त्यांत सद्गुरु, विठ्ठल, ज्ञानेश्वर व राम यांवर कांहीं आहेत. त्यांची **सद्गुरूवरची एक आरती** फारच बहारीची असून ती लोकप्रिय झाली पाहिजे. तिचीं चार कडवीं देतों —

**सद्भावाचें आसन हृदयीं अभेदबुद्धीनं ।**
**आनंदाच्या उदकें केलें चरणक्षालन ॥**
**दृश्य द्रष्टा दर्शन यांचें दिधलें आचमन ।**
**निर्हेतुक मन केलें भाळीं तोचि चंदन ॥ १ ॥**

जय देव जय देव जय सद्गुरु माहेरा।
आरती ओवाळूं अभयकर दातारा॥ ध्रु०॥
बोधाच्या अक्षता रंगविल्या श्रवणानें।
समर्पिलीं उत्तम अष्टहि भावांचीं सुमनें॥
अहं निरसूनियां धूप जाळुनियां करणें।
ज्ञानाच्या प्रकाशें बुद्धिदीप उजळणें॥ २॥
पूगीफल फोडुनियां फलेच्छेचा निजत्याग।
रंगलीं इंद्रियें रसने रंगविला रंग॥
दक्षणा त्वंपद तत्पद दोहींचा भंग।
मंत्रपुष्प सोहं याचा ज्ञानीं विनियोग॥ ४॥ जय०॥
नीरांजन निर्धारें मानससाधनें सरलीं
अभेदप्रदक्षिणा तेथें वाचा निवर्तली॥
ऐसी या हृद्भुवनीं पूजा सद्गुरुची केली।
बहेणि आनंदानें शेष सेवुनियां धाली॥ ५॥ जय०॥

बहिणाबाईंचा थोर पारमार्थिक अधिकार या एका आरतीने जाणत्यांच्या ध्यानांत येणार आहे. ज्ञानेश्वरीवरील पुढील आरतीही सुंदर आहे. ही मला मिळालेल्या गाथ्यांत आहे, छापलेली नाहीं.

जय माय ज्ञानदेवी। शब्दरत्नजान्हवी।
प्राशितां तोय तुझें। सुख होतसे जीवीं॥ १॥
अनर्घ्य साररत्नें। सिंधु मंथुनी गीता।
काढिली भूषणासी। वैराग्यभाग्यवंता॥ २॥
अमृतसार ओवी। शुद्ध सेवितां जीवीं।
जीवचि ब्रह्म होती। अर्थ ऐकतां तेही॥ ३॥
नव्हती अक्षरें हे। निजनिर्गुणभुजा।
बहेणि क्षेम देती। अर्थ ऐकतां वोजा॥ ४॥

बहिणाबाईंची वाणी प्रासादिक आहे. वेदान्ताचें गांभीर्य व भक्तीचा

**कवित्व**

जिव्हाळा दोन्ही गुण तिच्या ठायीं आहेत. बहिणाबाईंचे कांहीं श्लोक आहेत. उदाहरणार्थ—

### पंढरी

शेषाचे शिखरीं विराट नगरी नांदे महा सुंदरी
तद्गर्भी मकरी सुधामृतझरी चंद्रावती दूसरी।
तीच्या पैलतिरीं उभा विटवरी ब्रह्मांडसंस्था धरी।
ऐसी पुण्यपुरी नसेल दुसरी ते पंढरी भूवरी ॥ १ ॥

### राम सोडूं नको

शास्त्राभ्यास नको श्रुती पढुं नको तीर्थासि जाऊं नको
योगाभ्यास नको मखादिक नको दानें व्रतें तीं नको।
पापाचें भय मानसीं धरुं नको येमासि शंकूं नको
ज्याच्या हो स्मरणें पतीत तरती तो राम सोडूं नको ॥

'शिवस्तुति' या नांवाचें एक श्लोकबद्ध प्रकरण प्रसिद्ध आहे. त्याच्या शेवटीं अगदीं असाच श्लोक आहे; फक्त शेवटच्या चरणांतील 'राम' या शब्दाऐवजीं 'शंभु' हा शब्द वापरला आहे.

**ब्राह्मण कोणास म्हणावें?**—यावर बहिणाबाईंचे ४३ अभंग आहेत. ते ब्राह्मणांनीं अवश्य पाहिले पाहिजेत. 'ब्राह्मणांचे मुखीं सदा वसे वेद,' 'ब्राह्मणांचे मुखीं तृप्त होय देव,' 'चहूं वर्णांमाजी ब्राह्मण वरिष्ठ,' इ. प्रकारें ब्राह्मणांचें आधीं गौरव केले आहे. मंबाजीबोवा आणि एकनाथस्वामी हे जातीनें ब्राह्मणच पण कावळा—गरुड, खद्योत—सूर्य, गाढव—गाय, धोतरा—तुळसी हे सारे एकाच मापाने मोजतां येत नाहींत. 'जीव, देह, जाती, वर्ण, कर्म, धर्म' हे शोधून 'खरा ब्राह्मण कोण' तें ठरविले पाहिजे. ब्राह्मणपण कशांत आहे? '**जीव**' ब्राह्मण म्हणावा तर 'सर्वांठायीं जीव सारिखाचि एक। पशुपक्षी देख चांडाळादि।' **देहच** ब्राह्मण म्हणावा तर 'पंचभूतें सहजें सर्वांठायीं.' बाल्यादि **अवस्था** सर्वांच्याच देहाला आहेत. 'बहेणि म्हणे देह ब्राह्मण तो नव्हे। विवेकवैभवें विचारितां.' आतां **वर्ण** हाच ब्राह्मण म्हणावा तर गौर तो ब्राह्मण, आरक्त तो क्षत्रिय, पीत तो वैश्य व कृष्णवर्ण तो शूद्र असें कांहीं आढळत

नाहीं, म्हणजे देहाचा वर्ण हें कांहीं ब्राह्मणत्वाचें गमक नाहीं. **यातीला** ब्राह्मण म्हणावें तर 'ऋष्यशृंग जाला मृगीचिये पोटीं। गौतम शेवटीं कुशास्तरणीं.' असेच जंबुक, वाल्मीक, व्यास, ऊर्वशी-उदरीं जन्मलेला वसिष्ठ, नारद—तात्पर्य 'बहेणि म्हणे जाति नव्हेचि प्रमाण। ब्राह्मणाची खूण वेगळीच!' ब्राह्मण म्हणजे **पंडित** म्हणावा तर 'क्षत्रिय वैश्य शूद्र ब्राह्मणादि सर्व। पांडित्य अपूर्व करिती अवघे!' पदार्थांचे विवरण करणारे, कवि वगैरे सर्वत्र आहेत फार काय पण अंविधही पांडित्य करणारे आहेत! तात्पर्य पांडित्य हा कांहीं ब्राह्मणत्वाचा निकष नाहीं. **कर्म** ब्राह्मण म्हणावें तर 'आपुलेचि कर्मी वर्तताती वर्ण'—सारेच आपापलीं कर्में करीत आहेत! **धर्म** ब्राह्मण म्हणावा तर सर्वांना धर्म आहेच. 'नाना यज्ञदान अनुष्ठान तप' हेंही ब्राह्मणाचें रूप नव्हे! **जन्म** म्हणाल तर सर्वांचाच जन्म ब्रह्मा-पासून आहे. सर्वच ब्रह्मबीज आहेत! मग ब्राह्मण कोण? 'ब्रह्म जाणे तोचि ब्राह्मण बोलीजे!'

**मोक्षासी अधिकार जयाचेनि शब्दें। जळती प्रारब्धें दृष्टिमात्रें।**

तो खरा ब्राह्मण होय! 'ब्रह्म-ब्राह्मणासी नसे अणुभेद.' जो 'गुणांत असोनी गुणांसी नातळे,' व कामक्रोधादि षट्विकार, जायते वर्धते इ० षट्भाव, ज्यापाशीं नाहींत व संपूर्ण दोषरहित तोच ब्राह्मण!

१

**ब्रह्मभाव देहीं सदा सर्वकाळ। ब्राह्मण केवळ तोचि एक ॥ १ ॥**
**सर्वांभूतीं एक आत्मा देखियेला। शांतीचा ओतिला मूर्तिमंत ॥ २ ॥**
**तोचि एक खरा ब्राह्मण वेदार्थें। आणिक तीं मतें पाखंडाचीं ॥ ३ ॥**
**बहेणि म्हणे जैसें आकाश सर्वत्र। तैसा तो एकत्र जगामाजीं ॥ ४ ॥**

२

**ज्ञाननिष्ठ सदा लक्ष्यीं लययुक्त। चित्त तें विरक्त विषयभोगीं ॥ १ ॥**
**फळाचीच आस नाहीं जयामाजीं। वर्ततो सहजीं स्वधर्मेंचि ॥ २ ॥**
**बहेणी म्हणे दुजें न देखे आणिक। ब्राह्मण तो एक ओळखावा ॥ ३ ॥**

ज्योतिषी, वेदपाठक, अग्निहोत्री, तीर्थाटणी, पंडित, वैदिक, गायत्रीजपे हे वीर्यमात्र ब्राह्मण होत, पण खरा ब्राह्मण ' अनपेक्ष ' असतो. जगांत नाना शास्त्रें, नाना मतें, नाना पंथ आहेत. सगुण, निराकार, सिद्धि, आचार, तत्त्वविचार, इंद्रियजय, वेदपठण, पंचाग्निधूम्रपान, संन्यास, तप, पंचीकरण, अनुष्ठान, देवतावशित्व इ० प्रकारे एकेकावरच टेंकून बसणारे ते सारे एकांगी होत. मोक्षाचा विचार याहून वेगळा आहे. ' वासनेच्या क्षयें मोक्ष तो सांपडे, ' म्हणून ' **ब्राह्मण तो सत्य ब्रह्मवेत्ता.** '

अनेक पारमार्थिक विषयांवर इतर संतांप्रमाणेच बहिणाबाईंचे अभंग आहेत. त्यांचा विचार करूं गेल्यास ग्रंथ वाढेल. ' ज्ञानप्रकाश,' 'वेद आणि ब्रह्म,' ' प्रवृत्ति-निवृत्तींचें भांडण, ' ' कुडी आणि आत्मा यांचा संवाद, ' ' संत-सद्गुरु, ' ' नाम ' यांवरील अभंग वाचकांस परमार्थाचा ठेवा सांपडून देणारे आहेत. माझा सारा लाभ श्रीगुरु तुकारामाच्या कृपेचे फळ आहे असें कृतज्ञतेच्या प्रेमाने बहिणाबाई वारंवार सांगत आहेत.

## ४ रामेश्वरभट

आधीं तुकोबांचा छलक व पुढें त्यांचा एक प्रमुख शिष्य म्हणून

**चरित्र** रामेश्वरभटांचें नांव प्रसिद्ध आहे. रामेश्वरभटांनीं तुकोबांना स्वलिखित अभंगांच्या वह्या इंद्रायणीच्या डोहांत बुडवायला सांगितले, व त्या ब्राह्मणाची आज्ञा शिरसावंद्य मानून तुकोबांनीं बुडविल्या आणि पुढें त्या देवानें तारल्या ही गोष्ट प्रसिद्ध आहे व ह्या प्रसंगींचे तुकोबांचे अभंग व अनुताप पावल्यावरचे रामेश्वरभटांचे चार अभंग सर्व गाथ्यांतून छापलेले आहेत. ' निषेधाचा कांहीं पडला आघात । तेणें मधें चित्त दुखविलें ॥ बुडविल्या वह्या बैसलों धरणे । केले नारायणें समाधान ॥ ' असा ह्या प्रसंगाचा तुकोबांनीं आपल्या चरित्रपर अभंगांत उल्लेखही केला आहे. रामेश्वरभट हे थोर महाविद्वान् ब्राह्मण पुण्याच्या ईशान्येस ९ मैलांवर वाघोली येथें राहत असत. हे मोठे सच्छील, कर्मठ व रामोपासक होते.

त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें पुणें प्रांतावर धर्माधिकार चालविण्याची त्यांना आचार्यपीठांची आज्ञा होती. रामेश्वरभटांचें घराणे पिढीजाद शास्त्र्यांचें होतें. यांचे पणजे कानभट हे कर्नाटकांतून बदामी येथून पुणें प्रांतीं आले व स्थायिक झाले. कानभट—चौंडबा—कानभट—रामेश्वरभट अशी यांची वंशावळ मला वाघोलीस मिळाली. वेदविद्या रामेश्वरभटांच्या घरची होती व त्यांचें वेदशास्त्राध्ययन त्यांच्या पित्यापाशींच झाले होतें. ते मूळचे रामोपासक होते व त्यांच्या पूजेंतली राममूर्ति अद्याप बहुळ येथें आहे. **वाघोलीस व्याघ्रेश्वराचें ( शंकराचें ) प्राचीन स्थान आहे** व तेथील शिवदेवतेपाशीं त्यांनीं अनुष्ठान केलें होतें. घरची पूजाअर्चा संपली, कीं ते रोज व्याघ्रेश्वरापाशीं जाऊन एकादष्णी करीत. रामेश्वरभटांचा वंश अद्याप पुणें प्रांतीं हयात आहे. वाघोली येथें रामेश्वरभटांच्या बंधूचे वंशज आहेत व बहुळ येथें त्यांचा पुत्र विठ्ठलभट याचे वंशज आहेत व त्यांस, ‘ बहुळकर ’ म्हणतात. त्यांच्याकडे वाघोली, भावडी, बहुळ, चिंचोली व शिंदेगव्हाण हीं पांच गांवें जोशीपणाच्या वतनाचीं अजून चालत आहेत. रामेश्वरभट तुकोबांचे शिष्य झाल्यापासून वारकरी मंडळांत ते मान्यता पावले. तुकोबांच्या संगतींत ८।१० वर्षें घालविण्याचें भाग्य यांना लाभलें. तुकोबांच्या प्रयाणसमयीं हे देहूसच होते व अखेरचा शास्त्रार्थ यांनींच काढून दिलेला सर्वांनीं मान्य केला. यांची समाधि वाघोली येथें असून यांची पुण्यतीथ मार्गशीर्ष शुद्ध १४ ही बहुळकर पाळीत असतात.

**भक्तिपंथ—विरुद्ध कर्मठता**

तुकोबा जातीनें शूद्र असून ब्राह्मणही त्यांच्या पायां पडतात, त्यांच्या कवनांत श्रुत्यर्थ उमटतात व इतर सर्व धर्म उडवून ते केवळ नाममहिमा वाढवितात हे तीन आरोप ( भक्तलीलामृत, अ० ३ ) तुकोबारायांवर कर्मठ ब्राह्मणांचे होते. भागवतधर्मीयांविरुद्ध कर्मठांचे हे आक्षेप ज्ञानेश्वरांच्या वेळेपासूनच होते. कर्मठ ब्राह्मण पहिल्यापासून वारकरी पंथावर

आक्षेप काढीत आहेत. त्यांचे हे आक्षेप अजूनही निःशेष झाले आहेत असें नाहीं. भागवतधर्माचा प्रसार सर्व जातींच्या संतांनीं केला आहे, त्यांत जातीला महत्त्व नाहीं, केवळ भक्तीला आहे. कर्मठांना जातिबंधनें कडक रीतीनें पाळायचीं असतात, भक्तिपंथानें जातिभेदाचें प्रस्थ माजवलें नाहीं व त्यावर हत्यारही उपसलें नाहीं! भक्तिपंथ हा जातपातमोडक किंवा वर्णसंकरकारक नाहीं. 'हो कां वर्णांमाजी अग्रणी। जो विमुख हरिचरणीं। त्याहूनि श्वपच श्रेष्ठ मानी। जो भगवद्भजनीं प्रेमळु.' (नाथभागवत, अ० ५–६०) यामुळें श्रेष्ठता जातीस न राहतां भगवद्भक्त तो सर्वश्रेष्ठ असा भागवतधर्माचा सिद्धान्त ठरला. वारकरी जातिभेद विसरून एकमेकांच्या पायां पडतात, संस्कृतांतील ज्ञानरहस्य प्राकृतांत आणतात व त्यामुळें देववाणीची पायमल्ली होते आणि कर्ममार्गावर थोडा फार कटाक्ष ठेवण्यांत येऊन नामसंकीर्तनभक्तीचेंच माहात्म्य सर्वाधिक वाढतें या गोष्टी पूर्वपरंपरेनें चालणाऱ्या कर्मठ लोकांस आजही मानवत नाहींत! कर्मठांचा व भक्तिपंथीयांचा हा विरोध पूर्वापार चालत आलेला आहे. याच कारणासाठीं आळंदी व पैठण येथील कर्मठांनीं ज्ञानेश्वर-नाथांचा पहिल्यापहिल्यांदा छळ केला व तो या वैष्णववीरांनीं धीरोदात्तपणानें सोसून भक्तिपंथाचाच प्रसार केला. तोच प्रसंग तुकोबांवर येऊन ठेपला, व रामेश्वरभट हे त्यास निमित्त झाले. भाषा संस्कृत असो वा प्राकृत असो, ज्या भाषेंत हरीचें गुणगायन आहे तीच पावन आहे, संस्कृत भाषा तेवढी देवानें केली आणि प्राकृत भाषा कां हीं चोरांनीं केली नाहीं, अर्थात् संस्कृत वंद्य व प्राकृत निंद्य हा वृथाभिमान आहे असें नाथांनीं स्पष्ट सांगितले आहे. तुकोबांनीं प्राकृत भाषेंत अभंगरचना करून देवाचे गुणानुवाद गायिले व लोकांस भक्तिज्ञानाचा उपदेश केला हें योग्यच झालें, पण हें जुन्यांचे अभिमानी जे रामेश्वरभट त्यांस रुचलें नाहीं. हा झगडा तुकोबा व रामेश्वरभट यांत नसून कर्मठ व भक्तिमार्गी यांच्यांत होता. संतांनीं आपल्या उपदेशानें,

भगवद्भक्तीनें, शुद्धाचरणानें ह्या झगड्यास उत्तर दिलें; वादविवादांत, तर्कटांत व अन्योन्य छलाच्या तुच्छ मार्गांत ते पडले नाहींत व त्यांनीं शेवटीं दयाक्षमाशांत्यादि आपल्या अद्भुत गुणांनीं प्रतिपक्षावर मात केली. रामेश्वरभट प्रामाणिकपणानें जुन्या मताप्रमाणे वागले व तुकोबांची योग्यता त्यांच्या ध्यानांत येतांच आपला आग्रह सोडून ते तुकोबांस शरण आले व त्यांचा मार्ग त्यांनीं धरिला. रामेश्वरभट म्हणजे मंबाजी नव्हे ! कांहीं क्षुद्र स्वार्थासाठीं त्यांनीं तुकोबांचा छळ केला नाहीं, मताभिमानाने केला. आपलें मत चुकीचें असून तुकोबांचे वागणेंच योग्य आहे अशी खात्री पटतांच त्यांनीं आग्रह सोडला व तुकोबांच्या मताचा अंगीकार केला. प्राकृत भाषेंत अधिकारसंपन्न शूद्रालाही धर्मरहस्य सांगण्यास हरकत नाहीं हें तुकोबांच्या छलानें सिद्ध झालें !

रामेश्वरभटांनीं तुकोबारायांवर चित्ताच्या कळवळ्याने रचिलेले पुढील चार अभंग गाथ्यांत छापले आहेत---

**तुकोबांचें गुणगौरव**

'माझी मज आली०,' 'वैष्णवाची याती०,' 'पंडित वैदिक०' आणि 'भक्त भागवत०' या चार अभंगांत रामेश्वरभटांनीं आपल्याला अनुताप होऊन आपण तुकोबांस शरण गेल्याचें स्पष्ट कबूल केलें असून तुकोबारायांची योग्यता गोड शब्दांत सांगितली आहे. कर्मठता भक्तीला येथें शरण आल्यानें भागवतधर्माच्या उत्कर्षाचे हे अभंग आहेत. रामेश्वरभटांसारखा विद्वान् व धर्मशील ब्राह्मण तुकोबांस शरण आला व त्याने मोकळ्या मनानें व उदार अंतःकरणानें तुकोबांचें गुणगौरव केले हें जितकें तुकोबांस तितकेंच रामेश्वरभटांसही भूषणास्पद आहे. तुकोबांचा पहिला छलक त्यांचा निस्सीम भक्त झाला. भोळ्याभाबड्या स्तुतिपाठकांच्या स्तुतीपेक्षां प्रतिस्पर्धी म्हणून उभा राहिलेल्या विद्वान् मनुष्याने नम्र व निर्मत्सर होऊन केलेल्या गुणगौरवाची योग्यता किती तरी पटींनीं ज्यास्त आहे ! निंदा

करायला आलेला पंडित नम्र होऊन पायाशीं राहिला यांत दोघांचीही योग्यता मोठीच आहे असें स्पष्ट होतें. विद्येचा, कर्मठतेचा व ब्राह्मण-पणाचा अभिमान सोडून रामेश्वरभट तुकोबांच्या पायां लागतात व तुकोबाही त्यांची योग्यता ओळखून त्यांला पायां पडूं न देतां आपणच त्यांच्या चरणाला लागतात हें चित्र किती मनमोहक आहे ! भक्ति ही जातीपेक्षां श्रेष्ठ आहे हें पुन्हा एकवार ठरलें. रामेश्वरभट तुकोबांचे सांप्रदायी झाले तरी तुकोबांची विनीतता तिळमात्र सुटली नाहीं. ते त्यांना लोटांगण घालीत.

**रामेश्वराऐसा ब्राह्मण पाहीं । म्हणवी तुकयाचा सांप्रदायी ।**
**त्यासी लोटांगण घालितसे विदेही । महंती नाहीं किंचित ॥ १८६ ॥**
**आपुला शिष्य देखोनी । तयासी देवासमान मानी ।**
**तोचि जगद्गुरु पूर्ण ज्ञानी । अद्वैतभजनीं निवाला ॥ १८७ ॥**

( भक्तलीलामृत ३७ )

( १ ) रामेश्वरभटांचा पहिला अभंग असा आहे—

**माझी मज आली रोकडी प्रचीत । होऊनी फजीत दुःख पावें ॥ १ ॥**
**कांहीं द्वेष त्याचा करितां अंतरीं । व्यथा या शरीरीं बहुत जाली ॥धृ०॥**

मग ज्ञानेश्वरांनीं मजवर उपकार केला व स्वप्नांत सांगितलें कीं—

**तुका सर्वांश्रेष्ठ प्रिय आम्हां थोर । कां जे अवतार नामयाचा ॥ ३ ॥**

त्याची तुला निंदा घडली म्हणून ही बाधा झाली, तर आतां तूं त्यालाच शरण जा. 'दर्शनें'चि तुझ्या दोषा परिहार होईल ! ज्ञानेश्वरांच्या आज्ञेप्रमाणें मी तुकोबांच्या कीर्तनाला नित्य जाऊं लागलों.

**म्हणे रामेश्वर त्याच्या समागमें । जालें हें आराम देह माझें ॥ ८ ॥**

( २ ) दुसऱ्या अभंगांत तुकोबारायांची योग्यता वाखाणली आहे. 'ब्रह्मानंदतुकें तुळे आला तुका । तो हा विश्वसखा क्रीडे जनीं ' याप्रमाणें तुकोबांना ' विश्वसखा ' म्हणून त्यांची लोकप्रियता वर्णिली आहे. धर्माला

क्षयरोग लागला होता तो या धन्वंतरीनें दूर केला असें त्यांचें यथार्थ वर्णन केलें आहे.

**शास्त्र श्रेष्ठाचार अविरुद्ध क्रिया । तुझी भक्तराया देखियेली ॥**

तुकोबांची क्रिया शास्त्र व श्रेष्ठाचार यांशीं अविरुद्ध आहे असें रामेश्वरभटांना पुढें सहवासानें कळून आलें. 'ब्रह्मऐक्यभावें भक्ति विस्तारिली' म्हणजे अद्वैतसिद्धान्ताला धरून तुकोबांनीं भक्तिमार्गाचा प्रसार केला. 'पूजिले देवद्विज सर्वभावें,' देवब्राह्मणांची मोठ्या भक्तिभावानें त्यांनीं सेवा केली, शांतिपतिव्रतेशीं त्यांनीं लग्न लावले, क्षमा मूर्तिमंत अंगीं दाखविली व दया जीवविली, जगाचा अज्ञानांधकार दूर करण्यासाठीं संत-ग्रहमेळांत तुकोबा हे प्रत्यक्ष सूर्य उगवले आहेत इत्यादि प्रकारीं रामेश्वरभटांनीं ह्या अभंगांत बुवांची स्तुति केली असून मीं 'देहबुद्धि व जात्यभिमान' यांच्या अधीन होऊन तुमचा छळ केला पण 'आतां मी उपेक्षिलों न पाहिजे' अशी तुकोबांची प्रार्थना केली आहे, आणि शेवटच्या चरणांत 'न घडो याचे पायीं बुद्धीचा व्यभिचार' म्ह० तुकोबांविषयीं माझा जो हा शुद्धभाव उत्पन्न झाला आहे याला खंड पाडूं नका असें आपले उपास्य श्रीरामचंद्र यापाशीं मागणे मागितलें आहे.

( ३ ) तिसऱ्या अभंगांत वैष्णवाची जात पाहूं नये, हरिभक्तांना जातीचें दूषणभूषण कांहींच नाहीं असे म्हटले आहे—

**उंच निंच वर्ण न म्हणावा कोणी । जे कां नारायणीं प्रिय जाले ॥२॥**
**चहूं वर्णासी हा असे अधिकार । करितां नमस्कार दोष नाहीं ॥ ३ ॥**

भगवद्भक्ताला ब्राह्मणासकट चारी वर्णांनीं वंदन करावें. यांत दोष नाहीं. शालिग्रामाला पाषाण म्हणूं नये, तो सर्वत्रांस पूज्य आहे. 'गुरु परब्रह्म देवाचा देव' आहे त्यास मानव म्हणूं नये.

**म्हणे रामेश्वर नामीं जे रंगले । स्वयेंचि ते जाले देवरूप ॥ ६ ॥**

( ४ ) चौथ्या अभंगांत तुकोबांचें गौरव प्रेमळवाणीनें केलें आहे. 'पंडित, वैदिक अथवा दशग्रंथी' कोणीही असोत, 'शास्त्रही पुराणें

गीता नित्यनेमें' वाचणारे असोत,' 'परि सरी न पत्रती तुकयाची' म्ह०
तुकोबांच्या बरोबरीला येणार नाहींत असें म्हटलें आहे.

**कर्मअभिमानें वर्णअभिमानें। नाडले ब्राह्मण कलियुगीं ॥ ३ ॥**

तैसा तुका नव्हे, त्याचा निश्चळ भाव विठोबाचे पायीं आहे—

**अमृताची वाणी वरुषला शुद्ध। करी त्या अशुद्ध ऐसा कोण? ॥**
**भक्तिज्ञानें आणि वैराग्यें आगळा। ऐसा नाहीं डोळां देखियेला ॥**
**जपतप यज्ञ लाजविलीं दानें। हरिनामकीर्तनें करूनियां ॥**
**मागें कवीश्वर जाले थोर थोर। नेलें कलेवर कोणें सांगा ॥**
**म्हणे रामेश्वर सकळां पुसोनी। गेला तो विमानीं बैसोनियां ॥**

## ५ कचेश्वर ब्रह्मे

**चरित्र**

एक उनाड व भटक्या तरुण तुकोबांच्या संगतीने व कीर्तनश्रवणानें शुद्धीवर येऊन कसा सुधारला व सत्पुरुषकोटीला चढला याचें उदाहरण म्हणजे चाकणचे कचेश्वर ब्रह्मे हे होत. ब्रह्मे हे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. यांचे घराणें पूर्वापार वेदशास्त्रसंपन्न होते. 'मेगनाथ बिन शंकरभट' हे कचेश्वरांचे आजे असून त्यांजकडे शिवछत्रपति यांच्या घराण्याचा धार्मिक अधिकार पूर्वापार चालत आला होता. शहाजीराजे यांचे कारकीर्दींत त्यांचेकडे १०० होनांचे वर्षासन चालू होतें याबद्दलचे कागद उपलब्ध आहेत. शंकरभट—मेंगनाथ—सिद्धेश्वर—कचेश्वर अशी वंश-परंपरा आहे. कचेश्वर हे तुकोबारायांचे समकालीन असून त्यांच्या प्रयाणा-नंतरही दीर्घकाल हयात होते. शिवाजी, संभाजी, राजाराम व शाहू अशा चार कारकीर्दी यांनीं पाहिल्या! कचेश्वर हे वेदशास्त्र आपल्या वडिलां-पाशीं पढले पण तरुणपणींच अगदीं हूड व खोडकर निघाले. त्यांचें आत्म-चरित्रपर १११ ओव्यांचें एक प्रकरण उपलब्ध झालें आहे. त्यावरून यांचा उनाडपणा, तुकोबांच्या अभंगांची आवड, तुकोबांचा स्वप्नानुग्रह व वाफगांवच्या रानांत यांना झालेली श्रीमहाविष्णुमूर्तीची उपलब्धी (ही खेडास ब्रह्मे यांचे देवांत आहे) इ० प्रकार स्पष्ट दिसतात. 'वेदावीण आन

कांहीं नेणें'—बाळपणींच यांचें वेदाध्ययन घरीं झालें होतें. स्नानसंध्येवर निष्ठा नाहीं, कथापुराणांची आवड नाहीं, ब्राह्मणांच्या टवाळ्या करण्याची हौस, निंदेकडे प्रवृत्ति—'ऐसा अवगुण देहीं परिपूर्ण' होता! प्रपंचाच्या योगें हे एकदां जीर्णपूर (जुन्नर) येथें गेले. तेथें कृष्णंभट नामक एका शाक्ताच्या घरीं मुक्काम केला. तेथें रात्रीं देवतापूजन होतें, बरेच शाक्त जमले होते. 'भ्रमास्तव त्याणीं आधीं हाकारिले। मग उपेक्षिलें नका येऊं'—हा आपल्यापैकींच एक आहे असें वाटून त्यांनीं यांना बोलावलें पण नंतर हा परस्थ वैदिक ब्राह्मण आहे असें कळल्यावर यांना मना केलें. कचेश्वरांच्या मनाला तें लागलें! कृष्णंभटांपासून आगम मंत्रशास्त्र शिकावें असें यांस वाटलें पण त्यांनीं त्याला मंत्रशास्त्र शिकण्याच्या 'भानगडींत पडूं नकोस, तूं आपला प्रणवाचा जप कर' असें सांगितलें व शाक्तपंथापासून निवृत्त केलें! मग हा परत चाकणास आला, व गीतेच्या अभ्यासाला लागला. 'चित्ता दृढ आलें गीता ही पढावी। आनंदें पहावी नित्य टीका,' पण वेदविद्येच्या अभिमानामुळें कचेश्वराच्या बापास तें आवडलें नाहीं. 'तीर्थस्वरूपांनीं घातलें ताडन। गीतार्थमनन करूं नको!' पण त्यानें तें ऐकलें नाहीं. त्याला गीताभ्यसन गोड वाटलें. 'चमत्कार कांहीं माझा मज आला। जीवासी लागला गीताछंद.' एकदां स्वारी विजापुरास जाऊन आली. गीतेच्या संगतीनें वृत्ति शुद्ध होऊं लागली. शिवलिंगाची नित्य पूजा करावी, विष्णुसहस्रनाम म्हणावें व गीतापाठ करावा असें त्यास वळण लागलें. मध्यें कोणी विषप्रयोग केला, उपचार केले पण धाप लागली. मारीच्या प्रसंगानें भटकत असतां स्वारीस सिरोलीस कीर्तन ऐकण्याचा प्रसंग आला, व तेथपासून याची वृत्ति अगदींच निवळली. 'मला स्वस्थ वाटे करावें कीर्तन। संतांसी नमन करूं वाटे।' येथपर्यंत मजल आली! स्वारी खेड येथें गेली व तुकोबांचे कांहीं अभंग पहावे असें मनांत आलें.

देहूस अंबाजीपंत लोहोकरे, तुकोबांचे शिष्य, आहेत त्यांजपाशीं 'सर्वेही संग्रह तुकोबांच्या वह्या। जावें लवलाह्या तुम्ही तेथे' असें त्यास 'नारायणानें' सांगितलें. तेव्हां 'कचेश्वर' देहूस आले व त्यांनीं विठ्ठल-दर्शन घेतले.

**देखोनियां देव आनंदलें मन। ऐकिलें कीर्तन संतांमुखें ॥ ५० ॥**
**कथा जाल्यावरी देखिलें कौतुक। मोठें अलोलिक सांगवेना ॥ ५१ ॥**
**प्रत्यक्ष तुकोबा करीतसे कथा। आनंदें सर्वथा डोलतसे ॥ ५२ ॥**
**कर्दळी हेलावे जैसी चंडवातें। तैसें तुकोबातें देखियेलें ॥ ५३ ॥**

तुकोबा त्या डोलण्यांत पडतील असें वाटून यानें खांदा दिला. कथा झाल्यावर

**ठेवियेला माझ्या माथ्यावरी हात। स्वयें जाला गुप्त स्वप्नामाजी ॥५८॥**
**तेथूनियां स्फूर्ती तुकोबानें दिल्ही। येरे दिशीं केली कथा दीनें ॥५९॥**

स्वरतालज्ञान माहीत नसतांही दुसऱ्याच दिवशीं कचेश्वरांनीं कीर्तन केलें. देहाची व चित्ताची सर्व व्यथा गेली व पूर्वी कधीं न अनुभविलेलें समाधान-सुख प्राप्त झालें! ब्राह्मणांना वाटलें, कीं याला भूतसंचार झाला असावा! त्यांनीं याच्या वडिलांकडे चाहाडी केली.

**नाचतो बाजारीं यासी शिक्षा करा। देऊं नका घरा येऊं तुम्ही ॥६६॥**
**भलत्यासी कैसें करितो नमन। देतो आलिंगन लघुवर्णा ॥ ६७ ॥**

बापाला अत्यंत दुःख झालें, 'कैसा पापरूप पोटा आला!' त्यानें कचेश्वराला घराबाहेर घातलें. थोडेफार अन्नवस्त्र पोटाला दिलें हीच मोठी दया केली! आमचें पोर बिघडविलें म्हणून त्यानें तुकोबांना व वारकऱ्यांना सडकून शिव्या दिल्या! 'तुला वाळीत कां घालूं नये?' असेंही कांहीं कर्मठांनीं कचेश्वरांस विचारलें तेव्हां 'अवश्य घाला' म्हणून त्यांनीं सडेतोड उत्तर दिलें! हरिभक्तांनीं त्यांस आश्वासन दिले व 'देव तुझा योगक्षेम निश्चित चालवील, तूं मात्र देवावर बळकट विश्वास ठेव,' असें सांगितलें. याचा प्रत्यय तत्काळ आला.

**नारायणें दिल्हा चऱ्होली मोकासा। जालासे भरंवसा आहे देव ॥८०॥**

निस्पृहपणें रहावें अशी इच्छा झाली तों तळ्यापाशीं देवानें स्थळ दिलें. विहीर खणावी अशी इच्छा झाली तीही पूर्ण झाली. महाविष्णु-मूर्तीची पूजाअर्चा करावी अशी इच्छा झाली तीही पुरी झाली. कथेला विस्तीर्ण मंडप असावा, अग्निहोत्र ठेवावें, कवित्व करावें, अशी जी जी इच्छा झाली ती ती नारायणानें पुरविली!

**माझा अंगीकार देवें पूर्ण केला। अनुभव आला अंतरासी ॥ ९० ॥**
**स्नानसंध्या माझी नित्य चालवितो। कथा करवितो अहोराती ॥९५॥**
**जाऊं नेदी कोठें आपुल्यावेगळें। न धरी निराळें बाळकासी ॥ ९६ ॥**
**कलियुगामाजीं वर्णाश्रमधर्म। करूनि सत्कर्म आचरावें ॥ १०८ ॥**
**ऐसें प्रेरूनीयां कथा करवितो। नित्य चालवितो महाविष्णु ॥१०९॥**

'असा बोले अनुभव कचेश्वर.' सत्संग व कथाकीर्तन यांच्या योगानें या उनाड पोराचा हरिभक्त झाला! असें हें कचेश्वरचरित्र बोधप्रद आहे.

**चमत्कार**

कचेश्वर ब्रह्मे दीर्घायु होते आणि त्यांनीं वृद्धपणीं केलेला एक चमत्कार प्रसिद्ध आहे व त्याला इतिहासाचाही आधार आहे. कचेश्वरांनीं पाऊस पाडून साधुसंतांचा पंचभूतांवरही अंमल चालतो ही गोष्ट सिद्ध केली आहे! शके १६०७ मध्यें चाकण चौऱ्यायशींत ( चाकण परगणा व त्याखालील ८४ गांवें ) पावसावांचून हैराण झालीं, जनावरें व माणसेंही पाण्यावांचून मरूं लागलीं तेव्हां "देशमुख देशपांडे व समस्त मोकादम यांनीं ब्राह्मण मेळवून अकरा दिवस अनुष्ठान करविलें परंतु पर्जन्य न पडे त्यावरी समस्त ब्राह्मणांनीं व्यंगोक्ती केली कीं आमचे मुख्य महंत कचेश्वरभट बिन सिद्धेश्वरभट ब्रह्मे उपाध्ये कसबे चाकण यांस आम्हांमध्यें आणिलें पाहिजे त्यावरून स्वामींस अनुष्ठानाच्या ब्राह्मणांत आणविलें." स्वामींनीं "उत्तर दिधलें कीं या ब्राह्मणांस आज्ञा देणें आणि हनुमंताचे देवळीं आनंदगिरीचे मठीं हरिकथेस

मंडप देणें, कथा परमेश्वराची करून देवाचा धावा करूं म्हणिजे पर्जन्य पडेल संशय नाहीं ऐसी स्वामींनीं प्रतिज्ञा केली त्यावरून समस्त मिळोन हरिकथेचें साहित्य केलें. स्वामींनीं कथा आरंभितांच पर्जन्य अहोरात्र पडला पुरे पुरे केलें आम्ही समस्त सुख पावलों त्यास स्वामीचे कांहीं उतराई झालें पाहिजे म्हणऊन कसबे मजकुरीं व परगणे मजकुरीं दरगांवास टकाशाही एक व धान्य मण एक करून दिधलें असे, " असा मजकूर सरकारी कागदांत असून त्यावर देशमुख देशपांडे व चौऱ्यायशीं गांवचे प्रमुख यांच्या सह्या आहेत ! वरील हकीकत 'शाहू नरपति व मुख्य प्रधान व श्रीनिवास परशुराम प्रतिनिधि ' यांच्या सहीशिक्क्यानिशीं जें ' वृत्तिपत्र ' शके १६२० मध्यें ( राज्याभिषेक ५६ ) कचेश्वर ब्रह्मे यांस दिलें आहे त्यांतही आहे. कचेश्वर ब्रह्मे यांचा हा चमत्कार अथवा सिद्धिसामर्थ्याचा प्रकार त्यांच्या एखाद्या शिष्यानें भोळ्याभावानें वर्णिला नसून समस्त लोकांनीं सहीशिक्क्यानिशीं जाहीर केला आहे व त्यावर राजपुरुषांनीं शिक्कामोर्तब केलें आहे ! शके १५६० मध्यें कचेश्वर तुकोबांच्या प्रथम भेटीच्या वेळीं २० वर्षांचे होते असें समजलें तर शके १६०७ मध्यें त्यांनीं पाऊस पाडला त्या वेळीं ते ६७ वर्षांचे होते व शाहूमहाराज व बाजीराव पेशवे यांनीं त्यांस शके १६२० मध्यें ' वृत्तिपत्र ' करून दिलें तेव्हां ते चांगले ८० वर्षांचे होते हें उघड आहे. ह्या वृत्तिपत्रांत ' तुम्ही भले सत्पात्र थोर माहापुरुष ' असें राजपुरुषांनीं म्हटलें आहे.

ह्यासंबंधींचे अस्सल कागदपत्र माझे संग्रहीं आहेत. कचेश्वरांच्या पुत्रांचेही कांहीं कागद आहेत त्यांवरून कचेश्वरांस जगन्नाथ व देवराव हे पुत्र व दिनकरराव, नागोराव असे दोन पौत्र होते असें दिसते व त्या पत्रांत ' कचेश्वरभट उपनाम ब्रह्मे गोत्र काश्यप सूत्र आश्वलायन उपाध्ये कसबे चाकण ' असें लिहिलें आहे. राजाराममहाराजांनीं दिलेल्या एका दानपत्रांत ( राज्यशक ५४, शके १६१८ ) ' तुम्ही पूर्वापार राजाश्रित

बहुत योग्य वेदशास्त्रसंपन्न श्रौतस्मार्त नित्यकर्मानुष्ठानी सत्पात्र ब्राह्मण' इ. विशेषणें कचेश्वरांस लावलेलीं आहेत.

कचेश्वरांचें कवित्व फारसें उपलब्ध नाहीं. काव्यसंग्रहांत त्यांचीं दोन

**कवित्व** प्रकरणे छापलीं आहेत. तीं साधारण बरीं आहेत. (१) गजेंद्रमोक्ष श्लोक ९४ व (२) सुदाम-चरित्र श्लोक १०३. हीं प्रकरणें कचेश्वर ब्रह्मे यांचींच आहेत कां दुसरा कोणी कचेश्वर होता याविषयीं आजवर शंका होती पण तीं कचेश्वर ब्रह्मे यांचींच आहेत याविषयीं ह्या प्रकरणांतच प्रमाणें आहेत. यांचे कांहीं अभंगही आहेत. एका अभंगाचे शेवटचे २ चरण असे आहेत—

**तोचि महाविष्णू सर्वां चाळविता। सृष्टितें पाळिता भक्तराज ॥ ५ ॥**
**त्याचा दास ब्रह्मा कवि कचेश्वर। ध्यातो निरंतर सदा त्यासी ॥ ६ ॥**

सुदाम-चरित्रांत मध्येंच एक आरती आहे तिचे शेवटचें कडवें पहा—

**महिमा वर्णी कोण। जेथें ब्रह्मता पूर्ण।**
**कचेश्वर दिनरात। भावें वर्णितो गुण ॥ आरती० ॥ ५ ॥**

ह्या दोन्ही उल्लेखांवरून सदर प्रकरणें कचेश्वर ब्रह्मे यांचींच आहेत हें उघड ठरतें. सुदामदेव कृष्णभेटीसाठीं द्वारकेस निघाले तेव्हां त्यांना शुभशकुन झाल्याचें कचेश्वरांनीं वर्णिलें आहे—

**पुढे पाहतां सुंदरी एक नारी। कडे लेंकरूं साजिरा कुंभ शीरीं।**
**जळा आणितां बोलिली बाळकातें। म्हणे 'मागसी तेंचि देईन तूतें'॥**
**पाहतां पुढें धेनु भेटली। वाम हस्तकीं हरिणि चालिली।**
**पाडसें सवें तीन शोभती। चाष चालिला वाम तो गती ॥ २२ ॥**

सुदामकथेचें तात्पर्य कवि सांगतात—

**हरीला स्मरा आदरें सर्वभावें। मुखीं सर्वदा नाम त्याचें वदावें ॥**

**तुकोबांचें गौरव** कचेश्वरांच्या तुकोबांवर दोन आरत्या उपलब्ध आहेत. एका आरतींत ते म्हणतात—

देखिलें रूप जैसें । तैंचि दाविजे तैसें ।
सांवळें रूप बापा । याचें लागलें पिसें ॥ ३ ॥
आरती तुकोस्वामी० ॥
वर्तुळ दोंद पोट । नेत्र नासिका नीट ।
देखिल्या दंतपंक्ती । लघु आरक्त वोठ ॥ ४ ॥ आरती० ॥
उंच ना ठेंगणें हो । ध्यान हेंचि हें राहो ।
मानसीं कचेश्वरा । गुरु तुकोबा पाहो ॥ ५ ॥ आरती० ॥

तुकोबांनीं 'रोडके हातपाय दिसे अवकळा' असें एका अभंगांत स्वतःचें वर्णन केलें आहे तें धडपडीच्या काळांतलें असावें व वरील वर्णन चित्त समाधान पावल्यानंतरचें असावें. दुसरी आरती पहा—

आरती तुकोराया नेई विलया माया ।
षड्रिपु मर्दुनीयां लावि मुळींच्या ठाया ॥ आरती० ॥ध्रु०॥
सामर्थ्य वर्णवेना लीला केलिया नाना ।
रक्षिल्या वह्या जळीं आतां तारावें दीना ॥ आरती ॥ १ ॥
संतांत कीर्ति केली कुडी सायोज्यि नेली ।
आश्चर्य थोर केलें जना देख लावीली ॥ आरती० ॥ २ ॥
दीनासि तारिं भूपा आतां चुकवीं खेपा ।
चौऱ्याशि लक्ष फेरे कचेश्वराचे बापा ॥ आरती० ॥ ३ ॥

## ६ तुकयाबंधु कान्होबा

तुकोबांचे धाकटे बंधु कान्होबा हे प्रथम तुकोबांशीं भांडून वेगळे निघाले होते. विरक्त होऊन तुकोबा परमार्थाला लागले व एकान्तासाठीं भंडारा—भामनाथावर दिवसचे दिवस घालवूं लागले तेव्हां प्रपंचाकडे त्यांचें सहजच दुर्लक्ष झालें. प्रपंचाचा सारा भार कान्होबावर पडूं लागला, दोन्ही भावांचे संसार त्याला एकट्यालाच चालवावे लागले, तेव्हां त्यानें 'संसारांत लक्ष घालून पैसे तरी मिळीव नाहींतर वेगळा तरी निघ' असें तुकोबांच्यामागें टुमणें लावलें ! तुकोबांनीं वेगळें निघायचें ठरविलें व आपल्या वांटणीचीं खतपत्रें इंद्रायणीच्या डोहांत बुडवून

**पहिलें भांडण**

ते मोकळे झाले. ' तुका म्हणे धन। आम्हां गोमांसासमान ' ही त्यांची प्रतिज्ञा ! आवक बंद झाली. मग त्यांना पांडुरंगावर भार टाकून स्वस्थ बसावें लागलें. महादाजीपंत कुळकर्णी जिजाबाईला भेटून घरची विचारपूस करून त्यांच्या कुटुंबास मदत करीत. तुकोबांची भक्त म्हणून ख्याति झाली, त्यांच्या अंगचे गुण प्रगट झाले, तेव्हां कान्होबांची सत्त्ववृत्ति जागृत झाली व ते तुकोबांचे शिष्य व भक्त झाले. रामेश्वरभट व कान्होबा या उभयतांचेंही पूर्ववृत्त लोक विसरून गेले व त्यांनीं वारकरीमंडळांत त्यांना मिळवून घेतलें व ते दोघेही तुकोबांच्या १४ प्रमुख शिष्यांत मान्यता व लोकप्रेम संपादिते झाले. कान्होबांचे शेंसव्वाशें अभंग प्रसिद्ध आहेत.

**पश्चात्ताप, शोक व देवाशीं प्रेमकलह**

तुकोबांचें वैकुंठीं प्रयाण झाल्यावर देहूवर जी शोकछाया पडली तिचा ओघ कान्होबांच्या वाणींतून बाहेर पडला. ह्या शोकपर अभंगांत करुणरस मूर्तिमंत आहे. आपल्या भावास देवानें अकालीं नेल्याबद्दल कान्होबांनीं देवाशीं कडोविकडीचें भांडण केलें आहे. त्यांत तुकोबांविषयींचें त्यांचें उत्कट प्रेम तर व्यक्त झालेंच आहे, पण देवाशीं भांडतांनाही व त्याला ' निर्गुण निलाजरा निनांवा। ठक झोंड कुडा देवा ' अशा शिव्या (त्या खरोखरीच ओव्या आहेत!) देतांनाही त्यांत भक्ताचें हृदयच उघड झालें आहे. " तुकोबाला आपण तरुणपणीं छळले व अजूनही त्यांचा उपदेश ठसत नाहीं, " याविषयींचा अनुताप पुढील अभंगांत व्यक्त झाला आहे. " तुकोबाराया ! तुझी योग्यता म्यां ओळखली नाहीं—

**सख्यत्वासी गेलों करीत सलगी। नेणेंचि अभागी महिमा तुझा ॥ १ ॥**
**पावलों आपुले केलेला हारास (ऱ्हास)। निर्दैवा परीस काय होय ? ॥२॥**
**कष्टविलासी म्यां चांडाळें संवसारीं। अद्यापिवरी तरी उपदेशीं ॥ ३ ॥**
**उचित अनुचित सांभाळिलें नाहीं। कान्हा म्हणे काई बोलों आतां ॥४॥"**

देवाला उद्देशून ते म्हणतात—

**मायबाप निमाल्यावरी। घातलें भावाचे आभारीं।**
**तोही परि हरी। तुज जाला असमाई॥ १॥**
**हे कां भक्तीचे उपकार। नांदतें विध्वंसिलें घर!।**
**प्रसन्नता व्यवहार। शेवटीं हे झालासी॥ २॥**
**एका जीवावरी। होतों दोनी कुटुंबारी।**
**चाळवूं तो तरी। तुज येतो निर्लज्जा॥ ३॥**

'माझें बुडविलें घर। लेंकरेंबाळें दारोदार। लाविली काहार। तारातीर (ताडातोड) करूनी,' 'आक्रंदती बाळें'करुणावचनीं। या शोकें मेदिनी फुटों पाहे,' 'माझें नेलें पांघरूण। ठावें असोन दुर्बळ दीन। माणसांमधून। उठविलें खाणोऱ्या' इ० प्रकारें वज्राचेंही हृदय फोडणाऱ्या आर्तस्वरानें कान्होबांनीं शोक केला आहे! त्या सात्त्विक संतापाच्या भरांत 'भुक्तिमुक्ति तुझें जळो ब्रह्मज्ञान। दे माझ्या आणून भावा वेगीं' असा त्यांनीं देवामागें लकडा लावला; 'नाहींतरी पहा हो! हत्या होइल शिरीं पांडुरंगा' असा धाकही घातला. शोकावेग जरा कमी झाल्यावर 'तुम्हां आम्हां एके ठायीं सहवास। तेथें द्वैत द्वेष काय बरा' असा थोडा सुविचार सुचून 'तुकयाबंधु म्हणे चरण। आतां जीवें न सोडीं' यांत भांडणाचें पर्यवसान झाले आहे. या अभंगात 'धरणेंही तेरा दिवस। माझ्या भावें घेतलें' या गोष्टीचाही उल्लेख आला असून तुकोबांनीं संपादिलेल्या परमार्थधनाचा भोग घेत आतां आम्हीं बसून खाऊं असे कान्होबांचे उद्गार निघाले आहेत—

**माझ्या भावें केली जोडी। न सरेसी कल्प कोडी।**
**आणियेलें धाडी। घालूनि अवघें वैकुंठ॥ १॥**
**आतां नलगे यावें जावें। कोठें कांहींच करावें।**
**जन्मोजन्मीं सुखें खावें। बैसोनसें जालें॥ २॥**
**अवघें भरलें सदोदित। जाले सुखाचे पर्वत।**
**तुकयाबंधु म्हणे परमार्थ। धन अद्भुत सांपडलें॥ ३॥**

'पाहा हो कलीचें महिमान' ह्या ३१ चरणी अभंगांत तुकयाबंधूनें तत्कालीन स्थितीचें हुबेहुब चित्र वठविलें आहे.

**कान्होबांचे अभंग**

कान्होबांची वारकरी मंडळांत जी मान्यता आहे ती त्यांचे नाटाचे अभंग, आशीर्वाद व ललित, गौळणी यांवरून विशेष आहे. हे अभंग तुकोबांच्या गाथ्यांत त्यांच्या अभंगांच्या शेजारींच छापलेले आहेत व त्यांपैकीं कांहीं वारकऱ्यांच्या भजनकीर्तनांत व आरतीच्या वेळीं अद्यापही म्हणण्यांत येतात. उदाहरणार्थ—

१

**वचन ऐकें कमळापती। माझी रंकाची विनंती ॥ १ ॥**
**कर जोडितों कथाकाळीं। आपण असावें जवळी ॥ ध्रु० ॥**
**घेई घेई ऐसी भाक। जरी कां मागेन आणिक ॥ २ ॥**
**तुकयाबंधु म्हणे देवा। शब्द इतुकाचि राखावा ॥ ३ ॥**

२

**तूंचि मायबाप बंधु सखा आमुचा। वित्तगोत जिवलग जीवाचा ॥ १ ॥**
**आणिक प्रमाण दुसरें नाहीं आतां। योगक्षेमभार घातले तुझे माथां**
**तूंचि क्रिया कर्म धर्म देव तूं कुळ। तूंचि तीर्थ व्रत गुरु सकळ ॥ २ ॥**
**तुकयाबंधु म्हणे करिता कार्यता देवा।**
**तूंचि भक्तिभाव पूजा पुरस्कार आघवा ॥ ३ ॥**

३

**केला अंगीकार पंढरीच्या देवें।**
**आतां काय करितील काळ मशक मानवें ॥ १ ॥**
**घातलीं बाहेर तीं भय होतें ज्यानें।**
**बैसला आपण तेथें घालूनियां ठाणें ॥ २ ॥**
**लागों नेदी वारा दुजियाचा अंगासी।**
**हा पुरता निर्धार कळों आला आम्हांसी ॥ ३ ॥**
**म्हणे तुकयाबंधु न लगे करावी चिंता।**
**कोणेविशीं आतां बैसलों हस्तीवरी माथां ॥ ४ ॥**

४

गाऊं वाऊं टाळी रंगीं नाचों उदास।
सांडोनी भय लज्जा शंकाभार निरास ॥ १ ॥
बळियाचा बळी तो कैवारी आमुचा।
भुक्तिमुक्तिदाता सकळही सिद्धींचा ॥ ध्रु० ॥
मारूं शब्दशस्त्रबाण निःशंक अनिवार।
कंटकांचा चूर फोडूं काळाचें शिर ॥ २ ॥
म्हणे तुकयाबंधु नाहीं जीवाची चाड।
आपुलिया–तेथें काय आणिकांची भीड ॥ ३ ॥

ह्या चारच अभंगांवरून तुकयाबंधु यांची वाणीही निर्धाराची वीर्यवती आहे असें दिसून येईल.

## ७ निळोबाराय पिंपळनेरकर

तुकोबांच्या शिष्यमंडळांत निळोबांच्या योग्यतेचा दुसरा पुरुष नाहीं. बहुतेक शिष्य भोळे, भाविक व निष्ठावंत होते व सर्वांचें तुकोबांवर नितान्त प्रेम होतें. रामेश्वरभट विद्वान् होते व बहिणाबाई थोर अधिकाराच्या होत्या, पण संप्रदाय चालवून तिहीं लोकीं झेंडा फडकविणारा तुकोबांचा सच्छिष्य एकच आणि तो म्हणजे निळोबा हे होत. तुकोबांना तीन पुत्र झाले त्यांत नारायणबोवा बरे होते, पण तुकोबांच्या संप्रदायाचा वारसा शेवटीं निळोबांकडेच आला ! मांसवंशापेक्षां विद्यावंशाचें महत्त्व केव्हांही अधिक आहे. वारकरीसंप्रदायांत ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकोबा व निळोबा हें पंचायतन सर्वमान्य व सर्वप्रिय आहे. अनिवार भगवत्प्रेम, प्रखर वैराग्य, अलौकिक ज्ञानभाग्य हे गुण गुरूप्रमाणें या शिष्याच्याही ठायीं विलसले व ‘दोघेही एकच’ असा लोकांचा अभिप्राय झाला. तुकोबांच्या पश्चात् निळोबांनीं वारकरी संप्रदायाचा झेंडा महाराष्ट्रभर नाचविला.

**चरित्र**

नगर जिल्ह्यांत पिंपळनेर नांवाचें पारनेरपासून तीन कोसांवर पण पुणें प्रांताच्या सीमेवर एक गांव आहे तेथील हे कुळकर्णी. यांचें स्वतंत्र चरित्र आजवर उपलब्ध नव्हतें, महिपतबावांनीं

आपल्या ह्या वडील व श्रेष्ठ गुरुबंधूचें गुणगौरव त्यांच्या दोनच गोष्टी सांगून केलें आहे (भक्तविजय अ० ५६). मला निळोबांचें सविस्तर हस्तलिखित चरित्र त्यांच्या एका वंशजाकडून पहावयास मिळालें. त्याच्याच आधारें मी निळोबांची माहिती येथें देणार आहें. या 'निळाचरित्राचे' अध्याय २० असून ओंवीसंख्या सुमारें ३४०० आहे. त्यावरून असें दिसतें कीं, निळोबा तुकाराममहाराजांच्या वेळीं हयात नव्हते, त्यांची प्रत्यक्ष भेटसुद्धां झाली नव्हती. तुकोबांच्या प्रयाणानंतर सुमारें २०।२५ वर्षांनीं म्हणजे शके १५९० च्या सुमारास त्यांना तुकोबांचा स्वप्नानुग्रह झाला. हे मूळ पुणें परगण्याच्या हद्दींत असलेलें शिरूर येथले जोशी कुळकर्णी. यांचे आजे गणेशपंत व पिते मुकुंदपंत. हे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. घराणें सुखवस्तु.

**घरीं असे धनधान्य । गाईवृषभें भरलें गोठण ।**
**वृत्तिप्राप्ती थोर वेतन । सर्व अनुकूळ तयासी ॥१-४२॥**

निळोबांच्या अंगावर वयाच्या १८ व्या वर्षी संसार पडला. त्यांच्या स्त्रीचें नांव मैनाबाई. ती साध्वी, सुशीळ व धर्मचारिणी होती. निळोबांना वैराग्य प्राप्त झाल्याची गोष्ट मनोवेधक आहे. प्रातःस्नानसंध्या झाल्यावर हे शिवलिंगपूजन नित्य भक्तिभावानें करीत व नंतर कुळकर्ण पाहत. एकदां देवतार्चन चाललें असतां सरकारी देवडीवरचें बोलावणें आलें. पूजा झाल्यावर येतों म्हणून यांनीं निरोप पाठविला. चारदां उलट निरोप आले व शेवटीं त्यांना धरून नेलें! यांनीं हिशेब दिला व परत फिरले ते पारावर बसून सेवाधर्माचा वीट येऊन त्याचा त्याग करायचा निर्धार केला.

**अंतरीं विवेकें निरखून । पाहे ज्ञानदृष्टीकरून ।**
**म्हणे जळो संसार लागो अग्न । परमार्थ पूर्ण न घडे कीं ॥४७॥**
**असतों आपले स्वाधीन । तरी कां विसर्जतें देवार्चन ।**
**धिक् जिणें परस्वाधीन । लाजिरवाणें संसारीं ॥ ४८ ॥**
**असत्य कर्म करावें । बापडे कृषीवळ नाडावे ।**
**नष्टपणें धन हरावें । तें लावावें संसारीं ॥ २-४९ ॥**

या नष्ट वृत्तीचा त्याग करावा व संसारदारिद्य फेडण्यास साधुसंग धरावा म्हणजे अमूप परमार्थधन मिळेल असा त्यांनीं मनाचा निश्चय केला. 'अनुतापें संतप्त झाला। कंठ सद्गदित दाटला। नेत्रकमळींहून सुटला। लोट अश्रुधारांचा' (३-१५). कांतेला आपला निश्चय सांगतांना ते म्हणाले, 'मी तर देवाची जोड करण्यासाठीं सर्वस्वत्याग करून घराबाहेर पडणारच, पण मी तरून जावें व तूं मायेंतच लोळत पडावेंस हें मला उचित दिसत नाहीं. तुला अखंड परमार्थसुख पाहिजे असेल तर मजबरोबर चल.' मैनाबाई सलज्ज अधोवदन करून म्हणाली, "तुम्हांवीण येथें राहणें हें लाजिरवाणें जिणें मला नको. तुम्ही जाल तेथें मी संतोषानें येतें. देवावीण देऊळ किंवा जीवनावीण कमळ तशी मी घरीं मागें राहणार नाहीं. दीपज्योतीप्रमाणें तुम्ही आम्ही अतुट आहोंत!" हें ऐकून निळोबा हर्षले व त्यांनीं गृह, गुरेंढोरें सर्वस्व दान केलें, घर लुटविलें व उभयतां घराबाहेर पडलीं! फिरत फिरत ते पंढरीस आले, तेथील भक्तिप्रेमानंद त्यांनीं यथेच्छ लुटला. तुकोबांची कीर्ति सर्वत्र विस्तारली होतीच. ती ऐकून व आळंदी करून हे देहूस आले. तेथें तुकोबांचे पुत्र नारायण-बोवा भेटले. त्यांच्या व इतरांच्या तोंडून तुकोबांचें समग्र चरित्र ऐकून यांचें चित्त तुकोबांच्या चरणीं स्थिरावलें. ज्ञानेश्वरी, नाथभागवत व तुकोबांचे अभंग यांचें अध्ययन व श्रवणमनन झालें. त्यांनीं अनेक तीर्थयात्रा केल्या, पण तुकोबांच्या भेटीचा त्यांना ध्यास लागला.

**तुका ध्यानीं तुका मनीं। तुका दिसे जनीं वनीं।**
**तुका तुका म्हणोनी। निशिदिनीं बोभाट॥ ४-१३४॥**

तुकोबांच्या दर्शनाला त्यांचें मन अत्युत्कंठित झालें. 'दाखवीं दाखवीं निजचरण' असा त्यांनीं एकच ध्यास घेतला! शेवटीं अन्नपाणी त्यजून बसले असतांना त्यांना तुकोबांचें स्वप्नांत यथोचित दर्शन होऊन उपदेश झाला.

**मस्तकीं हस्त तेधवां ठेविला । उठोनि बैसविलें तयाला ।**
**म्हणे सावध होई रे निळा । उघडीं डोळा भ्रांतीचा ॥ ५-५४ ॥**
**मंत्र सांगून तये वेळां । बुका चर्चिला त्याचे भाळा ।**
**आपुले कंठींची तुळशीमाळा । निळोबाचे गळां घातली ॥५-६९॥**

तुकोबांनीं निळोबाचे गळ्यांत माळ घातली व 'आबाळवृद्ध नरनारी । भक्तिमार्गा लावावे' अशी त्यास आज्ञा केली.

**आपला ठेवा संपूर्ण । पिता देत पुत्रालागून ।**
**तैसें निजज्ञान पूर्ण । सद्गुरूंनीं दीधलें ॥ ५-७८ ॥**

निळोबावर तुकोबांचा पूर्णप्रसाद झाला. तुकोबांची कीर्तनपरंपरा त्यांनीं चालविली. तुकोबांच्या प्रसादानें त्यांना कवित्वस्फूर्ति झाली व त्यांच्या मुखांतून शेंकडों अभंग निघाले. हजारों लोकांस त्यांनीं कृतार्थ केलें. पिंपळनेरचा पाटील एका दुर्धर रोगानें गांजला होता. त्याला त्यांनीं त्या रोगापासून व भवरोगापासून सोडविलें. पाटलानें मोठ्या सत्कारानें त्यांना पिंपळनेरीं नेलें व राहवून घेतलें. साधु म्हणून त्यांचा मान झाला. भजनी संप्रदाय वाढला.

**मूर्ति ठेंगणी गौरवर्ण । सरळ नासिक विशाळ नयन ।**
**हृदय थोर कटि सान । शोभायमान दिसतसे ॥ १७—११९**

गळ्यांत तुळशीच्या माळा व मनगटीं माळा बांधलेल्या—' ऐसें स्वरूप अद्भुत । त्यावरी कीर्तनीं ब्रह्मभूत.' यांचें कीर्तन आबाळवृद्धांस व तेल्यातांबोळ्यांसही समजत असे. एक क्रूर वंजारी यांच्या एका कीर्तनाने अनुतप्त होऊन यांना शरण आला व वारकरी झाला. तुकोबांच्या पाठीमागें भक्तिमार्गाचा झेंडा निळोबांनीं महाराष्ट्रभर नाचविला.

**तुकोबांवरील निष्ठा व प्रेम**

निळोबारायांची तुकोबांवरील भक्ति अनुपम होती, किंबहुना गुरुभक्ति हेंच त्यांच्या स्फूर्तीचें व कर्तृत्वाचें बीज होतें. तुकोबांच्या भेटीसाठीं अन्नोदक सोडून निग्रहानें ते ध्यानस्थ बसले असतां साक्षात् पांडुरंग प्रगट झाले तेव्हां ते म्हणाले,

**येथें तुजलागीं बोलाविलें कोणी।**
**प्रार्थिल्यावांचूनी आलासी कां? ॥ १ ॥**
**प्रल्हादा कैवारी दैत्यासी दंडाया।**
**स्तंभीं देवराया प्रगटोनी ॥ २ ॥**
**तैशापरी मजला नाहीं बा संकट।**
**तरी कां फुकट श्रम केला? ॥ ३ ॥**
**निळा म्हणे आम्ही नोळखूंचि देवा।**
**तुकयाचा धांवा करीतसों ॥ ४ ॥**

देवाची ओळख करून देणारा सद्गुरु देवापेक्षां मोठा अशी गुरुभक्तांची निष्ठा असते. निळोबा म्हणतात —

**येऊनीयां कृपावंतें। तुकयास्वामी सद्गुरुनाथें ॥ १ ॥**
**हात ठेविला मस्तकीं। देउनि प्रसाद केलें सुखी ॥ २ ॥**
**माझी वाढविली मती। गुण वर्णावया स्फूर्ति ॥ ३ ॥**
**निळा म्हणे मी बोलता। दिसें परी हे त्याची सत्ता ॥ ४ ॥**

**मन विश्रांति पावलें। गुरुचरणीं स्थिरावलें ॥ १ ॥**
**ज्ञानयुक्त होतां मन। ब्रह्मभूत जालें जाण ॥ २ ॥**
**जिकडे जिकडे जाय मन। तिकडे तिकडे अधिष्ठान ॥ ३ ॥**
**निळा म्हणे मन। होउनि ठेलें तें उन्मन ॥ ४ ॥**

'उदकामाजी रक्षी वह्या' ही गोष्ट निळोबांनीं १०।१२ वेळ तरी उल्लेखिली आहे. निळोबांनीं तुकोबारायांच्या स्तुतिपर जे ३३३ श्लोक केले आहेत त्यांची घडण जरी टाकठिकीची नसली तरी ते एका बैठकींत आपल्या मनाशीं वाचीत बसलें असतां तुकयाच्या अध्यात्मस्वरूपांत चित्त रंगून जातें.' हे श्लोक 'भुजंगप्रयात'वृत्तांत लिहिले आहेत. श्रीतुकाराम-सद्गुरूच्या प्रेमानें भरलेल्या हृदयांतून स्वानंदसुखभोगाच्या वेळीं निघालेले हे सहजोद्गार आहेत. वर्षाकाळांतील महानदीप्रमाणें श्लोकांचा प्रवाह अस्खलित चालला असून शब्दांच्या ऱ्हस्वदीर्घाकडे किंवा व्याकरणशुद्धीकडे

पाहायला कवि थांबला नाहीं. 'तुका तोचि तो परब्रह्म ठेवा' हे ह्या श्लोकांचे रहस्य आहे. 'निळा कीं तुका भेद उरेल कैचा' अशा गुरुशिष्यांच्या एकात्मतेच्या बैठकीवरून हे श्लोक स्फुरले आहेत. निर्भिन्न आत्मरसानें हे श्लोक गोड झाले आहेत. 'जया मोहरा (प्रत्यक्ष) सर्व सिद्धांत आले। तयाचे पदीं रंगले चित्त माझे' असा सद्गुरुकृपानुभव आल्यामुळे 'नका अतरूं या सुखानंदठेवा' असे 'निळा सांगतो सर्वदा हेचि सर्वां.' चारदोन श्लोकच येथे देतो—

अकस्मात येऊनियां भेटि दिल्ही।
परी भेटण्यामाजि जाणीव नेली॥
अशा जाणण्यानेणण्याही निराळा।
करूनी पदीं स्थापिला नित्य नीळा॥ ३५॥

जया पूजिलें आदरें पांडुरंगें।
विमानस्थ केलें प्रयाण-प्रसंगें॥
तनू मानवी दिव्यरूपीच केली।
न त्यागी तिये दिव्यलोकासि नेली॥ ४६॥

होत गुप्त जें गुह्य भांडार दीलें।
पदीं बैसवूनी पदायोग्य केलें॥
नव्हे वीसरू आठवू सत्य त्याचा।
असा बोधिला बोध त्यासी सुखाचा॥ २११॥

जसा वन्हि मीळोनियां कर्पुरातें।
स्वयें नूरवी आपणा ना तयातें॥
तसे मीळतां सद्गुरू तूकयासी।
दुजें हारवूनी निजात्मेसि ग्रासि॥ २०१॥

'श्रीपांडुरंगाच्या प्रसादानें माझी वाणी पल्लवित झाली' असें निळोबांनीं अनेक ठिकाणीं म्हटलें आहे. ७६० ओव्यांचें पंचप्रकरणात्मक चांगदेव-ज्ञानदेव-चरित्र हें त्यांचें एक सुंदर काव्य आहे. श्रीकृष्णाच्या बाललीला म्हणजे कंसवधापर्यंतचें कृष्णचरित्र,

**कवित्वस्फूर्ति**

गौळणी, गोपीगोपाळांचे खेळ व काला यावर त्याचे मोठाले २५० वर अभंग आहेत. यांना अभंग म्हणा, धावऱ्या ओव्या म्हणा—पण हा भाग अगदी सुलभ व नेणत्यांनाही सहज समजणारा आहे. यांचे पदर्गे, विठ्ठल. नामसंकीर्तनमहिमा, संतमाहात्म्य, देवभक्तसंवाद, भक्तवात्सल्य, करुणापर अभंग, स्वस्थितीवर अभंग, जनांस उपदेश इ० भागवत सांप्रदायी संतांच्या नेहमीच्या आवडत्या विषयांवर सुमारें १२०० अभंग आहेत. कांहीं आरत्या आहेत. 'होतां कृपा तुमची पशु बोले वेद ' ही ज्ञानेश्वरावरची आरती, 'भानुदासकुळीं महाविष्णूचा अवतार' ही नाथांवरची आरती व 'प्रपंचरचना सर्वहि भोगुनि त्यागिली ' ही तुकोबारायावरची आरती ह्या तीन आरत्या वारकरीमंडळात सर्वमान्य आहेत व त्यांच्या भजनकीर्तनप्रसंगी नित्याच्या म्हणण्यांतल्या आहेत. निळोबांची कविता वारकरीमंडळांत मान्य असून त्यांच्या अभंगांवर कीर्तनें केलेलीं चालतात. तुकोबाच्या पश्चात् झालेल्या कोणाही संताच्या अभंगांवर कीर्तन केलेलें चालत नाहीं असा वारकऱ्यांचा दंडक आहे, पण निळोबाराय हे त्याला अपवाद आहेत. निळोबांची वाणी प्रासादिक, सरळ व सुबोध आहे. त्यांत उत्कटता व कळकळ आहे, आत्मानुभव आहे. गुरुप्रसादाची ही वाणी आहे. 'आज्ञापिलें जें श्रीहरी। तेंचि वदली हे वैखरी.' संतांची वाणी 'अमृतझरणी सुस्वाद ' अशी असतांना व माझी इच्छा नसतांना देव मला बोलवितात असें त्यांनी म्हटलें आहे.

> **चुबकळुनी काढिलीं । अक्षरें घोळिलीं ब्रह्मरसें ॥ १ ॥**
> **ऐसे तुष्टलेती देवा । माझिया भावासारिखे ॥ ध्रु० ॥**
> **अर्थचातुर्य तें मी नेणें । तुमचें करणें तुम्ही जाणा ॥ २ ॥**
> **निळा म्हणे सर्वसाक्षी । याल्रागीं कैपक्षी दीनाचा ॥ ३ ॥**

माझे अभंग ऐकून कोणी हंसतात 'पण मज बोलवी देवो । तेथें कोणाचा उपावो ? '

**फुटलें धरण आला लोंढा । नावरे तोंडा माझिया तो ॥ १ ॥**
**कृपाघनें वृष्टी केली । वाचा गर्जिन्नली बोधवरें ॥ २ ॥**
**प्रतीति विद्युल्लता झळकती । थेंबुटें पडती ब्रह्मरसें ॥ ३ ॥**
**निळा म्हणे पिकलें पीक । आलें सकळिक भागासी ॥ ४ ॥**

ह्या अभंगांतील कल्पना मनोरम आहे. एका ॐ शब्दाच्या ५२ मातृका व त्यांच्यापासून अनंत शब्द. 'शब्दीं शब्दांच्या कुसरी' तें हें कवित्व. तुकोबांनीं स्फूर्ति दिली व 'शब्दीं अर्थ उघडा' झाला.

**एकाक्षरीं विस्तार करा । अर्थांतरा मेळवुनी ॥ १ ॥**
**हे तों नव्हे माझी युक्ति । चेतवणें स्फूर्ती तुमची ते ॥ २ ॥**
**वसंताच्या ईक्षणमात्रें । पल्लव पत्रें फळें वृक्षा ॥ ३ ॥**
**निळा म्हणे रविकिरणें । विकासवणें कमळांसी ॥ ४ ॥**

दोन्ही अभंग बहारीचे आहेत. देवाच्या व सद्गुरु तुकयाच्या कृपेने आपली प्रतिभा उज्ज्वल झाली हें निळोबांच्या बोलण्याचें तात्पर्य आहे. गुरुप्रसाद झाल्यावर 'अंतरीं प्रकाशा काय उणे' आहे ?

निळोबांचे गुरु तुकोबाराय हें सांगितल्यावर तुकोबांची जी परंपरा तीच यांची हें कांहीं सांगायला नको. आणि ती परंपरा म्ह० भागवतधर्मपरंपरा होय. आदिनारायण (हंस)—ब्रह्मा—नारद—व्यास येथपासून परंपरा राघवचैतन्यापर्यंत आली.

**गुरुपरंपरा**

**राघव चैतन्यें केलें अनुष्ठान । त्यासी द्वैपायनें कृपा केली ॥ ४ ॥**
**कृपा करूनि हस्त ठेवियेला शिरीं । बोध तो अंतरीं ठसावला ॥ ५ ॥**
**राघवाचरणीं केशव शरण । बाबाजीशीं पूर्ण कृपा त्याची ॥ ६ ॥**
**बाबाजीनें स्वप्नीं येऊनी तुकयाला । अनुग्रह दिला निजप्रीती ॥ ७ ॥**
**जगद्गुरु तुका अवतार नामयाचा । संप्रदाय सकळांचा तेथुनीयां ॥८॥**
**निळा म्हणे मज उपदेश केला । संप्रदाय दिला सकळजना ॥ ९ ॥**

आपली परंपरा ज्ञानेश्वरांकडूनच आलेली आहे व ज्ञानेश्वर—नामदेव—एकनाथ—तुकोबा—व ह्याच चौकडीच्यापुढें आपण—निळोबा—असा निळोबारायांचा असंदिग्ध अभिप्राय स्पष्ट होतो.

**दळणीं दळितां आठवे मनासी । अलंकापुरवासी ज्ञानराज ॥ ध्रु० ॥**
**एका जनार्दन आणि नामदेव । देती स्वानुभव आठवितां ॥ २ ॥**
**ओविया मंगळीं गाईन तयासी । स्वामी तुकयासी निजानंदें ॥ ३ ॥**
**परलोक सोइरे जिवलग हे माझे । जे कां पंढरिराजें अनुग्रहीले ॥४॥**
**निळा म्हणे संत जे जे भूमंडळीं । त्यांची पायधुळी वंदीन मी ॥ ५ ॥**

म्हणजे महाराष्ट्रीय भागवतधर्माची परंपरा ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम व निळोबा ही असून हें पंचक अखिल वारकरी मंडळ आपल्या गुरुस्थानीं मानीत आलें आहे. ह्या पंचायतनाने महाराष्ट्रांत भागवतधर्माचा प्रसार अतिशय केला.

निळोबांची वाणी खेड्यापाड्यांतील अज्ञ जीवांना सुखबोध करण्याइतकी प्रेमळ, घराऊ व गोड आहे. 'कुचकुचती गौळणी,' 'सांचल ( चाहूल ) ऐकोनि गौळणी,' 'घुलकाविती अवघ्या बाळा,' 'निकुरेसी त्या नारी । शिव्या देती तोंडचिवरी,' 'पाउलांचिया हारी उमटल्या महीवरी,' 'आसडूनियां महीवरी । दांत उपटूनि घेतले करीं' अशा प्रकारचें शुद्ध व साधें मराठीपण त्यांच्या वाणींत आहे. त्यांच्या मधुरवाणीचा थोडासा स्वाद आपण घेऊं—'कृष्णरूपीं' वेधल्या 'नारी'—

## निळोबांची अभंगवाणी

१

**चित्ताचे चिंतनीं मनाचे मननीं । जीवाचे जीवनीं कृष्ण त्यांचे ॥ १ ॥**
**बुद्धीचे बोधनीं श्रोत्राचे श्रवणीं । आमोद घेतां घ्राणीं कृष्णीं मन ॥ २ ॥**
**देहीं देहभावा नेणती स्व-भावा । इंद्रियांचा धांवा कृष्णरूपीं ॥ ३ ॥**
**निळा म्हणे त्यांचा वर्ततां व्यापार । अवघा सारंगधर होवोनि ठेला ॥४॥**

२

**कौलें पिकली परलोकपेठ । हे भूवैकुंठ पंढरी ॥ १ ॥**
**नाम-मुद्रा खरें नाणें । घेणें देणें लाभवरी ॥ २ ॥**
**ब्रह्मानंदें भरलीं पोतीं । प्रेमें उथळती सीरावरी ॥ ३ ॥**
**निळा म्हणे जाऊं हाटा । करूं सांठा न सरेसा ॥ ४ ॥**

३

हा गे पहा विटे उभा । सच्चिदानंदाचा हा गाभा ॥ १ ॥
देखे सकळांचेही भाव । अध्यक्ष हें याचें नांव ॥ २ ॥
जेथें तेथें जैसा तैसा । नव्हे न्यून पूर्ण ऐसा ॥ ३ ॥
निळा म्हणे माझ्या जीवीं । ठेला जडोनि तो गोसावी ॥ ४ ॥

४

मूळ डाळ बीजीं अवघा शाखापल्लव ।
फळीं पुष्पीं विस्तारला परि तेंचि सर्व ॥ १ ॥
तैसा एक बीजरूप विटेवरी उभा ।
विश्वाकारें प्रगटला व्यापूनियां नभा ॥ ध्रु० ॥
सर्वहि होऊनि देवो देवी आपणचि सकळ ।
भूतव्यक्ति नानावर्ण सूक्ष्म स्थूळ ॥ २ ॥
निळा म्हणे एकाविण नाहीं दुसरें ।
एकीं एकपणहि नुरे सेवटिले भर ॥ ३ ॥

'एकला एक । नहोनि एक ना अनेक' असा परमात्माच सगुणवेषें पंढरीस विटेवर उभा आहे. 'कंस आणि जरासंध । रावण आणि कुंभकर्ण ज्यानें मारिले तोच हा विठ्ठल !' 'मना बुद्धीसीही भुली । इंद्रियें गुंफोनी राहिलीं ॥ तेथें लागली टकमक । डोळियां नावडे आणिक' असा हा निळोबांचा व सर्व वारकऱ्यांचा उपास्यदेव आहे! त्याची उपासना कोणती ?—

नामचिंतनें जडली प्रीती । भगवद्भावना सर्वभूतीं ॥ १ ॥
हेंचि परमार्थसाधन । मुखीं नाम हृदयीं ध्यान ॥ २ ॥

५

तेचि संत तेचि संत । ज्यांचा हेत विठ्ठलीं ॥ १ ॥
नेणती कांहीं टाणेटोणे । नामस्मरणेंवांचूनी ॥ २ ॥
काया वाचा आणि मनें । धाले चिंतनीं डुलती ॥ ३ ॥
निळा म्हणे विरक्त देहीं । आठवचि नाहीं विषयांचा ॥ ४ ॥

'निळा म्हणे स्वरूपसिद्धी । नित्य समाधी हरिनामीं' असे हे संतच जगाचे उद्धारकर्ते आहेत. त्यांची सेवा कशी करावी? 'शुद्धचर्या आचरण । हेंचि पूजन संतांचें.' त्यांना कांहीं सांगावें मागावें लागत नाहीं. 'पुण्यपावन त्यांची वाणी। जगदोद्धरणीं प्रवर्तली' आहे.

६

**घडो त्यांचा समागम । ज्यांचें प्रेम विठ्ठलीं ॥ १**
**सहज त्यांच्या ऐकतां गोष्टी । परमार्थ पोटीं दृढावे ॥ २ ॥**
**अनुतापासी दुणीव चढे । वैराग्य वाढे चढोवढी ॥ ३ ॥**
**निळा म्हणे वाढे भाव । संचरे स्वानुभव निजांगीं ॥ ४ ॥**

भक्त देवरूपच आहेत. 'निळा म्हणे भिन्न भाव। नाहीं देव-भक्तांचा'— अशी ही निळोबांची प्रेमळ वाणी आहे. 'देवाची भक्तवत्सलता' यावर निळोबांचे ७५ अभंग आहेत ते नुसते मथुरेचे ताजे पेढे आहेत ! वाचकांनीं निळोबांच्या वाणीनेंच ते मूळ गाथ्यांत सेवावेत व त्यांचा स्वानंद घ्यावा. एकच पेढा पहा——

**शुद्ध भाव तरी । प्रगटे येवोनी अंतरीं ॥ १ ॥**
**उरों नेदी तया भिन्न । करी आपणासमान ॥ २ ॥**
**भरोनीयां सृष्टी । आपणचि त्या पाठींपोटीं ॥ ३ ॥**
**निळा म्हणे राहे । कवळोनियां अंतर्बाह्यें ॥ ४ ॥**

## निळोबांच्या पश्चात्

निळोबांचे मुख्य शिष्य शंकरस्वामी शिऊरकर शिऊर येथील राहणारे हे यजुर्वेदी गर्गगोत्री ब्राह्मण. यांच्या पणतूचे नातु हल्लीं हयात आहेत. यांचें उपनांव लाखे. यांचे पूर्वज लक्षाधीश सराफ होते. शंकरस्वामी पुण्यास असतांना आळंदीपंढरीस निळोबांबरोबर जात. पुढें त्यांचा पूर्णप्रसाद झाल्यावर हे शिऊरला गेले. शंकरस्वामींचे शिष्य मल्लापा वासकर. हे लिंगाईत वाणी, मोगलाईत भालकी

गांवचे राहणारे. मल्लाप्पा वासकर ( शके १६३१–१७२१ ) यांनीं वारकऱ्यांत फड प्रथम काढला व आषाढीला आळंदीहून ज्ञानोबांची पालखी भजनी समारंभानें पंढरीस नेली. हा वासकरांचा पहिला फड होय. तुकोबांचे पुत्र नारायणबोवा यांनीं शाहूमहाराजांकडून तीन गांव इनाम मिळविल्यावर त्यांचे पुत्र इनामदारीच्या थाटानें राहूं लागले. असें सांगतात कीं, मल्लाप्पांचें कीर्तन पंढरीस चालू असतां तेथें तुकोबांचे पणतू गोपाळबुवा आले. मल्लाप्पांनीं त्यांना वंदन करून कीर्तन पुढें चालूं ठेवण्यास विनंति केली; पण त्यांस दोन अभंगही पाठ येत नव्हते ! मल्लाप्पांनीं निस्पृह वाणीनें त्यांची कानउघाडणी केली. मग गोपाळबुवा भंडाऱ्यावर ६ वर्षें राहिले, अभंग व ज्ञानेश्वरी वगैरे ग्रंथांचें अध्ययन केलें, व नंतर कीर्तन करूं लागले. त्यांनीं देहूकरांचा फड काढला. वासकरांचा व देहूकरांचा असे वारकऱ्यांत दोन मुख्य फड आहेत पण त्यांत गुरुपरंपरेनें आलेल्या वासकरांच्या फडाची योग्यता अधिक समजली जाते. वारकरीसंप्रदायांत गेल्या शेंदोनशें वर्षांत अनेक थोर पुरुष सर्व जातींत होऊन गेले आहेत. संतचरित्रकार व तुकोबांचे अनुग्रहित **महिपतबाबा ताहराबादकर** ( शके १६३७–१७१२ ) यांचें विस्मरण होणें शक्यच नाहीं. निळोबांनंतरच्या २०० वर्षांत प्रल्हादबोवा बडवे, बाबा आजरेकर, प्रल्हादभाऊ, हैबतरावबाबा, सखारामबोवा अंमळनेरकर, गुंडोजी बुवा, नारायण आप्पा, त्र्यंबकबुवा भिडे, गंगू काका, गोदाजी पाटील, ठाकुरबोवा, गिंडेबुवा, भानुदासबोवा, केसकरमहाराज, साखरेबोवा, बाबा पाध्ये, ज्योतिपंत महाभागवत, भाऊ काटकर, पुण्याचे खंडोजीबुवा, विष्णुबोवा जोग, व्यंकटस्वामी, केशवराव देशमुख, प्रो. दांडेकर वगैरे अनेक पुरुष वारकरी संप्रदायांत प्रसिद्ध झाले व आहेत. सर्वांचे आद्यगुरु ज्ञानेश्वरमहाराज हेच होत. सर्वांनीं भागवतधर्माचा महाराष्ट्रभर प्रसार केला आहे.

महिपतबावांनीं भक्तविजयांत ( अ० ५६ ) निळोबारायांची एक गोष्ट ४१ ओव्यांत मोठ्या प्रेमभरानें देऊन आपल्या या गुरुबंधूचें गौरव केलें आहे. ' निळोबाची देखोन भक्ती । पावले श्रीपति त्यालागीं ' ही गोष्ट प्रसिद्धच आहे.

## निळोबांची एक गोष्ट

**ज्याचे तुकाराम येऊनि स्वप्नीं । उपदेश दीधला कृपा करूनि ।**
**त्याचें चरित्र रसाळ वाणी । ऐका श्रवणीं भाविक हो ॥ १४८ ॥**
**नेणे मान दांभिकपण । सद्भावें करी हरिकीर्तन ।**
**पुरातन संतांचीं वचनें बोलून । संतचरित्रें वर्णावीं ॥ १४९ ॥**
**मुलें लेंकुरें सर्व असती । परि माझीं हीं हें नाठवे चित्तीं ।**
**सहज मिळेल जें अयाचितवृत्ती । त्यांतही अतिथि पूजावा ॥ १५० ॥**

निळोबाराय म्हणजे पक्क्या गुरूचे पक्के चेले. गुरु जसे निर्दंभ, निर्लोभ व निर्मम तसेच हे निळोबारायही होते. सर्व संसार पांडुरंगचरणीं वाहून मोकळे झालेले. यांच्या संसाराचा भारही देवानें माथां वहावा. एकदां निळोबारायांच्या मुलीचे निघालें लग्न. घरीं साहित्य तर बिलकुल नव्हतें. सोयरा मातबर मिळाला व यांचा पूर्वीचा लौकिक मोठा. तेव्हां आप्तेष्ट फार जमा झाले. या प्रसंगीं देव स्वतः यांचे घरीं सहा दिवस येऊन राहिले. कोठीच्या किल्ल्या ब्राह्मणवेषानें येऊन राहिलेल्या पांडुरंगानें आपल्या हातीं घेतल्या. मग साहित्यास तुटवडा कोठून पडणार ! बावांनीं म्हटल्याप्रमाणें "कल्पतरूचा आश्रय केल्यावर कसलीही वाण पडत नाहीं, सूर्यघरीं पाहुणा आला त्याला अंधाराचें दर्शन घडत नाहीं, गंगा रांजणांत येऊन बसल्यावर पाण्याची कमतरता होत नाहीं, मेघ सडा घालूं लागल्यास कोणतीच जमीन कोरडी राहत नाहीं किंवा सरस्वती लेखक झाल्यास रससाहित्याची हानि होण्याचा बिलकुल संभव नाहीं," त्याप्रमाणें निळोबारायांची कोठी पांडुरंगानें संभाळल्यामुळें सबंध लग्नांत

कोणत्याही गोष्टीची वाण पडली नाहीं. निळोबारायांनीं या ब्राह्मणाचें थोडेंतरी उतराई व्हावें म्हणून त्याच्या अंगावर घालण्याकरितां एक शेला काढून ठेवला होता. वऱ्हाडी बोळवून निळोबा परत घरीं आले तेव्हां त्यांचेबरोबर तो ब्राह्मणही परत आला. मात्र तो परत आला व देवघरांत शिरून गुप्त झाला. निळोबारायांनीं सर्व घर धुंडलें पण ब्राह्मण सांपडेना! तेव्हां त्यांनीं क्षणभर नेत्र मिटून ध्यान केलें तेव्हां त्यांचे लक्षांत सर्व प्रकार आला व ते देवाला कष्ट दिल्याबद्दल फार खिन्न झाले व त्यांनीं बहुत शोक केला. ही गोष्ट निळोबारायांनीं स्वतःच एका अभंगांत सूचित केलेली दिसते. देवाची भक्तवत्सलता वर्णितांना ते म्हणतात —

**मागें ऐकिले पवाडे याचे। आजि ते साचे कळों आले ॥ १ ॥**
**आपुलियाचि स्वानुभवा। आलें तेव्हां साच कळलें ॥ २ ॥**
**आणुनि मोहरा संकट टाळी। गोणी दुष्काळीं दाणियांची ॥ ३ ॥**
**निळा म्हणे प्रयोजनीं। साहित्य घेउनि संपादिलें ॥ ४ ॥**



# २ देवदास



( शके १५४०–१६२० )



व्यंकटेशस्तोत्र ह्या प्रासादिक, प्रेमळ व लोकप्रिय स्तोत्राचा कर्ता देवदास ह्याचा काळ निश्चित झाला आहे. ह्याचेंच संतमालिकास्तोत्र म्हणून दुसरें एक स्तोत्र २५ वर्षांपूर्वी उपलब्ध झालें आहे, त्याच्या शेवटीं कवीनें स्तोत्ररचनाकाल ‘क्षय संवत्सर, आषाढी तृतीया सोमवार’ असा दिला आहे, व त्यांत १०५ संतांची नामावळि आहे. ती पाहतां व रचनाकाळाचा विचार करितां संतमालिकास्तोत्र शके १६०८ क्षय संवत्सर, आषाढ शुद्ध ३ सोमवार ह्या दिवशीं लिहून पूर्ण झालें असें दिसतें. मजपाशीं या स्तोत्राची एक जुनी प्रत आहे. शिवाय व्यंकटेशस्तोत्राची एक कविसमकालीन सुंदर प्रत मला उपलब्ध झाली असून तिचा लेखनकाल संवत् १७२० ( म्ह० शके १५८६ ) माघ शुद्ध १३ रविवार असा दिला आहे. त्याच प्रतीवरून मी पुढील अवतरणें देत आहें. शके १५८६ मधील मराठी भाषेचें स्वरूप त्यावरून समजणार आहे. देवदासाच्या ह्या दोन्ही स्तोत्रांवरून शक १५४०–१६२० हा देवदासाचा काळ धरण्यास हरकत नाहीं. माझ्या संग्रहीं असलेल्या संतमालिकास्तोत्राच्या शेवटीं ‘इतिश्रीकरुणामृतचैतन्यांकित देवदासकृत संतमालिका ग्रंथ संपूर्णमस्तु’ असा उल्लेख आहे. इतर प्रतींतही ‘चैतन्यांकित देवदास’ असे उल्लेख सांपडतात. व्यंकटेशस्तोत्रांत १०२ ओवी अशी आहे —

**श्रीचैतन्यकृपा अलोलिक। तोषविला वैकुंठनायक।**
**वर दिधला अमोलिक। जेणें सुख सर्वांसी॥**

संतमालिकेंतही १३४ वी ओवी —

**ऐशा करुणावचनें देवदास । प्रार्थितां पावला जगदीश ।**
**बोळला चैतन्यकृपेचा सौरस । सुखसंतोष पैं केला ॥**

अशी आहे. ह्यावरून देवदास तुकोबांप्रमाणें चैतन्यसंप्रदायी होते हें उघड आहे. चैतन्य हे आडनांव यजुर्वेदी ब्राह्मणांत आहे.

**करूनि दुसरेपणाची बोळवण । अवघा प्रगट जाला आपण ।**
**करुणामृत गुणसंपन्न । वंदिला पूर्ण निर्धारें ॥**

यावरून करुणामृतचैतन्य हें देवदासांच्या गुरूचें सांप्रदायिक नांव असावें असें मला वाटतें. दोन्ही स्तोत्रांच्या मजजवळील प्रती अधिक सरस आहेत. एकच ओवी उदाहरणार्थ देतों. प्रचलित पाठ —

**जयापासून त्रिगुण । ना भक्तिस्तव जाला सगुण ।**
**षष्ठाचळीं अवतरोन । भक्तजन उद्धरिला ॥ ६ ॥**

माझ्या प्रतींतील पाठ —

**जयापासून निर्माण त्रिगुण । तो भक्तिस्तव जाला सगुण ।**
**शेषाचळीं अवतरोन । भक्तजन उद्धरिले ॥ ६ ॥**

शेषाचळ म्ह० व्यंकटेशाचा गिरि. व्यंकटेशस्तोत्रांत ( १०६ ) त्यालाच ‘फणिपर्वत’ म्हटलें आहे. व्यंकटेश हें विष्णूचें नांव आहे व स्तोत्रांत लक्ष्मीव्यंकटेशाचें म्ह० विष्णूचेंच ध्यान व प्रार्थना आहे. व्यंकटेश याचा अर्थ व्यंकट ( खळदुर्जन ) यांचा शास्ता, नियमिता असा आहे. ज्ञानेश्वरीच्या भरतवाक्यांत ‘खळांची व्यंकटी सांडो’ असा एक चरण आहे. व्यंकटी म्हणजे वक्रता, वांकडेपणा. व्यंकटेशाला ‘व्यंकटरमणा’ असेंही म्हटलें आहे, येथें व्यंकटांची वक्रता काढून म्ह० त्यांना सरळ सज्जन करून रमविणारा असा त्याचा अर्थ आहे. वैष्णवांना म्ह० रामकृष्णांच्या उपासकांना हें व्यंकटेशस्तोत्र अत्यंत प्रिय आहे. मराठी स्तोत्रांतला हा स्तोत्रराज आहे. त्यांतील कित्येक चरणांना म्हणींची प्रगल्भता आली आहे —

१

**पुत्राचे सहस्र अपराध। माता काय मानी तयाचा खेद ?।**

२

**उडदांमाजी काळें गोरें। काय निवडावें निवडणारें ?।**

३

**अन्नासाठीं दाही दिशा। आम्हां फिरविसी जगदीशा।**

४

**समर्थाचे घरींचें श्वान। त्यास सर्वही देती मान।**

५

**कन्या देऊनियां कुळ। मग काय विचारावें ?॥ इ. इ०**

हें स्तोत्र सर्वांना अतिशय आवडलें आहे. हें सुलभ, प्रेमळ व भक्तिरसपूर्ण आहे. हें याच्या रचनाकालींच लोकप्रिय झालें होतें.

## १ व्यंकटेशस्तोत्र

पहिलें मंगलाचरण झाल्यावर वैकुंठनायक जो व्यंकटेश त्याची प्रार्थना ( ओवी ५–४० ) केली आहे व लोकप्रिय नामांनीं देवाला आळविलें आहे ( ४१ ते ५१ ). पुढें देवाच्या आपादमस्तक रूपाचें वर्णन ध्यानसुखार्थ केलें आहे ( ५२ ते ७० ). नंतर पूजा ( ७१ ते ७६ ) व प्रार्थना ( ७७ ते ८१ ) करून वरदान मागितलें आहे ( ८२ ते ९६ ) व वरप्राप्तीनंतर उपसंहार ( ९७ ते १०८ ) केला आहे. असें हें १०८ च ओव्यांचें स्तोत्र आहे. पण यांत ध्यानापासून साक्षात्कारापर्यंत सर्व कांहीं आलें आहे. सगुणप्रेमानें हें सारें स्तोत्र ओथंबलें आहे. हें आबालवृद्ध स्त्रीपुरुषांना सहज समजण्यासारखें व म्हणतां म्हणतां हृदय भक्तिप्रेमानें आर्द्र करणारें आहे. मराठी भाषेंतल्या सर्व स्तोत्रांत हें अत्यंत हृदयंगम व रसभरित आहे. पहिल्या प्रार्थनेंत —

**जयजयाजी व्यंकटरमणा। दयासागरा परिपूर्णा।**
**परंज्योति प्रकाशगहना। करितों प्रार्थना श्रवण कीजे॥ ६॥**

**जननीपरि तुवां पाळिलें । पितयापरी सांभाळिलें ।**
**सकळ संकटांपासुनि रक्षिलें । पूर्ण दीधलें प्रेमसुख ॥ ७ ॥**
**तुज न जाणतां जालों कष्टी । आतां दृढ घातली तुझे पायीं मिठी ।**
**कृपाळुवा जगजेठी । अपराध पोटीं घालिं माझे ॥ ११ ॥**
**पुत्राचे सहस्र अपराध । माता काये करी तयाचा खेद ।**
**तेविं कृपाळुवा गोविंद । मायेबाप मजलागिं ॥ १३ ॥**

'मी आपाद मस्तकवरि अन्यायी' आहें पण तुझा शरणागत आहें, 'लक्ष्मि तुझ्या पायातळिं' आहे पण आमच्या गळ्यांत भिक्षेची झोळी पडली आहे ! तर सांग पां ! येणे तुझी श्रीदावळि कैशी राहील ? 'कुबेर तुझा भांडारी। आम्हां फिरविसी दारोदारीं ' यांत तुझा कोणता पुरुषार्थ साधत आहे ? माझा अंगीकार करून 'मज हातींचे न सोडावें.' मी दुष्ट, पतित, दुराचारी, अधमांतला अधम आहें; विषयासक्त, मंदमति, आळशी आहें; मला लोकांत वागतां येत नाहीं,–'वचनोक्ति नाहीं मधुर । अत्यंत जनांसी निष्ठुर' असा आहे; कामक्रोधांनीं माझें शरीर 'बिढार केलें आहे'—

**ऐसा पतित मी खरा । परि तूं पतितपावन सारंगधरा ।**
**तुवां अंगिकारिलियां गदाधरा । कोण गुणदोष गणिल ? ॥ ३२ ॥**
**नीच रातलि रायासि । तिस कोण म्हणेल दासि ।**
**लोहो लागलिया परिसासि । पूर्वस्थिति मग कैंचि ? ॥ ३३ ॥**

सांगणें इतकेंच कीं 'अंगिकारावरि अव्हेर । समर्थें केला न पाहिजे.' आतां प्रार्थना हीच कीं—

**धावें पावें रे गोविंदा । हातिं घेऊनियां गदा ।**
**करिं माझ्या कर्माचा चेंदा । सच्चिदानंदा श्रीहरी ॥ ३७ ॥**
**तुझें नाम पतितपावन । तुझें नाम करि मळदहन ।**
**तुझें नाम भवतारण । संकटनाशन नाम तुझें ॥ ४० ॥**

म्हणून 'तुझे नामीं राहो माझी मति' एवढेंच मागणें आहे. तूं अनंत व तुझीं नामेंही अनंत. त्यांतलीं कांहीं सुगम नामें मी घेतों, असें म्हणून कवीनें विष्णूच्या कित्येक प्रसिद्ध नांवांनीं देवाला आळविलें आहे. त्यानें

'अंतरीं आठविला श्रीव्यंकटेश' तेव्हां 'हृदयीं आविर्भवली मूर्ती.' ती पाहून त्याला अपार सुख झालें. त्या सगुणस्वरूपाचें आपादमस्तक मनोहर वर्णन त्यानें केलें आहे. ध्याननिष्ठाला तें सुखाच्या गुदगुल्या करील.

**ऐसा तूं देवाधिदेवो। गुणातीत वासुदेवो।**
**माझीये भक्तीस्तव पाहा वो। सगुणरूप जालासि॥ ७४॥**

आधीं शरणागति, मग प्रार्थना, आविर्भाव, मानसिक ध्यान, मानस-पूजा, प्रार्थना व वरप्रदान अशा क्रमानें हें हार्दिक स्तोत्र अवघ्या १०८ ओव्यांत संपविलें आहे.

हृदयीं प्रगटलेल्या जगजेठीची पूजा करून प्रार्थना केल्यावर कवीनें एक उत्कृष्ट वर मागून घेतला आहे. —

**मजला देईं ऐसा वर। जेणें घडे परोपकार।**
**हेंचि मागणें साचार। वारंवार प्रार्थितसें॥ ८५॥**

हा वर मागण्यांत कवीचा उदारभाव स्पष्ट होतो. 'जेणें घडे परोपकार' हें सर्व धर्मकर्मांचें उदात्त रहस्य आहे. आणखी एक अशीच सुंदर मागणी —

**हा ग्रंथ जो पठण करि। त्यासि दुःख नसावें संसारिं।**
**पठणमात्रें चराचरिं। विजइ करि जगासि॥ ८६॥**

लग्नार्थीयाचें लग्न व्हावें, धनार्थीयास धन व्हावें, पुत्रार्थीयास पुत्र व्हावे. पण पुत्र कसे व्हावेत?

**पुत्र विजयी आणि पंडित। शतायुषि भाग्यवंत।**
**पितृसेवेसि अत्यंत (रत)। ज्यांचें चित्त सर्वकाळ॥ ८८॥**
**उदार आणि सर्वज्ञ। पुत्र देईं भक्तालागुन।**
**व्यथिष्ठांचि पीडा हरण। तात्काळ किजे गोविंदा॥ ८९॥**
**विद्यार्थियासि विद्या व्हावी। युधिं शस्त्रें न लागावीं।**
**पठणें जगांत किर्त व्हावि। साधु साधु म्हणोनि॥ ९१॥**
**दरिद्री व्हावा भाग्येवंत। शत्रूंचा व्हावा निःपात।**
**सभा व्हावी वश्य समस्त। ग्रंथपठणेंकरूनि॥ ९२॥**

ही सारीच प्रार्थना प्रत्येक व्यक्तीनें व राष्ट्रानें नित्य करावी अशीच तेजस्वी आहे. हातून परोपकार घडावा; जगांत विजयी व्हावें; शतायु, भाग्यवंत, पंडित, विजयी, उदार, सर्वज्ञ, पितृभक्त असे सत्पुत्र व्हावेत; तरुण विद्यार्थ्यांना इष्ट विद्या प्राप्त व्हावी व ते राष्ट्रकार्यार्थ लढाईंत शिरले तर त्यांना शस्त्रें लागूं नयेत व ते विजयी होऊन जगांत 'साधु साधु' म्हणोन सर्वांनीं मान डोलवावी; शत्रूंचा निःपात व्हावा; दरिद्री भाग्यवंत व्हावेत; पंडितांनीं सभा जिंकावी—यापेक्षां अधिक उदात्त मागणी कधीं कोणी देवापाशीं मागितली आहे ? राष्ट्राला यापेक्षां अधिक काय पाहिजे ? देवदास ही प्रार्थना करीत होते त्याच वेळीं शिवाजीमहाराज व त्यांचे तरुण वीर शत्रूंचा निःपात करीत राष्ट्रकार्यांत यशस्वी होऊन येत होते, परोपकारांत देहार्पणापर्यंत निमग्न होत होते ! हें सारे प्रपंचांतलें कार्य साधून लोकांना 'अंतीं व्हावें मोक्षसाधन !' म्हणजे सर्वांना अभ्युदय व निःश्रेयस यांची प्राप्ति व्हावी, प्रपंच परमार्थ उत्तम व्हावा. ( देवदास म्हणतात कीं ) येरा गबाळाचे भरीं पडूं नका. हें प्रार्थनाशतक पठण करा व देवाला आपलासा करा. 'हृदयीं वसे परमानंद । अनुभवसिद्ध सकळांसी !' देवाला निष्कपट प्रेमानें भजा, व म्हणा——

**गजेंद्राचिया आक्रांतासि । कैसा पावला हृषीकेशि ।**
**प्रल्हादाचिया भावार्थासि । स्तंभांतूनि प्रगटला ॥**
**व्रजासाठीं गोविंदा । गोवर्धन परमानंदा ।**
**उचलोनियां स्वानंदकंदा । सुखि केलें तये वेळीं ॥**
**वत्साचेपरि भक्तांसि । मोहें पान्हावे धेनु जैसि ।**
**मातेच्या स्नेहतुलनेसि । त्याचपरि घडलेंसे ॥**

याप्रमाणें देवानें कृपेची पाखर घातली, कीं सकळांसी सुख होईल असा वर देवदासांनीं स्वतःसाठीं व लोकांसाठीं देवापासून मिळविला. देवाचें नाम घ्या, त्याला अवंचकपणानें भजा म्हणजे 'प्रत्यक्ष प्रगटेल वनमाळी.' मोक्षमंदिराला जावयास दुसरे सायास नकोत.

'व्यंकटेशस्तोत्रा'च्या कांहीं प्रतींत 'देवदास'च्या ऐवजीं 'देवीदास' असें नांव आढळतें, पण तें खरें नव्हे.

## २ संतमालिकास्तोत्र

ह्यांत १४६ ओव्या आहेत. ह्या संतमालिकेस करुणामृतस्तोत्र असें नांव स्वतः कवीनें दिलें आहे, पण ह्यांत अनेक संतांचीं नामें आलीं असल्यामुळें व अशा संतनामावळ्या १०।२० तरी उपलब्ध झाल्यामुळें ह्या करुणामृतस्तोत्रास देवदासांची संतमालिका हेंच नांव देणें सोईचें होईल. ज्या नामोच्चाराबरोबर विशिष्ट वस्तूचा किंवा रूपाचा बोध होतो तेंच नांव सयुक्तिक ठरतें. ह्या मालिकेंत २५ प्राचीन व १०० वर ऐतिहासिक कालांतील संतसंतिणींचीं नांवें आलीं आहेत. ह्या संतनामावळींत पुरुष आहेत व स्त्रिया आहेत, हिंदु आहेत व मुसलमान आहेत, फार काय पण पशुपक्षीसुद्धां आहेत. पौराणिक संतांत गजेंद्र, द्रौपदी, भीमार्जुन, पांडव, ध्रुव, प्रल्हाद, उपमन्यु, सुदामा, अजामेळ, उद्धव, हरिश्चंद्र, बळी, अंबऋषि, रुक्मांगद, कुंटणी, भिल्लीण, गोपिका, बिभीषण, पक्षी, हरिण इ. नांवें आलीं आहेत. ऐतिहासिक संतांत मुकुंदराज-ज्ञानेश्वरकालापासून तों कवीच्या कालापर्यंत ४।५ शतकांत झालेल्या संतांचीं नांवें आहेत. ह्यांत कालानुक्रम नाहीं. जीं सहज तोंडाला आलीं तींच नांवें घेतलीं आहेत. कांहीं महत्त्वाचीं नांवें गळलींही आहेत. कांहीं नांवें प्रसिद्ध नाहींत. ह्या संतनांवांत कांहीं ग्रंथकार किंवा अभंग-पदें वगैरे निर्माण करणारे संतकवि आहेत व कांहीं नुसते साधु म्हणून गाजलेले आहेत. अति प्रख्यात आहेत, कमी प्रख्यात आहेत, अप्रख्यात आहेत. सर्वच संतनामावळ्या अशा आहेत. देवाविषयीं व संतांविषयीं लोकांत प्रेमभाव उत्पन्न व्हावा असाच त्यांचा हेतु असतो. त्यांतून इतिहास काढून घेतां येतो. देवा! तूं अनेक संतांची आर्त पुरविणारा, त्यांना संकटीं तारणारा, प्रसंगीं त्यांच्या सेवेंत धन्यता मानणारा असून माझी

उपेक्षा कां करितोस असा ह्या कवीचा देवास प्रश्न आहे. चारदोन ओव्या पहा —

**जातीचा वाणी तुकाराम। तुझ्या भजनीं अत्यंत प्रेम।**
**त्या पावलासि पुरुषोत्तमा। उदकीं कागद तारिले ॥ ६९ ॥**
**मुक्ताई वटेश्वर सोपान। निवृत्तिदेवा तुझें ध्यान।**
**त्यासी देउनि आपुलेपण। सरतें केलें तिहीं लोकीं ॥ ७१ ॥**
**मुक्तेश्वरा मुक्तदशा। दिधली तुवां हृषीकेशा।**
**पुरवून त्याची आशा।। भारतीटीका वदविली ॥ ८८ ॥**

देवाचे भक्त असंख्य व देवाचे गुण अनंत. कवीनें एके ठिकाणीं भक्तांचे पर्याय सुचविले आहेत. देव कोणाला गुरुरूप होऊन ब्रह्मस्थिति देतात, कोणाच्या अंतरांतच ज्ञानदीप लावतात, कोणाला सगुणरूपाने भेटून कृतकृत्य करितात, कोणाला नामछंद लावतात, कोणाला वैकुंठधाम देतात. तात्पर्य ‘ भक्तांलागीं चराचरीं। इच्छेसारिखा तूं होसी. ’

‘ जेणें पावन त्रिजगती ’ अशा संतांची ‘ कथा ऐकावी परमप्रीती ’ अशी कवीनें प्रथम श्रोत्यांची म्ह० वाचकांची प्रार्थना केली आहे. संतांच्या कथा ऐकून लोक पावन होतात; देव भक्तांना संकटीं रक्षितो व भक्त देवाला पळभरही विसरत नाहींत हें मनावर ठसतें; भक्तींत जातपात, कुळगोत, विद्याधनादिकांचा कांहींएक संबंध नाहीं, हृदय शुद्ध असलें म्ह० देव कृपा करितो; देवावर विश्वास बसतो, असे अनेक लाभ संतकथाश्रवणापासून होतात. आदिअंतीं कवीनें आपलें उपास्य व्यंकटेश याची करुणरवानें प्रार्थना केली आहे —

**सकळ सुरवरांचा ईशु। पूर्णब्रह्म सनातन वेंकटेशु।**
**स्थिर करूनियां मानसु। हरिचरित्रास श्रवण कीजे ॥ ५ ॥**
**जयापासूनि निर्माण त्रिगुण। तो भक्तीस्तव जाला सगुण।**
**शेषाचळीं अवतरून। भक्तजन उद्धरिले ॥ ६ ॥**

'युगायुगीं भक्तांसी। स्मरतां पावसी हृषीकेशी' असा देवाचा बडिवार आहे. 'युगायुगीं रक्षिसी भक्तां' असा पुराणांनीं डांगोरा पिटिला आहे व कलियुगांतही तोच अनुभव आहे. आनंदकंद असा देव भक्ताचें उणें पडूं देत नाहीं.' देवाचे असंख्य भक्त आहेत त्यांना त्यांच्या इच्छेसारखा तो होतो.

असो. ह्या दोन स्तोत्रांत सुलभ प्रेमळ वाणीनें देवदासांनीं देवाला आळविले आहे, देवाचे भक्त होऊन जाणाऱ्यांस देव संकटीं रक्षितो असा विमलभाव लोकांत उत्पन्न केला आहे, व संसारी लोकांना मोठा धीर दिला आहे.

निंबराज दैठणकर यांचे वंशजांकडे देवदासकृत एक भगवद्गीताटीका ह्या ग्रंथाची त्रुटित प्रत सरदार मुजूमदार यांस मिळाली आहे. पण ती याच देवदासांची अशी खात्री नाहीं. ओवी चांगली आहे. ओवीसंख्या ३००० पर्यंत असावी.





सिंहासनावरि रघूत्तम मध्यभागीं।
बंधू तिघे परम सुंदर पृष्ठभागीं॥
वन्हीसुता निकट शोभत वामभागीं।
वीलासितो भिम भयानक पूर्वभागीं॥



परब्रह्म जें रामरूपासि आलें।
तिथें आपुलें चित्त तें अर्पियेलें॥
सखा ब्रह्मचारी हनूमंत केला।
नमस्कार साष्टांग स्वामी तुम्हांला॥

# ३ श्रीसमर्थ रामदास



## १ चरित्रारंभ

१ महाराष्ट्राची जागृति. २ नारायणाचा जन्म. ३ बाळपण. ४ 'सावधान! सावधान!' ५ गोदावरीचा पुण्यपरिसर. ६ नाशिकचे समकालीन ग्रंथकार. ७ तपश्चर्या. ८ तीर्थयात्रा. ९ एकान्ताची आवड. १० मातृतीर्थ.

### १ महाराष्ट्राची जागृति

श्रीसमर्थचरणांना भक्तिनम्रचित्तानें आधीं वंदन करितों. तीन शतकांमागें राष्ट्रावर कोणता तुफान प्रसंग आला होता व त्यांतून स्वधर्म-सूर्याचा महाराष्ट्रक्षितिजावर उदय होऊन तो कसा टळला हा रम्य इतिहास आपण दुसऱ्या खंडांत पाहिलाच आहे. परधर्म व परदास्य यांच्या माऱ्याखालीं हिंदुसमाज चिरडलेला, स्वधर्मकर्मांचा प्रायः लोप झालेला, दैन्यदारिद्र्यउद्वेगानें लोक त्रस्त झालेले, अमर्याद फितवेखोरांचें फावलेलें, नाना बंडपाखांडें माजलेलीं, चारित्र्य हीनावस्थेला पोंचलेलें—असल्या बिकट परिस्थितींतून देवी भवानीनें समर्थांच्या वाणींत व शिवबांच्या तलवारींत संचार करून महाराष्ट्राचा माथा जगाच्या इतिहासांत उजळ केला. महाराष्ट्रधर्म, महाराष्ट्रीय लोक व मराठी भाषा यांचा डंका सर्वत्र गाजूं लागला. सह्याद्रीच्या गिरिकंदरांतून वीरश्रीचा व कर्तृत्वाचा वारा सोसाट्यानें वाहूं लागला. भीमथडीचे व गंगथडीचे घोडे हिंदुस्थानभर नाचूं लागले. पराक्रमी वीर, बुद्धिवंत मुत्सद्दी, स्वानुभवी संत व प्रासादिक कवि महाराष्ट्रांत चमकूं लागले. महाराष्ट्राचें हृदय वीररसानें उचंबळलें. ब्रह्मतेज व क्षात्रतेज एकवटलें. हात, पाय, डोकें,

हृदय—सर्व देहांत वीरश्रीचा संचार होऊन महाराष्ट्ररूपी विराट् पुरुष कुंभकर्णी महानिद्रेतून जागा झाला. तपःप्रभावानें अमोघ झालेल्या आपल्या संजीवनी वाणीनें महाराष्ट्र ज्यानें हलवून जागा केला व राष्ट्रकार्यास लावला तो महामांत्रिक श्रीसमर्थ रामदासस्वामी हे होत. समर्थांची वाणी व शिवरायांची तलवार यांनीं अद्भुत कार्य करून महाराष्ट्राचें 'आनंदवनभुवन' बनविलें. समर्थांची ती ओजस्वी वाणी महाराष्ट्राच्या कानावर अजून पडत आहे. ही वाणी आजचा फाटलेला महाराष्ट्र सांधील. 'सकल लोक एक करावे ' ह्या समर्थमंत्राचा ध्यास जर आजचा महाराष्ट्र घेईल तर तो पुन्हा खरोखरीचा महाराष्ट्र होईल. समर्थांच्या चरित्रांत व वाणींत लोकोत्तर तेजस्विता आहे. समर्थांवर सकल लोकांची श्रद्धा आहे. समर्थांची ही वाणी लोक अंतरांत ऐकतील तर प्रपंच भाग्याचा होईल, राजकारण यशस्वी होईल व परमार्थ पैसावेल.

महाराष्ट्र चेतवून जागा करण्याचें श्रेय अनेकांच्या वांट्यास येणारें असलें तरी तें मुख्यतः एकनाथ, तुकाराम, रामदास व शिवाजी ह्या चौकडीस आहे. मागील खंडांत एकनाथ व तुकाराम यांची कामगिरी आपण पाहिली. एकनाथ (शके १४५० ते १५२०), तुकाराम ( शके १५३० ते १५७२ ) व समर्थ ( शके १५३० ते १६०३ ) म्हणजे एकनाथ, तुकाराम व रामदास या तीन महाराष्ट्राच्या आवडत्या व परमपूज्य विभूतींनीं एकामागून एक येऊन महाराष्ट्राच्या धार्मिक व सामाजिक उद्धाराचें महत्कार्य केलें. शिवछत्रपतींनीं स्वराज्य स्थापन केले व समर्थांनीं त्यांच्या कार्यास आशीर्वाद देऊन प्रोत्साहन व साहाय्य केलें. नाथ-तुकोबांनीं भागवतधर्माचा जयजयकार करून महाराष्ट्राची मनोभूमि शुद्ध केली व समर्थ-शिवाजी यांनीं त्याच पुण्याईवर स्वराज्याची भव्य इमारत उभारली. आपण येथें प्रथम समर्थांच्या चरित्राचा विचार करूं व मग त्यांच्या कामगिरीचा आढावा घेऊं.

## २ नारायणाचा जन्म

समर्थांचे पूर्वज कृष्णाजीपंत, उपनाम ठोसर, सूत्र आश्वलायन, गोत्र जामदग्न्य हे मूळ बेदरप्रांतीं राहत होते. तेथें राज्यक्रान्ति होऊन दुष्काळ पडल्यामुळें त्या प्रांतांतील गृहस्थ गंगातीरास येऊं लागले. त्यांजबरोबर कृष्णाजीपंतही गंगादक्षिणतीरीं मौजे हिवरे येथें येऊन राहिले. त्यांस पांच पुत्र. त्या सर्वांनीं बीड प्रांतांत जोशी-कुळकर्णीपणाची वृत्ति मिळविली. कृष्णाजीपंतांचे पुत्र दशरथ यांनीं अंबाड परगण्यांत हिवऱ्यापासून ३ कोसांवर कांहीं गवळ्यांच्या मदतीनें जांब गांव वसविले, व जांब, आसनगांव, वगैरे १२ गावें वसवून त्यांचें जोशी–कुळकर्णीपणाचे वतन मिळविलें. यांपैकीं जांबगांव फक्त कसब्याचा व बाकीचीं खेडीं. दशरथास सहा पुत्र. त्यांपैकीं रामाजीपंत वडील पुत्र. त्यापासून २० वे पुरुष नारायण उर्फ समर्थ रामदासस्वामी. ह्या घराण्यांत मूळपासून रामाची उपासना होती. ह्या २० पिढ्यांत § दोघांनीं पांचपांच गांवांची वृत्ति मिळविली व तिघे भगवत्परायण निघाले. समर्थांचे आजे त्र्यंबकपंत व पिते सूर्याजीपंत व माता राणादेवी. सूर्याजीपंतांचा जन्म शके १४९० मध्यें जांबेसच झाला. त्यांच्या घराण्यांत २४ पिढ्या रामाची उपासना चालत होती. सूर्याजीपंत परमतपस्वी, भागवतधर्मी व षट्कर्मी निरंतर तत्पर होते. त्यांनीं सूर्योपासना निष्ठापूर्वक केली. त्यांस शके १५२५ मध्यें सूर्यनारायणाचा वरप्रसाद झाला. ‘ तुला एक पुत्र मदंशेंकरून व दुसरा मारुती-अंशेंकरून होईल. पहिला वंशधर होईल व दुसरा ब्रह्मचर्यव्रत धारण करून जगदुद्धार करील. ’

---

§ कृष्णाजीपंतांपासून समर्थांपर्यंतचा वंशवेल बखरींत दिला आहे तो असा —

मूळपुरुष कृष्णाजीपंत–दशरथ–रामाजीपंत–हरिपंत–निराजी उर्फ निरंजन–शिवाजीपंत – विष्णु – ब्रह्मजी – गणेश – धोंडोपत – आत्माराम – गुंडाजी–निराजी – आत्माराम – शिवाजी – विष्णु – केशव – रामाजी – भवानजी – सूर्याजी – त्र्यंबकपंत. सूर्याजीपंत यांस पुत्र दोन – श्रेष्ठ व समर्थ.

सूर्याजीपंतांस शके १५२६ मध्यें साक्षात् रामदर्शन होऊन रामाचा अनुग्रह झाला. पुढें त्यांना राणूबाईच्या पोटीं दोन पुत्र झाले. वडील पुत्र गंगाधर याचा जन्म शके १५२७ विश्वावसु संवत्सरीं मार्गशीर्ष वद्य १३ स झाला, व धाकटा पुत्र नारायण याचा जन्म शके १५३० कीलक संवत्सरीं चैत्र शुद्ध नवमीस मध्यान्हीं श्रीरामजन्मसमयीं झाला. वडील पुत्र गंगाधर, श्रेष्ठ उर्फ रामीरामदास या नांवानें पुढें प्रख्यातीस आले व धाकटा पुत्र नारायण हेच श्रीसमर्थ रामदासस्वामी होत. दोघां भावांत तीन वर्षांचे अंतर. जांबगांवीं रामजन्मोत्सवाचा आनंद सूर्याजीपंतांच्या घरीं भरला असतांना व सारें घर रामनामगजरानें दुमदुमलें असतांना समर्थांचा अवतार झाला. ज्ञानेश्वरांचा जन्मही असाच गोकुळाष्टमीस मध्यरात्रीं कृष्णजन्मोत्सवावसरींच झाल्याचें प्रसिद्ध आहे. हे अवतार लोकाभ्युदयार्थ झाले. यांचे जन्माचे योगही अपूर्वच होत. राणूबाईचे पवित्र डोहळे व नारायणाचें बारसें यांचें चरित्रकारांनीं विस्तृत वर्णन केलें आहे. त्यांच्या बालपणच्या अनेक लीलांचेंही त्यांनीं कौतुकपूर्ण वर्णन केलें आहे.

## ३ बाळपण

समर्थांचें बाळपण चार मुलांप्रमाणेंच खेळण्याबागडण्यांत गेलें. ‘वृक्षसरोवरीं उड्या घेती। रानीं वनीं सदा असती’ असें सांगून समर्थ-प्रतापकार म्हणतात कीं, समर्थ आठ सवंगडे जमवून ‘गोट्या बोटें टिंचिती पूर्ण!’ रूपावळी, समासचक्र, अमर, रुद्र, पवमान, पूजावैश्वदेव, ब्रह्मयज्ञ हे समर्थ फार लवकर शिकले. उपजतबुद्धि तीव्र, धारणा मोठी, पाठान्तर उत्तम, अक्षर वळणदार व गायनाचाही छंद बाळपणापासून—या शिक्षणांत त्यांचीं बारा वर्षे गेलीं. गंगाधराचें उपनयन वयाचे ५ वे वर्षी झालें. नारायणाचेंही ३ वर्षांनीं नंतर झालें. गंगाधर उर्फ श्रेष्ठ यांचा विवाह अंबेडकर देशमुख यांचे घराण्यांतील एका कन्यकेशीं होऊन तिचें नांव पार्वती असें ठेवण्यांत आलें (शके १५३४). सूर्याजीपंत शके १५३७ मार्गशीर्ष शुद्ध ९ स

निजधामास गेले. त्या वेळीं समर्थ अवघे ७ वर्षांचे होते. राणूबाईंचे बंधु भानजी गोसावी हे एकनाथमहाराजांचे शिष्य असल्यामुळें ते नेहमीं पैठणास षष्ठीच्या उत्सवास जात. त्यांजबरोबर सूर्याजीपंत व राणूबाई दोघेंही अनेकवार पैठणास गेलीं होतीं. राणूबाईंना पतिनिधनानंतर दोघे पुत्र व श्रेष्ठांची भार्या पार्वती या तिघांचा सांभाळ करावा लागला. श्रेष्ठांना वडिलांपासून रामोपदेश झाला होता. वडील वारले तेव्हां नारायणाने 'मला उपदेश द्या' असा हट्ट वडील बंधु यांजकडे धरिला. 'तुझा हूडपणा जाऊन तूं अंमळ मोठा झालास म्हणजे तुला उपदेश देऊं' असें श्रेष्ठ म्हणाले. तें मानी नारायणास आवडलें नाहीं. नारायण रुसून गांवाबाहेर असलेल्या मारुतीच्या देवालयांत गेला. तेथें त्याला रामदर्शन होऊन अनुग्रह झाला. ही गोष्ट शके १८३८ श्रावण शुद्ध ८ स मध्यरात्रीं घडली. नारायणाचे वय तेव्हां अवघें आठ वर्षांचें होतें. ध्रुव-प्रल्हादादिकांसारखाच हा प्रकार झाला. वडील बंधूंनीं उपदेश देण्याचें नाकारलें तेव्हां नारायणानें आपल्या उत्कट भक्तिबलाने रामाला प्रगट होण्यास भाग पाडलें. ही भाऊबंदकी अपूर्व होय ! समर्थांनीं अंमळ विनोदानें एका अभंगांत ही गोष्ट सांगितली आहे. ते म्हणतात—

**आमुचे वंशीं आत्माराम। एका पिंडींचे निष्काम ॥ १ ॥**
**रामदास्य आलें हातां। अवघा वंश धन्य आतां ॥ ध्रु० ॥**
**बापें केली उपार्जना। आम्हीं लाधलों त्या धना ॥ २ ॥**
**बंधु अभिलाषा टकला। वांटा घेऊनि भिन्न झाला ॥ ३ ॥**
**पोर सकळां संकोचलें। एका सुखा उधळलें ॥ ४ ॥**
**रामीरामदासीं स्थिती। पाहिली वडिलांची रीती ॥ ५ ॥**

**भावार्थ**—आम्ही उभयतां बंधु एका निष्काम पिंडाचे आहोंत म्हणजे निष्काम रामभक्ति करणाऱ्या एकाच आईबापांच्या पोटीं जन्मलेले आहोंत. आमच्या घराण्यांत आत्मारामाची उपासना चालत आहे. आमच्या वडिलांनीं

रामाची उपासना केली व ह्या वडिलार्जित संपत्तीचा भोग आम्हांला वारसहक्कानें प्राप्त झाला. दादा (श्रेष्ठ) यांना सारी उपासनारूप संपत्ति आपल्यालाच मिळावी असा लोभ सुटला म्हणून मी माझ्या वांट्यासुद्धां सर्व धन भावास दिलें, व घराबाहेर पडलों आणि सर्व सुखमय अशा रामभजनाची स्वतंत्रपणें कमाई केली. रामदास्य आमच्या हातीं आलें, आमचा सारा वंश धन्य झाला !

समर्थांनीं एका आत्मचरित्रपर अभंगांत म्हटलें आहे —

**राघवाची भक्ति सुखाची विश्रांति ।**
**पितयाची शांति झाली पुढें ॥ २४ ॥**
**पुढें ज्येष्ठ बंधु न सांगेचि कांहीं ।**
**सुखें देवालयीं निद्रा केली ॥ २५ ॥**
**निद्रा केली तेथें श्रीरामें उठवूनी ।**
**तोचि मंत्र कानीं सांगितला ॥ २६ ॥**

समर्थांना उपदेश साक्षात् रामरायाचा झाला. रामराय हेच त्यांचे सद्गुरु झाले. समर्थांना श्रेष्ठांनीं अनुग्रह दिला नाहीं तरी समर्थांनीं पुढें त्यांच्याविषयीं अत्यंत प्रेमादराचे उद्गार दोनतीन पत्रांत काढले आहेत. ‘ विमलब्रह्मपरायण । सकल भक्तिसंरक्षण । विशेष वैराग्यलक्षण । तुमचे ठायीं ’ असें त्यांनीं श्रेष्ठांविषयीं म्हटलें आहे. समर्थांची मातुश्रीविषयींही पराकाष्ठेची पूज्यबुद्धि होती.

त्यांच्या बाललीलांपैकीं एक लीला येथें सांगतों. समर्थांचें बालपणापासून गृहकृत्यांकडे बिलकुल लक्ष नसे. बरोबरच्या मुलांना घेऊन रानावनांत हिंडावें, झाडावर चढावें, उड्या माराव्या, पोहावें, रामनाम गात नाचावें, बागडावें यांत त्यांचा सारा वेळ जाई. ‘ नारायणा ! तूं शहाणपण केव्हां शिकणार ? पैसे मिळवून वडील भावाला मदत केव्हां करणार ? ’ असें राणूबाई त्याला जवळ घेऊन नेहमीं विचारीत. नारायणाला संसारगोष्टींचा

स्वभावतः कंटाळा. ‘ पुरुषांनीं संसाराची कांहीं चिंता वाहिली पाहिजे ’ असें आई एकदां सहज म्हणाली; तेव्हां नारायण घरांतल्या एका अंधाराच्या खोलींत जाऊन गुपचुप बसला. घरींदारीं रानावनांत नारायणाचा पुष्कळ शोध केला पण नारायण सांपडला नाहीं. राणूबाई कांहीं कामानिमित्त त्या खोलींत गेल्या तों त्यांना नारायणाचा पाय लागला! ‘ कोण? नारायण? ’ ‘ आई, मीच आहें. ’ ‘ अरे! येथें काय करितोस? ’ **‘ आई, चिंता करितों विश्वाची!’**

‘ मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात ’ हेंच खरें आहे! कुळकर्ण्याच्या घराण्यांत जन्मलेल्या या मुलानें ‘ ब्रह्मांडाचें कुळकर्ण ’ केलें. जांबेस राहणारा नारायण पंचवटीस कां आकर्षिला गेला तें आतां आपण पाहूं.

## ४ ‘ सावधान ! सावधान ! ’

श्रेष्ठांनीं नारायणाचें अंतरंग ओळखलें व हा मुलगा फार दिवस घरीं राहणार नाहीं, हा लवकरच उधळणार व कोठें तरी देहाचें सार्थक करण्यासाठीं निघून जाणार असा त्यांनीं आपल्या मनाशीं कयास बांधला. नारायणाला फार बोलूं नकोस असें त्यांनीं राणूबाईस सुचविलेंही! राणूबाईला वाटलें कीं, एकदां नारायणाच्या पायांत दोन मणाची बेडी अडकविली, त्याचे दोन हातांचे चार हात केले, कीं तो आपसूक मार्गावर येईल! सूनमुख पाहण्याची हौसही स्त्रियांत स्वाभाविक असतेच! नारायणाच्या लग्नाचा विचार निघाला. आईनें नारायणापाशीं लग्नाची गोष्ट काढली. नारायण उठून वनांत गेला. वाड्यांतले लोक शोधास गेले तों नारायण एका उंच वृक्षाच्या डाहळीवर बसून झोंके घेत होता! लोक आपणास पकडून नेणार हें पाहतांच त्यानें झाडावरून खालीं नदींत उडी घेतली. उडी खडकावर पडली. डोक्यास टेंगूळ आलें. ती कायमची खूण मस्तकावर राहिली. ‘ भाळीं आवाळू असे. ’ लोकांनीं नारायणास घरीं नेलें. त्याला पाहून आईला आनंद झाला. श्रेष्ठांनीं ‘ पुन्हा त्याच्या लग्नाचा विचार काढूं

नकोस, मुलगा हातचा जाईल' असें तिला बजावलें. पण आईचें हृदय तें—तिला वाटे नारायणाला कसेंही करून विवाहपाशांत गोंवलें म्हणजे तो घरकोंबडा होऊन राहील ! एकदां तिनें नारायणाला जवळ बसवून प्रेमानें गोंजारीत म्हटलें, 'नारायणा ! मी सांगेन ती गोष्ट तूं मान्य करिशील काय ?' नारायण म्हणाला, 'आईच्या वचनाबाहेर मी जाणार नाहीं.' ती म्हणाली, 'लग्नाची गोष्ट काढली कीं तुला राग येतो, पण अंतरपाट धरीपर्यंत तूं नाहीं म्हणूं नकोस. तुला माझ्या गळ्याची शपथ आहे.' नारायणानें 'आज्ञा प्रमाण' म्हणून उत्तर केलें. ही त्याची संमति समजून आईनें त्याच्या लग्नाची तयारी सुरू केली. आसनगांवीं नारायणाचे मामा भानजीपंत राहत होते. त्यांची कन्या वधू नेमिली. लग्नाचें वऱ्हाड जांबेस आलें. सीमान्तपूजन, वाङ्निश्चय झाले. वरास समारंभानें वधूगृहीं आणलें ! फाल्गुन शुद्ध अष्टमीचा ११ घटकेचा मुहूर्त साधायचा होता. मंगलाष्टकें सुरू झालीं. द्विजांनीं 'सावधान' म्हणतांच नारायणानें 'झुकांडी दिली' व लग्नांतून निसटला तो तीन कोसांवरचें गोदातीर गांठलें ! नारायणानें आईस दिलेलें वचन अक्षरशः पाळलें ! गिरिधरस्वामी लिहितात—'ऐसें कोठे नाहीं हो वर्तलें। पूर्वीं अवतारादिकांसी नाहीं झालें' तें अक्षरशः खरें आहे. 'सांगायासी ऐकायासी गोष्ट झाली.' ब्राह्मणांनीं सावधान म्हणतांच समर्थ तोच उपदेश समजून घराबाहेर पडले व त्यांनीं जगास 'सावधान' केलें !

ह्या प्रसंगास अनुसरून रचलेलें समर्थांचें एक पद प्रसिद्ध आहे—

**सावधान सावधान। वाचे बोला नारायण ॥ ध्रु० ॥**
**दहा वर्षें बाळपण। वीस वर्षें तारुण्य।**
**अंगीं भरला अभिमान। तेव्हां न घडे सावधान ॥ १ ॥**
**तीस वर्षें पुरीं होती। पुत्रबाळा लागे प्रीती।**
**त्यांतचि पडे भ्रांति। मग कैंची आत्मप्राप्ती ॥ २ ॥**

दहा दहा वर्षांचा एक असे या पदाचे दहा कडाखे आहेत. 'चाळीस वर्षें जालीं डोळां चाळीसी आली.' पुढें 'साठीची बुद्धी नाठी। हातीं घेवोनीयां काठी। वसवसां लागे पाठीं। त्याला हांसती कारटीं!'

**शतमान पुरुष झाला। जन्म वायां व्यर्थ गेला।**
**रामदास सावध झाला। हरिभजनीं लागला॥ १०॥**

## ५ गोदावरीचा पुण्यपरिसर

गोदावरीच्या पुण्यपावन परिसरांत समर्थांनीं रामरायाप्रमाणेंच १२ वर्षें काढलीं. भरतखंडांतील महानद्यांपैकीं गोदा ही एक असून महाराष्ट्राची व आंध्रप्रांतांची ही मुख्य नदी आहे. त्र्यंबकेश्वरीं उगम पावून ९०० मैलांचा प्रवास करीत ही पूर्वसमुद्राला मिळाली आहे. ही ब्रह्मगिरि पर्वतावर उगम पावली असून गोदेचा व ब्रह्मगिरिपर्वताचा ज्ञानेश्वरींत उल्लेख आला आहे. ज्ञानेश्वरांच्या पूर्वजांचें वसतिस्थान आपेगांव हें गोदेच्या परिसरांत आहे. श्रीनिवृत्तिनाथांना गैनीनाथांचा उपदेश ब्रह्मगिरीच्या प्रदक्षिणेच्या वाटेवर झाला असून ज्ञानेश्वरादि भावंडांनाही ब्रह्मज्ञानोपदेश निवृत्तिनाथांनीं तेथेंच केला आहे. ब्रह्मगिरीवर गोरक्षनाथांची गुंफा असून पायथ्याशीं निवृत्तिनाथांची समाधि आहे. तेव्हां गोदेच्या उगमस्थानाशींच ज्ञानेश्वरांचा निकट संबंध आहे. श्रीशंकराच्या निवासस्थानापासून निघालेली गोदा ही आनंदवल्ली व गंगापूर यांवरून नाशिकपंचवटीस येते. पंचवटी प्रभु रामचंद्राचें वनवासांतील मुख्य निवासस्थान. अगस्त्यमुनीचा आशीर्वाद घेऊन प्रभु श्रीराम सीता-लक्ष्मणासह जनस्थानांत म्हणजे नाशिकपंचवटींत आले व तेथें त्यांनीं १२ वर्षें वस्ती केली. वाल्मीकिरामायणाच्या अरण्यकांडांत (अ. १३ ते १५) गोदापरिसराचें फार नामी वर्णन आलें आहे. गोदावरीचा हा पुण्यप्रदेश पाहून 'इदं पुण्यमिदं मेध्यं' असें रामरायांना वाटलें व त्यांनीं पंचवटींत म्ह० पांच वटवृक्षांच्या गर्द छायेंत 'विशाल पर्णशाला' बांधली. 'रम्यां गोदावरीं नदीं' अशा गोदावरीचें त्रिवर्गांनीं नित्य

स्नान करावें व 'नित्यपुष्पितकानन' व 'प्राज्यफलमूल' अशा ह्या प्रदेशांत स्वानंदानें विहार करावा! लक्ष्मणाला राम स्वमुखानें सांगतात —

**अत्र गोदावरी रम्या पुष्पितैस्तरुभिर्वृता।**
**दृश्यन्ते गिरयः सौम्य फुलैस्तरुभिरावृताः॥** (अ० १५)

येथे खर्जूर म्ह० खारीक, च्युत म्ह० आंबा, चंपक म्ह० चाफा, केतकी म्ह० केवडा, साल म्ह० सालई, पुन्नाग इ. वृक्षांचे वर्णन असून भातखांचरांचें चित्र फारच बहारीचें वठलें आहे.

**खर्जूरपुष्पाकृतिभिः शिरोभिः पूर्णतंडुलैः।**
**शोभन्ते किंचिदानम्राः शालयः कनकप्रभाः॥** (अ० १६)

येथें किंचित् लवलेलीं, कनकप्रभ म्ह० पिवळीं रसरशीत व तंदुलपूर्ण म्ह० तांदुळांच्या दाण्यांनीं भरलेलीं अशीं भाताचीं शेतें आजही पाहण्यांत येतात. राम म्हणतात कीं, येथें दिवस 'मृदुसूर्य' व 'सुमारुत' असतात व येथें फिरणे फार सुखाचें वाटतें—'अत्यंत सुखसंचाराः.' हा सारा अनुभव आजही येतो. असो. या प्रदेशाला पुढें गोपराष्ट्र, देवराष्ट्र अशीं नांवें ऐतिहासिक कालांत पडलेलीं आहेत. रामरायांच्या चरणरजाने पावन झालेली व पुढें समर्थांनीं आपल्या तपश्चर्येसाठीं पसंत केलेली ही भूमि मागें टाकून गोदावरी सायखेडें, चांदूरी हीं गांवें घेऊन नांदूर मध्यमेश्वर ह्या शिवस्थानीं येऊन पोंचते. तेथें एक मोठा डॅम आहे तो 'नांदूर डॅम' म्हणून प्रसिद्ध आहे. कादवा व दारणा ह्या नद्या येथें मिळाल्यापासून गोदावरीचें पात्र मोठें होत गेलें आहे. नाशिक जिल्ह्यांतून ६० मैल वाहत गेल्यावर गोदावरी नगर जिल्ह्याचा उत्तरभाग भिजवीत व पावन करीत कोपरगांव, संवत्सर, पुणतांबें, टोकें—प्रवरासंगम ह्या स्थानाला क्षेत्रपण देत देत मोगलाईत पैठणाकडे वळली आहे. ज्ञानेश्वरमंडळ पैठणच्या ब्राह्मणांकडे शुद्धिपत्र मागण्यासाठीं गेल्याची कथा श्रीज्ञानेश्वरचरित्रांत प्रसिद्ध आहे. पैठणासच ज्ञानेश्वरमहाराजांनीं रेड्याकडून वेद बोलविले. ह्या गोदावरीच्या

पवित्र जलानें अनेक संतकवींना परमार्थाची व ग्रंथरचनेची स्फूर्ति दिली आहे. किती तरी मराठी संत व कवि गोदातीरचे आहेत. ज्ञानेश्वरांचें लीलाचरित्र व संतमुकुटमणि श्रीएकनाथमहाराज यांचें सारें अवतारचरित्र गोदातीरस्थ पैठणचेंच आहे. अमृतरायांनीं एका पदांत म्हटलें आहे —

**सज्जनमन सुमेरू गुणनिधि एकनाथ**
**परमपुरुख परमभागवत अवतरे ॥ ध्रु० ॥**
**नगरनमन पट्टन तीरथमन गोदा**
**पुलिनपनघनतटनिकट निवास करे ॥ १ ॥**

मन म्ह० मध्यें. नाथांच्या वेळेपासून परवांच्या अनंतनाथांपर्यंत पैठणास झालेल्या १०८ सत्पुरुषांची एक यादी मजजवळ आहे ! समर्थांसारखे तुकोबाराय फारसे हिंडफिरे नव्हते; तरी पुणतांबें, त्र्यंबकेश्वर, पैठण इ० गोदातीरचीं क्षेत्रें पाहत असतांना ‘ गोदातीरें निर्मळें । दिवस जाय सुखाचा ’ असा उद्गार त्यांनींही काढला आहे ! हा गोदापरिसर असा परमपावन असून त्यांत मोठमोठे साधुसंत व कवि झालेले आहेत. त्र्यंबकेश्वरापासून नांदेडपर्यंतचा महाराष्ट्राचा भाग गोदावरीने पूनीत केला आहे व गोदेच्या परिसरांतील जांब येथे समर्थांचा जन्म झाला असून समर्थांनीं आपल्या तपश्चर्येचें स्थान नाशिक पंचवटी हें निवडून काढले.

रामकथेला समर्थांनीं एके ठिकाणीं गोदावरीची उपमा दिली आहे — ‘ गोदावरी कथाकीर्ती या रामाची । संसारव्यथांची विश्रामता ॥ ’ संसारव्यथा जेथें नाहींशा होतात अशी ही गोदावरी आहे व अशीच रामकथा आहे. ‘ रामनामकथागंगा । स्मरणें पावन करी जगा ’ असाही त्यांचा एक अभंग आहे. गोदावरीला गंगा असेंही म्हणतात.

समर्थ पंचवटीस आले त्या वेळच्या पंचवटीचें स्वरूप कसें होतें ? समर्थ पंचवटीस आले त्याच्या ४० वर्षेंच आधीं एकनाथांनीं आपल्या भावार्थरामायणाच्या अरण्यकांडांत ‘ परमपावन पंचवटीचें ’ वर्णन केलें आहे तें

पहावें. नाथ स्वतः नाशिकपंचवटीस राहून गेले होते यांत शंका नाहीं. ‘ रम्य रमणीय गंगातटीं । ’ पंचवटीची पंचक्रोशी आहे. ‘ सुंदर आणि कपालेश्वर । दोहीं तीरीं मनोहर । तीर्थें पावन परिकर । श्रीरामचंद्रहिवास. ’ सुंदर नारायण व कपालेश्वर हीं प्राचीन मंदिरे गोदावरीच्या दोन्ही तीरांवर आजही उभीं आहेत. हीं नाथांच्या वेळीं निःसंशय होतीं. अरुणावरुणा ह्या नद्यांचा संगम होऊन तेथें ‘ प्राची सरस्वती मीनली ’ आहे. हीं तीनही नांवें नाथांच्या वेळेपासून आजपर्यंत लोकांच्या माहितींत आहेत. कपालेश्वराच्याजवळ श्रीरामानें आपला आश्रम तयार केला. तेथेंच आज प्रसिद्ध राममंदिर उभें आहे. ‘ अरुणावरुणासंगम सार । प्राची सरस्वती पवित्र । लक्षूनि सुंदर कपालेश्वर । करीं सत्वर स्वाश्रम ॥ ’ राममंदिराच्या पलीकडे तपोवन असून तेथेंच शूर्पणखेचे विरूपकरण झालेलें आहे. ‘ गंगातीर सम सुशीळ । वृक्ष पुष्पित सफळ ’ आहेत. येथें ‘ बिल्व अश्वत्थ मधुवनें । आम्रवनें मघमघित ’ आहेत. ‘ पंचपंच वृक्षांची दाटी । गंगातीरीं निकटानिकटीं । त्यांमाजी शोभे पंचवटी । देखतां दृष्टी मन निवे. ’ हा आश्रम ‘ नानापुष्पीं नानाफळीं ’ डवरलेला आहे. येथे ‘ कुशपुष्पें सुस्वाद फळें । ‘ शीतळ जळें सुपरिमळें ॥ ’ आहेत.

## ६ नाशिकचे समकालीन ग्रंथकार

नारायणानें नाथांच्या भावार्थ रामायणाचीं हीं पहिलीं पहिलीं ३।४ कांडें जांबेस ऐकलीं, पंचवटीचें नाथांचें वर्णन ऐकलें, व तेथें ‘ रम्य रमणीय पावन ’ स्थळीं श्रीरामानें लक्ष्मण व सीता यांसह स्वाश्रम स्थापिला त्या श्रीरामाश्रमाचें वर्णन ऐकलें. तेथें राहूनच स्वधर्मरक्षणार्थ रामांनीं खरत्रिशिरादि राक्षसांचा वध केला. हें सर्व नाथांच्या जिवंत रसाळ वाणीनें ऐकून रामाश्रमाच्या सन्निध राहून रामभजन व अनुष्ठान करावें अशी नारायणाच्या मनीं स्फूर्ति झाली असावी म्हणजेच पंचवटीच्या रामानें नारायणाला आपल्यासन्निध खेंचून नेलें असावें असें मला वाटतें ! समर्थ पंचवटीस

आले, तेव्हांही गोदातीरचा सारा प्रदेश संतकवींनीं गजबजलेला होता. रामदास पंचवटींत अनुष्ठान करीत होते त्या वेळीं नाथांचा नातु **मुक्तेश्वर** हा पैठणास महाभारताच्या अंगावर मराठी वेष चढविण्यांत गुंग झाला होता. ' आमुची देशभाषा मराठी । वास्तव्य प्रतिष्ठान गोदातटीं ' असें त्यानें म्हटलें आहे. शके १५०० च्या आंतबाहेर सप्तशृंगीवर देवीचें अनुष्ठान करून **त्र्यंबकराज** या तपस्वी पुरुषानें आपला ५२०० ओव्यांचा 'बालबोध' ग्रंथ रचिला तो रामदास पंचवटीस आले तेव्हां पंचवटीस लोकांच्या वाचण्यांत होता, त्याचा संप्रदाय उभा राहिला होता, समर्थांच्याही तो वाचण्यांत होता व कदाचित् ' बालबोध ' ह्या नांवावरून त्यांना पुढें आपल्या ग्रंथास ' दासबोध ' हें नांव देण्याचें सुचलें असेलही. बालबोधानंतर दासबोध ७५ वर्षांनीं निर्माण झाला. ' गोदातीर उत्तरभाग । देवगिरी नगर सुभग ' येथील राहणारे **शिवकल्याण** यांनीं शके १५२५ ते १५५० ह्या काळांत दशमस्कंधावर आपली बहारीची व भारी विस्तृत टीका लिहिली व अमृतानुभवावर शके १५५७ मध्यें आपलें विद्वन्मान्य भाष्य लिहिलें. शिवकल्याणांची दशमावरील ग्रंथाची ओंवीसंख्या लाखावर आहे. नाथांचे संप्रदायी ' **रमावल्लभदास** ' यांना गुरूची भेट व अनुग्रह गोदातटींच झाल्याचें प्रमाण आहे. यांची कविता शके १५४० ते १५७० ह्या काळांतली आहे. मुक्तेश्वराप्रमाणें त्याच्याच घराण्यांतल्या ' **कृष्णदास मुद्गल** ' या कवीनें रामायणाच्या युद्धकांडावर ग्रंथरचना केली ती याच सुमारास होय. एकनाथ, मुक्तेश्वर आणि कृष्णदास मुद्गल या तीन कवींच्या रामायणानंतरच समर्थांनीं आपलीं रामायणाचीं दोन कांडें लिहिलीं. हे चारी कवि गोदातटाकींच रामायण लिहिते झाले ही लक्षांत ठेवण्यासारखी एक गोष्ट आहे ! वासिष्ठसार, चित्सदानंदलहरी व पंचरत्नी टीका हे ग्रंथ लिहिणारे **रंगनाथ मोगरीकर** हे गोदातीरचे राहणारे असून पहिला ग्रंथ त्यांनीं नाशकासच लिहिला

आहे. हे समर्थांपेक्षां वयानें थोडे वडील पण त्यांचे समकालीनच होते. त्यांनीं नाशिक क्षेत्र सर्व क्षेत्रांत श्रेष्ठ असें म्हटलें असून नाशिकचे 'क्षेत्रस्वामी सुंदर नारायण' व 'कपालेश्वर' यांचे उल्लेख केले असून नाशिकच्या 'अरुणावरुणागोदां'च्या संगमाचाही स्पष्ट उल्लेख केला आहे. रंगनाथ मोगरीकर म्हणतात—

> **सर्वावयव अतिसुंदर। सकोमळ सुभग शरीर।**
> **त्याहिवरी लेइले अलंकार। शोभा प्रचुरअनुपम ॥**
> **तेथें एक नाशीकचि नसतां। सर्वही सुंदरपण जाय वृथा।**
> **तैसें एके नाशिकेवीण समस्तां। सर्वां क्षेत्रां शोभा कैंची?॥**
> **म्हणोनी सर्व क्षेत्रांचा अलंकार। तें हें नासिकनामें महाक्षेत्र।**
> **चहूं युगांचें नगर। दक्षिणतीर गोदावरीचें ॥**

हे रंगनाथ त्या वेळीं नाशिक क्षेत्रीं गाजले होते. हे 'महाप्रसिद्ध रंगनाथ। नाशिकीं वसत निजसुखे' असे त्यांचा पुत्र व शिष्य काशिराज याने म्हटलें आहे. रंगनाथांचे समकालीन **कृष्णयाज्ञवल्की** यांनीं कथाकल्पतरु हा प्रचंड ग्रंथ नाशकास राहूनच लिहिला.

> **गोदेच्या दक्षिणतीरीं। पद्मपुरी बोलिजे द्वापारीं।**
> **ग्रंथ जाहला पुण्यक्षेत्रीं। नाशीकस्थानीं ॥**

## ७ तपश्चर्या

'सावधान' म्हणतांच सावध होऊन नारायण लग्नांतून निसटले ते वयाच्या १३ व्या वर्षी जनस्थानास म्ह० नाशिक-पंचवटीस आले. दुरत्यय असा प्राणिमात्रास मायाजाळीं गुंतवणारा मायापाश ताडकन् तोडून ते जांबेहून निघाले ते गोदावरीच्या कांठाकांठानें ११ दिवसांत पंचवटीस आले. तेथें येतांच गोदावरीचे स्नान करून त्यांनीं श्रीरामदर्शन घेतलें व तपास योग्य अशी जागा शोधून काढली. नाशिक आणि पंचवटी यांच्यामधून गोदा वाहते. आज जेथें नाशिक आहे तेथे त्या वेळीं महारण्य होतें. त्याला लागूनच जो

उंचवटा आहे त्यावर नाशिकची वस्ती होती व त्या वस्तीपासून मैलावर नंदिनीनामक छोटीशी नदी आहे तिच्या कांठीं टाकळी आहे ती त्यांनीं आपल्या तपश्चर्येस जागा शोधून काढली. सभोंवार गर्द झाडी आहे व पाव मैलावर नंदिनीचा व गोदावरीचा संगम आहे. संगमावर पहाटेस स्नान करावें, संध्यावंदनादि करून सूर्योदयापासून मध्यान्हकालापर्यंत गंगेंत एका पायावर उभें राहून गायत्रीपुरश्चरण करावें, मध्यान्हीं सिद्धभिक्षा मागावी, रामरायास नैवेद्य समर्पण करून भोजन सारावें, शास्त्रीपंडितांपाशीं गीता-भागवत-उपनिषदादि संस्कृत ग्रंथांचें अध्ययन करावें, कथाकीर्तनें श्रवण करावीं व सायंकाळीं टाकळीस मुक्कामास यावें. याप्रमाणें टाकळीस बारा वर्षें राहून त्यांनीं तीन गायत्री पुरश्चरणें व तेरा कोटि रामनामाचा जप केला. टाकळीस २ खणांची जमिनींत खोल गुंफा तयार करून तींत त्यांनीं वस्ती केली होती. आज तेथें मंदिर आहे पण समर्थांच्या वेळीं तें महारण्य होतें. स्थान अत्यंत रमणीय आहे. गोदावरी, पंचवटीचे राम, लक्ष्मण, सीता व मारुती, तपोवन, संगम, टाकळीची गुहा या सर्व पवित्र स्थानीं बारा वर्षें राहून नारायणांनीं ही भूमि अधिक पवित्र केली. ही त्यांची तपोभूमि होय.

त्यांनीं 'गोडी लागली रामीं। न गुंतत कामीं हो' ह्या पदांत म्हटल्याप्रमाणे 'त्यजुनि सुंदरी वसविली दरी। चरण भावियेले.' रामप्राप्तीची समर्थांची उत्कंठा कशी कडकडीत वैराग्याची होती हें पुढील अभंगावरून स्पष्ट होत आहे—

**जठरीं लागो क्षुधा होत नाना आपदा।**
**भक्तिप्रेम कदा न संडीं सत्य ॥ १ ॥**
**शब्द न फुटे तरी चिंतीन अंतरीं।**
**भक्तिप्रेम परी न संडीं सत्य ॥ २ ॥**
**नानापरी आघात चिरकाळ होत।**
**भक्तिप्रेमामृत न संडीं सत्य ॥ ३ ॥**

**दाहू वडवानळ अथवा दंशूं काळ ।**
**भक्तिप्रेमबळ न संडीं सत्य ॥ ४ ॥**
**आतांचि हा देहो राहो अथवा जावो ।**
**भक्तिप्रेमभावो न संडीं सत्य ॥ ५ ॥**
**म्हणे रामीरामदास वरी पडो आकाश ।**
**राघवाची कास न संडीं सत्य ॥ ६ ॥**

रामाच्या भक्तिप्रेमभावाचा हा जिव्हाळा किती दांडगा आहे !

नारायणाचें तपोनुष्ठान कडकडीत होतें. गोदानंदिनींच्या संगमांत ते एका पायावर उभे राहून गायत्री पुरश्चरण करीत, तेव्हां मांड्यांपर्यंतच्या खालच्या भागाला मासे चावत व त्यामुळें तो पांढरा झाला होता. त्या घोर अरण्यांत सर्पव्याघ्रादि क्रूर जनावरांची त्यांची कधीं गांठ पडत नसेल हें संभवनीय नाहीं, पण अखंड रामचिंतनामुळें त्यांचें चित्त गंगेलाही शुद्ध करील इतकें पवित्र झालें होतें व 'चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती । व्याघ्र हे न खाती सर्प तया' हा तुकोबांप्रमाणें त्यांनाही अनुभव आला असेल. उपास्य पाठीशीं आहे, या बळावर ते निश्चित, निर्भय व भेदभावातीत होते; त्यांना सर्प, विंचू काय करणार? एकदा वाघाच्या पाठीवर त्यांचा पाय पडला असतांना वाघ चवताळून उठला व डरकाळ्या फोडूं लागला. समर्थांनीं त्याच्या पाठीवर हात फिरवितांच वाघाच्या जागीं मारुतिराय प्रगट झाले अशी एक आख्यायिका आहे. अशाच एखाद्या प्रसंगीं त्यांच्या तोंडून पुढील अभंग आला असावा—

**कष्टी झाला जीव केली आठवण । पावलें किराण मारुतीचें ॥ १ ॥**
**संसारसागरीं आकांत वाटला । भुभुःकार केला मारुतीनें ॥ २ ॥**
**मज कोण्ही नाहीं मारुतीवांचूनी । चिंतितां निर्वाणीं उडी घाली ॥ ३ ॥**
**उडी घाली मज अनाथाकारणें । तेणें माझें केलें समाधान ॥ ४ ॥**

'कैवारी हनुमान आमुचा' ह्या पदांतही त्यांनीं 'पाठीं असतां तो जगजेठी । वरकड काय गुमान । आमुचा कैवारी हनुमान' असें म्हटलें आहे व तो

दासाला संकटीं रक्षितो असें त्यांनीं त्याची आण वाहून सांगितलें आहे. 'किराण' म्ह० उड्डाण. भक्तांनीं यापेक्षां अधिक उघड तें काय सांगायचें आहे ? व तें प्रत्ययावांचून कोणाला पटणार आहे ? समर्थांना ह्या अनुष्ठानाच्या काळांत अनेक दृष्टान्त, स्वप्नदर्शन, प्रत्यक्ष दर्शन, आगामी सूचना झाल्या असल्याच पाहिजेत. पण साक्षात्कार कोणाला सांगूं नयेत, सांगितले तर पुन्हा होत नाहींत असे त्यांनीं जुन्या दासबोधांत ( समास १५ ) स्पष्ट सांगितलें आहे.

**अखंड नाम स्मरावें। परी दुसरीयासी कळों नेदावें।**
**निदि्ध्यास लागलिया राघवें। पाविजे तात्काळ ॥ ४३ ॥**
**कांहीं साक्षात्कार झाला। तो सांगों नये दुसरियाला।**
**जरी आळकेपणें सांगितला। तरी पुन्हा होणार नाहीं ॥ ४४ ॥**
**पुन्हा साक्षात्कार कैंचा। जाला तरी वरपंगाचा।**
**हा मी आपुले जीवाचा। अनुभव सांगतों ॥ ४५ ॥**

लोकांची श्रद्धा वाढावी म्हणून इतकें तरी समर्थ बोलले आहेत, नाहीं तर 'अंतरिक्ष मार्ग' किंवा 'गुप्तपंथ' याच्या खुणा संत सांगत नाहींत, शब्दांनीं सांगून उपयोग होत नाहीं. संतसद्गुरूंच्या खुणा त्यांचें अनन्य व्हावें तेव्हांच कळायच्या. बारा चौदा वर्षांचें पोर घोर अरण्यांत राहून तीव्र अनुष्ठान कां करीत आहे याचें मर्म बहिर्मुखांना कसें कळावें ? ते भिक्षामिषानें चार घरें हिंडत, शास्त्रीपंडितांपाशीं अध्ययन करीत, कथाकीर्तनें दूर बसून श्रवण करीत, नित्यनेमानें गोदा ओलांडून पंचवटींत श्रीरामदर्शनाला जात, तेव्हां समर्थांची ती बालतपस्वीमूर्ति लोकांच्या डोळ्यांपुढें खेळत असे. लोकांचे त्यांच्याविषयीं नाना तर्कवितर्क चालत. समर्थ स्वतः सांगतात —

**विषयांची सोयरीं प्रपंचाचीं सखीं।**
**मिळोनि एकमेकीं करिती मात ॥ १ ॥**
**यासी काय झालें धडचि कां बिघडलें।**
**वयेंवीण लागलें देवपिसें ॥ २ ॥**

**देव काय आम्हां सकळांपासीं नसे ? ।**
**जनांवेगळें कैंचें भजन याचें ? ॥ ३ ॥**
**हें आधींच विषयसंसारा उबगलें ।**
**पुरुषार्थें सांडवलें अहंतेच्या ॥ ४ ॥**
**यासि कोणी मोहाचें वडिलधारें नाहीं ।**
**म्हणवूनी पाहीं छंद करी ॥ ५ ॥**
**न करवे म्हणुनि त्यजिला विषयधंदा ।**
**जल्पतसे सदा रामनाम ॥ ६ ॥**
**रामीं रामदास पिसळले माय ।**
**म्हणोनि मोकली धाय विषयजनु ॥ ७ ॥**

संतांना संताशिवाय कोण ओळखूं शकतो ? जग बहिरंगाकडे पाहतें. अंतरंग ओळखायला अंतरंगांतला—जातीचाच—पुरुष पाहिजे. समर्थांसारखाच नाथ-तुकोबांचा अनुभव आहे व तो त्यांनीं बोलूनही दाखविला आहे. भागवताच्या उपसंहारांत नाथ म्हणतात कीं, " ह्या एका जनार्दनाला कोणी भक्त म्हणतात, कोणी जीवन्मुक्त म्हणतात व कोणी केवळ प्रपंची मानतात ! याला आसन नाहीं, ध्यान नाहीं, माळामुद्रांचें भूषण किंवा उपासनालक्षण नाहीं. याने हरिनामाचा घोष करून भाविक लोक नादीं लावले आहेत झालं ! याला कोणी मंत्र दिला ? हा शिष्यांना काय उपदेश देतो कोण जाणे ! असे नाना विकल्प जनार्दनानेंच लोकांच्या मनांत उत्पन्न केले आहेत ! " मी कशाला मीपण घेऊन यांचें खंडण करीत बसूं ? " तुकोबारायांनीं 'तुका वेडा अविचार । करी बडबड फार' ह्या अभंगांत लोक आपल्याविषयीं काय म्हणतात तें असेच मौजेनें सांगितलें आहे ! " प्रपंचव्यवसायाच्या गोष्टी करायचे सोडून हा तुक्या निरंतर रामकृष्ण गोविंद हेंच भजन करीत असतो ! इतर मोठमोठे देव सोडून हा एका विठ्ठलालाच धरून बसला आहे ! याला कांहीं देहाची किंवा अब्रूची चाड आहे काय ? 'कथे नागवाची नाचे !' सभ्यपणा कांहीं तरी ? "

असो. नाथ, समर्थ, तुकोबा यांच्या अंतरंगभजनाची जाणीव सामान्य जीवांस नसते म्हणून यांच्याविषयीं हवें तसें ते बोलत असतात. समर्थांचें वय लहान आणि तपस्या कडक म्हणून बारा घरचे बारा लोक कांहीं तरी टीका करीत, टवाळी व छळही करीत. हें असेंच चालत आलें आहे !

चमत्कारावांचून नमस्कार नाहीं व पराक्रमावांचून पवाडा नाहीं ! श्रीरामरायानें असा एक प्रसंग अनायासें आणला कीं त्यामुळें निंदक होते ते वंदक झाले, टवाळ भाविक झाले व बाष्कळ नेमनिष्ठ झाले !

तीन वर्षें तपश्चर्या झाल्यावर म्ह० समर्थांच्या वयाच्या १५ व्या वर्षी पुढील चमत्कार घडला. समर्थ संगमावर ब्रह्मयज्ञ करीत असतां एक सुवासिनी समर्थांजवळ आली व तिनें त्यांस नमस्कार केला. त्यांनीं नेहमींप्रमाणें आशीर्वाद दिला. टाकळीच्या उत्तरेस २ मैलांवर दसकपंचक नामक एक खेडें होतें, तेथील गिरिधर कुळकर्णी नामक तरुण अग्निहोत्री ब्राह्मणाची ती स्त्री. तिचें नांव अन्नपूर्णा. गिरिधर नुक्ताच मृत झाला असून ती सहगमनास निघाली होती ! सती जाण्यापूर्वी ह्या बालतपस्वी पुरुषास वंदन करावें म्हणून ती त्यांजकडे आली. समर्थांनीं आशीर्वाद देतांच ' आपला आशीर्वाद या जन्मींचा का पुढल्या जन्मींचा ?' असें तिनें रोखठोक विचारलें ! सोबतच्या लोकांनीं खरी गोष्ट सांगितली. समर्थांनीं गिरिधराचे शव जवळ आणण्यास सांगितले व रामस्मरणपूर्वक गंगोदकाचे त्यावर सिंचन केलें; त्याबरोबर तें प्रेत निद्रितासारखें सजीव होऊन रामराम म्हणत उठून बसलें ! सर्व लोकांस आश्चर्य वाटलें. पतिपत्नींनीं समर्थांच्या पायांवर लोटांगण घातलें. समर्थ हंसून म्हणाले, ' तुम्हांस दहा पुत्र होतील, त्यांतील पहिला पुत्र आम्हांस द्यावा.' याप्रमाणे त्या दांपत्यास दहा पुत्र झाले म्हणून त्यांचें आडनांव दशपुत्रे पडले. हें दशपुत्र्यांचे घराणे अद्याप नाशकास नांदत आहे. पहिला पुत्र झाला तो त्या दांपत्यानें समर्थचरणीं अर्पण केला. समर्थांनीं त्याला आईबापांच्या स्वाधीन केलें. ' मुंज होईतों तुम्ही पाळा, मग

आमचा आम्हांस द्या ' असें समर्थांनीं सांगतांच त्यांनीं त्याप्रमाणें करण्याचें कबूल केलें. वरील चमत्कार शके १५४५ वैशाख शुद्ध १० स झाला, व शके १५४६ सालीं पहिला मुलगा जन्मास आला. समर्थांनीं त्याचें नांव उद्धव ठेवले. तो समर्थांच्या मांडीवर व अंगाखांद्यावर खेळला. त्याची मुंज समर्थांच्या मांडीवर लागली. तेरा कोटि जप पुरा होऊन समर्थ तीर्थाटणास निघाले तेव्हां उद्धवाने बरोबर येण्याचा हट्ट धरिला पण त्यांनीं त्यास बरोबर घेतलें नाहीं. त्याचे मस्तकीं समर्थांनीं आपला वरद हस्त ठेवून त्यास अनुग्रह दिला. त्याचेसाठीं स्वहस्तें गोमयाची मारुतीची मूर्ति तयार केली व तिची प्राणप्रतिष्ठा करून मारुतीची उपासना करण्याची त्यास आज्ञा केली. टाकळीचा मारुती हा समर्थांनीं स्थापन केलेला पहिला मारुती व उद्धव हा समर्थांचा पहिला शिष्य. शके १५४२ च्या माघापासून तों १५५४ च्या फाल्गुनापर्यंत १२ वर्षें समर्थांनीं टाकळीस राहून पुरश्चरण केलें व नंतर रामरायाची आज्ञा घेऊन ते तीर्थयात्रेस बाहेर पडले. या तीर्थयात्राही त्यांनीं बारा वर्षें केल्या. पंचवटीहून निघाले ते प्रथम तडक काशी गांठली!

## ८ तीर्थयात्रा

श्रीरामाची आज्ञा घेऊन समर्थ पंचवटीहून तीर्थयात्रा करण्यास निघाले. तीर्थयात्रेचा प्रघात फार पुरातन आहे. पूर्वींच्या बहुतेक साधुसंतांनीं हिंदुस्थानभर यात्रा केल्या आहेत. काशीची कावड रामेश्वराला व रामेश्वरची काशीला न्यायची. काशीयात्रा म्हणजे काशी, प्रयाग व गया ही त्रिस्थली. शिवभक्त बारा ज्योतिर्लिंगें करितात, गाणेश अष्ट विनायकांना भेटून येतात. कोणी चार धामें करून येतात. समर्थांनीं तीर्थयात्रामिषानें सारा भरतखंड पालथा घातला. हिंदुस्थानांतले एकही तीर्थ किंवा क्षेत्र त्यांनीं पाहिल्या-शिवाय ठेवले नाहीं. समर्थांसारख्या महात्म्यांच्या संगतीनें तीर्थक्षेत्रें पावन होतात, ते तीर्थांना तीर्थरूप देतात. संत हे खरोखर तीर्थांचे तीर्थरूप आहेत! समर्थ प्रथम पंचवटीहून निघाले ते तडक काशीस गेले, तेथून प्रयाग व

गया येथें जाऊन परत काशीस येऊन कांहीं महिने तेथें राहिले. काशीविश्वेश्वराची पूजाअर्चा व गंगेचें स्नान ते नित्यनेमाने करीत. तेथें हनूमंतघाटावर त्यांनीं मारुतीची स्थापना केली. तेथून ते अयोध्येस गेले व तेथें चांगले वर्षभर राहिले. रामरायाची ती नगरी म्हणजे समर्थांचें महाक्षेत्र. नंतर गोकुळ, मथुरा, वृंदावन हीं कृष्णचरित्राने पावन झालेलीं क्षेत्रें पाहून, ते मातृगया, द्वारका इकडे वळले. बहुतेक स्थळीं त्यांचा उपदेश घेणारे शिष्य त्यांच्याभोंवतीं जमा होत, व कोठें कोठे ते मारुतिस्थापना करीत व लोकांना रामभजनीं लावीत. श्रीनगरास गुरुनानकांच्या शीख शिष्यांची व त्यांची गांठ पडली. तेथून ते बद्रीनारायण, केदारेश्वर येथें गेले. गंगोत्री, जम्नोत्री पाहून लछमन झूला, हरिद्वार करून ते परत फिरले. जगन्नाथपुरीस जाऊन ते पूर्वसमुद्राच्या तीरानें गिरी, शिवकांची, विष्णुकांची करून रामेश्वरास गेले. गोकर्ण, किष्किंधा, पंपा, इत्यादि कर्नाटभागांतून ते महाराष्ट्रांत आले. करवीर, परशुरामक्षेत्र, महाबळेश्वर, पैठण, पंढरपूर, भीमाशंकर, त्र्यंबकेश्वर, जेजुरी, मातापूर, सप्तशृंगी, वाई, तुळजापूर इ. अनेक सुप्रसिद्ध क्षेत्रें पाहून व प्रत्येक स्थळीं पोटभर राहून सर्व हिंदुस्थानभर ते हिंडून आले. त्यांचा यात्रेचा क्रम, मुक्काम वगैरे माहिती अर्थातच आज मिळणें दुरापास्त आहे. त्यांच्या यात्रेचे वर्णन जें हनुमंतस्वामींनीं आपल्या बखरींत लिहिलें आहे त्याच्या अनुरोधानेंच इतर चरित्रकारांनीं आपापले ग्रंथ रंगविले आहेत. कांहीं लोक नर्मदेची प्रदक्षिणा करितात, समर्थांनीं आपल्या प्रिय गोदावरीची प्रदक्षिणा केली. समर्थांच्या तीर्थयात्रेचें काल्पनिक वर्णन न देतां किंवा दुधांत पाणी घालून तें वाढविण्याचा प्रयत्न न करितां मी समर्थांनीं ज्या तीर्थक्षेत्रांचीं नांवें आपल्या कवितेंत दिलीं आहेत तेवढ्यां-वरच संतुष्ट राहून वाचकांचें संतर्पण करितों. समर्थांनीं घरीं बसून कांहीं या नामावळी खास लिहिल्या नाहींत ! यावरून समर्थांचा संचार केवढा दांडगा होता याची कल्पनाच करावी. यांपैकीं कांहीं तीर्थक्षेत्रें वाचकांनीं स्वतः

पाहिलीं असणारच. तीर्थयात्रेपासून लाभ कोणकोणते होतात, यावर येथें प्रबंध लिहून ग्रंथ निष्कारण फुगवायचा नाहीं. यात्रेचा आनंद मोठा आहे, ठायींठायीं संतसज्जन भेटतात, कष्टाचा परिहार होतो, दृष्टींत व्यापकता येते, परमार्थबुद्धि पैसावते, लोकस्थितीचें ज्ञान होतें, हें थोडें फार सर्वांस माहीतच आहे.

( १ ) 'केला काशी विश्वेश्वर। श्वेतबंध रामेश्वर'—हा अभंग पहावा. ह्यांत भागीरथी, गोदावरी, कृष्णा, कावेरी, रामाची अयोध्या व कृष्णाची द्वारावती, औंढ्या जगन्नाथ व स्वामी त्रिमलनाथ, 'मातापूर तुळजापूर। सप्तशृंगी कोल्हापूर,' पंढरी व शिंगणापूर, मोरेश्वर–हरेश्वर—

**बारा लिंगें यावेगळीं। तीर्थें केलीं भूमंडळीं॥**
**सिद्ध मैराळ मारुती। तीर्थ केलीं नेणों किती॥**
**तरी संशय तुटेना। पूर्वगुण पालटेना॥**
**रामदास म्हणे भावें। तरी हें मन पालटावें॥**

सद्भावानें तीर्थक्षेत्रांच्या यात्रा केल्यासच खरा लाभ होतो. मन पालटावें हा यात्रेचा हेतु.

( २ ) 'मुख्य पूजापरंपरा' हा आणखी एक अभंग पहा. हा बराच मोठा म्ह० २६ चरणांचा आहे. 'माझ्या कुळींचीं दैवतें। पाहों जातां असंख्यातें!'

**रामकृष्ण महादेव। बनशंकरी खंडेराव॥**
**मातापुरींची यमाई। सप्तशृंगी चंडाबाई॥**
**तुळजापुरीं तुकाबाई। घाटमाथांची नवलाई॥**
**दंडपाणी जोगेश्वरी। माता कामाक्षी कावेरी॥**
**सातपांच रंगनाथ। व्यंकटेश वैजनाथ॥**
**धोपेश्वर कोपेश्वर। सिद्धेश्वर रामेश्वर॥**
**महिकावती भोगावती। आमुच्या देव्हारां वसती॥**
**अग्नीसारिखें दैवत। आणि मुख्य प्राणनाथ॥**

अनेक टांक आणि तांब्रे आणि नर्मदे, तथापि 'एक देव आहे खरा.'

**रामदासीं देव येक। येर सर्वही मायिक ॥ २६ ॥**

( ३ ) 'नमस्कार आतां देवा गणनाथा' ह्या वीस चरणी अभंगांत अनेक तीर्थक्षेत्रांची नामावळि दिली आहे ती पाहतां समर्थांनीं जीं तीर्थक्षेत्रें हिंडून पाहिलीं त्यांतील प्रमुखांचीं नांवें तरी आपणांस कळून येतात. शिंगणापूरचा शंभु, गिरीचा व्यंकटेश, 'भक्तांसी आधार' असा पंढरीनाथ, माझे कुळीचें दैवत 'तुळजा विख्यात भूमंडळीं,' काशीचा विश्वनाथ, अयोध्येचा रामराजा, द्वारकेचा कृष्ण, 'पालीपेंबरीचा खंडोबा' ( साताऱ्याकडील ), बनशंकरी शाकांबरी देवी ( बदामीजवळ कर्नाटकांत ), औंधची यमाई व मातापूर उर्फ माहूर ( वऱ्हाड ) येथील रेणुका, सप्तशृंगीची चंडिका ( नाशिक ), रासीन ( नगर जिल्हा ) येथील रासाई देवी, मोगलाईतील आंबाजोगेश्वरी, कोल्हापूरची महालक्ष्मी, कार्तिकस्वामीचे सोंडूर, पंचवटिकेचे रामसीतापति व 'देव हा मारुती जेथें तेथें'—मारुतीच्या मूर्ति जावें तेथे आहेतच—कावेरीतीरचा रंगनाथ, पूर्वभागींचा 'बोढ्या जगन्नाथ' ( उडिया प्रांतांतील ), उडुपी ( मध्वाचार्यांची गादी ) येथील कृष्ण, बद्रीनारायण, बारसीचा भगवंत—

**वैकुंठींचा विष्णु कैलासीं शंकर। मुख्य निराकार परब्रह्म ॥ २० ॥**

( ४ ) 'प्रातःकाळीं प्रातःस्नान' ह्या भूपाळींत समर्थांनीं हिंदुस्थानांतील अनेक पवित्र नद्यांचीं नांवें दिलीं आहेत. 'गंगा यमुना सरस्वती। कृष्णा वेण्या भागीरथी। पूर्णा फल्गु भोगावती। रेवा गोमती वैतरणी ॥' आणखी कित्येक प्रसिद्ध अप्रसिद्ध नद्यांचीं नांवें या भूपाळींत आहेत. कित्येक नद्या यात्रा करणाऱ्या चांगल्या मनुष्यासही माहीत नसतील! काळी ( धारवाड जिल्ह्यांत ), कुंदा ( माळव्यांत ), घटप्रभा व मलप्रभा ( दक्षिणेंतील ), मंदाकिनी ( चित्रकूट ), नारदी ( येवले कोपरगांव तालुक्यांत ), वेदावती ( कृष्णेस मिळणारी करवीराकडील ), कुद्मकुती

( कोयना ), सीताकुंड ( मोंगीरजवळ ), गंडिका ( नेपाळांत ), ताम्रपर्णी ( कुंभकोण—मद्रास ), इंद्रायणी ( देहू आळंदी ), तुंगभद्रा, कावेरी, माहेश्वरी इ. इ.—' दास म्हणे पुण्यक्षेत्रीं । नाना नद्या गोविंदीं ॥'

( ५ ) समर्थांचा संचार साऱ्या हिंदुस्थानभर कसा होता हें वरील दोन पद्यांवरूनही लक्षांत येण्यासारखें आहे. समर्थांनीं सर्व तीर्थक्षेत्रें श्रद्धाबुद्धीनें पाहिलीं हें सांगणें नलगे! दासबोधांतील ( द० ४ स० ५ ) अर्चनभक्तीचा समास वाचावा म्हणजे समर्थांच्या व्यापक बुद्धीची थोडीशी ओळख होईल. तो समास येथें उतरून घेण्याचा मोह मी आवरतों. परमेश्वराच्या उदंड मूर्ति उदंड स्थळीं आहेत त्यांचें भक्तीनें अर्चन करावें. ' नाना तीर्थक्षेत्रांस जावें । तेथें त्या देवाचें पूजन करावें । नाना उपचारीं अर्चावें । परमेश्वरासी.' शास्त्रोक्त पूजाविधान केलें पाहिजे, कुळधर्म अनुक्रमें सर्व केले पाहिजेत, असा त्यांचा बोध आहे.

( ६ ) इंदुरबोधन मठांत उपलब्ध झालेलें समर्थांचें ' तीर्थावळी ' म्हणून एक सुंदर प्रकरण छापलेलें आहे. ज्ञानदेव व नामदेव यांनीं केलेल्या तीर्थयात्रांना ' तीर्थावळि ' हें नांव देऊन नामदेवांनीं ' तीर्थावळीचे अभंग ' केलेले प्रसिद्ध आहेत. त्या तीर्थावळीच्या अभंगांचा परिचय आम्ही वाचकांस ' श्रीज्ञानेश्वरचरित्र ' व प्रस्तुत ग्रंथाचा ' पहिला खंड ' ह्या दोन्ही ग्रंथांत करून दिलाच आहे. समर्थांच्या ह्या तीर्थावळी प्रकरणांत हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध तीर्थक्षेत्रांचीं नांवें आलीं आहेत. ' नाना तीर्थें थोरथोरें । सृष्टीमध्यें अपारें । सुगमें दुर्गमें दुष्करें । पुण्यदायकें ' ( दास० ८—१ ). याप्रमाणें पुण्यदायक तीर्थक्षेत्रांच्या यात्रा समर्थांनीं सर्व भाविक हिंदूंप्रमाणें श्रद्धेने विधिपूर्वक केल्या यांत संशय नाहीं. समर्थांची या यात्रेंत ' माझा राम तो जेथें तेथें । आत्मारामेंवीण सर्व रितें ' अशी भावना होती. ' सर्व तीर्थांमध्यें काशी । धन्यधन्य ते पंचक्रोशी. ' तेथून यात्रेकरू ' रामेश्वरा कावड नेती.' यानंतर उडपेचा कृष्णनाथ, कावेरी रंगनाथ, वडीया जगन्नाथ,—या थोर क्षेत्रांत ' देक

नांदतो समर्थ रे.' कानग्यांचा प्रसाद देणारा वेंकटेश, श्रीशैल व तेथील पाताळगंगा, आवढयाचा नागनाथ, परळीचा वैजनाथ, सोरटीचा सोमनाथ, घृष्णेश्वर, भीमाशंकर, हिमाचळींचा हिमकेदार, सिंहस्थास पुष्कळ यात्रा जेथें मिळते तें नाशिक व त्रिंबक ( मोठे पुण्य प्रदक्षिणेसी रे ), हरेश्वर, माणदेसी महादेव, शिखरींचा शंभु, कृष्णाउगमीं महादेव, तळकोंकणींचा भार्गव ( परशुराम ), गोकर्ण तें अपूर्व–' धन्य होताती मानव रे,' शिवकंची, विष्णुकची, अरुणाचळ, ' थोर महिमा अयोध्येची रे,' सप्तशृंगी, जोगेश्वरी, भुवनेश्वरी, द्वारका, मातापूर, तुळजापूर, नरहरी, पंढरपूर (' तेथें कीर्तनाचा गजर । नामघोष वारंवार रे' ), खंडेराव (' बहु जनांसी उपाव । भरे यात्रा मोहोछाव' ), आदिशक्ति ठाईं ठाईं, ठाईं ठाईं विष्णुमूर्ति —

**देव नांदती अपार । येकाहूनी येक थोर ।**
**किती सांगावा विचार । भक्त पावती पैलपार रे ॥ २७ ॥**

समर्थांनीं ह्या तीर्थयात्रा केल्या; 'पायीं तीर्थयात्रा मुखीं रामनाम' अशा केल्या; सर्व देवता ह्या माझ्या रामरायाच्याच मूर्ति आहेत या भावानें केल्या. 'आत्माराम तो ठाईं ठाईं । नांदे म्लेंच्छाचे ( ही ) हृदयीं,' मग हा म्लेच्छ या देवांच्या मूर्ति 'फोडुनि पाहतो काई रे!' त्याला त्यांत काय मिळतें ?

**देवस्थानें उदंड होती । आतां जाले म्लेंच्छ नृपती ।**
**ठाईं ठाईं उरुस भरती । कीर्ती उदंड सांगती रे ॥ २८ ॥**

सगळ्याचें सार एक आहे—

**दास म्हणे देव हा येक । येर सकळही माईक ।**
**पाहणें तो अंतर्विवेक । तेणें होतसे सार्थक रे ॥ २९ ॥**

समर्थांना या यात्रेंत काय आनंद झाला असेल तो त्यांचा त्यांनाच ठाऊक! हिंदुस्थानांतील यात्रा करून शिवाजीमहाराजांसाठीं त्यांनीं जो एक निरोप आणला तो हा होय —

**'तीर्थक्षेत्रें मोडलीं । ब्राह्मणस्थानें भ्रष्ट झालीं ।**
**सकळ पृथ्वी आंदोळली । धर्म गेला !' ॥**

## ९ एकान्ताची आवड

येथेंच समर्थांच्या एकान्तप्रीतीबद्दल दोन शब्द लिहितों.

बहुतेक महापुरुषांप्रमाणे समर्थांनाही एकान्ताची अतिशय आवड होती. गीतेच्या १३ व्या अध्यायांत ज्ञानीपुरुषाच्या लक्षणांत 'विविक्तदेशसेवित्वं' म्ह० निर्जन अरण्यवासाची आवड व 'अरतिर्जनसंसदि' म्ह० लोकसंमर्दाची अनावड अशीं दोन लक्षणें दिलीं आहेत. या लक्षणांचा भावार्थ ज्ञानेश्वर सांगतात—'शैलकक्षांचीं कुहरें। जळाशयपरिसरें। अधिष्ठी जो आदरें। नगरा न ये॥ बहु एकान्तावरि प्रीती। जया जनपदाची खंती। जाण मनुष्याकारें मूर्ती। ज्ञानाची तो.' तुकोबा भंडारा डोंगरावर एकान्तांत हरिभजनांत नित्य तन्मय होत असत. त्यांनीं आपला अनुभव ४।२ अभंगांत सांगितला आहे. 'वृक्षवल्ली आम्हां सोइरीं वनचरें। पक्षीही सुस्वरें आळवीती' म्ह० रानावनांत स्वेच्छ विहार करणारे पशुपक्षी व वृक्षवेली हे आमचे इष्टमित्र व सोबती आहेत व आम्ही भजनानंदांत तन्मय होतों तेव्हां पक्षीही आपल्या मंजुळ गायनानें आमची साथ करितात! या सुखामुळें आम्हांस एकान्त फार आवडतो व आणखी एकान्ताचा एक लाभ होतो तो हा कीं, 'नाहीं गुणदोष अंगा येत' म्ह० चारचौघांत नेहमीं चालणाऱ्या लोकांच्या गुणदोषांच्या उठाठेवी व गप्पासप्पा कानांवर पडत नाहींत व म्हणून आम्हांला सुखसमाधान पोटभर उपभोगायला मिळतें! 'एकान्तींचे सुख जडलें जिव्हारीं। वीट परिचारीं बरा आला'—एकान्तसुख आमचेंच झाले व जनपदाची सहजच खंती आली. हा तुकोबांचा अनुभव एकान्तांत रमणाऱ्या कोणाही प्रेमळ भाविकांस येणारा आहे. लोकान्तांत म्ह० गांवांत, बाजारांत, लायब्ररींत, क्लबांत, सभांत, कोर्टकचेऱ्यांत, शाळाकॉलेजांत हें एकान्ताचें सुख कधींच मिळायचें नाहीं! तेथें 'मतीला गति' मिळते म्ह० नाना कल्पनांनीं चित्त डहुळले जातें. समर्थ म्हणतात —

**पुरें पट्टणें हाट बाजारपेठा। बहू वस्ति नानापरी दाट खेटा॥**
**वनें जीवनें भूवनें कुंपवावीं। मतीची गती ते किती आठवावी॥**

ग्रंथाध्ययनही एकान्तावांचून नीट होत नाहीं, लय लागत नाहीं, बुद्धिप्रभाव प्रगट होत नाहीं. पर्वतशिखरे, दऱ्याखोरीं, पाठारें, मैदानें, नदीतीरे, विवरें, भुयारें,गायराने, गुहा, घळी हीं एकान्तस्थाने एकसारखीं हिंडत राहण्याचे व गिरिगव्हरीं परमात्म्याला धुंडण्याचे इतकें व्यसन समर्थांसारखें दुसऱ्या कोणत्याही साधूला लागलेले दिसत नाहीं! 'बहू हिंडतां सूख होणार नाहीं' असें त्यांनीं म्हटलें आहे खरें, पण समर्थ जबर हिंडफिरे होते. हिदुस्थानांत मारुतीचीं मंदिरें त्यांनीं किती दूरदूर बांधलीं व बांधविलीं आहेत. समर्थ हिमालयांत तर गेलेच होते, पण अफगाणिस्थानांतही गेले होते व एकवार मक्काही पाहून आले होते असें म्हणतात! हिमालयाच्या परिसरांतला आनंद पुढील श्लोकात व्यक्त झाला आहे —

**दरें दर्कुटें झाडखंडें अनेकीं। कपाटें कडे वीवरें आणि टांकीं॥**
**वनीं पावनीं पांडवीं वास केला। गिरी देखिला दास संतुष्ट झाला॥**

समर्थांच्या रामायणांत गिरिकंदरांचीं किती तरी सुंदर वर्णनें आलीं आहेत! आपल्या करुणाष्टकांत त्यांनीं स्वतःची एकान्तप्रीति मोठ्या मनोहर प्रकारें वर्णिली आहे. टाकळीच्या रानांत अनुष्ठानासाठीं समर्थ राहिले होते त्या वेळचे त्यांचे उद्गार —

**मना! चाल ऊठीं वना दुर्गमातें।**
**न गुंतें भवागारदारादिकांतें॥**
**दुराशा करी किंकरी कोण आतां।**
**निराशा धरी अंतरीं मुक्तिकांता॥ १॥**
**बहू वीट आला भवाचा न सावे।**
**अटव्यांत देऊनियां हाक जावें॥**
**मनातें दमावें श्रीरामीं रमावें।**
**दिगंतीं फिरावें जना न स्मरावें॥ २॥**

सुषुप्ती अवस्थेसि भूमी निजावें ।
उसें रामपाद स्मरोनि धरावें ॥
दिशांचा महापाट तो पांघरावा ।
सिताकारणें साह्य वन्ही करावा ॥ ३ ॥

'गजबज मज आतां सर्वथा आवडेना—' कांहीं लोक वायफळ शब्द बोलत असतात ते कानावरही न पडावेत म्हणून, मना!—

जन वमनपरी तूं टाकिं थुंकून चित्ता
वनविजन धरीं तूं ज्ञानवैराग्यवंता ।
विसर सकळ दुःखें पावसी शांति रामीं
पहुडसि सुखसेजे सर्व कल्याणधामीं ॥
स्वजनजन त्यजावें देश लंघूनि जावें
कठिण मन करावें झाडखंडीं भरावें ।
अनुदिन विवरावें दूर देशीं भरावें
निरुपण विवरावें तर्कपंथेंचि जावें ।

अघोरा वनामाजि एकान्त जाव । उदासीन चित्तें तयाला पहावें ॥
उगी धांव घ्यावी गिरी तो चढावा । देहे कष्टवावा बरा वीवरावा ॥
गिरीशृंग पाठार ते प्रार्थवावे । भवें तापलों हाक मारूनि जावें ॥
सुखें वस्ति विश्रांति तेथें करावी । मनोवासना रामरूपीं भरावी ॥
बहु झाडखंडें उदंडें अचाटें । गिरीसारखीं थोरथोरें कपाटें ॥
बहु सावजें व्याघ्र सिंहे कलाली । तेथें रामदासें असे गुंफ केली ॥

समर्थांना एकान्ताचें सुख किती वाटत असे हें त्यांनीं इतरत्र केलेल्या एकान्ताच्या गोड वर्णनांवरूनही स्पष्ट दिसतें.

## १० मातृतीर्थ !

नारायण लग्नांतून 'सावधान' म्हणतांच निघून गेला या गोष्टीस २४ वर्षें झालीं. नारायणाची आई जराजर्जरतनु होऊन फार खंगली. आधीं वृद्धाप्य, त्यांत नारायणाच्या वियोगाचे दुःख. नारायणाची वार्ता आज कळेल

उद्यां कळेल या आशेनें दिवस कंठीत असतां दु:खानळानें शरीर होरपळून निघाले, रडतां भुई थोडी झाली. अंधही झाली. नारायण भेटेल ही कल्पनाही नष्ट झाली. बारा वर्षे बालपण, बारा वर्षें पुरश्चरण व बारा वर्षें तीर्थाटण याप्रमाणे नारायणाच्या मानवी आयुष्याचीं ३६ वर्षें व्यतीत होऊन पूर्वार्ध संपले. नारायण यात्रा संपवून अखेर घरच्या महातीर्थाच्या ( मातोश्रीच्या ) दर्शनास जांबेस आले ! समर्थांनीं सूर्याची आराधना केलेली होती. प्रत्यहीं बाराशें नमस्कार घालून शरीर पिळदार केलें होतें. तपःश्रीनें मुखश्री विलसत होती. असा हा तपस्तेजःसंपन्न पुरुष जांबेस आपल्याच घरच्या अंगणांत अकस्मात् प्राप्त झाला. पायांत खडावा, ढुंगणास लंगोटी, हातांत कुबडी, खाकेंत झोळी या थाटांत दारांत भिक्षा मागण्यास येऊन एक श्लोक म्हणून ‘ जय जय रघुवीर समर्थ ’ अशी त्याने गर्जना केली. श्रेष्ठ बाहेर गेले होते. आई माजघरांत पडल्या होत्या. भावजयीनें बाहेर येऊन झोळींत भिक्षा टाकली. समर्थांनीं वहिनीस ओळखलें. त्या त्यांच्याच वयाच्या होत्या. वहिनीने मात्र भावजीस ओळखलें नाहीं. समर्थ ओटीवर चढले, झोळी खालीं ठेवली व बसले. वहिनी म्हणतात, ‘ अगबाई ! हा बैरागी भिक्षा घेऊन जायचें सोडून येथेंच जेठा मारून बसला आहे !’ समर्थांनीं हंसून उत्तर केले, ‘ भिक्षा घेऊन जाणारा हा बैरागी नाहीं. हा येथेंच राहणार आहे ! ’ इतक्यांत समर्थांची आई खडबडून उठली व सरकत सरकत मधल्या उंबऱ्यांत आली. तिच्या मनांत आलें कीं ‘ माझ्या नारायणाच्या आवाजासारखा हा आवाज दिसतोय ! नारायण तर नसेल ना ? छे ! नारायण आतां कुठला दिसणार ! दिसतही नाहीं ! ’ तोंच समर्थ पुढें सरले, आईच्या पायांवर डोकें ठेवून म्हणाले, ‘ आई ! हा तुझा नारायण तुला नमस्कार करीत आहे ! ’ ‘ काय नारायण ! खरें कां हें ? कां स्वप्न ? ’ ‘ आई ! खरंच हा तुझा नारायण आहे ! ’

मायलेकरांची भेट झाली. उभयतां परस्परांस कडकडून भेटलीं, दोघांच्याही नेत्रांतून अश्रूंचे पूर वाहिले. घरांत आनंद कोंदाटला. इतक्यांत

श्रेष्ठ बाहेरून आले. समर्थांनीं भाऊ व भावजय यांस नमस्कार केले. घरांत शांतिसुखाचें साम्राज्य पसरलें. घरांतून बाहेर पडल्यापासून समर्थ २४ वर्षांनीं स्वगृहीं आले व बरेच दिवस घरीं राहिले.

कांहीं दिवस याप्रमाणें गेल्यावर आतां तरी नारायणाचें मन संसाराकडे वळेल काय हें पाहण्यासाठीं खडा टाकून पाहावा असें श्रेष्ठांच्या मनांत आलें! श्रेष्ठांनीं समर्थांना पूर्ण ओळखलें होतें. ते कृतार्थ झाले आहेत हे त्यांना माहीत होतें, पण त्यांनीं थोडासा विनोद केला. ते म्हणाले—

**लावण्यतारुण्यसंपन्न नारी। कौशल्यता वैभव चित्तहारी॥**
**एकांतकाळीं पडतां समंधु। अभिलाष न करी तो धन्य साधु॥**

दादांच्या मनांतला भाव जाणून चतुरशिरोमणि समर्थांनीं उत्तर केले—

**स्वर्गांगना त सन्मूख आली। लावण्यरूपीं दृष्टी न घाली॥**
**मुक्ताफळीं शूक उघेचरासी। परंतु आरण्य मिरासि त्यासी॥**

श्लोक नीट लागला नाहीं पण भावार्थ दिसतो तो असा—साधुपुरुषापुढें प्रत्यक्ष अप्सरा येऊन उभी ठाकली तथापि तिच्या शरीरसौंदर्याकडे तो पाहत नसतो. ( शुकानें रंभेला दाद दिली नाहीं याबद्दल शुकरंभासंवाद प्रसिद्ध आहे ). शुकापुढें मोत्याचे दाणे टाकले तरी तो त्यांकडे न पाहतां स्वेच्छेनें अरण्यांत निघून जाईल व डाळिंबाच्या दाण्यांत संतोष मानून स्वेच्छ वनविहार करील. हनुमंतस्वामींनीं ही गोष्ट सांगितली आहे.

सर्व थोर पुरुषांप्रमाणे समर्थ निःसीम मातृभक्त होते. सर्व ग्रंथांवर त्यांच्या मातृभक्तीची छाया जागोजाग पसरली आहे. दासबोधांत (द० ३ स० ४) ते म्हणतात कीं संसारांतील महादुःखांत आईचीच आठवण येते, कां कीं 'ते पोटआगी वेगळीच आहे—तो प्रेमाचा जिव्हाळा कांहीं और आहे, त्याची सर दुसऱ्या कोणत्याही प्रेमास येणार नाहीं.

**पुत्र वैभवहीन भिकारी। माता तैसाचि अंगिकारी।**
**दगदगला देखोनि अंतरीं। त्याच्या दुःखें दुःखवे॥ ३७॥**

**प्रपंच विचारें पाहतां। हें सकळ जोडे न जोडे माता।**
**हें शरीर जयेकरितां। निर्माण जालें ॥ ३८ ॥**

**म्हणोनि धन्य धन्य ते प्रपंची जन। जे मायबापांचें भजन।**
**करिती, न करिती मन। निष्ठुर जिवलगांसी ॥ ४१ ॥**

भवानीदेवीच्या स्तोत्रांत भक्तिरसाशीं वत्सलरस एकरूप झालेला आहे. भवानीच्या रूपांत आई व आईच्या रूपांत भवानी समर्थ पाहत असत! एका भंवानीच्या स्तोत्रांत ' हेंकाड बावळें वेडें। ( तेंही ) मातेला प्रिय होतसे, ' कां कीं ती स्वभावें लेंकराच्या जीवींचे जाणते—

**नागिवें उघडें लोळे। हागे वोकी अव्हासव्हा।**
**तैशास नेटकें दावी। लेववी नेसवी सदा॥**

**मातेचा कळवळा मोठा। लोभासी तूळणा नसे।**
**वोळखी सोडिली बाळें। तिला तो सांडितां नये॥**

इत्यादि प्रकारें भवानीची स्तुति करितांना समर्थांनीं आईचें हृदयप्रेम व्यक्त केलें आहे. कांहीं कालानंतर समर्थांनीं मातोश्रीस एक ११ ओव्यांचें पत्र लिहिले त्यांत ' तूं साक्षात् वैष्णवी माया म्ह० मूळमाया परमेश्वरी ' आहेस असें म्हटले आहे. ' तूं सर्व सुखांची मूस। तूं आनंदरत्नांची मांदूस (पेटी)। तुझेनि चुकती सायास। संसारींचे ॥ विवेकनिधी केवळ। अंतर शुद्ध निर्मळ। ज्ञानदीप प्रबळ। तुमचे ठायीं ॥ ' अशा तऱ्हेनें त्यांनीं मातेचें गौरव केलें आहे.

कोणी विचारील कीं समर्थांची मातृभक्ति इतकी उत्कट होती तर ते १२ व्या वर्षी मातेला घरीं रडत ठेवून लग्नांतून पळून कां गेले? घरींच राहून आईच्या आज्ञेप्रमाणें लग्न करून संसारांत कां पडले नाहींत? याला उत्तर असे आहे कीं, समर्थ केवळ परमात्मप्राप्तीसाठीं आईचा मनोभंग करून घराबाहेर पडले व तो परमात्मा त्यांनीं उग्रतपानें जोडला म्हणून हा मातृमनोभंग दोषावह नाहीं. देवाचें सख्य जोडण्यासाठीं सर्वस्वत्याग करावा

अशी शास्त्रांची आज्ञा आहे. अधिक मोठा लाभ होत असेल तर लहान लाभ सोडावा ही नीति आहे. त्यांनीं मातृभक्ति सोडली नाहीं.

**देवाच्या सख्यत्वाकारणें। आपलें सौख्य सोडून देणें।**
**अनन्यभावें जीवेंप्राणें। शरीर तेंही वेंचावें ॥ ६ ॥**
**देवाच्या सख्यत्वासाठीं। पडाव्या जिवलगांसी तुटी।**
**सर्व अर्पावें शेवटीं। प्राण तोही वेंचावा ॥ ८ ॥ (दास०, द० ४ स० ८)**

एकदां पूर्वरात्रीं राणूबाई, समर्थ, श्रेष्ठ वगैरे मंडळी मौजेनें बोलत बसली होती. राणूबाई सहज म्हणाल्या, " नारायणा! अरे तूं गेल्यावर एक चिठ्ठी तरी पाठवायची होतीस! आम्ही कित्ती कित्ती शोध केला पण तुझा पत्ता कांहीं लागला नाहीं. माझे रडून रडून डोळे सुजले व शेवटीं गेलेसुद्धां ! मन नेहमीं तुझ्याभोंवतीं भोंवतीं घुटमळत असे. म्हणतात ना कीं ' मन चिंती तें वैरी न चिंती.' हजारदां मनांत येई कीं नारायण का पाय घसरून विहिरींत पडला, का ओढ्याच्या खळखळाटांत वाहून गेला, का त्याला वाघानें खाल्ला, का त्यानें वैतागानें आपल्या जीवाचं कांहीं बरं वाईट करून घेतलें, का त्याला एकाद्या भूतानें पछाडलं, का झालं तरी काय ? " यावर समर्थ मनापासून हंसले व म्हणाले, ' आई ! हा शेवटचा तुझा तर्क खरा आहे.' ' काय तुला खरंच भूत लागलं ? मग निघालं कधीं ?' समर्थ म्हणाले, ' आई ! तें भूत असं तसं नाहीं. तें महद्भूत आहे, बाकीच्या भूतांना तें गिळून टाकतं ! तुला सांगूं कोणतं भूत तें ?' यावर समर्थांनीं एक सुन्दर पद म्हटलें.

**होतें वैकुंठींचे कोनीं। शिरलें अयोध्याभुवनीं।**
**लागे कौसल्येचे स्तनीं। तेंची भूत गे माय ॥ १ ॥**

या भूतानें ताटिका मारिली, दगडावर त्याचा पाय पडतांच पाषाणाची नारी झाली, त्यानें शिवाचें धनुष्य भंगिलें, त्याचा वैदेहीच्या अंगांत संचार झाला, पित्याच्या भाकेसाठीं तें अरण्यांत गेलें, चौदा वर्षें तापसवेषानें

रानावनांत हिंडलें, त्याचा सांगातीं भुजंग ( सर्प, शेष, लक्ष्मण ) असे, त्यानें पाण्यावर पाषाण तारले, रावण मारून त्यानें देवांचे बंध तोडले.

**नांव त्याचें रामराय। सर्वभूतांचें हृदय।**
**रामदास नित्य गाय। तेंचि भूत गे माय॥ तेंचि० ॥ १० ॥**

आईनें प्रेमानें मुलाला पोटाशीं धरिले, त्याचे अवघ्राण केलें व म्हणाली, ‘बाळा! आतां मी तुला अगदीं बाहेर जाऊं द्यायची नाहीं.’ नारायणानें उत्तर केले, ‘आई मी तुझ्या आज्ञेबाहेर अगदीं वागायचा नाहीं. तुझी शपथ–अगदीं तूं म्हणे तों बाहेर जायचा नाहीं.’

कांहीं दिवसांनीं चातुर्मास सुरू झाला. नारायणानें आईला सांगितलें, “आई! मी तुला चार महिने पुराण सांगणार आहें.’ राणूबाईला आनंद झाला. समर्थांनीं भागवताच्या तृतीयस्कंधांत (अ. २१ ते ३३) कपिल महामुनींचें जें पवित्र आख्यान आहे त्यावर चार महिने आईला पुराण सांगितलें. कर्दमऋषींची भार्या देवहूति हिला कर्दमापासून झालेला कपिल सांख्यशास्त्रप्रणेता हा विष्णूचाच अवतार होय. ‘सिद्धानां कपिलो मुनिः’ ( गीता, अ. १० )

हें सर्व कपिलदेवहूति प्रकरण मूळ भागवतांतच अत्यंत बहारीनें वर्णिलें आहे. कपिलांनीं आपल्या आईला भक्तिज्ञानवैराग्याचा बोध देऊन तिचा उद्धार केला. हा विषय निवडण्यांतच समर्थांचे चातुर्य प्रगट झाले आहे. यांत औचित्य आहे. लोकोद्धाराचे काम अंगावर घेण्यापूर्वीं समर्थांनीं आपल्या आईचा उद्धार केला व तिच्या ऋणांतून ते मुक्त झाले. ज्या पुण्यपावन स्थलीं कपिलांनीं आईला परमगतिदायक ज्ञानबोध देऊन धन्य केले तें स्थान सिद्धपूर उर्फ मातृगया या नांवानें प्रसिद्ध आहे. प्रकृतिपुरुषांचें स्वरूप, अष्टांगयोग व भक्तियोग, अध्यात्मयोग व भक्ति, ध्यानयोग, मूर्तिपूजेची मर्यादा व सर्वभूतात्मभाव, वैराग्य, ज्ञान व प्रेमभक्ति, संसारासक्त जीवांचीं दुःखें, जन्मगर्भत्रासबाल्यादि अवस्थांतील क्लेश, परमभक्तीनें वैराग्यज्ञान

प्राप्त होऊन जीवाची कृतार्थता, सर्व शास्त्रांचे लक्ष एक परमात्मलाभ, भक्तीचा आनंद इ० विषय येथें इतक्या उत्कृष्ट रीतीनें वर्णिले आहेत कीं, भागवतांतला हा सर्व कथाभाग पुनःपुन्हा पहावासा वाटतो. वाचकांनीं हे तेरा अध्याय मूळांत पहावेत. समर्थांना भागवतग्रंथ अतिप्रिय होता. त्यांचें घराणेंच भागवतधर्मी होतें. भागवतांतील वरील दिव्य प्रसंगावरील समर्थांच्या जिवंत वाणीने चार महिने प्रवचनें ऐकून समर्थमाता अत्यंत प्रसन्न झाली. तिच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहिल्या, तिनें समर्थांना धन्यवाद दिले व प्रेमानें म्हणाली, 'नारायणा ! तूं माझ्या कुशीला जन्म घेऊन माझा उद्धार केलास. बेचाळीस कुळें उद्धरलींस. तूं अवतारी पुरुष आहेस. माझा मायामोहपाश तुटला. मी दुःखशोकातीत झाले. जा, आतां जगदुद्धार करण्यास जा. असें परिपक्क झालेलें फळ मी लोभानें घरींच ठेवून घेत नाहीं. लोकोद्धारकार्याला वाटेल तेथें जा.' समर्थांची माता उद्धारगति पावली, अथवा जिच्या पवित्र कुशीला समर्थांसारखा महापुरुष जन्मला ती आधींच उद्धरली होती. समर्थ मात्राज्ञा घेऊन निघाले. त्यांनीं कृष्णातीरचा प्रदेश हें आपलें कार्यक्षेत्र ठरविलें व त्याप्रमाणें ते कार्याला लागले.



# २ करुणाष्टकें



१ प्रार्थनेची आवश्यकता व सहजता. २ प्रार्थना व नामस्मरण वेदांत आहे. ३ करुणाष्टकांचें स्वरूप. ४ भेटीपूर्वी का भेटीनंतर ? ५ करुणाष्टकांतील प्रेमळ प्रार्थना. ६ अनुताप व भेटीची उत्कंठा. ७ 'बुद्धि दे रघुनायका.' ८ 'श्रीराम राम हें म्हणा.'

## १ प्रार्थनेची आवश्यकता व सहजता

देवाची प्रार्थना करण्याची आवश्यकता सर्व देशांत व सर्व आस्तिकांना नेहमींच वाटते. देवाचीं लीलाचरित्रें गाणें व त्याच्या नामस्मरणानें आत्मशोधन करणें हा देवप्राप्तीचा परमश्रेष्ठ उपाय आहे. विश्वांत आपल्याहून कोणी एक श्रेष्ठ शक्ति आहे व तिला शरण जाणें आत्महिताचें आहे ही गोष्ट सांप्रतच्या आधिभौतिक युगांतही अनेक शास्त्रज्ञांना पटत आहे. देव सर्वव्यापी, सर्वज्ञ व दयाळु आहे व जीव हा एकदेशी, अल्पज्ञ व स्वार्थी आहे; देव पूर्ण आहे व जीव अपूर्ण आहे; सर्वांतर्यामी देवाच्या निदिध्यासानें जीव आपली अपूर्णता घालवूं शकतो; देव सर्वसुखमय आहे व जीवाला त्याच्या चिंतनानें अवीट सुख मिळूं शकतें; देव पातकापासून मुक्त करून आपल्या स्वरूपीं जीवाला ठाव देतो या सात्त्विक भावना सर्व धर्मांत प्रचलित आहेत. देवाच्या कल्पनेंत, साधनांत व स्वर्गमोक्षाच्या वासनांत अधिकार-परत्वें भेद असले तरी मूल तत्त्वांत सर्वांची एकवाक्यताच आहे. 'भावें गावें गीत । शुद्ध करोनीयां चित्त ॥ जरि व्हावा तुज देव । तरि हा सुलभ उपाव' असें तुकोबारायांनीं अनुभवाने सांगितले आहे. देवाचे गुणानुवाद गातां गातां चित्त शुद्ध होत असल्याचा प्रत्यय येतो, त्यानें शांतिसमाधान वाढत जातें, देवाच्या सान्निध्याची प्रचीति येते, देवसंगतीचें वेड लागतें व मग 'माझी मज जाली अनावर वाचा। छंद या नामाचा घेतलासे' अशी स्थिति

होऊन जीव देवस्वरूपीं विरून मुरून लीन होऊन जातो. हा देवप्राप्तीचा धोपट मार्ग आहे. प्रार्थनेची प्रथम आवश्यकता भासते व अखेर देवगुण-गायन हें स्फूर्तीनें होत राहतें. हें सर्व धर्मवाङ्मयांत सांपडतें. शिवाय संसारांतलीं दुःखें, विघ्नें, उपाधि, अडथळे, शरीरक्लेश इत्यादिकांचे धक्के प्रत्येक जीवाला केव्हां ना केव्हां तरी बसतात व तो दीन हताश होऊन, वणव्यानें पेटलेल्या जंगलांत सांपडलेल्या हरिणाप्रमाणें, सुटकेचा उपाय पाहण्यासाठीं धडपडत असतो, आणि अशा समयीं ' जगाचा तो ऐसा धनि कवण तो पाव मज गा ' असा केविलवाणा होऊन सृष्टिकर्त्याकडे वळत असतो. शिवाय लेकरूं जसें आईकडे किंवा वासरूं गाईकडे सहज प्रेमानें धांव घेतें त्याप्रमाणें जीव हा आदिकारण जो ईश्वर त्याकडे सहजप्रेमानें धांव घेतो. विश्रांतीची जागा परमात्मा असें जाणूननेणून त्याकडे वळतो. पृथ्वीवरील सर्व धर्मवाङ्मयांत वेद हे अतिप्राचीन आहेत हें शोधकांनाही पटलें आहे, तेव्हां प्रार्थनेच्या आवश्यकतेविषयीं ऋग्वेदांत काय प्रकार आढळतो तो आपण पाहूं.

## २ प्रार्थना व नामस्मरण वेदांत आहे.

' ऋग्वेदांतील गूढविद्या ' हें पुस्तक माझे सांगलीचे वेदव्यासंगी मित्र कै. यशवंतराव कोल्हटकर यांनीं लिहिलें आहे. त्यांतील चौथें व्याख्यान ( पृ. ४३ ते ५८ ) प्रस्तुत विषयासंबंधींचें अत्यंत वाचनीय आहे. तें पाहिलें म्हणजे पुढें शास्त्रपुराणांत, गीताभागवतांत व सकल संतवाङ्मयांत देवाच्या प्रार्थनेसंबंधानें व नामचिंतनासंबंधानें जे विचार व अनुभव आपणांस पहावयास मिळतात ते जणूं बीजरूपानें खुद्द ऋग्वेदांतच आहेत असें स्पष्ट दिसून येतें. ऋग्वेदांत इंद्र, अग्नि, वरुण, मरुत्, सोम, आदित्य, विष्णु, रुद्र इ० देवतांच्या स्तुतिपर प्रार्थना आहेत (आमचा मराठी वाङ्मयाचा इतिहास–खंड १–' वेदविद्या ' हें पहिलेंच प्रकरण पहा ). वेदोत्तरकालांत तशाच प्रार्थना राम, कृष्ण (विठ्ठल), दत्त, शंकर, जगदंबा, इत्यादि देवतांच्या केलेल्या

आहेत; देवांचीं नांवें भिन्न आहेत पण प्रार्थनेचें स्वरूप एकच आहे. ऋग्वेदांतही आम्हांला पातकापासून मुक्त करावें व अमृतत्व द्यावें, आमचें अज्ञान निरसून आम्हांला ज्ञानसंपन्न करावें, असेंच सर्व प्रार्थनांचें स्वरूप आहे. वेदांत देवतांपाशीं धनधान्य, पशु, शत्रुनाश, युद्धांत यश, सत्पुत्र इ० ऐहिक मागण्या मागितल्या आहेत, तथापि अद्वैतज्ञान, भक्ति, अमरत्व याही पारमार्थिक गोष्टी मागितल्या आहेत. ऐहिक व पारमार्थिक ऐश्वर्य या दोहींची वेदानें कदर बाळगली आहे. प्रपंच व परमार्थ हे दोन्ही संसाराचे भाग ऐश्वर्यसंपन्न असावेत अशी वेदप्रार्थना आहे. वैदिक प्रार्थनेचें पारमार्थिक स्वरूप पाहूं. पहिल्याच मंडळांत पुढील मंत्र आहे —

**इदमापः प्रवहत यत्किंच दुरितं मयि ।**
**यद्वाहमभिदुद्रोह यद्वा शेष उतानृतम् ॥**

" प्राण्यांचा द्रोह करणें, अथवा खोटें बोलणें अशासारखें जें कांहीं ' दुरित ' म्ह० पाप माझ्याकडून घडलें असेल त्याचें जलदेवतेनें परिमार्जन करावें " अशी ही प्रार्थना आहे. ' सिंधुर्ननावा दुरितातिपर्षी ' म्ह० नावा जशा नदीपार नेतात त्याप्रमाणें तूं आम्हांला तारून ने; माझ्यांतलें ' गुह्यं तमः ' म्ह० गूढ असलेले सूक्ष्म अज्ञान घालवून मला ज्ञानसंपन्न कर; 'अतारिष्म तमसस्पारमस्य ' म्ह० आम्हांला तमाच्या पार ने; ' उतो अस्माँ अमृतत्वे दधातन ' म्ह० आम्हांला अमृतत्व दे; ' दामेव वत्साद्विमुमुग्ध्यंहो ' म्ह० दांव्यापासून वत्साला सोडवितात त्याप्रमाणें ह्या बंधक पापापासून ( अंह— पाप ) मुक्त कर—अशा प्रकारच्या देवतांच्या प्रार्थना ऋग्वेदांत केलेल्या आहेत. एका प्रार्थनेंत देवतेला तूं पिता आहेस, भ्राता आहेस, जिवलग मित्र आहेस असें म्हटलें आहे. हा मंत्र व रामदासांचा ' दासाची संपत्ती ' हा अभंग अगदीं एक आहेत. राम माझा ' जीवाचा सांगाती ' आहे, ' राम एक माता राम एक पिता । राम एक भ्राता सहोदर ' असें समर्थ

म्हणतात. वर पहिला मंत्र भूतद्रोहाच्या पापाबद्दल दिला आहे तसाच तुकोबांचा—'कोण्याही जीवाचा न घडो मत्सर' हा उद्गार आहे. वेदांतील प्रार्थना व साधुसंतांनीं केलेल्या प्रार्थना अगदीं एकाच स्वरूपाच्या आहेत. साधुसंतांनीं एकमतानें जनांस उपदेशिलेला नाममंत्र तर ऋग्वेदांत ४।५ ठिकाणीं सांगितला आहे. 'त्या विष्णूस तो जसा आहे तसा जाणा व त्याचें नांव पुरुषार्थ साध्य करून देणारें आहे हें वर्म जाणून त्याच्या नांवांचें संकीर्तन करा', 'देवाचें नाम वैखरीनेंच नव्हे तर परावाणीनें स्मरा' अशा अर्थाचे मंत्र ऋग्वेदांत आहेत. 'मनामहे चारु देवस्य नाम', 'मर्ता अमर्तस्य ते भूरिनाम मनामहे' इ० मंत्र पहावेत. 'नमो देवोभ्यो' इ० मंत्रांत नमनभक्ति स्पष्टच आहे. 'भक्ताची उपास्य-देवतेचें दर्शन व प्रसाद होण्याविषयींची तळमळ व त्या तळमळीची शांति' याचा उत्कृष्ट मासला मं० ७।८६ मध्यें आहे.

सांगावयाचें तात्पर्य हें आहे कीं, देवाची प्रार्थना करावयाची पद्धत व नामस्मरणाचें महत्त्व मूळ वेदांत आहे व तोच कित्ता सर्व साधुसंतांनीं गिरविला आहे. भक्तिमार्ग वेदांतच आहे, अर्थात् वेदधर्म व भागवतधर्म यांत लवमात्र फरक नाहीं. आपण वेदधर्माचाच प्रसार करीत आहोंत अशी संतांनीं ग्वाही दिली आहे. 'नाहीं श्रुतिपरौती माउली जगा' असें ज्ञानेश्वर म्हणतात व 'वाचा बोलूं वेदनीती । करूं संतीं केलें तें' असें तुकोबा सांगतात.

## ३ करुणाष्टकांचें स्वरूप

ज्यांत प्रेमभक्तिभावानें देवाची करुणा भाकली आहे; आपले दोष आठवून किंवा देवभक्तांच्या गुणांनीं मोहित होऊन आत्मशुद्धीसाठीं देवाला आळविले आहे; देवाच्या भेटीची, दर्शनाची किंवा कृपाप्रसादाची ज्यांत अतीव तळमळ प्रगट झाली आहे अशीं करुणामय स्तोत्रें तीं

करुणाष्टकें होत. हीं सारीं अष्टकेंच आहेत असें नाहीं, त्यांत कांहीं पंचकें व दशकें आहेत, श्लोकसंख्येचा त्यांत नियम नाहीं. समर्थांचीं हीं श्लोकबद्ध करुणाष्टकें फार लोकप्रिय आहेत. नामदेव-तुकोबांच्या करुणापर अभंगांत किंवा दासोपंतांच्या पदांत जी माधुरी आहे ती ह्या करुणाष्टकांत आहे. ह्या करुणाष्टकांत संसाराची निःसारता म्ह० वैराग्य आहे, अनुताप आहे, देवाचा धांवा आहे, मोक्षाची आकांक्षा आहे, पण मुख्यतः उपास्याचें भक्तिप्रेम आहे. श्लोक धांवते असून त्यांत अत्यंत साधेपणा व प्रसाद आहे, हृदयाचा पाट फोडून वाहणारे हे प्रवाह मग ऱ्हस्वदीर्घ, काना-मात्रा, यतिभंग इत्यादि खडकांकडे पाहत नाहींत, त्यांना त्यांची पर्वा नसते. सर्व काव्यदोष टाळून व व्याकरणादिकांचे निर्बंध पाळून रचलेल्या कवितेपेक्षां समर्थांची ही सहजप्रतिभासंपन्न वाणी वाचकांच्या हृदयांना जाऊन भिडते. मी 'जनकजापतिचा लघुसा कवि,' माझ्या कवितेंत काव्याचे उत्कृष्ट गुण नाहींत—'कवित जाडकळा हृदयीं नसे' म्हणून कवि स्पष्ट कबूली देतो, मात्र ती कबूली आम्हांला स्वीकारवत नाहीं. कां कीं जनकजापतीच्या बाणाला शत्रूचें शिर जसें लीलेनें उडवितां येई त्याप्रमाणें ह्या जनकजापतीच्या बालकवीच्या वाणीलाही वाचकपाठकांचें शिर उडवून रामचरणाजवळ नेऊन सोडतां येतें व त्यांचे नेत्र ओले करितां येतात. प्रभावशाली कवींच्या वाणींत अद्भुत प्रेम, प्रसाद व प्रतिभा असते. समर्थांच्या वाणींत हे गुण आहेत.

करुणाष्टकांतील कांहीं स्तोत्रें गोदातीरीं समर्थ अनुष्ठान करीत असल्यावेळचीं असावींत, कांहीं कृष्णातीरीं किंवा कोठल्या तरी घळींत समर्थ हिंडत असतांना झालीं असावींत. हीं करुणाष्टकें समर्थांनीं कोणासाठीं लिहिलीं आहेत? रामासाठीं—रामरायाच्या संतोषासाठीं—हें उघडच आहे. पण हीं कोणाचे मनोभाव व्यक्त करणारीं आहेत? स्वतः समर्थांचे का दुसऱ्या कोणाचे?

**( १ ) तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों ।**
**( २ ) उदासीन हा काळ कोठें न कंठे ।**
**( ३ ) रघूनायका काय कैसें करावें ? ।**
**( ४ ) सर्वोत्तमा ! कैं मज भेटि देसी ।**
**( ५ ) उदासीन हे वृत्ति कोठें न लागे ।**
**( ६ ) तुजवीण रामा मज कंठवेना ।**
**( ७ ) अनुदिनिं अनुतापें तापलों रामराया ।**

ही व अशा जातींचीं दुसरीं स्तोत्रें समर्थांचा स्वतःचा मनोभाव व्यक्त करणारीं आहेत का दुसऱ्यांनीं रामापुढें बसून रामाला आळवावें म्हणून परार्थ रचिलीं आहेत ? देवापुढें कसें रडावें, देवाला आपलीं गाऱ्हाणीं कशीं सांगावींत, देवाला करुणवाणीनें कसें आळवावें, हें लोकांना शिकविण्यासाठीं समर्थांनीं हे कित्ते घालून दिले आहेत असें कोणाचें मत आहे. पण असेंच केवळ असतें तर हीं करुणाष्टकें साध्या शिकवणींत जमा झालीं असतीं ! हीं मुख्यतः उपदेशपर कविता नाहींत, हीं भावनाप्रधान काव्यें आहेत, आजकालच्या भाषेंत बोलायचें तर हीं भावगीतें आहेत ! यांच्यांत कवीचे भावगर्भ प्रगट झाले आहेत. देवासाठीं रडण्यांतही सुख आहे, आनंद आहे, समाधान आहे, देवाचें चिंतन व सान्निध्य आहे ! भक्तांवाचून देवासाठीं तरी कोण रडतो ? चकोरासारखा चंद्राकडे अनन्यतेनें कोण पाहतो ? चातकाइतकी मेघोदकाविषयीं आतुरता कोणाला आहे ? गाईसाठीं वत्सासारखा हंबरडा कोण फोडतो ? 'दुःखानळें मी संतप्त देहीं । तुजवीण रामा विश्रांति नाहीं' अशा प्रकारें देवाच्या भेटीसाठीं देवापुढें मुक्तकंठानें रडण्यांतही मोठें सुख असतें. तळमळ, उत्कंठा, आळवणें यांनीं देव जवळ होतो. 'सर्वोत्तमा कैं मज भेटि देसी' या तळमळींत अर्ध्या भेटीचें समाधान असतें. संसारासाठीं सगळेच रडत असतात पण केवळ देवासाठीं रडण्यानें देवालाही प्रेमाचा पाझर फुटतो. 'उदासीन हे

वृत्ति कोठें न लागे' ह्या पंचदशकांत या वेळची समर्थांची मनोभावना सुव्यक्त झाली आहे. 'गुणीं गुंतलें चित्त हें आवरेना', 'सदानंद हे राममूर्ती सुखाची', 'सदासर्वदा अंतरीं राम जागे' असें म्हणत म्हणत समर्थांनीं आपली वृत्ति अन्य बाह्य पदार्थांकडे किंवा जनसंगाकडे कशी ओढत नाहीं हें सांगितले आहे. 'मनीं नावडे द्रव्यदारा पसारा। मनीं नावडे मायिकांचा उबारा'—त्यांत जीव गुदमरतो ! लोकांकडे पहावें तर त्यांच्यांत अनेक भेदबुद्धि असून 'मदें मत्सरें निंदिती येकमेकां' असेंच प्रायः आढळतें ! शब्दज्ञान्यांचें 'बहूसाल हें बोलणें आवडेना' असें झालें आहे. 'जनांसारिखें बोलणेंही घडेना'—जन हे सत्याचें मिथ्य व मिथ्याचें सत्य करितांना पाहून जीव कासावीस होतो—त्यांच्यासारखें वागणें व बोलणें मला नको वाटतें. ह्या उपाधींत पडलेल्या मनुष्यांस सत्य सोडून कोणता तरी पक्ष घ्यावा लागतो—असें किती सांगावें ? 'मनीं प्रीति हे लागली राघवाची' ती कांहीं आतां सुटत नाहीं. 'पराधीनता रामदासीं घडेना,' कां कीं राम पाठींपोटीं सांभाळीत असतो, म्हणून रामाविरहित ही वृत्ति कोठेंही जडत नाहीं.

## ४ भेटीपूर्वीं का भेटीनंतर ?

खरोखर म्हटलें तर देवाला आळवल्यानें, देवाची करुणा भाकल्यानें प्रेमसुखाचा अनुभव चाखतां येतो, व ही गोडी आधीं भोगलेली असल्यावांचून प्रेमविरहाचीं 'करुणागीतें' मुखांतून येत नाहींत. देवा भेट दे, देवा दर्शन दे, असें भक्त म्हणतो तें त्याला देवाची भेट व दर्शन झालीं नसल्याचें गमक नसून झाल्याचेंच गमक आहे असे मला वाटतें. दर्शन झाल्यावरच वेध लागत असतो. वेधाची गोडी चाखणें हेंच भक्तीचें प्रेमळ रूप होय. गोपींचे विरहगीत याच दृष्टीनें भक्तांना अपूर्व वाटतें. विरहांत ध्यास पुरा लागतो, प्रेमसुखानुभव पूर्ण होतो. वेध हा

'चंद्राहूनि शीतळ । रवीहूनि सोज्ज्वळ ।' असून 'अमृताहूनि स्वादु । गगनाहूनि मृदु । रूपेंवीण आनंदु । देखिला बाई' असें नाथांनीं गोपीविरहाच्या वर्णनप्रसंगीं एका अभंगांत म्हटलें आहे !

देवाच्या भेटीची अत्यंत भूक लागली आहे, दर्शन होत नाहीं म्हणून जीव तळमळत आहे, जनसंसर्गाचा वीट आला आहे, आपल्या अवगुणांची खंती वाटून भक्तश्रेष्ठांचे उत्तम गुण अंगीं येऊन मी कधीं देवाला तसा प्रिय होईन अशी कासाविसी होत आहे, अशा अनुतप्त अंतःकरणांतला प्रेमपाझर तीं हीं करुणाष्टकें होत. 'तुका म्हणे येथें पिसें । तेथे तैसें असेचि'—मला देवाच्या भेटीची जर खरी तळमळ असेल तर निश्चित समजावें कीं देवही माझ्या भेटीसाठीं उत्सुक आहे. देव दयाळ आहे, करुणासागर आहे, भक्तवत्सल आहे असा पूर्ण विश्वास धरून देवासाठीं तळमळणें हाच त्याच्य भेटीचा एकमेव उपाय आहे. देवाच्या भेटीची तळमळ आणि देवाची भेट व त्याचा कृपाप्रसाद झाल्याचें समाधान ह्या दोन्ही टोंकांतल्या सर्व भावनांचा उद्रेक यांचा करुणाष्टकांत समावेश होतो. आईनें अंकावर घेऊन स्तनपान द्यावें यासाठीं वत्स कासावीस झालें, कीं आईलाही प्रेमाचा पान्हा फुटून ती त्याला उचलून घेऊन स्तनाशीं लावते व त्याबरोबर त्याचें रडें थांबते हा कोमळ प्रेमभाव देवाभक्तांच्याही संबंधांत प्रगट होतो. म्हणून 'अनुदिनिं अनुतापें तापलों रामराया' येथपासून तों 'सेविला देव देवांचा तेणें मी धन्य जाहलों' येथपर्यंतच्या सर्व भावप्रधान उद्गारांचा समावेश करुणाष्टकांत होतो. आपली तृप्ति झाल्यावर 'राघवाचा वर पावलों सत्वर । जनाचा उद्धार करावया' हें ओघानेंच येतें. देवाच्या भेटीची तळमळ हें फूल व देवदर्शनानें कृतार्थ होणें एवढेंच नव्हे तर म्यां भोगलेला देवाचा सुखसोहळा सर्व लोकांस देऊन त्यांनाही दुःखशोकापासून सोडवीन व या प्रकारें लोकोद्धार करीन अशी वासना हें फळ. असा हा प्रेमभक्तीचा दिव्य आम्रवृक्ष आहे. राम हा कल्पतरु आहे. तो उपासनाप्रेमानें

आपलासा करावा व त्याच्या सुखमय शीतल छायेखालीं सकळ लोक सुखी करावेत यांतच नरजन्माची सफळता आहे.

## ५ करुणाष्टकांतील प्रेमळ प्रार्थना

**अनुदिनिं अनुतापें तापलों रामराया**
**परमदिनदयाळा नीरसीं मोहमाया।**
**अचपळ मन माझें नावरे आवरीतां**
**तुजविण शिण होतो धांव रे धांव आतां ॥ १ ॥**
**भजनरहित रामा सर्वही जन्म गेला**
**स्वजनजनधनाचा व्यर्थ म्यां स्वार्थ केला।**
**रघुपति ! मति माझी आपुलीशी करावी**
**सकळ त्यजुनि भावें कास तूझी धरावी ॥**

हें पंधरा श्लोकी स्तोत्र लोकप्रिय आहे. त्यांतील अनुताप—संसाराचा अर्धाअधिक डोंगर चढून गेल्यावर—प्रत्येकाला होत असतो ! या स्तोत्राच्या वाणींत साधेपणा, सत्यपणा आहे. वाणींत प्रसन्नता आहे म्हणून हें सुंदर काव्य आहे. हें अनुभवावर आधारलेलें आहे म्हणून यांत सत्यता आहे. सत्यता आणि काव्य यांचें यांत सुंदर मिश्रण आहे. यासारखे अनुताप होण्याचे प्रसंग प्रत्येक संसारी माणसावर येत असतात. 'उपरति मज रामीं जाहली पूर्णकामीं—' संसारसंगतींत कोणाच्याही कामना पूर्ण होत नाहींत, राम पूर्णकाम आहे म्हणून त्याकडे चित्त वळलें आहे. 'विषयजनित सूखे सूख होणार नाहीं'—राम निर्विषय सुखस्वरूप आहे—

**तनुमनधन माझें राघवा ! रूप तूझें**
**तुजविण मज वाटे सव संसार ओझें।**

संसाराचा पाश तुझ्या कृपेवांचून एकदम सुटत नाहीं, मन विषयाकडे ओढतें—

**चपळपण मनाचें मोडितां मोडवेना**
**सकळ स्वजनमाया तोडितां तोडवेना।**

म्हणून षड्रिपूंचा संबंध तोडून टाक; 'मजवरि करुणेचा राघवा पूर लोटीं.' मनाची तळमळ निववून त्याला शांतिसमाधान देणारा तूंच आहेस.

**झडकरि झड घालीं धांव पंचानना रे**
**तुजविण मज ने ती जंबुकी वासना रे।**

तुझी अवचट भेटी होतांच मी पाय धरीन व ते पुन्हा कधीं सोडणार नाहीं. तूं मायमाउली आहेस, मला तुझ्या दयेची कल्पना कशी यावी?

**जळधरकणआशा लागली चातकासी**
**हिमकर अवलोकी पक्षिया भूमिवासी।**

मेघजलाच्या कणाची आस करीत चातक वर पाहतो व चंद्राची नजर वरून त्यावर असते, तशी आमच्यावर तुझी कृपादृष्टि आहेच आहे!

जन हे वैभवाचे अंकित आहेत. निर्वाणीचा सखा तूंच आहेस. 'जिवलग जिव घेती प्रेत सांडूनि देती!' वैभव चंचल आहे, जनांचें प्रेम मायिक आहे—

**स्वजनजनधनाचा कोण संतोष आहे?**
**रघुपतिविण आतां चित्त कोठें न राहे।**

संसाराच्या मृगजळाच्या मागें धांवतां धांवतां 'सुख सुख म्हणतां तें दुःख ठाकोनि आलें' असाच अनुभव येतो. देहबुद्धि कठिण आहे, ती जातां जात नाहीं. आतां मज उपरति झाली आहे. रामा! तूं विश्रामधाम आहेस. तुझ्या ठायीं भ्रम उरत नाहींत. आतां तूंच माझें मन आपल्या स्वरूपीं जडवून घे.

**घडिघडि मन आतां रामरूपीं भरावें**
**रघुकुळटिळका! रे आपुलेंसें करावें।**

आम्ही देवा, तुला चुकलों यांत नवल नाहीं. मासे काय जळाला जाणतात?

**जळचर जळवासी नेणती त्या जळासी**
**निशिदिनिं तुजपाशीं चूकलों गूणराशी।**

तुझा अंतपार आम्हांला लागत नाहीं. तूंच आपण होऊन दया करून आम्हांस जवळ केलें पाहिजेस. तुझ्या भेटीची आर्त आहे.

* * * *

**मनाची तळमळ**

**हुरहुर हुर वाटे अंतरीं बाष्प दाटे**
**तुजविण रघुराजा ! लोचनीं नीर लोटे ।**
**तन मन धन वीटे दुःख देहीं न कंठे**
**बहुविध उपचारें क्षोभलें चित्त ऊठे ॥**

* * * *

## ६ अनुताप व भेटीची उत्कंठा

**दुःखानळें मी संतप्त देहीं । तुजवीण रामा विश्रांति नाहीं ॥**
**आधार तूझा मज मी विदेशी । सर्वोत्तमा कैं मज भेटि देसी ॥**
**संसारचिंता मज वाटते रे । रामा प्रपंचीं मन जातसे रे ॥**
**संसर्ग आहे इतरां जनांसी । सर्वोत्तमा कैं मज भेटि देसी ॥**

* * * *

'उदासीन हे वृत्ति जीवीं धरावी'—पण ही उदासीनता म्हणजे संसारी जीवांची रडवी उदासता नव्हे ! 'सदा प्रीति लागो तुझे गूण गातां' ही सद्वासना ह्या उदासीनतेच्या पोटांत असल्यामुळें ही देवप्राप्तीची पूर्वनिशाणीच आहे !

**नको द्रव्यदारा नको येरझारा । नको मानसीं ज्ञानगर्वें फुगारा ॥**
**सगूणीं मला लाविं रे भक्तिपंथा । रघूनायका मागणें हेंचि आतां ॥**
**तुझें रूपडें लोचनीं म्यां पहावें । तुझे गूण गातां मनासीं रहावें ॥**
**उठो आवडी भक्तिपंथेंचि जातां । रघूनायका मागणें हेंचि आतां ॥**
**सदा सर्वदा योग तूझा घडावा । तुझे कारणीं देह माझा पडावा ॥**
**नुपेक्षीं मज गूणवंता अनंता । रघूनायका मागणें हेंचि आतां ॥**

शेवटचा श्लोक सर्वांच्या तोंडीं आहे. ‘नुपेक्षीं मज’ या ऐवजीं ‘उपेक्षूं नको’ असें लोक म्हणतात. ह्या स्तोत्रांतील मागणें रामाच्या नामरूपाच्या प्रेमानें पवित्र झालें आहे. मागायचें असेल तर हेंच मागावें.

*　　　*　　　*　　　*

मोठेमोठे भक्त, योगी, पुण्यात्मे पाहिले, त्यांच्या कथा वाचल्या व ऐकल्या, त्यांनीं देवाची अनन्यसेवा केली—पण माझ्या हातून तुझी सेवा कांहींच घडली नाहीं; मी देहकष्टाला व देहदु:खाला भिऊन दूर पळणारा—म्हणून अनुताप होऊन ‘तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों असें वाटायला लागले !

**असंख्यात रे भक्त होऊनि गेले । तिहीं साधनांचे बहू कष्ट केले ॥**
**नव्हे कार्यकर्ता भुमीभार जालों । तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों ॥**
**बहू दास ते तापसी तीर्थवासी । गिरीकंदरीं भेटि नाहीं जनांसी ॥**
**स्थिती ऐकतां थोर विस्मीत जालों । तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों ॥**
**सदा प्रेमराशी तयां भेटलासी । तुझ्या दर्शनें स्पर्शनें सौख्यराशी ॥**
**अहंता मनीं-शब्दज्ञानें बुडालों । तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों ॥**
**किती योगमूर्ती किती पुण्यमूर्ती । किती धर्मसंस्थापना अन्नशांती ॥**
**परस्तावलों कावलों तप्त जालों । तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों ॥**

समर्थांचा संचार केवढा; गिरिकंदरीं वास केवढा; केवढाले पुण्यात्मे, भक्त, योगी व तपस्वी त्यांनीं पाहिले व ऐकले असतील हें कोणी काय सांगावें ? देवाच्या प्राप्तीसाठीं नर्मदातीरीं वा अन्यत्र महान् कायक्लेश सोसणारे, लोकोद्धारक, कार्यकर्ते, अन्नशांतीसाठीं अन्नछत्रें घालणारे पुण्यात्मे समर्थांनीं अनेक पाहिले असतील ! आजही कोण कोण त्या साधनांत आहेत हें आपणांस काय ठाऊक आहे ? किती प्रेममूर्ति जागजागीं असतील ! त्यांच्या मानानें माझ्या हातून कांहींच घडलें नाहीं !

'अहंता मनीं—शब्दज्ञानें बुडालों' असा अनुताप केव्हां ना केव्हां तरी अंतर्मुख भाविकास होतोच. अंतर्निरीक्षणानें पुढचा मार्ग दिसत जातो.

*　　*　　*　　*

बाह्य चिन्हांवरून लोक म्हणतात कीं हा मोठा देवभक्त आहे पण अंतःकरणांतून अहंता गेली नाहीं!—

**नसे भक्ति ना ज्ञान ना ध्यान कांहीं। नसे प्रेम हें रामविश्राम नाहीं॥**
**असा दीन अज्ञान मी दास तूझा। समर्था जनीं घेतला भार माझा॥**
**रघूनायका! जन्मजन्मांतरींचा। अहंभाव छेदोनि टाकीं दिनाचा॥**
**जनीं बोलती दास या राघवाचा। परी अंतरीं लेश नाहीं तयाचा॥**
**रघूनायका दीन हातीं धरावें। अहंभाव छेदोनियां उद्धरावें॥**
**अगूणी तयालागिं गूणी करावें। समर्थें भवसागरीं ऊतरावें॥**

समर्थांनीं हें आमच्यासाठीं म्हटलें आहे खास. ते आपला अनुभव पुढेच सांगतात—

**मला कोवसा राम कैवल्यदाता। तयाचेनि हे फीटली सर्व चिंता॥**
**समर्था तया काय उत्तीर्ण व्हावें। सदा सर्वदा नाम वाचे वदावें॥**

*　　*　　*　　*

**विषयविष वमावें कल्पनेला दमावें**
**निजपद निजभावें दृढ चित्तीं धरावें।**
**भवभय निरसावें साधुसंगीं वसावें**
**सगुणभजन द्यावें स्वामि देवाधिदेवें॥**

ह्या स्तोत्रांत 'हरिभजन कराया पाहिजे दृढ काया' असा एक चरण आहे. भजनसुखासाठीं 'जाऊं देऊं नको भंगा। गात्रें माझीं पांडुरंगा' असें तुकोबांनींही म्हटलें आहे.

*　　*　　*　　*

सुखदुःखाचा भोग माझ्या पूर्वकर्मानुरूप जो माझ्या वांट्याला आला आहे तो मी भोगीन, त्याबद्दल तुला बोल लावणार नाहीं असें समर्थ एका श्लोकांत सांगतात —

सुखदुःख मज माझें वाढिलें तेंचि जेऊं
रघुपति ! तुजला रे कासया बोल ठेवूं ॥

## उदासीन हा काळ कोठें न कंठे

कांहीं काळ घडलेला प्रेमळ भक्तांचा समागम अंतरला आणि रामाचीही भेट नाहीं! प्रपंचसंगतींत सुख वाटत नाहीं. अशा समयीं 'उदासीन हा काळ कोठें न कंठे' असें होऊन जातें.

**समाधान साधूजनांचेनि योगें । परी मागुतें दुःख होतें वियोगें ॥**
**घडीनें घडी शीण अत्यंत वाटे । उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥**
**घरें सुंदरें सौख्य नानापरीचें । परी कोण जाणेल हें अंतरीचें ॥**
**मनीं आठवीतांचि तो कंठ दाटे । उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥**
**कृपाळूपणें भेटि दे रामराया । वियोगें तुझ्या सर्व व्याकूळ काया ॥**
**पहावें तुला हें जिवीं आर्त मोठें । उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥**

* * * *

**तुझिया वियोगें जीवित्व आलें । शरीर पांगें बहुदुःख जालें ॥**
**अज्ञानदारिद्य माझें सरेना । तुजवीण रामा मज कंठवेना ॥**
**जडली उपाधी अभिमान साधी । विवेक नाहीं बहुसाल बाधी ॥**
**समयीं बहुक्रोध शांती घडेना । तुजवीण रामा मज कंठवेना ॥**
**संसारसंगें बहु पीडलों रे । कारुण्यसिंधू ! मज सोडवीं रे ॥**
**कृपाकटाक्षें सांभाळिं दीना । तुजवीण रामा मज कंठवेना ॥**

## ७ बुद्धि दे रघुनायका

**युक्ति नाहीं बुद्धि नाहीं । विद्या नाहीं विवेकिता ।**
**नेणता भक्त मी तूझा । बुद्धि दे रघुनायका ॥**

ह्या वीस अनुष्टुपी श्लोकांत लोकव्यवहारांत लागणाऱ्या बुद्धिगुणाचें दान रामापाशीं मागितलें आहे. बुद्धिदाता परमेश्वर आहे. ‘ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते’ म्ह० ज्या बुद्धियोगामुळें जीव परमात्मस्वरूपाला पावतात, व ज्याच्या लाभासाठीं गायत्रीमंत्रानें सूर्याची उपासना सांगितली आहे तो बुद्धियोग इहपरतारक आहे. प्रपंचव्यवसायांत, राजकारणांत व परमार्थांत बुद्धियोगाची पदोपदीं आवश्यकता असते. निर्बुद्ध अथवा अल्पबुद्ध प्राणी यश व सुख कसा पावणार? ह्या स्तोत्रांत समर्थांनीं देवापाशीं बुद्धिदान मागितलें आहे.

**अन्न नाहीं वस्त्र नाहीं। सौख्य नाहीं जनांमधें।**
**आश्रयो पाहतां नाहीं। बुद्धि दे रघुनायका॥**
**बोलतां चालतां येना। कार्यभाग कळेचिना।**
**बहु मी पीडिलों लोकीं। बुद्धि दे रघुनायका॥**
**प्रसंगवेळ तर्केना। सुचेना दीर्घसूचना।**
**मैत्रिकी राखितां येना। बुद्धि दे रघुनायका॥**
**कळेना स्फूर्ति होईना। आपदा लागली बहू।**
**परमार्थू कळेना कीं। बुद्धि दे रघुनायका॥**

सर्वसामान्य लोकांनीं हीच बुद्धि देवापाशीं मागायला हवी—‘बेकारीनें गांजलेल्या व अंमळ वरच्या लोकांना एवढी बुद्धि मिळाली तर त्यांचा व्यवहार तरी बरासा चालेल! बुद्धीचें खरें वैभव देव जोडणें हें आहे. समर्थ म्हणतात—

**काया वाचा मनोभावें। तुझा मी म्हणवीतसें।**
**हे लाज तूजला माझी। बुद्धि दे रघुनायका॥**
**भक्त उदंड तुम्हांला। आम्हांला कोण पूसतें?।**
**ब्रीद हें राखणें आधीं। बुद्धि दे रघुनायका॥**
**रामदास म्हणे माझा। संसार तुज लागला।**
**संशयो वागतो पोटीं। बुद्धि दे रघुनायका॥**

## ८ 'श्रीराम राम हें म्हणा'

'श्रीराम राम हें म्हणा' ह्या पालुपदाचें एक सुंदर दशक आहे. 'जनासि सांगतों खुणा। श्रीराम राम हें म्हणा' असें समर्थांनीं म्हटलें असून शंकर पार्वतीला 'विशेष गूज' सांगतात तें विशद केलें आहे. शंकर म्हणतात—

**विषें बहूत जाळिलें। विशेष अंग पोळलें।**
**प्रचीत माझिया मना। श्रीराम राम हें म्हणा॥ ३॥**
**बहुत प्रेत्न पाहिले। परंतु सर्व राहिले।**
**विबूधपक्षरक्षणा। श्रीराम राम हें म्हणा॥ ५॥**
**अपाय होत चूकला। उपाय हा भला भला।**
**नसे जयासि तूळणा। श्रीराम राम हें म्हणा॥ ६॥**
**विरांमधें विरोत्तमू। विशेष हा रघूत्तमू।**
**सकाम काम आंकणा। श्रीराम राम हें म्हणा॥ ७॥**
**देहे धरूनि वानरी। अखंड दास्य मी करीं।**
**विमुक्त राज्य रावणा। श्रीराम राम हें म्हणा॥ १०॥**

"जगाच्या कल्याणार्थ मी हालाहल विष प्राशन केलें त्यामुळें माझ्या अंगाचा दाह झाला. तो रामनामानें शांत झाला म्हणून मी प्रचीतीनें सांगतों कीं 'राम राम' म्हणा. देवांचा सत्पक्ष आहे त्याच्या रक्षणासाठीं बहुत उपाय केले ते सारे व्यर्थ गेले, शेवटीं रामभजनानें यश आलें. रामनाम ह्याच उपायानें आपत्ति टळली, हाच उपाय सर्वश्रेष्ठ आहे. याच्या बरोबरीचा दुसरा कोणताही उपाय नाहीं. वीरांमधला श्रेष्ठ वीर एक राम होय. काळ त्याचा अंकित आहे म्हणून राम राम म्हणा. मीही मारुतीचा देह धारण केला व रामाचे अखंड दास्य केलें तेव्हां रावणाचें राज्य मला बुडवितां आलें! असें रामनाम श्रेष्ठ आहे. तुम्ही श्रीराम श्रीराम असें भजन करा म्हणजे सर्व आपत्तींतून उद्धराल." याच अर्थाचा समर्थांचा अभंग पहा—

**शिरीं आहे रामराज । औषधाचें कोण काज ? ॥ १ ॥**
**जो जो प्रेत्न रामावीण । तो तो दुःखासी कारण ॥ ध्रु० ॥**
**शंकराचें हळाहळ । जेणें केलें सुशीतळ ॥ २ ॥**
**आम्हां तोचि तो रक्षिता । रामदासीं नाहीं चिंता ॥ ३ ॥**

आपल्या वेळच्या महाराष्ट्राला समर्थांनीं रामनामाचा महामंत्र—सर्व आपत्तींतून तारून नेणारा महामंत्र—दिला तो हाच नाहीं काय? ह्या महामंत्राच्या जपाशिवाय—नामस्मरणाशिवाय—आजही आम्हांला तारक उपाय दुसरा कोणता आहे?



# ३ ग्रंथ आणि ग्रंथाध्ययन



**आधींच शिकोन जो शिकवी । तोचि पावे श्रेष्ठ पद्वी ।**
**गुंतल्या लोकांस उगवी । विवेकबळें ॥ ( दास० ११-६-१० )**

१ ग्रंथावलोकन. २ समर्थांचा अभ्यासक्रम. ३ अभ्यासाची महती व पद्धत. ४ अभ्यासाला एकान्ताची आवश्यकता. ५ कोणते ग्रंथ अभ्यासावेत? ६ कवित्वाचे चार प्रकार. ७ श्रवण उर्फ वाचन. ८ संस्कृत ग्रंथ. ९ उपनिषदें. १० वाल्मीकि-रामायण. ११ गीता आणि भागवत. १२ मुख्यतः गुरुकृपा व उपासनाभक्तिप्रेम पाहिजे. १३ मराठी भाषेचें महत्त्व. १४ भक्तांची नामावळी. १५ चमत्कारांवर समर्थांचा विश्वास होता काय? १६ मुकुंदराज आणि समर्थ. १७ ज्ञानेश्वर आणि समर्थ. १८ दासोपंत व समर्थ. १९ नाथ व समर्थ. २० त्र्यंबकरायांचा बालबोध व समर्थांचा दासबोध.

## १ ग्रंथावलोकन

१ ‘शब्दादेवापरोक्षधीः’ म्हणजे ‘शब्द’ अर्थात् वेदाचें महावाक्य—त्याच्या श्रवणानेंच मनुष्यास अपरोक्षसाक्षात्कार होतो. ‘शब्द’ याचा व्यापक अर्थ घेतला म्हणजे वेदवाणीला अनुसरून चालणाऱ्या शास्त्रपुराणांचा व संतवाङ्मयाचाही त्यांत समावेश होऊं शकतो. पूर्वी झालेल्या ग्रंथांचा अभ्यास करूनच कोणीही ग्रंथकार पुढें सरकत असतो. मागच्यांचा अनुभव घेतल्याशिवाय पाऊल पुढें पडत नाहीं. शास्त्रांचा अभ्यास, संतांचा अनुभव, व स्वतःचा प्रत्यय उर्फ प्रचीती यालाच समर्थ त्रिप्रचीती असें म्हणतात. अनुभव, अपरोक्षसाक्षात्कार व विज्ञान हीं नांवें पूर्वी ज्यास

दिलीं जात त्यालाच समर्थांनीं प्रत्यय किंवा प्रचीती असें सुटसुटीत नांव दिलें आहे. साधुसंतांची वाणी प्रचीतीची असते, म्हणूनच तिची समाजावर छाप बसते. अनुभवावांचून बोलणें व्यर्थ आहे, ती बडबड आहे, श्वानाच्या भुंकण्याइतकीच तिची किंमत आहे असें समर्थांनीं म्हटलें आहे. पण हा अनुभव येण्यापूर्वी पूर्वील मान्य ग्रंथांचा अभ्यास, वाचन, श्रवण, निरूपण प्रत्येकाला करावेंच लागतें. विद्या ही याप्रमाणें परंपराप्राप्त असते. समर्थांनीं याप्रमाणें कांहीं संस्कृतप्राकृत ग्रंथांचें अध्ययन केले. दुपारीं नाशिकच्या कांहीं सच्छील पंडितांपाशीं त्यांनीं अध्ययन–श्रवण केलें. नंतरही शास्त्रग्रंथांचें त्यांचें अवलोकन चालूच होतें. त्यांनीं पुरश्चरणकालीं किंवा नंतर कोणकोणत्या ग्रंथांचें अध्ययन केलें याचा कांहीं सुगावा लागल्यास आपण त्यांच्या ग्रंथांतच तो शोधूं. त्यांच्या अध्ययनाचा हा अंतर्गत पुरावा शोधणें मोठें बोधप्रद आहे. ‘भगवद्वाक्याविरहित नसे। बोलणें येथींचें’ म्ह० उपनिषदें किंवा गीताभागवतादि ग्रंथांला सोडून माझें बोलणें नाहीं अशी त्यांची प्रतिज्ञाच आहे. श्रवणाचें कार्य सांप्रतकाळीं वाचनानें होतें, म्हणून श्रवणांत वाचनाचा अंतर्भाव होतो असें समजावें. ऐकलें, वाचले, पाहिलें पाहिजे. त्यावांचून शहाणपण येत नाहीं.

**ऐकिल्यावीण कळलें। शिकविल्याविण शहाणपण आलें।**
**ऐसें देखिलें ना ऐकिलें। भूमंडळीं ॥ ६ ॥**
**सकळ कांहीं ऐकतां कळे। कळतां कळतां वृत्ति निवळे।**
**नेमस्त मनामध्यें आकळे। सारासार ॥ ७ ॥ ( दास० १८–१० )**

## २ समर्थांचा अभ्यासक्रम

समर्थांनीं दासबोधांत अभ्यासाविषयीं पुष्कळ शिकवणी दिल्या आहेत, त्या पाहिल्या म्हणजे त्यांनीं स्वतः अभ्यासाकडे कसें लक्ष पुरविलें होतें

हें चांगलें समजून येतें. 'आधीं केलें मग सांगितलें' असा त्यांचा दंडक असल्यामुळें त्यांनीं जें सांगितलें आहे तें आधीं केलेंच होतें. सांप्रदायिकाच्या अंगीं कोणकोणते गुण पाहिजेत हें त्यांनीं एका अभंगांत सांगितलें आहे. चांगल्या सुसंस्कृत मनुष्याचीं हीं लक्षणें आहेत. हीं लक्षणें २० आहेत. 'प्रथम लिहिणें, दुसरें वाचणें । तिसरे सांगणें अर्थान्तर.' प्राथमिक शिक्षणाचे हे पहिले तीन पाठ आहेत. यानंतरचे पाठ चढत्या क्रमाचे आहेत. गाणें, नाचणें, टाळी वाजविणें, अर्थभेद जाणणें व सांगणे, प्रबंध म्ह० कवित्व करणें, आशंका फेडणें, हें शिकले म्हणजे शिकविण्याची व कीर्तनाची योग्यता येते. लोकजागृति करणारे कीर्तनकार यांना हे गुण अवश्य पाहिजेत. हे बहिरंग झाले, आतां त्याहून वरच्या वर्गाचे पाठ म्हणजे प्रचीति (स्वानुभव), प्रबोध (दुसऱ्यांच्या मनांवर सुसंस्कार करणारा बोध देणें), विवेक, वैराग्य, अव्यग्रता (चित्तैकाग्र्य), उदासीनता (उपाधींत राहून निरुपाधिक राहणें, असंगत्व) हे होत. या अंतरंग गुणांची जोड असल्याशिवाय उपदेशकाची छाप लोकांवर पडत नाहीं. यापुढें प्रसंग जाणून वागणे, लोक राजी राखणें, राजकारण, सर्वांशीं समभाव व उपासनेनें लोक भक्तिमार्गास लावणें हें त्यानें शिकलें पाहिजे. हीं चढत्या क्रमाचीं २० लक्षणें अभ्यासानें अंगीं आणणारा मनुष्य स्वतः तरून इतरांस तारण्यास समर्थ होतो. ह्या बहुविध लक्षणांनीं नटलेला पुरुष लोकोद्धाराचें कार्य करण्यास समर्थ होतो. खऱ्या कार्यकर्त्या पुढाऱ्याच्या अंगीं हे गुण अवश्य पाहिजेत. हें ध्येय पुढें ठेवून कोणी कांहीं कांहीं गुणांचा अंशमात्रेंकरून अभ्यास करील तरी तोही लोककार्यकर्ता होईल. ह्या २० गुणांचें स्पष्टीकरण दासबोधांत व स्फुट कवितेंत समर्थांनीं चांगलें केलें आहे. पंचवटींत बारा वर्षें अनुष्ठान करीत असतांना समर्थांनीं हे गुण संपादन केले व त्याचें फळ महाराष्ट्रास मिळालें! हा अभ्यास अंगीं मुरविल्यानंतरच मनुष्यानें प्रगट

व्हावें, ' प्रगट होवोनि नासावें । हें बरें नव्हे ' अशी वरील अभ्यासक्रमाच्या खालीं त्यांनीं महत्त्वाची टीप देऊन ठेवली आहे ! असा कांहीं अभ्यास केल्याशिवाय लोक सुधारण्याची हांव बाळगणारांची काय स्थिति होते ती प्रत्यक्ष दिसतेच आहे ! आधीं आपण करावें, मग करवावें. ' सांगावें कोणें कोणा । चिंता आपुली आपणा ' या पदांत समर्थांनीं सांगितलें आहे कीं, आधीं आपण आपला उद्धार करावा व त्यासाठीं नारायणाला मनोभावें शरण जावें, त्याचें दास्य करावें, त्याचें सख्य जोडावें, तो पाठिराखा करावा. नंतर लोकोद्धाराचा मार्ग धरावा. आधीं स्वतःचा उद्धार, मग लोकांचा उद्धार !

## ३ अभ्यासाची महती व पद्धत

वर सांगितलेल्या २० लक्षणांपैकीं पहिले लक्षण जें ' लिहिणें ' त्यावर समर्थांनीं एक समास सांगितला आहे ( दास० द० १९ स० १ ). ' ब्राह्मणें बाळबोध अक्षर । घडसून करावें सुंदर । जें देखतांचि चतुर । समाधान पावती ॥ वाटोळें सरळ मोकळें । वोतलें मसीचें काळें । वोळी चालिल्या ढाळें । मुक्तमाळा जैशा. ' काने, मात्रा, वेलांट्या, आर्कुली ( रेफ ), मधलें अंतर, सर्व नीट असावें. कागद कसा साफ ठेवावा; शाई कशी करावी; गोफ, बासनें, मेणकापडें, पेट्याकुलपें—सर्व कांहीं सुव्यवस्थित कसें असावें हें येथें समर्थांनीं फार बारकाईनें सांगितलें आहे. सर्वही लक्षणांचे असेच पूर्ण विचार दासबोधांत सांगितले आहेत. विस्तार कोठवर करावा? ' नित्यनेम सांडूं नये । अभ्यास बुडों देऊं नये, ' बहुत ग्रंथ धांडोळावे, अपार पाठान्तर करावें, नाना ग्रंथ पाहिले तरी सार शोधून घ्यावें, शृंगारिक वाचूं नये, चित्तविक्षेप करणाऱ्या ग्रंथांस शिवों नये, नित्यनेमाचा अभ्यास ठेवावा—

( १ )

**एकाग्र करूनियां मन । बळेंचि§ करावें साधन ।**
**यत्नीं आळसाचें दर्शन । होऊंचि नये ॥ १२ ॥**
**अवगुण अवघेचि सांडावे । उत्तम गुण अभ्यासावे ।**
**प्रबंध पाठ करीत जावे । जाड† अर्थें ॥ १३ ॥**
**पद्प्रबंध $ श्लोकप्रबंध । नाना धाटी मुद्रा छंद ।**
**प्रसंगज्ञानेंचि आनंद । होत आहे ॥ १४ ॥**
**ज्याची जैसी उपासना । तेंचि गावें, चुकावेंना ।**
**रागज्ञान ताळज्ञाना । अभ्यासावें ॥ १७ ॥**
**साहित्य संगीत प्रसंगें मानें । करावीं कथेचीं घमशानें ।**
**अर्थान्तर श्रवणमननें । काढीत जावें ॥ १८ ॥**
**पाठ उदंडचि असावें । सर्वकाळ उजळीत जावें ।**
**सांगितले गोष्टीचें असावें । स्मरण अंतरीं ॥ १९ ॥**
**अखंड एकान्त सेवावा । ग्रंथमात्र धांडोळावा ।**
**प्रचीत येईल तो घ्यावा । अर्थ मनीं ॥ २० ॥ (द० १८ स० ३)**

समर्थांच्या अभ्यासक्रमांत ‘ गायनी विद्ये ’ चें महत्त्व विशेष आहे हें त्यांच्या पदपदान्तरांवरूनही स्पष्ट दिसतें. गायनी विद्येचा उपयोग कीर्तनभजनांत विशेष असतो.

( २ )

**जो एकान्तास तत्पर । आधीं करी पाठान्तर ।**
**अथवा शोधी अर्थान्तर । ग्रंथगर्भींचें ॥ ९ ॥**
**अक्षर सुंदर वाचणें सुंदर । बोलणें सुंदर चालणें सुंदर ।**
**भक्तिज्ञानवैराग्य सुंदर । करून दावी ॥ ११ ॥ (द० ११ स० ६)**

---

§ प्रथम चित्त लागत नसलें तरी, हट्टानें. † खोल, गहन अर्थ मनी आणून. $ अनेक वृत्तांतले, अनेक लक्षणांचे श्लोक, पदें वगैरे गुणगुणत पाठ करावींत. त्या त्या प्रसंगाचें ज्ञान झाल्यानें चित्तास आनंद होतो. दुर्गुण सोडावे, उत्तम गुण अभ्यासावेत, स्वानंद भोगावा हा तर विद्यानंद आहे.

महंतलक्षणाच्या समासांत या ओव्या आहेत. आतांचा पुढारी व तेव्हांचा महंत! समर्थांचा महंत धर्मनीतिन्यायाला व आचारविचारांना संभाळून वागणारा असे. उपासनेसाठीं त्याची विद्या असे. त्याची उठल्यापासून राहणीच वेगळी असे—

(३)

**प्रातःकाळीं उठावें। कांहीं पाठान्तर करावें।**
**यथानुशक्ति आठवावें। सर्वोत्तमासी॥ १५॥**
**मुखमार्जन प्रातःस्नान। संध्यातर्पण देवतार्चन।**
**पुढें वैश्वदेव उपासन। यथासांग॥ १७॥**
**पुढें भोजन जालियावरी। कांहीं वाची चर्चा करी।**
**एकान्तीं जाऊन विवरी। नाना ग्रंथ॥ २२॥**
**कांहीं धर्मचर्चा पुराण। हरिकथानिरूपण।**
**वायां जाऊं नेदी क्षण। दोहींकडे॥ (द० ११ स० ३)**

अशा अभ्यासाच्या महतीच्या दासबोधांत पुष्कळ ओव्या आहेत. 'विद्याभ्यास सोडूं नये। कांहीं केल्या,' विद्याभ्यासकाला, जाणत्याला जगांत मान्यता आहे, महत्त्व आहे. 'अपार असावें पाठान्तर। सन्निधचि असावा विचार'—नुस्ते पोपटपंची पाठान्तर काय कामाचें? जें पाठ करितों तें अर्थ समजून पाठांत ठेवावें. नानाशास्त्रांचे नाना ग्रंथ पहावेत, श्रवणभक्ति-निरूपणांत (द० ४ स० १) ग्रंथवाचन सर्व प्रकारचें असावें, वाचनविषयाला मर्यादा नसावी, असें त्यांनीं म्हटलें आहे. कर्मज्ञानउपासनादि नाना मार्गांचे, पंथांचे, मतांचे ग्रंथ वाचावेत असें सांगितलें आहे. बहुश्रुतपणा अंगीं पाहिजे. 'नाना पिंडांची रचना। नाना भूगोलरचना। नाना सृष्टीची रचना। कैसी ती ऐकावी.' चंद्रसूर्यतारामंडळें यांचें ज्ञान हवें. गायनवादननर्तनादि कलांचें ज्ञान हवें. 'नानावल्ली नाना औषधी'—वैद्यकीचें ज्ञान, ज्योतिषसामुद्रिक शास्त्रांचें ज्ञान पाहिजे.

' चौदा विद्या चौसष्ट कला ' यांपैकीं सर्वांचें थोडथोडें ज्ञान अवश्य पाहिजे. तथापि सारासारविचार मुख्य पाहिजे. सर्व वाचावें व ऐकावें पण आंधळेपणानें वाचूं व ऐकूं नये. सार शोधूनि घ्यावें—' सार असार येकचि करावें। हें मूर्खपण. ' आपल्या प्रचीतीला येईल तो अर्थ घ्यावा.

(४)

**शब्दरत्नें परीक्षावीं । प्रत्ययाचीं पाहोन घ्यावीं ।**
**येर तीं अवघीं सांडावीं । येकीकडे ॥ ३ ॥ (द० १८ स० ५)**

## ४ अभ्यासाला एकान्ताची आवश्यकता

' अखंड एकान्त सेवावा । अभ्यासचि करीत जावा ' म्हणजे आपला काळ सार्थकीं लागतो व जनांचा काळ सार्थकीं लावण्याचें सामर्थ्य अंगीं येतें. प्रपंचपरमार्थाचीं कोडीं एकान्ताशिवाय उलगडत नाहींत. साधकजन ध्यानधारणेचा व ब्रह्मचिंतनाचा अभ्यास पूर्ण एकान्तांत करितात.

**शिष्या ! एकान्तीं बैसावें । स्वरूपीं विश्रांतीस जावें ।**
**तेणें गुणें दृढावे । परमार्थ हा ॥ ( दास० द० ५ स० ६ )**

स्फुट प्रकरणांतही समर्थांनीं ठायीं ठायीं एकान्ताची महती गायिली आहे. ' फार एकान्त सेवावा । अभ्यास नित्य नूतनू. ' एकान्तीं मनन-निदिध्यास फार चांगला होतो, न कळलेल्या गोष्टी कळूं लागतात, न सुचलेले विचार स्फुरतात, वर्तायाची रीत व्यवस्थितपणें ठरून जाते. ' जयास एकान्त मानला। अवघ्यांआधीं कळे त्याला ' ( दास० १८–१० ). एकान्तांत मननानें विचार स्थिर होतात, चित्त सुचित्त होतें. ' न कळतां वाटे कोडें । कळतां आवघें दिसे उघडें । म्हणोनी एकान्तीं निवाडे । विचार पाहावा ' ( दास० २०–७ ). एकान्तांत चाळणा करीत असावें म्हणजे बुद्धियोग प्राप्त होतो, बुद्धियोगानें सर्व कांहीं सुव्यवस्थित होतें. प्रपंचाचा, राजकारणाचा, शास्त्राध्ययनाचा, परमार्थाचा कोणताही अभ्यास असो—

**पाहतां पाहतां जाणे जाणतां जाणतां कळे ।**
**कळतां कळतां शिके शिकतां शिकतां करी ।**
**करितां करितां वाढे वाढतां वाढतां भला ॥**

'**भला**' म्हणवून घ्यायला या क्रमानें गेले पाहिजे. ज्याचा जो व्यापार तो पाहतां पाहतां उमजतो, नंतर तो कळत जातो, कळतां कळतां त्याचें ज्ञान होतें, ज्ञानानें मनुष्य क्रिया करूं लागतो, व अशा तऱ्हेनें त्याचे कर्तव्य-क्षेत्र वाढतें, व कर्तृत्वाच्या योगानें लोक भला म्हणूं लागतात ! 'भला रे भला बोलती तें करावें.' कर्तृत्वाच्या पोटीं भलेपण आहे. उत्कृष्ट कार्यकर्ता असेल त्यालाच 'भला' म्हणतात. हें सारें एकान्तवाससेवन केल्यानें क्रमानें होतें. 'एकान्तेंवीण प्राणियातें । बुद्धि कैंची ?'

**ल्याहावें शुद्ध वाचावें जाणावें तदनंतरें ।**
**जाणतां जाणतां बिंबे बिंबतां स्फूर्ति होतसे ॥**

एकान्त—लिहिणें वाचणें—मननानें जाणणे—जाणण्यानें बिंबणें व नंतर '**स्फूर्ति.**' सांप्रत जो उठतो तो मला '**स्फूर्ति**' झाली असें म्हणतो ! स्फूर्ति ही कांहीं परसांतली मेथीची भाजी नव्हे, कीं ती वाटेल त्याने वाटेल तेव्हां खुडावी ! 'स्फूर्ति ही सीमेची पायरी आहे.' दासबोधांत (द० १९ स० ६) समर्थ सांगतात कीं, 'अखंड तजविजा चाळणा जेथें । पाहतां काय उणें तेथें ?' विवेकांत सांपडत नाहीं असें कांहींच नाहीं ! म्हणून—

**एकान्तीं विवेक करावा । आत्माराम वोळखावा ।**
**येथूनि तेथवरी गोवा । कांहींच नाहीं ! ॥ ३० ॥**

## ५ कोणते ग्रंथ अभ्यासावेत ?

समर्थ ग्रंथ कशाला म्हणतात, अर्थात् कोणत्या ग्रंथांचें अध्ययन करणें कल्याणकारक आहे याचा विचार पाहूं. ज्यांत निश्चयात्मक ज्ञान आहे व ज्यांनीं समाधान होतें असेच ग्रंथ पहावेत. हास्यविनोदाचीं व नवरसात्मक

पुस्तकें परमार्थाच्या उपयोगाचीं नाहींत. जेणें अनुताप चढे, भक्तिसाधन आवडे, जेणें विषयवासना मोडे, जेणे धारिष्ट चढे, जेणें परोपकार घडे—त्या नांव ग्रंथ! जेणें अवगुण पालटती, जेणें चुके अधोगती या नांव ग्रंथ. जेणें नुपजे उपरती विरक्ती भक्ती तो ग्रंथचि नव्हे! दुराशेचीं भूतें चित्तांत उठविणारा ग्रंथ काय कामाचा? जेथें आत्मज्ञान नाहीं ती 'करमणूक' किंवा 'मनोरंजन'! तात्पर्य 'जया स्वहित करणें। तेणें सदा विचरणें। अद्वैतग्रंथीं;' म्हणून 'अद्वैतग्रंथ परमार्थी। श्रवण करावे' (द० ७ स० ९).

## ६ कवित्वाचे चार प्रकार

कवित्वाचे (किंबहुना सर्व गद्यपद्यात्मक ग्रंथांचे) चार प्रकार आहेत, धीट कवि, पाठ कवि, धीट–पाठ कवि आणि प्रासादिक कवि.

(१)

**'जें जें आपुल्या मनासि आलें।**
**बळेंचि कवित्व रचिलें'–ते धीट कवि.**

(२)

**'बहुत पाहिलें ग्रंथान्तर। तयासारखा उतार।**
**आपणहि केला॥' ते पाठ कवि.**

(३)

**सीघ्रचि कवित्व जोडिलें। दृष्टी पडिलें तें वर्णिलें।**
**भक्तीवांचूनि जें केलें। या नांव धीटपाठ॥ १०॥**
**कामिक रसिक शृंगारिक। वीर हास्य प्रस्ताविक।**
**कौतुक विनोद अनेक। या नांव धीटपाठ॥ ११॥**

ह्या तीनही प्रकारचीं काव्यें किंवा ग्रंथ वाचण्यापासून आत्महित निश्चितीनें साधणें शक्य नसल्यामुळें चौथ्या प्रकारचे प्रासादिक ग्रंथ तेवढेच अभ्यासावेत. प्रासादिक ग्रंथ कोणते? 'देवाचेनि प्रसन्नपणें। जें जें

घडे बोलणें। तें तें अत्यंत श्लाघ्यवाणें। या नांव प्रासादिक!' नरस्तुतीनें भरलेले व व्युत्पत्तीच्या बळावर ठाकठिकीनें लिहिलेले ग्रंथ 'धीटपाठ' या सदरांत मोडतात. कवित्वांत खटपट नसावी, पाखांड नसावें, वादांग नसावें, तें कुटिळ–बाष्कळ–हीन नसावें, कलाहीन नसावें, भक्तिज्ञानवैराग्यहीन नसावें–समाधान देणारे व उन्नतिप्रद कवित्व तेवढें अभ्यासावें.

**जया अंतरीं भगवंत। अचळ राहिला निवान्त।**
**तो स्वभावें जें बोलत। तें ब्रह्मनिरूपण ॥ २० ॥**
**तो प्रेमरंगें रंगला। तो भक्तिमदें मातला।**
**तेणें अहंभाव घातला। पायांतळीं ॥ २९ ॥**
**त्याचे भक्तीचें कौतुक। तया नांव प्रासादिक।**
**सहज बोलतां विवेक। प्रगट होय ॥ ३४ ॥**
**जेणें सद्बुद्धि लागे। जेणें पाषांड भंगे।**
**जेणें विवेक जागे। या नांव कवित्व ॥ ५१ ॥** (द० १४ स० ३)

ज्यांच्या वाणींत प्रसाद नाहीं त्यांनीं कवितेचे डोंगर उभे करण्याच्या भानगडींत पडूं नये. उगाच कविता रचण्याचें वेड लागलेले कविब्रुव कांहीं थोडे नसतात! 'विडी', 'केरसुणी' असल्या विषयावर कविता रचणारे कवि आम्ही पाहिले आहेत!

**कविता गवताऐसी उदंड वाढली असे।**
**असेना दिसेना अर्थु–व्यर्थ व्यर्थचि स्वार्थ तो ॥**

त्यांत कांहीं अर्थ असतच नाहीं मग दिसणार कोठून? व्यर्थ खटाटोप कशाला हवा? नाशवंत पदार्थांवर कविता करूं नको, अविनाशी–पंचभूतातीत–मूळ तत्त्व शोधून काढा व त्याचा आनंद स्वतः चाखून जगास द्या अशी समर्थांची कवींस शिकवण आहे. उत्तम कविता लोकांचें मन वेधतेच. कवित्व जाड म्ह० अर्थभरित, मनोहर असावें.

**पदीं प्रबंध साजिरे। रसाळ शब्द गोजिरे।**
**तयामधें मनू भरे। प्रचंड अर्थ वीवरे ॥**

चतुर कवींना समर्थ सांगतात—

**उपाय तो अपाय रे । भूतें भजोन काय रे ।**
**भजा अनंत व्यापका । चतुर हो ! चळों नका ॥**
**भूतें समस्त वाव रे । प्रकृतिंचा स्वभाव रे ।**
**अनंत संत वोळखा । मुळाकडे चुकों नका ॥**

भूतांत पडणाऱ्या विषयांवर कवित्व करूं नका, भूतें मायिक आहेत, तीं प्रकृतीचीं कार्यें आहेत. अनंत, शाश्वत व विश्वाचें मूळ जें परमात्मरूप—तेथींची गोडी चाखून ती जगाला देण्यासाठीं कवित्व करा. आधिभौतिक शास्त्रे पाहिलींत तरी त्यांतून परमात्मतत्त्व शोधून घ्या. ' शास्त्रें पुराणें वेद श्रुती । अखंड जयेचें स्तवन करिती । नानारूपीं जयेस भजती । प्राणिमात्र ' त्या शारदेच्या स्वरूपास ओळखून जे गद्यपद्यरचना करितात त्यांचीच वाणी जगदुद्धारास कारण होते. ' शब्दसृष्टीचे ईश्वर, सरस्वतीचें निजस्थान, शब्दरत्नांचे सागर, बोलके चिंतामणि, साधकांचें साधन, सिद्धांचें समाधान, स्वधर्माचा आश्रय, मनाचा मनोजय, ' इ० प्रकारे समर्थांनीं खऱ्या कवीश्वरांचें गौरव केले आहे व वाल्मीकिव्यासादिकांचीं उदाहरणें दिलीं आहेत. ' परोपकाराकारणें । नाना निश्चय अनुवादणें ' हें चांगले कवीच करूं शकतात. ते ' सकळ जनांना विवेक देतात '—विकारांचीं भूतें उठवीत नाहींत ! ते ' स्वधर्मसंरक्षण करितात--धर्माची टवाळी करीत नाहींत ! ' नस्ता कवींचा व्यापार । तरी कैचा अस्ता जगदुद्धार । म्हणोनी कवि हे आधार । सकळ सृष्टीसी ' हा उत्तम कवींचा अधिकार आहे. कवि हे समाजधारण करणारे विवेकी पुरुष.

**कवि हे अमृताचे मेघ वोळले । कीं हे नवरसांचे वोघ लोटले ।**
**नाना सुखाचें उचंबळलें । सरोवर हें ॥ २८ ॥**
**हीं सुखाचीं तारुवें लोटलीं । आक्षै आनंदें उतटलीं ।**
**विश्वजनास उपेगा आलीं । नाना प्रयोगांकारणें ॥ ३१ ॥**

## ७ श्रवण उर्फ वाचन

समर्थांचा श्रवण उर्फ निरूपण यावर फार कटाक्ष आहे. देव सगुण निर्गुण उभयरूप असल्यामुळें रामकृष्णादि सगुणरूपाच्या चरित्रश्रवणानें भक्तिभावाचें उद्दीपन होतें व अध्यात्मश्रवणाने ज्ञानबोध होतो म्हणून 'हरिकथापुराणश्रवण व अध्यात्मनिरूपण' या दोहींचा अंतर्भाव समर्थांनीं श्रवणभक्तींत केला आहे. श्रवणांत समर्थांनीं अत्यंत व्यापकपणानें 'चौदा विद्या चौसष्ट कला' यांचा अंतर्भाव केला आहे. श्रवणांतून समर्थांनीं कोणताही विषय वगळला नाहीं. 'अवघेंचि ऐकावें। परंतु सार शोधून घ्यावें.' दासबोधांत श्रोतेस्तवन (द० १ स० ६) श्रवणभक्ति (द० ४ स० १), श्रवणनिरूपण (द० ७ स० ८।९ व द० १७ स० ३), श्रोते अवलक्षण (द० १८ स० १०), श्रोता (द० ७ स० १) इत्यादि समास समग्र पाहिले म्हणजे श्रवण कसें करावें हें पूर्णतया ध्यानांत येतें—वाचावें, पाहावें सर्व पण अभ्यासावें अध्यात्म! 'नानाशास्त्रें धांडोळावीं' पण 'निश्चयाकारणें' (२—४—८). निश्चयात्मक ज्ञान पाहिजे. ग्रंथाध्ययनाने संशयच वाढत गेले तर त्याचा स्वतःस किंवा इतरांस कांहीं उपयोग नाहीं. 'संशयात्मा विनश्यति' असें देव गीतेंत बोलले आहेत. 'संदेहरहित ज्ञान। निश्चयाचें समाधान' हेंच कृतार्थतेचें गमक आहे. निश्चय म्हणजे मुख्य देवाचा--आत्मत्वाचा--निश्चय. आत्मनिश्चय हेंच समाधानाचें रहस्य आहे. आत्मसमाधान मोडेल असे ग्रंथ हातीं धरूं नयेत व संशयात्म्यांचें वक्तृत्वही ऐकूं नये! 'येक्या ग्रंथें निश्चय केला। तो दुजयानें उडविला। तेणें संशयोचि वाढला। जन्मवरी!' म्हणून आत्मनिश्चय सांगणाऱ्या अद्वैतग्रंथांशिवाय इतर ग्रंथ दूरच ठेवलेले बरे! 'काहण्या कथा गोष्टी पवाड। नाना अवतारचरित्रें वाड। त्या समस्तांमध्यें जाड। अध्यात्मविद्या', कां कीं येथें अनुमानाचें कार्य नाहीं, हे प्रचीतीचें काम आहे (द० १७—३). निवडक ग्रंथ ऐकावेत व

वाचावेत. सर्वच ग्रंथ वाचण्यापासून कांहीं लाभ नाहीं, केवळ वाचेचा तो शीण आहे. सर्वसामान्य विषयांचें सामान्य ज्ञान असल्यानें बहुश्रुतपणा येतो. मुख्य मुख्य विषयांचे सिद्धान्त अवगत करून घ्यावे पण सर्व भर आपला व समाजाचा उद्धार करणारी जी अध्यात्मविद्या त्या विद्येवर असावा. वाचावें थोडें पण मनन करावें फार. श्रवण किंवा वाचन मननावांचून व्यर्थ होतें. 'श्रवणअभ्यासें पाविजे ब्रह्म' (दास० ७—१) असें झालें तरच तें श्रवण. निश्चयात्मक ज्ञान देणाऱ्या निवडक ग्रंथांचें श्रवण मनन पुनःपुन्हा करावें. आत्मनिश्चय दृढ होण्यासाठीं सतत असा अभ्यास ठेवावा. अर्थरूप व्हावें, मनोजय साधावा व मग लोकांस शिकवावें.

**अर्थ सर्वत्र शोधावा । रोधावा आपुला मनु ।**
**लोक सर्व बोधावा । यथातथ्य प्रचीतिनें ॥**

आपलें पोट भरल्यावर वाढावें, 'तैसें ज्ञानें तृप्त व्हावें । तेंचि ज्ञान जगास सांगावें । शाहाणे करूनि सोडावें । सकल जन.'

(१)

**अरे हें पाहिलेंचि पाहावें । विवरलेंचि मागुती विवरावें ।**
**वाचिलेंचि वाचावें । पुनः पुन्हा ॥ द० ११—८—९**

(२)

**मनाच्या तोडून ओढी । श्रवणीं बैसावें आवडी ।**
**दुश्चितपण आलें तरी । पुन्हा श्रवण करावें ॥ द० ८—१—६**

(३)

**अखंड एकान्त सेवावा । ग्रंथमात्र धांडोळावा ।**
**प्रचीत येईल तो घ्यावा । अर्थ मनीं ॥ द० १८—३—२०**

(४)

**उदंडांचें उदंड ऐकावें । परी तें प्रत्ययें पाहावें ।**
**खरें खोटें निवडावें । अंतर्यामीं ॥ द० १५—६—११**

( ५ )

**याकारणें अद्वैतग्रंथ । अध्यात्मविद्येचा परमार्थ ।**
**पहावया तोचि समर्थ । जो सर्वांगें श्रोता ॥ द. ७०१–२८**

( ६ )

**सेविलेंचि सेवावें अन्न । घेतलेंचि घ्यावें जीवन ।**
**तैसें हें श्रवणमनन । केलेंचि करावें ॥**

( ७ )

**जो एकान्तास तत्पर । आधीं करी पाठान्तर ।**
**अथवा शोधी अर्थान्तर । ग्रंथगर्भींचें ॥ ११–६–९**

श्रवणभक्ति करणारा जो मुमुक्षु त्याला हीं सूत्रें किती मार्गदर्शक आहेत! एकान्त पाहिजे, ग्रंथावलोकनाचा व अर्थान्तर शोधण्याचा म्ह० मननाचा छंद पाहिजे, पाठान्तर पाहिजे, आपल्या प्रत्ययानें अर्थ मनीं ठसवून घेण्याचा निरंतर अभ्यास पाहिजे, आणि हे सारें आत्मनिश्चयासाठीं, आत्मोद्धारासाठीं पाहिजे. 'अपार असावें पाठान्तर । सन्निधचि असावा विचार' (द. ११–५–१५). 'विभक्ति सांडून भक्तीचें मूळ शोधावें' यासाठीं हा सारा अभ्यास असला पाहिजे–विभक्ति (वेगळेपण) सोडून भक्तीचें (तादात्म्यतेचें) मूळ शोधले पाहिजे. आपलें पोट भरल्यावर मग तेंच ज्ञान जगास सांगावें व लोक शाहाणे करावे.

समर्थांनीं शिकविलेल्या अभ्यासक्रमाचें स्वरूप आपण येथवर पाहिलें. आतां त्यांनीं स्वतः कोणकोणत्या ग्रंथांचें अध्ययन केलें हें आपण त्यांनांच विचारूं व त्यांच्या ग्रंथांत याबद्दल कांहीं अंतःप्रमाणें मिळतात कीं काय तें पाहूं. या विषयाचा विस्तृत ऊहापोह करण्यापूर्वी समर्थांनीं उल्लेखिलेले व न उल्लेखिलेले सर्व ग्रंथ बारकाईनें पाहिले पाहिजेत. मला तितकी सवड नसल्यामुळें मी शलाकापरीक्षान्यायानें येथें संक्षेपानें याचा विचार करितों.

## ८ संस्कृत ग्रंथ

दासबोधांत समर्थ आरंभींच म्हणतात —

**नाना ग्रंथांच्या संमती । उपनिषदें वेदार्थ श्रुती ।**
**आणि मुख्य आत्मप्रचीती । शास्त्रेंसहित ॥ १५ ॥**

'मी आपल्या ग्रंथाला वेदवेदान्तादि अनेक ग्रंथांच्या संमति घेतल्या आहेत, शास्त्रांच्या सिद्धान्ताचे आधार घेतले आहेत, पण मुख्यतः आत्मप्रचीतीचा हा माझा ग्रंथ आहे. यांतील प्रतिपादन शास्त्रग्रंथांच्या व भगवद्वचनांच्या आधारें केलें आहे. हें परंपरेचें ज्ञान आहे.' समर्थादि पूर्वील संतकवींचा संप्रदाय असाच आहे! त्यांचें बोलणें अनुभवाचें असतेंच पण परंपरा व त्यांचा प्रत्यय यांत भेदच नसतो.

**शिवगीता रामगीता । गुरुगीता गर्भगीता ।**
**उत्तरगीता अवधूतगीता । वेद आणि वेदान्त ॥ १८ ॥**
**भगवद्गीता ब्रह्मगीता । हंसगीता पांडवगीता ।**
**गणेशगीता यमगीता । उपनिषदें भागवत ॥ १९ ॥**

उपनिषदें समर्थांनीं पचविलींच होतीं. शिवगीता, गुरुगीता, अवधूतगीता इत्यादि गीतांचे आधार त्यांनीं अनेक ठिकाणीं घेतले आहेत.

दशक ७ स० ७ मध्येंही गुरुगीता, अवधूतगीता व हंसगीता यांचे उल्लेख केले आहेत —' अद्वैतज्ञानाचा उपदेश । गुरुगीता तो महेश । सांगता होय पार्वतीश । पार्वतीप्रती ॥ अवधूतगीता केली । ते गोरक्षीस उपदेशिली.' तसेंच 'विष्णु होऊनि राजहंस । विधीस केला उपदेश । ते हंसगीता जगदीश । बोलिला स्वमुखें.' ब्रह्मदेवानें नारदाला 'चतुःश्लोकी भागवत' सांगितलें तें पुढें 'व्यासमुखें बहुत विस्तारलें' म्हणजे चतुःश्लोकीचा विस्तार तोच भागवतग्रंथ होय. वसिष्ठऋषीनें रामास 'वसिष्ठसार' ग्रंथ सांगितला. ह्या ग्रंथांतून प्रतिपादिलेलें 'अद्वैतज्ञान आदिअंतीं । सत्यचि असे.' वेदशास्त्रांनीं व व्यासवसिष्ठादि ऋषींनीं जे ज्ञानाचे उपाय

सांगितले आहेत ते निःसंशय सत्यच आहेत. हें आत्मज्ञान मिथ्या आहे असें म्हणणारे पतित होत! 'आपणास नुमजे बरवें' म्हणून त्याला काय मिथ्या म्हणावें? आपणांस कळत नाहीं असें फार तर म्हणावें! 'विद्याअभ्याससारिणी' आहे म्हणून श्रवणनिरूपणाचा अभ्यास सतत ठेवावा. पुढें सद्गुरुकृपेनें आत्मज्ञानाचा अनुभव होतो. मनाच्या श्लोकांत समर्थांनीं म्हटले आहे कीं, 'श्रुति न्याय मीमांसकें तर्कशास्त्रें। स्मृती वेदवेदांत वाक्यें विचित्रें'—यांना वास्तविक स्वरूपस्थिति सांगतां येत नाहीं ती सद्गुरु-कृपेनेंच अनुभविली पाहिजे. पण तत्पूर्वी परोक्षज्ञान अवश्यच आहे. 'महावाक्य तत्त्वादिकें पंचिकर्णें' म्ह० महावाक्योपदेश, तत्त्वज्ञान, पंचीकरण यांचें संतमुखानें श्रवण झालें पाहिजे, अर्थात् शाखाचंद्रन्यायानें खूण ज्याची त्यानेंच पावायची आहे.

## ९ उपनिषदें

उपनिषदांतील पुष्कळच सिद्धान्त समर्थांच्या ग्रंथांत वेळोवेळीं येऊन गेले आहेत. ब्रह्म मला समजलें असें जो म्हणतो त्याला तें समजलेलें नसते —

**यस्यामतं तस्य मतं मतं यस्य न वेद सः॥ केन० २-११**

याचा अनुवाद ज्ञानेश्वरांनीं 'जो मी जाहलों म्हणे। तो कांहींच नेणें' असा केला आहे व समर्थांनीं 'म्हणे जाणता तो मनीं मूर्ख पाहें' असें म्हटलें आहे. याचेंच स्पष्टीकरण समर्थांनीं एका श्लोकार्धांत नामी केलें आहे.

**चोरूनि जागे हृदयीं अहंता। कळे म्हणे त्या न कळेचि भ्रांता॥**

'त्रयस्त्रिंशद्वै देवाः अष्टौ वसवः एकादश रुद्राः द्वादशादित्याः'—

**जगीं द्वादशादित्य ते रुद्र अक्रा।—(मनोबोध १७९)**

'एकमेवाद्वितीयं ब्रह्म' म्हणजेच 'दुजेवीण जो तोचि तो हा स्वभावें.'

‘ यद्दृष्टं तन्नष्टं ’–तें हें दृश्य नाशवंत । ऐसें वेदश्रुति बोलत
( दा० ६–२–१५).

‘अहं ब्रह्मास्मि’ ( बृहदारण्य १–४–१० )–‘ अहं ब्रह्मास्मि महावाक्य । येथींचा अर्थ अतर्क्य ’ ( दास० ५–६–४४ ).

## १० वाल्मीकिरामायण

वाल्मीकिरामायण हा समर्थांच्या उपासनेचा मुख्य ग्रंथ होय. तेव्हां वाल्मीकींविषयीं व त्यांच्या रामायणाविषयीं समर्थांचा निरतिशय प्रेमा असावा हें अगदीं साहजिक आहे. दासबोधाच्या सोळाव्या दशकाचा पहिलाच समास वाल्मीकिस्तवनपर आहे. ‘ भविष्य आणि शतकोटी । हें तों नाहीं देखिलें दृष्टीं,’ ‘ नसतां रघुनाथ अवतार । नाहीं पाहिला शास्त्राधार । रामकथेचा विस्तार । विस्तारिला जेणें ’ हें पाहिलें म्हणजे ‘ वाल्मीका-सारिखा कवीश्वर । न भूतो न भविष्यति. ’ पूर्वीं त्यानें दुष्टकर्में केलीं होतीं, पण तो रामनामानें उद्धार पावला. ‘ पूर्वीं होता वाल्हाकोळी । जीवघातकी भूमंडळीं, ’ पण रामनामापुढें पाप उरेल कोठून ? ‘ उपरति आणि अनुताप । तेथें कैंचें उरेल पाप ? । देहान्ततपें पुण्यरूप । दुसरा जन्म जाला ॥ अनुतापें आसन घातलें । देहाचें वारुळ जालें । तेंचि नाम पुढें पडिलें । वाल्मीक ऐसें ’ असो. हा ऋषींत श्रेष्ठ असा वाल्मीकि ‘ समर्थांचा कवीश्वर ’ आहे म्ह० रामचरित्राचा गायक आहे. तो नसता तर ‘ आम्हांस कैंची रामकथा ? ’ वाल्मीकीनें लाखों रामभक्तांचा उद्धार केला आहे. समर्थांनीं आपल्या रामायणांतही वाल्मीकीची व रामकथेची अशीच स्तुति केली आहे.

## ११ गीता आणि भागवत

पूर्वीच्या संतांप्रमाणें समर्थांचाही मुख्य भर उपनिषदें, गीता आणि भागवत ह्यांवरच आहे. उपनिषदांतील अद्वैतसिद्धान्त त्यांनीं आत्मसात्

केला असून गीता–भागवतांचा उपासनाग्रंथ म्हणून अंगीकार केला आहे. भगवद्गीतेतील वचनें त्यांच्या ग्रंथांतून शतशः आलेलीं आहेत. 'इन्द्रियाणां मनश्चास्मि', 'द्वाविमौ पुरुषौ लोके', 'जीवभूतः सनातनः', 'ददामि बुद्धियोगं तं', 'दंभो दर्पोभिमानश्च', 'उर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्थाः', 'ये यथा मां प्रपद्यन्ते', 'न हि ज्ञानेन सदृशं', 'अश्वत्थः सर्ववृक्षाणां', 'अध्यात्मविद्या विद्यानां', 'आत्मैव ह्यात्मनो बंधुः', 'नैनं छिन्दन्ति शस्त्राणि', 'सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज', 'एकांशेन स्थितो जगत्'—( येकांशें जग चाले। परी सामर्थ्य वेगळालें। येकासंगें मुक्त केले। येकासंगें रौरव ॥ १० ॥ द० १३-१० ) इत्यादि शेंकडों गीतावचनें समर्थांच्या ग्रंथांत इतस्ततः विखुरलेलीं आहेत, त्यांचा त्यांनीं विषयस्पष्टीकरणार्थ उपयोग करून घेतला आहे व कोठें कोठे तर त्यांचा भावार्थही चांगला विशद करून दाखविला आहे. 'देवान् देवयजो यान्ति....यान्ति मद्याजिनोपि माम्' ह्या गीताश्लोकाचा भावार्थ समर्थांनीं पुढील दोन ओव्यांत बहारीनें सांगितला आहे—

> **देवांस भजतां देवलोक। पितरांस भजतां पितृलोक।**
> **भूतांस भजतां भूतलोक। पाविजेतो** ॥ १० ॥
> **जेणें जयास भजावें। तेणें त्या लोकासी जावें।**
> **निर्गुणीं भजतां व्हावें। निर्गुणचि स्वयें** ॥ ११ ॥ (द० ९, स० १०)

भागवतावरही त्यांचें अतुल प्रेम होतें. भागवताला त्यांनीं 'पावन करणारें सच्छास्त्र' असे स्पष्ट म्हटले असून त्यांतील प्रल्हादमुखानें 'श्रवणं कीर्तनं' ह्या नवविधाभक्तीचा ( स्कंध ७, अ० ५ ) जगाला मिळालेला संदेश दासबोधाच्या संपूर्ण चौथ्या दशकांत विशद करून दाखविला आहे. ह्या नवविधाभक्तीवर समर्थांनीं स्फुट कवितेंतही दहावीस ठिकाणीं पूर्ण भर दिला आहे. नवविधाभक्तीनें सद्गुरुभजन कसें करावें हें ज्ञानेश्वरांनीं उत्कृष्ट प्रकारें दाखवून दिलें आहे. ( ज्ञानेश्वरी अ० १३ ).

'तुका म्हणे नवविध । भक्ति जाणे तोचि शुद्ध.' तात्पर्य भागवतानें इतरांप्रमाणें समर्थांनाही नवविधाभक्तीचा राजमार्ग शिकविला आहे. 'नृदेहमाद्यं सुलभं सुदुर्लभं', 'भक्त्याहमेकया ग्राह्यः', 'बद्धोमुक्त इति व्याख्या', 'कविर्हरिरंतरिक्षः' इत्यादि भागवतांतील प्रसिद्ध वचनांचाही अनुवाद समर्थांनीं आपल्या ग्रंथांतून जागोजाग केला आहे. गीता आणि भागवत हे ग्रंथ समर्थांचेही आवडते आहेत.

'पंचीकरणादि अभंगांत' ते म्हणतात—

**गीताभागवतीं उपदेश केला । अर्जुना दाविला देव कृष्णें ॥ १ ॥**
**कृष्णें दाखविला देव तो वेगळा । बोलिजे आगळा सर्वांहूनी ॥ २ ॥**
**सर्वांहूनि सार देव तो साचार । दास म्हणे पार कल्पनेच्या ॥ ३ ॥**

तिसऱ्या ओव्याशतकांत ते म्हणतात—

**संतसंग धरी धन्य तो संसारीं । बोलिले श्रीहरी भागवतीं ॥**
**भागवतगीतासार निरूपण । त्याचें विवरण संतसंगें ॥**

गीताभागवतादि सच्छास्त्रग्रंथांचें निरूपणश्रवण संतमुखानें ऐकावें.

## १२ मुख्यतः गुरुकृपा व उपासनाभक्तिप्रेम पाहिजे

समर्थ सांगतात कीं, जगांत कोट्यानुकोटी ग्रंथ आहेत, 'किती संस्कृतें देशभाषा मऱ्हाटी'—संस्कृतांत, अनेक देशी भाषांत, तसेच मराठींत लाखों ग्रंथ आहेत. हे सर्व एका पंडिताला वाचतां येणार नाहींत व वाचून तरी काय उपयोग? निश्चयाचें ज्ञान नसेल तर बहुभाषाकोविदत्व किंवा बहुश्रुतत्व कांहीं मनुष्याच्या उद्धाराला उपयोगीं पडत नाहीं. कित्येक ग्रंथांत 'गपागोवी' म्ह० विचारांचा गोंधळ असतो, त्यामुळें वाचकाचा निश्चय होत नाहीं. साधकाला त्यांत काय सांपडणार? 'खरा देव तो मुख्य ठायीं पडेना' आणि संशय सरेना. नानापरींचीं पुराणे व शेंकडों ग्रंथ आहेत ते मतान्तरें व अभिमान मात्र वाढवितात. असो; प्रत्ययाचें

ब्रह्मज्ञान सांगेल व निश्चयात्मक ज्ञान देईल तोच ग्रंथ वाचावा, व अशाच गुरूला शरण जावें. गुरु शिष्याला देहातीताचा विचार सांगत आहे आणि शिष्य गुरूला मनुष्यबुद्धीनें पाहत आहे तेथें ज्ञान कसचें?—चळेना, ढळेना अशा परब्रह्माचें ज्ञान झालें तरच तें ज्ञान. संशय तुटे व निश्चय जडे तें ज्ञान.

**म्हणे दास वीचार आधीं पहावा। बरा निश्चयो शाश्वताचा करावा॥**

शाश्वत एक परब्रह्म आहे आणि त्या अद्वैताची वोळखण ज्या ग्रंथांत आहे तोच ग्रंथ पहावा आणि त्यांतून आपण प्रत्ययाचें ज्ञान घ्यावें. आत्मप्रत्यया-वांचून समाधानसुख होत नाहीं आणि प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान सगुणोपासने-शिवाय होत नाहीं —

**अनेक शास्त्रीं पाहतां पडेना। आयुष्य थोडें पाहणें घडेना॥**
**विश्वास येके वचनीं धरावा। संसार हा दुस्तर नीरसावा॥**

केवळ चर्चेनें किंवा वादानें किंवा ग्रंथाध्ययनानेंही अद्वैतबोध होत नाहीं. त्याला गुरूकृपाच पाहिजे. 'आधीं अध्यात्मश्रवण। मग सद्गुरुपाद-सेवन। पुढें आत्मनिवेदन। सद्गुरुप्रसादें॥ आत्मनिवेदनाउपरी। निखळ वस्तु निरंतरी। अहमात्मा हा अंतरीं। बोध आला' (दास० ६—३). सद्गुरुविण न घडे स्वहित, सद्गुरुविण मोक्ष नाहीं, सत्संगाविण तरणोपाय नाहीं, हा परंपरेचा सिद्धान्त समर्थांनींही शतशः सांगितला आहे. 'अंतरीं शुद्ध ब्रह्मज्ञान। बाह्य निष्ठेचें भजन' हें सद्गुरुलक्षण आहे. सतरा नाहीं, सताराशें गुरु केले तरी सद्गुरु वेगळाच आहे. 'ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान। पाहावें आपणासि आपण' ही दृष्टि सद्गुरुकृपेनेंच मिळते. सद्गुरूपाशीं निर्गुण व सगुण, ज्ञान व भक्ति हीं एकरूप असतात. ते स्वधर्म, नीतिन्याय, उपासना—भक्ति हाच आचारमार्ग सांगतात व यांत पूर्णता दिसली कीं कृतार्थ करितात. अद्वैत गुरुगम्य आहे म्हणून गुरूला शरण

जावें व गुरुभक्तीनें देव आकळावा असें सांगतात. 'एक गुरु एक देव। कोठें तरी असावा सद्भाव.' विश्वासावांचून ज्ञान फलदायी होत नाहीं.

'वाणी शुद्ध करीं नामीं। चित्त शुद्ध होय प्रेमीं'—वाणी नामघोषानें व चित्त प्रेमानें शुद्ध होतें. कर्ण कीर्तनश्रवणानें, मस्तक चरणांबुजनमनानें, त्वचा चरणरजानें, कर पूजनानें, पाद मंदिरीं जाण्यानें, प्राण निर्माल्य हुंगण्यानें, बुद्धि रामचरणीं रमल्यानें शुद्ध होते—'रामपायीं राहतां बुद्धी। रामदासा सकळ शुद्धी.' भक्ताचा शुद्धिकरणविधि असा आहे. हा शुद्धीचा मार्ग सर्वांसच मोकळा आहे!

**'भावभक्तीवीण उद्धरला कोण ?।**
**यालागीं सगुण भक्तिभाव ॥**

सकळ आगमनिगमांचें सार—'भजनरहित ज्ञानें मोक्ष होणार नाहीं' हेंच समर्थांनीं सांगितलें आहे. आत्मनिवेदनी भक्ति नसेल तर दिव्यासवें काजळी तसा ज्ञानाबरोबर जाणिवेचा फुंज असतो. ज्ञानापेक्षांही भक्तीची महति अधिक आहे. समर्थ स्वानुभव सांगतात —

**भेटी देईना जनांसी। पाठी लागे सज्जनासी ॥**
**ऐसें प्रीतीचें लक्षण। भेटीविण नाहीं क्षण ॥**

* * * *

**देव अभक्तां चोरला। आम्हां भक्तां सांपडला ॥**
**रामदासाचें अंतर। देवापाशीं निरंतर ॥**

हीच भक्ति, हेंच ज्ञान व हीच सद्गुरुकृपा! भक्तिज्ञानावांचून मनुष्यप्राणी निर्नासिक (नकटा) होय! कथानिरूपण नाहीं तर कान असून बहिरा! 'नाहीं देवाचें वर्णन' तो मुका! देवदर्शन नाहीं तर अंध! देवाच्या व जनीजनार्दनाच्या सेवेंत हात राबविले नाहींत तर थोटा! तीर्थाटण नाहीं तर पांगळा! सर्वेन्द्रियें हरिसेवेस लावलीं तरच जिवंत, नाहींतर मेलेला!

## १३ मराठी भाषेचें महत्त्व

मराठी ग्रंथ व मराठी भाषा यांच्यासंबंधानें समर्थ म्हणतात — 'मराठींत आहे काय? शहाण्यांनीं मराठी ग्रंथ पाहूं नयेत,' असें म्हणणारे जे कोणी § आहेत त्यांचें म्हणणें मनावर घेऊं नये. अहो! भाषेकडे पाहायचें कां अर्थाकडे पाहायचें? बहुमोल रत्नें लोखंडाच्या पेटींत सांठविलीं आहेत म्हणून पेटीकडे पाहून शाहणा मनुष्य रत्नें टाकील काय? पूर्ण अर्थ मराठींतून लाभतो तेव्हां मंदबुद्धीशिवाय मराठीची हेळणा कोण करील? द्रव्य घ्यावें, सांठवणाकडे पाहूं नये.

**तैसें प्राकृतीं अद्वैत । सुगम आणि सप्रचीत ।**
**अध्यात्म लाभे अकस्मात । तरी अवश्य घ्यावें ॥**

प्राकृत ग्रंथांत सुगम आणि सप्रचीत अध्यात्मज्ञान मिळतें, व्युत्पत्तीचे श्रम न करितां सकलशास्त्रार्थ सुगम होतो, व संतांच्या मुखानें हा महल्लाभ होतो म्हणून मराठी ग्रंथांचा आदर अवश्य करावा. व्युत्पत्तीनें न कळणारें ज्ञान सन्मुखानें अनायासें कळतें. भाषेंत पालट झाला, भाषा भिन्न झाली, म्हणून कांहीं 'अर्थ वायां जात नाहीं,' कार्यसिद्धि तर सारी अर्थापाशींच आहे. 'अर्थ सार, भाषा पोंचट' म्हणजे अर्थ हा दाणा आहे, व भाषा हें बाहेरचें टरफल आहे. 'प्राकृताकरितां । संस्कृताची सार्थकता;' संस्कृतांत जो गुप्तार्थ आहे तो प्राकृतांत आल्यामुळें लोकांच्या उपयोगीं पडतो, नाहींतर तो कळायचा आहे कोणाला? ज्या अध्यात्मांत अनुभवाचा जिव्हाळा आहे तें मराठींत आल्याने संस्कृतापरीसही मोलवान् ठरतें. ज्ञानभोजनाची चाड असेल तर शब्दांत गुंतूं नका. 'आज्य' म्हटलें काय नी 'तूप' म्हटलें काय कांहीं फरक कां होतो? अर्थाकडे दृष्टि ठेवून ब्रह्मानुभव घ्यावा.

---

§ तेव्हांचे शास्त्रीपंडित व अलीकडचे इंग्रजी विद्वान्!

**जेथें निरूपणाचे बोल । आणि अनुभवाची वोल ।**
**तें संस्कृतापरीस सखोल । अध्यात्मश्रवण ॥ (द० ७, स० १.)**

## १४ भक्तांची नामावळी

'समर्थकृत भक्तांची आरती' पाहावी म्हणजे प्राचीन भक्तांविषयीं समर्थांचा केवढा आदर व प्रेमा होता हें दिसून येतें. 'भक्तांची एक आरती केली कीं वनमाळीच्या (देवाच्या) सहस्र आरत्या केल्यासारखें होतें' असें येथें समर्थांनीं म्हटलें आहे. ह्या आरतींत इतर संतांप्रमाणें पौराणिक व पूर्वीं होऊन गेलेल्या अशा सुमारें १०० भक्तांची नामावळी समर्थांनीं दिली आहे व त्यांत महाराष्ट्रीय (व भारतीयही) भक्तांचीं नांवें आलीं आहेत. पौराणिक भक्तांचीं नांवें मनोबोधांत व इतरत्र आलेलीं आहेत, पण मराठी संतांचीं नुस्तीं नांवेंही या आरतीशिवाय समर्थांनीं कोठेंही दिलीं नाहींत! या ६१ संतकवींच्या नांवांत ज्ञानेश्वरपंचक आहे; विसोबा खेचर आहेत; तुलसीदास, मीराबाई व सूरदास आहेत; बहिरा पिसा व विठा रेणुकानंदन आहेत; जनजसवंत, पाठक, मुद्गल, केशवदास चांगा, माधवदास आहेत; 'एकोजनार्दन' आहेत. यांतील १५।२० नांवें समर्थांच्या वेळीं ज्ञात असलीं तरी आज अज्ञात आहेत. ज्ञानेश्वरकालीन व नाथकालीन बहुतेक संतांचीं नांवे आहेत. समर्थांना सहज सुचलीं तीं नांवे या आरतींत आलीं आहेत. मुकुंदराज, त्र्यंबकराज व दासोपंत यांचे ग्रंथ समर्थांनीं पाहिल्याचीं स्पष्ट प्रमाणे दाखवितां येतात, पण त्यांचा नामोल्लेख समर्थांनीं केला नाहीं याचें जरा नवल वाटतें! ह्या आरतीचें ध्रुवपद फार गोड आहे.

**जयजयजय आरती भक्त सुखमूर्ती ।**
**प्रेमभावें अव्यक्त आणियेलें व्यक्ती ॥**
**वैराग्यभास्कर सहज निजशांति ।**
**ज्ञानघन पूर्ण स्वयंबोधस्थिति ॥ ध्रु० ॥**

## १५ चमत्कारांवर समर्थांचा विश्वास होता काय ?

( १ ) 'जनस्वभाव गोसावी' म्हणून समर्थांचें एक छोटेंसें (७० ओव्यांचें) प्रकरण आहे, त्यांत साधुसंतांनीं केलेल्या चमत्कारांवर अविश्वास प्रगट झाल्याचा भास होणारा आहे, पण तें नीट पाहिलें म्हणजे 'प्रचीतीविण ज्ञान' बोलणाऱ्या व गुरूची खरी योग्यता न जाणतां त्याच्या चमत्कारांचाच बडेजाव करणाऱ्या अनधिकारी शिष्यांची समर्थांनीं येथें कानउघाडणी केली आहे असें स्पष्ट दिसतें. त्यांत 'अचेतन चालविती। रेड्याकरवीं वेद म्हणविती,' यांत ज्ञानेश्वरांचा उल्लेख आहे. 'व्याघ्रावरी निःशंक । हातीं सर्पाचा चाबूक । वांचले होते सहस्र एक। सामर्थ्यबळें' ओवी ही चांगदेवांविषयीं आहे. वांझेचे वांझपण फेडणें, मेलेले प्राणी उठवणें, वाळलीं काष्ठें हिरवळणें, आंधळ्यास डोळे येणे, नवस पुरवणें, अग्नीमध्यें न जळणें, समुद्रावरी चालत जाणें, व्याघ्र घरास आणणें, पाण्याच्या घागरीचें तूप करणे, मद्यमांसाचीं फुलें करणे, वाळवंटांत पुरून राहणें इ० अनेक अलौकिक चमत्कारांवर अश्रद्धा उत्पन्न होण्यासारखें हें प्रकरण दिसतें. तथापि गुरूंच्या नुस्त्या अलौकिक गोष्टी सांगून कोणी उद्धरत नाहीं--'येणें सार्थक नव्हे कीं । अध्यात्मविद्या विवेकीं। जाणिजेते' एवढेंच सांगण्याचा समर्थांचा येथें हेतु आहे.

दासबोधांत (द० १० स०१०) नरदेहस्तवनाच्या ओव्यांत 'संतमहंत ऋषिमुनी। सिद्ध साधु समाधानी । भक्त मुक्त ब्रह्मज्ञानी । विरक्त योगी तपस्वी॥ तत्त्वज्ञानी योगाभ्यासी' असे लक्षावधि सिद्ध होऊन गेले व त्यांनीं नरदेह धन्य केला असें म्हटले आहे. या समासांत योगसिद्धीच्या बळावर 'येक तेजीं तेजचि झाले । येक जळीं मिळोनि गेले । येक ते दिसतचि अदृस्य जाले । वायुस्वरूपीं ॥ येक येकचि बहुधा होती। येक देखतचि निघोनि जाती । येक बैसले असतांचि भ्रमती । नानास्थानीं समुद्रीं ॥'

असे अनेक हटनिग्रही कृतबुद्धि सिद्ध झाल्याचें समर्थांनीं म्हटलें आहे. समर्थांच्यानंतरच्या काळांत 'तेजीं तेजचि' झाल्याचे उदाहरण विदर्भसंत देवनाथ याचे आहे व 'जळीं मिळोनि गेले' याचे उदाहरण रामतीर्थांचे आहे. 'दिसतचि अदृश्य जाले' किंवा 'देखतचि निघोनि गेले' याचीं उदाहरणें देऊं म्हटल्यास मुक्ताबाई व तुकोबाराय यांचीं नांवें सहज डोळ्यांपुढें येतात. 'येक भयानकावरी बैसती। येक अचेतनें चालविती' येथें तर चांगदेव व ज्ञानेश्वर यांच्या चरित्रांचा स्पष्टच उल्लेख आहे. 'येक प्रेतें उठविती तपोबळें' येथे तुकोबांनीं मृतबालक कीर्तनांत उठविल्याचा उल्लेख असावा. तपोबळें प्रेत उठवल्याची गोष्ट समर्थांच्याही चरित्रांत घडलेली आहे. 'येक बैसले असतांचि भ्रमती। नाना स्थानीं समुद्रीं' येथें चिचवडचे मोरया गोसावी यांच्या सिद्ध चमत्कारांचा उल्लेख दिसतो. समर्थही एकाच वेळीं चाफळांत व काशींत प्रगट झाल्याची प्रसिद्धी आहे. योगसिद्धीवर समर्थांचा विश्वास असावासें वाटतें. समर्थांनीं आपल्या दीर्घप्रवासांत अनेक सिद्ध चमत्कार पाहिले असावेत. पुष्कळ अंधशिष्य आपल्या गुरूच्या नांवावर अनेक चमत्कार पिकवितात हेंही कांहीं खोटें नाहीं.

आत्मप्रचीतीचें महत्त्व सांगतांना (द० १० स० ६) समर्थांनीं 'भ्रमरूप विश्व स्वभावें। तेथें काय म्हणोनि सांगावें। निर्गुण ब्रह्मावेगळें आघवें। भ्रमरूप' असा व्यापक सिद्धान्त केला आहे व 'गत ज्ञात्यांचे चमत्कार' हा प्रश्न उपस्थित करून त्याचे उत्तर दिले आहे. 'ज्ञात्याची समाधि पूजिली। तेथें कांहीं साक्ष आली। किंवा नाहीं ॥ तैसेचि अवतार संपले। त्यांचेंही सामर्थ्य उदंड चाले। तरी ते नाहीं गुंतले। वासना धरूनी' ह्या आशंकेचें समर्थांनीं उत्तर दिले आहे. समर्थ म्हणतात कीं, ज्ञाते मुक्त होऊन गेले ते वासना धरून पुन्हा येत नाहींत, तथापि ते पुण्यमार्गें चालले म्हणून त्यांचे सामर्थ्य चालतें हें कांहीं खोटें नाहीं. तथापि

'हा लोकांचा भावार्थ । भाविकां देव यथार्थ । अन्यत्र कल्पना व्यर्थ। कुतर्कांची.' भाविकांच्या विश्वासाचा हा भाग आहे; त्यांना देव खराच आहे; त्याबद्दल इतरांनीं व्यर्थ कुतर्क काढण्यांत अर्थ नाहीं! निष्काम भजनाने देव जोडावा व ब्रह्मज्ञानाने मुक्त हावें हा मुख्य परमार्थ आहे.

## १६ मुकुंदराज आणि समर्थ

शास्त्रीय परिपाटीनें वेदान्तावर मराठींत लिहिला गेलेला पहिला अत्युत्कृष्ट ग्रंथ म्हणजे मुकुंदराजांचा विवेकसिंधु हा ग्रंथ होय. याचीं एकंदर १८ प्रकरणें असून ओवीसंख्या १६७१ आहे. 'वेदशास्त्राचा मथितार्थु। मऱ्हाठिया होय फलितार्थु । तरी चतुरीं परमार्थु । कां न घ्यावा?' असें मुकुंदराज विचारतात.--ह्या ग्रंथांत वेदशास्त्रांतील समर्पक अवतरणें जागोजाग घेतलीं असून मुकुंदराजांनीं आपल्या स्वानुभवाचा व गुरुभक्तीचा आनंद त्यांत मिसळला असल्यामुळें ग्रंथ फार बहारीचा उतरला आहे. ग्रंथ अगदीं समजूत पटवणारा आहे. यांत पिंडब्रह्मांडांच्या अष्टदेहांचें निरसन केलेले असून जीव व ब्रह्म यांचे ऐक्य प्रतिपादिलें आहे. अर्थात् ग्रंथ अद्वैत-मतप्रतिपादक आहे. 'शंकरोक्तीवरी । मी बोलिलों मऱ्हाटी वैखरी--' श्रीशंकराचार्यांच्या सिद्धान्ताचें ह्या ग्रंथांत प्रतिपादन आहे.

विवेकसिंधु ग्रंथ समर्थांनीं पाहिला होता व त्याची दासबोधावर छापही पडली आहे. पहिल्याच प्रकरणांतील गुरुशिष्यलक्षणें व गुरु हा परीस, कामधेनु, कल्पतरु, चिंतामणि यांपेक्षां कसा श्रेष्ठ आहे याचें विवरण दासबोधांतील याच विषयाशीं ताडून पाहण्यासारखें आहे (दास० द० १, स० ४). समर्थांनीं दृष्टान्तासाठीं आणखी १०।१२ पदार्थ घेऊन विवरण अधिक ठसठशीत व आटोपशीर केलें आहे इतकेंच. विवेकसिंधु व दासबोध हे दोन्ही ग्रंथ गुरुशिष्यसंवादरूपानें सांगितले आहेत. दोहींत आक्षेप व शंका यांचें खंडण आहे. रोकडें ब्रह्मज्ञान, प्रबोध, अहंतेचें

काविरें, गुणक्षोभिणी, केवळब्रह्म, पंचभूतांचा कर्दम, दुश्चितपण, शुद्ध-शबल, कैवल्याचा दानी, हिंपुटी, जाणीव—नेणीव, ‘ पंचमहाभूतें पावलीं स्पष्ट दशेतें,’ ‘ऐक्य निरंतर । असतचि असे’ इ० शब्दप्रयोग मूळ विवेकसिंधूंत आहेत ते तसेच दासबोधांत आढळतात. स्थूल—सूक्ष्म देहांचीं वर्णनें, सत्त्वरजतमोगुणांचीं लक्षणें, चारी मुक्ति, पंचप्रळय ‘शुकोमुक्तावामदेवोवा’ याचें रहस्य, सप्तावरण ब्रह्मांड व विराटाचें स्थूळ रूप यांचीं दोन्ही ग्रंथांतलीं वर्णनें अगदीं एकसारखीं आहेत. दोन्ही ग्रंथकार स्वतंत्र बुद्धीचे प्रज्ञावंत आहेत, तथापि पूर्वील संस्कृत ग्रंथांचे आधार दोघांनींही दिले आहेत.

**याच देहीं आपुले डोळां । जंव न भोगिजे मुक्तीचा सोहळा ।**
**तरी वैराग्याचा ताळवेळा । कां शिणावें ? ॥ विवेक० १—२८**

हाच विचार समर्थांचा आहे. ‘येचि जन्में येचि काळें । संसारीं होईजे निराळें’ (दास० ६-९ ).

## १७ ज्ञानेश्वर आणि समर्थ

(१) ज्ञाने०—सोनियाचा दिवस आजि अमृतें पाहला ॥
समर्थ—सोनियाचा दिवस जाला । पांडुरंग रंगीं आला ॥

(२) ज्ञा०—कापुराची वाती उजळली ज्योती । ठायींच समाप्ती जाली जैसी
समर्थ०—केलें संघट्टण कापुरें अग्नीशीं । तैसी भिन्नत्वासी उरी नाहीं ॥

(३) दोघांचाही०——भावेवीण भक्ति भक्तीवीण मुक्ती ।

(४) ‘धर्म जागो निवृत्तीचा’ व ‘धर्म जागो सदैवाचा’ ह्या ज्ञानेश्वरांच्या पदांवरूनच ‘राघवाचा धर्म जागो’ हा पांगुळ समर्थांना स्फुरलेला दिसतो. चाल एकच आहे.

**ज्ञाने०— तैसा शरीरीं हन कर्मे । तो भक्त ऐसा गमे ।**
**परी अंतरप्रतीतिधर्मे । मीच जाहला ॥**
**राम०— देहास लागली उपासना । आपण विवेकें उरेना ।**
**ऐसी स्थिति सज्जना-। अंतरींची ॥**

## १८ दासोपंत व समर्थ

दासबोधाचा केवळ पूर्वावतार असा दासोपंतांचा 'ग्रंथराज' नांवाचा एक सुंदर ग्रंथ आहे. दोन्ही ग्रंथांस ग्रंथराज म्हणतात. दासोपंतांचा ग्रंथराज १२०० ओव्यांचा असून त्याचीं आठ प्रकरणें आहेत. ह्या ग्रथाची समर्थांच्या दासबोधावर चांगलीच छाया पडलेली आहे. समर्थांचे आवडते शब्द 'प्रबोध' व 'प्रतीति' हे दासोपंतांच्या ग्रंथांत वारंवार आलेले आहेत. समर्थांनीं 'प्रयत्न' याची त्याला जोड दिली आहे. 'प्रतीति, प्रबोध व प्रयत्न' ह्या तीन शब्दांत समर्थांच्या शिकवणीचें सर्व रहस्य सांगतां येतें. दासोपंतांनीं आपल्या ग्रंथराजाच्या तिसऱ्या प्रकरणांत संसाराचें जें एक चित्र रेखाटलें आहे त्याचेंच अधिक ठसठशीत व कांटेकोरीचें स्वरूप समर्थांच्या ग्रंथराजांत ( द० ३ ) पाहावयास मिळतें! समर्थांनीं आपलें 'संसारचित्र' मूळ दासोपंतांच्या ग्रंथावरून घेतलेलें आहे यांत शंकाच नाहीं. दासोपंतांच्या ग्रंथांतील १ ल्याच प्रकरणांतील गुरुशिष्यलक्षणांशीं दासबोधांतील गुरुशिष्यलक्षणें ताडून पाहण्यासारखीं आहेत. समर्थांचें वर्णन अधिक उठावदार आहे हें स्पष्ट आहे. 'रोकडा ब्रह्मसाक्षात्कारु। करूं जाणे तो सद्गुरु। मोक्षाचा नाहीं उधारु। जयाप्रती' (दासो० १–३३ ). 'ग्रंथावरूनि ज्ञान होय। तरी कां सेवावे गुरूचे पाय' ( दासो० २–९७) याच कल्पना याच शब्दांत दासबोधांत व्यक्त झालया आहेत! त्रिविधा प्रतीति, शुद्धशबल हा विचार, अध्यात्माची महती, अष्टदेह व त्यांचे निरसन, पंचीकरण, पंचप्रळ्य दोन्ही ग्रंथांत सारख्याच तऱ्हेनें सांगितले आहेत! दासोपंतांनीं संसारचित्र कसें रेखाटलें आहे हें पूर्वी दाखविलेलें आहे (खंड २, पृ० १५७–१६०) त्याशीं दासबोधांतील वर्णन ( दास० द० ३, स० १ ते ५ ) ताडून पाहिले म्हणजे समर्थांना त्याची स्फूर्ति दासोपंतांपासून मिळाली हें कोणालाही कबूल करावेंच लागेल.

## १९ नाथ व समर्थ

मुकुंदराज समर्थांपूर्वी चारशें वर्षांमागें होऊन गेले. नाथांच्या प्रयाणानंतर १० वर्षांनीं समर्थ जन्माला आले व दासोपंत निजधामाला गेले तेव्हां समर्थ अवघे ७ वर्षांचे होते. अर्थात् मुकुंदराज, नाथ व दासोपंत यांच्या विचारांचे व भाषेचे पूर्ण संस्कार समर्थांवर झाले असल्यास त्यांत नवल नाहीं. समर्थांनीं यांचे ग्रंथ अभ्यासिले होते याविषयीं यांचे व समर्थांचे ग्रंथ पाहिले असतां खात्री पटते. तशा प्रकारचीं अंतरंगप्रमाणेही आढळतात, किंबहुना समर्थांनीं आपल्यापूर्वी होऊन गेलेल्या संतकवींचे अनेक मराठी ग्रंथ चांगले पाहिले होते असें म्हणण्यास हरकत नाहीं. अनादि ओघ असाच आहे. नाथ व समर्थ यांच्या अभंगांचे गाथे पहावेत.

**दत्त ध्यावा दत्त गावा। दत्त आमुचा विसांवा॥ १॥**
**दत्त जनीं दत्त वनीं। दत्तरूप हे अवनी॥ २॥**

हा अभंग ‘ दत्ताच्या ’ ऐवजीं ‘ राम ’ येऊन समर्थगाथ्यांत आला आहे !

**भाग्यहीन बहु असती। कमळापती सांभाळणें॥**
**गर्जे ब्रीदाचा तोडर। चराचर त्रिभुवनीं॥**
**शरणागता वज्रपंजरु। हा बडिवारु त्रिजगतीं।**

ह्या नाथांच्या अभंगांतील ‘ब्रीदाचा तोडर’, ‘शरणागता वज्रपंजर’, ‘बडिवार’ हे शब्द समर्थांच्या वाणींत वारंवार येतात. ‘देह जावो अथवा राहो। आम्ही वस्तूचि आहों,’ ‘रिता नाहीं कोठें ठाव। जिकडे पाहें तिकडे देव,’ ‘जळीं स्थळीं पाषाणीं भरला। रिता ठाव कोठें उरला?’,‘आयुष्य खातो काळ तुम्ही राम कां रे म्हणाना,’ ‘कीटक पाषाणांत वसे। त्याचे मुखीं चारा असे’ इत्यादि नाथांचे अभंगपाद समर्थांच्या अभंगादिकांत वारंवार आढळतात. समर्थांच्या कवितेला जें एक व्यावहारिक उपदेशाचें वळण आहे त्याच वळणाचें नाथांचेंही एक उपदेशपर भारुड आहे.

सांडावरून जाऊं नये । लांच खाऊं नये ।
चोहट्यांत राहूं नये। कोणी एक ॥
अक्रीत घेऊं नये । इमान सोडूं नये ।
बैमान होऊं नये । कोणी एक ॥
सज्जनासी विटूं नये । नीचासवें बाटूं नये ।
तस्करासी पुसूं नये । कोणी एक ॥
भक्तिमार्ग खंडूं नये । कुभांड्यासी तंडूं नये ।
खळासंगें भांडूं नये । कोणी एक ॥
शिवेचा गुंडा ढाळूं नये । केला नेम टाळूं नये ।
पापद्रव्य जोडूं नये । कोणी एक ॥
असत्यवाद करूं नये । खोटा संग धरूं नये ।
भोचकासी मैत्री करूं नये । कोणी एक ॥
भलते भरीं भरूं नये । अनाचार करूं नये ।
कपट मनीं धरूं नये । कोणी एक ॥
एका जनार्दनीं भावें । संतचरणीं लीन व्हावें ।
सदा हरिनाम उच्चारावें । कोणी एक ॥

नाथांच्या वर्णनांची व भाषेची व्यापकता आणि प्रेमळ रसाळता मराठी वाङ्मयांत अतुलनीय आहेत. त्यांचें भावार्थरामायण व विशेषतः सुंदरकांड व युद्धकांड हीं दोन कांडें पुढें ठेवून समर्थांचें रामायण पहावें. दोघांचींही रामायणें वीररसानुकूल भाषेंतच वर्णिलीं आहेत. समर्थांनीं नाथांचे भावार्थरामायण खास पाहिले होतें असें वाटतें.

देखे ठकाराचें निजठाण । दों हातीं धनुष्यबाण ।
(बाल०, अ० ६)

ही नाथांची ओवी समर्थांच्या 'ठकाराचें ठाण । करीं चापबाण' ह्या रामरूपाचें स्पष्ट चित्र उभें करितें ! नाथांच्या किष्किंधाकांडांतील (अ० १२) पंचप्रळयांचें वर्णन समर्थांच्या वर्णनाशीं ताडून पाहावें. समर्थांचें एक 'लघुरामायण' म्हणून १२५ पद्यांचें सुंदर प्रकरण आहे,

त्यांत रावणानें देवांना बंदींत घातले व त्यांना आपल्या सेवेस जुंपले याचे मौजेचे वर्णन आहे.

> समीर लोटितो खडे । वरुण घालितो सडे ।
> मयंक ( चंद्र ) साउली धरी । मळीण पावकू हरी ॥ १३ ॥
> विधी विधीस धाकतो । सुरेंद्र बाग राखतो ।
> करावयासि निग्रहो,। भुमंडळासि विग्रहो ॥ १४ ॥
> अखंड चाकरी करी । सदा वरूचि भाद्री ।
> सटी आरंधळी ( ओरडून )दळी। गणेश गाढवें वळी ॥ १५ ॥

नाथांच्या भावार्थरामायणांत या प्रकारचे वर्णन २।३ वेळां आलेलें आहे. ( अयोध्या०, अ० ३ पहा. )

> इंद्र बारी चंद्र छत्रधारी । यम पाणी वाहे घरीं ।
> वायु सदा झाडी ओसरी । विधि तेथें करी दळाकांडा ॥ ५ ॥
> राहू केतू शनि अंगारी । त्यांची पीडा सुरासुरीं ।
> रावणें करूनियां पायरी । मंचकावरी वेंघतु ॥ १० ॥
> विघ्न राहूं न शके जयापुढें । तो गणेश होवोनि बापुडें ।
> गाढवांचे कळप गाढे । चहूंकडे वळीतसे ॥ १२ ॥
> उदकक्रिया वरुणाहातीं । व्यजनसेवा नित्य वसंतीं ।
> निरोप सांगावया बृहस्पती । प्रजापती शांतिपाठकु ॥ १३ ॥

पुन्हा ( युद्ध०, अ० ८ ) असेंच वर्णन आहे—

> सूर्य जो कां सहस्रकर । द्वारपाळ निरंतर ।
> मळयानिळ चवरधर । चंद्रें छत्र धरावें ॥ ५७ ॥
> वायूचा अधिकार जाण । बिदी (रस्ते) झाडाव्या संपूर्ण ।
> वरुण येवोनि आपण । सडासंमार्जन करावें ॥ ५८ ॥ इ. इ.

नाथ व समर्थ या दोघांनीं गणेशाला गाढवें वळायला लावलें आहे. बुद्धिदात्या मंगलमूर्तीने गाढवांना म्ह० मूढांना बुद्धि देऊन स्वहिताच्या मार्गाला

लावलें आहे तें ठीकच आहे ! नाथांचीं वर्णनें अधिक व्यापक व विस्तृत असतात व समर्थांचीं आटपशीर असतात. रावणाच्या बंदींतून देवांना सोडविण्यासाठीं रामाचा अवतार झाला हें दोघांनींही अनेकवार म्हटलें आहे.

( १ ) विघुरल्या—थिजल्या तुपाचा दृष्टान्त नाथांचा आवडता आहे—

**विघुरलें तें तूप होये । थिजलें त्यापरिस गोड आहे ।**
**निर्गुणापरिस सगुणीं पाहें । अतिलवलाहें स्वानंदु ॥**
**( भाग० ११, १४५९ )**

समर्थही ओव्याशतकांत म्हणतात—

**हारपोनि गेलें तूप हें थिजलें । जऱ्ही विघुरलें तऱ्ही तूप ॥**

( २ ) अनेक लौकिक गुरूंचीं लक्षणें ( सद्गुरूचीं नव्हत, नाथ-भागवतांत ( अ० ३, ओवी २७५—२९७) आहेत तशींच दासबोधांत ( द० ५, स० २ ) आलीं आहेत.

( ३ ) नाथांच्या पदांतील 'वारियाने कुंडल हाले । डोळे मोडित राधा चाले' ह्या प्रसिद्ध चरणाची 'सकळ कळांचा हरी' ह्या समर्थांच्या कृष्णपर पदांतील 'डोलत डोलत चाले । श्रवणीं कुंडल हाले' हे पद पाहत असतांना आठवण होते. समर्थांचीं कृष्णावर जीं १०।५ पदें प्रसिद्ध आहेत त्यांवर नाथांच्या 'गौळणीं'ची छाप आहे.

( ४ ) नाथांच्या 'जागल्यां'तील 'जुने ठेवणें' समर्थांनीं घेतलें आहे.

( ५ ) 'सांडी मांडी' शब्द नाथांचे मूळचे समर्थांनीं घेतले आहेत.

( ६ ) आयुष्य जातें पळपळ तुजला कैसें कळेना ॥ ( नाथ )
घटका जाती पळें जाती राम कां रे म्हणाना ॥ ( समर्थ )

( ७ ) 'भगवद्भावो सर्वांभूतीं । हेंचि ज्ञान हेचि भक्ति' हा नाथांचा अभंग 'आठव तो परब्रह्म' ह्या समर्थपदाशीं ताडून पहावा.

(८) 'धांव रे धांव आतां । दीनवत्सला रामा' हें नाथांचें पद व 'धांव रे रामराया किती अंत पाहसी' हे समर्थांचें पद एकसारखींच आहेत.

(९) नाथांचा पांगूळ—

**सहजपूर पाटणीं गा एक जनार्दन दाता ।**
**पांगुळा पाय देतो विश्रांति समस्तां ॥**

ह्या व समर्थांचा 'पांगूळ' बरोबर वाचावेत. नाथांची छाया समर्थांच्या कवितेवर चांगलीच पडलेली दिसून येते.

## २० त्र्यंबकरायांचा बालबोध व समर्थांचा दासबोध

मराठी वाङ्मयाच्या इतिहासाच्या दुसऱ्या खंडांत त्र्यंबकराय व त्यांचा बालबोध ग्रंथ यांविषयीं १५ व्या प्रकरणांत मी सविस्तर विवरण केलें आहे. 'बालबोध' हा ग्रंथ समर्थांच्या पाहण्यांत आला होता हें मी पुढें दाखवीतच आहें; पण 'बालबोध' या नांवावरूनही समर्थांना आपल्या ग्रंथास 'दासबोध' हें नांव द्यावेंसें वाटलें असेल कीं काय असा प्रश्न मनांत उभा राहतो. 'जयबोध' नामक एक ग्रंथ दासबोधानंतर १०० वर्षांनीं कोणा जयरामानें केलेला आहे ! या तीनही बोधांचा अल्प तरी अन्योन्यसंबंध असावा. बालबोध ग्रंथाचा रचना-काल शके १४९४ ते १५०२ हा त्र्यंबकरायांनींच दिला आहे, अर्थात् तो दासबोधाच्या ७५।८० वर्षें अगोदर झाल्याचें उघडच आहे. ह्या ग्रंथाच्या ओव्या ५२४० असून तो दासबोधाच्या दोन-तृतीयांशाएवढा मोठा आहे. हा प्रणवोपासनेचा ग्रंथ असून निर्गुणज्ञानपर आहे. त्यांत त्या वेळचीं मतमतान्तरें सांगितलीं असून त्यांचें निरसन केलें आहे. ग्रंथांत अष्टांगयोग, पंचीकरण, अष्टदेह-निरसन इ० विषयांचें पण मुख्यतः अद्वैताचें प्रतिपादन आहे. त्र्यंबकराय हे नाशिक जिल्ह्यांतील सप्तशृंगीदेवीचे एकनिष्ठ उपासक होते. नाशकाजवळ टाकळी येथें अनुष्ठानार्थ बारा वर्षें राहिलेल्या समर्थांच्या अवलोकनांत प्रस्तुत

ग्रंथ आला असल्यास त्यांत नवल नाहीं. यांतील पंचप्रळय, अजपाजप-निरूपण, हे विषय दासबोधांत आले आहेत.

**पुढां तत्त्वविवरण । तत्पद त्वंपदलक्षण ।**
**शबळ शुद्ध कार्यकारण । सांगावें तें ॥**
**या बुद्धी ब्रह्मीं असे । लोकसंग्रहीं सदा वसे ।**
**सांडणें मांडणें नसे । ठाईं वहोनि ॥**

या भाषेचें दासबोधांतील भाषेशीं फार साम्य आहे. पुढील ओव्या तर या दोन्ही बोधांचा संबंध स्पष्ट दाखविणाऱ्या आहेत. कवित्वाचा विचार करितांना त्र्यंबकराय लिहितात—

**येरवीं पाठु आणि प्रसादु । एणें शोभे प्रबंधु ।**
**धिटाया बोलतां शुद्धु । ग्रंथु नव्हे ॥** (**बाल०, पृ० ८३**).

पाठकवि, प्रासादिक कवि व धीटकवि ही कल्पना वरील ओवीवरून समर्थांस सुचली असावी—

**धीट पाठ प्रासादिक । ऐसे बोलती अनेक ।**
**तरी हा त्रिविध विवेक । बोलिजेल ॥** (**दास०, द० १४, स० ३**)

धीट, पाठ, धीटपाठ व प्रासादिक असे कवित्वाचे चार प्रकार समर्थांनीं सांगितले आहेत. त्यांपैकीं धीटपाठ हा प्रकार नाथांच्या भावार्थरामायणांत ( बाल०, अ० १४।८१ ) आढळतो.

'शब्दरत्नाचे परीक्षक', 'पश्चिम मार्ग' म्ह० अंतरिक्षमार्ग, प्रपंच-उभारणी, कांतिटे, 'शिष्य नसावा भिडसारु', शब्दब्रह्मगोळ, इ० शब्दयोजना दोन्ही ग्रंथांत आहे. आपल्यापूर्वीच्या मराठी ग्रंथांचें समर्थांनीं सखोल अध्ययन केले होतें हें वरील विवेचनावरून वाचकांच्या ध्यानांत येईल.



# ४ उपासना–राम, मारुति व भवानी

**१ रामाची उपासना**—१ उपासनाप्रेम; २ एकनिष्ठता; ३ धन्य सूर्यवंश; ४ रामाचें ध्यान; ५ रामाचें वैराग्य व कौसल्येचें वात्सल्य; ६ रामराज्याचें सुख; ७ माझ्या रामाचीं बिरुदें; ८ निष्कामभक्ताचें ऐश्वर्य; ९ रामकृष्णचरित्रशतकें; १० रामकृष्ण एकरूप; ११ जुना दासबोध व रामभक्ति; १२ मनोबोध व रामभक्ति; १३ अभंग, पदें, वगैरे.

**२ मारुतिउपासना**—१ बलसंवर्धक उपासना; २ वीर मारुती; ३ भीमरूपी स्तोत्रांचें स्वरूप; ४ अभंग व पदें.

**३ तुळजापूरची भवानी**—१ तुळजापूरची तुकाई; २ रामवरदायिनी शक्ति; ३ खबरदार राजा.

## १ रामाची उपासना

### १ उपासनाप्रेम

रखरखीत उन्हांतून शीतल छायेच्या आश्रयाला जाणे मोठे सुखाचें असतें ! 'महावाक्य तत्त्वादिकें पंचिकर्णे' या बुद्धीला ताण देणाऱ्या विषयांच्या उबाऱ्यांतून किंवा रणकर्कश खणाखणीच्या मैदानांतून सुटून सुखशीतल मंदमंद पवनाने आंदोलित होणाऱ्या रम्य सरोवरांत स्नानादि विहार करणें सुखदायक होतें. समर्थ पुरुषाच्याही हृदयांतला कोमल भाग म्हणजे त्याच्या उपासनेच्या प्रेमाचें नंदनवन होय. 'समर्थ' हे नांव रामदासांनीं रामाला दिलेले. त्याच नांवानें लोक त्यांना संबोधूं लागले, तथापि त्यांनीं आपल्याला 'दास' म्हणविले व आपल्या ज्ञानाच्या गठ्याला 'दासबोध' हें नांव दिले. रामाचा 'दास' तोच जगाचा 'स्वामी' झाला. दास्याची गोडी दासालाच ठाऊक. उत्तम सेवक मालकाचा नियंता झाला तरी तो आपली दास्याचीं भूमिका सोडायला तयार नसतो! मालकाच्या बरोबरीचें ऐश्वर्य मिळालें तरी मुनीम मालकाच्या खालच्या स्थानावर

बसतो. यांत मर्यादा आहे, माधुर्य आहे, प्रेम आहे, समर्थांनीं म्हटल्याप्रमाणें कृतज्ञताबुद्धि आहे. ज्ञान हे सर्वश्रेष्ठ आहे असें समर्थांनीं अनेक ठिकाणीं म्हटलें असलें तरी 'भक्तीचेनि योगें देव। निश्चयें पावती मानव' असाच समर्थांचा खरा अभिप्राय आहे. समर्थांची विशालबुद्धि परब्रह्माला आकळती झाली तरी त्यांचे हृदयांतील रामभक्तीचे सिंहासन अढळच राहिले. ज्ञानेश्वरनाथांप्रमाणें समर्थही ज्ञानोत्तरभक्तीचेच सुख भोगणारे व जगाला देणारे आहेत. दासबोधांतच एक मौजेचा प्रसंग आहे. शिष्याने ब्रह्मज्ञान ऐकल्यावर प्रश्न केला, 'निर्गुणाने मोक्ष होतो। प्रत्यक्ष प्रत्यया येतो। सगुण काय देऊं पाहतो। सांगा स्वामी.' हा निर्भीड प्रश्न ऐकल्यावर समर्थांनीं जें उत्तर केले आहे त्यांत त्यांचे सारे हृदय आहे. गुरु सांगतात म्हणून व 'गुरूचें वचन प्रतिपाळण। हे मुख्य परमार्थाचें लक्षण' आहे म्हणून तुला सगुणभजन केलें पाहिजे. या उत्तरानें शिष्याचे समाधान झालें नाहीं. 'गुरूने तरी असें कां सांगावें?' असें त्याने पुन्हा विचारले! गुरूने उत्तर केले कीं ब्रह्मज्ञान ऐकल्यावर तुझे देहधर्म किंवा लोकव्यवहार सुटले नाहींत तर मग सगुणभजन सोडण्यांतच काय पुरुषार्थ आहे? ह्याही उत्तराने शिष्य गप्प बसेना तेव्हां समर्थांनीं आपला स्वतःचा अनुभव सांगितला—

**आमुचे कुळीं रघुनाथ। रघुनाथें आमुचा परमार्थ।**
**जो समर्थाचाही समर्थ। देवां सोडविता॥ २१॥**
**त्याचे आम्ही सेवकजन। सेवेकरितां जालें ज्ञान।**
**तेथें अभाव धरितां पतन। पाविजेल कीं॥ २२॥**
**करी दुर्जनांचा संहार। भक्तजनांसी आधार।**
**ऐसा हा तों चमत्कार। रोकडा § चाले॥ २९॥**

§ प्रत्यक्ष, आपल्यासमोर. शिवबांच्या यशस्वी कार्याकडे याचा संबंध उघडच येतो. रामाच्या कृपेनेंच धर्मरक्षणाचें कार्य महाराष्ट्रांत होत असून लोकांना रामराज्याचें सुख निश्चयानें मिळणार असा समर्थांचा विश्वास होता.

**मनीं धरावें तें होतें । विघ्न अवघेंचि नासोन जातें ।**
**कृपा केलियां रघुनाथें । प्रचीत येते ॥ ३० ॥**
**रघुनाथभजनें ज्ञान जालें । रघुनाथभजनें महत्त्व वाढलें ।**
**म्हणोनियां तुवां केलें । पाहिजे आधीं ॥ ३१ ॥**
**हें तों आहे सप्रचीत । आणि तुज वाटेना प्रचीत ।**
**साक्षात्कारें नेमस्त । प्रत्ययो करावा ॥ ३२ ॥**
**रघुनाथ स्मरोन कार्य करावें । तें तत्काळचि सिद्धी पावे ।**
**कर्ता राम हें असावें । अभ्यंतरीं ॥ ३३ ॥**
**मी कर्ता ऐसें म्हणसी । तेणें तूं कष्टी होसी ।**
**राम कर्ता म्हणतां पावसी । यश कीर्तिप्रताप ॥ ३६ ॥**
**कर्ता राम-मी नव्हे आपण । ऐसें सगुणनिवेदन ।**
**निर्गुणीं तें अनन्य । निर्गुणचि होइजे ॥ ३४ ॥**
**ज्ञानबळ उपासना । आम्ही भक्त जरी मानूं ना ।**
**तरी या दोषाच्या पतना । पावों अभक्तपणें ॥ ४० ॥**
**देहास लागली उपासना । आपण विवेकें उरेना ।**
**ऐसी हे स्थिति सज्जना- । अंतरींची ॥ ४२ ॥** (द० ६, स० ७)

हा उतारा मोठा आहे पण समर्थांच्या हृदयांतल्या भक्तिभावाची पुरी ओळख करून देणारा आहे. समर्थांचें हाड भक्ताचें होतें. दासबोधांत अन्यत्रही उपासनेचें महत्त्व त्यांनीं सांगितले आहे. ‘नाहीं उपासनेचा आधार । तो परमार्थ निराधार,’ ‘उपासनेचा मोठा आश्रयो । उपासनेवीण निराश्रयो,’ असें स्पष्ट म्हटलें आहे. ज्याला उपासनेची पाठी नाहीं त्याला वाटेल त्यानें (कामक्रोधादिकांनीं) कुटावें असें होतें, ‘यालागीं उठाउठी । भजन करावें.’ ते म्हणतात –

**उपासनाकर्म हें आधीं पाळावें । मग सांभाळावें ब्रह्मज्ञान ॥**

दासबोधाच्या चौथ्या दशकांत समर्थांनीं भागवताधारें नवविधाभक्ति विशद करून सांगितली आहे ती उपासनेसाठींच होय. स्फुट कवितेंतही

अनेकवार नवविधाभक्तीवर जोर दिला आहे. त्यांचीं अभंग पदें उपास्य-प्रेमानेच भरलीं आहेत. वर्णाश्रमधर्मकर्मे प्रत्येकानें आचरलीं पाहिजेत. स्वधर्म-उपासना-ज्ञान-ज्ञानोत्तर भक्ति असा हा सर्व संतांप्रमाणें समर्थांचाही दंडक आहे.

**कर्में चित्तशुद्धि होऊनीयां गेली । मग उपासिली उपासना ॥**
**उपासनामिसें देव ठायीं पडे । संदेहचि उडे येकसरां ॥**

*　　　*　　　*

**आधी तें करावें कर्म । कर्ममार्गें उपासना ॥**
**उपासकां सांपडे ज्ञान । ज्ञानें मोक्षचि पावणें ॥**

रामउपासना ब्रह्मांडव्यापिनी कशी आहे हें दासबोधाच्या विवरणांत स्पष्ट होईल.

## २ एकनिष्ठता

'म्हणा रे म्हणा राम लीलावतारी' ह्या दशकांत समर्थांनीं आपली रामाविषयींची एकनिष्ठता व ती करीत असतांना इतर देवतांविषयींची अप्रीति व्यक्त केली आहे. मच्छ, कूर्म, वराह, 'खुजटू' वामन, 'सीघ्रकोपी' नृसिंह, 'मातृहन्ता व खड्गधारी' परशुराम, 'कूळहन्ता व गोवळू' कृष्ण, 'दिगंबर व नग्न' दत्त, 'येकदंत' गणेश, 'त्रिपुरारी' शंकर—हे 'नव्हे रे नव्हे'—यांच्या भजनीं न लागतां—'म्हणा रे म्हणा राम लीलावतारी' असा जनांस बोध केला आहे! यानंतर राम कसा अद्वैत आहे याचें वर्णन केले आहे. तो शिव ना शक्ति, व्यक्त ना अव्यक्त, द्वैत ना अद्वैत, निर्गुण ना सगुण, लक्ष ना अलक्ष, बद्ध ना मुक्त, निर्विकारी ना वेषधारी इ० प्रकारीं सर्वच भक्त आपापल्या उपास्याचें अध्यात्मस्वरूप जसें वर्णितात तसेंच त्यांनीं वर्णिलें आहे. रामाशिवाय इतर देवतांचा वर जो अधिक्षेप केला आहे त्यांतून रामदासांची एकनिष्ठता तेवढीच घ्यावयाची आहे. नरहरि सोनार पंढरपुरास राहून विठ्ठलाचें तोंड पाहत नसत, पण पुढें शिव व

विठ्ठल निराकारपणे दोन्ही एकच आहेत हें कळल्यावर त्यांचा भेदभाव गेला व ते विठ्ठलभक्तांत मान्यता पावले. तुकोबांनीं ‘गणोबा विक्राळ। लाडू मोदकांचा काळ’ असें म्हटले आहे हे ‘तुका म्हणे चित्तीं धरा। रखुमाईचा पति’ ह्या एकान्तिक भक्तीपुरतेंच मानायचें आहे. ‘विठ्ठल गणपति दुजा नाहीं’ हे काय त्यांस माहीत नव्हते? रामदासांचा एकनिष्ठ भाव दाशरथी रामाचे पायीं होता एवढेंच याचे सार आहे. समर्थ इतर देवतांना तुच्छ मानीत होते असा यांत भाव नाहीं, तो त्यांचा स्थायीभाव नव्हता. त्यांनीं कृष्णचरित्र संकलितपणे गायिले आहे व ‘रामकृष्णचरित्रां’ची एकरूपताही वर्णिली आहे. त्यांनीं सर्व देवतांवर अभंग, पदें, आरत्या, स्तोत्रें वगैरे केलीं आहेत तरी तुकोबांचा विठ्ठल तसा त्यांचा राम एकमेव उपास्य आहे. ‘राम कृपाकर विठ्ठल साकार। दोघे निराकार एकरूपें’ असें त्यांनीं म्हटलें आहे.

ज्ञानेश्वरनाथतुकोबादि संतांची जशी कृष्णाच्या (विठ्ठलाच्या) ठिकाणीं अनन्यनिष्ठा होती तशी समर्थांची रामाच्या ठिकाणीं होती. राम आणि कृष्ण यांत भेद नाहींच, व तो कोणीही केला नाहीं. मग उपासनेंत भेद कां? याला उत्तरें दोन आहेत. एक तर ज्याला कुलपरंपरेने जी उपासना मिळाली तीच त्याने पुढें चालविली. दुसरें उत्तर असें कीं ‘आवड गोड!’ ज्याला जें आवडलें तेंच त्याचे उत्तम. आवडतें तें सुंदर, तेंच सर्वगुण-संपन्न! लावण्यगुणराशि रामही होते व कृष्णही होते. दुष्टांचा संहार व भक्तांचें संरक्षण हे कार्य दोघांनींही केले. देवांचे बंध दोघांनींही तोडले, दोघांनींही भू सनाथ केली. दोघांची कीर्ति शाश्वत आहे. दोघांच्याही उपासनेने असंख्य जन उद्धरले आहेत व उद्धरतील. सूरदासांना कृष्णभक्ति कां व तुलसीदासांना रामभक्ति कां? ‘आवड गोड’ हेंच उत्तर. तिसरें उत्तर असें कीं, पूर्वजन्मीं ज्यानें जी उपासना केलेली असते तीच त्याच्यापुढें दत्त म्हणून उभी राहते व तींतच त्याचें चित्त रमते. समर्थांनीं कृष्णगुणही

गायिले आहेत, 'अनेकीं सदा एक देवासि पाहे' असें त्यांनीं म्हटलें आहे. तथापि त्यांचे अंतर रामप्रेमाने नितान्त भरले होतें. त्यांच्या ध्यानांत रामरूप व मुखांत रामनाम असे.

**मारुतीस्कंधभागीं । शीघ्र बैसोनि यावें ॥ राघवें वैद्यराजें । कृपा औषध द्यावें ॥ दयेचे पद्महस्त । माझे शिरिं ठेवावे ॥ धांव रे० ॥**

अशीं त्यांचीं बाळपणचीं सुखस्वप्नें होतीं. रामकृपेनें त्यांचे मनोरथ पुरले.

उपासकाला आपल्या उपास्याविषयीं निरतिशय प्रेम असणें स्वाभाविक आहे व उचित आणि अवश्यही आहे. समर्थांनीं युद्धकांडाच्या आरंभींच म्हटलें आहे कीं, शंकर, स्कंद, चंडिका, मोरया, वेंकट, विठ्ठल, नृसिंह, वामन, इंद्र इत्यादि देवांच्या कथा आहेत पण 'समस्तांमधें श्रेष्ठ या राघवाची.' कौरवपांडव–माधवांच्या कथा ( भागवत–हरिवंशादि ग्रंथांत ) वर्णिल्या आहेत, तथापि रामकथा सर्वश्रेष्ठ आहे. कारण काय तर रामाने 'बळें तोडिला बंद त्या त्रीदशांचा'—रामाने देवांना रावणाच्या बंधापासून सोडविले व त्यांचा पांग ( पराधीनता ) फेडिला ! समर्थ म्हणतात कीं, 'दुजी उपमा ये कथेला न साहे.' ऋषींमध्यें श्रेष्ठ असे वाल्मीकि यांनीं वनांत राहून रामावतार होण्यापूर्वी ही रामकथा गायिली आहे. यांत 'धर्ममूर्ति' मारुतीचे चरित्रही वानिले आहे. ही 'कथा ऐकतां नासलें कार्य होतें । महाविघ्न तें भग्न होवोनि जातें' व सुखानंद प्राप्त होतो अशी 'रामदासाला अखंड प्रचीत' आहे. आणखी पहा, 'प्रतापें दिनेशु तपाचा हुताशु । विरांमाजी ईशु सुरांचा सुरेशु' अशा रामाचें शंकरही ध्यान करितात—'महादेव तो वर्णितो राघवाला.'

**महावैभवाची कथा राघवाची । जनीं सौख्यदातीच ब्रह्मादिकांची ॥**

ही 'रामउपासक रामदास' प्रेमाने गात आहे. रामचरित्रें उत्तम आहेत; तीं जे सर्वदा गातात ते दुःखमुक्त होऊन धन्य होतात.

समर्थांचें लक्ष वर्तमानकाळाकडेही होतें. रावणी राज्य बुडून लोकांना रामराज्याचें सुख व्हावें, लोक वर्णाश्रमनिरत व्हावेत अशी समर्थांना मनांतून इच्छा होती. त्या वेळचे यवन त्यांना रावणाच्या राक्षसांसारखे वाटत. 'पूर्वीं जे मारिले होते तेचि आतां बळावले' असून रामराय त्यांवर संतप्त झाले आहेत व 'कल्पांत मांडला मोठा। म्लेच्छ दैत्य बुडावया ॥ कैपक्ष (कैवार) घेतला देवीं (रामाने)। आनंदवनभूवनीं' असें त्यांनीं म्हटले आहे. धर्मसंस्थापनेसाठीं रामरायच शिवाजीच्या रूपानें प्रगटले आहेत असा समर्थांचा दृढ विश्वास होता.

समर्थांनीं रामाच्या कथा परोपरीने गायिल्या आहेत. त्यांचे दुकांडी रामायण प्रसिद्धच आहे. त्यांचीं रामलीलापर व रामकृष्णलीलापर अशीं चारदोन स्फुट प्रकरणें आहेत. 'राम माझा स्वामी राव अयोध्येचा' हा एक ६५ चरणी व 'नमूं एकदंता माता ब्रह्मसुता' हा एक १०५ चरणी असे दोन मोठाले अभंग आहेत त्यांत रामकथा संक्षेपाने सांगितली आहे. त्यांच्या अध्यात्मप्रकरणांत निर्गुणनिराकार रामाचे (परब्रह्माचे) स्वरूप वर्णिले आहे. सगुण राम व निर्गुण राम दोन्ही एकरूपच आहेत तथापि उपासना सगुण रामाचीच आहे. एकबाणी, एकपत्नी व एकवचनी राम त्यांच्या निरतिशय प्रेमाचा विषय होता. 'जैसें तें गंगाजळ। तैसे गुण निर्मळ। ऐकतां विव्हळ मन माझें रे.'

**बहुविध भजनाचीं दैवतें पाहिलीं हो**
**सकळ त्यजुनि रामीं वृत्ति हे राहिली हो।**
**विमळगुणशिळाची लागली प्रीति मोठी**
**विमळहृदय होतां उद्धरे कूळ कोटी ॥**

रामाचे गुण आणि शील हीं विमल आहेत. त्यामुळें माझें मन रामरूपीं रंगले आहे. रामाचे गुण आदरें गावे, त्याचें नाम वाचे वदावें, त्याचें रूपलावण्य पहावें, त्याची कीर्ति जीवीं भरावी, त्याची मूर्ति ध्यानीं वसावी

त्याचा अंतरीं वेध लागावा अशी अतीव उत्कंठा त्यांना लागलेली असे. 'मधुकर मन माझें रामपादांबुजीं हो.' रामाची उपासना जनांत वाढावी व रामभजनानें जन उद्धरावे अशी लोकोपकारबुद्धीही त्यांच्या मनांत उदित झाली.

एका स्तोत्रांत 'धरीं रे मना पंथ या राघवाचा' असें सांगतां सांगतां पुढील दोन बहारीचे श्लोक आले आहेत—

**चकोरासि चंद्रोदयीं सूख जैसें। रघूनायका देखतां सूख तैसें॥**
**सगूणासि लांचावलें स्थीर राहे। रघूनंदनेवीण कांहीं न पाहे॥**
**चमत्कारलें चित्त हें रामगूणीं। उठे कीर्ति वाखाणितां प्रीति दूणी॥**
**रघूनायकासारिखा देव नाहीं। क्रिया पाहतां चोखडी सर्व कांहीं॥**

बिभीषणाचें राज्य व मारुतीचा देह हे दोन्ही रामकृपाबळावर चिरंजीव झाले आहेत, देवांचा देव जो महादेव तो अखंड रामनाम चिंतीत आहे, असा माझा राम समर्थ आहे. सर्व देवांत राम श्रेष्ठ तसें सर्व नामांत रामनाम श्रेष्ठ! 'बहूनाम या रामनामीं तुळेना' व रामनाम हें 'अतीसाजिरें स्वल्प सोपें फुकाचें' आहे असें मनोबोधांत म्हटले आहे.

समर्थ रामोपासक म्हणून जगद्विख्यात आहेत. त्यांना रामाची एकविध भक्ति होती. रामाचें चरित्र व गुण त्यांना अत्यंत प्रिय होते. रामभक्तांत श्रेष्ठ अशा मारुतीचें त्यांना अत्यंत प्रेम होतें. रामकथा गाणारे वाल्मीकि व रामाचे कुलगुरु व रामाला योगवासिष्ठ सांगणारे वसिष्ठ यांविषयीं त्यांना अत्यादर होता. त्यांची कुलस्वामिनी तुळजाभवानी ही 'रामवरदायिनी' म्हणून त्यांना अधिक प्रिय होती. रामनाम अखंड जपणारांत अग्रेसर शंकर त्यांना रामाइतकेच प्रिय होते. याप्रमाणें रामविषयक सर्वच कांहीं त्यांना प्रिय होतें. प्रस्तुत प्रकरणांत समर्थांच्या रामभक्तीचा आपण प्रथम आस्वाद घेऊं आणि नंतर मारुतिराय व तुळजाभवानी यांच्याविषयीचें त्यांचें मनोगत पाहूं.

राम प्रिय म्हणजे रामाचें सर्व कांहीं प्रिय. 'धन्य सूर्यवंश पुण्यपरायण' ह्या अभंगांत रामाचा समुदायही कसा गुणवंत आहे, निष्काम आहे हें सांगितलें आहे. राज्याचाही त्याग करणारा निष्काम भक्त भरत, अन्नत्याग करून चौदा वर्षें उपोषण करणारा ब्रह्मचारी लक्ष्मण, श्रीरामीं जन्मसार्थक करणारा सेवक मारुति, भविष्योत्तर सांगणारा वाल्मीकि, सर्वभावें शरण येणारा बिभीषण, फार काय पण—

**३ 'धन्य सूर्यवंश'**

**सर्व भावें रामीं सर्वही वानर। शरण अवतार विबुधांचे** ८
**विबुधमंडळीं राम सर्वगुण। अनन्यशरण रामदास** ९

अशी ज्या रामाची साहाय्यक मंडळी तो राम कसा ?

**शोभतसे राम प्रतापी आगळा। दिसे सौम्यलीळा सत्त्वगुणी** २
**सत्त्वगुणी होय सात्त्विकांकारणें। कोपें संहारणें दुर्जनांसी** ३
**दुर्जना संहार सज्जना आधार। भाविकांसी पार पाववितो** ४
**दीनानाथ नाम पतितपावन। योगियां जीवन योगलीला** ६
**नोहे सोडवण रामनामाविण। रामदास खूण सांगतसे** १२

'रामाचें चरित्र सांगतां अपार' आहे—तें वाल्मीकीने गायिले आहे. थोडेंसें आमच्या वांट्याला आले. समर्थ म्हणतात—

**कांहीं एक पुण्य होतें पूर्वजांचें। पापियासि कैंचें रामनाम ॥ ३ ॥**
**गर्जती पुराणें आणि संतजन। करावें भजन राघवाचें ॥ ८ ॥**

रामभजन कसें करावें? 'नामघोष वाचे श्रवणकीर्तन। चरणीं गमन देवालयीं.' सर्व इंद्रियें व मन अशींच रामभजनीं लावावीं. रामपायीं शिळा उद्धरली. असेच जड पाषाणतुल्य मानवही उद्धरतात. 'सार्थकाचें जिणें कथानिरूपणें। श्रवणमननें काळ गेला.'

ओवीरूप अभंगांत अनेक स्थलीं समर्थांचा रामप्रेमा प्रगट झाला आहे. राम सीतामाईला घेऊन अयोध्येस जाण्यास निघाले तेव्हांचें वर्णन एका ६७ चरणी अभंगांत काव्यमय गोड भाषेंत आले आहे—

**४ रामाचें ध्यान**

**सर्व येकसरें निघाले गजरें । अंबर धूसरें पूर्ण जालें ॥ ५५ ॥**
**मेघडंब्रें माही निशाणें थरकती । रोमांच फरकती देखतांचि ॥ ५७ ॥**
**तुरंग उसाळे जाती अंतराळें । उफळती बळें दोचि पाईं ॥ ६२ ॥**

दुसऱ्या एका प्रकरणांत रामरूप वर्णिले आहे; 'माझे मनीं ध्यान आठवलें'— सांवळें सुंदर रूप, कासे पीतांबर, अंगीं चंदनाची उटी, कंठीं मुक्तमाळा, कपाळीं कस्तुरीटिळा, मुकुटकुंडलें तळपणारीं, करीं चापबाण, पायीं तोडर, सन्मुख मारुती, बंधु उभे—असे हें 'रामध्यान माझ्या चित्तीं अखंड ठसावले' आहे. मी जाईन तेथें राम माझ्याबरोबर असतात. 'राम आहे जनीं राम आहे वनीं । राम निरंजनीं सारिखाचि.' ह्या रामरूपीं मला पूर्ण समाधान जाले आहे. रामाने मला पावन केले. रामचिंतनसुखामुळें 'सर्वकाळ देही असतां विदेही । रामदासीं नाहीं जन्ममृत्यु.'

'रत्नजडित सिंहासन । वरी शोभे रघुनंदन' ह्या लोकप्रिय अभंगांत रामपंचायतनाचें ध्यान वर्णिले आहे.

रामाचा अवतार कशासाठीं झाला?

## ५ रामाचें वैराग्य व कौसल्येचें वात्सल्य

**मदें मातला रावणू क्रूरबुद्धी ।**
**तेणें घातले सर्वही देव बंदीं ॥**
**स्वधर्मू बुडाला भुमीभार जाला ।**
**अनाथां दिनां धांवण्या राम आला ॥**

राम अयोध्याधीशाचा पुत्र. त्याला काय कमी होतें? 'हिरे माणिकें फांकती दिव्य कीळा । सुढाळा गळां रूळती मुक्तमाळा.' मुकुटकुण्डले— 'कपोळीं प्रभा कुंडलांची झळाळी.' करपल्लवांत रत्नांची मुद्रिका, बाहुदंडीं केयुरें, कटी पीतांबर—असो. तें ऐश्वर्य काय वानावें? पण त्या रामाने देवकार्यासाठीं वनवास पत्करला तेव्हां सारे उलटें झालें! मस्तकावर 'पिंगट जटा, अंगाला विभूती, सीता नोवरी नुक्तीच घरीं आलेली, वयें नूतनू— तारुण्याचा भर—पण तापसी वीतरागी झालेला राम—तीव्र वैराग्यमूर्ति वनांत जाण्यास निघाला! 'समागमें जानकि दिव्यकांता!' खडे रूतले

खूतले—वनवासच तो! पंचभूतांच्या स्वाधीन या राजकुलोत्पन्न बालकांना करितांना माता कौसल्या म्हणाली, 'हे पृथ्वी! यांच्या कोमल पावलांना रुतूं नकोस बरें—'जामात तूझा प्रतिपाळि यातें। फळीं तऱ्ही सीघ्र हरीं क्षुधेतें.' हे आदिनारायणा! हा रघुराज योगी होऊन तपास चालला आहे. याला सांभाळ व 'नद्यातटाकें करिं पूर्ण पंथें। तृषा झणीं पीडिल हो तयातें.' हे सूर्यराजा! हा तुझा कुळदीप आहे. 'स्पर्शों नको तीव्र किर्णें तयातें.' हे वायो! तुझ्या पुत्राचा हा स्वामी आहे हें ध्यानांत धर. त्याचा सुकुमार देह धुळीनें धूसर करूं नकोस आणि 'वाजों नको कर्कश रे समीरा.' रामासारखाच हा सुंदर सुकुमार लक्ष्मण—वनस्पतींनो! छाया-सुगंधानें त्याच्या श्रमाचा परिहार करा. आणि कोकिळांनो!

**सपक्षिकूळासह कोकिला हो। सीते सुशब्दीं तुम्हि रंजवा हो॥**
**हे धाकुटी योगिनी कुंजवासी। तुम्हीच तेथें सखिया तियेसी॥**

येथें तर कोमल भावनेची पराकाष्ठा झाली आहे.

'मानपंचकांत' रामराज्याचे सुरस वर्णन आहे—

**६ रामराज्याचें सुख**

**राम विश्राम देवांचा राम भक्तांसि आश्रयो।**
**राम योगीमुनि-ध्यानीं राम रक्षी ऋषीकुळा॥१॥**

रामकथा गातां ऐकतां निरंतर चित्त रामरूप असतें असा समर्थ आपला अनुभव सांगतात. पार्वतीला शंकर सांगतात कीं, विषानें माझा गळा भाजून निघाला तेव्हां 'राम' या दोन सुंदर अक्षरांचा मीं जप केला तेव्हां उतार पडला—'रामनामेंचि सुटका' झाली व 'निवालों अंतरीं सुखें.'

**कीर्ति या रघुनाथाची पाहतां तुळणा नसे।**
**येकबाणी येकवचनी येकपत्नीच धार्मिकु॥**

या 'रघुनाथाचें राज्य प्रजेला अत्यंत सुखदायक झालें. बहुवृष्टि, अनावृष्टि, चिंताउद्वेग, कांहीं नाहीं.'

**व्याधी नाहीं रोग नाहीं लोक आरोग्य नांदती ।**
**आदरू सकळै लोकां सख्यप्रीति परस्परें ॥**
**बोलणें सत्य न्यायाचें अन्याय सहसा नसे ।**
**दरिद्री धुंडितां नाहीं सर्वत्र लोकसंग्रहो ॥**
**अद्भूत पिकती भूमी वृक्ष देती सदा फळें ।**
**अखंड दुभती धेनू आरोग्यें वाहती जळें ॥**
**नाना विद्या आणि बुद्धी नाना युक्ति नाना कळा ।**
**नाना संगीतसामर्थ्यें नानावाद्यें परोपरी ॥**
**चढता वाढता प्रेमा सुखानंद उचंबळे ।**
**संतोष समस्तां लोकां रामराज्य भुमंडळीं ॥**

प्रजेला परमसुखाचें ‘ रामराज्य भूमंडळीं ’ एकदाच झालें काय ? रात्रणी राज्यें कैक झालीं, गेलीं व जातील ! लोकांपुढें संतकर्त्रींनीं रामराज्याचें गौरवपूर्ण वर्णन केलें तें कोणत्या हेतूनें केलें बरें ? समर्थ सांगतात कीं, या रघुनाथाची कास धरून मी सर्वसुख पावलों, त्यानें माझीं सारीं सांकडीं वारिलीं. मुखीं नाम व चित्तीं रूप अशी रामाची भक्ति करीत सर्व भरतखंड-भर मी हिंडलों, पण रामचिंतनसुखामुळें जावें तेथें ‘ आपुलीं वाटती सर्वे धन्य तूं गा रघूत्तमा ’ हा अनुभव आला !

### ७ माझ्या रामाचीं बिरुदें

रामाचीं बिरुदें भक्तांसाठीं घेतलेलीं किती गोड व सुखसमाधान देणारीं आहेत ! भक्तांचा हा अनुभव आहे, प्रेमळांनीं विश्वास ठेवून तो घ्यावा ! ‘ तुज कैसें पाहूं देवा ? तुझी कैसी करूं सेवा ? ’ असा प्रेमळांस विचार पडला असतां राम समर्थमुखानें सांगतात व समर्थ आपल्या अनुभवाची ग्वाही देतात —

( १ ) **‘ माझीं बिरुदें कां विसरतां ? । आणि व्यर्थ कां चेष्टतां ?’ ॥ १ ॥**
**भक्तवत्सल दीनानाथ । तुम्हां आधार समर्थ ॥ २ ॥**

भय दाखवी निवारी । तोचि सर्व चिंता करी ॥ ३ ॥
दासासमीप राहतो । योगक्षेमही वाहतो ॥ ४ ॥

( २ ) देव म्हणे 'मी जात नाहीं । आतां चिंता न करीं कांहीं ॥ १ ॥
मज पहावें संतापाशीं । सेवीं जाणत्या भक्तासी ॥ २ ॥
मज जाणावें विचारें । सगुणाचे भजनद्वारें ' ॥ ३ ॥
देव म्हणतो रे दासासी । 'मी तों आहें तुजपासीं ! ॥ ४ ॥

( ३ ) मज गांजिलें तें साहें । परि भक्तांचें न साहे ॥ १ ॥
माझ्या भक्तां शीण व्हावा । मग मजसी त्यासी दावा ॥ २ ॥
मज अवतार घेणें । माझ्या भक्तांचे कारणें ॥ ३ ॥
निजदासांसी पाळावें । दुर्जनांसी निर्दाळावें ॥ ४ ॥

( ४ ) तुम्हां संकटाचे वेळे । काय झांकितों मी डोळे ?॥ १ ॥
सेवकाचा साभिमान । समर्थाचें हें लक्षण !' ॥ २ ॥
देव म्हणे ' दासजनीं । चिंता न धरावी मनीं ॥ ३ ॥

( ५ ) रे मी भक्तांचा कोंवसा । मनीं धरावा भरंवसा ॥ १ ॥
कोप येतांचि ते घडी । घेइन काळाची नरडी ॥ २ ॥
दासां सांभाळावें सदा । मज आणिक नाहीं धंदा ' ॥ ३ ॥
रामभेटीचा समये । रामदासीं सांगतां न ये ! ॥ ४ ॥

देव भक्ताचा अत्यंत लोभाळु आहे. गाईचे वत्सावर नसेल इतके त्याचें भक्तावर प्रेम असतें. भक्ताकडून अन्याय सहसा घडत नाहीं पण क्वचित् घडलाच तर तो तत्काळ क्षमा करितो— 'भक्ताचा साभिमानी तो । बुद्धिदाता परोपरी.' व्यवहारांत ' धणी ते लालची मोठे । सेवकू चोरटे जनीं ' असे असतात म्हणून भांडवलवाले व मजूर यांचे तंटे होतात ! इकडे देव दयाळु व उदार असून घे घे म्हणून सेवकाच्या मागें लागतो व स्वामीचें ऐश्वर्य पाहून संतोष मानणारा हा भक्त मला कांहीं नको म्हणून सांगतो— तरी देव त्याचें ऐश्वर्य वाढवीत असतो ! हा स्वामीसेवकसंबंध किती गोड

## ८ निष्काम भक्ताचें ऐश्वर्य

आहे बरें ! समर्थ सांगतात कीं, आपला क्षुद्र स्वार्थ सोडून जो देवाचा अनन्य भक्त होतो त्याचें ऐश्वर्य तर तो वाढवितोच पण 'त्यास वोढेल हे सृष्टी' म्हणजे सारे लोक त्याला अनुकूळ होतात. हें (समर्थ सांगतात) आमचें अनुभवाचें बोलणें आहे—

**भक्त होईल देवाचा । सर्व संसार सांडुनी ।**
**त्यास वोढेल हे सृष्टी । यदर्थीं संशयो नसे ॥**
**प्रत्यय वाक्य नेमाचें । कित्येक जाणती जनीं ।**
**देव तो आपुला जाला । वैभवा कोण पूसतें ! ॥**
**टाकितां लावितो मागें । देव दाताचि जाहला ॥**
**घ्यावें तें कोणतें किती । त्रैलोक्य भरलें असे ॥**
**दाता अनंत भुजांचा । भडसा पुरवीतसे ।**
**'पुरे पुरे पुरे आतां ' । देव देतां विटेचिना ! ॥**
**भक्त तो घेइना कांहीं । देवें त्रैलोक्य दीधलें ।**
**सर्वही सांडिलें दोघीं । येकमेकांसि लाविती ॥**
**दया हे थोर देवाची । भक्ताला वज्रपंजरु ।**
**अभावें भर्वसा नाहीं । मूढाला निश्चयो नसे ! ॥**

### ९ रामकृष्णचरित्रशतकें

रामकृष्णचरित्रविषयक तीन प्रकरणे आहेत. त्यांतील एकांत संक्षिप्त रामचरित्र सांगितलें असून दुसऱ्यांत संक्षिप्त कृष्णचरित्र गाइलें आहे व तिसऱ्यांत रामकृष्णांची एकरूपता दाखविली आहे. राम व कृष्ण यांच्यांत कोणताच संप्रदाय भेद मानीत नाहीं; समर्थही रामाचे एकनिष्ठ उपासक होते तरी रामकृष्णांची अभेदताच त्यांनीं मानिली आहे. रामचरित्राचे प्रारंभीं साहजिकच वाल्मीकीचें व रामकथेचें त्यांनीं गौरव केलें आहे. 'रामाचेनि नामें वाल्हा तो वाल्मीक' जाला व त्यानें शतकोटिरामायण रचिलें. असें 'भविष्य दुजा कवण करी?' वाल्हा कोळी होता तो ब्रह्मादिकांना रामचरित्रगायनानें

मान्य झाला. रामकथा ही गोदावरीसारखी पवित्र आहे.

**गोदावरी कथाकीर्ति या रामाची । संसारव्यथांची विश्रामता ॥**
**विश्रामता जाली रामउपासकां । जैसी ते चातका जळवृष्टि ॥**
**जळवृष्टि केली वाल्मीक ऋषीनें । तयाचें वचन सांगईन ॥**

रामानें पित्याच्या वचनासाठीं वैभव सोडलें, वनवास पत्करिला, 'रामचंद्रें बाणीं ताटका पिटिली । शिळा उद्धरिली हेळामात्रें' इ० लीला केल्या, रावणास मारून राम सिंहासनाधीश झाला व रामराज्याचें सुख प्रजेस दाखविलें, हा सारा कथाभाग एका शतकांत सांगितला आहे. 'दुष्टांचा संहार धर्माची स्थापना' यासाठीं रामावतार झाला. रामराज्याचें सुख प्रजेस अपरिमित झालें. 'भक्ति करी राम गाईब्राह्मणांची । सीमा मर्यादेची उल्लंघीना.' राम 'जनांसी उपाय हनूमंत' ठेवून आपण वैकुंठास गेले.

**हनूमंतीं राम आहे निश्चयेंसीं । रामीं रामदासीं ऐक्यभाव ॥**

कृष्णचरित्र असेंच गोड वाणीनें समर्थांनीं गाइलें आहे.

**यादवांचे कुळीं गोकुळीं गोविंद । आनंदाचा कंद अवतरला ॥**
**अवतरला पूर्ण अच्युत अनंत । आयुधें मंडित चतुर्भुज ॥**
**निजरूप देवें सांडूनी कौतुक । जाहला बाळक नंदजीचें ॥**

माभळभटाची फजीती केली; पूतना, रिठासूर, शकटासूर, कालिया, कग, बक, धेनुक, मल्ल चाणूर, कंस, शिशुपाल, काळयवन, जरासंध इ० थोरथोर असुर कृष्णानें मारले व यादवांसह सुखानें राज्य केलें.

**विश्वलोक नांदे जयाचे उदरीं । गाई राखे हरी गौळियांच्या ॥**
**पांडवांचा सखा सर्व साहकारी । संकटीं कैवारी द्रौपदीचा ॥**
**उपदेशिला दास श्रीकृष्णें आपुला । अवतार जाला पूर्ण आतां ॥**

रामकृष्णांच्या एकरूपतेचे श्लोक ३४ असून एकदां रामाचें व एकदां कृष्णाचें गुणवर्णन करून शेवटीं 'म्हणे दास द्वैतास हो नातळावें । जळाचे

परी सर्वभूतीं मिळावें' असें म्हटलें आहे. 'करीं बाण कोदंड हें ठाण देखा' हें रामाचें ध्यान, तर 'चतुर्भूज पीतांबरू चक्रपाणी' हें कृष्णाचे ध्यान! 'गुणें आगळा' श्रीकृष्ण तर 'प्रतापें बळें आगळा राम.' जेथें योद्धय कोणी नाहीं ती अयोद्धा रामाची तर 'घरें सुंदरे द्वारका पुण्यभूमी' कृष्णाची. 'चरित्रें विचित्रें करी कृष्णनाथु', 'उभा राम तूणीर बांधूनि पाठी' तर 'त्रिभंगीं उभा रूप लावण्यपेटी' असा कृष्ण. कृष्णरूपाने समर्थांस मोहिलें होतें—

**ढळेना प्रिती लागली माधवाची। उभी साजिरी मूर्ति हे चित्सुखाची॥**
**कृपाळू हरी अंतरीं सर्व जाणे।तया देखतां सर्वही सूख बाणे॥**
**तनू सांवळी वेणु वाहे त्रिभंगीं। क्रिडा कौतुकें गोपिगोपाळसंगीं॥**
**स्वयें जाहला कृष्ण हा विश्वसत्ता। धरीं रे मना गोपिनाथा समर्था॥**

रामानें रावण मारिला तर कृष्णाने कंस मारला व दोघांनीं देवांचे बंध तोडून लोक सुखी केले. दुष्टदमन व सुष्टसंरक्षण हें दोन्ही अवतारांचें एकच कार्य. 'नसे काळ दुष्काळ उद्वेग चिंता' ही रामसत्ता, व 'बहू दैत्य संहारिले' ही कृष्णसत्ता. राम सूर्यवंशाचें भूषण तर कृष्ण चंद्रवंशाचें भूषण. मारुती भीमपराक्रमी पण 'भला मारुती जिंकिला कृष्णनाथें। रणीं रक्षिलीं पांडवें तीं अनाथें.' 'मनीं सर्वदा सर्व कापट्य जागे' असा कृष्णनाथ बलीच्या द्वारीं 'याचकू भीक मागे!' राम नित्यनिर्मळ खरा पण 'येणे राघवें मारिला व्यर्थ वाळी। नव्हे नीति हे सर्व केली धुमाळी!' असें म्हणणारे आहेतच! शिवाय सीतेसाठीं रानावनांत 'करुणास्वरें आळवी जानकीतें' तो राम धीर कसा म्हणावा? रामकृष्णचरित्रांतही असे दोष धुंडणारे लोक आहेतच! ते विचार करीत नाहींत कीं रामाचे ठायीं कामलेश असता तर 'सीतेवीणही राज्य केलें सुरेशें' हें कसें शक्य होतें? रामाने प्रेत उठविले ( व कृष्णानें गुरुपुत्र आणिला ) हे पराक्रम काय भलत्याच्या हातून होतात?

**समस्तांमधें सार गोपाळकाला। तया देखतां चाखतां जीव धाला॥**
**स्वयें सवंगड्यां वांटितो कृष्ण पाहा। गडी खेळती तोचि आनंद माहा॥**

समर्थ एकदां पंढरीस गेले. त्यांनीं एका अभंगांत म्हटल्याप्रमाणें तेथें विठ्ठलासमोर हनूमंत उभे आहेत म्हणून ते हनूमंताच्या दर्शनासाठीं गेले. मारुतिराय रामाशिवाय कोणापुढें हात जोडून उभे राहणारे नव्हत व ते ज्याअर्थीं विठ्ठला-सन्मुख उभे आहेत त्याअर्थीं समर्थांना विठ्ठलदर्शनार्थ गाभाऱ्यांत जावें लागलें ! तेथें विठ्ठलानें त्यांना रामरूपानें दर्शन दिले !

**१० रामकृष्ण एकरूप**

**येथें उभा कां श्रीरामा। मनमोहन मेघश्यामा॥ १ ॥**
**काय केली सीताबाई। येथें राही रखुमाई ॥ २ ॥**
**काय केली अयोध्यापुरी। येथें वसवीली पंढरी ॥ ३ ॥**
**काय केलें वानरदळ। येथें मिळवीले गोपाळ ॥ ४ ॥**

'रामीं रामदासीं भाव। तैसा होय पंढरीराव.' राम आणि विठ्ठल (कृष्ण) एकच !

**राम कृपाकर विठ्ठल साकार। दोघे निराकार एकरूपें १**
**आमुचिये घरीं वस्ती निरंतर। हृदयीं एकाकार राहियेले २**
**दास म्हणे धरा भक्तिप्रेमभाव। कृपाळु राघव पांडुरंग ३**

विठाई ही वैकुंठींहून भक्त पुंडलीकासाठीं येऊन भीमातीरीं भक्तांसाठीं उभी राहिली आहे तीच 'रामदासाची माउली' आहे. पंढरीस असतांना समर्थांनीं कृष्णावर अनेक पदें व प्रकरणें लिहिलीं तीं मोठीं प्रेमळ आहेत.

**सकळ कळांचा हरी। भेटवा वो झडकरी।**
**तयावीण देहा उरी। नाहीं साजणी ॥ १ ॥**
**डोलत डोलत चाले। श्रवणीं कुंडल हाले।**
**भेदिक वचन बोले। चित्तचोरटा ॥ २ ॥**

* * *

**सुरस मधुर वेणु । वाजवितो रुणुझुणु ।**
**विकल होताहे प्राणु । भेटीकारणें ॥ १ ॥**
**अखंड लागलें ध्यान । स्वरूपीं गुंतलें मन ।**
**सकळ पाहतां जन । आठवे हरी ॥ २ ॥**
**सकळ सांडुनी आस । तयालागीं उदास ।**
**फिरे रामीरामदास । वेधु लागला ॥ ३ ॥**

समर्थांचीं असलीं पदें पाहतां, नाथतुकोबांच्या गौळणींची आठवण येते. 'ये रे यादवा ये रे माधवा । हृदयनिवासा देवा!' गोवर्धनोद्धारी कान्हा सांवळा हरि हा वृंदावनीं मंजुळ वेणु वाजवूं लागला तेव्हां सर्वजण तल्लीन झालीं—'पशुपक्षी जाहलीं पिसीं.'

**दासां सुख देतुसे तो हा गोपाळवेषें ।**
**आसनीं शयनीं कृष्ण भासे ॥**

## ११ जुना दासबोध व रामभक्ति

'जुन्या दासबोधांत' समर्थांच्या रामभक्तीसंबंधाने तीन समास पाहण्यासारखे आहेत. ७ व्या समासांत 'सगुणध्यान' व १५ व्या समासांत 'रघुनाथचरित्र' वर्णिलें आहे. 'देव घननीळ सांवळा । मुकुट कुंडलें मेखळा । रुळे वैजयन्ती माळा । आणि पीतांबरु ॥' असा शेषशायी महाविष्णु रामकृष्णादि अवतार घेतो. 'शिव आणि विष्णु । दोघां एकचि तनु । भिन्नत्व नाहीं.' हरिहरात्मक हा देव भक्तांना प्रत्यक्ष प्रगट होतो असें समर्थांनीं ह्या ७ व्या समासांत स्वानुभवानें स्पष्ट सांगितलें आहे. 'एका भावार्थासाठीं । देव लागे भक्तापाठीं । भाव नसतां जगजेठी । प्राप्त नाहीं.' विमलभावाशिवाय देवाची भेट होणार नाहीं. त्यासाठीं 'सगुणमूर्तीचीं चरित्रें । श्रवण करावीं पवित्रे । ध्यानें विविधें विचित्रें । अंतरीं धरावीं' हा अभ्यास निष्ठापूर्वक प्रथमपासून ठेवला पाहिजे. 'निग्रह नेमाचें बळ । असतां प्राप्ति तत्काळ' होते. 'देह पडे कां देव जोडे' असा निग्रह पाहिजे. कडकडीत

वैराग्य पाहिजे, देहपांग अगदीं नसावा. प्रपंचआशा नसावी. ‘सर्वस्वाची आस तुटे। तरीच सगुणमूर्ति प्रगटे.’ कांतापुत्रधनाचें ध्यान सर्वांसच पूर्वाभ्यासेंकरून असतें. ‘प्रपंच करावा ऐसें। कोणासी सांगणेंच नलगे.’ प्रपंचाचें समूळ विस्मरण पडून देवाचेंच ध्यान लागलें असतां देव आपण होऊन भक्तापाठीं लागतो व त्याला सर्वस्वें पाळतो. १५ वा समास तर रामभक्तांनीं मुखोद्गत करावा. त्याचें नित्य चिंतन करावें. तेथें पहिल्या १८ ओव्यांत समर्थांनीं रामध्यानाचा प्रकार सांगितला असून पुढील साऱ्या ओव्या रामभक्तिरसानें ओथंबलेल्या आहेत. सुहास्यवदनापासून तों चरणापर्यंत राममूर्तिध्यान वर्णिलें आहे तें मूळांतच पहावें.

**चरणीं वांकी तोडर गर्जती। पाउलें मांडीवर एक क्षिती।**
**तेथें रामदासाची वस्ती। कदा वियोग न साहे॥ १८॥**
**राम सर्वांगसुंदर। राम करुणेचा सागर।**
**दीना अनाथांचा उद्धार। एक श्रीराम कर्ता॥ १९॥**
**राम जीवाचा जिव्हाळा। राम मनाचा कोवळा।**
**राम जाणे अंतर्कळा। निजदासाची॥ २४॥**
**वैभवें रावण माजलें। तेणें सकळ देव गांजिले।**
**ऐसें जाणूनि धांवणें केलें। वैकुंठींहूनि राघवें॥ २६॥**
**राम सुरवरांचा कोवसा। राम मंडन सूर्यवंशा।**
**रामजप भवानीशा। सप्रेम चित्त रामनामें॥ ३०॥**

समर्थ सांगतात कीं, राम माझा स्वामी आहेच, पण ‘जे जे शरण गेले। यांचाचि जाला’ असा उदार आहे.

**आतांही जयास वाटे भेटावें। रामें मज सांभाळीत जावें।**
**ऐसें दृढ घेतलें जीवें। तरी ऐका मी सांगेन॥ ३७॥**

‘श्रीराम जयराम जयजयराम’ असा कांहीं एक जपाचा नियम करावा म्हणजे ‘आत्माराम जोडेल नियमें’ असें समर्थ निश्चयात्मक सांगतात.

जप मात्र अंतरींच करावा, कोणासी कळों नेदावा. कृपण जसा सांपडलेल्या ठेव्याला जपतो, तसा रामानुभव अंतरीं एकान्तांत ध्यावा. विकल्प मनांत अगदीं येऊं न देतां मेरूप्रमाणें निश्चळ व निष्कंप असावें. प्रपंचीं आघात किंवा देहासी आपदा आल्या तरी ' राम विसरूं नये. '

**अखंड नाम स्मरावें । परी दुसरियासी कळों नेदावें ।**
**निदिध्यास लागलियां राघवें । पाविजे तात्काळ ॥ ४३ ॥**

रावणानें वैरभावानें रामचिंतन केलें तर तोही तरून गेला, मग दास्यभावानें प्रेमाने जो राम चिंतील तो उद्धरल्यावांचून कसा राहील? मात्र होणारे साक्षात्कार लोभानें कोणाला सांगूं नयेत. हा मी आपले जीवाचा अनुभव सांगतों —

**कांहीं साक्षात्कार जाला । तो सांगों नये दुसरियाला ।**
**जरी आळकेपणें सांगितला । तरी पुन्हा होणार नाहीं ॥ ४५ ॥**

द्रव्यठेवा प्रगट केला तर राजदूत हिरावून नेतील. लोकांत प्रसिद्धी व्हावी, लोकांनीं बरें म्हणावें, या लौकिकासाठीं साक्षात्कार सांगितला तर राम दुरावेल. ज्याला राम पाहिजे त्यानें लौकिकाची वासना (प्रतिष्ठेचा लोभ) सोडला पाहिजे. ' निदिध्यास जालियां नेमेसी । साक्षात्कार होय ' हें निश्चित होय. शब्दज्ञानाच्या घमेंडींत राहून राम गमावूं नकोस. एवढा प्रबळ व दयाळ स्वामी नामनिष्ठेनें व चिंतनसुखाने जोडतो हा महत्तम लाभ होय. समर्थ रामानें ज्याचा अंगीकार केला तो कळिकाळाला वंद्य होतो. शब्दज्ञान काय होय? क्रिया म्ह० आचरण मुख्य होय.

**सगुण उच्छेदावें । आणि निर्गुण प्रतिपादावें ।**
**परि तें निर्गुणचि स्वभावें । सगुण होतें ॥ ५९ ॥**
**भक्ति सगुणाचीच घडे । निर्गुणीं भेद समूळ उडे ।**
**तेथें जो वेगळेपणें पडे । तो मूर्ख जाणावा ॥ ६१ ॥**

भक्ति सगुणाचीच होते, निर्गुण आपण अंगें व्हावयाचें असतें. तेथें मौनच योग्य आहे. प्रपंचवणवा पेटला, त्याला परमार्थानें जाळिलें व

आपण विझाला —'तेथें रामदास जळोनि गेला । धांवणें करा कोणी!' तात्पर्य, रामदास 'रामीं निजधामीं विश्रांति पावला.'

दुसऱ्या समासांत रामासाठीं आपण सर्वत्याग केला असें समर्थ सांगतात.

> **रामचंद्रा ! तुझा वियोग । ऐसा नको रे प्रसंग ।**
> **तुजकारणें सर्वसंग । त्यक्त केला ॥ २ ॥**
> **रामा ! तुझिये स्वामीपणें । मी ब्रह्मांड मानीं ठेंगणें ।**
> **स्वामी ! तुजविण कोण जाणे । अंतर आमुचें ॥ ३ ॥**

संक्षेपांत सांगायचें म्हणजे, 'तुजकारणें जिवलगांचा । संग सोडिला.' रामकृपेने आपण कसे रामरूप व धन्य झालों हें समर्थांनीं १६ व्या समासांत सांगितलें आहे पण त्याचा विचार पुढें होणार आहे.

### १२ मनोबोध व रामभक्ति

मनाच्या श्लोकांत समर्थांची रामैकनिष्ठा चांगलीच प्रगट झाली आहे. 'अनंत अशा राघवाचा पंथ' जनांस दाखविण्यासाठीं ह्या श्लोकांची रचना झाली. राम सगुण आहे, निर्गुण आहे व सगुणनिर्गुणातीत आहे हें यांत सांगितलें असून त्याला पावावयाचा मार्ग येथें सांगितला आहे. मनोबोधाचा विचार अन्यत्र केला असल्यामुळें या ठिकाणीं फक्त सगुण रामाचे व त्याच्या कथेचे जे उल्लेख आले आहेत तेवढ्यांचाच विचार करूं. 'प्रभाते मनीं राम चिंतीत जावा,' 'सदासर्वदा प्रीति रामीं धरावी' म्हणजे संसारदुःखाचें विस्मरण होतें. रावणानें कुडी ( वाईट, परस्त्रीसंगतीची) वासना धरल्यामुळें तो प्राणास व राज्यास मुकला (१३). 'मना राघवेंवीण आशा नको रे'—रामाला सोडून मानवाचे गुण गाऊं नकोस; वेदशास्त्रपुराणे ज्याचे गुणानुवाद गातात त्याचे गुण गाइल्यानें सर्व कांहीं श्लाघ्यवाणें म्ह० गोड होतें (१८). 'न बोलें मना राघवेंवीण कांहीं'—फालतु गोष्टी बोलण्यानें आयुष्य व्यर्थ जातें व त्यांत कांहीं सुखही नाहीं (२३). 'रघूनायकासारिखा स्वामी'

शिरीं असल्यावर दंडधारी काळासही भिण्याचें कारण नाहीं (२८). श्लोक २८ ते ३७ फार बहारीचे आहेत.

**दिनानाथ हा राम कोदंडधारी। पुढें देखतां काळ पोटीं थरारी॥**
**पुरी वाहिली सर्व जेणें विमानीं। नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥२९॥**

रामाचा दास होऊन राहतो त्याची राम कधीं उपेक्षा करीत नाहीं हें येथें अहल्या, मारुति, बिभीषण यांचीं उदाहरणें देऊन उत्तम प्रकारें मनावर ठसविलें आहे. समर्थांची ही प्रासादिक वाणी महाराष्ट्राच्या कानावर सतत पडत आहे. हे सुंदर श्लोक सर्वलोकप्रिय आहेत. 'समर्थाचिया सेवका वक्र पाहे। असा सर्व भूमंडळीं कोण आहे?' ही समर्थांची दणदणीत वाणी कोणी ऐकली नाहीं?

**महासंकटीं सोडिले देव जेणें। प्रतापें बळें आगळा सर्वगूणें॥**
**जयातें स्मरे शैलजा शूलपाणी। नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥३१॥**
**अहल्या शिळा राघवें मुक्त केली। पदीं लागतां दिव्य होऊनि गेली॥**
**जया वर्णितां शीणली वेदवाणी। नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥३२॥**
**वसे मेरुमांदार हे सृष्टिलीळा। शशीसूर्य तारांगणें मेघमाळा॥**
**चिरंजीव केले जनीं दास दोन्ही। नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥३३॥**

सृष्टिरचनेच्या परमात्म्याच्या अनंत लीलांपैकीं मेरुमांदारादि पर्वत, चंद्रसूर्य, तारांगणें व मेघमाळा आहेत तोंवर रामाने आपले दोन भक्त—मारुतिराय व बिभीषण यांना चिरंजीव करून ठेवलें आहे म्ह० रामाच्या कृपेनें त्यांच्यावर काळाची सत्ता चालत नाहीं!

**असे हो जया अंतरीं भाव जैसा। वसे हो तया अंतरीं देव तैसा॥**
**अनन्यासि रक्षीतसे चापपाणी। नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥३५॥**
**सदासर्वदा देव सन्नीध आहे। कृपाळूपणें अल्पधारिष्ट पाहे॥**
**सुखानंद आनंद कैवल्यदानी। नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥३६॥**

मना! परम समाधान देणाऱ्या रामाला आपलें सर्व चांचल्य देऊन तूं रामरूपीं अखंड वस्ती करून निश्चळ रहा (४०). दीनपरिपालनाचा

त्याचा बाणा आहे: ‘दिनानाथ हें तोडरीं ब्रीद गाजे। मना सज्जना राघवीं वस्ति कीजे’ (४२). राघवाची कथा गाऊन तूं मौन धरून रहा. ‘नसे राम तें धाम सोडोनि द्यावें। सुखालागिं आरण्य सेवीत जावें’ (४४). कल्पनांच्या मागें लागलास तर कधींच रामभेटी होणार नाहीं, ‘मनीं कामना राम नाहीं जयाला,’ ज्याच्या मनीं राम नाहीं त्याच्याच मनीं वासना, कल्पना, आशा, तृष्णा या बुजबुजत असतात! (५९).

**घनश्याम हा राम लावण्यरूपी। महाधीर गंभीर पूर्णप्रतापी॥**
**करी संकटीं सेवकाचा कुडावा। प्रभाते मनीं राम चिंतीत जावा॥६७॥**
**सुखानंदकारी निवारी भयातें। जनीं भक्तिभावें भजावें तयातें॥**
**विवेकें त्यजावा अनाचार हेवा। प्रभाते मनीं राम चिंतीत जावा॥६९॥**

रामाचें ध्यान जसें गोड आहे तसें त्याचें नामही अतिशय गोड आहे. रामनाम हें खरोखर सारभूत व साधनश्रेष्ठ आहे (७५). ‘समस्तामधें नाम हें सार आहे’ (८१).

**बहू चांगलें नाम या राघवाचें। अती साजिरें स्वल्प सोपें फुकाचें॥**
**करी मूळ निर्मूळ घेतां भवाचें। जिवां मानवां हेंचि कैवल्य साचें॥८८॥**

तात्पर्य —

**भजाया जनीं पाहतां राम येकू। करीं बाण येकू मुखीं शब्द येकू॥**
**क्रिया पाहतां उद्धरे सर्व लोकू। धरा जानकीनायकाचा विवेकू॥१३१॥**

## १३ अभंग, पदें वगैरे

१

**ध्यान लागलें रामाचें। दुःख हरपलें जन्माचें॥ १॥**
**रामपादांबुजावरी। वृत्ति गुंतली मधुकरी॥ २॥**
**रामवदनमयंकीं। चक्षुचकोर जाले सुखी॥ ३॥**
**तनु मेघश्याम मेळे। चित्तचातक निवाले॥ ४॥**
**कीर्तिसुंदरतरुवरी। कूजे कोकिला अंतरीं॥ ५॥**
**रामीरामदास-स्वामी। प्रगटले अंतर्यामीं॥ ६॥**

'राम सांवळा सुंदर। कासे मिरवी पीतांबर,' 'मुकुट किरीट कुण्डलें। तेज रत्नांचें फांकलें,' 'धन्य सूर्यवंश पुण्यपरायण' इ० अभंग रामदासी लोकांत प्रिय आहेत व ते फार सुंदर आहेत. ध्यानाचे दोन अभंग पहा—

२

छेत्री सुखासनीं अयोध्येचा राजा। नांदतसे माझा मायबाप ॥ १ ॥
माझा मायबाप त्रिलोकीं समर्थ। सर्व मनोरथ पूर्ण करी ॥ २ ॥
पूर्ण प्रतापाचा कैवारी देवांचा। नाथ अनाथांचा स्वामी माझा ॥ ३ ॥
विसंभेना कदा आपुल्या दासासी। रामीरामदासीं कुळस्वामी ॥ ७ ॥

३

रत्नजडित सिंहासन। वरी शोभे रघुनंदन ॥ १ ॥
वामांकीं ते सीताबाई। जगज्जननी माझी आई ॥ २ ॥
पश्चाद्भागीं लक्षुमण। पुढें अंजनीनंदन ॥ ३ ॥
भरत शत्रुघ्न ते भाई। चामरें ढाळिति दोहीं बाहीं ॥ ४ ॥
नळनीळ जांबुवंत। अंगद सुग्रिव बिभिषण भक्त ॥ ५ ॥
देहेबुद्धी नेणों कांहीं। दास अंकित रामापायीं ॥ ६ ॥

४

राम माझी माये कंई भेटईल। वोरसें देईल आलिंगन ॥ १ ॥
संसारींचें दुःख दाटलें मानसीं। तें मी तुजपासीं सांगईन ॥ २ ॥
उतावेळ चित्त उभारूनि बाहे। रामदास पाहे वाट तूझी ॥ ३ ॥

५

कां वो रामराये! दुरी धरियेलें। कठिण कैसें जालें चित्त तुझें ॥ १ ॥
देउनी आळिंगन प्रीतिपडिभरें। कैं मुख पीतांबरें पुससील ॥ २ ॥
घेउनी कडिये धरुनी हनुवटी। कैं गुजगोष्टी सांगसील ॥ ३ ॥
रामदास म्हणे केव्हां संबोखिसी। प्रेमपान्हा देसी जननिये ॥ ४ ॥

६

दासाची संपत्ती राम सीतापती। जीवाचा सांगाती राम एक ॥ १ ॥
राम एक माता राम एक पिता। राम एक भ्राता सहोदर ॥ २ ॥
सहोदर विद्या वैभव कांचन। सर्व हा स्वजन राम एक ॥ ३ ॥
राम एक स्वामी राम हा कैवारी। लाभ या संसारीं राम एक ॥ ४ ॥
राम एक ज्ञान राम एक ध्यान। राम समाधान रामदासीं ॥ ५ ॥

७

ठकाराचें ठाण करीं चापबाण । माझें ब्रह्मज्ञान ऐसें आहे ॥ १ ॥
रामरूप देहो जाला निःसंदेहो । माझे मनीं राहो निरंतर ॥ २ ॥
मुखीं रामनाम चित्तीं घनश्याम । होतसे विश्राम आठवितां ॥ ३ ॥
रामदास म्हणे रामरूपावरी । भावें मुक्ति चारी वोवाळीन ॥ ४ ॥

८

राघवाची भक्ति ज्ञानाचें मंडण । भक्तांचें भूषण राम येक ॥ १ ॥
नलगे पिंडज्ञान नलगे तत्त्वज्ञान । राघवाचें ध्यान आठवितां ॥ २ ॥

९

रामाचें भजन तेंचि माझें ज्ञान । तेणें समाधान पावईन ॥ १ ॥
रामासी वर्णितां देहीं विदेहता । जाली तन्मयता सहजचि ॥ २ ॥
राघवाचें रूप तें माझें स्वरूप । तेणें सुखरूप निरंतर ॥ ३ ॥

१०

संसारींचें दुःख मज वाटे सुख । राघवाचें मुख पाहतांचि ॥ १ ॥
माझें सुख माझ्या राघवाच्या पाईं । तेणें मी हृदयीं निवईन ॥ २ ॥

११

समर्थाचें उणें सेवकां मरण । तेणें गुणें शीण होत असे ॥ १ ॥
'पतितपावन' नाम कैसें राहे । कासावीस होये जीव माजा ॥ २ ॥
यालागीं राघवें भक्तां उद्धरावें । आपुलें राखावें ब्रीद देवा ॥ ३ ॥
माझें सर्व जावो तुझें नाम राहो । हान्त्रि माझा भावो अंतरींचा ॥ ४ ॥
रामदास म्हणे भलतें करावें । आधीं उद्धरावें सेवकासी ॥ ५ ॥

१२

रामभक्तीविण अनु नाहीं सार । साराचेंही सार रामनाम ॥ १ ॥
रामदास म्हणे रामभक्तीविणें । जाणावें हें उणें सर्व कांहीं ॥ ६ ॥

१३

जाणे सुखदुःख राम माझा येक । येर ते माईक वैभवाचीं ॥ १ ॥
अंतरींची व्यथा श्रीरामा समर्था । जाणवल्या चिंता दूरी करी ॥ ५ ॥
करी प्रतिपाळ शरण आलियांचा । राम त्रैलोक्याचा मायबाप ॥ ६ ॥
मायबाप धन सज्जन सोयरा । येका रघुवीरावीण नाहीं ॥ ७ ॥

**नाहीं मज चिंता श्रीराम असतां । संकटीं बोहातां उडी घाली ॥ ९ ॥**
**अंतरींचें गुज राम सर्वबीज । रामदासीं निज प्रगटलें ॥ १० ॥**

समर्थांच्या पदांतही भक्तिप्रेमा कसा वोसंडून येत आहे पहा —

'निदान पाहसी किती दयाळा । निदान पाहसी किती' ह्या गोड पदांत 'जळीं तूं पाषाण तारिलेस त्यांहून कां मी जड आहें?' असें समर्थांनीं लाडिकपणें विचारिलें आहे. पदाचा शेवट –

**वृत्ती जडली पायांपासीं । जेवीं गुळासि गुंतली माशी ।**
**देहीं असोनि गुप्त कां होसी । दास उदास देहभावासी ॥ ४ ॥**

* * * *

(१) **वेध लागला रामाचा । सुखरविश्रामाचा ॥ ध्रु० ॥**
(२) **रामा ! चाल रे झडकरी । त्रिभुवन हरुषे भारी ॥ ध्रु० ॥**
(३) **आठवे मनीं आठवे मनीं । आठवे मनीं सदा राम चिंतनीं ॥ध्रु०॥**
(४) **कल्याणधामा । रामा कल्याणधामा ॥ ध्रु० ॥**
(५) **रामा हो जयरामा हो । पतितपावना पूर्णकामा हो ॥ ध्रु० ॥**

अशीं किती तरी पदें व पदांचीं ध्रुवपदेंही गुणगुणत रामप्रेम लुटावेंसें वाटतें.

(६) **श्रीगुरुचें चरणकंज हृदयीं धरावें ॥**
(७) **आम्ही काय कुणाचें खातों रे । तो राम आम्हांला देतो रे ॥**

समर्थांच्या आरत्या महाराष्ट्रांत घरोघर झाल्या आहेत. 'सुखकर्ता दुखहर्ता' ही गणपतीची, 'लवथवती विक्राळा' ही शंकराची, 'पंचानन हयवाहन' ही खंडोबाची, 'अघहरणी पुष्करणी' ही व्यंकटेशाची, इ० आरत्या लोकप्रसिद्ध आहेत.

'साफल्या निजवल्लया' ही एक व 'नाना देहीं देव एक विराजे' ही एक अशा रामाच्या दोन व 'सत्राणें उड्डाणें' ही मारुतीची एक अशा तीन आरत्या सर्वत्र म्हणण्यांत येतात.

याशिवाय ळळितें, सवाया, भजनें बहुत आहेत.

समर्थांच्या रामोपासनेचें स्वरूप ह्या प्रकरणावरून वाचकांच्या नीट ध्यानांत यावें. आतां रामोपासनेचेंच अंग 'मारुतिउपासना' तिकडे वळूं.

---

## २ मारुतिउपासना

**१ बलसंवर्धक उपासना**

राम आणि मारुति हे रामोपासकांचे एकरूप दैवत आहे: 'राम हनूमंत आत्मरूपी.' साखर आणि गोडी इ० दृष्टान्तही येथें अपुरे पडतात. आमची कुळवल्ली हनूमंत ही राममंडपावर वेंघली असून 'आमुचे कुळीं हनूमंत । हनूमंत आमुचे दैवत । तयावीण आमुचा परमार्थ । सिद्धीतें न पावे कीं'—आमचा सखा साहकारी हनूमंत असून आमुचा सद्गुरु—आमुचें आराध्य दैवत—राम आहे असें समर्थांनीं म्हटले आहे. आमुचा स्वरूपसंप्रदाय अयोध्यामठाचा असून आमचे देवदेवी रामसीता हे आहेत व 'मारुती-उपासना नेमस्त । वाढविला परमार्थ रामदासीं.' आदिनारायण—महाविष्णु—हंस—ब्रह्मा—वसिष्ठ—राम—रामदास ही रामदासांनीं आपली गुरुपरंपरा स्वतःच दिली आहे.

**वसिष्ठ उपदेशी श्रीरामरायासी । रामें रामदासीं उपदेशिलें ॥**

समर्थांना उपदेश साक्षात् श्रीरामरायाचा होता. 'उपदेश देवोनी दिधला मारुती । स्वयें रघुपति निरवीत.' रामानें उपदेश देऊन मला मारुतिरायाच्या स्वाधीन केलें, म्हणून तो 'रामदासा साहाकारी । सांभाळितो परोपरी.' 'त्याचा मी म्हणती जनीं,' मी मारुतिरायाचा (सेवक अगर अवतार) आहें असें लोक म्हणतात! समर्थांनीं मारुतीची उपासना केली व लोकांत वाढविली. वारकरी संतही गरुड हनूमंत यांना मानतात पण समर्थांनीं मारुतीची एकान्तिक भक्ति केली. प्रत्येक खेड्यांत एक तरी मारुतीचें देऊळ असतें व प्रत्येक तालमींत मारुतीची एक मूर्ति असून शनिवारीं मारुतीची

आरती करतात. या गोष्टी समर्थांनीं सुरू केल्या अशी समजूत आहे. मारुतीची लघूशी मूर्ति करून ती ' असावी सदा ताइतामाजि दंडीं । समरांगणीं पाठ दीजे उदंडीं. ' तालीमबाजांपैकीं कांहींच्या दंडाला मारुतीची मूर्ति असते, पण शिवकालीं किंवा नंतर मराठी वीरांच्या दंडाला ती असे किंवा काय याचा शोध मला लागला नाहीं. महाराष्ट्रीय लोकांची तालमीकडे मूळचीच प्रवृत्ति होती, समर्थांच्या प्रेरणेमुळें मारुतिराय तालीम व व्यायाम करणाऱ्या लोकांचें अधिदैवत झालें. ' काय भक्तीच्या त्या वाटा। मज दावाव्या सुभटा ' अशा प्रकारें पूर्वींच्या संतांनीं मारुतिरायाला भक्तीच्या वाटा पुसल्या होत्या पण ' वीरमारुती ' मात्र समर्थांनींच लोकांच्या पुढें ठेवला यांत शंका नाहीं. दास मारुती रामापुढें हात जोडून उभा असतो. वीरमारुती हातीं गदा घेऊन समरांगणावर जाण्यास सज्ज असतो. समर्थांनीं स्वहस्तानें अकरा मारुती स्थापिले व हजारों त्यांच्या प्रेरणेनें स्थापिले गेले.

रामाच्या दासांतला अग्रेसर जो मारुती त्याची उपासना समर्थांना फार प्रिय होती. दोघांतही साम्य होतें. अविप्लुत ब्रह्मचर्य, निःस्सीम रामभक्ति, वरिष्ठ प्रकारची बुद्धिमत्ता म्ह० शक्ति, भक्ति व युक्ति या तीन गुणांत मारुतीची बरोबरी करणारा दुसरा कोण आहे? मारुतीचे लोकोत्तर पराक्रम व धर्मसंस्थापनेसाठीं अवश्य तें दुष्टदमनसामर्थ्य यांची प्रत्यक्ष मूर्ति म्ह० मारुतिरायच. मारुतीच्या मूर्ति समर्थांनीं जागोजाग स्थापन केल्या त्या मारुतिरायाच्या वरील गुणांचें अनुकरण करण्याची प्रेरणा तरुणपिढीला व्हावी या हेतूनेंच. समर्थांनीं आपल्या रामायणांत व भीमरूपी स्तोत्रांतही मारुतिरायांच्या भीमपराक्रमाची, त्यांच्या बुद्धिमत्तेची व उत्कृष्ट रामभक्तीची प्रशंसा केलेली आहे, त्यांच्या लोककल्याणकारित्वाची स्तुति केली आहे. ' बलभीम ', ' बजरंग ' हीं विशेषणें एकट्या मारुतीलाच लावलेलीं आहेत. आपल्या बलानें दुष्टांना भिवविणारे म्हणून ' बलभीम ' मारुति वज्रदेही—वज्रांग—बज्रांग—बजरंग. मारुतीचा जयजयकार 'बजरंग बली की जय'

याप्रमाणे करितात. खुद्द रामरायांनीं मारुतीला ज्या गुणांबद्दल प्रशस्तिपत्र दिल्याचें वाल्मीकि सांगतात ते गुण असे —

**शौर्यं दाक्ष्यं बलं धैर्यं प्राज्ञता नयसाधनम् ।**
**विक्रमश्च प्रभावश्च हनूमति कृतालयः ॥**

समर्थांनीं मारुतीला एका पद्यांत 'रामदासाचा सारथी' म्हटले आहे.

**हा तो ईश्वरी अवतार । भीम सकळांसी आधार ।**
**रामध्यानीं निरंतर । भक्तराज ॥**
**राम गेले वैकुंठासी । तें निरविलें हनुमंतासी ।**
**'तुवां माझिया भक्तांसी । सांभाळावें' ॥**
**रामदासाचा सारथी । विघ्नें चळचळां कांपती ।**
**पावे संकटीं मारुती । भर्वशानें ॥**

मारुती आपला संरक्षक आहे याविषयीं समर्थांनीं आपले अनुभव अनेक ठिकाणीं सांगितले आहेत.

(१) **प्रभूचें महावाक्य तां साच केलें**
**म्हणे दास हें प्रत्यया सत्य आलें ।**
**जनामाजी हें सांगतां पूरवेना**
**अवस्था मनीं लागली हे सरेना ॥**

(२) **कष्टी जाला जीव केली आठवण ।**
**पावला किराण मारुतीचें ॥**

समर्थशिष्य दिनकर यांनींही आपले अनुभव असेच सांगितले आहेत. "निर्विलें राघवें यासी सांभाळीं दास आमुचे । तयांची सर्वही चिंता मारुती तुजला असे ॥ नसे हे अन्यथावाणी प्रत्यक्ष साक्ष बाणली," असें दिनकर गोसावी म्हणतात. कल्याणस्वामींचाही हाच अनुभव आहे. हे अनुभव २५० वर्षांपूर्वींचे असले तरी आजही येणें अशक्य नसावें. दीडशें वर्षांपूर्वीं देवनाथांसही याचा अनुभव आला होता.

समर्थांनीं वीरमारुतीचीं स्तोत्रें कांहीं विशेष हेतूनें रचलेलीं आहेत.

**२ वीरमारुती**

त्यांनीं रामायणापैकीं फक्त 'सुंदरकांड' व 'युद्धकांड' या दोन कांडांवरच आपल्या 'रामायणा'ची उभारणी केली आहे, याचें बीज समर्थांच्या हनूमद्भक्तींत आहे. ह्या दोन कांडांत मारुतीचे पराक्रम व रामरावणयुद्ध यांचेंच वर्णन आहे. महाराष्ट्रांतील तरुणांपुढें 'शक्ति, युक्ति व भक्ति' या गुणत्रयाचा पुतळा उभा करावा व मुख्यतः शक्तिसंपादनाकडे त्यांची प्रवृत्ति व्हावी हा समर्थांचा हीं मारुतिस्तोत्रें रचण्यांत प्रधान हेतु उघड दिसत आहे. त्यांची मारुतीची आरती सर्वप्रिय आहेच—

**सत्राणें उड्डाणें हुंकार वदनीं ।**
**करि डळमळ भूमंडळ सिंधूजळ गगनीं ।**
**कडाडिलें ब्रह्मांड धोका त्रिभुवनीं ।**
**सुरवर नर नीशाचर त्यां जाल्या पळणी ॥ १ ॥**
**जय देव जय देव जयजय हनुमंता ।**
**तुमचेनि प्रसादें न भियें कृतांता ॥ ध्रु० ॥**
**दुमदुमिलें पाताळ उठिला पडशब्द ।**
**धगधगिला धरणीधर मानिला खेद ।**
**कडाडिले पर्वत उडुगणउच्छेद ।**
**रामीं रामदासा शक्तीचा शोध ॥ २ ॥**

सत्राण म्ह० प्रचंड. 'सत्त्वाची सुटे सत्राण । वाहुटळी' (ज्ञाने० १५-१८३). शक्तीचा (सीतादेवीचा, आदिशक्तीचा) शोध घेण्यासाठीं मारुतीनें जें प्रचंड उड्डाण केलें त्यामुळें देवदानवमानवांत भयंकर खळबळ उडाली, त्याच्या हुंकारयुक्त उड्डाणानें त्रैलोक्य घाबरलें, पर्वत कडाडले व ब्रह्मांडाला धोका उत्पन्न झाला ! पृथ्वीवर लोळणाऱ्या मानवांना त्या गगनव्यापी उड्डाणानें खडबडून जागें केलें व मारुतीचा प्रसाद जे जोडतील त्यांना

कृतान्तालाही भिण्याचें कारण उरणार नाहीं असा धीर दिला! केवढी वीर्यवती वाणी आहे ही! असा रामभक्त पराक्रमी पुत्रही महावीर्यवती अंजनीमातेच्या उदरीं जन्मला. नाशिक-त्र्यंबकेश्वरच्या वाटेवर अंजनीचा डोंगर आहे. रामकार्यार्थ मारुतीला अर्पण केल्यावर ही तपस्विनी रामचिंतन करीत ह्या डोंगरावर राहिली होती. रावणाचा वध केल्यावर रामलक्ष्मणसीता यांसह मारुतिराय विमानांतून अयोध्येला परत जात असतां विमान या डोंगरापाशीं आलें तेव्हां ' लंकेहूनी अयोध्ये येतां । रामलक्षुमणसीता । हनूमंतें अंजनिमाता । दाखविली रामा. ' चौघें विमानांतून खालीं उतरलीं, त्यांनीं अंजनीस वंदन केलें, सीतादेवीनें मारुतीच्या पराक्रमाची स्तुति केली. ती ऐकून ती वीरमाता अंजनी उसळून म्हणाली, ' काय याच्या पराक्रमाची एवढी मोठी स्तुति करितां ?—

**हा कां माझ्या उदरीं आला। गर्भींहुनि कां नाहीं गळला।**
**आपण असतां कष्टवीला। कां स्वामी राम॥**
**माझ्या दुग्धाची हे प्रौढी। कळिकाळाची नरडी मुरडी।**
**रावणादिक हीं बापुडीं। घुंगुरटीं काय॥**

रामाला मारुतीच्या पराक्रमाचें बीज त्याच्या वीर्यवती आईच्या प्रकृतींत आहे हें कळून आलें. माता वीर्यवती असल्याशिवाय वीरपुत्र निर्माण होणें कठिण आहे. हें अंजनीगीत, भीमरूपी स्तोत्रे आपल्या बायकांच्या म्हणण्यांत पहिल्यापासून आहेत व त्यांच्याठायीं मारुतिभक्ति विशेष स्पष्ट दिसते. मारुतीसारखा सर्वगुणसंपन्न पुत्र व्हावा अशी वासना त्यांच्या पोटीं असावी. पुढील भीमरूपी तरी सर्वप्रिय आहे—

**भीमरूपी महारुद्रा वज्रहनुमान मारुती।**
**वनारी अंजनीसूता रामदूता प्रभंजना॥ १॥**
**महाबळी प्राणदाता सकळां उठवी बळें।**
**सौख्यकारी शोकहर्ता धूर्त वैष्णव गायका॥ २॥**

**लोकनाथा जगन्नाथा प्राणनाथा पुरातना ।**
**पुण्यवंता पुण्यशीला पावना परतोषका ॥ ४ ॥**
**ध्वजांगें ऊचली बाहो आवेशें लोटला पुढें ।**
**काळाग्नी काळरुद्राग्नी देखतां कांपती भयें ॥ ५ ॥**
**ठकारे पर्वताऐसा नेटका सडपातळू ।**
**चपलांग पाहतां मोठें महाविद्युल्लतेपरी ॥ ८ ॥**
**आरक्त देखिलें डोळां गिळिलें सूर्यमंडळा ।**
**वाढतां वाढतां वाढे भेदिलें शून्यमंडळा ॥ १३ ॥**
**भूतप्रेतसमंधादी रोगव्याधी समस्तही ।**
**नासती तूटती चिंता आनंदें भीमदर्शनें ॥ १४ ॥**

सकळांचा हा प्राणदाता 'सकळां ऊठवी बळें'—निजलेल्यांना जागे करितो. जन्मतः यानें सूर्यमंडळावर, तें पक्व फळ आहे असें समजून, झांप घातली—उपजत महत्त्वाकांक्षाच प्रचंड ! पोरांना उठपळ देवऋषींकडे व वैद्यांकडे नेऊन औषधाच्या बाटल्या त्यांच्या पोटांत रिचवणाऱ्या मूढांना ते सांगतात कीं, मुलांना मारुतीची उपासना लावा; प्रातःस्नान, रामभजन, सूर्यनमस्कार घालायचें वळण लावा म्हणजे भूतप्रेतसमंधादिकांची त्यांना बाधा होणार नाहीं, तीं मुलें निश्चित व आनंदमय होतील. रोगव्याधि मारुतिउपासनेनें दूर होतात हें समर्थांनीं एका स्तोत्रांत स्वानुभवानें सांगितले आहे. वृद्धपणीं कफवातानें एकदां समर्थ आजारी पडले; पण मारुतीच्या कृपेने खडखडीत बरे होऊन उठले--

'उठवीं मज अनाथा दूर सारूनि वेथा' आणि 'माझी काया पूर्ववत् दृढ करा' अशी त्यांनीं मारुतीची करुणवाणीनें प्रार्थना केली.

**तुजविण मज पाहें पाहतां कोण आहे ?**
**म्हणउनि मन माझें रे ! तुझी वाट पाहे ।**
**मज तुज निरवीलें पाहिजे आठवीलें**
**सकळिक निजदासांलागिं सांभाळवीलें ॥ ५ ॥**

**उचित हित करावें उद्धरावें धरावें**
**अनहित न करावें त्वां जनीं येश घ्यावें ।**
**अघटित घडवावें सेवकां सोडवावें**
**हरिभजन घडावें दुःख तें वीघडावें ॥ ९ ॥**
**कृपणपण नसावें भव्य लोकीं दिसावें**
**अनुदिन करुणेचें चिन्ह पोटीं वसावें ।**
**वडिलपण धरावें सेवकां सांवरावें**
**अनहित न करावें तूर्त हातीं धरावें ॥ १० ॥**

भक्ताची प्रार्थना देव ऐकणार नाहीं असें कधीं घडलें आहे काय? 'कपि घन करुणेचा बोळला रामवेधें' व समर्थांची वज्रकाया झाली व ते सुखी झाले. मारुतिराय दासाचें संरक्षण करितात असा आपला स्वानुभव समर्थांनीं अनेकदां सांगितला आहे: 'सदा सर्वदा रामदासासि पावे। खळीं गांजितां ध्यान सोडूनि धांवे' म्हणून 'पावे मारुति संकटीं भर्वशाने' अशी निष्ठा ठेवून त्याची उपासना करावी.

**३ भीमरूपी स्तोत्रांचें स्वरूप**

सर्व भीमरूपी स्तोत्रें वीररसानें मुसमुसलीं आहेत. प्रत्येकांत मारुतिरायाच्या पराक्रमाचें व एकेक प्रसंगाचें वर्णन आहे. ह्या स्तोत्रांत समर्थांच्या रामायणापेक्षां अधिक रसानुभव घेतां येतो. ह्यांत वीररस व अद्भुतरस या दोन्ही रसांचें मिश्रण आहे. वाणी सुबोध, सरल व ओजस्वी आहे. मारुतीचें बाळरूप व बाळलीला यांचें एका स्तोत्रांत सुरस वर्णन आहे. 'जनीं ते अंजनी माता जन्मली ईश्वरी तनू' व तिच्या उदरीं जें बाळ जन्मलें तें 'अतूळ तूळणा नाहीं मारुती वातनंदनु.'

**चळे तें चंचळे नेटें बाळ मोवाळ साजिरें ।**
**चळताहे चळचळी बाळ लोवाळ गोजिरें ॥**
**हात कीं पाय कीं सांगों नखें बोटें परोपरी ।**
**दृष्टीचें देखणें मोठें लांगूळ लळलळीतसे ॥**

मवाळ म्ह० मनाचा सौम्य व लोवाळ म्ह० लव्हाळ्यासारखा मृदु, सकुमार.

**बाळानें गिळिला बाळू स्वभावें खेळतां पहा।**
**आरक्त पीत वाटोळें देखिलें धरणीवरी॥**

ह्या बाळानें म्ह० मारुतीनें तो बाळ म्ह० बाळसूर्य खेळतां खेळतां गिळिला! पोरे खेळांत माती उकरून खात असतात, पण ह्या बाळानें तेजोगोलच गिळला, स्वतःच तेजोगोल झाला! अंजनी ही 'ईश्वरी तनु' म्ह० शबल ब्रह्म किंवा मूळमाया—तिच्यापासून मारुति ( प्राण ) झाला व प्राणाचाही प्राण राम परब्रह्म—असे हें मारुतीउपासनेचें म्हणजे उपनिषदांतील प्राणोपासनेचे रहस्य आहे. असो. आपण मारुतीच्या सगुणरूपाकडेच लक्ष देऊं. मारुती बाल असतानाच 'पवनासारिखा धांवे वावरे विवरे बहू.' हा असला प्रचंड योद्धा गिरीसमोर उभा राहिला कीं, 'हा गिरी तो गिरी पाहे' असेच लोकांस वाटे. हा लंकेंत गेला तेव्हां वृक्षावर गुप्त राहिला व—

**मागुता प्रगटे धांवे झेंपावे गगनोदरीं।**

व हा वृक्षावर बसला तेव्हां 'कडाडां मोडतीं झाडें' व हा प्रासादांवरून उड्या मारीत गेला तेव्हां 'वाड वाडे उलंडती!'

मारुतीचा कोप ( शत्रूंवरचाही ) भयानक असायचाच!

**कोपला रुद्र जे काळीं ते काळीं पाहवेचि ना।**
**बोलणें चालणें कैंचें? ब्रह्मकल्पांत मांडला॥**

त्याच्याशीं बोलेल चालेल कोण? सभेंतलीं भाषणें, चर्चा, वितंडवाद हे कार्यकर्त्या वीराला सुचत नसतात!

**ब्रह्मांडाहून तो मोठा स्थूळ उंच भयानकू।**
**पुच्छ तें मुर्डिलें माथां पाऊल शून्यमंडळा॥**

**मार्तंडमंडळाऐसे दोन्ही पिंगाक्ष ताविले।**
**कर्कशा घर्डिल्या दाढा उभे रोमांच ऊठिले॥**
**अद्भूत वेश आवेशें कोपला रणकर्कशु।**
**धर्मसंस्थापनेसाठीं दास तो उठिला बळें॥**

षड्रिपूंपैकीं कोप हा एक आहे. पण धर्मस्थापनेचें कार्य साधून देणारा कोप—वीराचा आवेश—हा महागुणच आहे! कामकोपादि सामान्यतः शत्रु खरे, पण त्यांचा तारतम्यानें विनियोग करितां आला तर हेच मित्र होतात. जाणते धर्मसंस्थापनेसाठीं त्यांचा उपयोग करून घेतात. दुष्टदमन व सुष्टसंरक्षण हीच धर्मस्थापना. धर्म यज्ञरूप आहे. यज्ञाला गाई व ब्राह्मण अवश्य आहेत. दूध, तूप, दहीं यज्ञाच्या हविर्भागाला लागतात व ब्राह्मण मंत्र म्हणायला लागतात म्हणून गाईब्राह्मणांचें प्रतिपालन यांत सर्व प्रजांचे कल्याण आहे. कृष्णपरमात्मा किंवा शिवराय यांसारखे जातिवंत क्षत्रिय गोब्राह्मणप्रतिपालक म्हणजेच धर्मसंस्थापक असतात.

चामरवृत्तांतल्या एका भीमरूपीची ओळख करून देऊन हें प्रकरण पुरें करितों. मारुतिराय त्रिकुट गिरीवर ( लंकेस ) गेले, त्या वेळची त्यांच्या पुच्छाची तेथील कामगिरी पहा —

**हीन देव दीनरूप देखतांचि पावला**
**गड्गडीत घड्घडीत कड्कडीत कोपला।**
**लाटि कूटि पाडि फोडि झोडि झोडि झोडिला**
**दैत्यतोक एक हाक सर्व गर्व मोडिला॥**
**काळदंडसें प्रचंड तें ( पुच्छ ) वितंड जातसे**
**भारमार राजमार पुच्छमार होतसे।**
**पाडिले पछाडिले रुधीरपूर न्हातसे**
**दैत्य बोलती 'बळें पळोन काय ग्यातसे'॥**

काळकूट तें त्रिकूट धूट धूट ऊठिलें
दाट थाट लाट लाट कूट कूट कूटिले ।
घोर मार ते सुमार लूट लूट लूटिले
चिर्डिलेचि घर्डिलेचि फूट फूट फूटिले ॥

वज्रपुच्छ त्यासि तुच्छ मानिलें निशाचरीं
सर्वही खणखणाट ऊठिले घरोघरीं ।
फुटेचिना तुटेचिना समस्त भागले करीं
लटलटीत कांपती बहूत धाक अंतरीं ॥

हात पाय मान माज वोढितें पछाडितें
अडचणींत अडकवूनि पीळ पेंच काढितें ।
हस्तमार दैत्यमार दंडमार होतसे
लंडसे कलंडले उलंडलेचि भंडसे ॥

गुप्तरूप मारुती दशाननाकडे भरे
मुकूट पाडिला शिरीं कठोर वज्र ठोसरे ।
सभा विटंबिली बळेंचि गर्गरीत वावरे
बलाढ्य दैत्य मारिले कठीण पुच्छ नावरे ॥

बळें चपेट मारिला उदंड दैत्य हारिला
तरारिला थरारिला भयंकरू भरारिला ।
गद्‌गदी तनू वितंड सागरीं सरारिला
जानकीस भेटला प्रभूकडे झरारिला ॥

मारुतीची ही लंकेची पहिली धूळभेट म्हणजे ' थोर धाक एक हाक काळचक्र वावरे ' याची निशाणीच होय. युद्धाकांड पुढें !

**४ अभंग व पदें**

समर्थांनीं मारुतिरायावर कांहीं अभंग व पदें केलीं आहेत. अभंगांत प्रायः मारुतिचरित्र संक्षेपानें गाइले आहे व पदांत त्याची करुणा भाकली आहे. मारुती " हा तो ईश्वरी अवतार । भीम सकळांसि आधार । रामध्यानीं

निरंतर । भक्तराज ॥ राम गेले वैकुंठासी । तैं निरविले हनुमंतासी । तुवां माझिया भक्तांसी । सांभाळावें" असे एका ठिकाणीं त्यांनीं म्हटले आहे. मारुतीने अनेक संकटांतून माझे रक्षण केलें आहे व रामाज्ञेप्रमाणें तो अनेक रामभक्तांचे रक्षण करीत आहे. 'स्वधामासि जातां प्रभू रामराजा । हनूमंत तो ठेविला याचि काजा ॥ सदा सर्वदा रामदासासि पावे । खळीं गांजितां ध्यान सांडूनि धांवे ॥' लोकोद्धारासाठीं रामानें मारुतीला चिरंजीव केले आहे: "हनूमान मी नमीं । मज भेटविलें रामीं । विघ्नांचिया कोटिश्रेणी । अंतरोनी ॥ राम उपासकांवरी । अतिप्रेम पडिभरी । होवोनीयां कैवारी । निवारी दुःख ॥" मारुति हा विश्वप्राण आहे: 'मुख्य प्राणासी पूजिले । रामदर्शन घडले.' मारुति-उपासनेमुळें मला रामदर्शन घडलें व मी कृतार्थ झालों असें समर्थांनीं अनेकवार म्हटलें आहे. मारुतिरायाच्या उपासनाबळावर मी निर्भय आहें. माझा मायबाप मारुति आहे, त्याच्या अनुग्रहानें मला परस्त्री मातेसमान झाली.

**बाप माझा ब्रह्मचारी । मातेसमान अवघ्या नारी ॥**
**उपजतां बाळपणीं । गिळूं पाहे वासरमणी ॥**
**स्वामीकृपेची साउली । रामदासाची माउली ॥**

रामदासांसंबंधीं कोणी कांहीं वांकडेतिकडें लिहिले आहे व त्याचें म्यां या ग्रंथांत खंडण करावें अशा मला कोणी कोणी सूचना केल्या होत्या, पण चिखलांत हात घालून मग तो धूत बसण्याची मला जरूरी वाटत नाहीं. महापुरुषाची निंदा कानानें ऐकूं नये, डोळ्यांनीं वाचूं नये, मुखानें बोलूं नये, 'माध्यान्हीं थुंकतां सूर्यावरी । तो थुंका उडे आपणावरी' हें निंदक विसरतात. असो.

## अभंग

पडतां संकट जीवा जडभारी। स्मरावा अंतरीं बलभीम ॥
बलभीम माझा सखा सहोदर। निवारी दुस्तर तापत्रय ॥

* * * *

जिकडे जिकडे जाती भक्त। पाठीं जाय हनुमंत ॥
रामउपासना करी। मारुति नांदे त्याचे घरीं ॥
दास म्हणे ऐसें करा। सदा मारुति हृदयीं धरा ॥

## पद

कैवारी हनुमान। आमुचा। कैवारी हनुमान ॥ ध्रु० ॥
पाठी असतां तो जगजेठी। वरकड काय गुमान ॥ आमुचा० ॥ १ ॥
नित्य निरंतर भजका रक्षी। धरूनियां अभिमान ॥ आमुचा० ॥ २ ॥
दासा रक्षी हाचि भरंवसा। वदतों त्याची आण ॥ आमुचा० ॥ ॥ ३ ॥

आणखी काय सांगायचें आहे ? ' सामर्थ्याचा गाभा तो हा भीम भयानक उभा. '

मारुतिसख्या बलभीमा रे ॥ ध्रु० ॥
अंजनिचें वचनामृत सेवुनि। दाखविसी बलसीमा रे ॥

कल्याणस्वामीही म्हणतात—

अहो जी बलभीमा बलभीमा ॥ ध्रु० ॥
भक्तजनांतें निरवुनि आम्हां। स्वामी गेले निजधामा ॥ १ ॥

त्यांचें पुढील सुंदर पदही मननीय आहे—

कैपक्षी भीमराया। निगमांतर विवराया।
ब्रह्मानंद वराया। चंचळ मन आवराया ॥ ध्रु० ॥
संकट दुष्ट हराया। मार कुमार कराया।
गुरुपदरेणु धराया। भाविक जन उद्धराया ॥ १ ॥
रघुपतिचा कैवारी। दुर्घट विघ्न निवारी।
भजन पूजन मंदवारीं। कल्याण जनहितकारी ॥ २ ॥

मारुतिराय कैवारी झाले म्हणजे वेदाचें रहस्य उलगडतें, ब्रह्मानंद मिळतो, चंचल मन आवरलें जातें, दुष्टजन व संकटें यांचा नाश होतो, गुरुचरणीं मति स्थिर होते, भाविक उद्धरतात व जनांचें हित होतें. मारुति-उपासनेपासून हे सारे लाभ होतात.

---

## ३ तुळजापूरची भवानी

समर्थांचें उपास्य राम व उपासना मारुतीची हें आपण येथवर पाहिले.

### १ तुळजापूरची तुकाई

त्यांच्या उपासनेचें आणखी एक अंग आहे. तुजळापूरची भवानी ही त्यांची कुलस्वामिनी होती. शिवाजीमहाराजांचीही कुलस्वामिनी तुळजापूरची भवानी हीच होती, तेव्हां समर्थ व शिवाजी यांच्या ऐक्यांतला हा एक महत्त्वाचा दुवा होता. एकाच भवानीदेवीचे दोघे उपासक, त्यामुळेंच जणूं तिनें दोघांच्याही चित्तांत एकाच जातीची प्रेरणा केली! आदिमाया आदिशक्ति–हिचीं मुख्य स्थानें महाराष्ट्रांत चार आहेत. तुळजापूरची भवानी उर्फ तुकाई, माहूरची ( औंधचीही ) रेणुका उर्फ यमाई, कोल्हापूरची महालक्ष्मी व सप्तशृंगीची महिषासुरमर्दिनी. ह्या चार स्थानांची माहिती व नाथांचें आदिमायेवरील अत्यद्भुत व ओजस्वी भारूड मी मागें दुसऱ्या खंडांत ( पृ० ४३१ ते ४३९ ) दिलेलें वाचकांनीं आधीं पहावें व नंतर समर्थांच्या ह्या भवानीस्तोत्रांकडे ( हीं ७।८ आहेत ) लक्ष पुरवावें. तुळजापूरची भवानी ही महाराष्ट्रांतील बहुतेक घराण्यांची कुलस्वामिनी आहे. निंबाळकर, भोंसले, इ० प्राचीन क्षत्रिय घराणीं भवानीच्या उपासकांचीं आहेत. शिवाजीमहाराजांची प्रसिद्ध तलवार 'भवानी' या नांवानेंच प्रसिद्ध होती. समर्थांनीं शिवरायांस लिहिलेल्या एका पत्रांत 'विवेक विचार सावधपणें। दीर्घ प्रयत्न करणें। तुळजावराचेनि गुणें। रामें रावण मारिला ॥ ऐसी हे तुळजाभवानी । प्रसिद्ध

रामवरदायिनि ' असें म्हटलें आहे. भवानीला तुकाई हें नांव केव्हां कसें पडलें याविषयीं समर्थांनीं भवानीच्या एका स्तोत्रांत एक गोष्ट दिली आहे. रामलक्ष्मण हे सीताशोधार्थ गिरिकंदरीं हिंडत असतांना ह्या आदिमायेनें 'परस्त्री नाणिती दृष्टी' ह्या त्यांच्या शीलाची परीक्षा पाहिली. रूपलावण्यवती अशा कुमारीचें रूप घेऊन बालचेष्टा करीत ती त्यांच्यापुढें अकस्मात् प्रगट झाली. तेव्हां त्यांनीं तिला ओळखलें—

**ते सूर्यवंशिंचे राजे । विख्यात भुवनत्रयीं ।**
**नेमस्त न्यायनीतीचे । करिती धर्मस्थापना ॥**
**येकांतीं देखिली त्यांनीं । देखिले त्या कुमारिनें ॥**
**' कैंची तूं कोण तूं काई ? । नाम तें कोणतें तुझें ? '**
**म्हणे ' रे मीच तूकाई । जा तुम्हां वर दीधला ।**
**मनाच्या कामना होती । सीताशुद्धि तुम्ही करा ' ॥**

लक्ष्मणाला तुकाईने तेथें बसल्या जागींच लंका दाखविली तेव्हां त्यांचा तिच्यावर विश्वास बसला. तिला 'रामवरदायिनी' तेव्हांपासून म्हणतात. तीच तुळजापुरीं प्रगट आहे.

**प्रसन्नमूख सुंदरा । तुझेन हे वसुंधरा ॥**
**तुझेंचि नांवरूप हो । दिसे तुझें स्वरूप हो ॥**
**तुझेनि सर्व बोलणें । तुझेनि सर्व चालणें ॥**
**तुझेनि योगधारणें । तुझेनि राजकारणें ॥**

ही तुळजामाता आमच्या कुळाची स्वामिनी आहे असें मी बाळपणीं ऐकत होतों. आतां ती म्यां पाहिली—ओळखिली आहे. सर्वांचें मूळ म्हणून हिला मूळमाया म्हणतात. सृष्टीची ही आदिशक्ति, सर्व प्राणी हिच्यामुळें चालतात व वागतात म्हणून हिला आदिशक्ति म्हणतात. 'जगदात्मा जगदीश्वरी। परमात्मा परमेश्वरी' हीं सर्व हिचींच नांवें आहेत. ही सूक्ष्मांत सूक्ष्म व स्थूलांत स्थूल आहे. सर्व कांहीं हीच आहे. हिला जाणल्यामुळें 'तुटली सर्वही चिंता। निवालों अंतरीं सुखें.' ह्या

जगन्मातेनें माझ्या सर्व मनकामना पुरविल्या आहेत, 'प्रस्तुत प्रत्ययो आतां। रक्षिते बहुतांपरी.' ही प्रसन्न असली कीं 'अंतरीं स्फूर्तिरूपें प्रकाशते,' पण ही रागावली तर मात्र खरूज, नायटे, नानारोग, आधिव्याधि सर्व मागे लावते! ही मूळमाया जगज्ज्योति आहे. हिचें सामर्थ्य फार मोठें आहे.

**प्रसिद्ध तुळजामाता। श्रीरामवरदायिनी॥**
**कुळासी पाळिलें मूळीं। आतां आम्हांसि पाळिते॥**
**पूजितां तुळजामाता। तेणें सुखचि होतसे॥**
**विध्युक्त होमहवनें। नवरात्र घटस्थापना॥**
**रामदास म्हणे माझी। माता ही जगदीश्वरी॥**
**ऐश्वर्य सर्व शक्तीचें। विवेकें प्रत्ययें पहा॥**

समर्थ एकदां श्रेष्ठांचा नवस फेडण्याकरितां प्रतापगडीं गेले होते, तेव्हां त्यांनीं भगवतीची पूजा करून एक स्तोत्र रचिलें. त्यांत जगदंबेने अंगीकारल्यापासून आपले सर्व प्रकारे कल्याण झाले आहे असे धन्यतेचे उद्गार त्यांनीं काढले आहेत. त्यांचा उल्लेख अन्यत्र येणार आहे. त्यांत त्यांनीं म्हटले आहे कीं, "मी तुझ्या कृपेने कृतकृत्य झालों आहें तेव्हां मला स्वतःसाठीं कांहीं मागावयाचे उरले नाहीं, पण —

**येकची मागणें आतां द्यावें तें मजकारणें।**
**तुझा तूं वाढवीं राजा शीघ्र आम्हांचिदेखतां॥**

'शिवाजीराजाचे ऐश्वर्य वाढीव, त्याच्या राजाचा विस्तार आमच्या डोळ्यांदेखत होऊं दे' एवढें एकच मागणें तुझ्यापाशीं मी मागत आहें!" शिवाजीमहाराजांवर समर्थांचें किती अकृत्रिम प्रेम होतें हें या एकाच गोष्टीवरून सिद्ध होत आहे. ह्या स्तोत्रांतून समर्थांचें राज्यतंत्र काय होतें याचाही उलगडा होत आहे.

समर्थ म्हणतात —

२ रामवरदायिनी शक्ति

**दुःखदारिद्र्यउद्वेगें । लोक सर्वत्र पींडिले ॥**
**मुळींची कुळदेव्या हे । संकटीं रक्षिते बळें ॥**
**उन्मत्त रावणें येणें । त्रैलोक्य पीडिलें बळें ॥**
**देव ते घातले बंदी । कैपक्षी राम पावला ॥**

उन्मत्त रावणानें देव बंदी घातले व त्याच्या त्रासामुळें लोक दारिद्र्य-दुःखानें विविध प्रकारांनीं गांजले तेव्हां लोकांचा कैवारी राम पावला. तसाच प्रसंग आतां आहे !

**विश्वाची साक्षिणी माता । विश्वमाता म्हणोनियां ॥**
**श्रीमंत करंटे केले । रक्षिले पाळिले किती ॥**
**दुष्ट संहारिले मागें । ऐसें उदंड ऐकतों ॥**
**परंतु रोकडें कांहीं । मूळ सामर्थ्य दाखवीं ! ॥**

भवानीमातेनें आपले मूळ सामर्थ्य दाखविले व शिवाजीराजांचा अवतार झाला ! '**राम**' वरदायिनी तीच '**शिव**' वरदायिनी झाली ! " हीच तुळजापूरची भवानीमाता प्रतापगडावर प्रगटली आहे. ही आमची कुळदेवता आहे. हिनेंच आमचे कुळ पाळिले, आमचे बहुतापरी रक्षण केलें. ' ही वैष्णवी माया । तारिते मारिते जनीं. ' ही भक्तांना तारिते व दुष्टांना मारिते. ही आदिशक्ति आहे. ही आपल्या भक्तांना शक्तिबळ देते. शक्तिबळानें युक्तिबळ वाढतें व शक्तियुक्ति जेथें एकवटतात तेथें नारायणाचा आविष्कार होतो. शक्तीवांचून संसार धड होत नाहीं, मग राजकारण कोठचें ?

**शक्तीनें पावती सुखें । शक्ति नस्तां विटंबना ॥**
**शक्तीनें नेटका प्राणी । वैभवें भोगतां दिसे ॥**
**कोण पुसे अशक्ताला । रोगीसें बराडी दिसे ॥**
**शक्ति तों सर्वहि सुखें । शक्ति आनंद भोगवी ॥**
**सार संसार शक्तीनें । शक्तीनें शक्ति भोगिजे ॥**
**शक्ति तो सर्वही भोगी । शक्तीवीण दरिद्रता ॥**

**शक्तीनें मिळती राज्यें । युक्तीन यत्न होतसे ॥**
**शक्ति युक्ति जये ठायीं । तेथें श्रीमंत धांवती ॥**

योगेश्वर कृष्ण व धनुर्धर पार्थ जेथें आहेत तेथें श्री, विजय, ऐश्वर्य, नीति सर्व कांहीं आहे ह्या गीतातत्त्वाचा शेवटच्या वचनांत अनुवाद केलेला आहे. शक्तीचें वैभव येथें समर्थांनीं आपल्या तेजस्वी वाणीनें उत्कृष्ट वर्णिलें आहे. शक्ति म्ह० शरीरबळ व युक्ति म्ह० योगबळ, बुद्धिबळ. दोन्ही जेथें आहेत तेथेंच यशाची प्राप्ति आहे. शक्ति व युक्ति जेथें नांदतात तेथेंच प्रयत्न सुफलित होतात. ' अचूक चुकेना कोठे । त्याचीं राज्यें समस्तहीं ' शक्तियुक्तिबळानें अचूक प्रयत्न ज्याला करितां येतात त्याच्या हातीं पृथ्वीचें राज्य येईल.

नामर्द ' सदा दुश्चित लालची ' असतो पण ' उदंड खस्तिचीं कामें । मर्द मारूनि जातसे ' हें प्रत्यक्षच आहे. कुटिल व फितवेखोर यांचा सुळसुळाट जेथें होतो व त्यांचा बंदोबस्त करण्याची खबरदारी जेथे घेतली जात नाहीं, ज्यावर प्रजा संतुष्ट नाहीं, त्या ' मूर्खाचें राज्य राहेना ' असें राजकारणाचें तत्त्व समर्थांनीं पुढील २।४ श्लोकांत फार बहारीने सांगितलें आहे —

**लोकांसी राखणें राजी । तें राज्य प्रबळे बळें ॥**
**नेटकें कार्य साधावें । रोधावें कुटिळा जनां ॥**

युक्तीवीण कार्यभाग होत नाहीं पण युक्तीला शक्ति पाहिजे. ' तस्मात् शक्ती प्रमाण ही.' याला दृष्टान्त रामाचाच. रामानें काय केलें ?

**मुक्त केल्या देवकोटी । सर्वही शक्तिच्या बळें ॥**
**समर्थ भवानीमाता । समर्था वरु दीधला ॥**

शरीरशक्तीला युक्तिबळ पाहिजे व दोन्हीला अध्यात्माचें, आदिशक्तीच्या उपासनेचें, बळ पाहिजे हें समर्थांना येथें सांगावयाचें आहे. पहिलें हरिभजन व दुसरें राजकारण; चळवळींना सामर्थ्य येतें पण तें भगवंताचें अधिष्ठान असल्यानें निःसंदेह येतें हा समर्थांचा सिद्धान्त आहे.

## ३ खबरदार राजा

राजा खबरदार, विवेकी, सर्वसाक्षपी, सर्वांना राजी राखणारा, सर्वांची चिंता वाहणारा असला, कीं त्याला व त्याच्या प्रजेला बहुत सुख होतें. त्याचे मोठमोठे अंमलदार यांवरही ञ्याचा वचक पाहिजे.

**पोरांला माय जाणेना । ते पोरें वांचती कशीं ? ॥**
**गुराखा राखितो पोरें । धणी दोहींस पाळितो ॥**

येथें पोरें व गुरें म्ह० प्रजा, गुराखी म्ह० राजाचे कारभारी व माय व धणी म्ह० राजा ! राजानें नुस्तें कारभाऱ्यांवर लक्ष ठेवून भागायचें नाहीं, ते प्रजेस त्रास देत नाहींत हेंही त्यानें पाहिलें पाहिजे. त्याचें लक्ष दोघांवर पाहिजे, त्यानें दोघांचें पालन केले पाहिजे ! अंमलदार वेळेला प्रजापीडकही असतात —

**धणी तो राहिला मागें । कारबारीच नासती ॥**
**पाप हें थोर लोकांचें । सांगावें कवणापुढें ? ॥**

प्रभु जाणता नसला; स्वबुद्धीनें चालणारा नसला; परीक्षक नसला; हिशेबठिशेब बारकाईनें पाहणारा नसला; लांचलुचपत, चोरी, घालमेली यांजकडे बारीक नजर ठेवणारा नसला म्हणजे तें राज्य नव्हे, ती बेदादनगरीच !

**लोकांचे गोष्टीनें वर्ते । प्रत्यये पाहिल्याविणें ॥**
**आळसें चाळणा नाहीं । स्वता बुद्धि असेचिना ।**
**मोठें तें पाप लोकांचें । प्रभु तो जाणता नव्हे ॥**
**वर्ततो शिकविल्या बोलें । तो काय म्हैसमंगळू ॥**

* * * *

**शक्तीवीण कोण आहे । हें तों विचारून पाहें ।**
**शक्तीविरहित न राहे । येश कीर्ति प्रताप ॥ १ ॥**
**शिवशक्तीचा विचारु । अर्धनारीनटेश्वरु ।**
**दास म्हणे हा विचारु । तत्त्वज्ञानी जाणती ॥ २ ॥**



## ८ ‘ श्रीराम राम हें म्हणा ’

‘श्रीराम राम हें म्हणा’ ह्या पालुपदाचें एक सुंदर दशक आहे. ‘जनासि सांगतों खुणा । श्रीराम राम हें म्हणा’ असें समर्थांनीं म्हटलें असून शंकर पार्वतीला ‘ विशेष गूज’ सांगतात तें विशद केलें आहे. शंकर म्हणतात—

**विषें बहूत जाळिलें । विशेष अंग पोळलें ।**
**प्रचीत माझिया मना । श्रीराम राम हें म्हणा ॥ ३ ॥**
**बहुत प्रेत्न पाहिले । परंतु सर्व राहिले ।**
**विबूधपक्षरक्षणा । श्रीराम राम हें म्हणा ॥ ५ ॥**
**अपाय होत चूकला । उपाय हा भला भला ।**
**नसे जयासि तूळणा । श्रीराम राम हें म्हणा ॥ ६ ॥**
**विरांमधें विरोत्तमू । विशेष हा रघूत्तमू ।**
**सकाम काम आंकणा । श्रीराम राम हें म्हणा ॥ ७ ॥**
**देहे धरूनि वानरी । अखंड दास्य मी करीं ।**
**विमुक्त राज्य रावणा । श्रीराम राम हें म्हणा ॥ १० ॥**

“ जगाच्या कल्याणार्थ मी हालाहल विष प्राशन केलें त्यामुळें माझ्या अंगाचा दाह झाला. तो रामनामानें शांत झाला म्हणून मी प्रचीतीनें सांगतों कीं ‘ राम राम ’ म्हणा. देवांचा सत्पक्ष आहे त्याच्या रक्षणासाठीं बहुत उपाय केले ते सारे व्यर्थ गेले, शेवटीं रामभजनानें यश आलें. रामनाम ह्याच उपायाने आपत्ति टळली, हाच उपाय सर्वश्रेष्ठ आहे. याच्या बरोबरीचा दुसरा कोणताही उपाय नाहीं. वीरांमधला श्रेष्ठ वीर एक राम होय. काळ त्याचा अंकित आहे म्हणून राम राम म्हणा. मीही मारुतीचा देह धारण केला व रामाचें अखंड दास्य केलें तेव्हां रावणाचे राज्य मला बुडवितां आलें ! असें रामनाम श्रेष्ठ आहे. तुम्ही श्रीराम श्रीराम असें भजन करा म्हणजे सर्व आपत्तींतून उद्धराल.” याच अर्थाचा समर्थांचा अभंग पहा—

**शिरीं आहे रामराज । औषधाचें कोण काज ? ॥ १ ॥**
**जो जो प्रेत्न रामावीण । तो तो दुःखासी कारण ॥ ध्रु० ॥**
**शंकराचें हळाहळ । जेणें केलें सुशीतळ ॥ २ ॥**
**आम्हां तोचि तो रक्षिता । रामदासीं नाहीं चिंता ॥ ३ ॥**

आपल्या वेळच्या महाराष्ट्राला समर्थांनीं रामनामाचा महामंत्र—सर्व आपत्तींतून तारून नेणारा महामंत्र—दिला तो हाच नाहीं काय ? ह्या महामंत्राच्या जपाशिवाय—नामस्मरणाशिवाय—आजही आम्हांला तारक उपाय दुसरा कोणता आहे ?



# ३ ग्रंथ आणि ग्रंथाध्ययन



**आधींच शिकोन जो शिकवी । तोचि पावे श्रेष्ठ पदवी ।**
**गुंतल्या लोकांस उगवी । विवेकबळें ॥ ( दास० ११-६-१० )**

१ ग्रंथावलोकन. २ समर्थांचा अभ्यासक्रम. ३ अभ्यासाची महती व पद्धत. ४ अभ्यासाला एकान्ताची आवश्यकता. ५ कोणते ग्रंथ अभ्यासावेत? ६ कवित्वाचे चार प्रकार. ७ श्रवण उर्फ वाचन. ८ संस्कृत ग्रंथ. ९ उपनिषदें. १० वाल्मीकि-रामायण. ११ गीता आणि भागवत. १२ मुख्यतः गुरुकृपा व उपासनाभक्तिप्रेम पाहिजे. १३ मराठी भाषेचें महत्त्व. १४ भक्तांची नामावळी. १५ चमत्कारांवर समर्थांचा विश्वास होता काय? १६ मुकुंदराज आणि समर्थ. १७ ज्ञानेश्वर आणि समर्थ. १८ दासोपंत व समर्थ. १९ नाथ व समर्थ. २० त्र्यंबकरायांचा बालबोध व समर्थांचा दासबोध.

## १ ग्रंथावलोकन

१ 'शब्दादेवापरोक्षधीः' म्हणजे 'शब्द' अर्थात् वेदाचें महावाक्य—त्याच्या श्रवणानेंच मनुष्यास अपरोक्षसाक्षात्कार होतो. 'शब्द' याचा व्यापक अर्थ घेतला म्हणजे वेदवाणीला अनुसरून चालणाऱ्या शास्त्रपुराणांचा व संतवाङ्मयाचाही त्यांत समावेश होऊं शकतो. पूर्वी झालेल्या ग्रंथांचा अभ्यास करूनच कोणीही ग्रंथकार पुढें सरकत असतो. मागच्यांचा अनुभव घेतल्याशिवाय पाऊल पुढें पडत नाहीं. शास्त्रांचा अभ्यास, संतांचा अनुभव, व स्वतःचा प्रत्यय उर्फ प्रचीती यालाच समर्थ त्रिप्रचीती असें म्हणतात. अनुभव, अपरोक्षसाक्षात्कार व विज्ञान हीं नांवें पूर्वी ज्यास

दिलीं जात त्यालाच समर्थांनीं प्रत्यय किंवा प्रचीती असें सुटसुटीत नांव दिलें आहे. साधुसंतांची वाणी प्रचीतीची असते, म्हणूनच तिची समाजावर छाप बसते. अनुभवावांचून बोलणें व्यर्थ आहे, ती बडबड आहे, श्वानाच्या भुंकण्याइतकीच तिची किंमत आहे असें समर्थांनीं म्हटलें आहे. पण हा अनुभव येण्यापूर्वी पूर्वील मान्य ग्रंथांचा अभ्यास, वाचन, श्रवण, निरूपण प्रत्येकाला करावेंच लागतें. विद्या ही याप्रमाणें परंपराप्राप्त असते. समर्थांनीं याप्रमाणें कांहीं संस्कृतप्राकृत ग्रंथांचें अध्ययन केलें. दुपारीं नाशिकच्या कांहीं सच्छील पंडितांपाशीं त्यांनीं अध्ययन–श्रवण केलें. नंतरही शास्त्रग्रंथांचें त्यांचें अवलोकन चालूच होतें. त्यांनीं पुरश्चरणकालीं किंवा नंतर कोणकोणत्या ग्रंथांचें अध्ययन केले याचा कांहीं सुगावा लागल्यास आपण त्यांच्या ग्रंथांतच तो शोधूं. त्यांच्या अध्ययनाचा हा अंतर्गत पुरावा शोधणें मोठें बोधप्रद आहे. 'भगवद्वाक्याविरहित नसे। बोलणें येथींचें' म्ह० उपनिषदें किंवा गीताभागवतादि ग्रंथांला सोडून माझें बोलणें नाहीं अशी त्यांची प्रतिज्ञाच आहे. श्रवणाचें कार्य सांप्रतकाळीं वाचनानें होतें, म्हणून श्रवणांत वाचनाचा अंतर्भाव होतो असें समजावें. ऐकले, वाचले, पाहिलें पाहिजे. त्यावांचून शहाणपण येत नाहीं.

**ऐकिल्यावीण कळलें। शिकविल्याविण शहाणपण आलें।**
**ऐसें देखिलें ना ऐकिलें। भूमंडळीं ॥ ६ ॥**
**सकळ कांहीं ऐकतां कळे। कळतां कळतां वृत्ति निवळे।**
**नेमस्त मनामध्यें आकळे। सारासार ॥ ७ ॥ (दास० १८–१०)**

## २ समर्थांचा अभ्यासक्रम

समर्थांनीं दासबोधांत अभ्यासाविषयीं पुष्कळ शिकवणी दिल्या आहेत, त्या पाहिल्या म्हणजे त्यांनीं स्वतः अभ्यासाकडे कसें लक्ष पुरविलें होतें

हें चांगलें समजून येतें. 'आधीं केलें मग सांगितले' असा त्यांचा दंडक असल्यामुळें त्यांनीं जें सांगितलें आहे तें आधीं केलेंच होतें. सांप्रदायिकाच्या अंगीं कोणकोणते गुण पाहिजेत हें त्यांनीं एका अभंगांत सांगितलें आहे. चांगल्या सुसंस्कृत मनुष्याचीं हीं लक्षणें आहेत. हीं लक्षणें २० आहेत. 'प्रथम लिहिणें, दुसरे वाचणें । तिसरे सांगणें अर्थान्तर.' प्राथमिक शिक्षणाचे हे पहिले तीन पाठ आहेत. यानंतरचे पाठ चढत्या क्रमाचे आहेत. गाणे, नाचणें, ताळी वाजविणें, अर्थभेद जाणणें व सांगणें, प्रबंध म्ह० कवित्व करणे, आशंका फेडणें, हें शिकले म्हणजे शिकविण्याची व कीर्तनाची योग्यता येते. लोकजागृति करणारे कीर्तनकार यांना हे गुण अवश्य पाहिजेत. हे बहिरंग झाले, आतां त्याहून वरच्या वर्गाचे पाठ म्हणजे प्रचीति ( स्वानुभव ), प्रबोध ( दुसऱ्यांच्या मनांवर सुसंस्कार करणारा बोध देणे ), विवेक, वैराग्य, अव्यग्रता ( चित्तैकाग्र्य ), उदासीनता ( उपाधींत राहून निरुपाधिक राहणें, असंगत्व ) हे होत. या अंतरंग गुणांची जोड असल्याशिवाय उपदेशकाची छाप लोकांवर पडत नाहीं. यापुढें प्रसंग जाणून वागणे, लोक राजी राखणें, राजकारण, सर्वांशीं समभाव व उपासनेनें लोक भक्तिमार्गास लावणें हें त्यानें शिकलें पाहिजे. हीं चढत्या क्रमाचीं २० लक्षणें अभ्यासानें अंगीं आणणारा मनुष्य स्वतः तरून इतरांस तारण्यास समर्थ होतो. ह्या बहुविध लक्षणांनीं नटलेला पुरुष लोकोद्धाराचें कार्य करण्यास समर्थ होतो. खऱ्या कार्यकर्त्या पुढाऱ्याच्या अंगीं हे गुण अवश्य पाहिजेत. हें ध्येय पुढें ठेवून कोणी कांहीं कांहीं गुणांचा अंशमात्रेंकरून अभ्यास करील तरी तोही लोककार्यकर्ता होईल. ह्या २० गुणांचें स्पष्टीकरण दासबोधांत व स्फुट कवितेंत समर्थांनीं चांगलें केलें आहे. पंचवटींत बारा वर्षें अनुष्ठान करीत असतांना समर्थांनीं हे गुण संपादन केले व त्याचें फळ महाराष्ट्रास मिळालें ! हा अभ्यास अंगीं मुरविल्यानंतरच मनुष्यानें प्रगट

व्हावें, 'प्रगट होवोनि नासावें। हें बरें नव्हे' अशी वरील अभ्यासक्रमाच्या खालीं त्यांनीं महत्त्वाची टीप देऊन ठेवली आहे! असा कांहीं अभ्यास केल्याशिवाय लोक सुधारण्याची हांव बाळगणारांची काय स्थिति होते ती प्रत्यक्ष दिसतेच आहे! आधीं आपण करावें, मग करवावें. 'सांगावें कोणें कोणा। चिंता आपुली आपणा' या पदांत समर्थांनीं सांगितलें आहे कीं, आधीं आपण आपला उद्धार करावा व त्यासाठीं नारायणाला मनोभावें शरण जावें, त्याचें दास्य करावें, त्याचें सख्य जोडावें, तो पाठिराखा करावा. नंतर लोकोद्धाराचा मार्ग धरावा. आधीं स्वतःचा उद्धार, मग लोकांचा उद्धार!

## ३ अभ्यासाची महती व पद्धत

वर सांगितलेल्या २० लक्षणांपैकीं पहिलें लक्षण जें 'लिहिणें' त्यावर समर्थांनीं एक समास सांगितला आहे (दास० द० १९ स० १). 'ब्राह्मणें बाळबोध अक्षर। घडसून करावें सुंदर। जें देखतांचि चतुर। समाधान पावती॥ वाटोळें सरळ मोकळें। वोतले मसीचें काळें। वोळी चालिल्या ढाळें। मुक्तमाळा जैशा.' काने, मात्रा, वेलांट्या, आर्कुली (रेफ), मधलें अंतर, सर्व नीट असावें. कागद कसा साफ ठेवावा; शाई कशी करावी; गोफ, बासनें, मेणकापडें, पेट्याकुलपें—सर्व कांहीं सुव्यवस्थित कसें असावें हें येथें समर्थांनीं फार बारकाईनें सांगितलें आहे. सर्वही लक्षणांचे असेच पूर्ण विचार दासबोधांत सांगितले आहेत. विस्तार कोठवर करावा? 'नित्यनेम सांडूं नये। अभ्यास बुडों देऊं नये,' बहुत ग्रंथ धांडोळावे, अपार पाठान्तर करावें, नाना ग्रंथ पाहिले तरी सार शोधून घ्यावें, शृंगारिक वाचूं नये, चित्तविक्षेप करणाऱ्या ग्रंथांस शिवों नये, नित्यनेमाचा अभ्यास ठेवावा—

(१)

**एकाग्र करूनियां मन। बळेंचि§ करावें साधन।**
**यत्नीं आळसाचें दर्शन। होऊंचि नये ॥ १२ ॥**
**अवगुण अवघेचि सांडावे। उत्तम गुण अभ्यासावे।**
**प्रबंध पाठ करीत जावे। जाड† अर्थें ॥ १३ ॥**
**पदप्रबंध $ श्लोकप्रबंध। नाना धाटी मुद्रा छंद।**
**प्रसंगज्ञानेंचि आनंद। होत आहे ॥ १४ ॥**
**ज्याची जैसी उपासना। तेंचि गावें, चुकावेंना।**
**रागज्ञान ताळज्ञाना। अभ्यासावें ॥ १७ ॥**
**साहित्य संगीत प्रसंगें मानें। करावीं कथेचीं घमशानें।**
**अर्थान्तर श्रवणमननें। काढीत जावें ॥ १८ ॥**
**पाठ उदंडचि असावें। सर्वकाळ उजळीत जावें।**
**सांगितले गोष्टीचें असावें। स्मरण अंतरीं ॥ १९ ॥**
**अखंड एकान्त सेवावा। ग्रंथमात्र धांडोळावा।**
**प्रचीत येईल तो घ्यावा। अर्थ मनीं ॥ २० ॥ (द० १८ स० ३)**

समर्थांच्या अभ्यासक्रमांत ‘ गायनी विद्ये ’ चें महत्त्व विशेष आहे हे त्यांच्या पदपदान्तरांवरूनही स्पष्ट दिसतें. गायनी विद्येचा उपयोग कीर्तनभजनांत विशेष असतो.

(२)

**जो एकान्तास तत्पर। आधीं करी पाठान्तर।**
**अथवा शोधी अर्थान्तर। ग्रंथगर्भींचें ॥ ९ ॥**
**अक्षर सुंदर वाचणें सुंदर। बोलणें सुंदर चालणें सुंदर।**
**भक्तिज्ञानवैराग्य सुंदर। करून दावी ॥ ११ ॥ (द० ११ स० ६)**

---

§ प्रथम चित्त लागत नसलें तरी, हट्टानें. † खोल, गहन अर्थ मनी आणून. $ अनेक वृत्तांतले, अनेक लक्षणांचे श्लोक, पदें वगैरे गुणगुणत पाठ करावींत. त्या त्या प्रसंगाचें ज्ञान झाल्यानें चित्तास आनंद होतो. दुर्गुण सोडावे, उत्तम गुण अभ्यासावेत, स्वानंद भोगावा हा तर विद्यानंद आहे.

महंतलक्षणाच्या समासांत या ओव्या आहेत. आतांचा पुढारी व तेव्हांचा महंत ! समर्थांचा महंत धर्मनीतिन्यायाला व आचारविचारांना संभाळून वागणारा असे. उपासनेसाठीं त्याची विद्या असे. त्याची उठल्यापासून राहणीच वेगळी असे—

( ३ )

**प्रातःकाळीं उठावें । कांहीं पाठान्तर करावें ।**
**यथानुशक्ति आठवावें । सर्वोत्तमासी ॥ १५ ॥**
**मुखमार्जन प्रातःस्नान । संध्यातर्पण देवतार्चन ।**
**पुढें वैश्वदेव उपासन । यथासांग ॥ १७ ॥**
**पुढें भोजन जालियावरी । कांहीं वाची चर्चा करी ।**
**एकान्तीं जाऊन विवरी । नाना ग्रंथ ॥ २२ ॥**
**कांहीं धर्मचर्चा पुराण । हरिकथानिरूपण ।**
**वायां जाऊं नेदी क्षण । दोहींकडे ॥ ( द० ११ स० ३ )**

अशा अभ्यासाच्या महतीच्या दासबोधांत पुष्कळ ओव्या आहेत. ‘विद्याभ्यास सोडूं नये । कांहीं केल्या,’ विद्याभ्यासकाला, जाणत्याला जगांत मान्यता आहे, महत्त्व आहे. ‘अपार असावें पाठान्तर । सन्निधचि असावा विचार’—नुस्ते पोपटपंची पाठान्तर काय कामाचे ? जें पाठ करितों तें अर्थ समजून पाठांत ठेवावें. नानाशास्त्रांचे नाना ग्रंथ पहावेत, श्रवणभक्ति-निरूपणांत ( द० ४ स० १ ) ग्रंथवाचन सर्व प्रकारचें असावें, वाचनविषयाला मर्यादा नसावी, असें त्यांनीं म्हटलें आहे. कर्मज्ञानउपासनादि नाना मार्गांचे, पंथांचे, मतांचे ग्रंथ वाचावेत असें सांगितलें आहे. बहुश्रुतपणा अंगीं पाहिजे. ‘नाना पिंडांची रचना । नाना भूगोलरचना । नाना सृष्टीची रचना । कैसी ती ऐकावी.’ चंद्रसूर्यतारामंडळें यांचें ज्ञान हवें. गायनवादननर्तनादि कलांचें ज्ञान हवें. ‘नानावल्ली नाना औषधी’—वैद्यकीचें ज्ञान, ज्योतिषसामुद्रिक शास्त्रांचें ज्ञान पाहिजे.

' चौदा विद्या चौसष्ट कला ' यांपैकीं सर्वांचें थोडथोडें ज्ञान अवश्य पाहिजे. तथापि सारासारविचार मुख्य पाहिजे. सर्व वाचावें व ऐकावें पण आंधळेपणानें वाचूं व ऐकूं नये. सार शोधूनि घ्यावें—' सार असार येकचि करावें। हें मूर्खपण.' आपल्या प्रचीतीला येईल तो अर्थ घ्यावा.

( ४ )

**शब्दरत्नें परीक्षावीं। प्रत्ययाचीं पाहोन घ्यावीं।**
**येर तीं अवघीं सांडावीं। येकीकडे ॥ ३ ॥ (द० १८ स० ५)**

## ४ अभ्यासाला एकान्ताची आवश्यकता

' अखंड एकान्त सेवावा। अभ्यासचि करीत जावा ' म्हणजे आपला काळ सार्थकीं लागतो व जनांचा काळ सार्थकीं लावण्याचें सामर्थ्य अंगीं येतें. प्रपंचपरमार्थाचीं कोडीं एकान्ताशिवाय उलगडत नाहींत. साधकजन ध्यानधारणेचा व ब्रह्मचिंतनाचा अभ्यास पूर्ण एकान्तांत करितात.

**शिष्या ! एकान्तीं बैसावें। स्वरूपीं विश्रांतीस जावें।**
**तेणें गुणें दृढावे। परमार्थ हा ॥ ( दास० द० ५ स० ६ )**

स्फुट प्रकरणांतही समर्थांनीं ठायीं ठायीं एकान्ताची महती गायिली आहे. ' फार एकान्त सेवावा। अभ्यास नित्य नूतनू.' एकान्तीं मनन-निदिध्यास फार चांगला होतो, न कळलेल्या गोष्टी कळूं लागतात, न सुचलेले विचार स्फुरतात, वर्तायाची रीत व्यवस्थितपणें ठरून जाते. ' जयास एकान्त मानला। अवघ्यांआधीं कळे त्याला ' ( दास० १८–१० ). एकान्तांत मननानें विचार स्थिर होतात, चित्त सुचित्त होतें. ' न कळतां वाटे कोडें । कळतां आवघें दिसे उघडें । म्हणोनी एकान्तीं निवाडे। विचार पाहावा ' ( दास० २०–७ ). एकान्तांत चाळणा करीत असावें म्हणजे बुद्धियोग प्राप्त होतो, बुद्धियोगानें सर्व कांहीं सुव्यवस्थित होतें. प्रपंचाचा, राजकारणाचा, शास्त्राध्ययनाचा, परमार्थाचा कोणताही अभ्यास असो—

**पाहतां पाहतां जाणे जाणतां जाणतां कळे ।**
**कळतां कळतां शिके शिकतां शिकतां करी ।**
**करितां करितां वाढे वाढतां वाढतां भला ॥**

**'भला'** म्हणवून घ्यायला या क्रमानें गेले पाहिजे. ज्याचा जो व्यापार तो पाहतां पाहतां उमजतो, नंतर तो कळत जातो, कळतां कळतां त्याचें ज्ञान होतें, ज्ञानानें मनुष्यं क्रिया करूं लागतो, व अशा तऱ्हेनें त्याचें कर्तव्य-क्षेत्र वाढतें, व कर्तृत्वाच्या योगाने लोक भला म्हणूं लागतात ! 'भला रे भला बोलती तें करावें.' कर्तृत्वाच्या पोटीं भलेपण आहे. उत्कृष्ट कार्यकर्ता असेल त्यालाच 'भला' म्हणतात. हें सारें एकान्तवाससेवन केल्यानें क्रमानें होतें. 'एकान्तेंवीण प्राणियातें । बुद्धि कैंची ?'

**ल्याहावें शुद्ध वाचावें जाणावें तदनंतरें ।**
**जाणतां जाणतां बिंबे बिंबतां स्फूर्ति होतसे ॥**

एकान्त—लिहिणें वाचणें—मननानें जाणणें—जाणण्याने बिंबणें व नंतर '**स्फूर्ति.**' सांप्रत जो उठतो तो मला '**स्फूर्ति**' झाली असें म्हणतो! स्फूर्ति ही कांहीं परसांतली मेथीची भाजी नव्हे, कीं ती वाटेल त्याने वाटेल तेव्हां खुडावी ! 'स्फूर्ति ही सीमेची पायरी आहे.' दासबोधांत (द० १९ स० ६) समर्थ सांगतात कीं, 'अखंड तजविजा चाळणा जेथें । पाहतां काय उणें तेथें ?' विवेकांत सांपडत नाहीं असें कांहींच नाहीं ! म्हणून—

**एकान्तीं विवेक करावा । आत्माराम वोळखावा ।**
**येथूनि तेथवरी गोवा । कांहींच नाहीं ! ॥ ३० ॥**

## ५ कोणते ग्रंथ अभ्यासावेत ?

समर्थ ग्रंथ कशाला म्हणतात, अर्थात् कोणत्या ग्रंथांचें अध्ययन करणें कल्याणकारक आहे याचा विचार पाहूं. ज्यांत निश्चयात्मक ज्ञान आहे व ज्यांनीं समाधान होतें असेच ग्रंथ पहावेत. हास्यविनोदाचीं व नवरसात्मक

पुस्तकें परमार्थाच्या उपयोगाचीं नाहींत. जेणें अनुताप चढे, भक्तिसाधन आवडे, जेणें विषयवासना मोडे, जेणे धारिष्ट चढे, जेणें परोपकार घडे—त्या नांव ग्रंथ! जेणें अवगुण पालटती, जेणें चुके अधोगती या नांव ग्रंथ. जेणें नुपजे उपरती विरक्ती भक्ती तो ग्रंथचि नव्हे! दुराशेचीं भूतें चित्तांत उठविणारा ग्रंथ काय कामाचा? जेथें आत्मज्ञान नाहीं ती 'करमणूक' किंवा 'मनोरंजन'! तात्पर्य 'जया स्वहित करणें। तेणें सदा विचरणें। अद्वैतग्रंथीं;' म्हणून 'अद्वैतग्रंथ परमार्थी। श्रवण करावे' (द० ७ स० ९).

## ६ कवित्वाचे चार प्रकार

कवित्वाचे (किंबहुना सर्व गद्यपद्यात्मक ग्रंथांचे) चार प्रकार आहेत, धीट कवि, पाठ कवि, धीट–पाठ कवि आणि प्रासादिक कवि.

(१)

**'जें जें आपुल्या मनासि आलें।**
**बळेंचि कवित्व रचिलें'–ते धीट कवि.**

(२)

**'बहुत पाहिलें ग्रंथान्तर। तयासारखा उतार।**
**आपणहि केला॥' ते पाठ कवि.**

(३)

**सीघ्रचि कवित्व जोडिलें। दृष्टी पडिलें तें वर्णिलें।**
**भक्तीवांचूनि जें केलें। या नांव धीटपाठ॥ १०॥**
**कामिक रसिक शृंगारिक। वीर हास्य प्रस्ताविक।**
**कौतुक विनोद अनेक। या नांव धीटपाठ॥ ११॥**

ह्या तीनही प्रकारचीं काव्यें किंवा ग्रंथ वाचण्यापासून आत्महित निश्चितीनें साधणें शक्य नसल्यामुळें चौथ्या प्रकारचे प्रासादिक ग्रंथ तेवढेच अभ्यासावेत. प्रासादिक ग्रंथ कोणते? 'देवाचेनि प्रसन्नपणें। जें जें

घडे बोलणें। तें तें अत्यंत श्लाघ्यवाणें। या नांव प्रासादिक!' नरस्तुतीनें भरलेले व व्युत्पत्तीच्या बळावर ठाकठिकीनें लिहिलेले ग्रंथ 'धीटपाठ' या सदरांत मोडतात. कवित्वांत खटपट नसावी, पाखांड नसावें, वादांग नसावें, तें कुटिळ—बाष्कळ—हीन नसावें, कलाहीन नसावें, भक्तिज्ञानवैराग्यहीन नसावें—समाधान देणारें व उन्नतिप्रद कवित्व तेवढें अभ्यासावें.

**जया अंतरीं भगवंत। अचळ राहिला निवान्त।**
**तो स्वभावें जें बोलत। तें ब्रह्मनिरूपण॥ २०॥**
**तो प्रेमरंगें रंगला। तो भक्तिमदें मातला।**
**तेणें अहंभाव घातला। पायांतळीं॥ २९॥**
**त्याचे भक्तीचें कौतुक। तया नांव प्रासादिक।**
**सहज बोलतां विवेक। प्रगट होय॥ ३४॥**
**जेणें सद्बुद्धि लागे। जेणें पाषांड भंगे।**
**जेणें विवेक जागे। या नांव कवित्व॥ ५१॥ (द० १४ स० ३)**

ज्यांच्या वाणींत प्रसाद नाहीं त्यांनीं कवितेचे डोंगर उभे करण्याच्या भानगडींत पडूं नये. उगाच कविता रचण्याचें वेड लागलेले कविब्रुव कांहीं थोडे नसतात! 'विडी', 'केरसुणी' असल्या विषयावर कविता रचणारे कवि आम्ही पाहिले आहेत!

**कविता गवताऐसी उदंड वाढली असे।**
**असेना दिसेना अर्थु—व्यर्थ व्यर्थचि स्वार्थ तो॥**

त्यांत कांहीं अर्थ असतच नाहीं मग दिसणार कोठून? व्यर्थ खटाटोप कशाला हवा? नाशवंत पदार्थांवर कविता करूं नको, अविनाशी—पंचभूतातीत—मूळ तत्त्व शोधून काढा व त्याचा आनंद स्वतः चाखून जगास द्या अशी समर्थांची कवींस शिकवण आहे. उत्तम कविता लोकांचें मन वेधतेच. कवित्व जाड म्ह० अर्थभरित, मनोहर असावें.

**पदीं प्रबंध साजिरे। रसाळ शब्द गोजिरे।**
**तयामधें मनू भरे। प्रचंड अर्थ वीवरे॥**

चतुर कवींना समर्थ सांगतात—

**उपाय तो अपाय रे। भूतें भजोन काय रे।**
**भजा अनंत व्यापका। चतुर हो! चळों नका॥**
**भूतें समस्त वाव रे। प्रकृतिंचा स्वभाव रे।**
**अनंत संत वोळखा। मुळाकडे चुकों नका॥**

भूतांत पडणाऱ्या विषयांवर कवित्व करूं नका, भूतें मायिक आहेत, तीं प्रकृतीचीं कार्यें आहेत. अनंत, शाश्वत व विश्वाचें मूळ जें परमात्मरूप—तेथींची गोडी चाखून ती जगाला देण्यासाठीं कवित्व करा. आधिभौतिक शास्त्रे पाहिलींत तरी त्यांतून परमात्मतत्त्व शोधून घ्या. 'शास्त्रें पुराणें वेद श्रुती। अखंड जयेचें स्तवन करिती। नानारूपीं जयेस भजती। प्राणिमात्र' त्या शारदेच्या स्वरूपास ओळखून जे गद्यपद्यरचना करितात त्यांचीच वाणी जगदुद्धारास कारण होते. 'शब्दसृष्टीचे ईश्वर, सरस्वतीचें निजस्थान, शब्दरत्नांचे सागर, बोलके चिंतामणि, साधकांचें साधन, सिद्धांचें समाधान, स्वधर्माचा आश्रय, मनाचा मनोजय,' इ० प्रकारे समर्थांनीं खऱ्या कवीश्वरांचें गौरव केले आहे व वाल्मीकिव्यासादिकांचीं उदाहरणें दिलीं आहेत. 'परोपकाराकारणें। नाना निश्चय अनुवादणें' हें चांगले कवीच करूं शकतात. ते 'सकळ जनांना विवेक देतात'—विकारांचीं भूतें उठवीत नाहींत! ते 'स्वधर्मसंरक्षण करितात--धर्माची टवाळी करीत नाहींत! 'नस्ता कवींचा व्यापार। तरी कैचा अस्ता जगदुद्धार। म्हणोनी कवि हे आधार। सकळ सृष्टीसी' हा उत्तम कवींचा अधिकार आहे. कवि हे समाजधारण करणारे विवेकी पुरुष.

**कवि हे अमृताचे मेघ वोळले। कीं हे नवरसांचे वोघ लोटले।**
**नाना सुखाचें उचंबळलें। सरोवर हें॥ २८॥**
**हीं सुखाचीं तारुवें लोटलीं। आक्षे आनंदें उतटलीं।**
**विश्वजनास उपेगा आलीं। नाना प्रयोगांकारणें॥ ३१॥**

## ७ श्रवण उर्फ वाचन

समर्थांचा श्रवण उर्फ निरूपण यावर फार कटाक्ष आहे. देव सगुण निर्गुण उभयरूप असल्यामुळें रामकृष्णादि सगुणरूपाच्या चरित्रश्रवणानें भक्तिभावाचें उद्दीपन होतें व अध्यात्मश्रवणाने ज्ञानबोध होतो म्हणून 'हरिकथापुराणश्रवण व अध्यात्मनिरूपण' या दोहींचा अंतर्भाव समर्थांनीं श्रवणभक्तींत केला आहे. श्रवणांत समर्थांनीं अत्यंत व्यापकपणानें 'चौदा विद्या चौसष्ट कला' यांचा अंतर्भाव केला आहे. श्रवणांतून समर्थांनीं कोणताही विषय वगळला नाहीं. 'अवघेंचि ऐकावें । परंतु सार शोधून घ्यावें.' दासबोधांत श्रोतेस्तवन (द० १ स० ६ ) श्रवणभक्ति (द० ४ स० १ ), श्रवणनिरूपण (द० ७ स० ८।९ व द० १७ स० ३ ), श्रोते अवलक्षण (द० १८ स० १० ), श्रोता (द० ७ स० १ ) इत्यादि समास समग्र पाहिले म्हणजे श्रवण कसें करावें हें पूर्णतया ध्यानांत येतें—वाचावें, पाहावें सर्व पण अभ्यासावें अध्यात्म ! 'नानाशास्त्रें धांडोळावीं' पण 'निश्चयाकारणें' (२—४—८). निश्चयात्मक ज्ञान पाहिजे. ग्रंथाध्ययनाने संशयच वाढत गेले तर त्याचा स्वतःस किंवा इतरांस कांहीं उपयोग नाहीं. 'संशयात्मा विनश्यति' असें देव गीतेंत बोलले आहेत. 'संदेहरहित ज्ञान । निश्चयाचें समाधान' हेंच कृतार्थतेचे गमक आहे. निश्चय म्हणजे मुख्य देवाचा--आत्मत्वाचा--निश्चय. आत्मनिश्चय हेंच समाधानाचें रहस्य आहे. आत्मसमाधान मोडेल असे ग्रंथ हातीं धरूं नयेत व संशयात्म्यांचें वक्तृत्वही ऐकूं नये ! 'येक्या ग्रंथें निश्चय केला । तो दुजयानें उडविला । तेणें संशयोचि वाढला । जन्मवरी !' म्हणून आत्मनिश्चय सांगणाऱ्या अद्वैतग्रंथांशिवाय इतर ग्रंथ दूरच ठेवलेले बरे ! 'काहण्या कथा गोष्टी पवाड । नाना अवतारचरित्रें वाड । त्या समस्तांमध्यें जाड । अध्यात्मविद्या', कां कीं येथें अनुमानाचें कार्य नाहीं, हे प्रचीतीचें काम आहे (द० १७—३ ). नित्रडक ग्रंथ ऐकावेत व

वाचावेत. सर्वच ग्रंथ वाचण्यापासून कांहीं लाभ नाहीं, केवळ वाचेचा तो शीण आहे. सर्वसामान्य विषयांचें सामान्य ज्ञान असल्यानें बहुश्रुतपणा येतो. मुख्य मुख्य विषयांचे सिद्धान्त अवगत करून घ्यावे पण सर्व भर आपला व समाजाचा उद्धार करणारी जी अध्यात्मविद्या त्या विद्येवर असावा. वाचावें थोडें पण मनन करावें फार. श्रवण किंवा वाचन मनना-वांचून व्यर्थ होतें. 'श्रवणअभ्यासें पाविजे ब्रह्म' (दास० ७–१) असें झालें तरच तें श्रवण. निश्चयात्मक ज्ञान देणाऱ्या निवडक ग्रंथांचें श्रवण मनन पुनःपुन्हा करावें. आत्मनिश्चय दृढ होण्यासाठीं सतत असा अभ्यास ठेवावा. अर्थरूप व्हावें, मनोजय साधावा व मग लोकांस शिकवावें.

**अर्थ सर्वत्र शोधावा । रोधावा आपुला मनु ।**
**लोक सर्व बोधावा । यथातथ्य प्रचीतिनें ॥**

आपलें पोट भरल्यावर वाढावें, 'तैसें ज्ञानें तृप्त व्हावें । तेंचि ज्ञान जगास सांगावें । शाहाणे करूनि सोडावें । सकल जन.'

(१)

**अरे हें पाहिलेंचि पाहावें । विवरलेंचि मागुती विवरावें ।**
**वाचिलेंचि वाचावें । पुनः पुन्हा ॥ द० ११—८—९**

(२)

**मनाच्या तोडून ओढी । श्रवणीं बैसावें आवडी ।**
**दुश्चितपण आलें तरी । पुन्हा श्रवण करावें ॥ द० ८—१—६**

(३)

**अखंड एकान्त सेवावा । ग्रंथमात्र धांडोळावा ।**
**प्रचीत येईल तो घ्यावा । अर्थ मनीं ॥ द० १८—३—२०**

(४)

**उदंडांचें उदंड ऐकावें । परी तें प्रत्ययें पाहावें ।**
**खरें खोटें निवडावें । अंतर्यामीं ॥ द० १५–६–११**

( ५ )

**याकारणें अद्वैतग्रंथ । अध्यात्मविद्येचा परमार्थ ।**
**पहावया तोचि समर्थ । जो सर्वांगें श्रोता ॥ द. ७०१-२८**

( ६ )

**सेविलेंचि सेवावें अन्न । घेतलेंचि घ्यावें जीवन ।**
**तैसें हें श्रवणमनन । केलेंचि करावें ॥**

( ७ )

**जो एकान्तास तत्पर । आधीं करी पाठान्तर ।**
**अथवा शोधी अर्थान्तर । ग्रंथगर्भीचें ॥ ११-६-९**

श्रवणभक्ति करणारा जो मुमुक्षु त्याला हीं सूत्रें किती मार्गदर्शक आहेत! एकान्त पाहिजे, ग्रंथावलोकनाचा व अर्थान्तर शोधण्याचा म्ह० मननाचा छंद पाहिजे, पाठान्तर पाहिजे, आपल्या प्रत्ययानें अर्थ मनीं ठसवून घेण्याचा निरंतर अभ्यास पाहिजे, आणि हें सारें आत्मनिश्चयासाठीं, आत्मोद्धारासाठीं पाहिजे. 'अपार असावें पाठान्तर । सन्निधचि असावा विचार' (द. ११-५-१५). 'विभक्ति सांडून भक्तीचें मूळ शोधावें' यासाठीं हा सारा अभ्यास असला पाहिजे—विभक्ति (वेगळेपण) सोडून भक्तीचें (तादात्म्यतेचें) मूळ शोधले पाहिजे. आपलें पोट भरल्यावर मग तेंच ज्ञान जगास सांगावें व लोक शाहाणे करावे.

समर्थांनीं शिकविलेल्या अभ्यासक्रमाचें स्वरूप आपण येथवर पाहिलें. आतां त्यांनीं स्वतः कोणकोणत्या ग्रंथांचें अध्ययन केलें हें आपण त्यांनांच विचारूं व त्यांच्या ग्रंथांत याबद्दल कांहीं अंतःप्रमाणें मिळतात कीं काय तें पाहूं. या विषयाचा विस्तृत ऊहापोह करण्यापूर्वी समर्थांनीं उल्लेखिलेले व न उल्लेखिलेले सर्व ग्रंथ बारकाईनें पाहिले पाहिजेत. मला तितकी सवड नसल्यामुळें मी शलाकापरीक्षान्यायानें येथें संक्षेपानें याचा विचार करितों.

## ८ संस्कृत ग्रंथ

दासबोधांत समर्थ आरंभींच म्हणतात —

**नाना ग्रंथांच्या संमती । उपनिषदें वेदार्थ श्रुती ।**
**आणि मुख्य आत्मप्रचीती । शास्त्रेंसहित ॥ १५ ॥**

'मी आपल्या ग्रंथाला वेदवेदान्तादि अनेक ग्रंथांच्या संमति घेतल्या आहेत, शास्त्रांच्या सिद्धान्ताचे आधार घेतले आहेत, पण मुख्यतः आत्मप्रचीतीचा हा माझा ग्रंथ आहे. यांतील प्रतिपादन शास्त्रग्रंथांच्या व भगवद्वचनांच्या आधारें केलें आहे. हें परंपरेचें ज्ञान आहे.' समर्थादि पूर्वील संतकवींचा संप्रदाय असाच आहे! त्यांचें बोलणें अनुभवाचें असतेंच पण परंपरा व त्यांचा प्रत्यय यांत भेदच नसतो.

**शिवगीता रामगीता । गुरुगीता गर्भगीता ।**
**उत्तरगीता अवधूतगीता । वेद आणि वेदान्त ॥ १८ ॥**
**भगवद्गीता ब्रह्मगीता । हंसगीता पांडवगीता ।**
**गणेशगीता यमगीता । उपनिषदें भागवत ॥ १९ ॥**

उपनिषदें समर्थांनीं पचविलींच होतीं. शिवगीता, गुरुगीता, अवधूतगीता इत्यादि गीतांचे आधार त्यांनीं अनेक ठिकाणीं घेतले आहेत.

दशक ७ स० ७ मध्येंही गुरुगीता, अवधूतगीता व हंसगीता यांचे उल्लेख केले आहेत —'अद्वैतज्ञानाचा उपदेश । गुरुगीता तो महेश । सांगता होय पार्वतीश । पार्वतीप्रती ॥ अवधूतगीता केली । ते गोरक्षीस उपदेशिली.' तसेंच 'विष्णु होऊनि राजहंस । विधीस केला उपदेश । ते हंसगीता जगदीश । बोलिला स्वमुखें.' ब्रह्मदेवानें नारदाला 'चतुःश्लोकी भागवत' सांगितलें तें पुढें 'व्यासमुखें बहुत विस्तारलें' म्हणजे चतुःश्लोकीचा विस्तार तोच भागवतग्रंथ होय. वसिष्ठऋषीनें रामास 'वसिष्ठसार' ग्रंथ सांगितला. ह्या ग्रंथांतून प्रतिपादिलेलें 'अद्वैतज्ञान आदिअंतीं । सत्यचि असे.' वेदशास्त्रांनीं व व्यासवसिष्ठादि ऋषींनीं जे ज्ञानाचे उपाय

सांगितले आहेत ते निःसंशय सत्यच आहेत. हें आत्मज्ञान मिथ्या आहे असें म्हणणारे पतित होत! 'आपणास नुमजे बरवें' म्हणून त्याला काय मिथ्या म्हणावें? आपणांस कळत नाहीं असें फार तर म्हणावें! 'विद्याअभ्याससारिणी' आहे म्हणून श्रवणनिरूपणाचा अभ्यास सतत ठेवावा. पुढें सद्गुरुकृपेनें आत्मज्ञानाचा अनुभव होतो. मनाच्या श्लोकांत समर्थांनीं म्हटले आहे कीं, 'श्रुति न्याय मीमांसकें तर्कशास्त्रें। स्मृती वेदवेदांत वाक्यें विचित्रें'—यांना वास्तविक स्वरूपस्थिति सांगतां येत नाहीं ती सद्गुरु-कृपेनेच अनुभविली पाहिजे. पण तत्पूर्वी परोक्षज्ञान अवश्यच आहे. 'महावाक्य तत्त्वादिकें पंचिकर्णें' म्ह० महावाक्योपदेश, तत्त्वज्ञान, पंचीकरण यांचें संतमुखानें श्रवण झालें पाहिजे, अर्थात् शाखाचंद्रन्यायानें खूण ज्याची त्यानेंच पावायची आहे.

## ९ उपनिषदें

उपनिषदांतील पुष्कळच सिद्धान्त समर्थांच्या ग्रंथांत वेळोवेळीं येऊन गेले आहेत. ब्रह्म मला समजलें असें जो म्हणतो त्याला तें समजलेलें नसतें —

**यस्यामतं तस्य मतं मतं यस्य न वेद सः॥ केन० २-११**

याचा अनुवाद ज्ञानेश्वरांनीं 'जो मी जाहलों म्हणे। तो कांहींच नेणें' असा केला आहे व समर्थांनीं 'म्हणे जाणता तो मनीं मूर्ख पाहें' असें म्हटलें आहे. याचेंच स्पष्टीकरण समर्थांनीं एका श्लोकार्धात नामी केलें आहे.

**चोरूनि जागे हृदयीं अहंता। कळे म्हणे त्या न कळेचि भ्रांता॥**

'त्रयस्त्रिंशद्वै देवाः अष्टौ वसवः एकादश रुद्राः द्वादशादित्याः'—

**जगीं द्वादशादित्य ते रुद्र अक्रा।—(मनोबोध १७८)**

'एकमेवाद्वितीयं ब्रह्म' म्हणजेच 'दुजेवीण जो तोचि तो हा स्वभावें.'

'यद्दृष्टं तन्नष्टं'–तें हें दृश्य नाशवंत। ऐसें वेदश्रुति बोलत (दा० ६–२–१५).

'अहं ब्रह्मास्मि' (बृहदारण्य १–४–१०)–'अहं ब्रह्मास्मि महावाक्य। येथींचा अर्थ अतर्क्य' (दास० ५–६–४४).

## १० वाल्मीकिरामायण

वाल्मीकिरामायण हा समर्थांच्या उपासनेचा मुख्य ग्रंथ होय. तेव्हां वाल्मीकींविषयीं व त्यांच्या रामायणाविषयीं समर्थांचा निरतिशय प्रेमा असावा हें अगदीं साहजिक आहे. दासबोधाच्या सोळाव्या दशकाचा पहिलाच समास वाल्मीकिस्तवनपर आहे. 'भविष्य आणि शतकोटी। हें तों नाहीं देखिलें दृष्टीं,' 'नसतां रघुनाथ अवतार। नाहीं पाहिला शास्त्राधार। रामकथेचा विस्तार। विस्तारिला जेणें' हें पाहिलें म्हणजे 'वाल्मीका-सारिखा कवीश्वर। न भूतो न भविष्यति.' पूर्वीं त्यानें दुष्टकर्में केलीं होतीं, पण तो रामनामानें उद्धार पावला. 'पूर्वीं होता वाल्हाकोळी। जीवघातकी भूमंडळीं,' पण रामनामापुढें पाप उरेल कोठून? 'उपरति आणि अनुताप। तेथें कैंचें उरेल पाप?। देहान्ततपें पुण्यरूप। दुसरा जन्म जाला॥ अनुतापें आसन घातलें। देहाचे वारुळ जालें। तेंचि नाम पुढें पडिलें। वाल्मीक ऐसें' असो. हा ऋषींत श्रेष्ठ असा वाल्मीकि 'समर्थांचा कवीश्वर' आहे म्ह० रामचरित्राचा गायक आहे. तो नसता तर 'आम्हांस कैंची रामकथा?' वाल्मीकीनें लाखों रामभक्तांचा उद्धार केला आहे. समर्थांनीं आपल्या रामायणांतही वाल्मीकीची व रामकथेची अशीच स्तुति केली आहे.

## ११ गीता आणि भागवत

पूर्वीच्या संतांप्रमाणें समर्थांचाही मुख्य भर उपनिषदें, गीता आणि भागवत ह्यांवरच आहे. उपनिषदांतील अद्वैतसिद्धान्त त्यांनीं आत्मसात्

केला असून गीता–भागवतांचा उपासनाग्रंथ म्हणून अंगीकार केला आहे. भगवद्गीतेंतील वचनें त्यांच्या ग्रंथांतून शतशः आलेलीं आहेत. 'इन्द्रियाणां मनश्चास्मि', 'द्वाविमौ पुरुषौ लोके', 'जीवभूतः सनातनः', 'ददामि बुद्धियोगं तं', 'दंभो दर्पोभिमानश्च', 'उर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्थाः', 'ये यथा मां प्रपद्यन्ते', 'न हि ज्ञानेन सदृशं', 'अश्वत्थः सर्ववृक्षाणां', 'अध्यात्मविद्या विद्यानां', 'आत्मैव ह्यात्मनो बंधुः', 'नैनं छिन्दन्ति शस्त्राणि', 'सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज', 'एकांशेन स्थितो जगत्'—( येकांशें जग चाले। परी सामर्थ्य वेगळालें। येकासंगें मुक्त केले। येकासंगें रौरव ॥ १० ॥ द० १३-१० ) इत्यादि शेंकडों गीतावचनें समर्थांच्या ग्रंथांत इतस्ततः विखुरलेलीं आहेत, त्यांचा त्यांनीं विषयस्पष्टीकरणार्थ उपयोग करून घेतला आहे व कोठे कोठे तर त्यांचा भावार्थही चांगला विशद करून दाखविला आहे. 'देवान् देवयजो यान्ति....यान्ति मद्याजिनोपि माम्' ह्या गीताश्लोकाचा भावार्थ समर्थांनीं पुढील दोन ओव्यांत बहारीनें सांगितला आहे—

**देवांस भजतां देवलोक। पितरांस भजतां पितृलोक।**
**भूतांस भजतां भूतलोक। पाविजेतो** ॥ १० ॥
**जेणें जयास भजावें। तेणें त्या लोकासी जावें।**
**निर्गुणीं भजतां व्हावें। निर्गुणचि स्वयें** ॥ ११ ॥ (द० ९, स० १०)

भागवतावरही त्यांचें अतुल प्रेम होतें. भागवताला त्यांनीं 'पावन करणारें सच्छास्त्र' असे स्पष्ट म्हटलें असून त्यांतील प्रल्हादमुखानें 'श्रवणं कीर्तनं' ह्या नवविधाभक्तीचा ( स्कंध ७, अ० ५ ) जगाला मिळालेला संदेश दासबोधाच्या संपूर्ण चौथ्या दशकांत विशद करून दाखविला आहे. ह्या नवविधाभक्तीवर समर्थांनीं स्फुट कवितेंतही दहावीस ठिकाणीं पूर्ण भर दिला आहे. नवविधाभक्तीनें सद्गुरुभजन कसें करावें हें ज्ञानेश्वरांनीं उत्कृष्ट प्रकारें दाखवून दिलें आहे. ( ज्ञानेश्वरी अ० १३ ).

'तुका म्हणे नवविध । भक्ति जाणे तोचि शुद्ध.' तात्पर्य भागवतानें इतरांप्रमाणें समर्थांनाही नवविधाभक्तीचा राजमार्ग शिकविला आहे. 'नृदेहमाद्यं सुलभं सुदुर्लभं', 'भक्त्याहमेकया ग्राह्यः', 'बद्धोमुक्त इति व्याख्या', 'कविर्हरिरंतरिक्षः' इत्यादि भागवतांतील प्रसिद्ध वचनांचाही अनुवाद समर्थांनीं आपल्या ग्रंथांतून जागोजाग केला आहे. गीता आणि भागवत हे ग्रंथ समर्थांचेही आवडते आहेत.

'पंचीकरणादि अभंगांत' ते म्हणतात—

**गीताभागवतीं उपदेश केला । अर्जुना दाविला देव कृष्णें ॥ १ ॥**
**कृष्णें दाखविला देव तो वेगळा । बोलिजे आगळा सर्वांहूनी ॥ २ ॥**
**सर्वांहूनि सार देव तो साचार । दास म्हणे पार कल्पनेच्या ॥ ३ ॥**

तिसऱ्या ओव्याशतकांत ते म्हणतात—

**संतसंग धरी धन्य तो संसारीं । बोलिले श्रीहरी भागवतीं ॥**
**भागवतगीतासार निरूपण । त्याचें विवरण संतसंगें ॥**

गीताभागवतादि सच्छास्त्रग्रंथांचें निरूपणश्रवण संतमुखानें ऐकावें.

## १२ मुख्यतः गुरुकृपा व उपासनाभक्तिप्रेम पाहिजे

समर्थ सांगतात कीं, जगांत कोट्यानुकोटी ग्रंथ आहेत, 'किती संस्कृतें देशभाषा मऱ्हाटी'—संस्कृतांत, अनेक देशी भाषांत, तसेच मराठींत लाखों ग्रंथ आहेत. हे सर्व एका पंडिताला वाचतां येणार नाहींत व वाचून तरी काय उपयोग? निश्चयाचें ज्ञान नसेल तर बहुभाषाकोविदत्व किंवा बहुश्रुतत्व कांहीं मनुष्याच्या उद्धाराला उपयोगीं पडत नाहीं. कित्येक ग्रंथांत 'गपागोवी' म्ह० विचारांचा गोंधळ असतो, त्यामुळें वाचकाचा निश्चय होत नाहीं. साधकाला त्यांत काय सांपडणार? 'खरा देव तो मुख्य ठायीं पडेना' आणि संशय सरेना. नानापरींचीं पुराणें व शेंकडों ग्रंथ आहेत ते मतान्तरें व अभिमान मात्र वाढवितात. असो; प्रत्ययाचें

ब्रह्मज्ञान सांगेल व निश्चयात्मक ज्ञान देईल तोच ग्रंथ वाचावा, व अशाच गुरूला शरण जावें. गुरु शिष्याला देहातीताचा विचार सांगत आहे आणि शिष्य गुरूला मनुष्यबुद्धीनें पाहत आहे तेथें ज्ञान कसचें?—चळेना, ढळेना अशा परब्रह्माचें ज्ञान झालें तरच तें ज्ञान. संशय तुटे व निश्चय जडे तें ज्ञान.

**म्हणे दास वीचार आधीं पहावा। बरा निश्चयो शाश्वताचा करावा॥**

शाश्वत एक परब्रह्म आहे आणि त्या अद्वैताची वोळखण ज्या ग्रंथांत आहे तोच ग्रंथ पहावा आणि त्यांतून आपण प्रत्ययाचें ज्ञान घ्यावें. आत्मप्रत्ययावांचून समाधानसुख होत नाहीं आणि प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान सगुणोपासनेशिवाय होत नाहीं —

**अनेक शास्त्रीं पाहतां पडेना। आयुष्य थोडें पाहणें घडेना॥**
**विश्वास येके वचनीं धरावा। संसार हा दुस्तर नीरसावा॥**

केवळ चर्चेनें किंवा वादानें किंवा ग्रंथाध्ययनानेंही अद्वैतबोध होत नाहीं. त्याला गुरूकृपाच पाहिजे. 'आधीं अध्यात्मश्रवण। मग सद्गुरुपादसेवन। पुढें आत्मनिवेदन। सद्गुरुप्रसादें॥ आत्मनिवेदनाउपरी। निखळ वस्तु निरंतरी। अहमात्मा हा अंतरीं। बोध आला' (दास० ६—३). सद्गुरुविण न घडे स्वहित, सद्गुरुविण मोक्ष नाहीं, सत्संगाविण तरणोपाय नाहीं, हा परंपरेचा सिद्धान्त समर्थांनींही शतशः सांगितला आहे. 'अंतरीं शुद्ध ब्रह्मज्ञान। बाह्य निष्ठेचें भजन' हें सद्गुरुलक्षण आहे. सतरा नाहीं, सतराशें गुरु केले तरी सद्गुरु वेगळाच आहे. 'ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान। पाहावें आपणासि आपण' ही दृष्टि सद्गुरुकृपेनेंच मिळते. सद्गुरूपाशीं निर्गुण व सगुण, ज्ञान व भक्ति हीं एकरूप असतात. ते स्वधर्म, नीतिन्याय, उपासना—भक्ति हाच आचारमार्ग सांगतात व यांत पूर्णता दिसली कीं कृतार्थ करितात. अद्वैत गुरुगम्य आहे म्हणून गुरूला शरण

जावें व गुरुभक्तीनें देव आकळावा असें सांगतात. 'एक गुरु एक देव। कोठें तरी असावा सद्भाव.' विश्वासावांचून ज्ञान फलदायी होत नाहीं.

'वाणी शुद्ध करीं नामीं। चित्त शुद्ध होय प्रेमीं'–वाणी नामघोषानें व चित्त प्रेमानें शुद्ध होतें. कर्ण कीर्तनश्रवणानें, मस्तक चरणांबुजनमनानें, त्वचा चरणरजानें, कर पूजनानें, पाद मंदिरीं जाण्यानें, प्राण निर्माल्य हुंगण्यानें, बुद्धि रामचरणीं रमल्यानें शुद्ध होते–'रामपायीं राहतां बुद्धी। रामदासा सकळ शुद्धी.' भक्ताचा शुद्धिकरणविधि असा आहे. हा शुद्धीचा मार्ग सर्वांसच मोकळा आहे!

**'भावभक्तीवीण उद्धरला कोण ?।**
**यालागीं सगुण भक्तिभाव॥**

सकळ आगमनिगमांचें सार–'भजनरहित ज्ञानें मोक्ष होणार नाहीं' हेंच समर्थांनीं सांगितलें आहे. आत्मनिवेदनी भक्ति नसेल तर दिव्यासवें काजळी तसा ज्ञानाबरोबर जाणिवेचा पुंज असतो. ज्ञानापेक्षांही भक्तीची महति अधिक आहे. समर्थ स्वानुभव सांगतात —

**भेटी देईना जनांसी। पाठी लागे सज्जनासी॥**
**ऐसें प्रीतीचें लक्षण। भेटीविण नाहीं क्षण॥**

* * * *

**देव अभक्तां चोरला। आम्हां भक्तां सांपडला॥**
**रामदासाचें अंतर। देवापाशीं निरंतर॥**

हीच भक्ति, हेंच ज्ञान व हीच सद्गुरुकृपा! भक्तिज्ञानावांचून मनुष्यप्राणी निर्नासिक (नकटा) होय! कथानिरूपण नाहीं तर कान असून बहिरा! 'नाहीं देवाचें वर्णन' तो मुका! देवदर्शन नाहीं तर अंध! देवाच्या व जनीजनार्दनाच्या सेवेंत हात राबविले नाहींत तर थोटा! तीर्थाटण नाहीं तर पांगळा! सर्वेन्द्रियें हरिसेवेस लावलीं तरच जिवंत, नाहींतर मेलेला!

## १३ मराठी भाषेचें महत्त्व

मराठी ग्रंथ व मराठी भाषा यांच्यासंबंधानें समर्थ म्हणतात — 'मराठींत आहे काय? शहाण्यांनीं मराठी ग्रंथ पाहूं नयेत,' असें म्हणणारे जे कोणी § आहेत त्यांचें म्हणणें मनावर घेऊं नये. अहो! भाषेकडे पाहायचें कां अर्थाकडे पाहायचें? बहुमोल रत्नें लोखंडाच्या पेटींत सांठविलीं आहेत म्हणून पेटीकडे पाहून शाहणा मनुष्य रत्नें टाकील काय? पूर्ण अर्थ मराठींतून लाभतो तेव्हां मंदबुद्धीशिवाय मराठीची हेळणा कोण करील? द्रव्य घ्यावें, सांठवणाकडे पाहूं नये.

**तैसें प्राकृतीं अद्वैत। सुगम आणि सप्रचीत।**
**अध्यात्म लाभे अकस्मात। तरी अवश्य घ्यावें॥**

प्राकृत ग्रंथांत सुगम आणि सप्रचीत अध्यात्मज्ञान मिळतें, व्युत्पत्तीचे श्रम न करितां सकलशास्त्रार्थ सुगम होतो, व संतांच्या मुखानें हा महल्लाभ होतो म्हणून मराठी ग्रंथांचा आदर अवश्य करावा. व्युत्पत्तीनें न कळणारे ज्ञान सन्मुखानें अनायासें कळतें. भाषेंत पालट झाला, भाषा भिन्न झाली, म्हणून कांहीं 'अर्थ वायां जात नाहीं,' कार्यसिद्धि तर सारी अर्थापाशींच आहे. 'अर्थ सार, भाषा पोंचट' म्हणजे अर्थ हा दाणा आहे, व भाषा हें बाहेरचें टरफल आहे. 'प्राकृताकरितां। संस्कृताची सार्थकता;' संस्कृतांत जो गुप्तार्थ आहे तो प्राकृतांत आल्यामुळें लोकांच्या उपयोगीं पडतो, नाहींतर तो कळायचा आहे कोणाला? ज्या अध्यात्मांत अनुभवाचा जिव्हाळा आहे तें मराठींत आल्यानें संस्कृतापरीसही मोलवान् ठरतें. ज्ञानभोजनाची चाड असेल तर शब्दांत गुंतूं नका. 'आज्य' म्हटलें काय नी 'तूप' म्हटलें काय कांहीं फरक कां होतो? अर्थाकडे दृष्टि ठेवून ब्रह्मानुभव घ्यावा.

---

§ तेव्हांचे शास्त्रीपंडित व अलीकडचे इंग्रजी विद्वान्!

**जेथें निरूपणाचे बोल । आणि अनुभवाची वोल ।**
**तें संस्कृतापरीस सखोल । अध्यात्मश्रवण ॥ (द० ७, स० १.)**

## १४ भक्तांची नामावळी

'समर्थकृत भक्तांची आरती' पाहावी म्हणजे प्राचीन भक्तांविषयीं समर्थांचा केवढा आदर व प्रेमा होता हें दिसून येतें. 'भक्तांची एक आरती केली कीं वनमाळीच्या (देवाच्या) सहस्र आरत्या केल्यासारखें होतें' असें येथें समर्थांनीं म्हटले आहे. ह्या आरतींत इतर संतांप्रमाणें पौराणिक व पूर्वी होऊन गेलेल्या अशा सुमारें १०० भक्तांची नामावळी समर्थांनीं दिली आहे व त्यांत महाराष्ट्रीय (व भारतीयही) भक्तांचीं नांवें आलीं आहेत. पौराणिक भक्तांचीं नांवें मनोबोधांत व इतरत्र आलेलीं आहेत, पण मराठी संतांचीं नुस्तीं नांवेंही या आरतीशिवाय समर्थांनीं कोठेंही दिलीं नाहींत! या ६१ संतकवींच्या नांवांत ज्ञानेश्वरपंचक आहे; विसोबा खेचर आहेत; तुलसीदास, मीराबाई व सूरदास आहेत; बहिरा पिसा व विठा रेणुकानंदन आहेत; जनजसवंत, पाठक, मुद्गल, केशवदास चांगा, माधवदास आहेत; 'एकोजनार्दन' आहेत. यांतील १५।२० नांवें समर्थांच्या वेळीं ज्ञात असलीं तरी आज अज्ञात आहेत. ज्ञानेश्वरकालीन व नाथकालीन बहुतेक संतांचीं नांवे आहेत. समर्थांना सहज सुचलीं तीं नांवे या आरतींत आलीं आहेत. मुकुंदराज, त्र्यंबकराज व दासोपंत यांचे ग्रंथ समर्थांनीं पाहिल्याचीं स्पष्ट प्रमाणें दाखवितां येतात, पण त्यांचा नामोल्लेख समर्थांनीं केला नाहीं याचें जरा नवल वाटतें! ह्या आरतीचें ध्रुवपद फार गोड आहे.

**जयजयजय आरती भक्त सुखमूर्ती ।**
**प्रेमभावें अव्यक्त आणियेलें व्यक्ती ॥**
**वैराग्यभास्कर सहज निजशांति ।**
**ज्ञानघन पूर्ण स्वयंबोधस्थिति ॥ ध्रु० ॥**

## १५ चमत्कारांवर समर्थांचा विश्वास होता काय ?

(१) 'जनस्वभाव गोसावी' म्हणून समर्थांचें एक छोटेंसें (७० ओव्यांचें) प्रकरण आहे, त्यांत साधुसंतांनीं केलेल्या चमत्कारांवर अविश्वास प्रगट झाल्याचा भास होणारा आहे, पण तें नीट पाहिलें म्हणजे 'प्रचीतीविण ज्ञान' बोलणाऱ्या व गुरूची खरी योग्यता न जाणतां त्याच्या चमत्कारांचाच बडेजाव करणाऱ्या अनधिकारी शिष्यांची समर्थांनीं येथें कानउघाडणी केली आहे असें स्पष्ट दिसतें. त्यांत 'अचेतन चालविती। रेड्याकरवीं वेद म्हणविती,' यांत ज्ञानेश्वरांचा उल्लेख आहे. 'व्याघ्रावरी निःशंक । हातीं सर्पाचा चाबूक । वांचले होते सहस्र एक। सामर्थ्यबळें' ओवी ही चांगदेवांविषयीं आहे. वांझेचें वांझपण फेडणें, मेलेले प्राणी उठवणे, वाळलीं काष्ठें हिरवळणें, आंधळ्यास डोळे येणे, नवस पुरवणें, अग्नीमध्यें न जळणें, समुद्रावरी चालत जाणे, व्याघ्र घरास आणणें, पाण्याच्या घागरीचें तूप करणे, मद्यमांसाचीं फुलें करणे, वाळवंटांत पुरून राहणें इ० अनेक अलौकिक चमत्कारांवर अश्रद्धा उत्पन्न होण्यासारखें हें प्रकरण दिसतें. तथापि गुरूंच्या नुस्त्या अलौकिक गोष्टी सांगून कोणी उद्धरत नाहीं--'येणें सार्थक नव्हे कीं । अध्यात्मविद्या विवेकीं। जाणिजेते' एवढेंच सांगण्याचा समर्थांचा येथें हेतु आहे.

दासबोधांत (द० १० स०१०) नरदेहस्तवनाच्या ओव्यांत 'संतमहंत ऋषिमुनी। सिद्ध साधु समाधानी । भक्त मुक्त ब्रह्मज्ञानी । विरक्त योगी तपस्वी॥ तत्त्वज्ञानी योगाभ्यासी' असे लक्षावधि सिद्ध होऊन गेले व त्यांनीं नरदेह धन्य केला असें म्हटले आहे. या समासांत योगसिद्धीच्या बळावर 'येक तेजीं तेजचि झाले। येक जळीं मिळोनि गेले। येक ते दिसतचि अदृश्य जाले । वायुस्वरूपीं ॥ येक येकचि बहुधा होती। येक देखतचि निघोनि जाती । येक बैसले असतांचि भ्रमती। नानास्थानीं समुद्रीं॥'

असे अनेक हटनिग्रही कृतबुद्धि सिद्ध झाल्याचें समर्थांनीं म्हटले आहे. समर्थांच्यानंतरच्या काळांत ‘तेजीं तेजचि’ झाल्याचें उदाहरण विदर्भसंत देवनाथ यांचें आहे व ‘जळीं मिळोनि गेले’ याचे उदाहरण रामतीर्थांचे आहे. ‘दिसतचि अदृश्य जाले’ किंवा ‘देखतचि निघोनि गेले’ याचीं उदाहरणें देऊं म्हटल्यास मुक्ताबाई व तुकोबाराय यांचीं नांवें सहज डोळ्यांपुढें येतात. ‘येक भयानकावरी बैसती। येक अचेतने चालविती’ येथें तर चांगदेव व ज्ञानेश्वर यांच्या चरित्रांचा स्पष्टच उल्लेख आहे. ‘येक प्रेते उठविती तपोबळें’ येथें तुकोबांनीं मृतबालक कीर्तनांत उठविल्याचा उल्लेख असावा. तपोबळें प्रेत उठवल्याची गोष्ट समर्थांच्याही चरित्रांत घडलेली आहे. ‘येक बैसले असतांचि भ्रमती। नाना स्थानीं समुद्रीं’ येथें चिचवडचे मोरया गोसावी यांच्या सिद्ध चमत्कारांचा उल्लेख दिसतो. समर्थही एकाच वेळीं चाफळांत व काशींत प्रगट झाल्याची प्रसिद्धी आहे. योगसिद्धीवर समर्थांचा विश्वास असावासें वाटतें. समर्थांनीं आपल्या दीर्घप्रवासांत अनेक सिद्ध चमत्कार पाहिले असावेत. पुष्कळ अंधशिष्य आपल्या गुरूच्या नांवावर अनेक चमत्कार पिकवितात हेही कांहीं खोटें नाहीं.

आत्मप्रचीतीचे महत्त्व सांगतांना (द० १० स० ६) समर्थांनीं ‘भ्रमरूप विश्व स्वभावें। तेथें काय म्हणोनि सांगावें। निर्गुण ब्रह्मावेगळे आघवें। भ्रमरूप’ असा व्यापक सिद्धान्त केला आहे व ‘गत ज्ञात्यांचे चमत्कार’ हा प्रश्न उपस्थित करून त्याचे उत्तर दिले आहे. ‘ज्ञात्याची समाधि पूजिली। तेथें कांहीं साक्ष आली। किंवा नाहीं॥ तैसेचि अवतार संपले। त्यांचेंही सामर्थ्य उदंड चाले। तरी ते नाहीं गुंतले। वासना धरूनी’ ह्या आशंकेचे समर्थांनीं उत्तर दिले आहे. समर्थ म्हणतात कीं, ज्ञाते मुक्त होऊन गेले ते वासना धरून पुन्हा येत नाहींत, तथापि ते पुण्यमार्गें चालले म्हणून त्यांचे सामर्थ्य चालतें हें कांहीं खोटें नाहीं. तथापि

'हा लोकांचा भावार्थ। भाविकां देव यथार्थ। अन्यत्र कल्पना व्यर्थ। कुतर्कांची.' भाविकांच्या विश्वासाचा हा भाग आहे; त्यांना देव खराच आहे; त्याबद्दल इतरांनीं व्यर्थ कुतर्क काढण्यांत अर्थ नाहीं! निष्काम भजनाने देव जोडावा व ब्रह्मज्ञानाने मुक्त व्हावें हा मुख्य परमार्थ आहे.

## १६ मुकुंदराज आणि समर्थ

शास्त्रीय परिपाटीनें वेदान्तावर मराठींत लिहिला गेलेला पहिला अत्युत्कृष्ट ग्रंथ म्हणजे मुकुंदराजांचा विवेकसिंधु हा ग्रंथ होय. याचीं एकंदर १८ प्रकरणें असून ओवीसंख्या १६७१ आहे. 'वेदशास्त्राचा मथितार्थु। मऱ्हाठिया होय फलितार्थु। तरी चतुरीं परमार्थु। कां न घ्यावा?' असें मुकुंदराज विचारतात.--ह्या ग्रंथांत वेदशास्त्रांतील समर्पक अवतरणें जागोजाग घेतलीं असून मुकुंदराजांनीं आपल्या स्वानुभवाचा व गुरुभक्तीचा आनंद त्यांत मिसळला असल्यामुळें ग्रंथ फार बहारीचा उतरला आहे. ग्रंथ अगदीं समजूत पटवणारा आहे. यांत पिंडब्रह्मांडांच्या अष्टदेहांचें निरसन केलेलें असून जीव व ब्रह्म यांचे ऐक्य प्रतिपादिले आहे. अर्थात् ग्रंथ अद्वैत-मतप्रतिपादक आहे. 'शंकरोक्तीवरी। मी बोलिलों मऱ्हाटी वैखरी--' श्रीशंकराचार्यांच्या सिद्धान्ताचें ह्या ग्रंथांत प्रतिपादन आहे.

विवेकसिंधु ग्रंथ समर्थांनीं पाहिला होता व त्याची दासबोधावर छापही पडली आहे. पहिल्याच प्रकरणांतील गुरुशिष्यलक्षणें व गुरु हा परीस, कामधेनु, कल्पतरु, चिंतामणि यांपेक्षां कसा श्रेष्ठ आहे याचें विवरण दासबोधांतील याच विषयाशीं ताडून पाहण्यासारखें आहे (दास० द० १, स० ४). समर्थांनीं दृष्टान्तासाठीं आणखी १०।१२ पदार्थ घेऊन विवरण अधिक ठसठशीत व आटोपशीर केलें आहे इतकेंच. विवेकसिंधु व दासबोध हे दोन्ही ग्रंथ गुरुशिष्यसंवादरूपानें सांगितले आहेत. दोहींत आक्षेप व शंका यांचें खंडण आहे. रोकडें ब्रह्मज्ञान, प्रबोध, अहंतेचें

काविरें, गुणक्षोभिणी, केवळब्रह्म, पंचभूतांचा कर्दम, दुश्चितपण, शुद्ध-शबल, कैवल्याचा दानी, हिंपुटी, जाणीव—नेणीव, 'पंचमहाभूतें पावलीं स्पष्ट दशेतें,' 'ऐक्य निरंतर । असतचि असे' इ० शब्दप्रयोग मूळ विवेकसिंधूंत आहेत ते तसेच दासबोधांत आढळतात. स्थूल—सूक्ष्म देहांचीं वर्णनें, सत्त्वरजतमोगुणांचीं लक्षणे, चारी मुक्ति, पंचप्रळय 'शुकोमुक्तावामदेवोवा' याचें रहस्य, सप्तावरण ब्रह्मांड व विराटाचें स्थूळ रूप यांचीं दोन्ही ग्रंथांतलीं वर्णनें अगदीं एकसारखीं आहेत. दोन्ही ग्रंथकार स्वतंत्र बुद्धीचे प्रज्ञावंत आहेत, तथापि पूर्वील संस्कृत ग्रंथांचे आधार दोघांनींही दिले आहेत.

**याच देहीं आपुले डोळां । जंव न भोगिजे मुक्तीचा सोहळा ।**
**तरी वैराग्याचा ताळवेळां । कां शिणावें ? ॥ विवेक० १—२८**

हाच विचार समर्थांचा आहे. 'येचि जन्में येचि काळें । संसारीं होईजे निराळें' (दास० ६-९ ).

## १७ ज्ञानेश्वर आणि समर्थ

( १ ) ज्ञाने०—सोनियाचा दिवस आजि अमृतें पाहला ॥
समर्थ—सोनियाचा दिवस जाला । पांडुरंग रंगीं आला ॥

( २ ) ज्ञा०—कापुराची वाती उजळली ज्योती । ठायींच समाप्ती जाली जैसी
समर्थ०—केलें संघट्टण कापुरें अग्नीशीं । तैसी भिन्नत्वासी उरी नाहीं ॥

( ३ ) दोघांचाही०—भावेंवीण भक्ति भक्तीवीण मुक्ती ।

( ४ ) 'धर्म जागो निवृत्तीचा' व 'धर्म जागो सदैवाचा' ह्या ज्ञानेश्वरांच्या पदांवरूनच 'राघवाचा धर्म जागो' हा पांगुळ समर्थांना स्फुरलेला दिसतो. चाल एकच आहे.

**ज्ञाने०— तैसा शरीरीं हन कर्मे । तो भक्त ऐसा गमे ।**
**परी अंतरप्रतीतिधर्मे । मीच जाहला ॥**
**राम०— देहास लागली उपासना । आपण विवेकें उरेना ।**
**ऐसी स्थिति सज्जना— । अंतरींची ॥**

## १८ दासोपंत व समर्थ

दासबोधाचा केवळ पूर्वावतार असा दासोपंतांचा 'ग्रंथराज' नांवाचा एक सुंदर ग्रंथ आहे. दोन्ही ग्रंथांस ग्रंथराज म्हणतात. दासोपंतांचा ग्रंथराज १२०० ओव्यांचा असून त्याचीं आठ प्रकरणें आहेत. ह्या ग्रथाची समर्थांच्या दासबोधावर चांगलीच छाया पडलेली आहे. समर्थांचे आवडते शब्द 'प्रबोध' व 'प्रतीति' हे दासोपंतांच्या ग्रंथांत वारंवार आलेले आहेत. समर्थांनीं 'प्रयत्न' याची त्याला जोड दिली आहे. 'प्रतीति, प्रबोध व प्रयत्न' ह्या तीन शब्दांत समर्थांच्या शिकवणीचें सर्व रहस्य सांगतां येतें. दासोपंतांनीं आपल्या ग्रंथराजाच्या तिसऱ्या प्रकरणांत संसाराचें जें एक चित्र रेखाटलें आहे त्याचेंच अधिक ठसठशीत व कांटेकोरीचें स्वरूप समर्थांच्या ग्रंथराजांत ( द० ३ ) पाहावयास मिळतें! समर्थांनीं आपलें 'संसारचित्र' मूळ दासोपंतांच्या ग्रंथावरून घेतलेले आहे यांत शंकाच नाहीं. दासोपंतांच्या ग्रंथांतील १ ल्याच प्रकरणांतील गुरुशिष्यलक्षणांशीं दासबोधांतील गुरुशिष्यलक्षणें ताडून पाहण्यासारखीं आहेत. समर्थांचें वर्णन अधिक उठावदार आहे हें स्पष्ट आहे. 'रोकडा ब्रह्मसाक्षात्कारु। करूं जाणे तो सद्गुरु। मोक्षाचा नाहीं उधारु। जयाप्रती' (दासो० १–३३ ). 'ग्रंथावरूनि ज्ञान होय। तरी कां सेवावे गुरूचे पाय' (दासो० २–९७). याच कल्पना याच शब्दांत दासबोधांत व्यक्त झालया आहेत! त्रिविधा प्रतीति, शुद्धशबल हा विचार, अध्यात्माची महती, अष्टदेह व त्यांचें निरसन, पंचीकरण, पंचप्रळय दोन्ही ग्रंथांत सारख्याच तऱ्हेनें सांगितले आहेत! दासोपंतांनीं संसारचित्र कसें रेखाटलें आहे हें पूर्वी दाखविलेलें आहे (खंड २, पृ० १५७–१६०) त्याशीं दासबोधांतील वर्णन (दास० द० ३, स० १ ते ५) ताडून पाहिलें म्हणजे समर्थांना त्याची स्फूर्ति दासोपंतांपासून मिळाली हें कोणालाही कबूल करावेंच लागेल.

## १९ नाथ व समर्थ

मुकुंदराज समर्थांपूर्वी चारशें वर्षांमागें होऊन गेले. नाथांच्या प्रयाणानंतर १० वर्षांनीं समर्थ जन्माला आले व दासोपंत निजधामाला गेले तेव्हां समर्थ अवघे ७ वर्षांचे होते. अर्थात् मुकुंदराज, नाथ व दासोपंत यांच्या विचारांचे व भाषेचे पूर्ण संस्कार समर्थांवर झाले असल्यास त्यांत नवल नाहीं. समर्थांनीं यांचे ग्रंथ अभ्यासिले होते याविषयीं यांचे व समर्थांचे ग्रंथ पाहिले असतां खात्री पटते. तशा प्रकारचीं अंतरंगप्रमाणेही आढळतात, किंबहुना समर्थांनीं आपल्यापूर्वी होऊन गेलेल्या संतकवींचे अनेक मराठी ग्रंथ चांगले पाहिले होते असें म्हणण्यास हरकत नाहीं. अनादि ओघ असाच आहे. नाथ व समर्थ यांच्या अभंगांचे गाथे पहावेत.

**दत्त ध्यावा दत्त गावा । दत्त आमुचा विसांवा ॥ १ ॥**
**दत्त जनीं दत्त वनीं । दत्तरूप हे अवनी ॥ २ ॥**

हा अभंग ‘ दत्ताच्या ’ ऐवजीं ‘ राम ’ येऊन समर्थगाथ्यांत आला आहे !

**भाग्यहीन बहु असती । कमळापती सांभाळणें ॥**
**गर्जे ब्रीदाचा तोडर । चराचर त्रिभुवनीं ॥**
**शरणागता वज्रपंजरु । हा बडिवारु त्रिजगतीं ।**

ह्या नाथांच्या अभंगांतील ‘ ब्रीदाचा तोडर ’, ‘ शरणागता वज्रपंजर ’, ‘ बडिवार ’ हे शब्द समर्थांच्या वाणींत वारंवार येतात. ‘ देह जावो अथवा राहो । आम्ही वस्तूचि आहों,’ ‘ रिता नाहीं कोठें ठाव । जिकडे पाहें तिकडे देव,’ ‘ जळीं स्थळीं पाषाणीं भरला । रिता ठाव कोठे उरला ? ’,‘ आयुष्य खातो काळ तुम्ही राम कां रे म्हणाना,’ ‘ कीटक पाषाणांत वसे । त्याचे मुखीं चारा असे ’ इत्यादि नाथांचे अभंगपाद समर्थांच्या अभंगादिकांत वारंवार आढळतात. समर्थांच्या कवितेला जें एक व्यावहारिक उपदेशाचें वळण आहे त्याच वळणाचें नाथांचेंही एक उपदेशपर भारूड आहे.

**सांडावरून जाऊं नये । लांच खाऊं नये ।**
**चोहट्यांत राहूं नये । कोणी एक ॥**
**अक्रीत घेऊं नये । इमान सोडूं नये ।**
**बैमान होऊं नये । कोणी एक ॥**
**सज्जनासी विटूं नये । नीचासवें बाटूं नये ।**
**तस्करासी पुसूं नये । कोणी एक ॥**
**भक्तिमार्ग खंडूं नये । कुभांड्यासी तंडूं नये ।**
**खळासंगें भांडूं नये । कोणी एक ॥**
**शिवेचा गुंडा ढाळूं नये । केला नेम टाळूं नये ।**
**पापद्रव्य जोडूं नये । कोणी एक ॥**
**असत्यवाद करूं नये । खोटा संग धरूं नये ।**
**भोंचकासी मैत्री करूं नये । कोणी एक ॥**
**भलते भरीं भरूं नये । अनाचार करूं नये ।**
**कपट मनीं धरूं नये । कोणी एक ॥**
**एका जनार्दनीं भावें । संतचरणीं लीन व्हावें ।**
**सदा हरिनाम उच्चारावें । कोणी एक ॥**

नाथांच्या वर्णनांची व भाषेची व्यापकता आणि प्रेमळ रसाळता मराठी वाङ्मयांत अतुलनीय आहेत. त्यांचें भावार्थरामायण व विशेषतः सुंदरकांड व युद्धकांड हीं दोन कांडें पुढें ठेवून समर्थांचें रामायण पहावें. दोघांचींही रामायणें वीररसानुकूल भाषेंतच वर्णिलीं आहेत. समर्थांनीं नाथांचें भावार्थरामायण खास पाहिले होतें असें वाटते.

**देखे ठकाराचें निजठाण । दों हातीं धनुष्यबाण ।**
**(बाल०, अ० ६)**

ही नाथांची ओवी समर्थांच्या 'ठकाराचें ठाण । करीं चापबाण' ह्या रामरूपाचें स्पष्ट चित्र उभें करिते ! नाथांच्या किष्किंधाकांडांतील (अ० १२) पंचप्रळयांचें वर्णन समर्थांच्या वर्णनाशीं ताडून पाहावें. समर्थांचें एक 'लघुरामायण' म्हणून १२५ पद्यांचें सुंदर प्रकरण आहे,

त्यांत रावणाने देवांना बंदींत घातले व त्यांना आपल्या सेवेस जुंपले याचे मौजेचे वर्णन आहे.

**समीर लोटितो खडे । वरुण घालितो सडे ।**
**मयंक ( चंद्र ) साउली धरी । मळीण पावकू हरी ॥ १३ ॥**
**विधी विधीस धाकतो । सुरेंद्र बाग राखतो ।**
**करावयासि निग्रहो ।। भुमंडळासि विग्रहो ॥ १४ ॥**
**अखंड चाकरी करी । सदा वरूचि भाद्री ।**
**सटी आरंधळी ( ओरडून ) दळी । गणेश गाढवें वळी ॥ १५ ॥**

नाथांच्या भावार्थरामायणांत या प्रकारचे वर्णन २।३ वेळां आलेले आहे. ( अयोध्या०, अ० ३ पहा. )

**इंद्र बारी चंद्र छत्रधारी । यम पाणी वाहे घरीं ।**
**वायु सदा झाडी ओसरी । विधि तेथें करी दळाकांडा ॥ ५ ॥**
**राहू केतू शनि अंगारी । त्यांची पीडा सुरासुरीं ।**
**रावणें करूनियां पायरी । मंचकावरी वेंघतु ॥ १० ॥**
**विघ्न राहूं न शके जयापुढें । तो गणेश होवोनि बापुडें ।**
**गाढवांचे कळप गाढे । चहूंकडे वळीतसे ॥ १२ ॥**
**उदकक्रिया वरुणाहातीं । व्यजनसेवा नित्य वसंतीं ।**
**निरोप सांगावया बृहस्पती । प्रजापती शांतिपाठकु ॥ १३ ॥**

पुन्हा ( युद्ध०, अ० ८ ) असेंच वर्णन आहे—

**सूर्य जो कां सहस्रकर । द्वारपाळ निरंतर ।**
**मळयानिळ चवरधर । चंद्रें छत्र धरावें ॥ ५७ ॥**
**वायूचा अधिकार जाण । बिदी (रस्ते) झाडाव्या संपूर्ण ।**
**वरुण येवोनि आपण । सडासंमार्जन करावें ॥ ५८ ॥ इ. इ.**

नाथ व समर्थ या दोघांनीं गणेशाला गाढवें वळायला लावले आहे. बुद्धिदात्या मंगलमूर्तीनें गाढवांना म्ह० मूढांना बुद्धि देऊन स्वहिताच्या मार्गाला

लावलें आहे तें ठीकच आहे ! नाथांचीं वर्णनें अधिक व्यापक व विस्तृत असतात व समर्थांचीं आटपशीर असतात. रावणाच्या बंदींतून देवांना सोडविण्यासाठीं रामाचा अवतार झाला हें दोघांनींही अनेकवार म्हटले आहे.

( १ ) विघुरल्या—थिजल्या तुपाचा दृष्टान्त नाथांचा आवडता आहे—

**विघुरलें तें तूप होये । थिजलें त्यापरिस गोड आहे ।**
**निर्गुणापरिस सगुणीं पाहें । अतिलवलाहें स्वानंदु ॥**

**( भाग० ११, १४५९ )**

समर्थही ओव्याशतकांत म्हणतात—

**हारपोनि गेलें तूप हें थिजलें । जऱ्ही विघुरलें तऱ्ही तूप ॥**

( २ ) अनेक लौकिक गुरूचीं लक्षणें ( सद्गुरूचीं नव्हत, नाथ-भागवतांत ( अ० ३. ओवी २७५–२९७) आहेत तशींच दासबोधांत ( द० ५, स० २ ) आलीं आहेत.

( ३ ) नाथांच्या पदांतील ' वारियाने कुंडल हाले । डोळे मोडित राधा चाले ' ह्या प्रसिद्ध चरणाची ' सकळ कळांचा हरी ' ह्या समर्थांच्या कृष्णपर पदांतील ' डोलत डोलत चाले । श्रवणीं कुंडल हाले ' हें पद पाहत असतांना आठवण होते. समर्थांचीं कृष्णावर जीं १०।५ पदें प्रसिद्ध आहेत त्यांवर नाथांच्या ' गौळणीं 'ची छाप आहे.

( ४ ) नाथांच्या ' जागल्यां ' तील ' जुनें ठेवणें ' समर्थांनीं घेतलें आहे.

( ५ ) ' सांडी मांडी ' शब्द नाथांचे मूळचे समर्थांनीं घेतले आहेत.

( ६ ) आयुष्य जातें पळपळ तुजला कैसें कळेना ॥ ( नाथ )
घटका जाती पळें जाती राम कां रे म्हणाना ॥ ( समर्थ )

( ७ ) ' भगवद्भावो सर्वांभूतीं । हेंचि ज्ञान हेचि भक्ति ' हा नाथांचा अभंग ' आठव तो परब्रह्म ' ह्या समर्थपदाशीं ताडून पहावा.

( ८ ) 'धांव रे धांव आतां । दीनवत्सला रामा' हें नाथांचें पद व 'धांव रे रामराया किती अंत पाहसी' हे समर्थांचें पद एकसारखींच आहेत.

( ९ ) नाथांचा पांगूळ—

**सहजपूर पाटणीं गा एक जनार्दन दाता ।**
**पांगुळा पाय देतो विश्रांति समस्तां ॥**

ह्या व समर्थांचा 'पांगूळ' बरोबर वाचावेत. नाथांची छाया समर्थांच्या कवितेवर चांगलीच पडलेली दिसून येते.

## २० त्र्यंबकरायांचा बालबोध व समर्थांचा दासबोध

मराठी वाङ्मयाच्या इतिहासाच्या दुसऱ्या खंडांत त्र्यंबकराय व त्यांचा बालबोध ग्रंथ यांविषयीं १५ व्या प्रकरणांत मी सविस्तर विवरण केलें आहे. 'बालबोध' हा ग्रंथ समर्थांच्या पाहण्यांत आला होता हे मी पुढें दाखवीतच आहें; पण 'बालबोध' या नांवावरूनही समर्थांना आपल्या ग्रंथास 'दासबोध' हें नांव द्यावेंसें वाटलें असेल कीं काय असा प्रश्न मनांत उभा राहतो. 'जयबोध' नामक एक ग्रंथ दासबोधानंतर १०० वर्षांनीं कोणा जयरामानें केलेला आहे ! या तीनही बोधांचा अल्प तरी अन्योन्यसंबंध असावा. बालबोध ग्रंथाचा रचना-काल शके १४९४ ते १५०२ हा त्र्यंबकरायांनींच दिला आहे, अर्थात् तो दासबोधाच्या ७५।८० वर्षें अगोदर झाल्याचें उघडच आहे. ह्या ग्रंथाच्या ओव्या ५२४० असून तो दासबोधाच्या दोन-तृतीयांशाएवढा मोठा आहे. हा प्रणवोपासनेचा ग्रंथ असून निर्गुणज्ञानपर आहे. त्यांत त्या वेळचीं मतमतान्तरें सांगितलीं असून त्यांचें निरसन केलें आहे. ग्रंथांत अष्टांगयोग, पंचीकरण, अष्टदेह-निरसन इ० विषयांचें पण मुख्यतः अद्वैताचें प्रतिपादन आहे. त्र्यंबकराय हे नाशिक जिल्ह्यांतील सप्तशृंगीदेवीचे एकनिष्ठ उपासक होते. नाशकाजवळ टाकळी येथें अनुष्ठानार्थ बारा वर्षें राहिलेल्या समर्थांच्या अवलोकनांत प्रस्तुत

ग्रंथ आला असल्यास त्यांत नवल नाहीं. यांतील पंचप्रळय, अजपाजप-निरूपण, हे विषय दासबोधांत आले आहेत.

**पुढां तत्त्वविवरण । तत्पद त्वंपदलक्षण ।**
**शबळ शुद्ध कार्यकारण । सांगावें तें ॥**
**या बुद्धी ब्रह्मीं असे । लोकसंग्रहीं सदा वसे ।**
**सांडणें मांडणें नसे । ठाईं वहोनि ॥**

या भाषेचें दासबोधांतील भाषेशीं फार साम्य आहे. पुढील ओव्या तर या दोन्ही बोधांचा संबंध स्पष्ट दाखविणाऱ्या आहेत. कवित्वाचा विचार करितांना त्र्यंबकराय लिहितात—

**येरवीं पाठु आणि प्रसादु । एणें शोभे प्रबंधु ।**
**धिटाया बोलतां शुद्धु । ग्रंथु नव्हे ॥ (बाल०, पृ० ८३).**

पाठकवि, प्रासादिक कवि व धीटकवि ही कल्पना वरील ओवीवरून समर्थांस सुचली असावी—

**धीट पाठ प्रासादिक । ऐसे बोलती अनेक ।**
**तरी हा त्रिविध विवेक । बोलिजेल ॥ (दास०, द० १४, स० ३)**

धीट, पाठ, धीटपाठ व प्रासादिक असे कवित्वाचे चार प्रकार समर्थांनीं सांगितले आहेत. त्यांपैकीं धीटपाठ हा प्रकार नाथांच्या भावार्थरामायणांत ( बाल०, अ० १४।८१ ) आढळतो.

'शब्दरत्नाचे परीक्षक', 'पश्चिम मार्ग' म्ह० अंतरिक्षमार्ग, प्रपंच-उभारणी, कांतिटे, 'शिष्य नसावा भिडसारु', शब्दब्रह्मगोळ, इ० शब्दयोजना दोन्ही ग्रंथांत आहे. आपल्यापूर्वींच्या मराठी ग्रंथांचें समर्थांनीं सखोल अध्ययन केले होतें हें वरील विवेचनावरून वाचकांच्या ध्यानांत येईल.



# ४ उपासना–राम, मारुति व भवानी

**१ रामाची उपासना**—१ उपासनाप्रेम; २ एकनिष्ठता; ३ धन्य सूर्यवंश; ४ रामाचें ध्यान; ५ रामाचें वैराग्य व कौसल्येचें वात्सल्य; ६ रामराज्याचें सुख; ७ माझ्या रामाचीं बिरुदें; ८ निष्कामभक्ताचें ऐश्वर्य; ९ रामकृष्णचरित्रशतकें; १० रामकृष्ण एकरूप; ११ जुना दासबोध व रामभक्ति; १२ मनोबोध व रामभक्ति; १३ अभंग, पदें, वगैरे.

**२ मारुतिउपासना**—१ बलसंवर्धक उपासना; २ वीर मारुती; ३ भीमरूपी स्तोत्रांचें स्वरूप; ४ अभंग व पदें.

**३ तुळजापूरची भवानी**—१ तुळजापूरची तुकाई; २ रामवरदायिनी शक्ति; ३ खबरदार राजा.

## १ रामाची उपासना

### १ उपासनाप्रेम

रखरखीत उन्हांतून शीतल छायेच्या आश्रयाला जाणे मोठे सुखाचें असतें ! 'महावाक्य तत्त्वादिकें पंचिकर्णें' या बुद्धीला ताण देणाऱ्या विषयांच्या उबाऱ्यांतून किंवा रणकर्कश खणाखणीच्या मैदानांतून सुटून सुखशीतल मंदमंद पवनाने आंदोलित होणाऱ्या रम्य सरोवरांत स्नानादि विहार करणें सुखदायक होतें. समर्थ पुरुषाच्याही हृदयांतला कोमल भाग म्हणजे त्याच्या उपासनेच्या प्रेमाचें नंदनवन होय. 'समर्थ' हें नांव रामदासांनीं रामाला दिलेले. त्याच नांवानें लोक त्यांना संबोधूं लागले, तथापि त्यांनीं आपल्याला 'दास' म्हणविले व आपल्या ज्ञानाच्या गठ्याला 'दासबोध' हें नांव दिले. रामाचा 'दास' तोच जगाचा 'स्वामी' झाला. दास्याची गोडी दासालाच ठाऊक. उत्तम सेवक मालकाचा नियंता झाला तरी तो आपली दास्याचीं भूमिका सोडायला तयार नसतो ! मालकाच्या बरोबरीचें ऐश्वर्य मिळाले तरी मुनीम मालकाच्या खालच्या स्थानावर

बसतो. यांत मर्यादा आहे, माधुर्य आहे, प्रेम आहे, समर्थांनीं म्हटल्या-प्रमाणें कृतज्ञताबुद्धि आहे. ज्ञान हें सर्वश्रेष्ठ आहे असें समर्थांनीं अनेक ठिकाणीं म्हटलें असले तरी 'भक्तीचेनि योगें देव। निश्चयें पावती मानव' असाच समर्थांचा खरा अभिप्राय आहे. समर्थांची विशालबुद्धि परब्रह्माला आकळती झाली तरी त्यांचे हृदयांतील रामभक्तीचे सिंहासन अढळच राहिले. ज्ञानेश्वरनाथांप्रमाणे समर्थही ज्ञानोत्तरभक्तीचेच सुख भोगणारे व जगाला देणारे आहेत. दासबोधांतच एक मौजेचा प्रसंग आहे. शिष्याने ब्रह्मज्ञान ऐकल्यावर प्रश्न केला, 'निर्गुणाने मोक्ष होतो। प्रत्यक्ष प्रत्यया येतो। सगुण काय देऊं पाहतो। सांगा स्वामी.' हा निर्भीड प्रश्न ऐकल्यावर समर्थांनीं जें उत्तर केले आहे त्यांत त्यांचे सारे हृदय आहे. गुरु सांगतात म्हणून व 'गुरूचें वचन प्रतिपाळण। हे मुख्य परमार्थाचें लक्षण' आहे म्हणून तुला सगुणभजन केलें पाहिजे. या उत्तराने शिष्याचे समाधान झाले नाहीं. 'गुरूने तरी असें कां सांगावें?' असें त्याने पुन्हा विचारले! गुरूने उत्तर केले कीं ब्रह्मज्ञान ऐकल्यावर तुझे देहधर्म किंवा लोकव्यवहार सुटले नाहींत तर मग सगुणभजन सोडण्यांतच काय पुरुषार्थ आहे? ह्याही उत्तराने शिष्य गप्प बसेना तेव्हां समर्थांनीं आपला स्वतःचा अनुभव सांगितला—

**आमुचे कुळीं रघुनाथ। रघुनाथें आमुचा परमार्थ।**
**जो समर्थाचाही समर्थ। देवां सोडविता॥ २१॥**
**त्याचे आम्ही सेवकजन। सेवेकरितां जालें ज्ञान।**
**तेथें अभाव धरितां पतन। पाविजेल कीं॥ २२॥**
**करी दुर्जनांचा संहार। भक्तजनांसी आधार।**
**ऐसा हा तों चमत्कार। रोकडा § चाले॥ २९॥**

§ प्रत्यक्ष, आपल्यासमोर. शिवबांच्या यशस्वी कार्याकडे याचा संबंध उघडच येतो. रामाच्या कृपेनेंच धर्मरक्षणाचें कार्य महाराष्ट्रांत होत असून लोकांना रामराज्याचें सुख निश्चयानें मिळणार असा समर्थांचा विश्वास होता.

मनीं धरावें तें होतें । विघ्न अवघेंचि नासोन जातें ।
कृपा केलियां रघुनाथें । प्रचीत येते ॥ ३० ॥
रघुनाथभजनें ज्ञान जालें । रघुनाथभजनें महत्त्व वाढलें ।
म्हणोनियां तुवां केलें । पाहिजे आधीं ॥ ३१ ॥
हें तों आहे सप्रचीत । आणि तुज वाटेना प्रचीत ।
साक्षात्कारें नेमस्त । प्रत्ययो करावा ॥ ३२ ॥
रघुनाथ स्मरोन कार्य करावें । तें तत्काळचि सिद्धी पावे ।
कर्ता राम हें असावें । अभ्यंतरीं ॥ ३३ ॥
मी कर्ता ऐसें म्हणसी । तेणें तूं कष्टी होसी ।
राम कर्ता म्हणतां पावसी । यश कीर्तिप्रताप ॥ ३६ ॥
कर्ता राम–मी नव्हे आपण । ऐसें सगुणनिवेदन ।
निर्गुणीं तें अनन्य । निर्गुणचि होइजे ॥ ३४ ॥
ज्ञानबळ उपासना । आम्ही भक्त जरी मानूं ना ।
तरी या दोषाच्या पतना । पावों अभक्तपणें ॥ ४० ॥
देहास लागली उपासना । आपण विवेकें उरेना ।
ऐसी हे स्थिति सज्जना– । अंतरींची ॥ ४२ ॥ (द० ६, स० ७)

हा उतारा मोठा आहे पण समर्थांच्या हृदयांतल्या भक्तिभावाची पुरी ओळख करून देणारा आहे. समर्थांचें हाड भक्ताचें होतें. दासबोधांत अन्यत्रही उपासनेचें महत्त्व त्यांनीं सांगितले आहे. 'नाहीं उपासनेचा आधार । तो परमार्थ निराधार,' 'उपासनेचा मोठा आश्रयो । उपासनेवीण निराश्रयो,' असें स्पष्ट म्हटले आहे. ज्याला उपासनेची पाठी नाहीं त्याला वाटेल त्यानें (कामक्रोधादिकांनीं) कुटावें असें होतें, 'यालागीं उठाउठी । भजन करावें. ' ते म्हणतात –

उपासनाकर्म हें आधीं पाळावें । मग सांभाळावें ब्रह्मज्ञान ॥

दासबोधाच्या चौथ्या दशकांत समर्थांनीं भागवताधारें नवविधाभक्ति विशद करून सांगितली आहे ती उपासनेसाठींच होय. स्फुट कवितेंतही

अनेकवार नवविधाभक्तीवर जोर दिला आहे. त्यांचीं अभंग पदें उपास्य-प्रेमानेंच भरलीं आहेत. वर्णाश्रमधर्मकर्में प्रत्येकानें आचरलीं पाहिजेत. स्वधर्म-उपासना-ज्ञान-ज्ञानोत्तर भक्ति असा हा सर्व संतांप्रमाणे समर्थांचाही दंडक आहे.

**कर्मे चित्तशुद्धि होऊनीयां गेली । मग उपासिली उपासना ॥**
**उपासनामिसें देव ठायीं पडे । संदेहचि उडे येकसरां ॥**

*　　　*　　　*

**आधी तें करावें कर्म । कर्ममार्गें उपासना ॥**
**उपासकां सांपडे ज्ञान । ज्ञानें मोक्षचि पावणें ॥**

रामउपासना ब्रह्मांडव्यापिनी कशी आहे हें दासबोधाच्या विवरणांत स्पष्ट होईल.

## २ एकनिष्ठता

'म्हणा रे म्हणा राम लीलावतारी' ह्या दशकांत समर्थांनीं आपली रामाविषयींची एकनिष्ठता व ती करीत असतांना इतर देवतांविषयींची अप्रीति व्यक्त केली आहे. मच्छ, कूर्म, वराह, 'खुजटू' वामन, 'सीघ्रकोपी' नृसिंह, 'मातृहन्ता व खड्गधारी' परशुराम, 'कूळहन्ता व गोवळू' कृष्ण, 'दिगंबर व नग्न' दत्त, 'येकदंत' गणेश, 'त्रिपुरारी' शंकर—हे 'नव्हे रे नव्हे'—यांच्या भजनीं न लागतां—'म्हणा रे म्हणा राम लीलावतारी' असा जनांस बोध केला आहे! यानंतर राम कसा अद्वैत आहे याचें वर्णन केले आहे. तो शिव ना शक्ति, व्यक्त ना अव्यक्त, द्वैत ना अद्वैत, निर्गुण ना सगुण, लक्ष ना अलक्ष, बद्ध ना मुक्त, निर्विकारी ना वेषधारी इ० प्रकारीं सर्वच भक्त आपापल्या उपास्याचें अध्यात्मस्वरूप जसें वर्णितात तसेंच त्यांनीं वर्णिलें आहे. रामाशिवाय इतर देवतांचा वर जो अधिक्षेप केला आहे त्यांतून रामदासांची एकनिष्ठता तेवढीच घ्यावयाची आहे. नरहरि सोनार पंढरपुरास राहून विठ्ठलाचें तोंड पाहत नसत, पण पुढें शिव व

विठ्ठल निराकारपणे दोन्ही एकच आहेत हें कळल्यावर त्यांचा भेदभाव गेला व ते विठ्ठलभक्तांत मान्यता पावले. तुकोबांनीं 'गणोबा विक्राळ। लाडू मोदकांचा काळ' असें म्हटले आहे हे 'तुका म्हणे चित्तीं धरा। रखुमाईचा पति' ह्या एकान्तिक भक्तीपुरतेंच मानायचें आहे. 'विठ्ठल गणपति दुजा नाहीं' हें काय त्यांस माहीत नव्हते? रामदासांचा एकनिष्ठ भाव दाशरथी रामाचे पायीं होता एवढेंच याचे सार आहे. समर्थ इतर देवतांना तुच्छ मानीत होते असा यांत भाव नाहीं, तो त्यांचा स्थायीभाव नव्हता. त्यांनीं कृष्णचरित्र संकलितपणे गायिले आहे व 'रामकृष्णचरित्रां'ची एकरूपताही वर्णिली आहे. त्यांनीं सर्व देवतांवर अभंग, पदें, आरत्या, स्तोत्रें वगैरे केलीं आहेत तरी तुकोबांचा विठ्ठल तसा त्यांचा राम एकमेव उपास्य आहे. 'राम कृपाकर विठ्ठल साकार। दोघे निराकार एकरूपें' असें त्यांनीं म्हटलें आहे.

ज्ञानेश्वरनाथतुकोबादि संतांची जशी कृष्णाच्या (विठ्ठलाच्या) ठिकाणीं अनन्यनिष्ठा होती तशी समर्थांची रामाच्या ठिकाणीं होती. राम आणि कृष्ण यांत भेद नाहींच, व तो कोणीही केला नाहीं. मग उपासनेंत भेद कां? याला उत्तरें दोन आहेत. एक तर ज्याला कुलपरंपरेने जी उपासना मिळाली तीच त्याने पुढें चालविली. दुसरें उत्तर असे कीं 'आवड गोड!' ज्याला जें आवडलें तेंच त्याचे उत्तम. आवडतें तें सुंदर, तेंच सर्वगुण-संपन्न! लावण्यगुणराशि रामही होते व कृष्णही होते. दुष्टांचा संहार व भक्तांचें संरक्षण हें कार्य दोघांनींही केले. देवांचे बंध दोघांनींही तोडले, दोघांनींही भू सनाथ केली. दोघांची कीर्ति शाश्वत आहे. दोघांच्याही उपासनेने असंख्य जन उद्धरले आहेत व उद्धरतील. सूरदासांना कृष्णभक्ति कां व तुलसीदासांना रामभक्ति कां? 'आवड गोड' हेंच उत्तर. तिसरें उत्तर असें कीं, पूर्वजन्मीं ज्यानें जी उपासना केलेली असते तीच त्याच्यापुढें दत्त म्हणून उभी राहते व तींतच त्याचें चित्त रमतें. समर्थांनीं कृष्णगुणही

गायिले आहेत, 'अनेकीं सदा एक देवासि पाहे' असें त्यांनीं म्हटलें आहे. तथापि त्यांचे अंतर रामप्रेमानें नितान्त भरले होतें. त्यांच्या ध्यानांत रामरूप व मुखांत रामनाम असे.

**मारुतीस्कंधभागीं । शीघ्र बैसोनि यावें ॥ राघवें वैद्यराजें । कृपा औषध द्यावें ॥ दयेचे पद्महस्त । माझे शिरिं ठेवावे ॥ धांव रे० ॥**

अशीं त्यांचीं बाळपणचीं सुखस्वप्नें होतीं. रामकृपेनें त्यांचे मनोरथ पुरले.

उपासकाला आपल्या उपास्याविषयीं निरतिशय प्रेम असणे स्वाभाविक आहे व उचित आणि अवश्यही आहे. समर्थांनीं युद्धकांडाच्या आरंभींच म्हटले आहे कीं, शंकर, स्कंद, चंडिका, मोरया, वेंकट, विठ्ठल, नृसिंह, वामन, इंद्र इत्यादि देवांच्या कथा आहेत पण 'समस्तांमधें श्रेष्ठ या राघवाची.' कौरवपांडव–माधवांच्या कथा ( भागवत–हरिवंशादि ग्रंथांत ) वर्णिल्या आहेत, तथापि रामकथा सर्वश्रेष्ठ आहे. कारण काय तर रामाने 'बळें तोडिला बंद त्या त्रीदशांचा'—रामाने देवांना रावणाच्या बंधापासून सोडविले व त्यांचा पांग ( पराधीनता ) फेडिला! समर्थ म्हणतात कीं, 'दुजी उपमा ये कथेला न साहे.' ऋषींमध्यें श्रेष्ठ असे वाल्मीकि यांनीं वनांत राहून रामावतार होण्यापूर्वी ही रामकथा गायिली आहे. यांत 'धर्ममूर्ति' मारुतीचे चरित्रही वानिलें आहे. ही 'कथा ऐकतां नासलें कार्य होतें। महाविघ्न तें भग्न होवोनि जातें' व सुखानंद प्राप्त होतो अशी 'रामदासाला अखंड प्रचीत' आहे. आणखी पहा, 'प्रतापें दिनेशु तपाचा हुताशु । विरांमाजी ईशु सुरांचा सुरेशु' अशा रामाचें शंकरही ध्यान करितात—'महादेव तो वर्णितो राघवाला.'

**महावैभवाची कथा राघवाची । जनीं सौख्यदातीच ब्रह्मादिकांची ॥**

ही 'रामउपासक रामदास' प्रेमाने गात आहे. रामचरित्रें उत्तम आहेत; तीं जे सर्वदा गातात ते दुःखमुक्त होऊन धन्य होतात.

समर्थांचें लक्ष वर्तमानकाळाकडेही होतें. रावणी राज्य बुडून लोकांना रामराज्याचें सुख व्हावें, लोक वर्णाश्रमनिरत व्हावेत अशी समर्थांना मनांतून इच्छा होती. त्या वेळचे यवन त्यांना रावणाच्या राक्षसांसारखे वाटत. 'पूर्वीं जे मारिले होते तेचि आतां बळावले' असून रामराय त्यांवर संतप्त झाले आहेत व 'कल्पांत मांडला मोठा। म्लेच्छ दैत्य बुडावया ॥ कैपक्ष (कैवार) घेतला देवीं (रामाने)। आनंदवनभूवनीं' असें त्यांनीं म्हटलें आहे. धर्मसंस्थापनेसाठीं रामरायच शिवाजीच्या रूपानें प्रगटले आहेत असा समर्थांचा दृढ विश्वास होता.

समर्थांनीं रामाच्या कथा परोपरीने गायिल्या आहेत. त्यांचे दुकांडी रामायण प्रसिद्धच आहे. त्यांचीं रामलीलापर व रामकृष्णलीलापर अशीं चारदोन स्फुट प्रकरणे आहेत. 'राम माझा स्वामी राव अयोध्येचा' हा एक ६५ चरणी व 'नमूं एकदंता माता ब्रह्मसुता' हा एक १०५ चरणी असे दोन मोठाले अभंग आहेत त्यांत रामकथा संक्षेपाने सांगितली आहे. त्यांच्या अध्यात्मप्रकरणांत निर्गुणनिराकार रामाचे (परब्रह्माचे) स्वरूप वर्णिले आहे. सगुण राम व निर्गुण राम दोन्ही एकरूपच आहेत तथापि उपासना सगुण रामाचीच आहे. एकबाणी, एकपत्नी व एकवचनी राम त्यांच्या निरतिशय प्रेमाचा विषय होता. 'जैसें तें गंगाजळ। तैसे गुण निर्मळ। ऐकतां विव्हळ मन माझें रे.'

**बहुविध भजनाचीं दैवतें पाहिलीं हो**
**सकळ त्यजुनि रामीं वृत्ति हे राहिली हो।**
**विमळगुणशिळाची लागली प्रीति मोठी**
**विमळहृदय होतां उद्धरे कूळ कोटी ॥**

रामाचे गुण आणि शील हीं विमल आहेत. त्यामुळें माझें मन रामरूपीं रंगले आहे. रामाचे गुण आदरे गावे, त्याचें नाम वाचे वदावें, त्याचें रूपलावण्य पहावें, त्याची कीर्ति जीवीं भरावी, त्याची मूर्ति ध्यानीं वसावी

त्याचा अंतरीं वेध लागावा अशी अतीव उत्कंठा त्यांना लागलेली असे. 'मधुकर मन माझें रामपादांबुजीं हो.' रामाची उपासना जनांत वाढावी व रामभजनानें जन उद्धरावे अशी लोकोपकारबुद्धीही त्यांच्या मनांत उदित झाली.

एका स्तोत्रांत 'धरीं रे मना पंथ या राघवाचा' असें सांगतां सांगतां पुढील दोन बहारीचे श्लोक आले आहेत---

**चकोरासि चंद्रोदयीं सूख जैसें। रघूनायका देखतां सूख तैसें॥**
**सगूणासि लांचावलें स्थीर राहे। रघूनंदनेवीण कांहीं न पाहे॥**
**चमत्कारलें चित्त हें रामगूणीं। उठे कीर्ति वाखाणितां प्रीति दूणी॥**
**रघूनायकासारिखा देव नाहीं। क्रिया पाहतां चोखडी सर्व कांहीं॥**

बिभीषणाचें राज्य व मारुतीचा देह हे दोन्ही रामकृपाबळावर चिरंजीव झाले आहेत, देवांचा देव जो महादेव तो अखंड रामनाम चिंतीत आहे, असा माझा राम समर्थ आहे. सर्व देवांत राम श्रेष्ठ तसें सर्व नामांत रामनाम श्रेष्ठ! 'बहूनाम या रामनामीं तुळेना' व रामनाम हें "अतीसाजिरें स्वल्प सोपें फुकाचें' आहे असें मनोबोधांत म्हटलें आहे.

समर्थ रामोपासक म्हणून जगद्विख्यात आहेत. त्यांना रामाची एकविध भक्ति होती. रामाचें चरित्र व गुण त्यांना अत्यंत प्रिय होते. रामभक्तांत श्रेष्ठ अशा मारुतीचें त्यांना अत्यंत प्रेम होतें. रामकथा गाणारे वाल्मीकि व रामाचे कुलगुरु व रामाला योगवासिष्ठ सांगणारे वसिष्ठ यांविषयीं त्यांना अत्यादर होता. त्यांची कुलस्वामिनी तुळजाभवानी ही 'रामवरदायिनी' म्हणून त्यांना अधिक प्रिय होती. रामनाम अखंड जपणारांत अग्रेसर शंकर त्यांना रामाइतकेच प्रिय होते. याप्रमाणें रामविषयक सर्वच कांहीं त्यांना प्रिय होतें. प्रस्तुत प्रकरणांत समर्थांच्या रामभक्तीचा आपण प्रथम आस्वाद घेऊं आणि नंतर मारुतिराय व तुळजाभवानी यांच्याविषयीचें त्यांचें मनोगत पाहूं.

राम प्रिय म्हणजे रामाचें सर्व कांहीं प्रिय. 'धन्य सूर्यवंश पुण्यपरायण'

**३ 'धन्य सूर्यवंश'**

ह्या अभंगांत रामाचा समुदायही कसा गुणवंत आहे, निष्काम आहे हें सांगितलें आहे. राज्याचाही त्याग करणारा निष्काम भक्त भरत, अन्नत्याग करून चौदा वर्षे उपोषण करणारा ब्रह्मचारी लक्ष्मण, श्रीरामीं जन्मसार्थक करणारा सेवक मारुति, भविष्योत्तर सांगणारा वाल्मीकि, सर्वभावें शरण येणारा बिभीषण, फार काय पण—

**सर्व भावें रामीं सर्वही वानर। शरण अवतार विबुधांचे** ८
**विबुधमंडळीं राम सर्वगुण। अनन्यशरण रामदास** ९

अशी ज्या रामाची साहाय्यक मंडळी तो राम कसा ?

**शोभतसे राम प्रतापी आगळा। दिसे सौम्यलीळा सत्त्वगुणी** २
**सत्त्वगुणी होय सात्त्विकांकारणें। कोपें संहारणें दुर्जनांसी** ३
**दुर्जना संहार सज्जना आधार। भाविकांसी पार पाववितो** ४
**दीनानाथ नाम पतितपावन। योगियां जीवन योगलीला** ६
**नोहे सोडवण रामनामाविण। रामदास खूण सांगतसे** १२

'रामाचें चरित्र सांगतां अपार' आहे—तें वाल्मीकीने गायिले आहे. थोडेंसे आमच्या वांट्याला आले. समर्थ म्हणतात—

**कांहीं एक पुण्य होतें पूर्वजांचें। पापियासि कैंचें रामनाम ॥ ३ ॥**
**गर्जती पुराणें आणि संतजन। करावें भजन राघवाचें ॥ ८ ॥**

रामभजन कसें करावें? 'नामघोष वाचे श्रवणकीर्तन। चरणीं गमन देवालयीं.' सर्व इंद्रियें व मन अशींच रामभजनीं लावावीं. रामपायीं शिळा उद्धरली. असेच जड पाषाणतुल्य मानवही उद्धरतात. 'सार्थकाचें जिणें कथानिरूपणें। श्रवणमननें काळ गेला.'

ओवीरूप अभंगांत अनेक स्थलीं समर्थांचा रामप्रेमा प्रगट झाला आहे.

**४ रामाचें ध्यान**

राम सीतामाईला घेऊन अयोध्येस जाण्यास निघाले तेव्हांचें वर्णन एका ६७ चरणी अभंगांत काव्यमय गोड भाषेंत आलें आहे—

**सर्व येकसरें निघाले गजरें । अंबर धूसरें पूर्ण जालें ॥ ५५ ॥**
**मेघडंब्रें माही निशाणें थरकती । रोमांच फरकती देखतांचि ॥ ५७ ॥**
**तुरंग उसाळें जाती अंतराळें । उफळती बळें दोचि पाईं ॥ ६२ ॥**

दुसऱ्या एका प्रकरणांत रामरूप वर्णिले आहे; ' माझे मनीं ध्यान आठवलें '– सांवळें सुंदर रूप, कासे पीतांबर, अंगीं चंदनाची उटी, कंठीं मुक्तमाळा, कपाळीं कस्तुरीटिळा, मुकुटकुंडलें तळपणारीं, करीं चापबाण, पायीं तोडर, सन्मुख मारुती, बंधु उभे–असे हें 'रामध्यान माझ्या चित्तीं अखंड ठसावलें ' आहे. मी जाईन तेथें राम माझ्याबरोबर असतात. ' राम आहे जनीं राम आहे वनीं । राम निरंजनीं सारिखाचि. ' ह्या रामरूपीं मला पूर्ण समाधान जाले आहे. रामाने मला पावन केले. रामचिंतनसुखामुळें ' सर्वकाळ देहीं असतां विदेही । रामदासीं नाहीं जन्ममृत्यु. '

' रत्नजडित सिंहासन । वरी शोभे रघुनंदन ' ह्या लोकप्रिय अभंगांत रामपंचायतनाचें ध्यान वर्णिलें आहे.

रामाचा अवतार कशासाठीं झाला ?

**५ रामाचें वैराग्य व कौसल्येचें वात्सल्य**

**मदें मातला रावणू क्रूरबुद्धी ।**
**तेणें घातले सर्वही देव बंदीं ॥**
**स्वधर्मू बुडाला भुमीभार जाला ।**
**अनाथां दिनां धांवण्या राम आला ॥**

राम अयोध्याधीशाचा पुत्र. त्याला काय कमी होतें ? ' हिरे माणिकें फांकती दिव्य कीळा । सुढाळा गळां रूळती मुक्तमाळा. ' मुकुटकुण्डले– ' कपोळीं प्रभा कुंडलांची झळाळी. ' करपल्लवांत रत्नांची मुद्रिका, बाहुदंडीं केयुरें, कटी पीतांबर–असो. तें ऐश्वर्य काय वानावें ? पण त्या रामाने देवकार्यासाठीं वनवास पत्करला तेव्हां सारे उलटें झाले ! मस्तकावर ' पिंगट जटा, अंगाला विभूती, सीता नोवरी नुक्तीच घरीं आलेली, वयें नूतनू– तारुण्याचा भर–पण तापसी वीतरागी झालेला राम–तीव्र वैराग्यमूर्ति वनांत जाण्यास निघाला ! ' समागमें जानकि दिव्यकांता ! ' खडे रूतले

खूतले—वनवासच तो! पंचभूतांच्या स्वाधीन या राजकुलोत्पन्न बालकांना करितांना माता कौसल्या म्हणाली, 'हे पृथ्वी! यांच्या कोमल पावलांना रुतूं नकोस बरे—'जामात तूझा प्रतिपाळिं यातें। फळीं तऱ्ही सीघ्र हरीं क्षुधेतें.' हे आदिनारायणा! हा रघुराज योगी होऊन तपास चालला आहे. याला सांभाळ व 'नद्यातटाकें करिं पूर्ण पंथें। तृषा झणीं पीडिल हो तयातें.' हे सूर्यराजा! हा तुझा कुळदीप आहे. 'स्पर्शों नको तीव्र किर्णें तयातें.' हे वायो! तुझ्या पुत्राचा हा स्वामी आहे हें ध्यानांत धर. त्याचा सुकुमार देह धुळीनें धूसर करूं नकोस आणि 'वाजों नको कर्कश रे समीरा.' रामासारखाच हा सुंदर सुकुमार लक्ष्मण—वनस्पतींनो! छाया-सुगंधानें त्याच्या श्रमाचा परिहार करा. आणि कोकिळांनो!

**सपक्षिकूळासह कोकिला हो। सीते सुशब्दीं तुम्हि रंजवा हो॥**
**हे धाकुटी योगिनी कुंजवासी। तुम्हीच तेथें सखिया तियेसी॥**

येथें तर कोमल भावनेची पराकाष्ठा झाली आहे.

'मानपंचकांत' रामराज्याचे सुरस वर्णन आहे—

**६ रामराज्याचें सुख** **राम विश्राम देवांचा राम भक्तांसि आश्रयो।**
**राम योगीमुनि–ध्यानीं राम रक्षी ऋषीकुळा॥१॥**

रामकथा गातां ऐकतां निरंतर चित्त रामरूप असतें असा समर्थ आपला अनुभव सांगतात. पार्वतीला शंकर सांगतात कीं, विषानें माझा गळा भाजून निघाला तेव्हां 'राम' या दोन सुंदर अक्षरांचा मीं जप केला तेव्हां उतार पडला—'रामनामेंचि सुटका' झाली व 'निवालों अंतरीं सुखें.'

**कीर्ति या रघुनाथाची पाहतां तुळणा नसे।**
**येकबाणी येकवचनी येकपत्नीच धार्मिकु॥**

या 'रघुनाथाचें राज्य प्रजेला अत्यंत सुखदायक झालें. बहुवृष्टि, अनावृष्टि, चिंताउद्वेग, कांहीं नाहीं.'

**व्याधी नाहीं रोग नाहीं लोक आरोग्य नांदती ।**
**आदरू सकळै लोकां सख्यप्रीति परस्परें ॥**
**बोलणें सत्य न्यायाचें अन्याय सहसा नसे ।**
**दरिद्री धुंडितां नाहीं सर्वत्र लोकसंग्रहो ॥**
**अद्भूत पिकती भूमी वृक्ष देती सदा फळें ।**
**अखंड दुभती धेनू आरोग्यें वाहती जळें ॥**
**नाना विद्या आणि बुद्धी नाना युक्ति नाना कळा ।**
**नाना संगीतसामर्थ्यें नानावाद्यें परोपरी ॥**
**चढता वाढता प्रेमा सुखानंद उचंबळे ।**
**संतोष समस्तां लोकां रामराज्य भुमंडळीं ॥**

प्रजेला परमसुखाचें ‘रामराज्य भूमंडळीं’ एकदाच झालें काय ? रात्रणी राज्यें कैक झालीं, गेलीं व जातील ! लोकांपुढें संतकर्त्रींनीं रामराज्याचें गौरवपूर्ण वर्णन केलें तें कोणत्या हेतूनें केलें बरें ? समर्थ सांगतात कीं, या रघुनाथाची कास धरून मी सर्वसुख पावलों, त्यानें माझीं सारीं सांकडीं वारिलीं. मुखीं नाम व चित्तीं रूप अशी रामाची भक्ति करीत सर्व भरतखंड-भर मी हिंडलों, पण रामचिंतनसुखामुळें जावें तेथें ‘आपुलीं वाटती सर्वें धन्य तूं गा रघूत्तमा’ हा अनुभव आला !

### ७ माझ्या रामाचीं बिरुदें

रामाचीं बिरुदें भक्तांसाठीं घेतलेलीं किती गोड व सुखसमाधान देणारीं आहेत ! भक्तांचा हा अनुभव आहे, प्रेमळांनीं विश्वास ठेवून तो घ्यावा ! ‘तुज कैसें पाहूं देवा ? तुझी कैसी करूं सेवा ?’ असा प्रेमळांस विचार पडला असतां राम समर्थमुखानें सांगतात व समर्थ आपल्या अनुभवाची ग्वाही देतात —

**( १ ) ‘माझीं बिरुदें कां विसरतां ? । आणि व्यर्थ कां चेष्टतां ?’ ॥ १ ॥**
**भक्तवत्सल दीनानाथ । तुम्हां आधार समर्थ ॥ २ ॥**

भय दाखवी निवारी । तोचि सर्व चिंता करी ॥ ३ ॥
दासासमीप राहतो । योगक्षेमही वाहतो ॥ ४ ॥

(२) देव म्हणे 'मी जात नाहीं । आतां चिंता न करीं कांहीं ॥ १ ॥
मज पहावें संतापाशीं । सेवीं जाणत्या भक्तासी ॥ २ ॥
मज जाणावें विचारें । सगुणाचे भजनद्वारें' ॥ ३ ॥
देव म्हणतो रे दासासी । 'मी तों आहें तुजपासीं ! ॥ ४ ॥

(३) मज गांजिलें तें साहें । परि भक्तांचें न साहे ॥ १ ॥
माझ्या भक्तां शीण व्हावा । मग मजसी त्यासी दावा ॥ २ ॥
मज अवतार घेणें । माझ्या भक्तांचे कारणें ॥ ३ ॥
निजदासांसी पाळावें । दुर्जनांसी निर्दाळावें ॥ ४ ॥

(४) तुम्हां संकटाचे वेळे । काय झांकितों मी डोळे ? ॥ १ ॥
सेवकाचा साभिमान । समर्थाचें हें लक्षण !' ॥ २ ॥
देव म्हणे 'दासजनीं । चिंता न धरावी मनीं ॥ ३ ॥

(५) रे मी भक्तांचा कोंवसा । मनीं धरावा भरंवसा ॥ १ ॥
कोप येतांचि ते घडी । घेइन काळाची नरडी ॥ २ ॥
दासां सांभाळावें सदा । मज आणिक नाहीं धंदा' ॥ ३ ॥
रामभेटीचा समये । रामदासीं सांगतां न ये ! ॥ ४ ॥

देव भक्ताचा अत्यंत लोभाळु आहे. गाईचे वत्सावर नसेल इतकें त्याचें

## ८ निष्काम भक्ताचें ऐश्वर्य

भक्तावर प्रेम असतें. भक्ताकडून अन्याय सहसा घडत नाहीं पण क्वचित् घडलाच तर तो तत्काळ क्षमा करितो– 'भक्ताचा साभिमानी तो । बुद्धिदाता परोपरी.' व्यवहारांत 'धणी ते लालची मोठे । सेवकू चोरटे जनीं' असे असतात म्हणून भांडवलवाले व मजूर यांचे तंटे होतात ! इकडे देव दयाळु व उदार असून घे घे म्हणून सेवकाच्या मागें लागतो व स्वामीचें ऐश्वर्य पाहून संतोष मानणारा हा भक्त मला कांहीं नको म्हणून सांगतो– तरी देव त्याचें ऐश्वर्य वाढवीत असतो ! हा स्वामीसेवकसंबंध किती गोड

आहे खरें ! समर्थ सांगतात कीं, आपला क्षुद्र स्वार्थ सोडून जो देवाचा अनन्य भक्त होतो त्याचें ऐश्वर्य तर तो वाढवितोच पण 'त्यास वोढेल हे सृष्टी' म्हणजे सारे लोक त्याला अनुकूळ होतात. हें (समर्थ सांगतात) आमचें अनुभवाचें बोलणें आहे—

**भक्त होईल देवाचा। सर्व संसार सांडुनी।**
**त्यास वोढेल हे सृष्टी। यदर्थीं संशयो नसे॥**
**प्रत्यय वाक्य नेमाचें। कित्येक जाणती जनीं।**
**देव तो आपुला जाला। वैभवा कोण पूसतें !॥**
**टाकितां लावितो मागें। देव दाताचि जाहला॥**
**घ्यावें तें कोणतें किती। त्रैलोक्य भरलें असे॥**
**दाता अनंत भुजांचा। भडसा पुरवीतसे।**
**'पुरे पुरे पुरे आतां'। देव देतां विटेचिना !॥**
**भक्त तो घेइना कांहीं। देवें त्रैलोक्य दीधलें।**
**सर्वही सांडिलें दोघीं। येकमेकांसि लाविती॥**
**दया हे थोर देवाची। भक्ताला वज्रपंजरु।**
**अभावें भर्वसा नाहीं। मूढाला निश्चयो नसे !॥**

**९ रामकृष्णचरित्रशतकें**

रामकृष्णचरित्रविषयक तीन प्रकरणें आहेत. त्यांतील एकांत संक्षिप्त रामचरित्र सांगितले असून दुसऱ्यांत संक्षिप्त कृष्णचरित्र गाइलें आहे व तिसऱ्यांत रामकृष्णांची एकरूपता दाखविली आहे. राम व कृष्ण यांच्यांत कोणताच संप्रदाय भेद मानीत नाहीं; समर्थही रामाचे एकनिष्ठ उपासक होते तरी रामकृष्णांची अभेदताच त्यांनीं मानिली आहे. रामचरित्राचे प्रारंभीं साहजिकच वाल्मीकीचें व रामकथेचें त्यांनीं गौरव केलें आहे. 'रामाचेनि नामें वाल्हा तो वाल्मीक' जाला व त्यानें शतकोटिरामायण रचिलें. असें 'भविष्य दुजा कवण करी?' वाल्हा कोळी होता तो ब्रह्मादिकांना रामचरित्रगायनानें

मान्य झाला. रामकथा ही गोदावरीसारखी पवित्र आहे.

**गोदावरी कथाकीर्ति या रामाची। संसारव्यथांची विश्रामता॥**
**विश्रामता जाली रामउपासकां। जैसी ते चातका जळवृष्टि॥**
**जळवृष्टि केली वाल्मीक ऋषीनें। तयाचें वचन सांगईन॥**

रामानें पित्याच्या वचनासाठीं वैभव सोडलें, वनवास पत्करिला, 'रामचंद्रें बाणीं ताटका पिटिली। शिळा उद्धरिली हेळामात्रें' इ० लीला केल्या, रावणास मारून राम सिंहासनाधीश झाला व रामराज्याचें सुख प्रजेस दाखविलें, हा सारा कथाभाग एका शतकांत सांगितला आहे. 'दुष्टांचा संहार धर्माची स्थापना' यासाठीं रामावतार झाला. रामराज्याचें सुख प्रजेस अपरिमित झालें. 'भक्ति करी राम गाईब्राह्मणांची। सीमा मर्यादेची उल्लंघीना.' राम 'जनांसी उपाय हनूमंत' ठेवून आपण वैकुंठास गेले.

**हनूमंतीं राम आहे निश्चयेंसीं। रामीं रामदासीं ऐक्यभाव॥**

कृष्णचरित्र असेंच गोड वाणीनें समर्थांनीं गाइलें आहे.

**यादवांचे कुळीं गोकुळीं गोविंद। आनंदाचा कंद अवतरला॥**
**अवतरला पूर्ण अच्युत अनंत। आयुधें मंडित चतुर्भुज॥**
**निजरूप देवें सांडूनी कौतुक। जाहला बाळक नंदजीचें॥**

माभळभटाची फजीती केली; पूतना, रिठासूर, शकटासूर, कालिया, कग, बक, धेनुक, मल्ल चाणूर, कंस, शिशुपाल, काळयवन, जरासंध इ० थोरथोर असुर कृष्णानें मारले व यादवांसह सुखानें राज्य केलें.

**विश्वलोक नांदे जयाचे उदरीं। गाई राखे हरी गौळियांच्या॥**
**पांडवांचा सखा सर्व साहकारी। संकटीं कैवारी द्रौपदीचा॥**
**उपदेशिला दास श्रीकृष्णें आपुला। अवतार जाला पूर्ण आतां॥**

रामकृष्णांच्या एकरूपतेचे श्लोक ३४ असून एकदां रामाचें व एकदां कृष्णाचें गुणवर्णन करून शेवटीं 'म्हणे दास द्वैतास हो नातळावें। जळाचे

परी सर्वभूतीं मिळावें' असें म्हटलें आहे. 'करीं बाण कोदंड हें ठाण देखा' हें रामाचे ध्यान, तर 'चतुर्भूज पीतांबरू चक्रपाणी' हें कृष्णाचें ध्यान! 'गुणे आगळा' श्रीकृष्ण तर 'प्रतापें बळें आगळा राम.' जेथें योद्धय कोणी नाहीं ती अयोद्धा रामाची तर 'घरें सुंदरे द्वारका पुण्यभूमी' कृष्णाची. 'चरित्रें विचित्रें करी कृष्णनाथु', 'उभा राम तूणीर बांधूनि पाठी' तर 'त्रिभंगीं उभा रूप लावण्यपेटी' असा कृष्ण. कृष्णरूपाने समर्थांस मोहिलें होतें —

**ढळेना प्रिती लागली माधवाची। उभी साजिरी मूर्ति हे चित्सुखाची॥**
**कृपाळू हरी अंतरीं सर्व जाणे। तया देखतां सर्वही सूख बाणे॥**
**तनू सांवळी वेणु वाहे त्रिभंगीं। क्रिडा कौतुकें गोपिगोपाळसंगीं॥**
**स्वयें जाहला कृष्ण हा विश्वसत्ता। धरीं रे मना गोपिनाथा समर्था॥**

रामानें रावण मारिला तर कृष्णाने कंस मारला व दोघांनीं देवांचे बंध तोडून लोक सुखी केले. दुष्टदमन व सुष्टसंरक्षण हें दोन्ही अवतारांचें एकच कार्य. 'नसे काळ दुष्काळ उद्वेग चिंता' ही रामसत्ता, व 'बहू दैत्य संहारिले' ही कृष्णसत्ता. राम सूर्यवंशाचें भूषण तर कृष्ण चंद्रवंशाचे भूषण. मारुती भीमपराक्रमी पण 'भला मारुती जिंकिला कृष्णनाथें। रणीं रक्षिलीं पांडवें तीं अनाथें.' 'मनीं सर्वदा सर्व कापट्य जागे' असा कृष्णनाथ बलीच्या द्वारीं 'याचकू भीक मागे!' राम नित्यनिर्मळ खरा पण 'येणे राघवें मारिला व्यर्थ वाळी। नव्हे नीति हे सर्व केली धुमाळी!' असें म्हणणारे आहेतच! शिवाय सीतेसाठीं रानावनांत 'करुणास्वरें आळवी जानकीतें' तो राम धीर कसा म्हणावा? रामकृष्णचरित्रांतही असे दोष धुंडणारे लोक आहेतच! ते विचार करीत नाहींत कीं रामाचे ठायीं कामलेश असता तर 'सीतेवीणही राज्य केलें सुरेशें' हें कसें शक्य होतें? रामाने प्रेत उठविले (व कृष्णानें गुरुपुत्र आणिला) हे पराक्रम काय भलत्याच्या हातून होतात?

**समस्तांमधें सार गोपाळकाला । तया देखतां चाखतां जीव धाला ॥**
**स्वयें सवंगड्यां वांटितो कृष्ण पाहा । गडी खेळती तोचि आनंद माहा ॥**

समर्थ एकदां पंढरीस गेले. त्यांनीं एका अभंगांत म्हटल्याप्रमाणें तेथें विठ्ठलासमोर हनूमंत उभे आहेत म्हणून ते हनूमंताच्या दर्शनासाठीं गेले. मारुतिराय रामाशिवाय कोणापुढें हात जोडून उभे राहणारे नव्हत व ते ज्याअर्थीं विठ्ठला-सन्मुख उभे आहेत त्याअर्थीं समर्थांना विठ्ठलदर्शनार्थ गाभाऱ्यांत जावें लागलें ! तेथें विठ्ठलाने त्यांना रामरूपानें दर्शन दिले !

**१० रामकृष्ण एकरूप**

**येथें उभा कां श्रीरामा । मनमोहन मेघश्यामा ॥ १ ॥**
**काय केली सीताबाई । येथें राही रखुमाई ॥ २ ॥**
**काय केली अयोध्यापुरी । येथें वसवीली पंढरी ॥ ३ ॥**
**काय केलें वानरदळ । येथें मिळवीले गोपाळ ॥ ४ ॥**

'रामीं रामदासीं भाव । तैसा होय पंढरीराव.' राम आणि विठ्ठल ( कृष्ण ) एकच !

**राम कृपाकर विठ्ठल साकार । दोघे निराकार एकरूपें १**
**आमुचिये घरीं वस्ती निरंतर । हृदयीं एकाकार राहियेले २**
**दास म्हणे धरा भक्तिप्रेमभाव । कृपाळु राघव पांडुरंग ३**

विठाई ही वैकुंठींहून भक्त पुंडलीकासाठीं येऊन भीमातीरीं भक्तांसाठीं उभी राहिली आहे तीच 'रामदासाची माउली' आहे. पंढरीस असतांना समर्थांनीं कृष्णावर अनेक पदें व प्रकरणें लिहिलीं तीं मोठीं प्रेमळ आहेत.

**सकळ कळांचा हरी । भेटवा वो झडकरी ।**
**तयावीण देहा उरी । नाहीं साजणी ॥ १ ॥**
**डोलत डोलत चाले । श्रवणीं कुंडल हाले ।**
**भेदिक वचन बोले । चित्तचोरटा ॥ २ ॥**

* * *

**सुरस मधुर वेणु । वाजवितो रुणुझुणु ।**
**विकल होताहे प्राणु । भेटीकारणें ॥ १ ॥**
**अखंड लागलें ध्यान । स्वरूपीं गुंतलें मन ।**
**सकळ पाहतां जन । आठवे हरी ॥ २ ॥**
**सकळ सांडुनी आस । तयालागीं उदास ।**
**फिरे रामीरामदास । वेधु लागला ॥ ३ ॥**

समर्थांचीं असलीं पदें पाहतां, नाथतुकोबांच्या गौळणींची आठवण येते. 'ये रे यादवा ये रे माधवा । हृदयनिवासा देवा!' गोवर्धनोद्धारी कान्हा सांवळा हरि हा वृंदावनीं मंजुळ वेणु वाजवूं लागला तेव्हां सर्वजण तल्लीन झालीं—'पशुपक्षी जाहलीं पिसीं.'

**दासां सुख देतुसे तो हा गोपाळवेषें ।**
**आसनीं शयनीं कृष्ण भासे ॥**

## ११ जुना दासबोध व रामभक्ति

'जुन्या दासबोधांत' समर्थांच्या रामभक्तीसंबंधानें तीन समास पाहण्यासारखे आहेत. ७ व्या समासांत 'सगुणध्यान' व १५ व्या समासांत 'रघुनाथचरित्र' वर्णिलें आहे. 'देव घननीळ सांवळा । मुकुट कुंडलें मेखळा । रुळे वैजयन्ती माळा । आणि पीतांबरु ॥' असा शेषशायी महाविष्णु रामकृष्णादि अवतार घेतो. 'शिव आणि विष्णु । दोघां एकचि तनु । भिन्नत्व नाहीं.' हरिहरात्मक हा देव भक्तांना प्रत्यक्ष प्रगट होतो असें समर्थांनीं ह्या ७ व्या समासांत स्वानुभवाने स्पष्ट सांगितलें आहे. 'एका भावार्थासाठीं । देव लागे भक्तापाठीं । भाव नसतां जगजेठी । प्राप्त नाहीं.' विमलभावाशिवाय देवाची भेट होणार नाहीं. त्यासाठीं 'सगुणमूर्तीचीं चरित्रें । श्रवण करावीं पवित्रे । ध्यानें विविधें विचित्रें । अंतरीं धरावीं' हा अभ्यास निष्ठापूर्वक प्रथमपासून ठेवला पाहिजे. 'निग्रह नेमाचें बळ । असतां प्राप्ति तत्काळ' होते. 'देह पडे कां देव जोडे' असा निग्रह पाहिजे. कडकडीत

वैराग्य पाहिजे, देहपांग अगदीं नसावा. प्रपंचआशा नसावी. 'सर्वस्वाची आस तुटे । तरीच सगुणमूर्ति प्रगटे.' कांतापुत्रधनाचें ध्यान सर्वांसच पूर्वाभ्यासेंकरून असतें. 'प्रपंच करावा ऐसें । कोणासी सांगणेच नलगे.' प्रपंचाचें समूळ विस्मरण पडून देवाचेंच ध्यान लागलें असतां देव आपण होऊन भक्तापाठीं लागतो व त्याला सर्वस्वें पाळतो. १५ वा समास तर रामभक्तांनीं मुखोद्गत करावा. त्याचें नित्य चिंतन करावें. तेथें पहिल्या १८ ओव्यांत समर्थांनीं रामध्यानाचा प्रकार सांगितला असून पुढील साऱ्या ओव्या रामभक्तिरसानें ओथंबलेल्या आहेत. सुहास्यवदनापासून तों चरणापर्यंत राममूर्तिध्यान वर्णिलें आहे तें मूळांतच पहावें.

**चरणीं वांकी तोडर गर्जती । पाउलें मांडीवर एक क्षिती ।**
**तेथें रामदासाची वस्ती । कदा वियोग न साहे ॥ १८ ॥**
**राम सर्वांगसुंदर । राम करुणेचा सागर ।**
**दीना अनाथांचा उद्धार । एक श्रीराम कर्ता ॥ १९ ॥**
**राम जीवाचा जिव्हाळा । राम मनाचा कोवळा ।**
**राम जाणे अंतर्कळा । निजदासाची ॥ २४ ॥**
**वैभवें रावण माजलें । तेणें सकळ देव गांजिले ।**
**ऐसें जाणूनि धांवणें केलें । वैकुंठींहूनि राघवें ॥ २६ ॥**
**राम सुरवरांचा कोवसा । राम मंडन सूर्यवंशा ।**
**रामजप भवानीशा । सप्रेम चित्त रामनामें ॥ ३० ॥**

समर्थ सांगतात कीं, राम माझा स्वामी आहेच, पण 'जे जे शरण गेले । यांचाचि जाला' असा उदार आहे.

**आतांही जयास वाटे भेटावें । रामें मज सांभाळीत जावें ।**
**ऐसें दृढ घेतलें जीवें । तरी ऐका मी सांगेन ॥ ३७ ॥**

'श्रीराम जयराम जयजयराम' असा कांहीं एक जपाचा नियम करावा. म्हणजे 'आत्माराम जोडेल नियमे' असें समर्थ निश्चयात्मक सांगतात.

जप मात्र अंतरींच करावा, कोणासी कळों नेदावा. कृपण जसा सांपडलेल्या ठेव्याला जपतो, तसा रामानुभव अंतरीं एकान्तांत घ्यावा. विकल्प मनांत अगदीं येऊं न देतां मेरूप्रमाणें निश्चळ व निष्कंप असावें. प्रपंचीं आघात किंवा देहासी आपदा आल्या तरी ' राम विसरूं नये. '

**अखंड नाम स्मरावें । परी दुसरियासी कळों नेदावें ।**
**निदिध्यास लागलियां राघवें । पाविजे तात्काळ ॥ ४३ ॥**

रावणानें वैरभावानें रामचिंतन केलें तर तोही तरून गेला, मग दास्यभावानें प्रेमानें जो राम चिंतील तो उद्धरल्यावांचून कसा राहील? मात्र होणारे साक्षात्कार लोभानें कोणाला सांगूं नयेत. हा मी आपले जीवाचा अनुभव सांगतों —

**कांहीं साक्षात्कार जाला । तो सांगों नये दुसरियाला ।**
**जरी आळकेपणें सांगितला । तरी पुन्हा होणार नाहीं ॥ ४५ ॥**

द्रव्यठेवा प्रगट केला तर राजदूत हिरावून नेतील. लोकांत प्रसिद्धी व्हावी, लोकांनीं बरें म्हणावें, या लौकिकासाठीं साक्षात्कार सांगितला तर राम दुरावेल. ज्याला राम पाहिजे त्यानें लौकिकाची वासना (प्रतिष्ठेचा लोभ) सोडला पाहिजे. ' निदिध्यास जालियां नेमेसी । साक्षात्कार होय ' हें निश्चित होय. शब्दज्ञानाच्या घमेंडींत राहून राम गमावूं नकोस. एवढा प्रबळ व दयाळ स्वामी नामनिष्ठेनें व चिंतनसुखानें जोडतो हा महत्तम लाभ होय. समर्थ रामानें ज्याचा अंगीकार केला तो कळिकाळाला वंद्य होतो. शब्दज्ञान काय होय? क्रिया म्ह० आचरण मुख्य होय.

**सगुण उच्छेदावें । आणि निर्गुण प्रतिपादावें ।**
**परि तें निर्गुणचि स्वभावें । सगुण होतें ॥ ५९ ॥**
**भक्ति सगुणाचीच घडे । निर्गुणीं भेद समूळ उडे ।**
**तेथें जो वेगळेपणें पडे । तो मूर्ख जाणावा ॥ ६१ ॥**

भक्ति सगुणाचीच होते, निर्गुण आपण अंगें व्हावयाचें असतें. तेथें मौनच योग्य आहे. प्रपंचवणवा पेटला, त्याला परमार्थानें जाळिलें व

आपण विझाला —'तेथें रामदास जळोनि गेला । धांवणें करा कोणी !' तात्पर्य, रामदास 'रामीं निजधामीं विश्रांति पावला.'

दुसऱ्या समासांत रामासाठीं आपण सर्वत्याग केला असें समर्थ सांगतात.

**रामचंद्रा ! तुझा वियोग । ऐसा नको रे प्रसंग ।**
**तुजकारणें सर्वसंग । त्यक्त केला ॥ २ ॥**
**रामा ! तुझिये स्वामीपणें । मी ब्रह्मांड मानीं ठेंगणें ।**
**स्वामी ! तुजविण कोण जाणे । अंतर आमुचें ॥ ३ ॥**

संक्षेपांत सांगायचे म्हणजे, 'तुजकारणें जिवलगांचा । संग सोडिला.' रामकृपेने आपण कसे रामरूप व धन्य झालों हें समर्थांनीं १६ व्या समासांत सांगितलें आहे पण त्याचा विचार पुढें होणार आहे.

मनाच्या श्लोकांत समर्थांची रामैकनिष्ठा चांगलीच प्रगट झाली आहे.

## १२ मनोबोध व रामभक्ति

'अनंत अशा राघवाचा पंथ' जनांस दाखविण्यासाठीं ह्या श्लोकांची रचना झाली. राम सगुण आहे, निर्गुण आहे व सगुणनिर्गुणातीत आहे हें यांत सांगितलें असून त्याला पावावयाचा मार्ग येथें सांगितला आहे. मनोबोधाचा विचार अन्यत्र केला असल्यामुळें या ठिकाणीं फक्त सगुण रामाचे व त्याच्या कथेचे जे उल्लेख आले आहेत तेवढ्यांचाच विचार करूं. 'प्रभाते मनीं राम चिंतीत जावा,' 'सदासर्वदा प्रीति रामीं धरावी' म्हणजे संसारदुःखाचें विस्मरण होतें. रावणाने कुडी ( वाईट, परस्त्रीसंगतीची) वासना धरल्यामुळें तो प्राणास व राज्यास मुकला (१३). 'मना राघवेंवीण आशा नको रे'—रामाला सोडून मानवाचे गुण गाऊं नकोस; वेदशास्त्रपुराणे ज्याचे गुणानुवाद गातात त्याचे गुण गाइल्यानें सर्व कांहीं श्लाघ्यवाणे म्ह० गोड होतें (१८). 'न बोलें मना राघवेंवीण कांहीं'—फालतु गोष्टी बोलण्यानें आयुष्य व्यर्थ जातें व त्यांत कांहीं सुखही नाहीं (२३). 'रघूनायकासारिखा स्वामी'

शिरीं असल्यावर दंडधारी काळासही भिण्याचें कारण नाहीं (२८). श्लोक २८ ते ३७ फार बहारीचे आहेत.

**दिनानाथ हा राम कोदंडधारी । पुढें देखतां काळ पोटीं थरारी ॥**
**पुरी वाहिली सर्व जेणें विमानीं । नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥२९॥**

रामाचा दास होऊन राहतो त्याची राम कधीं उपेक्षा करीत नाहीं हें येथें अहल्या, मारुति, बिभीषण यांचीं उदाहरणें देऊन उत्तम प्रकारें मनावर ठसविलें आहे. समर्थांची ही प्रासादिक वाणी महाराष्ट्राच्या कानावर सतत पडत आहे. हे सुंदर श्लोक सर्वलोकप्रिय आहेत. 'समर्थाचिया सेवका वक्र पाहे । असा सर्व भूमंडळीं कोण आहे ?' ही समर्थांची दणदणीत वाणी कोणी ऐकली नाहीं ?

**महासंकटीं सोडिले देव जेणें । प्रतापें बळें आगळा सर्वगूणें ॥**
**जयातें स्मरे शैलजा शूलपाणी । नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥३१॥**
**अहल्या शिळा राघवें मुक्त केली । पदीं लागतां दिव्य होऊनि गेली ॥**
**जया वर्णितां शीणली वेदवाणी । नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥३२॥**
**वसे मेरुमांदार हे सृष्टिलीळा । शशीसूर्य तारांगणें मेघमाळा ॥**
**चिरंजीव केले जनीं दास दोन्ही । नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥३३॥**

सृष्टिरचनेच्या परमात्म्याच्या अनंत लीलांपैकीं मेरुमांदारादि पर्वत, चंद्रसूर्य, तारांगणें व मेघमाळा आहेत तोंवर रामाने आपले दोन भक्त—मारुतिराय व बिभीषण यांना चिरंजीव करून ठेवलें आहे म्ह० रामाच्या कृपेनें त्यांच्यावर काळाची सत्ता चालत नाहीं !

**असे हो जया अंतरीं भाव जैसा । वसे हो तया अंतरीं देव तैसा ॥**
**अनन्यासि रक्षीतसे चापपाणी । नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥३५॥**
**सदासर्वदा देव सन्नीध आहे । कृपाळूपणें अल्पधारिष्ट पाहे ॥**
**सुखानंद आनंद कैवल्यदानी । नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥ ३६ ॥**

मना ! परम समाधान देणाऱ्या रामाला आपलें सर्व चांचल्य देऊन तूं रामरूपीं अखंड वस्ती करून निश्चळ रहा (४०). दीनपरिपालनाचा

त्याचा बाणा आहे: ‘दिनानाथ हें तोडरीं ब्रीद गाजे। मना सज्जना राघवीं वस्ति कीजे’ (४२). राघवाची कथा गाऊन तूं मौन धरून रहा. ‘नसे राम तें धाम सोडोनि द्यावें। सुखालागिं आरण्य सेवीत जावें’ (४४). कल्पनांच्या मागें लागलास तर कधींच रामभेटी होणार नाहीं, ‘मनीं कामना राम नाहीं जयाला,’ ज्याच्या मनीं राम नाहीं त्याच्याच मनीं वासना, कल्पना, आशा, तृष्णा या बुजबुजत असतात! (५९).

**घनश्याम हा राम लावण्यरूपी। महाधीर गंभीर पूर्णप्रतापी॥**
**करी संकटीं सेवकाचा कुडावा। प्रभाते मनीं राम चिंतीत जावा॥६७॥**
**सुखानंदकारी निवारी भयातें। जनीं भक्तिभावें भजावें तयातें॥**
**विवेकें त्यजावा अनाचार हेवा। प्रभाते मनीं राम चिंतीत जावा॥६९॥**

रामाचें ध्यान जसें गोड आहे तसे त्याचें नामही अतिशय गोड आहे. रामनाम हें खरोखर सारभूत व साधनश्रेष्ठ आहे (७५). ‘समस्तामधें नाम हें सार आहे’ (८१).

**बहु चांगलें नाम या राघवाचें। अती साजिरें स्वल्प सोपें फुकाचें॥**
**करी मूळ निर्मूळ घेतां भवाचें। जिवां मानवां हेंचि कैवल्य साचें॥८८॥**

तात्पर्य —

**भजाया जनीं पाहतां राम येकू। करीं बाण येकू मुखीं शब्द येकू॥**
**क्रिया पाहतां उद्धरे सर्व लोकू। धरा जानकीनायकाचा विवेकू॥१३१॥**

## १३ अभंग, पदें वगैरे

१

**ध्यान लागलें रामाचें। दुःख हरपलें जन्माचें॥ १॥**
**रामपादांबुजावरी। वृत्ति गुंतली मधुकरी॥ २॥**
**रामवदनमयंकीं। चक्षुचकोर जाले सुखी॥ ३॥**
**तनु मेघश्याम मेळे। चित्तचातक निवाले॥ ४॥**
**कीर्तिसुंदरतरुवरी। कूजे कोकिला अंतरीं॥ ५॥**
**रामीरामदास–स्वामी। प्रगटले अंतर्यामीं॥ ६॥**

'राम सांवळा सुंदर। कासे मिरवी पीतांबर,' 'मुकुट किरीट कुण्डलें। तेज रत्नांचें फांकलें,' 'धन्य सूर्यवंश पुण्यपरायण' इ० अभंग रामदासी लोकांत प्रिय आहेत व ते फार सुंदर आहेत. ध्यानाचे दोन अभंग पहा—

२

छेत्री सुखासनीं अयोध्येचा राजा। नांदतसे माझा मायबाप ॥ १ ॥
माझा मायबाप त्रिलोकीं समर्थ। सर्व मनोरथ पूर्ण करी ॥ २ ॥
पूर्ण प्रतापाचा कैवारी देवांचा। नाथ अनाथांचा स्वामी माझा ॥ ३ ॥
विसंभेना कदा आपुल्या दासासी। रामीरामदासीं कुळस्वामी ॥ ७ ॥

३

रत्नजडित सिंहासन। वरी शोभे रघुनंदन ॥ १ ॥
वामांकीं ते सीताबाई। जगज्जननी माझी आई ॥ २ ॥
पश्चाद्भागीं लक्षुमण। पुढें अंजनीनंदन ॥ ३ ॥
भरत शत्रुघ्न ते भाई। चामरें ढाळिति दोहीं बाहीं ॥ ४ ॥
नळनीळ जांबुवंत। अंगद सुग्रिव बिभिषण भक्त ॥ ५ ॥
देहेबुद्धी नेणों कांहीं। दास अंकित रामापायीं ॥ ६ ॥

४

राम माझी माये कंई भेटईल। वोरसें देईल आळिंगन ॥ १ ॥
संसारींचें दुःख दाटलें मानसीं। तें मी तुजपासीं सांगईन ॥ २ ॥
उतावेळ चित्त उभारूनि बाहे। रामदास पाहे वाट तूझी ॥ ३ ॥

५

कां वो रामराये! दुरी धरियेलें। कठिण कैसें जालें चित्त तुझें ॥१॥
देउनी आळिंगन प्रीतिपडिभरें। कैं मुख पीतांबरें पुससील ॥ २ ॥
घेउनी कडिये धरुनी हनुवटी। कैं गुजगोष्टी सांगसील ॥ ३ ॥
रामदास म्हणे केव्हां संबोखिसी। प्रेमपान्हा देसी जननिये ॥ ४ ॥

६

दासाची संपत्ती राम सीतापती। जीवाचा सांगाती राम एक ॥ १ ॥
राम एक माता राम एक पिता। राम एक भ्राता सहोदर ॥ २ ॥
सहोदर विद्या वैभव कांचन। सर्व हा स्वजन राम एक ॥ ३ ॥
राम एक स्वामी राम हा कैवारी। लाभ या संसारीं राम एक ॥ ४ ॥
राम एक ज्ञान राम एक ध्यान। राम समाधान रामदासीं ॥ ५ ॥

७

ठकाराचें ठाण करीं चापबाण । माझें ब्रह्मज्ञान ऐसें आहे ॥ १ ॥
रामरूप देहो जाला निःसंदेहो । माझे मनीं राहो निरंतर ॥ २ ॥
मुखीं रामनाम चित्तीं घनश्याम । होतसे विश्राम आठवितां ॥ ३ ॥
रामदास म्हणे रामरूपावरी । भावें मुक्ति चारी वोवाळीन ॥ ४ ॥

८

राघवाची भक्ति ज्ञानाचें मंडण । भक्तांचें भूषण राम येक ॥ १ ॥
नलगे पिंडज्ञान नलगे तत्त्वज्ञान । राघवाचें ध्यान आठवितां ॥ २ ॥

९

रामाचें भजन तेंचि माझें ज्ञान । तेणें समाधान पावईन ॥ १ ॥
रामासी वर्णितां देहीं विदेहता । जाली तन्मयता सहजचि ॥ २ ॥
राघवाचें रूप तें माझें स्वरूप । तेणें सुखरूप निरंतर ॥ ३ ॥

१०

संसारींचें दुःख मज वाटे सुख । राघवाचें मुख पाहतांचि ॥ १ ॥
माझें सुख माझ्या राघवाच्या पाईं । तेणें मी हृदयीं निवईन ॥ २ ॥

११

समर्थाचें उणें सेवकां मरण । तेणें गुणें शीण होत असे ॥ १ ॥
'पतितपावन' नाम कैसें राहे । कासावीस होये जीव माजा ॥ २ ॥
यालागीं राघवें भक्तां उद्धरावें । आपुलें राखावें ब्रीद देवा ॥ ३ ॥
माझें सर्व जावो तुझें नाम राहो । हाचि माझा भावो अंतरींचा ॥ ४ ॥
रामदास म्हणे भलतें करावें । आधीं उद्धरावें सेवकासी ॥ ५ ॥

१२

रामभक्तीविण अनु नाहीं सार । साराचेंही सार रामनाम ॥ १ ॥
रामदास म्हणे रामभक्तीविणें । जाणावें हें उणें सर्व कांहीं ॥ ६ ॥

१३

जाणे सुखदुःख राम मांझा येक । येर ते माईक वैभवाचीं ॥ १ ॥
अंतरींची व्यथा श्रीरामा समर्था । जाणवल्या चिंता दूरी करी ॥ ५ ॥
करी प्रतिपाळ शरण आलियांचा । राम त्रैलोक्याचा मायबाप ॥ ६ ॥
मायबाप धन सज्जन सोयरा । येका रघुवीरावीण नाहीं ॥ ७ ॥

**नाहीं मज चिंता श्रीराम असतां । संकटीं बोहातां उडी घाली ॥ ९ ॥**
**अंतरींचें गुज राम सर्वबीज । रामदासीं निज प्रगटलें ॥ १० ॥**

समर्थांच्या पदांतही भक्तिप्रेमा कसा वोसंडून येत आहे पहा —

'निदान पाहसी किती दयाळा । निदान पाहसी किती' ह्या गोड पदांत 'जळीं तूं पाषाण तारिलेस त्यांहून कां मी जड आहें?' असें समर्थांनीं लाडिकपणें विचारिलें आहे. पदाचा शेवट —

**वृत्ती जडली पायांपासीं । जेवीं गुळासि गुंतली माशी ।**
**देहीं असोनि गुप्त कां होसी । दास उदास देहभावासी ॥ ४ ॥**

* * * *

**( १ ) वेध लागला रामाचा । सुखरविश्रामाचा ॥ ध्रु० ॥**
**( २ ) रामा ! चाल रे झडकरी । त्रिभुवन हरुषे भारी ॥ ध्रु० ॥**
**( ३ ) आठवे मनीं आठवे मनीं । आठवे मनीं सदा राम चिंतनीं ॥ध्रु०॥**
**( ४ ) कल्याणधामा । रामा कल्याणधामा ॥ ध्रु० ॥**
**( ५ ) रामा हो जयरामा हो । पतितपावना पूर्णकामा हो ॥ ध्रु० ॥**

अशीं किती तरी पदें व पदांचीं ध्रुवपदेंही गुणगुणत रामप्रेम लुटावेंसें वाटतें.

**( ६ ) श्रीगुरुचें चरणकंज हृदयीं धरावें ॥**
**( ७ ) आम्ही काय कुणाचें खातों रे । तो राम आम्हांला देतो रे ॥**

समर्थांच्या आरत्या महाराष्ट्रांत घरोघर झाल्या आहेत. 'सुखकर्ता दुखहर्ता' ही गणपतीची, 'लवथवती विक्राळा' ही शंकराची, 'पंचानन हयवाहन' ही खंडोबाची, 'अघहरणी पुष्करणी' ही व्यंकटेशाची, इ० आरत्या लोकप्रसिद्ध आहेत.

'साफल्या निजवल्लुया' ही एक व 'नाना देहीं देव एक विराजे' ही एक अशा रामाच्या दोन व 'सत्राणें उड्डाणें' ही मारुतीची एक अशा तीन आरत्या सर्वत्र म्हणण्यांत येतात.

याशिवाय लळितें, सवाया, भजनें बहुत आहेत.

समर्थांच्या रामोपासनेचें स्वरूप ह्या प्रकरणावरून वाचकांच्या नीट ध्यानांत यावें. आतां रामोपासनेचेंच अंग 'मारुतिउपासना' तिकडे वळूं.

## २ मारुतिउपासना

राम आणि मारुति हे रामोपासकांचे एकरूप दैवत आहे:

**१ बलसंवर्धक उपासना**

'राम हनूमंत आत्मरूपी.' साखर आणि गोडी इ० दृष्टान्तही येथें अपुरे पडतात. आमची कुळवल्ली हनूमंत ही राममंडपावर वेंघली असून 'आमुचे कुळीं हनूमंत । हनूमंत आमुचें दैवत । तयावीण आमुचा परमार्थ । सिद्धीतें न पावे कीं'—आमचा सखा साहकारी हनूमंत असून आमुचा सद्गुरु—आमुचें आराध्य दैवत—राम आहे असें समर्थांनीं म्हटले आहे. आमुचा स्वरूपसंप्रदाय अयोध्यामठाचा असून आमचे देवदेवी रामसीता हे आहेत व 'मारुती-उपासना नेमस्त । वाढविला परमार्थ रामदासीं.' आदिनारायण—महाविष्णु—हंस—ब्रह्मा—वसिष्ठ—राम—रामदास ही रामदासांनीं आपली गुरुपरंपरा स्वतःच दिली आहे.

**वसिष्ठ उपदेशी श्रीरामरायासी । रामें रामदासीं उपदेशिलें ॥**

समर्थांना उपदेश साक्षात् श्रीरामरायाचा होता. 'उपदेश देवोनी दिधला मारुती । स्वयें रघुपति निरवीत.' रामानें उपदेश देऊन मला मारुतिरायाच्या स्वाधीन केलें, म्हणून तो 'रामदासा साहाकारी । सांभाळितो परोपरी.' 'त्याचा मी म्हणती जनीं,' मी मारुतिरायाचा (सेवक अगर अवतार) आहें असें लोक म्हणतात! समर्थांनीं मारुतीची उपासना केली व लोकांत वाढविली. वारकरी संतही गरुड हनूमंत यांना मानतात पण समर्थांनीं मारुतीची एकान्तिक भक्ति केली. प्रत्येक खेड्यांत एक तरी मारुतीचें देऊळ असतें व प्रत्येक तालमींत मारुतीची एक मूर्ति असून शनिवारीं मारुतीची

आरती करतात. या गोष्टी समर्थांनीं सुरू केल्या अशी समजूत आहे. मारुतीची लघूशी मूर्ति करून ती ' असावी सदा ताइतामाजि दंडीं । समरांगणीं पाठ दीजे उदंडीं. ' तालीमबाजांपैकीं कांहींच्या दंडाला मारुतीची मूर्ति असते, पण शिवकालीं किंवा नंतर मराठी वीरांच्या दंडाला ती असे किंवा काय याचा शोध मला लागला नाहीं. महाराष्ट्रीय लोकांची तालमीकडे मूळचीच प्रवृत्ति होती, समर्थांच्या प्रेरणेमुळें मारुतिराय तालीम व व्यायाम करणाऱ्या लोकांचें अधिदैवत झालें. ' काय भक्तीच्या त्या वाटा। मज दावाव्या सुभटा ' अशा प्रकारें पूर्वींच्या संतांनीं मारुतिरायाला भक्तीच्या वाटा पुसल्या होत्या पण ' वीरमारुती ' मात्र समर्थांनींच लोकांच्या पुढें ठेवला यांत शंका नाहीं. दास मारुती रामापुढें हात जोडून उभा असतो. वीरमारुती हातीं गदा घेऊन समरांगणावर जाण्यास सज्ज असतो. समर्थांनीं स्वहस्तानें अकरा मारुती स्थापिले व हजारो त्यांच्या प्रेरणेनें स्थापिले गेले.

रामाच्या दासांतला अग्रेसर जो मारुती त्याची उपासना समर्थांना फार प्रिय होती. दोघांतही साम्य होतें. अविप्लुत ब्रह्मचर्य, निःस्सीम रामभक्ति, वरिष्ठ प्रकारची बुद्धिमत्ता म्ह० शक्ति, भक्ति व युक्ति या तीन गुणांत मारुतीची बरोबरी करणारा दुसरा कोण आहे? मारुतीचे लोकोत्तर पराक्रम व धर्मसंस्थापनेसाठीं अवश्य तें दुष्टदमनसामर्थ्य यांची प्रत्यक्ष मूर्ति म्ह० मारुतिरायच. मारुतीच्या मूर्ति समर्थांनीं जागोजाग स्थापन केल्या त्या मारुतिरायाच्या वरील गुणांचें अनुकरण करण्याची प्रेरणा तरुणपिढीला व्हावी या हेतूनेंच. समर्थांनीं आपल्या रामायणांत व भीमरूपी स्तोत्रांतही मारुतिरायांच्या भीमपराक्रमाची, त्यांच्या बुद्धिमत्तेची व उत्कृष्ट रामभक्तीची प्रशंसा केलेली आहे, त्यांच्या लोककल्याणकारित्वाची स्तुति केली आहे. ' बलभीम ', ' बजरंग ' हीं विशेषणें एकट्या मारुतीलाच लावलेलीं आहेत. आपल्या बलानें दुष्टांना भिवविणारे म्हणून ' बलभीम ' मारुति वज्रदेही—वज्रांग—बज्रांग—बजरंग. मारुतीचा जयजयकार 'बजरंग बली की जय'

याप्रमाणें करितात. खुद्द रामरायांनीं मारुतीला ज्या गुणांबद्दल प्रशस्तिपत्र दिल्याचें वाल्मीकि सांगतात ते गुण असे —

**शौर्यं दाक्ष्यं बलं धैर्यं प्राज्ञता नयसाधनम् ।**
**विक्रमश्च प्रभावश्च हनूमति कृतालयः ॥**

समर्थांनीं मारुतीला एका पद्यांत 'रामदासाचा सारथी' म्हटलें आहे.

**हा तो ईश्वरी अवतार । भीम सकळांसी आधार ।**
**रामध्यानीं निरंतर । भक्तराज ॥**
**राम गेले वैकुंठासी । तैं निरविलें हनुमंतासी ।**
**'तुवां माझिया भक्तांसी । सांभाळावें' ॥**
**रामदासाचा सारथी । विघ्नें चळचळां कांपती ।**
**पावे संकटीं मारुती । भर्वशानें ॥**

मारुती आपला संरक्षक आहे याविषयीं समर्थांनीं आपले अनुभव अनेक ठिकाणीं सांगितले आहेत.

(१) **प्रभूचें महावाक्य तां साच केलें**
**म्हणे दास हें प्रत्यया सत्य आलें ।**
**जनामाजी हें सांगतां पूरवेना**
**अवस्था मनीं लागली हे सरेना ॥**
(२) **कष्टी जाला जीव केली आठवण ।**
**पावला किराण मारुतीचें ॥**

समर्थशिष्य दिनकर यांनींही आपले अनुभव असेच सांगितले आहेत. "निर्विलें राघवें यासी सांभाळीं दास आमुचे । तयांची सर्वही चिंता मारुती तुजला असे ॥ नसे हे अन्यथावाणी प्रत्यक्ष साक्ष बाणली," असें दिनकर गोसावी म्हणतात. कल्याणस्वामींचाही हाच अनुभव आहे. हे अनुभव २५० वर्षांपूर्वींचे असले तरी आजही येणें अशक्य नसावें. दीडशें वर्षांपूर्वीं देवनाथांसही याचा अनुभव आला होता.

समर्थांनीं वीरमारुतीचीं स्तोत्रें कांहीं विशेष हेतूनें रचलेलीं आहेत.

**२ वीरमारुती**

त्यांनीं रामायणापैकीं फक्त 'सुंदरकांड' व 'युद्धकांड' या दोन कांडांवरच आपल्या 'रामायणा'ची उभारणी केली आहे, याचें बीज समर्थांच्या हनूमद्भक्तींत आहे. ह्या दोन कांडांत मारुतीचे पराक्रम व रामरावणयुद्ध यांचेंच वर्णन आहे. महाराष्ट्रांतील तरुणांपुढें 'शक्ति, युक्ति व भक्ति' या गुणत्रयाचा पुतळा उभा करावा व मुख्यतः शक्तिसंपादनाकडे त्यांची प्रवृत्ति व्हावी हा समर्थांचा हीं मारुतिस्तोत्रें रचण्यांत प्रधान हेतु उघड दिसत आहे. त्यांची मारुतीची आरती सर्वप्रिय आहेच—

**सत्राणें उड्डाणें हुंकार वदनीं ।**
**करि डळमळ भूमंडळ सिंधूजळ गगनीं ।**
**कडाडिलें ब्रह्मांड धोका त्रिभुवनीं ।**
**सुरवर नर नीशाचर त्यां जाल्या पळणी ॥ १ ॥**
**जय देव जय देव जयजय हनुमंता ।**
**तुमचेनि प्रसादें न भियें कृतांता ॥ ध्रु० ॥**
**दुमदुमिलें पाताळ उठिला पडशब्द ।**
**धगधगिला धरणीधर मानिला खेद ।**
**कडाडिले पर्वत उडुगणउच्छेद ।**
**रामीं रामदासा शक्तीचा शोध ॥ २ ॥**

सत्राण म्ह० प्रचंड. 'सत्त्वाची सुटे सत्राण। वाहुटळी' (ज्ञाने० १५-१८३). शक्तीचा (सीतादेवीचा, आदिशक्तीचा) शोध घेण्यासाठीं मारुतीनें जें प्रचंड उड्डाण केलें त्यामुळें देवदानवमानवांत भयंकर खळबळ उडाली, त्याच्या हुंकारयुक्त उड्डाणानें त्रैलोक्य घाबरलें, पर्वत कडाडले व ब्रह्मांडाला धोका उत्पन्न झाला ! पृथ्वीवर लोळणाऱ्या मानवांना त्या गगनव्यापी उड्डाणानें खडबडून जागें केलें व मारुतीचा प्रसाद जे जोडतील त्यांना

कृतान्तालाही भिण्याचें कारण उरणार नाहीं असा धीर दिला! केवढी वीर्यवती वाणी आहे ही! असा रामभक्त पराक्रमी पुत्रही महावीर्यवती अंजनीमातेच्या उदरीं जन्मला. नाशिक-त्र्यंबकेश्वरच्या वाटेवर अंजनीचा डोंगर आहे. रामकार्यार्थ मारुतीला अर्पण केल्यावर ही तपस्विनी रामचिंतन करीत ह्या डोंगरावर राहिली होती. रावणाचा वध केल्यावर रामलक्ष्मणसीता यांसह मारुतिराय विमानांतून अयोध्येला परत जात असतां विमान या डोंगरापाशीं आलें तेव्हां ' लंकेहूनी अयोध्ये येतां। रामलक्षुमणसीता। हनूमंतें अंजनिमाता। दाखविली रामा.' चौघें विमानांतून खालीं उतरलीं, त्यांनीं अंजनीस वंदन केलें, सीतादेवीनें मारुतीच्या पराक्रमाची स्तुति केली. ती ऐकून ती वीरमाता अंजनी उसळून म्हणाली, 'काय याच्या पराक्रमाची एवढी मोठी स्तुति करितां ?—

**हा कां माझ्या उदरीं आला। गर्भींहुनि कां नाहीं गळला।**
**आपण असतां कष्टवीला। कां स्वामी राम॥**
**माझ्या दुग्धाची हे प्रौढी। कळिकाळाची नरडी मुरडी।**
**रावणादिक हीं बापुडीं। घुंगुरटीं काय॥**

रामाला मारुतीच्या पराक्रमाचें बीज त्याच्या वीर्यवती आईच्या प्रकृतींत आहे हें कळून आलें. माता वीर्यवती असल्याशिवाय वीरपुत्र निर्माण होणें कठिण आहे. हें अंजनीगीत, भीमरूपी स्तोत्रें आपल्या बायकांच्या म्हणण्यांत पहिल्यापासून आहेत व त्यांच्याठायीं मारुतिभक्ति विशेष स्पष्ट दिसते. मारुतीसारखा सर्वगुणसंपन्न पुत्र व्हावा अशी वासना त्यांच्या पोटीं असावी. पुढील भीमरूपी तरी सर्वप्रिय आहे—

**भीमरूपी महारुद्रा वज्रहनुमान मारुती।**
**वनारी अंजनीसूता रामदूता प्रभंजना॥ १॥**
**महाबळी प्राणदाता सकळां उठवी बळें।**
**सौख्यकारी शोकहर्ता धूर्त वैष्णव गायका॥ २॥**

> **लोकनाथा जगन्नाथा प्राणनाथा पुरातना ।**
> **पुण्यवंता पुण्यशीला पावना परतोषका ॥ ४ ॥**
> **ध्वजांगें ऊचली बाहो आवेशें लोटला पुढें ।**
> **काळाग्नी काळरुद्राग्नी देखतां कांपती भयें ॥ ५ ॥**
> **ठकारे पर्वताऐसा नेटका सडपातळू ।**
> **चपलांग पाहतां मोठें महाविद्युल्लतेपरी ॥ ८ ॥**
> **आरक्त देखिलें डोळां गिळिलें सूर्यमंडळा ।**
> **वाढतां वाढतां वाढे भेदिलें शून्यमंडळा ॥ १३ ॥**
> **भूतप्रेतसमंधादी रोगव्याधी समस्तही ।**
> **नासती तूटती चिंता आनंदें भीमदर्शनें ॥ १४ ॥**

सकळांचा हा प्राणदाता 'सकळां ऊठवी बळें'—निजलेल्यांना जागे करितो. जन्मतः यानें सूर्यमंडळावर, तें पक्क फळ आहे असें समजून, झांप घातली—उपजत महत्त्वाकांक्षाच प्रचंड ! पोरांना उठपळ देवऋर्षीकडे व वैद्यांकडे नेऊन औषधाच्या बाटल्या त्यांच्या पोटांत रिचवणाऱ्या मूढांना ते सांगतात कीं, मुलांना मारुतीची उपासना लावा; प्रातःस्नान, रामभजन, सूर्यनमस्कार घालायचें वळण लावा म्हणजे भूतप्रेतसमंधादिकांची त्यांना बाधा होणार नाहीं, तीं मुलें निश्चित व आनंदमय होतील. रोगव्याधि मारुतिउपासनेनें दूर होतात हें समर्थांनीं एका स्तोत्रांत स्वानुभवानें सांगितले आहे. वृद्धपणीं कफवातानें एकदां समर्थ आजारी पडले; पण मारुतीच्या कृपेनें खडखडीत बरे होऊन उठले--

'उठवीं मज अनाथा दूर सारूनि वेथा' आणि 'माझी काया पूर्ववत् दृढ करा' अशी त्यांनीं मारुतीची करुणवाणीनें प्रार्थना केली.

> **तुजविण मज पाहें पाहतां कोण आहे ?**
> **म्हणउनि मन माझें रे ! तुझी वाट पाहे ।**
> **मज तुज निरवीलें पाहिजे आठवीलें**
> **सकळिक निजदासांलागिं सांभाळवीलें ॥ ५ ॥**

**उचित हित करावें उद्धरावें धरावें**
**अनहित न करावें त्वां जनीं येश घ्यावें ।**
**अघटित घडवावें सेवकां सोडवावें**
**हरिभजन घडावें दुःख तें वीघडावें ॥ ९ ॥**
**कृपणपण नसावें भव्य लोकीं दिसावें**
**अनुदिन करुणेचें चिन्ह पोटीं वसावें ।**
**वडिलपण धरावें सेवकां सांवरावें**
**अनहित न करावें तूर्त हातीं धरावें ॥ १० ॥**

भक्ताची प्रार्थना देव ऐकणार नाहीं असें कधीं घडलें आहे काय? 'कपि घन करुणेचा बोळला रामवेधें' व समर्थांची वज्रकाया झाली व ते सुखी झाले. मारुतिराय दासाचें संरक्षण करितात असा आपला स्वानुभव समर्थांनीं अनेकदां सांगितला आहे: 'सदा सर्वदा रामदासासि पावे। खळीं गांजितां ध्यान सोडूनि धांवे' म्हणून 'पावे मारुति संकटीं भर्वशानें' अशी निष्ठा ठेवून त्याची उपासना करावी.

### ३ भीमरूपी स्तोत्रांचें स्वरूप

सर्व भीमरूपी स्तोत्रे वीररसानें मुसमुसलीं आहेत. प्रत्येकांत मारुतिरायाच्या पराक्रमाचें व एकेक प्रसंगाचें वर्णन आहे. ह्या स्तोत्रांत समर्थांच्या रामायणापेक्षां अधिक रसानुभव घेतां येतो. ह्यांत वीररस व अद्भुतरस या दोन्ही रसांचें मिश्रण आहे. वाणी सुबोध, सरल व ओजस्वी आहे. मारुतीचें बाळरूप व बाळलीला यांचें एका स्तोत्रांत सुरस वर्णन आहे. 'जनीं ते अंजनी माता जन्मली ईश्वरी तनू' व तिच्या उदरीं जें बाळ जन्मलें तें 'अतूळ तूळणा नाहीं मारुती वातनंदनु.'

**चळे तें चंचळे नेटें बाळ मोवाळ साजिरें ।**
**चळताहे चळचळी बाळ लोवाळ गोजिरें ॥**
**हात कीं पाय कीं सांगों नखें बोटें परोपरी ।**
**दृष्टीचें देखणें मोठें लांगूळ लळलळीतसे ॥**

मवाळ म्ह० मनाचा सौम्य व लोवाळ म्ह० लव्हाळ्यासारखा मृदु, सकुमार.

**बाळानें गिळिला बाळू स्वभावें खेळतां पहा।**
**आरक्त पीत वाटोळें देखिलें धरणीवरी॥**

ह्या बाळानें म्ह० मारुतीनें तो बाळ म्ह० बाळसूर्य खेळतां खेळतां गिळिला! पोरें खेळांत माती उकरून खात असतात, पण ह्या बाळानें तेजोगोलच गिळला, स्वतःच तेजोगोल झाला! अंजनी ही 'ईश्वरी तनु' म्ह० शबल ब्रह्म किंवा मूळमाया—तिच्यापासून मारुति (प्राण) झाला व प्राणाचाही प्राण राम परब्रह्म—असें हें मारुतीउपासनेचें म्हणजे उपनिषदांतील प्राणोपासनेचें रहस्य आहे. असो. आपण मारुतीच्या सगुणरूपाकडेच लक्ष देऊं. मारुती बाल असतानांच 'पवनासारिखा धांवे वावरे विवरे बहू.' हा असला प्रचंड योद्धा गिरीसमोर उभा राहिला कीं, 'हा गिरी तो गिरी पाहे' असेंच लोकांस वाटे. हा लंकेंत गेला तेव्हां वृक्षावर गुप्त राहिला व—

**मागुता प्रगटे धांवे झेंपावे गगनोदरीं।**

व हा वृक्षावर बसला तेव्हां 'कडाडां मोडतीं झाडें' व हा प्रासादांवरून उड्या मारीत गेला तेव्हां 'वाड वाडे उलंडती!'

मारुतीचा कोप (शत्रूंवरचाही) भयानक असायचाच!

**कोपला रुद्र जे काळीं ते काळीं पाहवेचि ना।**
**बोलणें चालणें कैंचें? ब्रह्मकल्पांत मांडला॥**

त्याच्याशीं बोलेल चालेल कोण? सभेंतलीं भाषणें, चर्चा, वितंडवाद हे कार्यकर्त्या वीराला सुचत नसतात!

**ब्रह्मांडाहून तो मोठा स्थूळ उंच भयानकू।**
**पुच्छ तें मुर्डिलें माथां पाऊल शून्यमंडळा॥**

मार्तंडमंडळाऐसे दोन्ही पिंगाक्ष ताविले।
कर्कशा घर्डिल्या दाढा उभे रोमांच ऊठिले ॥
अद्भूत वेश आवेशें कोपला रणकर्कशु।
धर्मसंस्थापनेसाठीं दास तो उठिला बळें ॥

षड्रिपूंपैकीं कोप हा एक आहे. पण धर्मस्थापनेचें कार्य साधून देणारा कोप—वीराचा आवेश—हा महागुणच आहे! कामकोपादि सामान्यतः शत्रु खरे, पण त्यांचा तारतम्याने विनियोग करितां आला तर हेच मित्र होतात. जाणते धर्मसंस्थापनेसाठीं त्यांचा उपयोग करून घेतात. दुष्टदमन व सुष्टसंरक्षण हीच धर्मस्थापना. धर्म यज्ञरूप आहे. यज्ञाला गाई व ब्राह्मण अवश्य आहेत. दूध, तूप, दहीं यज्ञाच्या हविर्भागाला लागतात व ब्राह्मण मंत्र म्हणायला लागतात म्हणून गाईब्राह्मणांचें प्रतिपालन यांत सर्व प्रजांचे कल्याण आहे. कृष्णपरमात्मा किंवा शिवराय यांसारखे जातिवंत क्षत्रिय गोब्राह्मणप्रतिपालक म्हणजेच धर्मसंस्थापक असतात.

चामरवृत्तांतल्या एका भीमरूपीची ओळख करून देऊन हें प्रकरण पुरें करितों. मारुतिराय त्रिकुट गिरीवर ( लंकेस ) गेले, त्या वेळची त्यांच्या पुच्छाची तेथील कामगिरी पहा—

हीन देव दीनरूप देखतांचि पावला
गड्गडीत घड्घडीत कड्कडीत कोपला।
लाटि कूटि पाडि फोडि झोडि झोडि झोडिला
दैत्यतोक एक हाक सर्व गर्व मोडिला ॥
काळदंडसें प्रचंड तें ( पुच्छ ) वितंड जातसे
भारमार राजमार पुच्छमार होतसे।
पाडिले पछाडिले रुधीरपूर न्हातसे
दैत्य बोलती 'बळें पळोन काय घ्यातसे' ॥

काळकूट तें त्रिकूट धूट धूट ऊठिलें
दाट थाट लाट लाट कूट कूट कूटिले।
घोर मार ते सुमार लूट लूट लूटिले
चिर्डिलेचि घर्डिलेचि फूट फूट फूटिले॥

वज्रपुच्छ त्यासि तुच्छ मानिलें निशाचरीं
सर्वही खणखणाट ऊठिले घरोघरीं।
फुटेचिना तुटेचिना समस्त भागले करीं
लटलटीत कांपती बहूत धाक अंतरीं॥

हात पाय मान माज वोढितें पछाडितें
अडचणींत अडकवूनि पीळ पेंच काढितें।
हस्तमार दैत्यमार दंडमार होतसे
लंडसे कलंडले उलंडलेचि भंडसे॥

गुप्तरूप मारुती दशाननाकडे भरे
मुकूट पाडिला शिरीं कठोर वज्र ठोसरे।
सभा विटंबिली बळेंचि गर्गरीत वावरे
बलाढ्य दैत्य मारिले कठीण पुच्छ नावरे॥

बळें चपेट मारिला उदंड दैत्य हारिला
तरारिला थरारिला भयंकरू भरारिला।
गद्गदी तनू वितंड सागरीं सरारिला
जानकीस भेटला प्रभूकडे झरारिला॥

मारुतीची ही लंकेची पहिली धूळभेट म्हणजे ' थोर धाक एक हाक काळचक्र वावरे ' याची निशाणीच होय. युद्धाकांड पुढें!

समर्थांनीं मारुतिरायावर कांहीं अभंग व पदें केलीं आहेत. अभंगांत

**४ अभंग व पदें**

प्रायः मारुतिचरित्र संक्षेपानें गाइले आहे व पदांत त्याची करुणा भाकली आहे. मारुती "हा तो ईश्वरी अवतार। भीम सकळांसि आधार। रामध्यानीं

निरंतर । भक्तराज ॥ राम गेले वैकुंठासी । तैं निरविले हनुमंतासी । तुवां माझिया भक्तांसी । सांभाळावें " असें एका ठिकाणीं त्यांनीं म्हटलें आहे. मारुतीनें अनेक संकटांतून माझे रक्षण केलें आहे व रामाज्ञेप्रमाणें तो अनेक रामभक्तांचे रक्षण करीत आहे. ' स्वधामासि जातां प्रभू रामराजा । हनूमंत तो ठेविला याचि काजा ॥ सदा सर्वदा रामदासासि पावे । खळीं गांजितां ध्यान सांडूनि धांवे ॥ ' लोकोद्धारासाठीं रामानें मारुतीला चिरंजीव केलें आहे : " हनूमान मी नमीं । मज भेटविलें रामीं । विघ्नांचिया कोटिश्रेणी । अंतरोनी ॥ राम उपासकांवरी । अतिप्रेम पडिभरी । होवोनीयां कैवारी । निवारी दुःख ॥ " मारुति हा विश्वप्राण आहे : ' मुख्य प्राणासी पूजिलें । रामदर्शन घडलें.' मारुति-उपासनेमुळे मला रामदर्शन घडलें व मी कृतार्थ झालों असें समर्थांनीं अनेकवार म्हटले आहे. मारुतिरायाच्या उपासनाबळावर मी निर्भय आहें. माझा मायबाप मारुति आहे, त्याच्या अनुग्रहानें मला परस्त्री मातेसमान झाली.

**बाप माझा ब्रह्मचारी । मातेसमान अवघ्या नारी ॥**
**उपजतां बाळपणीं । गिळूं पाहे वासरमणी ॥**
**स्वामीकृपेची साउली । रामदासाची माउली ॥**

रामदासांसंबंधीं कोणी कांहीं वांकडेतिकडें लिहिले आहे व त्याचे म्यां या ग्रंथांत खंडण करावें अशा मला कोणी कोणी सूचना केल्या होत्या, पण चिखलांत हात घालून मग तो धूत बसण्याची मला जरूरी वाटत नाहीं. महापुरुषाची निंदा कानानें ऐकूं नये, डोळ्यांनीं वाचूं नये, मुखानें बोलूं नये, ' माध्यान्हीं थुंकतां सूर्यावरी । तो थुंका उडे आपणावरी ' हें निंदक विसरतात. असो.

## अभंग

पडतां संकट जीवा जडभारी । स्मरावा अंतरीं बलभीम ॥
बलभीम माझा सखा सहोदर । निवारी दुस्तर तापत्रय ॥

*   *   *   *

जिकडे जिकडे जाती भक्त । पाठीं जाय हनुमंत ॥
रामउपासना करी । मारुति नांदे त्याचे घरीं ॥
दास म्हणे ऐसें करा । सदा मारुति ह्रुदयीं धरा ॥

## पद

कैवारी हनुमान । आमुचा । कैवारी हनुमान ॥ ध्रु० ॥
पाठी असतां तो जगजेठी । वरकड काय गुमान ॥ आमुचा० ॥ १ ॥
नित्य निरंतर भजका रक्षी । धरूनियां अभिमान ॥ आमुचा० ॥ २ ॥
दासा रक्षी हाचि भरंवसा । वदतों त्याची आण ॥ आमुचा० ॥ ॥ ३ ॥

आणखी काय सांगायचें आहे ? ‘ सामर्थ्याचा गाभा तो हा भीम भयानक उभा. ’

मारुतिसख्या बलभीमा रे ॥ ध्रु० ॥
अंजनिचें वचनामृत सेवुनि । दाखविसी बलसीमा रे ॥

कल्याणस्वामीही म्हणतात—

अहो जी बलभीमा बलभीमा ॥ ध्रु० ॥
भक्तजनांतें निरवुनि आम्हां । स्वामी गेले निजधामा ॥ १ ॥

त्यांचें पुढील सुंदर पदही मननीय आहे—

कैपक्षी भीमराया । निगमांतर विवराया ।
ब्रह्मानंद वराया । चंचळ मन आवराया ॥ ध्रु० ॥
संकट दुष्ट हराया । मार कुमार कराया ।
गुरुपदरेणु धराया । भाविक जन उद्धराया ॥ १ ॥
रघुपतिचा कैवारी । दुर्घट विघ्न निवारी ।
भजन पूजन मंदवारीं । कल्याण जनहितकारी ॥ २ ॥

मारुतिराय कैवारी झाले म्हणजे वेदाचें रहस्य उलगडतें, ब्रह्मानंद मिळतो, चंचल मन आवरलें जातें, दुष्टजन व संकटें यांचा नाश होतो, गुरुचरणीं मति स्थिर होते, भाविक उद्धरतात व जनांचें हित होतें. मारुति-उपासनेपासून हे सारे लाभ होतात.

---

## ३ तुळजापूरची भवानी

समर्थांचें उपास्य राम व उपासना मारुतीची हें आपण येथवर पाहिलें.

### १ तुळजापूरची तुकाई

त्यांच्या उपासनेचें आणखी एक अंग आहे. तुजळापूरची भवानी ही त्यांची कुलस्वामिनी होती. शिवाजीमहाराजांचीही कुलस्वामिनी तुळजापूरची भवानी हीच होती, तेव्हां समर्थ व शिवाजी यांच्या ऐक्यांतला हा एक महत्त्वाचा दुवा होता. एकाच भवानीदेवीचे दोघे उपासक, त्यामुळेंच जणूं तिने दोघांच्याही चित्तांत एकाच जातीची प्रेरणा केली! आदिमाया आदिशक्ति—हिचीं मुख्य स्थानें महाराष्ट्रांत चार आहेत. तुळजापूरची भवानी उर्फ तुकाई, माहूरची ( औंधचीही ) रेणुका उर्फ यमाई, कोल्हापूरची महालक्ष्मी व सप्तशृंगीची महिषासुरमर्दिनी. ह्या चार स्थानांची माहिती व नाथांचें आदिमायेवरील अत्यद्भुत व ओजस्वी भारूड मी मागें दुसऱ्या खंडांत ( पृ० ४३१ ते ४३९ ) दिलेलें वाचकांनीं आधीं पहावें व नंतर समर्थांच्या ह्या भवानीस्तोत्रांकडे ( हीं ७।८ आहेत ) लक्ष पुरवावें. तुळजापूरची भवानी ही महाराष्ट्रांतील बहुतेक घराण्यांची कुलस्वामिनी आहे. निंबाळकर, भोंसले, इ० प्राचीन क्षत्रिय घराणीं भवानीच्या उपासकांचीं आहेत. शिवाजीमहाराजांची प्रसिद्ध तलवार 'भवानी' या नांवानेंच प्रसिद्ध होती. समर्थांनीं शिवरायांस लिहिलेल्या एका पत्रांत 'विवेक विचार सावधपणें। दीर्घ प्रयत्न करणें। तुळजावराचेनि गुणें। रामें रावण मारिला ॥ ऐसी हे तुळजाभवानी। प्रसिद्ध

रामवरदायिनि' असें म्हटलें आहे. भवानीला तुकाई हें नांव केव्हां कसें पडलें याविषयीं समर्थांनीं भवानीच्या एका स्तोत्रांत एक गोष्ट दिली आहे. रामलक्ष्मण हे सीताशोधार्थ गिरिकंदरीं हिंडत असतांना ह्या आदिमायेनें 'परस्त्री नाणिती दृष्टी' ह्या त्यांच्या शीलाची परीक्षा पाहिली. रूपलावण्यवती अशा कुमारीचें रूप घेऊन बालचेष्टा करीत ती त्यांच्यापुढें अकस्मात् प्रगट झाली. तेव्हां त्यांनीं तिला ओळखलें—

**ते सूर्यवंशिंचे राजे । विख्यात भुवनत्रयीं ।**
**नेमस्त न्यायनीतीचे । करिती धर्मस्थापना ॥**
**येकांतीं देखिली त्यांनीं । देखिले त्या कुमारिनें ॥**
**'कैंची तूं कोण तूं काई ? । नाम तें कोणतें तुझें ?'**
**म्हणे 'रे मीच तूकाई । जा तुम्हां वर दीधला ।**
**मनाच्या कामना होती । सीताशुद्धि तुम्ही करा' ॥**

लक्ष्मणाला तुकाईने तेथें बसल्या जागींच लंका दाखविली तेव्हां त्यांचा तिच्यावर विश्वास बसला. तिला 'रामवरदायिनी' तेव्हांपासून म्हणतात. तीच तुळजापुरीं प्रगट आहे.

**प्रसन्नमूख सुंदरा । तुझेन हे वसुंधरा ॥**
**तुझेंचि नांवरूप हो । दिसे तुझें स्वरूप हो ॥**
**तुझेनि सर्व बोलणें । तुझेनि सर्व चालणें ॥**
**तुझेनि योगधारणें । तुझेनि राजकारणें ॥**

ही तुळजामाता आमच्या कुळाची स्वामिनी आहे असें मी बाळपणीं ऐकत होतों. आतां ती म्यां पाहिली—ओळखिली आहे. सर्वांचें मूळ म्हणून हिला मूळमाया म्हणतात. सृष्टीची ही आदिशक्ति, सर्व प्राणी हिच्यामुळें चालतात व वागतात म्हणून हिला आदिशक्ति म्हणतात. 'जगदात्मा जगदीश्वरी। परमात्मा परमेश्वरी' हीं सर्व हिचींच नांवें आहेत. ही सूक्ष्मांत सूक्ष्म व स्थूलांत स्थूल आहे. सर्व कांहीं हीच आहे. हिला जाणल्यामुळें 'तुटली सर्वही चिंता। निवालों अंतरीं सुखें.' ह्या

जगन्मातेनें माझ्या सर्व मनकामना पुरविल्या आहेत, 'प्रस्तुत प्रत्ययो आतां। रक्षिते बहुतांपरी.' ही प्रसन्न असली कीं 'अंतरीं स्फूर्तिरूपें प्रकाशते,' पण ही रागावली तर मात्र खरूज, नायटे, नानारोग, आधिव्याधि सर्व मागें लावते! ही मूळमाया जगज्ज्योति आहे. हिचें सामर्थ्य फार मोठें आहे.

**प्रसिद्ध तुळजामाता। श्रीरामवरदायिनी ॥**
**कुळासी पाळिलें मूळीं। आतां आम्हांसि पाळिते ॥**
**पूजितां तुळजामाता। तेणें सुखचि होतसे ॥**
**विध्युक्त होमहवनें। नवरात्र घटस्थापना ॥**
**रामदास म्हणे माझी। माता ही जगदीश्वरी ॥**
**ऐश्वर्य सर्व शक्तीचें। विवेकें प्रत्ययें पहा ॥**

समर्थ एकदां श्रेष्ठांचा नवस फेडण्याकरितां प्रतापगडीं गेले होते, तेव्हां त्यांनीं भगवतीची पूजा करून एक स्तोत्र रचिलें. त्यांत जगदंबेने अंगीकारल्यापासून आपलें सर्व प्रकारें कल्याण झालें आहे असे धन्यतेचे उद्गार त्यांनीं काढले आहेत. त्यांचा उल्लेख अन्यत्र येणार आहे. त्यांत त्यांनीं म्हटलें आहे कीं, "मी तुझ्या कृपेनें कृतकृत्य झालों आहें तेव्हां मला स्वत:साठीं कांहीं मागावयाचें उरलें नाहीं, पण —

**येकची मागणें आतां द्यावें तें मजकारणें।**
**तुझा तूं वाढवीं राजा शीघ्र आम्हांचिदेखतां ॥**

'शिवाजीराजाचें ऐश्वर्य वाढीव, त्याच्या राजाचा विस्तार आमच्या डोळ्यांदेखत होऊं दे' एवढें एकच मागणें तुझ्यापाशीं मी मागत आहें!" शिवाजीमहाराजांवर समर्थांचें किती अकृत्रिम प्रेम होतें हें या एकाच गोष्टीवरून सिद्ध होत आहे. ह्या स्तोत्रांतून समर्थांचें राज्यतंत्र काय होतें याचाही उलगडा होत आहे.

समर्थ म्हणतात —

**२ रामवरदायिनी शक्ति**

**दुःखदारिद्र्यउद्वेगें । लोक सर्वत्र पींडिले ॥**
**मुळींची कुळदेव्या हे । संकटीं रक्षिते बळें ॥**
**उन्मत्त रावणें येणें । त्रैलोक्य पीडिलें बळें ॥**
**देव ते घातले बंदी । कैपक्षी राम पावला ॥**

उन्मत्त रावणानें देव बंदी घातले व त्याच्या त्रासामुळें लोक दारिद्र्य-दुःखानें विविध प्रकारांनीं गांजले तेव्हां लोकांचा कैवारी राम पावला. तसाच प्रसंग आतां आहे !

**विश्वाची साक्षिणी माता । विश्वमाता म्हणोनियां ॥**
**श्रीमंत करंटे केले । रक्षिले पाळिले किती ॥**
**दुष्ट संहारिले मागें । ऐसें उदंड ऐकतों ॥**
**परंतु रोकडें कांहीं । मूळ सामर्थ्य दाखवीं ! ॥**

भवानीमातेनें आपले मूळ सामर्थ्य दाखविलें व शिवाजीराजांचा अवतार झाला ! '**राम**' वरदायिनी तीच '**शिव**' वरदायिनी झाली ! "हीच तुळजापूरची भवानीमाता प्रतापगडावर प्रगटली आहे. ही आमची कुळदेवता आहे. हिनेंच आमचे कुळ पाळिले, आमचे बहुतापरी रक्षण केलें. 'ही वैष्णवी माया । तारिते मारिते जनीं.' ही भक्तांना तारिते व दुष्टांना मारिते. ही आदिशक्ति आहे. ही आपल्या भक्तांना शक्तिबळ देते. शक्तिबळानें युक्तिबळ वाढतें व शक्तियुक्ति जेथें एकवटतात तेथें नारायणाचा आविष्कार होतो. शक्तीवांचून संसार धड होत नाहीं, मग राजकारण कोठचें ?

**शक्तीनें पावती सुखें । शक्ति नस्तां विटंबना ॥**
**शक्तीनें नेटका प्राणी । वैभवें भोगतां दिसे ॥**
**कोण पुसे अशक्ताला । रोगीसें बराडी दिसे ॥**
**शक्ति तों सर्वहि सुखें । शक्ति आनंद भोगवी ॥**
**सार संसार शक्तीनें । शक्तीनें शक्ति भोगिजे ॥**
**शक्ति तो सर्वही भोगी । शक्तीवीण दरिद्रता ॥**

**शक्तीनें मिळती राज्यें । युक्तीन यत्न होतसे ॥**
**शक्ति युक्ति जये ठायीं । तेथें श्रीमंत धांवती ॥**

योगेश्वर कृष्ण व धनुर्धर पार्थ जेथें आहेत तेथें श्री, विजय, ऐश्वर्य, नीति सर्व कांहीं आहे ह्या गीतातत्त्वाचा शेवटच्या वचनांत अनुवाद केलेला आहे. शक्तीचें वैभव येथें समर्थांनीं आपल्या तेजस्वी वाणीनें उत्कृष्ट वर्णिलें आहे. शक्ति म्ह० शरीरबळ व युक्ति म्ह० योगबळ, बुद्धिबळ. दोन्ही जेथें आहेत तेथेंच यशाची प्राप्ति आहे. शक्ति व युक्ति जेथें नांदतात तेथेंच प्रयत्न सुफलित होतात. ' अचूक चुकेना कोठें । त्याचीं राज्यें समस्तहीं ' शक्तियुक्तिबळानें अचूक प्रयत्न ज्याला करितां येतात त्याच्या हातीं पृथ्वीचें राज्य येईल.

नामर्द ' सदा दुश्चित लालची ' असतो पण ' उदंड खस्तिचीं कामें । मर्द मारूनि जातसे ' हें प्रत्यक्षच आहे. कुटिल व फितवेखोर यांचा सुळसुळाट जेथें होतो व त्यांचा बंदोबस्त करण्याची खबरदारी जेथें घेतली जात नाहीं, ज्यावर प्रजा संतुष्ट नाहीं, त्या ' मूर्खाचें राज्य राहेना ' असें राजकारणाचें तत्त्व समर्थांनीं पुढील २।४ श्लोकांत फार बहारीनें सांगितले आहे —

**लोकांसी राखणें राजी । तें राज्य प्रबळे बळें ॥**
**नेटकें कार्य साधावें । रोधावें कुटिळा जनां ॥**

युक्तीवीण कार्यभाग होत नाहीं पण युक्तीला शक्ति पाहिजे. ' तस्मात् शक्ती प्रमाण ही.' याला दृष्टान्त रामाचाच. रामानें काय केलें ?

**मुक्त केल्या देवकोटी । सर्वही शक्तिच्या बळें ॥**
**समर्थ भवानीमाता । समर्था वरु दीधला ॥**

शरीरशक्तीला युक्तिबळ पाहिजे व दोन्हीला अध्यात्माचें, आदिशक्तीच्या उपासनेचें, बळ पाहिजे हें समर्थांना येथें सांगावयाचें आहे. पहिलें हरिभजन व दुसरें राजकारण; चळवळींना सामर्थ्य येतें पण तें भगवंताचें अधिष्ठान असल्यानें निःसंदेह येतें हा समर्थांचा सिद्धान्त आहे.

## ३ खबरदार राजा

राजा खबरदार, विवेकी, सर्वसाक्षपी, सर्वांना राजी राखणारा, सर्वांची चिंता वाहणारा असला, कीं त्याला व त्याच्या प्रजेला बहुत सुख होतें. त्याचे मोठमोठे अंमलदार यांवरही त्याचा वचक पाहिजे.

**पोरांला माय जाणेना । ते पोरें वांचती कशीं ? ॥**
**गुराखा राखितो पोरें । धणी दोहींस पाळितो ॥**

येथें पोरे व गुरें म्ह० प्रजा, गुराखी म्ह० राजाचे कारभारी व माय व धणी म्ह० राजा ! राजानें नुस्तें कारभाऱ्यांवर लक्ष ठेवून भागायचें नाहीं, ते प्रजेस त्रास देत नाहींत हेंही त्यानें पाहिलें पाहिजे. त्याचें लक्ष दोघांवर पाहिजे, त्यानें दोघांचें पालन केले पाहिजे ! अंमलदार वेळेला प्रजापीडकही असतात —

**धणी तो राहिला मागें । कारबारीच नासती ॥**
**पाप हें थोर लोकांचें । सांगावें कवणापुढें ? ॥**

प्रभु जाणता नसला; स्वबुद्धीनें चालणारा नसला; परीक्षक नसला; हिशेबठिशेब बारकाईनें पाहणारा नसला; लांचलुचपत, चोरी, घालमेली यांजकडे बारीक नजर ठेवणारा नसला म्हणजे तें राज्य नव्हे, ती बेदादनगरीच !

**लोकांचे गोष्टीनें वर्ते । प्रत्यये पाहिल्याविणें ॥**
**आळसें चाळणा नाहीं । स्वता बुद्धि असेचिना ।**
**मोठें तें पाप लोकांचें । प्रभु तो जाणता नव्हे ॥**
**वर्ततो शिकविल्या बोलें । तो काय म्हैसमंगळू ॥**

*　　*　　*　　*

**शक्तीवीण कोण आहे । हें तों विचारून पाहें ।**
**शक्तीविरहित न राहे । येश कीर्ति प्रताप ॥ १ ॥**
**शिवशक्तीचा विचारु । अर्धनारीनटेश्वरु ।**
**दास म्हणे हा विचारु । तत्त्वज्ञानी जाणती ॥ २ ॥**



# ५ रात्र संपली, प्रभात झाली !



आनंदकंदा ! प्रभात झाली, उठ सरली राती ॥
रविप्रभा पडुनियां उजळल्या शुद्ध दिशा दाही ॥

होनाजीबाळा

१ पूर्वावलोकन. २ परंपरेचा ओघ. ३ वारकरी आणि रामदासी संप्रदाय. ४ संतांची कामगिरी. ५ लोकसंग्रह. ६ अस्मानी सुलतानी. ७ अंतर्मुख होऊन आपले दोष पाहावेत. ८ दुष्काळ पडला भावार्थाचा. ९ ब्राह्मणांची थोरवी व ऱ्हास. १० महाराष्ट्रानें पुढें झालें पाहिजे. ११ निर्लोभ व निर्दंभ कार्यकर्ता. १२ लोकहिताची कळकळ. १३ धीर धरा व यत्न करा. १४ आत्मविश्वास हें पहिलें उदयचिन्ह. १५ मुक्तेश्वराचें स्वराज्याचें स्वप्न. १६ हिंदु राजाचा आदर्श. १७ रोमन प्रवाश्यानें पाहिलेला त्या वेळचा हिंदु समाज. १८ तालमी व कुस्त्या. १९ डोहळे ! २० शिसोदे यांचा वंश. २१ मालोजी राजे व शहाजी राजे. २२ शहाजी राजे व समर्थ. २३ समर्थकालीन एक अज्ञात मराठी राज्य.

## १ पूर्वावलोकन

आमच्या 'मराठी वाङ्मयाच्या इतिहासा'च्या दुसऱ्या खंडांतील 'मुसलमानी राजसत्ता व तिचे दुष्परिणाम' हें दुसरें प्रकरण व 'देशाची सामाजिक व धार्मिक दुरवस्था' हें सहावें प्रकरण हीं दोन प्रकरणें वाचकांनीं येथें वाचून पूर्ण ध्यानांत आणावीं म्हणजे पुढील प्रकरणांचे धागेदोरे त्यांच्या लक्षांत येतील. दुसऱ्या प्रकरणांत महमदपैगंबराचा धर्म, महमदीयांचा जगज्जय, हिंदुस्थानावर मुसलमानांच्या टोळधाडी, त्यांचा प्रतिकार, जाधवांच्या राज्याचा शेवट, विजयानगरचें साम्राज्य, बहामनी-शाही, विजापूरची आदिलशाही, नगरची निजामशाही, गोवळकोंड्याची कुतुबशाही, याप्रमाणें मुसलमानांच्या महाराष्ट्रांतील राजसत्तेचा संपूर्ण

इतिहास दिला असून मुसलमानी राजसत्तेचे दुष्परिणाम सविस्तर वर्णन केले आहेत. बेदरच्या पाच्छाईत कान्हूपात्रा, दामाजी, भानुदास व मृत्युंजय इ० भक्तांनीं हिंदु संस्कृतीचें कसें संरक्षण केलें हें त्यापुढील म्हणजे ३ ऱ्या प्रकरणांत सांगितलें आहे. ४ थ्या प्रकरणांत श्रीगुरु नृसिंहसरस्वतींनीं दत्तसंप्रदाय महाराष्ट्रांत रूढ करून केवढी धर्मसेवा व राष्ट्रसेवा केली याचें वर्णन केले आहे. सहाव्या प्रकरणांत 'देशाची सामाजिक व धार्मिक दुरवस्था' विस्तृतपणाने तत्कालीन संतकवींच्या व इतिहासाच्या आधारें वर्णिली आहे. ब्राह्मणांनीं आचार व क्षत्रियांनीं विचार सोडल्यामुळें लोकांची दैन्यदारिद्र्यानें दुर्दशा झाली, वर्णधर्मी आणि वर्णबाह्य यांचे झगडे चालू झाले, ब्राह्मणांचा तेजोभंग होऊन ते कर्मभ्रष्ट झाले व ब्राह्मण-क्षत्रियादि उच्चवर्ण यवनांच्या सेवेंत राबूं लागले, सोंगेढोंगें व बुवाबाजी यांना ऊत आला, अभाविक म्ह० नास्तिक आणि तर्कटी यांचा सुळसुळाट झाला असून देवाधर्माविषयीं अनास्था व हेळणाबुद्धि वाढली, खऱ्या अध्यात्मविद्येचा लोप होऊन भावार्थाचा दुष्काळ पडला, वर्णाश्रम-धर्मरक्षणासाठीं नाथ-तुकोबादि महापुरुषांनीं भागवतधर्माचा प्रसार करून धर्म, संस्कृति व वाङ्मय यांची यवनांच्या ऐन अमदानींत जोपासना केली, ह्या सर्व मुद्दयांचें विवेचन मी ह्या सहाव्या प्रकरणांत केलें असून त्याच खंडाच्या पुढील भागांत एकनाथांचें चरित्र, वाङ्मय व कामगिरी यांविषयीं ३५० पृष्ठांत ऊहापोह केला आहे व तुकोबाराय व इतर ३०।४० संतकवींनीं महाराष्ट्रभर धर्मजागृतीच्या केलेल्या कार्याचा आढावा घेतला आहे. वाचकांनीं दुसरा खंड, निदान त्यांतील २ रें व ६ वें प्रकरण तरी अगोदर वाचावें म्हणजे त्याच ओघांत पुढील कथाभाग कसा सुसंगतरीतीनें जमून जातो हें त्यांस समजून येईल. मागें पहात पुढें चालावें. सिंहावलोकनानें मागचा-पुढचा संबंध चांगला लक्षांत येतो व समजुतींत एकांगीपण राहत नाहीं. व्यापकदृष्टीनें सारा इतिहास यथार्थ समजतो.

## २ परंपरेचा ओघ

वेद सर्वांचें मूळ आहे. हिंदुधर्म वेदशास्त्रपुराणात्मक आहे. सकल ऋषिमुनि व संतविभूति ह्या वेदमहासागरावरच्या लाटा आहेत. महाराष्ट्रापुरतें बोलायचें म्हणजे **ज्ञानेश्वर** ही पहिली मोठी लाट उसळली. प्रत्येक मोठी लाट दुसऱ्या लहानमोठ्या लाटा मिळून किंवा त्यांना पोटांत घेऊनच उठत असते. मुकुंदराज, नामदेव, जनाबाई, चोखामेळा इ० ज्ञानेश्वरसमकालीन लाटा या मोठ्या लाटेच्या पोटांत येतात. ह्या लाटेनंतर दुसरी मोठी लाट उसळली ती दत्तसंप्रदायाचे प्रवर्तक **नृसिंहसरस्वति** ही होय. दासोपंतादि अनेक सत्कवि ह्या लाटेंतच येतात. ज्ञानेश्वरांचा भागवतधर्म व नृसिंहसरस्वतींची दत्तोपासना यांना आपल्या पोटांत घेऊन सर्व प्रदेश आक्रमण करणारी तिसरी प्रचंड लाट उठली ती **एकनाथ**रूपानें प्रगट झाली. ह्यानंतरची मोठी व सर्वभर पसरणारी लाट म्हणजे **तुकारामा**ची होय. त्यानंतरची पांचवी विश्वव्यापी लाट म्हणजे **रामदास** ही होय. सर्व लाटांत एकच धर्मप्रेमाचें व लोकोद्धारक बुद्धीचे निर्मळ पाणी भरले आहे. दोन मोठ्या लाटांमध्यें इतर अनेक लाटा सामावल्या जातात किंबहुना त्यांच्याच बळावर ही मोठी लाट मोठेपणानें उठावून दिसते. मागच्यांच्या आधारावर ती मोठेपणा पावते. नवीन कांहींच होत नाहीं. कोणतीच लाट स्वयंभू, अगदीं स्वतंत्र, अशी नाहीं. समुद्रकिनाऱ्यावर भरतीच्या वेळीं जाऊन भरतीची मौज पाहत आपण क्षणभर उभे राहिलों तर आपणांस काय दिसतें ? जी एक प्रचंड लाट आपल्यापुढें दिसते तिच्या पाठीमागें अनेक लहानमोठ्या लाटा उसळत असतात. त्या सर्व एकमेकींस मागेंपुढें रेंटीत असतात. लाटांमागें लाटा, लाटांमागें लाटा, असा भरतीचा रम्य देखावा दिसून महासागराचें गांभीर्य व सौंदर्य प्रतीतीला येतें. मराठी वाङ्मयाचा ८०० वर्षांचा इतिहास पाहिला म्हणजे त्यांतही हेंच दृश्य दिसून येतें. **रामदासां**ची कामगिरी व वाङ्मयसंपत्ति ही अशीच मागच्या संत-परंपरेंतून उद्भूत झाली

आहे. ज्ञानेश्वरीचे संस्कार एकनाथी भागवतांत, दोहोंचे संस्कार तुकोबांच्या अभंगवाणींत व मुकुंदराज, ज्ञानेश्वर, नाथ, दासोपंत, तुकोबाराय यांच्या चरित्राचे, वाङ्मयाचे व कामगिरीचे संस्कार समर्थांच्या चरित्रांत व वाङ्मयांत स्पष्टपणें दृग्गोचर होतात. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम यांना वारकरी संप्रदायाचे प्रवर्तक म्हणतात व रामदासांना रामदासी संप्रदायाचे प्रवर्तक समजतात; पण सारे एका भागवतधर्मपरंपरेंतच येतात.

## ३ वारकरी आणि रामदासी संप्रदाय

दोन्ही संप्रदायांनीं उपनिषदें, गीता व भागवत यांतील ज्ञानभक्तीचा उपदेश लोकांस केला असल्यामुळें त्यांत पूर्ण एकात्मता आहे. दोन्ही संप्रदाय पूर्ण वैदिक आहेत. दोघांनाही वेदशास्त्रपुराणें मान्य आहेत. दोघांनाही देव निर्गुण आहे, सगुण आहे व सगुणोपासनेच्या द्वारेंच निर्गुणपद हातीं येतें हें पूर्ण संमत आहे. दोनही संप्रदाय अद्वैत सिद्धान्त पूर्ण संमत असलेले पण तत्सिद्ध्यर्थ उपासनेवर भर देणारे आहेत. दोघांनाही वर्णाश्रमधर्माचरण हें वैदिक धर्माचें प्रधान अंग आहे हें मान्य आहे. देवमूर्तींची पूजा करणारे दोघेही आहेत. धर्माच्या नांवावर खपणाऱ्या ढोंगधत्तुऱ्यांचा, दांभिकपणाचा, पाखांडमताचा, धर्महीनतेचा दोन्ही संप्रदायांनीं तिखट शब्दांनीं निषेध केला आहे, आणि धर्म व नीतिन्याय यांचा उपदेश केला आहे. लोकसंग्रहार्थ झटण्याचा दोन्ही संप्रदायांचा बाणा आहे. प्रपंच करून परमार्थ साधा अशी दोघांची शिकवण आहे. ईश्वरप्राप्तीच्या साधनांत नामसंकीर्तन हें परम श्रेष्ठ साधन आहे असा दोन्ही संप्रदायांचा आचार व उपदेश आहे. हरिहरांची एकरूपता आणि एकादशी व महाशिवरात्र ह्या व्रतांचें परिपालन दोन्ही संप्रदायांत आहे. ह्याप्रमाणें दोन्ही संप्रदायांची मनस्वी एकरूपता आहे. याविषयीं शेकडों हजारों प्रमाणें देतां येतील; पण ग्रंथविस्तारभयास्तव तीं येथें देत नाहीं, व शिवाय

माझ्या ग्रंथांतून तीं मी अनेकवार दिलीं असल्यामुळें पुनरुक्तिदोषाचाही धणी होऊं इच्छीत नाहीं.

दोन्ही संप्रदाय ह्याप्रमाणें भागवतधर्माचे व एकस्वरूप असूनही कांहीं अभिमानी लोकांना त्यांत विरोध दिसतो व एक दुसऱ्यापेक्षां श्रेष्ठ आहे असें प्रतिपादण्यांतच त्यांना समाधान वाटनें याचें नवल वाटतें ! जे कोणत्याही संप्रदायांत नाहींत व ज्यांनीं एकाही संप्रदायाचे ग्रंथ धडपणें व अभ्यास-पूर्वक वाचले नाहींत, पण धडाकून मतें ठोकून देण्यांत पटाईत आहेत त्यांच्याबद्दल 'ब्रह्मापिच तं नरं न रंजयति' एवढेंच म्हणणें पुरे ! पण जे कोणत्या तरी संप्रदायांत असून ज्यांना उपासनेविषयीं कांहीं प्रेम आहे व जे कांहीं वाचले पढले आहेत त्यांच्या दुराग्रहाला काय नांव द्यावें ? दुराग्रही लोक अडाणी वारकऱ्यांत आहेत व अर्वाचीन काळच्या सुशिक्षित रामदासा-भिमान्यांतही आहेत ! रामदासस्वामींनीं राजगुरुत्व पत्करलें म्हणून वारकरी लोक त्यांच्या गोष्टी अगर त्यांचीं वचनें आपल्या कीर्तनांत काढूं देत नाहींत. ' निवृत्ति ज्ञानदेव सोपान मुक्ताबाई । एकनाथ नामदेव तुकाराम ' हे सात व आठवे निळोबा यांच्याशिवाय कोणाच्याही अभंगावर खरें वारकरी कीर्तन व्हायचेंच नाहीं व यांनीं मान्य केलेल्या संतांशिवाय कोणाचेंही वचन त्यांच्या कीर्तनांत निघायचें नाहीं असा वारकऱ्यांचा एक अलिखित कायदा आहे ! त्यांच्या कथेंत रामदास, वामन, मोरोपंत, वगैरेंचे श्लोक, आर्या, पदें यांपैकीं कांहींच निघायचें नाहीं. ज्ञानेश्वर, नामदेव, नाथ, तुकोबा, निळोबा हे पंढरीचे नेमनिष्ठ वारकरी व विठ्ठलाचे उपासक असल्यामुळें त्यांच्यावर व त्यांच्या वचनांवर वारकऱ्यांची जी निष्ठा आहे ती पंढरीची वारी नियमानें न करणाऱ्या व क्वचित् प्रसंगीं पंढरीस जाणाऱ्या संतांवर नसली तर त्यांत वारकऱ्यांना मोठासा दोष देतां येईल असे मला वाटत नाहीं ! समर्थांची योग्यता त्यांना माहीत नाहीं असें नाहीं, पण त्यांचें राजकारण व राजगुरुत्व यांविषयीं त्यांच्यांत कांहीं गैरसमज पूर्वापार चालत आले आहेत,

तथापि त्यांचें निराकरण हळूहळू होत चाललें आहे. हे वारकरी तर बोलून चालून अडाणी पण सुजाण व सुशिक्षित अशा रामदासांच्या कित्येक अभिमान्यांनीं गेल्या ३०–४० वर्षांत वारकरी संतांविषयीं जे कांहीं आक्षेप व दुराग्रह पिकविले आहेत त्यांचें निराकरण झालेंच पाहिजे. रामदास आणि शिवछत्रपति यांच्याविषयीं कांहीं अत्यंत महत्त्वाचे लेख राजवाडे यांनीं प्रसिद्ध केले आहेत, पण त्यांनींच हें दुराग्रहाचें रोपडें महाराष्ट्रांत प्रथम लावलें व ७।८ वर्षांतनंतर त्यांनीं जरी त्याची थोडीशी छाटणी केली तरी दुसऱ्या बाजूनें त्याला कांहीं फांद्या फुटल्या आहेत ! देशभक्तांच्या एका संप्रदायांत वारकरी संतांविषयीं उगाच अनादर उत्पन्न झाला आहे. काळकर्ते परांजपे यांनीं मागें 'विठोबा हा गुलामांचा देव आहे' असा उपहासात्मक लेख लिहिला होता. रामदासी संप्रदाय हा नेभळट, पंगु व राष्ट्रकार्यास निरुपयोगी ( वारकरी संप्रदायासारखा ) नसून राजकारण, देशकारण करणारा म्हणून श्रेष्ठ आहे; त्याचीं उपास्य दैवतें राम व मारुति अशीं ओजस्वी आहेत; राम हा दैत्यांचा नाश करून देवांना बंदींतून सोडविणारा अतएव स्वतंत्रतेचा पुरस्कर्ता आहे; वारकऱ्यांच्या केवळ भजनी संप्रदायाहून रामदासी संप्रदाय वेगळा आहे; महाराष्ट्रधर्माचे आदिसंस्थापक रामदास हेच आहेत व महाराष्ट्रधर्माचा आद्यग्रंथ दासबोध हाच आहे इत्यादि एकान्तिक मतें या राजवाडे, देवप्रभृति अभिनवरामदासाभिमानी लोकांनीं आपल्या लेखांत व भाषणांत अट्टाहासानें पुढें मांडून निष्कारण दुही माजविली आहे ! ज्ञानेश्वर व नाथतुकाराम हे काय महाराष्ट्रधर्माचे संस्थापक नाहींत ? ज्ञानेश्वरी व नाथभागवत हे काय महाराष्ट्रधर्माचे महाग्रंथ नाहींत ? यांना वगळून महाराष्ट्र-धर्म तो काय राहिला ? महाराष्ट्रधर्म हा शब्दप्रयोग गुरुचरित्रादि पूर्वींच्या ग्रंथांत आला आहे, हा शब्द कांहीं रामदासांनीं नवीन बनविला नाहीं. महाराष्ट्रधर्म म्हणजे महाराष्ट्रांतील लोकांचा वेदविहित स्वधर्म. हा कांहीं नवा स्वतंत्र धर्म नाहीं. रामदासांचें विशिष्ट कार्य व विशिष्ट प्रकारची कर्तबगारी

हीं आम्हांला सर्वस्वी मान्य आहेत, पण म्हणून आम्ही त्यांना ज्ञानेश्वर-नाथतुकोबादि भागवतधर्मीयांपासून तोडायला, अगदीं वेगळे लेखायला, तयार नाहीं. हे सर्वच संत देवाचे निरोपी आहेत, परमात्मा त्यांना विशिष्ट कार्यापुरता निर्माण करीत असतो. त्यांच्या त्यांच्या परिस्थितींत ते ते आपलें कार्य चोख बजावीत असतात. पूर्ण पुरुषांना अशक्य काय आहे? नाथतुकोबांनींही शिवराजाला समर्थांनीं केला असाच उपदेश केला नसता काय? तुकोबांनीं तर थोड्याच वेळांत केलाही. नातू आजोबांच्या खांद्यावर उभा राहिला म्हणजे त्याला अधिक दूरचा प्रदेश दिसतो म्हणून तो काय आजोबांपेक्षां दूरदर्शी व श्रेष्ठ झाला? बाजीरावराघोबांनीं मराठ्यांचा भगवा झेंडा दिल्लीअटकेपर्यंत नेला म्हणून ते काय शिवाजी-महाराजांपेक्षां श्रेष्ठ ठरतात? शिवराय झाले नसते तर कोठचे बाजीरावराघोबा? तसे ज्ञानेश्वरनाथतुकोबांनीं धर्मस्थापना केली नसती तर समर्थांचें कार्य कोठें विस्तारलें असतें? समर्थांनीं जें कार्य रामाच्या आज्ञेनें केलें तें अत्यंत पवित्र व राष्ट्रक्षेमकर झालें यांत संशय नाहीं. ज्ञानेश्वरनाथतुकोबांच्या कार्याविषयीं मी आपल्या पहिल्या दोन खंडांत विस्तृत विवेचन केलें आहे. प्रस्तुत खंड समर्थांना वाहिला आहे. बापाची कर्तबगारी आज आमच्या डोळ्यांत भरत असली तरी आजापणजांविषयीं अनादर-बुद्धि बाळगणें किंवा त्यांची हेटाळणी करणें किंवा केलेली सहन करणें हा कुळवंतांचा धर्म नाहीं. हे सर्वच आमचे वडील आहेत व त्यांनीं सांगितलेला धर्म तोच आमचा सामान्यांचा धर्म. समर्थांना पांढरपेशा वर्गाचीं, विशेषतः ब्राह्मणवर्गाचीं तरुण होतकरू मुलें हाताशीं घेऊन त्यांना कार्यकर्ते बनवायचे होतें. तें काम त्यांनीं उत्कृष्टतेनें केलें आहे. ज्ञानेश्वर, नाथ, तुकोबा, निवृत्ति-नाथ, मुक्ताबाई यांच्या पुण्यतिथीला आजकालही लाख दोन लाख यात्रा दरसाल जमते. पैठणच्या षष्ठीला २॥ लाख यात्रा जमलेली आम्ही पाहिली आहे. नाथांनीं तळापासून वरपर्यंतच्या लोकांत धर्माचें प्रचंड कार्य केलें

आहे. आम्ही सज्जनगडावरही ४।५ वेळ गेलों होतों. अलीकडे चौंडेबुवांच्या खटपटीमुळें सज्जनगडावर जेमतेम १०।५ हजार यात्रा जमूं लागली आहे. यात्रेकरूंच्या संख्येवरून महापुरुषांची योग्यता ठरवायची नाहीं हें खरें, तथापि केवढ्या मोठ्या समुदायावर त्यांची छाप पांचपांचशें वर्षें पडली आहे याचें तें गमकही आहे. समर्थांनीं जें राजकारण केलें तें त्यांच्याबरोबरच संपलें ! त्यांच्या पश्चात् त्यांच्या वळणाचा कोणीही पुरुष त्यांच्या संप्रदायांत झाला नाहीं. त्यांनीं राजकारण, व्यवहार, नीतिशास्त्र, समाजशास्त्र व तत्त्वज्ञान यांसंबंधाचे अप्रतिम व शाश्वतसिद्धान्त दासबोधादि ग्रंथांत सांगितले आहेत; पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, रामदासी संप्रदाय म्हणजे रामदासच ! पंढरीच्या संप्रदायाचा अध्यक्ष पांडुरंग हा कायम आहे. धर्मांत किंवा परमार्थांत व्यवहार गोवणें युक्त आहे कीं नाहीं हा स्वतंत्र प्रश्न आहे ! आज समर्थांच्या तत्त्वज्ञानाचा व राजकारणाचा तरुण कार्यकर्त्यांनीं अभ्यास केला पाहिजे हें मात्र खरे आहे.

## ४ संतांची कामगिरी

ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम व रामदास ह्या चारही महाराष्ट्रीय महापुरुषांच्या तत्त्वज्ञानांत, आत्मबोधांत, ज्ञानोत्तरभक्तींत व लोकसंग्राहकबुद्धींत अगदीं एकपणा आहे. बिलकुल भेद नाहीं. ज्ञानेश्वरांच्या वेळीं ( शके ११९५–१२१९ ) जाधवांचे राज्य होतें म्हणजे पूर्ण स्वराज्य होतें. परधर्मीय परराज्याचा ताप महाराष्ट्रापर्यंत पोंचला नव्हता. मुसलमानी सत्तेच्या प्रखर अमलांत नृसिंहसरस्वती व एकनाथ यांनीं आपल्या संस्कृतीचें, धर्माचें व वाङ्मयाचें आपल्या प्रदीर्घ तपस्येच्या बळावर उत्कृष्ट संरक्षण व संवर्धन केलें. नाथांची कामगिरी ( शके १४५०–१५२० ) अपूर्व झाली. स्वराज्याच्या अरुणोदयकालीं तुकोबारायांचा अवतार झाला ( १५३०–१५७२ ). लोकांचे क्लेश पाहवत नाहींत असें म्हणत

असतांनाच त्यांना स्वराज्याचें तोरण बांधणारा शिवराय डोळ्यांसमोर दिसला, पण त्याच्या स्वराज्याचा महोदय पाहण्यापूर्वीच त्यांनीं वैकुंठगमन केलें; महाराष्ट्राच्या भाग्यानें त्याच वेळीं समर्थ रामदासस्वामींचें अवतारकार्य लोकांपुढें आलें. तुकोबा व समर्थ या दोघांचा जन्म शके १५३० ह्या एकाच वर्षी झाला, पण तुकोबा वैराग्यज्ञानभक्तीचा पाऊस पाडून १५७२ मध्यें अदृश्य झाले व त्यांच्यानंतर समर्थांची मूर्ति महाराष्ट्राच्या डोळ्यांसमोर आपल्या तपस्तेजानें झळकूं लागली. समर्थांची जन्मभूमी गोदातीरीं जांब, त्यांची तपोभूमि नाशिक पंचवटी व कर्मभूमि महाराष्ट्र किंबहुना संपूर्ण भरतखंड. नृसिंहसरस्वतींच्या चरित्रांत संन्यासाश्रमाचा उत्कर्ष दिसतो तर नाथांच्या चरित्रांत गृहस्थधर्माचा उत्कर्ष दिसतो. नृसिंहसरस्वतींचा संन्यास, नाथांचा गृहस्थाश्रम व समर्थांचें ब्रह्मचर्य एकच. यावरून असें दिसतें कीं, कोणत्याही आश्रमांतल्या विभूतीला लोककार्य सारख्याच निरपेक्षतेनें, तेजस्वीपणानें व पूर्णत्वाने करितां येतें. कोणताही आश्रम लोककार्याच्या आड येत नाहीं. त्याग, संयम व तप यांचें बळ मात्र भरपूर पाहिजे, व उपासनेचें उत्कट पुण्य पाहिजे. एकनाथांनीं आपल्या भागवतांत यवनांच्या राज्याचें वर्णन—

**गाईब्राह्मणांसी जाण । पीडा करिती दारुण ।**
**क्षेत्रवित्तदाराहरण । स्वार्थें प्राण घेताती ॥**

ह्या एका पूर्ण ओवींतच केलें आहे. स्वराज्याची भूक महाराष्ट्राला लागली होती. परराज्याचा अंत होऊन स्वराज्य, स्वधर्म व स्वभाषा यांचा महाराष्ट्रांत जयजयकार व्हावा असें सर्वच संतांना, कवींना व सामान्यजनांना वाटत होतें. महाराष्ट्रानें या कार्यांत पुढाकार घेतला पाहिजे असें नाथांचा नातू मुक्तेश्वर यानें—

**महाराष्ट्र जे सर्व राष्ट्रांसि राजे ।**
**जयाच्या भयें व्यापिले देव लाजे ॥**

असें स्पष्ट म्हटले आहे. मुक्तेश्वरी भारताची तेजस्विता, त्यांतील वीररसाचा उठाव, व कुस्त्या व आखाडे यांचीं वर्णनें पाहतां समर्थांच्या बाळपणींच महाराष्ट्रमहासागराच्या पोटांत स्वराज्यतळमळीचा वडवानळ कसा पेटला होता याची कल्पना करितां येते. अगदीं अशा वेळीं समर्थ व शिवराय ही **ब्राह्मक्षात्रतेजाची जोडी** महाराष्ट्राच्या क्षितिजावर अवतीर्ण झाली व यांनीं महाराष्ट्राचें '**आनंदवनभुवन**' केले व पाहिलें. ब्राह्मण-तेजाचा आदर्श समर्थ व क्षात्रतेजाचा अद्भुत पुतळा शिवछत्रपति यांनीं 'मराठा तितुका मेळवावा। आपुला महाराष्ट्रधर्म वाढवावा' हें कार्य संगन-मतानें व सहकार्यानें केलें. '**पवनाग्निसमागमो ह्ययं सहितं ब्रह्म यदस्त्रतेजसा**'–'**दुरासदं च तत्तेजो क्षात्रं च ब्रह्मसंयुतम्**'–ब्राह्मतेज व क्षात्रतेज एकवटून परराज्याला दुर्धर्ष झालें. ज्या ज्या मनुष्यांत जो जो श्रेष्ठ गुण आढळला तो तो घेऊन जातपात न पाहतां त्यांनीं राष्ट्र एकजूट बनविलें, व पावशतकांत स्वराज्य मिळवून दाखविलें. धर्मस्थापना हेंच एक ध्येय डोळ्यांपुढें ठेवून सर्वजण वागले म्हणून महाराष्ट्राचा भाग्योदय झाला. धर्मरक्षणासाठीं नाथ, तुकोबा, समर्थ व शिवराय यांनीं आपल्या आयुष्याचा प्रत्येक क्षण खर्च केला. धर्मरक्षणाच्या पोटांत स्वराज्यरक्षण सहजच झाले होतें. हिंदुमात्राला स्वधर्म हा सर्वांत अधिक प्रिय आहे. 'धर्माकरितां मरावें, फुकट मरूं नये,' अशी समर्थांची शिकवण आहे. महाराष्ट्राचा धर्म, संस्कृति, विद्या, मराठी भाषा यांच्या उत्कर्षार्थ सर्व संत निरपेक्षपणानें झटले म्हणून शिवरायाला धर्मराज्य स्थापन करणें सुलभ झालें.

ज्ञानेश्वरादि संतांनीं सकलजनमन आपल्या मधुर मुरलिरवानें आपणा-कडे वेधून घेणाऱ्या, लोकपीडक कंसाच्या राज्याचा अंत करणाऱ्या **कृष्णाकडे** लावलें, तर समर्थांनीं सकल देवांना बंदींत टाकून अकंटक राज्य करणाऱ्या रावणाचें राज्य बुडविणाऱ्या **रामाकडे** लोकांचें लक्ष वेधलें व त्यांना **रामराज्याची** तळमळ लावली. रामकृष्णांची उपासना ही

महाराष्ट्राची उपासना आहे. दोन्ही उपासनांत मारुतिरायांचें अधिष्ठान आहे. ' शूर आणि धीर । स्वामीकाजीं तूं सादर ' अशा मारुतिरायाला ' काय भक्तीच्या त्या वाटा । मज दावाव्या सुभटा ' याप्रमाणें तुकोबांनीं जयिष्णुभक्तीचा मार्ग पुसला आहे! मारुतिराय म्हणजे **' शक्ति, युक्ति व भक्ति '** ह्या तीन प्रबलतम शक्तींची एकात्मता. मारुतिराय विठोबापुढें तसेंच रामापुढें हात जोडून त्याची आज्ञा विचारीत आहेत. देवापुढचा ' दासमारुति '—दानवांपुढें ' वीर मारुति ' म्हणून उभा आहे! मारुतिराय ही वारकऱ्यांची तशीच रामदासीयांची देवता आहे, व रामकृष्ण हे महाविष्णूचे अवतार एकाच कार्यासाठीं म्हणजेच धर्मसंस्थापनेसाठीं झाले आहेत हें लक्षांत ठेविलें म्हणजे वारकरी व रामदासी यांच्यांत भेदच उरत नाहीं. तुकोबांनीं दयेचें लक्षण—दया तिचें नांव भूतांचें पाळण । आणिक निर्दळण कंटकांचें ॥ असें केलें आहे. **दया** = भूतांचें पाळण + कंटकांचें निर्दळण. दया ही अशी दुधारी तलवार आहे. हेंच महाराष्ट्रीय धर्माचें स्वरूप आहे. भूतमात्रांना पीडा देणाऱ्या दानवांचा निःपात करा व लोक धर्मसंपन्न व सुखी करा, हा सद्धर्म जनतेला शिकविण्यासाठींच मराठी संतांनीं व कवींनीं मराठी भाषेंत २५ वेळां महाभारत व १०।१२ वेळां तरी रामायण गायिलें आहे! दुर्दमनीय वीररसात्मकतेचा उठाव ह्यांत जिवंत राष्ट्राचें बळ सामावलें असतें! समर्थांच्या वाणींत व शिवाजीच्या तलवारींत नारायणानें लोकोत्तर तेजस्विता उत्पन्न केली. समर्थांनीं गांवागांवांतून व तालमीच्या आखाड्यांतून मारुतिरायाच्या मूर्तींची स्थापना करून महाराष्ट्राला शक्तियुक्तिभक्तींचा निष्कंटक मार्ग दाखविला. ही त्यांची क्रियात्मक मुख्य शिकवण आहे. रामोपासना म्हणजे राम व मारुति यांची उपासना लोकांत प्रसृत करण्यासाठीं रामदासी संप्रदायाची उभारणी आहे. यांत वारकरी पंथाला विरुद्ध असें कांहींच नाहीं.

## ५ लोकसंग्रह

अध्यात्माचा अनुभव–आत्मप्रतीती–घेऊनच संत तृप्त राहत नाहींत, ते तो जगाला देतात. अंतरी व्यतिरेकाचा **पूर्ण बोध व बाह्य जगाशीं अन्वयाच्या प्रेमाची वागणूक** ह्या दोन्ही गोष्टी त्यांच्या ग्रंथांत व चरित्रांत स्पष्ट दिसतात. ज्ञानेश्वरमहाराजांनीं 'जें जें भेटे भूत। तें तें मानिजे भगवंत। हा भक्तियोग निश्चित। जाण माझा' असें भक्तीचें लक्षण केलें आहे. 'सर्वांभूतीं भगवद्भाव' हेंच नाथ सांगतात. 'भूतमात्रीं हरीवीण। न पाहेचि दुजेपण॥ प्रेम अंतरीं निःसीम। मुखीं ज्याचे रामनाम' असेंच भक्तांचें लक्षण तुकोबांनीं केलें आहे. प्राणीमात्रांना सुख देणें, जीवांच्या कल्याणार्थ अहर्निश झटणें, रंजले गांजले जाणून त्यांचें ऐहिक व पारत्रिक हित करणें, सर्वभूतहितेरत असणे, हेंच भक्तीचें स्वरूप सर्वांनीं सांगितलें आहे. समर्थ तरी दुसरें काय सांगणार?

**जीवांत जीव घालावा। चालावा भक्तिमार्ग हा॥**

* * *

**सकळां राखणें राजी। हे मुख्य भक्ति जाणिजे॥**

**भक्तींत लोकसंग्रहाचें तत्त्व अंतर्हित आहे.** परोपकार, परमार्थ ह्याच आहे. उच्च प्रकारचा स्वार्थ म्हणजेच परमार्थ. श्रेष्ठ स्वार्थ म्हणजे परार्थ. परोपकारालाच अलीकडच्या भाषेंत राजकारण किंवा देशहित किंवा राष्ट्रकार्य म्हणतात. व्यापकपण संभाळून मर्यादेंत श्रेष्ठ जीवांना कार्य करितां येतें. 'हे विश्वचि माझें घर' असें सांगणाऱ्या ज्ञानेश्वरांनींच अर्जुनाच्या मिषानें भारतीयांना बोध केला आहे—

**जगीं कीर्ति रूढवीं। स्वधर्माचा मान वाढवीं।**
**इया भारापासोनि सोडवीं। मेदिनी हे॥**

## ६ अस्मानी सुलतानी !

परधर्मीय परराज्यामुळें हिंदुसमाजाची कशी दैन्यावस्था झाली होती याचें समर्थांनीं ठसठशीत वर्णन केले आहे. समर्थ सारा हिंदुस्थान पाहून आले होते त्यामुळें सर्वत्र यवनशाहीचें भयानक स्वरूप त्यांनीं उघड्या डोळ्यांनीं समक्ष पाहिलें होतें. ते म्हणतात, 'कल्पान्तकाळ आल्यासारखें झालें आहे.' महर्घता, त्यामुळें ग्रामत्याग व देशत्याग, गांवेंचीं गांवें ओस पडलेलीं, त्यांतच दुष्काळ, परसैन्याच्या धाडी, कांहीं सांगतां पुरवत नाहीं ! 'छंद ना बंद' अशी बेबंदशाही माजलेली आहे.

**किती एक ते घ्राणकर्णेंचि घेती । किती उत्तमा त्या स्त्रिया भ्रष्टवीती ॥**
**किती मोट बांधूनि ते बूडवीती । पिछाडेचि बांधोनि हीरोनि नेती ॥**

कित्येक परधर्मांत जाऊन भ्रष्ट झाले होते व कित्येक कुलवंतांनीं धर्मासाठीं प्राण दिले होते. कित्येकांचे नाककान कापले जात होते, किती कुलवंत स्त्रिया भ्रष्ट केल्या जात होत्या, ज्या वश होत नसत त्यांना मोट बांधून बुडविण्यांत येत होतें ! कित्येकांना पाठीवर बांधून घोड्यावरून पळविण्यांत येत होतें. शेतें पिकत नाहींत, कष्ट करूनही फजितवाडा होतो, सारें थोतांड माजलें आहे. दुनिया पाहावी तर सारी लंड ( धर्म व सदाचार यांना विन्मुख ) झाली आहे. इतकी बेबंदशाही माजली आहे कीं, ज्यानें उठावें त्यानें गरीब प्रजेला लुटीत सुटावें ! पिकें कणसाला येतात न येतात तों तीं लुटण्यांत येतात. काळ ( धान्याची महर्घता ) जिवलगांत ताटातूट करतो. एकत्र नांदणारीं कुटुंबें विस्कळित होऊन जाताहेत ! संरक्षणाचा आधार नसल्यामुळें व्यापारी धीर धरीत नाहींत व म्हणून व्यापारधंदा चालत नाहीं. सारे सारखेच कंगाल व धर्मभ्रष्ट झाले आहेत. पदरीं पुण्यसंपत्ति नाहीं मग ती फळणार तरी कोठून ? अंगावर घ्यायला सुडकें नाहीं, कोंपट म्ह० झोंपडी बांधायला अंगांत त्राण नाहीं, पोट भरायला परदेशाकडे धांव घ्यावी तर वाट फुटत नाहीं, याप्रमाणें

सगळेजण मरणाच्या दारीं बसलों आहोंत ! या दैन्याला कंटाळून कित्येक भरल्या नदींत उड्या टाकतात, कित्येक विष भक्षण करून दुःखाची कड लावतात व कित्येक अग्नींत जाळून घेतात ! मरमर चाकरी करूनही पोटभर भाकरी मिळत नाहीं, नीतिभ्रष्ट तरुण पोरींस फूस लावून पळवून नेतात, नीतिन्याय कोठें राहिला नाहीं, सर्वत्र शिरजोरपणा बोकाळला आहे.

**उदंड चाकरी चाकरी मीळेना भाकरी**
**लोक नीलंड नीलंड काढुनि नेती पोरी ।**
**न्याय बुडाला बुडाला जाहाली शिर्जोरी**
**पैक्याकारणें कारणें होते मारामारी ॥ ९ ॥**
**येतो पाहुणा पाहुणा लौकरी जाईना**
**अन्न खातो रे खातो रे थोडेंही खाईना ।**
**उदंड वाढीलें वाढीलें तऱ्ही तो धाईना**
**गर्वें बोलतो बोलतो कोठेंची माईना ॥ १० ॥**
**राहे वस्तीस वस्तीस चोरीतो वस्तांस**
**खोटा अभ्यास अभ्यास ह्याणी महत्त्वास ।**
**लोक भलेसे दीसती खेटरें चोरिती**
**वस्त्रेंधोतरेंपातरें लपऊनी पळती ॥ ११ ॥**
**दास म्हणे रे भगवंता ! किती पहासी सत्त्व !**
**काय वांचोनी वांचोनी ? ने परतें जीवित्त्व ! ! ।**
**कीती धरावें धरावें धरावें तें सत्त्व**
**जालीं शरीरें शरीरें शरीरें निःसत्त्व ॥ १२ ॥**

लोक भुकेबंगाल व लोंचट झाले आहेत. पाहुणा आला तरी लौकर जात नाहीं, जेवतो तोही बेतानें जेवत नाहीं, उदंड वाढलें तरी त्याची तृप्ति होत नाहीं, उलट तोच गर्वानें फुगून यजमानाच्या अंगावर गुरकावतो ! वस्तीला राहून वस्ता चोरून नेतो ! त्याचे खोटे प्रकार त्याच्या मोठेपणाला बट्टा लावतात पण त्याला त्याची कोठे लाज आहे ? हे लोक भले

दिसतात पण खेटरांपर्यंत वस्ता चोरून नेण्यास लाजत नाहींत, वस्त्रेंपात्रें खुशाल गांठोड्यांत बांधून घेऊन जातात! श्रीरामदास म्हणतात, "भगवंता! आमचें सत्त्व तूं आणखी पाहणार तरी किती? असल्या ह्या जगण्यांत काय अर्थ आहे? त्यापेक्षां आम्हां सर्वांना एकदम मारून तरी टाक!! आतां आम्ही सत्त्व तरी किती संभाळावें? आमचीं शरीरेंही यापुढें—टिकाव धरण्यास असमर्थ--निःसत्त्व झालीं आहेत!"

शके १५५१।५२ सालीं महाराष्ट्रांत भयंकर दुष्काळ पडले, अतिवृष्टि अनावृष्टि होऊन लोकांचे हाल हाल झाले, त्याचेंही हें वर्णन आहे असें मला वाटतें. तीनशें वर्षे मुसलमानी राजांच्या अंमलांत देश कंगाल झाला.

**पदार्थ मात्र तितुका नेला। नुस्ता देशचि उरला।**
**येणेंकरितां बहुतांला। संकट जालें॥**
**माणसा खावया अन्न नाहीं। आंथरूण पांघरूण तेंहि नाहीं।**
**घर कराया सामुग्री नाहीं। काय करीती!॥**
**कितेक अनाचारीं पडलीं। कितेक यातिभ्रष्ट जालीं।**
**कितेक ते आक्रंदलीं। मुलेंबाळें॥**
**अद्यापी दुश्चिन्हें दिसती। दुष्टग्रह आढळती।**
**पुढेंही वाईट सांगती। किती एक!॥**

तात्पर्य—

**विचार सुचेना कांहीं। अखंड चिंतेच्या प्रवाहीं। पडले लोक!**
**प्राणिमात्र जाले दुःखी। पाहतां कोण्ही नाहीं सुखी।**
**कठिण काळें वोळखी। धरीनात कोणी!॥**

दासबोधांत (द० ३, स० ७) आधिभौतिक तापाचे जें वर्णन केलें आहे त्यांत 'कोणी येकें भ्रष्टविलें। कोणी येकें धरून नेलें', 'दरवडे घालूनियां जना। तस्कर करिती यातना', 'लुटिती घरें नेती खिल्लार', 'कडेलोट करणें कां भांड्यामुखें उडवणें ( तोफेच्या तोंडीं देणें )', जेरबंद, चाबूक,

वेत यांनीं मार देणें, अनेक अघोर मार देणें, कर्णघ्राणहस्तपादादि छेदन करणें, नेत्रवृषण काढणें, इत्यादि जे अघोर प्रकार सांगितले आहेत त्यांचा त्या वेळच्या स्थितीशीं मेळ बसतो. ' परचक्रीं धरूनि नेलें । नीच यातीस दिधले । दुर्दशा होऊनि मेले । या नांव आधिभौतिक ' ही एकच ओवी पुरे आहे. समर्थांचा पुढील अभंग पहा —

**अधिक बोलोंचि नेदिती । धरूनी जीभचि कापिती ॥ १ ॥**
**तेथें चालेना कीं ताठा । पोटासाठीं देशवटा ॥ २ ॥**
**हातपाय ते कापिती । कर्ण नासिक छेदिती ॥ ३ ॥**
**नाना प्रकारीं यातना । अवघें श्रुत आहे जना ॥ ४ ॥**
**दास म्हणे सेवाचोर । साहेबांचे हरामखोर ॥ ५ ॥**

' वेळे पाऊस पडेना ' ह्या अभंगांत शेतकऱ्यांची निकृष्ट स्थिति वर्णिली आहे.

केवळ सांसारिक जे आहेत त्यांची स्थिति समर्थांनीं किती तरी अभंगांत व्यक्त करून दाखविली आहे. यांना देव नाहीं, देश नाहीं, धर्मनीति नाहीं, समाज नाहीं, कर्माकर्मधर्माधर्म कसलाच विचार नाहीं—असले हे लोक ! त्यांचें मत —

**भक्ति न लगे भाव न लगे । देव न लगे आम्हांसी ॥ १ ॥**
**आम्ही पोटाचे पाईक । आम्हां न लगे आणिक ॥ २ ॥**
**आम्ही खाऊ ज्याची रोटी । त्याची कीर्ती करूं मोठी ॥ ३ ॥**

* * * *

**आम्हां अन्न जालें पुरे । अन्नाविण काया जुरे ॥ १ ॥**
**पोटभरी मिळे अन्न । आम्हां तेंचि ब्रह्मज्ञान ॥ २ ॥**

समर्थ म्हणतात यांना ' अवघे पोटाचे सायास ' ठाऊक आहेत. त्यांना ' कैंचा राम कैंचा दास ! ' यांना देवाचें भजन नको पण ' कलावंतांचे गाणें ' हे जीवेंभावें ऐकतात, गायनाच्या जलशासाठीं अगदीं प्राण टाकतात !

**अवघा स्वधर्म बुडाला। देह प्रपंचीं लाविला ॥ १ ॥**
**मना आलें तें बोलती। चालों नये तें चालती ॥ २ ॥**
**करिती लग्नाचा उत्साव। नाहीं देवमहोत्सव ॥ १ ॥**
**भूतदया नाहीं पोटीं। खाती लोभाचीं चोरटीं ॥ २ ॥**

त्यांना समर्थ सौम्यपणें सांगतात—

**अन्न देणार श्रीहरी। तोचि प्रतिपाळ करी ॥ १ ॥**
**ज्या देवाचे आज्ञेवरी। मेघ वर्षती अंबरीं ॥ २ ॥**
**त्यासी चुकलीं बापुडीं। अन्न अन्न करिती वेडीं ॥ ३ ॥**
**देव तारी देव मारी। देव सर्व कांहीं करी ॥ ४ ॥**
**रामदास म्हणे एक। देव त्रैलोक्यनायक ॥ ५ ॥**

## ७ अंतर्मुखतेनें आपले दोष पहावेत.

समाजाची जी हीनदीन स्थिति झाली होती तिचा दोष समर्थांनीं लोकांना व विशेषतः पुढारी ब्राह्मणक्षत्रियवर्गांनाच दिला आहे. यवनांनीं अतिक्रमण करून हिंदुराष्ट्रावर जी दैन्यावस्था आणली त्याबद्दल सतत त्यांनाच दोष देण्यापेक्षां आपलेंच चुकलें असें म्हणून चूक आपली आपणच दुरुस्त केली पाहिजे! ही आत्मनिरीक्षणदृष्टि असल्याशिवाय सुधारणा होत नाहीं. अंतर्मुख झाल्याशिवाय आपले दोष दिसत नाहींत व दिसूनही त्यांचा मिथ्याभिमान सोडल्याशिवाय त्यांचा त्याग होत नाहीं. 'सकळ अवगुणांमध्यें अवगुण। आपुले अवगुण वाटती गुण!' असो. समर्थांनीं यासंबंधानें कांहीं अभंग केले आहेत त्यांतलीं त्यांचीं सिद्धान्त-वचनें येथें देतों—

**(१) लोक दोष आचरती। तेणें दोषें भस्म होती ॥ १ ॥**
**जना सुबुद्धि नावडे। मन धांवे पापाकडे ॥ ३ ॥**
**रामीरामदास म्हणे। पुण्य उणें पाप दुणें ॥ ४ ॥**
**(२) लोक मिणधेंचि चालती। त्यांसी होताती विपत्ती ॥१॥**
**धर्मप्रवृत्ति बुडावी। शास्त्रमर्यादा उडावी ॥ २ ॥**

लोक आशाळभूत, लालची, तोंडपुंजे झाले, निस्पृहपणाचा बाणा सुटला म्हणून ही विपत्ति ते भोगीत आहेत ! परधर्मीयांच्या संगतीमुळें व राजसत्तेमुळें स्पष्टवक्तेपणाचें शील बुडालें, खरें बोलण्याचें धैर्य लोपलें, म्हणून राष्ट्राला दुःस्थिति आली. धर्मकार्यांत व राजकार्यांत सत्याचा व निर्भयतेचा बाणा सारखाच पाहिजे. तो नसल्यामुळें धर्माप्रमाणें वागण्याचें धैर्य उरलें नाहीं व त्यामुळें शास्त्रमर्यादा पाळली जात नाहीं. राष्ट्राच्या आपत्तीचें हें बीज होय ! शुद्ध ज्ञानाचा विचार लोपला, अज्ञान प्रबळ झालें, म्हणून 'अवघा स्वधर्म बुडाला। देह प्रपंचीं लाविला'—लोक पोटार्थी झाले. 'राज्य जाहलें कलीसी'—कलियुगाला बळ चढलें. विचारी लोकांच्या तोंडाकडे पहावें तर 'नाना पंथ नाना मतें। भूमंडळीं असंख्यातें' त्यामुळें समाज फाटला. पुढारी वर्णाची स्थिति—

**( ३ ) विप्रीं सांडिला आचार। क्षेत्रीं सांडिला विचार ॥ १ ॥**
**नीतिमर्यादा उडाली। भक्ति देवाची बुडाली ॥ २ ॥**
**मेघवृष्टि मंदावली। पिकें भूमीनें सांडिलीं ॥ ३ ॥**
**बहुवृष्टि अनावृष्टि। दास म्हणे केली सृष्टि ॥ ४ ॥**

ब्राह्मणांनीं आचार सोडला, क्षत्रियांनीं देशस्थितीचा विचार करण्याचें सोडलें ! देवाधर्माला व नीतीला लोक पारखे झाल्यामुळें आपत्ति आल्या आहेत, त्यांतच 'पुण्यक्षेत्रें तीं मोडावीं। आणि ब्राह्मण्यें पीडावीं ॥ पुण्यवंत ते मरावे। पापी चिरंजीव व्हावे' असा प्रकार झाला आहे. सर्वांस उपाय एक—उपासना !

**रामदास सांगे खूण। भक्तीविणें सर्व शीण ॥ ५ ॥**

## ८ दुष्काळ पडला भावार्थाचा

जुन्या दासबोधांत (स० ११) समर्थांनीं पारमार्थिक म्हणविणाऱ्यांची चांगली कानउघाडणी केली आहे. 'ये कलियोगीं आत्मबोध।

तयाचा मांडिला विनोद'—आत्मबोध आपल्या व जनांच्या उद्धारार्थ सांगायचा सोडून यांनीं तो करमणुकीचा विषय करून टाकला आहे! विवेकवैराग्याचा फड ( परंपरा ) मोडून गेल्यामुळें श्रद्धाविश्वास उरला नाहीं व भावार्थाचा दुष्काळ पडला आहे. स्वधर्माचा लोप झाला, लोक विषयासक्त झाले, वर्णसंकर आरंभिला व अधर्मी जन प्रवर्तला आहे. सत्यावर अविश्वास आणि असत्यावर विश्वास! नास्तिकपणा वाढला आहे!

**भक्ति अवघी बुडाली। आणि अभक्ति ठाकली।**
**आणि ती येतां निघोनि गेली। नीतिमर्यादा ॥ १६ ॥**
**शब्दज्ञान उदंड जालें। कवित्व घरोघरीं केलें।**
**समाधान निःशेष गेलें। हारपोनियां ॥ १७ ॥**
**हरिदासीं साहित्य वाढविलें। हरिदास्य सांडोनि कलावंत जाले।**
**देव सांडोनि फिरों लागले। मनुष्यांभोंवते ॥ १८ ॥**

सर्वत्र भक्तिभावाचा लोप होऊन घरोघर पांचट कवित्व आणि शब्दज्ञान बोकाळलें आहे. आचारविचारांपासून जें समाधान ( शांतिसुख ) मिळायचें तें कोठें राहिलें नाहीं. 'हरिदास्य सांडून कळावंत झाले,— हरिभक्तींत स्वतः रमायचें व जनतेला रमवायचें तें सोडून कीर्तनाच्या उपांगांकडे म्ह० गायनवादननर्तन या कलांतच हरिदास रमून गेले व जनमनरंजन व द्रव्यार्जन यांत दंग होऊन 'देव सांडून फिरों लागले। मनुष्याभोंवतें!' सप्रेम भक्तिसुख सोडून ज्ञानी वादविवादांत दंग झाले, संस्कृत शिकून गर्वाखालीं मेले!

**स्त्रिया भ्रतारासी सदा। सेवा न करिती, पेटती द्वंद्वा।**
**पुत्रीं टाकिली मर्यादा। मायबापांची ॥ २२ ॥**

भक्तिप्रेम, भावार्थ, जिव्हाळा हे जाऊन तर्कटीपणा व वाद यांना ऊत आला आहे! सप्रेम भक्ति सोडून ज्ञानी वितंडवादांत गर्क झाले आहेत.

काय करावें? ईश्वरही कसा डोळे झांकून बसला आहे!

हें सारें वर्णन शक १५६० मधलें आहे का शक १८६० मधलें आहे? चालू वर्तमानकाळाचें वर्णन समर्थांनीं ३०० वर्षांपूर्वी लिहून ठेवलें असावें असा संभ्रम होतो! पण नाथसमर्थतुकोबांसारख्या पुण्यात्म्यांच्या अंतःकरणाला ज्या परराज्यामुळें ताप होत होता त्या पारतंत्र्यावर धाड घालणारा वीर पुरुष पुणेंप्रांतींच वाढत होता. आतां असा एखादा अवतारी शिवाजी महाराष्ट्रांत—निदान हिंदुसमाजाच्या कोणत्याही भागांत—जन्मास आला असेल काय? राजकीय स्वातंत्र्याशिवाय धार्मिक चळवळींना बळ चढत नाहीं!

## ९ ब्राह्मणांची थोरवी आणि ऱ्हास

ब्राह्मणांना बुद्धि व आचार यांमुळें महत्त्व. आत्मज्ञानानें जग उद्धरावें हा त्यांचा धर्म.

सर्व आश्रमांत गृहस्थाश्रम हा उत्तमोत्तम आहे, 'परंतु पाहिजे स्वधर्म आणि भूतदया.' ज्या प्रपंचांत स्वधर्माचरण आणि भूतदया संभाळून राहतां येतें तो प्रपंच धन्य होय. उत्तम ब्राह्मणाचा आदर्श (दास० १३-७)—

**जेथें षट्कर्मे चालती। विध्युक्त क्रिया आचरती।**
**वाङ्माधुर्यें बोलती। प्राणिमात्रांसी॥ ५॥**
**सर्व प्रकारें नेमक। शास्त्रोक्त करणें कांहींयेक।**
**त्याहीमध्यें अलोकिक। तो हा भक्तिमार्ग॥ ६॥**
**पुरश्चरणीं कायाक्लेशी। दृढव्रती परमसायासी।**
**जगदीशावेगळें जयांसी। थोर नाहीं॥ ७॥**

यजनयाजन, अध्ययनअध्यापन, दानप्रतिग्रह हीं ब्राह्मणांचीं सहा कर्मे आहेत. त्याप्रमाणें शास्त्रोक्त कर्मे करून म्हणजे आचारधर्म पाळून सर्व प्राण्यांशीं मधुर वाणीनें बोलणें, नियमितपणानें नित्यनेम पाळणें आणि तेही शास्त्रोक्त क्रिया करून पाळणें, गायत्र्यादि पुरश्चरणें दृढव्रतानें

शरीरकष्ट सोसून करणें, परमात्म्यावांचून दुसरें कांहींच श्रेष्ठ न मानणें, ‘अंतरापासून वैराग्य’ असणें—

**ऐसी वृत्ति उदासीन। त्याहीवरी विशेष आत्मज्ञान।**
**दर्शनमात्रें समाधान। पावती लोक ॥ १३ ॥**

‘अखंड जयाचें हृदय। भगवद्रूप’ आहे असा हा ब्राह्मण बहुतांच्या कल्याणाचा मार्ग त्यांना दाखवितो व तो सर्वप्रिय होतो, ‘उपासनामूर्तिध्यानीं। अथवा आत्मानुसंधानीं। नाहींतरी श्रवणमननीं। निरंतर’ अशा पुरुषाची भेट पूर्वपुण्यानेंच होते. सांप्रत बहुतेक लोक इहपरसुखाला आंचवलेलेच दिसतात.

**संसार मिथ्या ऐसा कळला। ज्ञान समजोन निघोन गेला।**
**तेणें जन पावन केला। आपणाऐसा ॥ २५ ॥**
**जो दुसऱ्याचें अंतर जाणे। देशकाळप्रसंग जाणे।**
**तया पुरुषा काय उणें। भूमंडळीं ? ॥ २८ ॥**

या ओव्यांत समर्थांची उत्साहवती वाणी त्यांचेंच चरित्र सांगत आहे असें वाटतें. सांप्रत ब्राह्मणांची स्थिति हीन झाली आहे—

**ब्राह्मण बुद्धीपासूनि चेवले। आचारापासून भ्रष्टले।**
**गुरुत्व सांडूनि जाले। शिष्य शिष्यांचे ॥ ३१ ॥**
**राज्य नेलें म्लेंच्छ क्षेत्रीं। गुरुत्व नेलें कुपात्रीं।**
**आपण अरत्रीं ना परत्रीं। कांहींच नाहीं ॥ ३६ ॥**

ब्राह्मणांनीं आचार सोडला यामुळें त्यांना ‘अन्न मिळेना खायाला’ अशी त्यांची दुरवस्था झाली आहे. नाहीं धर्मकारण ना राजकारण! ब्राह्मणांना मिथ्याभिमानानें व ग्रामणीनें (गांवकीच्या क्षुद्र गोष्टींनीं) बुडविलें आहे. ‘आतां तरी ब्राह्मणीं आपणांला। शाहाणे करावें!’ शहाणपणा कसा शिकावा हें यापुढील समासांत सांगितलें आहे. त्यांतील मुख्य सूत्रें

'आधीं देवास वोळखावें । मग अनन्यभावें भजावें' व 'सकळां घटीं देव पाहून सर्वांस राजी राखावें' हीं आहेत.

## १० महाराष्ट्रानें पुढें झालें पाहिजे !

दासबोधांत (द० १५, स० २) एके ठिकाणीं समर्थांनीं तत्कालीन लोकस्थितीचें फार बहारीचे चित्र रेखाटले आहे त्याकडे आपण बारकाईनें पाहूं. ते म्हणतात—

**कित्येक म्लेंच्छ होऊन गेले । कित्येक फिरंगणांत आटले ।**
**देशभाषेनें रुधिले । कितीयेक ॥ ३ ॥**
**मऱ्हाष्ट्रदेश थोडा उरला । राजकारणें लोक रुधिला ।**
**अवकाश नाहीं जेवायाला । उदंड कामें ॥ ४ ॥**

कित्येक हिंदु मुसलमान धर्मात गेले व कित्येक पोर्तुगीज मुलखांत खिस्ती होऊन बसले. (हिंदुधर्मस्थापनेच्या कार्यात त्यांचा कांहीं उपयोग होणार नाहीं, एवढ्या समाजाला हिंदुधर्म मुकला.) बाकी जे राहिले ते भिन्न भिन्न प्रांतांत (कर्नाटक, गुजराथ, बंगाल इ०) निरनिराळ्या भाषांनीं अडकून पडले आहेत. (सर्वांची एक भाषा नसल्यामुळें राष्ट्र एकमुखी करण्यास अडचण पडते). राहतां राहिले महाराष्ट्रीय लोक. महाराष्ट्रावरच देशधर्मोद्धाराचा सारा बोजा येऊन पडल्यामुळे व त्यांतही कार्यकर्ते चळवळ करणारे लोक थोडे असल्यामुळें संघटणशक्ति निर्माण करितांना त्यांना जेवायलाही फुरसत नाहींसें झाले आहे ! 'मराठा तितुका मेळवावा । आपुला महाराष्ट्रधर्म वाढवावा' अशी समर्थांची शिकवण आहे.

**कित्येक युद्धप्रसंगीं गुंतले । तेणें गुणें उन्मत्त जाले ।**
**रात्रंदिवस करूं लागले । युद्धचर्चा ॥ ५ ॥**

कित्येक युद्धप्रसंगांत गुंतले असून त्यांतच बेहोष होऊन रात्रंदिवस युद्धाच्या फुकट वार्ता करण्याशिवाय त्यांना दुसरें कांहीं सुचतच नाहीं. (अधिक

विद्वान् अशा शास्त्रीपंडितांकडे पहावें तर त्यांनाही व्यापक राष्ट्रकार्य सुचत नाहीं. 'षड्दर्शनें नानामतें। पाखांडें वाढलीं बहुतें' आणि नवल हें कीं, स्वतः कांहीं न करितां हे 'उपदेशिती जेथें तेथें'—आपापल्या मतांचा उपदेश करून शिष्य करीत सुटले आहेत! स्मार्त (शैव) आणि वैष्णव आपापल्या संकुचित पंथांतच गुरफटले आहेत! कित्येक 'कामनेचे भक्त'—इष्टकामनाप्रीत्यर्थ—व्रतें आचरण्यांतच गुंग आहेत! युक्तायुक्ततेचा विचारच कोण करितो! ह्या गलबल्यांतच वैदिक लोकांनीं आपलीं मतें लोकांपुढें मांडून अधिकच गोंधळ माजविला आहे. कांहींनीं हरिकीर्तनांत लोक गुंगवून टाकले आहेत. 'प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान। कोण पाहे!' देशकालवर्तमान पाहून विचार करणाऱ्या विवेकी पुरुषांचीच देशाला वाण आहे! विचारवंतांना सर्व कांहीं साध्य आहे पण विचार करितो कोण?

## ११ निर्लोभ व निर्दंभ कार्यकर्ता

अशा स्थितींत विचारवंत म्ह० निर्लोभी आणि निर्दंभ कार्यकर्ता कसा वागतो किंवा त्यानें कसें वागायला पाहिजे याचें समर्थांनीं यापुढें उत्कृष्ट वर्णन केलें आहे. त्यांत त्यांचें चरित्रच स्पष्टपणें दिसतें. समर्थांचें हें आत्मचरित्र म्हणजे कार्यकर्त्याचा उत्कृष्ट आदर्श आहे.

ते म्हणतात—विचार सर्वांना सांगतां येत नाहींत. अनधिकाऱ्यांना उपाय म्हणून सांगावा तर तो अपायच होतो! खरे विचार कांहीं निवडक विश्वस्त व विचारी लोकांनाच सांगतां येतात, राजकारण बाजारबुणग्यांचें नाहीं! प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान ज्यापाशीं आहे व ज्याला लोककार्य निर्दंभपणें करायचें आहे तो कसा वागतो तें पहा—'धूर्त, तार्किक विचक्षण। रिकामा जाऊं नेदी क्षण;' तो तीक्ष्ण बुद्धीनें सारासारविचार करून 'सकळां माने' असा निश्चित मार्ग दाखवितो. त्याचें ग्रंथावलोकन चोख असतें, पाठान्तर उदंड असतें, म्हणून 'आधारावांचून' तो बोलतचालत नाहीं.

तो प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान सांगून मतमतान्तरें जागच्या जागीं बसवितो, त्याच्यापुढें मतभेद उभे राहूं शकत नाहींत. कोणाला काय सांगावें, कोणापासून कोणतें कार्य करून घ्यावें हें तो यथार्थ जाणतो.

**प्रबोधशक्तीचीं अनंत द्वारें । जाणे सकळांचीं अंतरें ।**
**निरूपणें तदनंतरें । चटक लागे ॥ १६ ॥**
**उदंड करी गुप्तरूपें । भिकाऱ्यासारिखा स्वरूपें ।**
**तेथें यशकीर्तिप्रतापें । सीमा सांडिली ॥ २१ ॥**
**ठायीं ठायीं भजन लावी । आपण तेथून चुकावी ।**
**मत्सरमतांची गोवी । लागोंच नेदी ॥ २२ ॥**
**खनाळामध्यें जाऊन राहे । तेथें कोणीच न पाहे ।**
**सर्वत्रांची चिंता वाहे । सर्वकाळ ॥ २३ ॥**

नानामतांचे लोक आपापले मतभेद विसरून त्याच्या स्वानुभवी उपदेशाप्रमाणें वागूं लागतात—'सृष्टीमध्यें सकळ लोक । धुंडीत येती.'. तो एककल्ली, हेकाड व हट्टी नसतो. त्याच्या निश्चयाची सर्वांवर छाप बसते. त्याच्यापुढें कोणाचें कांहीं चालत नाहीं. तो 'कट्ट घालून' म्हणजे सर्वांचें ऐक्य करून 'राजकारणा लोक लावी.'

**लोकीं लोक वाढविले । तेणें अमर्याद जाले ।**
**भूमंडळीं सत्ता चाले । गुप्तरूपें ॥ २६ ॥**

मनुष्यमात्र त्याला झोंबतात, 'प्रत्ययानें प्राणिमात्र सोडविलें.' जागोजाग त्याचीं मंडळें पसरलीं असतात. सर्वत्र उपासनेचा गजर होऊन परमार्थबुद्धि पैसावते, त्याच्या प्रत्ययामुळें लोक शहाणपण शिकतात. हें 'संकेतानें' येथें सांगितलें आहे.

## १२ लोकहिताची कळकळ

'आई! चिंता करितों विश्वाची' असे वयाच्या ८ व्या वर्षी समर्थांच्या मुखांतून जे शब्द बाहेर पडले ते भगवंताच्या स्फूर्तीनेंच पडले.

देवाची इच्छा ह्या स्फूर्तिवाक्यांत मूर्त झाली. विश्वाची चिंता अवतारी पुरुषावांचून कोण वाहणार? व ती सफल झालेली पाहण्याचें भाग्य तरी दुसऱ्या कोणाचें असणार? ' समर्थप्रतापांत ' ( स० २० ) स्पष्ट लिहिलें आहे —

**श्रीगुरुसमर्थ एकांतीं बैसती । प्रांतींचे लोक दर्शनास येती ।**
**सकल प्रांतींचा स्वामी परामर्ष घेती । चिंता करिती विश्वाची ५८**
**देशकाळवर्तमानें । आपण चिंताग्रस्त होती मनें ।**
**म्हणती कैसीं वांचतील जनें । कैसीं ब्राम्हण्यें राहतील ५९**
**कैसी क्षेम राहेल जगती । कैसीं देवदेवालयें तगती ।**
**कैसे कुटुंबवत्सल लोक जगती । कोणीकडे जातील हे ६०**

लोकांची दैन्यदारिद्रयउद्वेगानें झालेली हीनदशा त्यांना पाहवेना. समाजावर आपत्तींचे डोंगर कोसळल्यामुळे त्यांना रामचरणावांचून दुसरा कोठेंच आधार दिसेना. लोक सुखी झालेले पाहण्याचे माझ्या नशीबीं आहे काय? समर्थांचे हुजूर म्हणजे राम. त्यांना ते म्हणतात —

**हुजुर ! दम निघेना, अंतरीं कोंड नाना,**
**तिळभरि स्थळ कोठें पाहतांही दिसेना ।**
**बहुत विषमकाळें दाटणी थोर झाली**
**म्हणउनि चरणाब्जीं वृत्ति गुंतोनि ठेली ॥**

**बहुतचि सुकुमारा ! स्वस्थ नाहीं शरीरा**
**निशिदिनिं जनचिंता लागलीसे उदारा ।**
**सकळजन सुखावे तो कसा काळ फावे ?**
**भजन जन उकावे सर्व आनंद पावे ॥**

समर्थांनीं लोकस्थिति सुधारण्याचा निश्चय केला. रडवेपणा हा शब्दच त्यांच्या कोशांत नाहीं. **त्यांच्या सर्व चळवळीचें सार प्रयत्न, प्रबोध आणि प्रत्यय ह्या तीन शब्दांत आहे.** मेण्यासारखी गुडघ्यांत मान घालून

कोणाचीही—व्यक्तीची व राष्ट्राची—स्थिति सुधारत नाहीं. आळस झाडून व उत्साहवंत होऊन प्रयत्न करायला हवेत. पुरुषार्थ बाणला पाहिजे. जनतेची अत्यंत हलाखीची स्थिति पाहून समर्थांच्या मनास किती वेदना होत होत्या हें वरील श्लोकांवरून कोणाच्याही लक्षांत येईल.

## १३ धीर धरा व यत्न करा !

"प्रसंग तुफान आहे पण निर्भयपणानें त्याला तोंड द्या, धीरानें यत्न करून लोकस्थिति व राज्यस्थिति सुधारा. राज्याच्या उलथापालथी निरंतर होत असतात. चढेल तो पडेल व पडेल तो चढेल हें लक्षांत ठेवा. कलह, पक्षभेद व वितंडवाद टाकून दांडगा यत्न करा—यत्न तिकडे देव आहे, किंबहुना यत्न तोच देव आहे. भेदभाव विसरून एक व्हा." असा समर्थांनीं या प्रसंगीं आपल्या तेजस्वी वाणीनें लोकांस धीर दिला आहे. तो सर्व आजचे पुढारी ध्यानीं धरतील काय?

**धीर्धरा धीर्धरा तकवा हडबडूं गडबडूं नका ।**
**काळ देखोनि वर्तावें सांडावें भय पोटिचें ॥**
**खादाड आळसी मंदू सूचना ते कळेचिना ।**
**प्रसंगीं चळचळां कांपे तो प्राणी आत्मघातकी ॥**

* * * *

**अखंड सावधान रे प्रयोग प्रेत्न मान रे**
**प्रसंग हा तुफान रे नकोचि वेवधान रे ॥**
**मनीं धरूनि धारणा करा बरी विचारणा ।**
**प्रेत्न मूळ कारणा अतर्क्य ते विचारणा ॥**

क्षुद्र 'सुधारणांत' डोकें खुपसून समाज फाडूं नका; हें चित्तचांचल्य टाकून सावधान व्हा व राष्ट्रावरचें मोठे संकट प्रथम टाळा.

'अखंड सावधानता' ठेवा, रिकामे क्षणभर राहूं नका, प्रयत्नाची शिकस्त करा म्हणजे भाग्योदय होईलच होईल. 'देशकाळवर्तमान। सावधान सावधान!' शरीर नटवायच्या क्षुद्र फंदांत पडूं नका—

**शरीरवेष पालटे परोपरी नटे नटे।**
**परंतु काय साधिलें? अगम्य कोण शोधिलें॥**

देहशृंगारापेक्षां चातुर्यानें अंतर शृंगारा. शरीर नटविल्यानें लाभ तो काय होणार? कोणता मोठा शोध लागणार? सर्व देहांना ज्या आत्मारामामुळें शोभा येते तो सर्वांतर्यामी देव शोधा—उपासनेनें तो सांपडेल.

**उपासकांसि सूचना 'उपासना! उपासना!'॥**

रामाची उपासना वाढवा, सर्व कार्य साधेल.

* * * *

'प्रसंग हा कठीण हो', 'कठिण काळ वीषमु' हें किती वेळ सांगावें? नानापक्षोपपक्ष उत्पन्न करून आपापसांत भांडतां काय? 'सकळ लोक एक करावे.' समाजांत फूट पाडणारे मतभेद सारे गाडून टाका. एकी करा. चित्तानें एक व्हा. एकीच्या गोष्टी सांगतां आणि बेकी करितां! 'अहंमती विरेचिना तरी कळहो सरेचिना!' तुमचा अहंकार मेला नाहीं तोंवर कलह संपत नाहींत!

**धरूनि पक्ष काय रे उपाय तो अपाय रे।**
**तुम्ही तुम्हांसि वीवरा स्वहीत तें मनीं धरा॥**
**अभेदभक्तिचा ठसा अनन्यभाव तो कसा।**
**निवेदनेंचि वोळखा अहंपणें झकों नका॥**

एकच एक पक्ष धरून चाललांत तर जे जे उपाय कराल ते ते अपाय होतील. अहंकार मोडला तरच कलह मिटतील. कलह मोडण्याचें बीज सर्व भूतांच्या अंतरीं जो हरि आहे त्याला प्रसन्न ठेवणें म्हणजे लोक राजी राखणें हें होय.

**जनीं उदंड पाहिले कळहो करीत राहिले।**
**अनन्य देव भेटला कळहो तयांसि तूटला ॥**
**कळहो करील शब्द रे अनंत तो निशब्द रे।**
**तुम्ही अनंत कां नव्हा वेवादितां अव्हासवा ! ॥**

पुष्कळ लोक नुसता कलहच करीत राहतात. निःशब्द असा जो अनंत, तद्रूप तुम्ही व्हाल तर तुम्हीही निःशब्द होऊन कलह मिटेल.

आजचें म्लेच्छांचें दृढमूल झालेलें बंड मोडून धर्मराज्य व्हावें कसें ही शंका मनांत बाळगूं नका. राज्याच्या उलथापालथी नित्य होत असतात. राज्ययंत्र शाश्वत नाहीं !

**भुपाळही भले भले जनीं उदंड जाहले।**
**ऱ्हासकाळ शेवटीं विसंचितां लुटालुटी ॥**
**सभाग्य रावणादिकां बहू कठिण काळ कां ?।**
**महीवरी परोपरी उदंड हे भरोवरी ॥**
**भरे सवेंचि मागुतें उगेंचि होतसे रितें।**
**म्हणे कवी नका नका समस्त पावले धका ॥**

रावणांसारखे गेले तेथें इतरांची कथा काय ? उन्मत्तपणाच्यामागून ऱ्हास हें निश्चित आहे. रहाटगाडगें खालींवर होत असतें.

**नदी भरोन वोहटे तळें भरोन तें फुटे।**
**तयापरीच संपदा जनीं न निश्चळे कदा ॥**
**भरोंच लागतां भरे भरे कदापि नावरे ॥**
**सवेंचि वोसरे सरे सरेचि तें कदा नुरे ॥**

नदीला महापूर येऊन ती भरून वाहूं लागली, कीं ओहटी ही लागायचीच ! तळें भरून फुटायचेंच ! संपत्ति व सत्ता अफाट माजली कीं ऱ्हासकाळ यायचाच. काळ अनुकूळ आला, कीं ऐश्वर्य अनावर वाढत जातें व काळ उलटला, कीं त्याचा मागमूसही राहत नाहीं. घाबरूं नका. हेही दिवस जातील व सुखाचे दिवस येतील, यत्न करा.

## १४ आत्मविश्वास हें पहिलें उदयचिन्ह

**गुरुचरित्र ग्रंथांत** (सुमार शक १४८०) त्या वेळीं मुसलमानी राजांबद्दल व राजसत्तेबद्दल काय उद्गार काढले आहेत ते येथें पाहूं —

एका रजकानें एक म्लेंच्छराजा कृष्णावेणीतटाकीं वसंतऋतूंत वैशाखमासीं जलक्रीडा करण्यास आल्याचें पाहिलें. त्या राजाचें ऐश्वर्य पाहून त्या गरीबाच्या तोंडास पाणी सुटलें !

**स्त्रियांसहित राजा आपण। अलंकृत आभरण।**
**क्रीडा करीत स्त्रिया आपण। गंगेमधून येतसे ॥ १६ ॥**
**सर्वदल येत दोनी थडी। अमित असती हत्तीघोडीं।**
**मिरवितातीं रत्नकोडी। अळंकृत सेवकजन ॥ १७ ॥**
**ऐसा गंगेच्या प्रवाहांत। राजा आला खेळत।**
**अनेक वाद्यनाद गर्जत। कृष्णावेणीथडियेसी ॥ १८ ॥**
**धन्य राजयाचें जिणें। ऐसें सौख्य भोगणें।**
**स्त्रिया वस्त्रें अनेक भूषणें। कैसा भक्त ईश्वराचा ! ॥ २१ ॥**
**कैसें याचें आर्जव फळलें ?। कवण्या देवा आराधिलें ?।**
**कैसे श्रीगुरु असती भेटले। मग पावला ऐसी दशा ॥२२॥(अ०९)**

त्या यवन बादशाहाचें हें राजस ऐश्वर्य पाहून सामान्य लोकांना हे देवाच्या कृपेचें फळ आहे असें वाटे !

‘दुष्ट यवनशासनाचा’ चौदावा अध्याय पाहण्यासारखा आहे —

सायंदेव नांवाचा एक ब्राह्मण श्रीगुरूस शरण आला व म्हणाला कीं, “मी यवनाची सेवा करीत आहें पण तो ‘महाक्रूर’ आहे. आपल्या अनुग्रहानें मी कृतार्थ झालों पण आतां फिरून त्या यवनाकडे जाणे प्राप्त आहे आणि मला तर त्याची भीति वाटते !

**प्रतिसंवत्सरीं ब्राह्मणांसी। घात करितो तो बहुवसी।**
**याचिकारणें आह्मांसी। बोलावितसे परियेसा ॥ १४ ॥**
**जातां तयाजवळी आपण। निश्चयें घेईल माझा प्राण।**
**भेटी जाली तुमची म्हणोन। कैंचें मरण आम्हांसी ? ॥ १५ ॥”**

श्रीगुरूंनीं त्या भयाक्रान्त ब्राह्मणाच्या मस्तकावर हात ठेवले व त्याला अभय दिलें व म्हणाले, 'भय सांडूनि त्वां जावें। क्रूर यवनातें भेटावें। संतोषोनि प्रियभावें। पुनरपि पाठवील आम्हांप्रती.' तो सायंदेव ब्राह्मण यवनाकडे गेला—

**कालांतक यम देखा। यवन दुष्ट परियेसा।**
**ब्राह्मणातें पाहतां कैसा। ज्वालारूप होता जाला॥२२॥ (अ० १४)**

यवन कोपला व ब्राह्मण भयचकित झाला. पण ज्यावर श्रीगुरूची कृपा झाली त्याला यवन काय करील? त्याच रात्रीं त्या यवनाला निद्रेंत 'हृदय-ज्वाळांचा' ताप झाला म्ह० एका विप्रानें शस्त्रानें त्याचा एकेक अवयव छेदायला आरंभ केला तेव्हां त्याला प्राणान्तिक वेदना झाल्या! जागृत होतांच त्यानें त्या ब्राह्मणाला वस्त्रभूषणें व द्रव्य देऊन निरोप दिला! श्रीगुरूंनीं स्वप्नांत त्या यवनाला शिक्षा केली तेव्हां त्याला ब्राह्मणाची भीति वाटली व जागृतींत हा ब्राह्मण निर्भय झाला. यवन हे श्रेष्ठ व दुष्ट, आपण त्यांना भिऊनच राहिलें पाहिजे, अशी भित्या ब्राह्मणांची भीति नृसिंहसरस्वतींनीं काढून टाकली व आपणही दुष्टांचा प्रतिकार करूं शकतों असा आत्मप्रत्यय त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न केला! आत्मप्रत्यय व आत्मविश्वास उत्पन्न करून दीनदुबळ्या झालेल्या लोकांत चैतन्य उत्पन्न करणें हें काम नृसिंहसरस्वतींनीं केलें व हें कार्य फार मोठें आहे.

## १५ मुक्तेश्वरांचें स्वराज्याचें स्वप्न

दक्षिणेंतील मुसलमानांची सद्दी संपून मऱ्हाठ्यांचा यशोभानु उदयाचलावर येत होता अशा काळांतील मुक्तेश्वर हा महाकवि आहे. त्याचा महाभारत ग्रंथ महाराष्ट्र स्वराज्योन्मुख झाल्या वेळचा आहे. त्या वेळीं महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांच्या हृदयांत ज्या राष्ट्रीय मनोवृत्ति उचंबळत होत्या त्यांचें स्वच्छ प्रतिबिंब त्याच्या भारतांत पडलें आहे. शहाजीच्या

कर्तबगारीचा काळ आणि मुक्तेश्वरी भारताचा काळ अगदीं एकच आहे. मुक्तेश्वर हा उघड्या डोळ्यांनीं भरतखंडांतील लोकस्थितीकडे पाहणारा प्रतिभासंपन्न कवि होता. राष्ट्राची राजकीय स्थिति त्याला चांगली दिसत होती. मुसलमानी व ख्रिस्ती राष्ट्रें हिंदुस्थानांत काय चळवळी करीत होतीं हे त्याला स्वच्छ दिसत होतें. राजकारणाचे डावे–उजवे डाव, न्याय व अन्याय दोन्ही प्रकार त्याने उत्तम प्रकारें वर्णिले आहेत. कुटिल राजनीतीनें चालणाऱ्या कौरवांस उपदेश करणारा कणिक (आदि०, अ० ३४) व उदात्त, राष्ट्रोपकारक व व्यापक राजनीतीचा पांडवांस उपदेश करणारा नारद ( सभा०, अ० ३ ) ह्या दोघांच्याही नीति त्याने आपल्या भारतांत सविस्तर सांगितल्या आहेत. दोन्ही प्रकारचे म्ह० कुटिल व सरळ राजनीतीचे प्रकार मूळ महाभारतांतच वर्णिले आहेत, तथापि मुक्तेश्वरी वर्णनांत चालू परिस्थितीकडे कवीचे लक्ष असल्याचें स्पष्ट दिसून येते. मोरोपंतश्रीधरादि दुसऱ्या कोणत्याही कवीने ह्या राजनीतिविषयक विषयांचें मुक्तेश्वराइतकें खुबीदार वर्णन केलेलें नाहीं. इतर कवि भारती कथांतच रंगले होते व मुक्तेश्वर महाराष्ट्राच्या वर्तमानकाळाकडे एक डोळा ठेवून दुसऱ्या डोळ्याने कौरव-पांडवकथांकडे पाहून लिहीत होता! मुक्तेश्वरानें राष्ट्राला राजनीतीचें शिक्षण देणारे उत्तम प्रसंग सविस्तर वर्णिले आहेत. मुक्तेश्वराचें समाजाकडे, राष्ट्रकार्याकडे व राजनीतीकडे व्यापकपणाचें लक्ष होतें. पांडव प्रबल होत चालले आहेत, तर त्यांचे छिद्र समजून घेऊन व आपले राजकीय बेत गुप्त ठेवून कपटानें त्यांचा कसा नाश करावा हें कणिकानें सांगितलें आहे. शठाशीं शाठ्य नव्हे तर सज्जनांशीं शाठ्य करायला कणिक शिकवीत आहे! “ दूरी दवडोनि सात्त्विकता । विस्तारावी अतिक्रूरता । उग्रतेस्तव इच्छिल्या अर्था । अनायासें पाविजे ॥ ११ ॥ शोधिजे परबुद्धीचा ठावो । कळों न दिजे आपुला भावो । स्वार्थ साधे तो उपावो । नाना यत्नीं साधावा ॥ १६ ॥ दया आर्जव साधुवृत्ती । वर्ततां वदनीं पाडे माती, ” ह्या कणिकनीतीचा

मथितार्थ आहे! शत्रूशीं वागतांना सावधानता कशी ठेवावी व स्वकार्यापुढें कांहींही मानूं नये हा नारदांचा उपदेश विचारणीय आहे. 'वैरी थोर अथवा सान' असला तरी सावधान असावें.

अशा प्रकारच्या गुणांनीं युक्त असा सार्वभौम राजा भरतखंडावर अंमल चालवणारा असावा, अशी जी शिवाजीमहाराजांच्या जन्मापूर्वींपासून मराठ्यांची प्रबळ इच्छा होती, तिचें हुबेहूब उत्कृष्ट प्रतिबिंब मुक्तेश्वरी भारतांत सर्वत्र पडलेलें दिसतें. गोदावरीच्या कांठीं पैठणास भारत रचणाऱ्या मुक्तेश्वराला जसा मराठा राजा असावा असें वाटत होतें, तसाच सर्वगुण-संपन्न मराठा राजा त्याच वेळीं पुणेंप्रांतीं मुळामुठेच्या कांठीं नुकताच बालसूर्यासारखा उदय पावत होता व मुक्तेश्वरानें

**महाराष्ट्र जें सर्व राष्ट्रांसि राजे।**
**जयाच्या भयें व्यापिले देव लाजे॥ (रामायण, ४–६९.)**

असा 'प्रसिद्ध महाराष्ट्रदेशाबद्दल' जो अभिमानोद्गार काढला आहे त्याची यथार्थता जगताच्या प्रत्ययाला आणून देण्याचे प्रयत्न करीत होता. मुक्तेश्वरी **आदिपर्व, अ० ३१ मध्यें गौड, महाराष्ट्र, तैलंग, आंध्र व फिरंगी यांच्या युद्धाचे प्रकार स्वतंत्रपणें वर्णिले आहेत त्यांत "खेटक (ढाल), करवाळें (तलवार) सतेज। सूडसाधनीं विशाळ पैज। या नांवें महाराष्ट्र झुंज। खंडितांहि न खंडवे'** (५४) अशी ओवी आहे ती मननार्ह आहे. मराठ्यांचा चिवटपणा व तेजस्विता अनादि आहे. महाराष्ट्रीय हे 'सूडसाधनीं पैज' बांधणारे व 'खंडितां न खंडवे'—मेरेतों न हटणारे, कधींही खंडिले न जाणारे आहेत अशी महाराष्ट्रीयांची स्वभावसिद्धि मुक्तेश्वरानें वर्णिली आहे, ती इतिहास गाऊनच राहिला आहे!

## १६ हिंदु राजाचा आदर्श

'नमुनेदार हिंदु राजा' कसा असावा याचें उत्कृष्ट चित्र मुक्तेश्वरानें (दुष्यन्तयुधिष्ठिरांच्या वर्णनप्रसंगीं व) सभापर्वातील नारदनीति सांगण्याच्या

प्रसंगीं वठविलें आहे. मुक्तेश्वरी भारत त्या काळीं मोठमोठाल्या मराठा घराण्यांतून वाचलें जात होतें व शिवाजीमहाराजांना त्यांच्या बाळपणीं महाभारत ऐकवण्यांत आलें तें बहुधा मुक्तेश्वरी भारतच असावें असें मला वाटतें. कोणत्या गुणांच्या क्षत्रिय हिंदुराजाचें चित्र मुक्तेश्वर महाराष्ट्रीयांपुढें ठेवीत होता हें मी त्याच्या शब्दांनीं येथें सांगत आहें. राजा 'गोब्राह्मण-प्रतिपालक' असावा; 'म्लेंच्छादिकांना दंडून' त्यानें आपले अंकित करावें; 'गोवधदेवब्राह्मणावज्ञा' करणारांना त्यानें 'शूळदंड' करावा; 'राष्ट्रास दुर्गबळ आवश्यक आहे म्हणून त्यानें 'अमात्य सुहृदकोश' यांच्या साह्यानें किल्ले बांधावे; 'झुंजार बळी' अशा समुदायांचे संघ करून त्यानें शत्रूवर कोसळावें; शेतकीच्या सुधारणेसाठीं त्यानें 'तडाग, पाटस्थळें, कालवे, बांधावे'; 'परद्वीपींच्या अमोल्य वस्ता। वणिक आणिती इच्छून अर्था। त्यांच्या पुरवूनि मनोरथा' त्यांना चौगुणी लाभ देऊन संतुष्ट करून (फ्रान्स, हॉलंड, पोर्च्युगाल, इत्यादि देशांना) आपली कीर्ति गाणारे करून परत पाठवावें; 'अंध, मुके, पंगु, व्यंग' यांचें 'पितयाप्रमाणें सांगोपांग पाळण' करून त्यांच्यासाठीं शाळा स्थापाव्या; 'अग्नि, सर्प, चोर, व्याघ्र, । रोग, राक्षस, कां परचक्र । यांपासून आपुलें राष्ट्र' बलिष्ठपणानें त्यानें राखावें; तो 'पवित्र आचरणाचा' असून 'राष्ट्र स्वदृष्टीनें अवलोकन करणारा' असावा; 'संपूर्ण राजैश्वर्य' प्राप्त झाले असून 'त्याला राज्यमदें दुरभिमान' नसावा; 'वडिल आचरले जो धर्म' तो विहितकर्मपूर्वक चालविणारा तो असावा; 'समस्तांसी संपत्ती विभागून' त्यानें न्यायानें भोगावी; राजाला 'परगुणपरीक्षा ' उत्तम असावी; 'भृत्यानें अचाट कार्य साधलें' तर त्याला वेतनापेक्षां फार मोठें द्रव्य देऊन त्यानें संतुष्ट ठेवावें; आज्ञा, कीर्ति, द्विजपालन, दान, मोक्ष, मित्रसंरक्षण ह्या षड्गुणांनीं युक्त असेच प्रधान त्यानें ठेवावेत; मंत्री व सचिव यांच्या राहटी कशा आहेत व लोक काय बोलतात हें चार मुखांनीं नित्य ऐकावें; प्रजापीडन करून लांच

खाणारे प्रधान तावडतोब काढून टाकावेत; दुर्बळ लोक आपल्या 'क्लेशगोष्टी'-तक्रारी-सांगायला आले तर त्यांना कोठेंही 'आडकाठी' नसावी; 'परराष्ट्र घ्यावया सैन्य धाडून शत्रूकंदन' करावें व प्रजेची 'नागवण' बिलकूल होऊं देऊं नये; अंगावरचा रोम उपटला तर जें दु:ख होतें तें प्रजापीडन ऐकून व्हावें; अंगबळ, सेनाबळ, कोशबळ, दुर्गबळ, शस्त्रबळ व सुहृद्बळ ह्या गुणांनीं राजा संपन्न असावा; वेदविद्यासंपन्न, विद्वान्, ज्ञाते यांचें दैन्य परिहरून त्यांना त्याने सुखांत ठेवावें; 'प्रत्रासी, रोगी व कारागृहीं अटकलेले' यांना सांभाळून त्यानें 'क्लेशातीत' करावें; 'अजिंक्य शत्रूतें जिंकावें। जिंकिल्यातें प्रतिपाळावें। शरणागतांतें रक्षावें' हा त्याचा दंडक असावा; प्रधानादिकांशीं केलेला एकान्त बाहेर न फुटावा; 'एक बोलिजे उघड जनीं। एक प्रेरिजे महंतकर्णीं। एक ठेविजे मनींचें मनीं' अशी राजकारणपटुता त्यांत असावी; 'अग्नि सर्प चोर व्याघ्र। रोग राक्षस कां परचक्र। यांपासून आपुलें राष्ट्र' रक्षण करण्यांत त्यानें दक्ष असावें—असा 'राजा असावा सावधान!'

## १७ रोमन प्रवाश्यानें पाहिलेला त्या वेळचा हिंदु समाज

[शके १५४५ ते १५४८ (इ. स. १६२३ ते १६२६) ह्या चार वर्षांच्या काळांत पीटर व्हॅले नांवाचा एक इटालियन प्रवासी अरबस्थान, हिंदुस्थान, वगैरे देशांतून फिरत होता. त्याने आपले प्रवासवृत्त आपल्या एका मित्राला १८ पत्रें लिहून कळविलें आहे. त्यावरून तुकोबाराय व समर्थ यांच्या बाळपणच्या हिंदुसमाजस्थितीची वाचकांस चांगली कल्पना येणार आहे.]

"इकडे (हिंदुस्थानांत) बेलाचें झाड पवित्र मानलें जातें व त्याचीं फळें पोटदुखी वगैरे रोगांवर फार औषधि आहेत; त्याचा उपयोग आपणही इकडे केला पाहिजे."

" हिंदु लोकांना खाण्याकरितां फक्त भात लागतो. तांदूळ फार स्वस्त. या लोकांचीं वस्त्रें म्ह० अंगांत आंगरखा, डोक्यावर पागोटें, पायांत तुमान असून वर उपरणें, पायांत पादत्राण पण तें असें कीं, त्याला हात न लावतां तें पायांतून काढतां येतें ! ढालतलवाही सर्व लोक बाळगतात, कट्यार अगर जंबिया हाही असतोच. कापडाचा रंग पांढरा शुभ्र असून कापड फार चांगलें व बारीक असतें. इतर कोणत्याही देशांत इतका तलम कपडा मी पाहिला नाहीं ! हिंदु स्त्रिया मात्र तांबड्या रंगाचीं वस्त्रें नेसतात. वेलबुट्टीच्या वस्त्राला चीट असे म्हणतात. कपड्याच्या आंत चोळी असते व ती कोंपरापर्यंत असते. बायका हातांत सोन्याचीं, चांदीचीं अगर हस्तिदंती कांकणे घालतात. कानांत भोंकें पाडून सोन्याचे व हिऱ्याचे दागिने घालतात. हिंदु स्त्रिया फार मर्यादशील असतात व त्यांना कुटुंबामध्यें मोठा मान दिला जातो. या हिंदु स्त्रियांत गाण्यानाचण्याचा † धंदा करणारी एकही स्त्री नाहीं. मुसलमानी बायकांमध्यें नृत्यगायनाचा धंदा करणाऱ्या बायका फार. त्या कोठेंही जातात व पैशाकरितां गातात, नाचतात व वेश्याव्यवसायास जरूर त्या सर्व गोष्टी करितात. "

" हिंदुलोक दोन्ही कानांत कुंडलें व अलंकार घालतात. "

" लोक गाईच्या शेणानें आपलीं घरें व जमिनी सारवतात, व जमीन सारवल्याशिवाय जेवीत नाहींत ! अनुभवान्तीं मला पटलें कीं, स्वच्छतेच्या

---

† आतां कुलीन स्त्रियांनींही नाटकांत व सिनेमांत प्रवेश करून पैसे घेऊन कामें केलीं पाहिजेत व तीं 'कलेसाठीं' करून त्यांनीं 'कलावंत' झालें पाहिजे असा पक्ष शहाणेसुर्तेही घेऊन तडत आहेत ! पीटर व्हॅलेचा समकालीन कवि मुक्तेश्वर म्हणतो—" स्वयें नर्तन गायन । गीतनृत्यअवलोकन । शृंगार कामशास्त्रश्रवण । हें कुलक्षण कुलवंते ॥ " त्याचप्रमाणें 'परघरअटण परघरवस्ती', 'बहु हांसणें बहु बोलणें । सदा हांसत गोष्टी करणें' हीं कुलीन स्त्रियांचीं कुलक्षणें होत. कुलक्षणांनाच सांप्रत लोक सुलक्षणें म्हणूं लागले आहेत !

दृष्टीनें ही फार चांगली रीत आहे. त्यायोगें जमिनी तकतकीत दिसतात. गाई गवताशिवाय कांहीं खात नसल्यामुळें शेणांत घाण नसते." ( इटलींत गेल्यावर हा प्रचार आपण सुरू करणार आहोंत असें या प्रवाश्यानें लिहिलें आहे ! )

" ब्राह्मण हे दुसऱ्या कोणत्याही जातीच्या घरीं जेवीत नाहींत, कारण त्या जाती मांसाहारी आहेत. मांसाहारी ब्राह्मणजाती ज्या आहेत त्यांच्याही घरीं निवृत्तमांस ब्राह्मण जेवीत नाहींत. इतर सर्व लोक ब्राह्मणांच्या घरीं जेवतात, इतकेंच नव्हे तर तो सन्मान समजतात."

" मी जयकामा नांवाची स्त्री सती जातांना पाहिली ! मला त्या सतीशीं बोलावयालाही सांपडलें. तिनें सती जाऊं नये असें सांगण्याचा मी प्रयत्न केला. तिला दोन लहान मुलें होतीं तरीही ती स्वखुषीनें व आनंदानें सती गेली. ही बाई कनिष्ठ जातींपैकीं होती. सतीचें पावित्र्य सर्व जातींत सारखेंच पूज्य मानलें जातें."

" खंबायतमध्यें गाई, वांसरें व बैल मारण्याची कडक बंदी आहे. हिंदु लोकांनीं बादशाहास मोठा करभार भरून हा हक्क संपादन केला. एखाद्या मुसलमानानें जरी गोहत्या केली तरी त्याला देहान्त शासनाची कडक शिक्षा दिली जाते."

" हिंदूंच्या मुख्य जाती चार झाल्या व आतां ८४ आहेत. या जाती जन्मानें ठरतात व त्यांचे धंदेही ठरलेले असतात. मुख्य धर्ममतें सर्वांचीं एकच आहेत. पुनर्जन्मावर सर्वांचाच विश्वास असल्यामुळें व आपल्या कर्माप्रमाणें जन्म येतो असें मानणारे सर्वच लोक असल्यामुळें त्यांच्यांत तंटे होत नाहींत. ब्राह्मणलोक खाण्यापिण्याच्या बाबतींत फारच कडक असतात; इतर जातीही कमी असत नाहींत. कोणीही एकत्र ( एका ताटांत ) जेवीत नाहींत, व एकाच भांड्यानें पाणी पीत नाहींत. लग्नें आपापल्या जातींतच करितात."

" हे हिंदुलोक फार नीतिमान् आहेत. दारू व व्यभिचार ह्या दोन्ही गोष्टी ते अत्यंत निंद्य समजतात. गुलामांची चाल यांच्यांत नाहीं. लग्न एकच करितात, बहुपत्नीकत्वाची चाल सर्वत्र नाहीं व ती गौण मानतात. नवरा दुसरें लग्न करितो पण बायकांना ही परवानगी नसल्यामुळें क्वचित् तरुण विधवा बिघडतात."

" प्राणिवध करणें हें पाप समजलें जातें यामुळें कोणी मांस खात नाहींत. जितका वर्ग वरिष्ठ तितक्या प्रमाणानें तो मांसनिवृत्त असतो. गोमांसभक्षण तर सर्वांनाच सर्वथा वर्ज्य आहे. गाईचें दूध पिऊन लोक वाढतात व बैलांच्या मशागतीवरच सर्व शेती अवलंबून असल्यामुळें गोमांसभक्षण हें महापाप समजलें जातें हें योग्यच आहे."

" मद्य प्यावयाचें नाहीं असा कडक निर्बंध आहे. खालचे लोक विशेषतः रजपूत मद्य पितात, पण त्यांनाही आपण पाप करितों असें वाटतें."

" मार्च १५ ला होळीचा सण होता. त्या वेळीं लोक एकमेकांवर रंग टाकीत होते. इस्पहानमधले हिंदु लोक हा सण पाळतात, पण येथें फार मोठ्या प्रमाणावर हा उत्सव होतो."

सदर इटालियन प्रवाश्याला हिंदुसमाज कसा आढळला त्याचें हें सुंदर चित्र आहे. हें पत्र त्यानें सुरतेहून लिहिलें आहे तरी सर्व ठिकाणच्या हिंदु समाजाला हें वर्णन लागू पडतें.

## १८ तालमी व कुस्त्या

वीररस मुक्तेश्वराला फारच उत्कृष्ट साधतो. वीररसवर्णनांत मुक्तेश्वर आपल्या वेळच्या युद्धकलेचें, शस्त्रांचें, कुस्त्यांच्या पांचपेंचांचें व क्वचित् भारतवर्षांतल्या अनेक प्रांतांतल्या युद्धपद्धतीचेंही इतकें हुबेहूब वर्णन देतो

कीं या बाबतींत तो सर्व मराठी कवींत खरोखरच अद्वितीय आहे. पुढें शिवकालीं व नंतरच्या प्रत्यक्ष स्वराज्याच्या काळांत अनेक शाहीर व पोवाडे रचणारे कवि झाले आहेत, पण मुक्तेश्वराच्या वीररसवर्णनाची सर कोणालाच येत नाहीं. युद्धाचीं अनेक अंगें सांगतांना गौड शुद्ध, 'महाराष्ट्रीय झुंज,' आंध्रदेशस्थ युद्ध, फिरंगी युद्ध यांचें दिग्दर्शन (आदि०, अ० ३१) त्यानें केलें आहे! भारतीयोद्धयांच्या कृतींतला 'वीरश्रियेचा आवेश। सिंहगर्जनेचा घोष' त्याच्या वाणींत प्रतिबिंबित झाला आहे. त्याची वाणी वीररसानुसारिणी आहे. भीमदुर्योधन 'सिंह उफाळती हुंकारें। कुंजर लक्षिती कुंजरें। कीं वृषभ माजले डिबरें (डुरकावणी फोडून)। फुंपाटती अतिरागें' याप्रमाणें 'अधरदर्शनें चावीत व वामकरीं श्मश्रू पिळीत' एकमेकांस कसे भिडतात याचें व अशाच अनेक प्रसंगांचें त्याचें वर्णन अत्यंत बहारीचें आहे.

कुस्तींतले डावपेंच मुक्तेश्वराला जात्या माहीत होतेसें दिसतें. मुक्तेश्वराचा काळ हा शिवाजीतानाजींसारख्या मल्लांच्या वीरश्रीचा उगमकाळ असल्यामुळें महाराष्ट्रांत चहूंकडे तालमी आणि आखाडे फार झाले होते. पुढें यवनांशीं झुंज खेळायला तयार होणारे वीर आखाड्यांत झोंबी खेळत होते, शरीर कमावीत होते, युद्धाला लागणाऱ्या डावपेंचांची तालीम घेत होते. याप्रमाणें बालवीरांच्या शाळा महाराष्ट्रांत सर्वत्र निघाल्या होत्या. पुढें रामभक्त रामदासस्वामींच्या प्रेरणेने दरएक तालमींत कडकडीत ब्रह्मचर्य, विलक्षण स्वामिनिष्ठा, शारीरिक व मानसिक सामर्थ्य हे गुण अंगीं असणाऱ्या 'बुद्धिमत्तां वरिष्ठम्' अशा मारुतीची स्थापना झाली. जितेन्द्रिय व ईश्वरभक्त असा हनुमान् तालमींच्या उस्तादांचा उस्ताद होऊन बसला. असो. मुक्तेश्वराच्या काळीं तालमींची सार्वत्रिकता होती म्हणून त्याच्या भारतांतही कुस्तीचें मनोहर वर्णन येऊं शकलें. राष्ट्राचा उत्कर्ष मुख्यतः राष्ट्रीय शरीरबळावर व लष्करी शिक्षणावर अवलंबून आहे.

भीम व जरासंध (सभा०, अ० ७) भीम व किर्मीर (वन०, अ० २), भीम व कीचक (विराट०, अ० ३), भीम व बकासुर (आदि०, अ० ३८), ह्या जोड्यांचीं मल्लयुद्धें किंवा कुस्त्या यांचीं वर्णनें इतकीं बारकाव्याचीं आहेत, कीं मुक्तेश्वर हा स्वतः आखाड्यांत उतरलेला असावा असें वाटतें! हे प्रसंग सर्व तरुणांनीं, विशेषतः मल्लयुद्धविशारदांनीं अवश्य अभ्यासिले पाहिजेत. ह्यांत वीररस मूर्तिमंत भरला आहे.

## १९ डोहळे!

ह्या काळीं रामकृष्णांच्या कथा गाणाऱ्या कवींच्या भावना काय होत्या तेंही त्या वाचणाऱ्यांच्या ध्यानांत आल्याशिवाय राहत नाहीं. उदाहरणादाखल रंगनाथस्वामींच्या 'रामजन्मा'वरील श्लोकांतून पुढील एकच उतारा देतों. राजा दशरथाचे वर्णन पहा—

**दशरथ रविवंशीं जन्मला पुण्यराशी**
**विबुधमुनि पुराणीं वर्णिती ज्या नराशी।**
**सदयहृदय चित्तीं सर्वदा भूतमात्रीं**
**अनुदिन रत शास्त्रीं नातळे दोष गात्रीं॥**

**विदितसकलविद्या वीरशार्दूल राणा**
**अनुपम शरयुद्धीं नाकळे शौर्य कोणा।**
**अनुकुळ सकळार्थी एक चिंता प्रजांची**
**अनुदिन मन तेणें राजयालागिं जांची॥**

माता कौसल्येचे रामजन्मापूर्वीचे डोहळे—

**स्थापूं सुरां निजपदीं, असुरांसि दंडूं,**
**पाषांड बंड अतिलंड कुमत्त खंडूं,।**
**सत्कर्म धर्म हरिभक्ति विरक्ति जोडूं,**
**संमोहशोक अविवेकसमूह तोडूं,॥**

**सत्यासि छत्र धरवूं, दुरितासि जाळूं,**
**गोब्राह्मणां विनत होउनि पूर्ण पाळूं, ।**
**दीनें अनाथ गतिहीन-तयां कृपाळूं**
**देऊनि अन्नधन कांचन आर्ति टाळूं, ॥**
**पीडा प्रजांसि न करूं, परबाध वारूं,**
**वेदानुवादविधिदूषक यांसि मारूं, ।**
**मातापितासुजन भाविक भक्त निंदी**
**घालूं तया यमपुरीस अघोर बंदीं ॥**

रामाचा जन्म देवांना असुरांच्या बंदींतून सोडविण्यासाठींच झाला —

**सुरगण दशवक्त्रें घातले बंदिशाळे**
**म्हणउनि रविवंशीं जन्मला हा स्वलीळे ।**

## २० शिसोदे यांचा वंश

वाकेनिसी टिपणांचा उल्लेख मागें केलाच आहे. त्या ३९ टिपणां-पैकीं ७।८ टिपणांवरून समर्थ व शिवराज यांचा संबंध फार पूर्वींचा होता हें सिद्ध होतें. श्रीसमर्थांच्या चरित्रसाधनांत ह्या टिपणांइतकें अस्सल व महत्त्वाचें असें दुसरे एकही साधन नाहीं, समर्थप्रताप ग्रंथही त्याच्याइतका ऐतिहासिक महत्त्वाचा नाहीं. समर्थांना वयाच्या ८ व्या वर्षीं (शक १५३८) श्रीरघुपतीची आज्ञा झाली कीं, 'शिसोदे याचे वंशीं शिवनामा होणार आहे त्यास उपासना सांगावी व धर्मस्थापना करवावी' (टिपण ६). या वेळीं शिवाजीचा जन्मही झाला नव्हता. शिवजन्म शके १५४९ मध्यें झाला व त्यानंतर पांचच वर्षांनीं (शक १५५४) समर्थ तीर्थयात्रेस निघाले तेव्हां 'शिवनामा उत्पन्न जाला कृष्णातीरास जावें,' (टिपण १२) अशी रामरायाची आज्ञा झाली! पुढें शके १५७१ मध्यें शिवाजी-महाराज यांस समर्थांचा अनुग्रह झाला (टिपण १८) हें आपण मागें पाहिलेंच आहे. समर्थ व शिवराय यांचा संबंध भगवत्संकल्पानें शिवाजीच्या

जन्मापूर्वींपासूनच होता हें ह्या तीन टिपणांवरून स्पष्ट होतें. आपण आतां शिवाजी, शहाजी व मालोजी यांचा थोडा इतिहास पाहूं व शिसोदे यांच्या राजघराण्याशीं त्यांचा कसा काय संबंध होता हें इतिहासग्रंथांच्या आधारें ठरवूं.

शिवाजी राजे यांचें घराणें उदेपूरच्या राजघराण्यांतून उदय पावलेलें आहे, अर्थात् भोसले हे जातिवंत क्षत्रिय होत. आपण राजपूत आहोंत, क्षत्रिय आहोंत याची जाणीव ठेवीत ते महाराष्ट्रांत आले. पुढें ते आपणांस मराठे म्हणवूं लागले. आदिलशाहींत जावळीचे चंद्रराव मोरे, फलटणचे रावनाईक निंबाळकर ( मूळचे परमार किंवा पवार ), वाडीचे सावंत व माने हे उदयास आले. साळुंखे, शितोळे, कदम, साळवी, शिंदे, चव्हाण हीं सारीं घरंदाज मराठ्यांचीं घराणीं अस्सल क्षत्रिय होत. हीं कशीं उदयास आलीं याचा एक नमुना म्हणून व आपल्या प्रस्तुत विषयास अवश्य म्हणून आपण भोसले घराण्याच्या इतिहासाकडेच थोडें लक्ष देऊं. मेवाडांत चितोड व शिसोदे येथें एकाच सूर्यवंशी घराण्याचीं दोन राज्यें होतीं. राणा रणसिंह ( इ० स० ११५८ ) यापासून १३ वा पुरुष अजयसिंह. त्याचे दोन पुत्र सज्जनसिंह व लक्ष्मणसिंह हे प्रतिकूल परिस्थितीच्या फेऱ्यांत सांपडल्यामुळें आपले नशीब काढण्यासाठीं दक्षिणेत आले ( इ० स० १३३४ ), व १३४७ सालीं अल्लाउदीन हुसेन कांगो याने कलबुर्ग्यास बहामनीशाहीची स्थापना केली तेव्हां त्या शाहीच्या नौकरींत शिरले. सज्जनसिंह याने व त्याचा पुत्र दिलीपसिंह यानें बहामनीशाहींत मर्दुमकीचीं कामें केलीं तेव्हां दौलताबादेकडे त्यांस जहागीर मिळाली व वेरूळ वगैरे ठिकाणीं पाटीलकीचे हक्क मिळाले. या घराण्यानें ८ पिढ्यांपर्यंत बहामनीशाहींत दुय्यमप्रतीचीं पराक्रमाचीं कृत्यें केलीं व लौकिक व पैसा मिळविला. १४७१ मध्यें ह्या घराण्यांतील कर्णसिंह व भीमसिंह यांनीं एक कोंकणी किल्ला घोरपड लावून घेतला. कर्णसिंह

धारातीर्थीं पतन पावला व भीमसिंहाला मुधोळची मोठी जहागीर व 'राजा घोरपडे बहादर' हा किताब बादशाहाकडून मिळाला! कर्णसिंहाचा भाऊ शुभकृष्ण हा दौलताबादेकडील जहागीर संभाळून होता. शुभकृष्णापासून तिसरा पुरुष बाबाजी भोसले म्हणजे शिवाजीराजे यांचा पणजा होय. तात्पर्य, उदेपूरच्या राजघराण्यांतले सज्जनसिंह व दिलीपसिंह यांच्या वंशांत शिवछत्रपति जन्मास आले ही गोष्ट अलीकडे इतिहासाच्या पुराव्यावरून अगदीं सिद्ध झाली आहे. राधामाधवविलासचंपू ह्या ग्रंथाने ही गोष्ट सिद्ध केली आहे. शहाजीराजांच्या जयरामकवीने शहाजीस शिसोदे स्पष्ट म्हटले असून मालोजीविषयीं त्याने म्हटलें आहे: 'महीच्या महेंद्रांमधें मुख्य राणा। द (दि) लीपास त्याचे कुळीं जन्म जाणा॥ तयाचे कुळीं माल भूपाल जाला। जयाने जले शंभु संपूर्ण केला' म्ह० पृथ्वीवरील राजांत प्रमुख जो उदेपूरचा राणा त्याचे घराण्यांतील दिलीपसिंह याचे कुळांत मालोजी राजे यांचा जन्म झाला व त्यांनीं शंभू महादेवाच्या डोंगरावर पाण्याचा उत्तम तलाव बांधला. भोसल्यांच्या घराण्यांतील अनेक शाखा झाल्या त्यांतील एका पुरुषाने देशमुखीच्या वतनासाठीं श० १५६६ मध्यें मुसलमानी धर्म स्वीकारला! त्याचा वंश निजामशाहींत परतूर मुक्कामीं वतन भोगीत असून त्या वंशांत नेहमीं एका मुलाचें नांव शिवाजी अगर छत्रपति ठेवण्यांत येत असतें! महमद शिवाजी, अहमद छत्रपति इ०. ही माहिती हैद्राबादचे केशवराव कोरटकर यांनीं प्रसिद्ध केली होती.

बहामनीशाही संपुष्टांत आल्यावर घोरपडे यांनीं विजापूरच्या आदिलशाहीची अशीच एकनिष्ठ सेवा केली व 'स्वामिनिष्ठ' म्हणवून घेतलें! दौलताबादेकडील भोसलेशाखेनें निजामशाही वांचविण्याचा प्रयत्न शहाजीपर्यंत केला. पुढें शिवरायांनीं सर्वच शाखा पायांखालीं दडपून स्वतंत्र मराठी राज्य स्थापन केलें! बाप शिसोदे राजघराण्यांतील रक्ताचा व आई जाधव घराण्यांतील. याप्रमाणें दोहींकडून क्षात्ररक्तामांसाचा हा पुतळा

क्षत्रियकुलावतंस व गोब्राह्मणप्रतिपालक निघाला यावरून रक्तशुद्धीचें महत्त्व केवढें आहे हें सिद्ध होतें! मधल्या कांहीं पिढ्या प्रतिकूल परिस्थितीपुढें लवल्या तरी शेवटीं शुद्ध रक्ताचा जोर झाल्याशिवाय राहत नाहीं, म्हणून रक्तशुद्धि व संस्कारशुद्धि संभाळणें हें हिंदु धर्माचें महत्त्वाचें अंग समजले जातें. मालोजी घोरपडे यांनीं विजापूरचा इस्माईल आदिलशहा हिंदूंच्या (विजयानगराचा राजा तिमराज याच्या) वेढ्यांत पुरा सांपडला असतां त्याचे प्राण वांचविले ( इ० स० १५२१ ) म्हणून त्या पातशाहानें मेहेरबानी करून मालोजी घोरपडे यास 'जमीनीपर्यंत लवून कुर्निसात करणें माफ केलें आहे, आतां संतुष्ट मनानें चाकरी करावी' अशी सनद दिली! घोरपडे यांनीं मुसलमानांची नोकरी करण्यांत कृतकृत्यता मानली, पण भोसल्यांनीं मुसलमानी सत्तेशीं झगडून आपलें स्वतंत्र राज्य स्थापिलें! एकाच घराण्याच्या दोन शाखा अगदीं एकमेकींविरुद्ध वागल्या! शिवछत्रपतींची आई जिजाबाई हिच्या घराण्यांत तिचे जनक लुकजी जाधवराव, राजारामकालीन सुप्रसिद्ध धनाजी जाधव व पुढें पिलाजी व शंभुसिंग जाधव अशी कर्तबगारीचीं माणसें जन्मास आलीं. भोसले, घोरपडे, वगैरे मराठ्यांचीं घराणीं, नगरची निजामशाही व विजापूरची आदिलशाही यांच्या काळांत उदयास आलीं. राज्यकारभारांत मोठमोठ्या हुद्द्यांवर ब्राह्मण मुत्सद्दी व मराठे वीर शिरकत चालले व शेवटीं शिवाजीमहाराजांना स्वतंत्र राज्य स्थापन करितां येईल इतकी राज्यकारभाराची माहिती पूर्वींच त्यांस झाली होती. दहादहा पांचपांच हजारांच्या मनसबदाऱ्या व मोठमोठ्या किल्लेदाऱ्या हिंदु पुढाऱ्यांना मिळाल्या होत्या. महाबळेश्वर, पन्हाळा, मुल्हेर वगैरे गडांवर, हिंदु राजांचीं राज्येंच होतीं. उत्तर हिंदुस्थानांत हिंदूंचा जसा अनन्वित छळ झाला तसा दक्षिणेंत न होण्याचें हें एक मुख्य कारण होतें. विजयानगर, तेलंगण, ओरिसा, वारंगळ, इत्यादि ठिकाणीं हिंदु राज्यें होतीं व पाळेगार, राजे, नाईक या नांवांनीं अनेक

छोटे मोठे सत्ताधारी महाराष्ट्रांतही होते. दक्षिणेंत हिंदूंना कोठें ना कोठें थोडा फार आसरा मिळण्यासारखा होता. बुऱ्हाण निजामशाहाचा पेशवा कावरसेन नांवाचा ब्राह्मण होता असें फेरिस्ता म्हणतो. आदिलशाहींत तर मराठ्यांना व मराठी भाषेला चांगलेंच उत्तेजन मिळालें. तेथें दप्तर मराठी भाषेंत ठेवूं लागल्यापासून ब्राह्मण कारकुनांचें व मुत्सद्द्यांचें चांगलेंच फावलें. मऱ्हाठ्यांना सरदाऱ्या मिळूं लागून समरांगणावर हमेष जाण्याचे प्रसंग प्राप्त झाले. जमाबंदीखातें ब्राह्मणांच्या ताब्यांत आले व याप्रमाणें मुत्सद्देगिरीचें व लढाईचें शिक्षण मराठ्यांस आधींच मिळाले होतें. त्याचा उपयोग शिवाजीराजे यांनीं पुरा करून घेतला ! लक्ष्मणसिंहापासून मालोजीपर्यंतचा ३०० वर्षांचा काळ भोसल्यांना बराच अडचणीचा व त्रासाचा गेला.

## २१ मालोजी राजे व शहाजी राजे

भोसले घराण्याचा खरा उदय मालोजीच्या कारभारांत झाला. मालोजी, त्याचा पुत्र शहाजी व शहाजीचा पुत्र शिवाजी अशा चढत्यावाढत्या ऐश्वर्यानें हे पुरुष महाराष्ट्रांत गाजले. हे तिघेही पुरुष कर्तबगारीचे निघाले. भोसल्यांच्या घराण्याने मुसलमानांची सेवा अधूनमधून आपद्धर्म म्हणून केली. मालोजीच्या पूर्वजांनीं कांहीं वतनवाडी व कांहीं गांवच्या पाटिलक्या मिळवून ठेवल्या होत्या. हीं त्यांचे उत्पन्नाचीं गांवें औरंगाबाद-वेरूळ, पैठण, नगर व पुणें या प्रांतांत होतीं. मालोजी खरे खरे महाराष्ट्रीय होते. मालोजीचा जन्म शक १४७४ (इ० स० १५५२) मध्यें झाला. तो व त्याचा भाऊ विठोजी हे सवडीप्रमाणें निजामशाहींत नौकरी करीत. मालोजी शरीरानें धिप्पाड व मजबूत असल्यामुळें त्याच्या स्वारीस घोडें टिकत नसे, म्हणून निजामशाहीचा मातबर सरदार लखूजी जाधव यांनीं त्याला देवडीवरच्या पाहरेकऱ्याचें काम दिलें ! मालोजीची भार्या उमाऻबा ही फलटणच्या जगपाळ निंबाळकरांची बहीण असून तिला बरींच वर्षे मूल

होत नव्हते. नगरजवळ शहाशरीफ नांवाचा मुसलमान अवलीया होता, त्याला उमाव्बानें नवस केल्यानंतर तिला दोन मुलगे झाले. त्यांचीं नांवें त्या पीराच्या नांवावरून शहाजी व शरीफजी अशीं ठेवण्यांत आलीं ! शहाजीचा जन्म चैत्र शुद्ध ५ जयसंवत्सर (इ० स० १५९४ मार्च ता. १८) या दिवशीं झाला. शहाजी पांच वर्षांचा असतांना शिमग्याचा सण आला व रंगपंचमीच्या दिवशीं सिंदखेडास जाधवरावांच्या वाड्यांत रंगपंचमीचा सण झाला. जाधवरावांची मुलगी जिजाबाई शहाजीहून एक वर्षानें लहान होती. रंगाचा खेळ चालू झाल्यावर शहाजी व जिजाबाई समवयस्कतेमुळें सहजच एकमेकांच्या अंगावर गुलाल व रंग उधळूं लागलीं ! तें पाहून जाधवराव कौतुकानें म्हणाले, ‘ हा जोडा किती सुंदर दिसतो पहा !’ उत्कर्षेच्छु मालोजींनीं ते शब्द उचलले व दरबारांत उठून म्हणाले, ‘ऐका हो ! जिजाबाई आजपासून आमची सून झाली व जाधवराव व्याही झाले !’ हें भाषण जाधवराव यांस बिलकूल आवडलें नाहीं. ‘ माझी श्रीमंताची मुलगी मी त्या शिपुरड्याच्या पोरट्याला देऊं देतें कीं काय ?’ म्हाळसाबाई संतापून नवऱ्याला म्हणाली ! दोघांच्या स्थितींत फारच अंतर ! पण मालोजी जाधवरावांची नोकरी सोडून निघाले व करीन तर जिजाबाईलाच सून करून घेईन अशी त्यांनीं प्रतिज्ञा केली ! शिसोद्यांचें कुलदैवत एकलिंगजी, त्याची त्यानें एकनिष्ठ उपासना केली व हरप्रयत्नानें द्रव्यप्राप्ति केली. उपासनाबळानें मालोजींस भूगत मोहरांचे हंडे सांपडले. त्यांनीं तें द्रव्य श्रीगोंद्याचे शेषाप्पा नाईक पुंडे या सावकारा-पाशीं ठेवलें, पदरीं पुष्कळ लष्कर ठेवून परोपकाराचीं धार्मिक कृत्यें करून मोठा नांवलौकिक मिळविला. त्यांनीं वेरूळच्या घृष्णेश्वराच्या देवळाचा जीर्णोद्धार केला व शिंगणापूरच्या महादेवाच्या डोंगरावर मोठा तलाव बांधून यात्रेकरूंच्या पाण्याची उत्तम सोय केली. त्यांनीं माणसें जमविलीं व द्रव्य जोडलें. जाधवराव व मालोजी यांच्यांत वितुष्ट कां पडलें हें जाधवरावांचा

मालक निजामशाह याच्या कानावर गेलें व त्यानें व त्याचा मुख्य कारभारी मलिकंबर यानें जरा जरब लावून व गोडीची मध्यस्थी करून जाधवरावांना आपली मुलगी मालोजीच्या मुलास द्यावयास भाग पाडलें! शहाजी व जिजाबाई यांचा विवाह मार्गशीर्ष शुद्ध ५ शके १५२० रोजीं मोठ्या थाटानें झाला! मालोजींना निजामशाहींतून पंचहजारी मनसब, शिवनेरी व चाकण हे दोन किल्ले आणि पुणे व सुपें हे दोन परगणे जहागीर मिळाले! मालोजींची प्रतिज्ञा खरी झाली व शहाजीचा विवाह त्यांच्या उत्कर्षाला कारण झाला. मालोजींची कर्तबगारी पाहून निजामशाहाला असला मोहरा जोडावा असें वाटलें. अकबराशीं निजामशाहीचें युद्ध सुरू होतें व आपल्या बाजूला जाधवराव व भोसले असले मातबर सरदार असावेत असा मलिकंबराचा राजकीय डाव होता! मात्र जाधवराव व भोसले यांची सगाई झाली तरी सलोखा झाला नाहीं! त्यांचें वैर उत्तरोत्तर वाढतच गेलें. तथापि या जबरदस्तीच्या विवाहाला एक अत्यंत मधुर फळ आलें आणि तें म्हणजे शहाजी व जिजाबाई यांच्या पोटीं शिवरायाचा जन्म शिवनेरी किल्ल्यावर झाला. शिवाजीचा जन्मदिवस शके १५४९ वैशाख शुद्ध २ गुरुवार ( इ० स० १६२७ एप्रिल, ता० ६ ) होय. मागाहून दुसरी एक जन्मतीथ पुढें आली आहे, व याबद्दल वादही पुष्कळ झाला आहे तरी अनेक गोष्टींशीं जुळणारी हीच जन्मतीथ बरोबर आहे असें मला वाटतें. बावड्याचे पंत अमात्य यांच्या दप्तरांतील जुन्या कागदपत्रांत मालोजींविषयीं पुढील मजकूर आढळतो: "राजश्री मालोजी राजे ईश्वरभजनीं तत्पर, गोब्राह्मणांचे प्रतिपालक, निरंतर साधुसज्जन भले रयत यांचे प्रतिपालक, दुष्टांचा निःपात करणारे. मालोजी राजांनीं शिखरीं तळें बांधिले, जीवन केलें, इमारती केल्या, जनयात्रा येऊं लागली." मालोजी भोसले शके १५४२ ( इ० स० १६२० ) मध्यें वारले. त्यांचा कारभार सारा शहाजींनीं बालवयांतच आवरला होता.

पुढें मोगलांशीं निजामशाहीचीं युद्धें झालीं त्यांत जाधवराव मोगलांस मिळाला व शहाजी निजामशाहीच्या बाजूनें लढत होते. सासरे जावई समोरासमोर लढत होते! शहाजी मलिकंबराच्या तंत्रानें शेवटपर्यंत चालत असत. निजामशाही, आदिलशाही व मोगल यांच्या युद्धप्रसंगांचीं विस्तृत वर्णने इतिहासग्रंथांत पुष्कळ आहेत. त्यांशीं आपणांस येथें कांहीं कर्तव्य नाहीं. मलिकंबराने निजामशाही वांचविण्यासाठीं २५ वर्षें मोगलांशीं प्रचंड संग्राम केला त्यांत मालोजी व शहाजी यांनीं मोठाले पराक्रम करून कीर्ति मिळविलीच पण राजकारणाचा व युद्धशास्त्राचा शहाजींस मोठा अनुभव मिळाला. गनीमी काव्याच्या युद्धपद्धतीनें त्यांनीं मोगलांस हैराण केले. मोगलांशीं युद्ध करण्याचें शिक्षण मराठ्यांस मिळाले. भातवडीच्या संग्रामांत शहाजींनीं मोठा पराक्रम केला तेव्हां हा डोईजड होऊं नये म्हणून मलिकंबरानें त्यांची जहागीर कमी केली, तेव्हां मानी शहाजींनीं आदिलशाहीचा आश्रय केला व आदिलशाहानें त्यांस सरलष्कर म्हणजे सेनापति करून मावळांतील प्रदेश हस्तगत करण्यास पाठविलें. तें शहाजींस इष्टच होतें. पुढें लौकरच मलिकंबर मरण पावला व विजापुरीं गेल्यावर शहाजींनीं मोहित्याची तुकाबाई हिच्याशीं लग्न केलें. तिच्या पोटीं व्यंकोजी राजे जन्मास आले (शक १५५२, इ० स० १६३०). निजामशाहाचा वजीर फत्तेखान याने शहाजींची पुणें प्रांतींची जहागीर त्यांस परत देऊन पुन्हा आपल्यांत मिळवून घेतले. मार्च १६२८ रोजीं संपूर्ण पुणें परगणा शहाजीराजे यांच्या कबज्यांत आला. शहाजी पुन्हा निजामशाहीचे मुख्य सरदार झाले व त्यांनीं मोगलांवर चढाई केली. मध्यें दीड वर्ष मोगलांची ताबेदारी पत्करणें त्यांस भाग पडलें, पण प्रसंग येतांच त्यांनीं पुन्हा निजामशाहीस हाताशीं धरिले. शके १५५२।५३ हीं दोन वर्षें नाशिक, सिन्नर, संगमनेर हा टापू शहाजींकडे होता.

## २२ शहाजी राजे व समर्थ

शके १५५२।५३ मध्यें शहाजीराजांचा अमल जुन्नर, संगमनेर, नाशिक, त्र्यंबकपर्यंतच्या प्रांतावर होता. दोन वर्षांचे पावसाळे त्यांनीं नाशिक येथें राहूनच काढले. शहाजीराजे मालोजींप्रमाणे धर्मनिष्ठ व साधुसंतांविषयीं पूज्यता बाळगणारे होते. समर्थांची उग्र तपश्चर्येमुळें व उत्कट रामभक्तीमुळे ख्याति झाली होती. तेव्हां शहाजीराजे या काळांत समर्थांची भेट घेतल्याशिवाय राहिले असतील हें संभवनीय दिसत नाहीं. त्यांच्या अनेकवार भेटी व संभाषणे झालीं असण्याचा पूर्ण संभव आहे. धर्मरक्षणासाठीं काय उपाय योजावेत, महाराष्ट्र मुसलमानांच्या पकडींतून कसा सोडवावा, याविषयीं त्यांच्या चर्चाही झाल्या असतील! शहाजीराजे केव्हां तरी जुन्नरास जाऊन बालशिवाजीला पाहून आले असतील. त्याचें टिपण व सामुद्रिक चिन्हें समर्थांना त्यांनीं सांगितलीं असतील व समर्थांच्या मनांत त्याच्याविषयीं विशेष प्रेमही उत्पन्न झालें असेल. शिवराय त्या वेळीं ४ वर्षांचे होते. 'शिसोदियांचे वंशीं शिवनामा होणार' असें त्यांना रामरायांनीं सांगितले होतेच. तीच अवतारमूर्ति ही अशी त्यांनीं आपल्या मनाशीं खूण पटवून घेतली असेल. देशस्थिति प्रत्यक्ष पाहून यावी म्हणून समर्थांनीं शके १५५४ पासून १५६६ पर्यंत भरत-खंडभर हिंडून तीर्थयात्रा केल्या व ते शके १५६६ मध्यें मसूर येथें गेले व पुढील ५।६ वर्षांत त्यांनीं मसूर ते कोल्हापूरपर्यंतचा सर्व टापू आपल्या कक्षेंत आणून आपल्या संप्रदायाची उभारणी केली व १५७१ मध्यें शिवराय व त्यांचे मुख्य मंत्री यांजवर अनुग्रह केला. ही हकीकत पुढील प्रकरणीं सांगण्यांत येणार आहे. पण समर्थांनीं कृष्णातीरच आपल्या चळवळीसाठीं कां पसंत केला व ते मसूरलाच कां राहिले याला एक कारण आहे व त्यावरून शहाजी—समर्थांचा संबंध शके १५५३ पासूनच होता असें मानण्यास बळकटी येते. शहाजीसारखा कर्तबगारीचा व स्वधर्मरक्षक असा

कोणी मराठा क्षत्रिय समर्थांस आढळला नव्हता, तेव्हां त्याचा जेथें अंमल चालू आहे तेथेंच आपलें ठाण मांडावें असें समर्थांस साहजिकपणें वाटलें. मसूर परगणा शहाजींच्या जहागिरींत शके १५६६ पूर्वींच आला होता. 'मसूर परगणा शहाजी राजानें जहागीर घेतली आणि मसुरीच्या कोटामध्यें आपलें ठाणें ठेवलें' असें जगदाळे आपल्या एका पत्रांत म्हणतो (म० इ० सा०, खंड १५, पृ० १५). कदाचित् शहाजीराजांनीं पूर्वपरिचयामुळें त्यांस तेथें बोलावूनही घेतलें असेल. कऱ्हाडची देशमुखी शके १५६१ पासून शहाजीराजे यांजकडे होती. यामुळें समर्थांना तिकडे पाय पसरायला सवड मिळाली. शके १५६७ च्या श्रीरामनवमीच्या उत्सवास शिवाजी व बहुधा शहाजीही हजर होते. शके १५७० ला शिवरायांनीं पहिलें पत्र पाठविलें त्यांत 'तुमचे देशीं वास्तव्य केले। परंतु वर्तमान नाहीं घेतलें। ऋणानुबंधें विस्मरण जाहले। काय नेणों' अशी एक ओवी आहे. पूर्वींच्या परिचयाशिवाय 'विस्मरण जाहलें' या प्रेमाच्या रुसव्याला किंमत काय? तात्पर्य शहाजी व समर्थ यांचा परिचय फार जुना होता हें निश्चित दिसतें.

## २३ समर्थकालीन एक अज्ञात मराठी राज्य

मुक्तेश्वराला ज्या स्वराज्याचें स्वप्न पडत होतें व हिंदु राजा कसा असावा याचें तो आपल्या भारतांत वर्णन करीत होता व ज्या धर्मराज्याची समर्थांना तळमळ लागून राहिली होती तसल्या जातीचे एक छोटेंसें स्वराज्य त्याच वेळीं महाराष्ट्रांत नांदत होतें, पण त्याचें महाराष्ट्रास आज २५०।३०० वर्षें पुरें विस्मरण झालेलें आहे! मला त्या राज्याचा पत्ता जुन्या मराठी काव्यग्रंथांत लागला व मी ऑगस्ट १९३५ च्या, 'केसरी' च्या एका अंकांत 'शिवपूर्वकालीन एक अज्ञात हिंदु राज्य' या मथळ्याखालीं एक लेख लिहून प्रसिद्ध केला. भोसले हे राजपुतान्यांतून महाराष्ट्रांत

येऊन बहामनीशाहीच्या वेळीं डोकें वर काढण्याच्या प्रयत्नांत होते त्याच वेळीं तसेंच एक दुसरें रजपूत घराणें नाशिक जिल्ह्यांत बागलाण प्रांतांत आलें व साल्हेरमुल्हेरच्या किल्ल्यावर आपलें स्वतंत्र राज्य स्थापून दोन तीन शतकें राज्यसुख भोगीत होतें. भोसले जसे महाराष्ट्रीय झाले तसे तेंही घराणें अंतर्बाह्य पूर्ण महाराष्ट्रीय झालें होतें. त्याच्या आश्रयांत 'कथाकल्पतरु' नांवाच्या प्रचंड मराठी ग्रंथाचे कर्ते कृष्ण याज्ञवल्की हे समर्थ पंचवटींत अनुष्ठान करीत असतांना नाशकासच राहत होते!

कृष्ण याज्ञवल्की व मधुकर कवि ही मराठी कवींची जोडगोळी शक १४७० ते १५४० (इ० स० १५५८ ते १६२८) च्या दरम्यान नाशिक जिल्ह्यांत हयात असून या दोघांनीं मिळून 'कथाकल्पतरु' नांवाचा ३९००० ओव्यांचा एक प्रचंड मराठी ग्रंथ लिहिलेला आहे. ह्या ग्रंथाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. पूर्वार्ध कृष्ण याज्ञवल्की यांनीं लिहिला असून त्याचे अध्याय १२६ आहेत व ओवीसंख्या वीस हजारांवर आहे. उत्तरार्ध मधुकर कवीनें लिहिला असून त्याचे १४९ अध्याय आहेत व ओवीसंख्या १८७०० आहे. सदर ग्रंथ जगदीश्वर प्रेसनें श० १८१५ मध्यें छापून प्रसिद्ध केला आहे. कृष्ण याज्ञवल्की आटोपल्यावर त्यांचा श्रोता व शिष्य जो मधुकर कवि त्यानें उत्तरार्ध लिहिला व त्यानें ग्रंथसमाप्तीचा काळ शके १५४५ म्हणजे १६२३ हा दिला आहे. सर्व ग्रंथाची रचना इ० स० १६०० ते १६२३ च्या काळांत झाली. कृष्ण याज्ञवल्की यांनीं आपला पूर्वार्ध नाशिक क्षेत्रीं लिहिला व उत्तरार्ध नाशिक जिल्ह्यांतीलच साल्हेरगडावर राजधानींत मधुकर उर्फ महादेव कवीनें रचिला (माझा 'मराठी वाङ्मयाचा इतिहास,' खंड २, पृ० ५९८ ते ६०२ पहा). मधुकर कवीनें गडावरील समकालीन हिंदु राजाचें, राजनगरीचें व तेथील लोकांचें मौजेचें वर्णन केलें आहे. तें पूर्ण ऐतिहासिक आहे व त्यावरूनच आजवर अज्ञात असलेल्या

एका महाराष्ट्रीय स्वराज्याचा इतिहास मिळतो आहे. आठव्या स्तबकांत पुढील माहिति दिलेली आहे —

गोदेच्या उत्तरतीरीं व 'तपतीदक्षिणतीरामाझारी' म्हणजे गोदेच्या उत्तरेस व तापीच्या दक्षिणेस 'बागल' (बागलाण) देश प्रसिद्ध आहे. त्या देशांत शैल आणि मयूर असे दोन पर्वत आहेत. त्या मयूराद्रीच्या पठारावर वाटिका नामक नगरी आहे. 'तेथें सोमवंशी राठोडरावो। वासिष्ठ-गोत्री महाबाहो' असा नारायणशाह हा राज्य करीत असे. तो प्रजापालक व क्षात्रधर्मीं तत्पर असून प्रजाप्रिय होता. त्याची स्त्री गंगा ही सती-धर्मपरायण होती. त्या राजाला दोन पुत्र—एक प्रतापशाह व दुसरा हरिबा. प्रतापशाह हा जणूं कृष्णसुत प्रद्युम्न याचा अवतार होता. हा राज्यकारभार चालवी. त्याची स्त्री द्यांबाई. त्याला तिजपासून दोन पुत्र झाले—१ बहिरामशाह व २ जयदेव. जयदेव आपला सारा काल हरिभजनांत घालवी. बहिरामशाह हा क्षात्रधर्मीं अखंड तत्पर असे. हा शूर, राजकारणनिपुण, धर्मिष्ठ व विद्वानांचा औदार्यपूर्वक परामर्श घेणारा होता. त्यानें मधुकर कवीचें मुलासारखें संगोपन केले व त्यास राजकारणार्थींही प्रयोजिलें. (स्त० ८, अ० ३३)

**बागलाणांतील प्रदेशांत**

> **प्रद्युम्नाचे ज्येष्ठ कुमरें। बहिरामश्याह नृपवरें।**
> **आज्ञा केली म्हणोनि आधारें। रचिला ग्रंथ ॥ २०९ ॥**
> **त्या रायाचे सभेआंत। चतुःशास्त्रवेत्ते पंडित।**
> **पुराणचर्चा अखंडित। असे जयासी ॥ २१० ॥**
> **त्या सकळांचे आधारें। ग्रंथ रचिला मतांतरें।**

मधुकर कवीनें आपल्या अन्नदात्या राजाचें केलेलें वर्णन वर दिलें आहे. आतां त्याच्या राजधानीचें वर्णनही त्यानें केलेलें पाहूं. हें शिवपूर्वकालीन हिंदु राज्य बागलाण प्रांतांत होतें. शिवाजीमहाराजांच्या पूर्वीचें, मुसलमानांचें पाऊल

**राजधानीचें वर्णन**

त्या प्रांतांत पडण्यापूर्वीचें, हें चित्र आहे. त्या वेळच्या हिंदु संस्कृतीचा हा एक सुंदर नमुना आहे. म्हणून मी त्याची कवीच्या शब्दांतच ओळख करून देतों. 'त्रिगिरी' किंवा 'त्रिपर्वत शोभिवंत' त्यावर ही राजधानी वसलेली आहे.

**मोरामोरी हरगड । त्रिकूटाचळवत् अवघड ।**
**कज्जलवर्ण निसळा । निघोट अत्युन्नत नितळा ।**
**ऊर्ध्व निहाळितां डोळां । भ्रमगिरी येतसे ॥ ६१ ॥**
**अश्वत्थवृक्षांच्या परंपरी । वरी पत्रांच्या सघन हारी ।**
**गगनचुंबित शोभा थोरी । नानापल्लवीं ॥ ६४ ॥**
**श्वेत पीता आणि मंजिष्ठा । कृष्णा हरिता पिंगटा ।**
**नाना रंगीं वरिष्ठा । रंगलिया कीं ॥ ६५ ॥**
**तये पौळी-अंतर्निष्ठें । भडिमारयंत्रें श्रेष्ठें ।**
**पंचरसीं निघोटें । अप्रतसें अभंगें ॥ ६६ ॥**
**जयांचिये आगा जी । मद सांडिले दिग्गजीं ।**
**दुरापातित्वें झुंजीं । अरिनाशक ॥ ६६ ॥**

गड चढून जाण्यास 'विविध सोपानमार्ग' केले असून—

**तेथ दारवंटेयाची रचना । कोरीव विचित्र आहे ॥**
**दोहीं भागीं बुरुज थोर । त्यांची घडणी केली सुंदर ।**
**कुंभियाद्वारशाखा अपार । विचित्रपणें ॥ ७८ ॥**
**इंद्रबाहे उंबरवट । कवाडें लोहमय बळकट ।**
**पाषाणमय निघोट । केली घडणी ॥ ७९ ॥**
**त्रिगिरीच्या मध्यभागीं । पाठार असे उत्तरांगीं ।**
**तेथ नगरी अनुपम्य जगीं । वाटिका नामें ॥ ८१ ॥**
**ठायीं ठायीं मार्ग रोखे । तप साधिलेती निकें ।**
**जो भडिमार साहों सके । ऐसा विरळा गाजी ॥ ८८ ॥**
**सशस्त्र दारवंटेकारी । बैसले असती निरंतरीं ।**
**मुंगियेही रीघ भीतरीं । नाहीं परीक्षेवांचोनी ॥ ९६ ॥**

प्रत्येक दारवंट्यावर गणेश, हनुमंत व चंडिका लोकांचे रक्षणार्थ बसलीं आहेत. नानाविध शस्त्रधारी, बाणकरी, वोडाणिये व कुंतकार पौळीचें रक्षण करीत आहेत. शहराची रचना अपूर्व आहे. ठायीं ठायीं महाप्रौढीचीं भव्य व रमणीय जलाशयें आहेत. ब्राह्मणादि चारी वर्ण व अठरा याति यांचीं लहानमोठीं मजबूत घरें आहेत. भाग्यवंतांनीं बांधलेलीं अनेक देवळें असून 'सर्वजन पूजिती प्रेममेळें' व लोकांच्या भक्तीला वश होऊन देवता गडांचे रक्षण करतात. 'ब्रह्मपुरीं'त अनेक विद्वान्, शास्त्री, वैदिक ब्राह्मण आनंदांत राहत आहेत. त्या ब्राह्मणांत 'शुक्ल मुळिये दीक्षित। जोशी पाठक पंडित। अग्निहोत्री, बडुवे, वैद्य' हीं घराणीं मुख्य आहेत ( हीं घराणीं पुढें नाशिकास येऊन राहिलीं ).

**वैभवाची विविधता**

**क्षत्रिय असती बळाचे। शूर राजकुळीचे।**
**ते सशस्त्र पुरुषार्थाचे। मूर्त देवावतार॥ १०७॥**

त्यांचे मोठमोठे चौकाचे भव्य वाडे आहेत.

**'चातुर्य कळा कुशळता। लघुलाघव विद्यापूर्णता'**

साऱ्या नगरींत नांदत आहेत. वाणिये, स्वईकार, सराफ, रत्नपरीक्षक, शिंपी, वस्त्रदोसी इ० व्यापारी पट्टणांत भरलेले आहेत. 'देशोदेशींच्या वस्तु अनेका। वाणिये विकिताती॥'

**हिरे पाच माणिकें। नवरत्नादि अमोलिकें।**
**जडितालंकार नेटके। घडिती स्वर्णकार॥ ११६॥**
**नाना खुमाशीच्या जाती। कडोविकडी भासती।**
**शिंपी वस्त्रें शिवताती। नाना मेचूंचीं॥ ११८॥**
**गंधवादी अनेक। बुके फरास सुगंधादिक।**
**कस्तुरी केशर जवादी देख। विकिती अत्तरें॥ १२१॥**
**सूत्रगुंफित पुष्पलेणीं। ग्राहिकां वेंचिती माळणी।**
**तेणें काम प्रदीप्त होऊनि। रामा रंगती एका॥ १२३॥**

**नागवल्लीचीं सुष्ठु पानें । चोखीं सुरंगी पीतवर्णें ।**
**मुखशोभा शुद्धीकरणें । विकिती पत्रकेणिये ॥ १२८ ॥**
**व्यापार करिती उत्साहें । वर्तती स्वधर्में न्यायें ।**
**अंतःकरणीं शंका नये । कोणेही अर्थी ॥ १२९ ॥**
**ठायीं ठायीं हरिकीर्तनें । होती वैष्णवांचीं गायनें ।**
**पंडित सांगती पुराणें । श्रोते सावधानें परिसती ॥ १३० ॥**
**गुलाल सुगंधी उधळिती । धूपदीप उज्वलिती ।**
**मंगळार्तिया म्हणताती । नारीनर ॥ १४२ ॥**
**तालमृदंग बांगडे । गाती नाचती देवांपुढें ।**
**सुगंध तैलें टिळे विडे । देती भक्त भक्तां ॥ १४४ ॥**

ह्या मठ-मंदिरांतून 'राया रंका सम परी । कोणी कोणातें न धिक्कारी' असा बंधुभाव आहे.

ह्या वाटिका नगरींत राजकुमारांचे नानाकुसरी रचलेले भव्य प्रासाद असून 'अश्वगज उष्ट्रादिक । द्वारीं शोभती अनेक' असा थाट आहे. वाद्यें, निशाणें, दुंदुभी गर्जतात.

**'निगूढ रचना'**

**'कटिबंधा कटारिया । खड्गें तरवारी फिरंगिया'**

असे राजपुरुष नेहमीं सज्ज आहेत. घड्याळेंही आहेत, ठोके वाजतात. (घड्याळें वाळूचीं) 'घटिका दिनमाननेमेसी । घावो घालिती घडियाळेसी ।'

भद्रधाम म्हणजे मुख्य राजवाडा पाहा —

**तळ शोधूनि चिरेबंदित । ओटे बांधिले सोपानयुक्त ।**
**तयाभीतरीं अगणित । तळघरें देखा ॥ १६५ ॥**
**वरी अभंग समस्तळ । भूमिका निघोट निखळ ।**
**त्यावरी स्तंभ थारविले सबळ । सुकुंभिया कळासोनी ॥ १६६ ॥**
**हिंगुटा गजदंतादि नवरंग । सारिले यथास्थानीं सुरंग**

* * *

**भिंगें बैसविलीं भिंती । बैसका केलिया निगुती ।**
**भद्रशिळा खांबीं शोभती । वल्लीप्राय ॥ १७१ ॥**

हे बाह्यरचना. 'अंतर उभावणी न कळे मज!' वाड्यांत सारी 'निगूढ रचना' केलेली आहे, तथापि 'घराची वोजव्यवस्था। अंगण सांगे हे लोकवार्ता' म्हणजे 'घराची कळा आंगण सांगतें' ह्या म्हणीप्रमाणें साऱ्या भद्रधामाची कल्पना करावी! 'मुंगीये प्रवेश नाहीं जाणा!' भद्राच्या उत्तरेस राजा व दक्षिणेस राजबंधु जयदेवराव राहतात. 'पृष्ठभागीं राणियांचे महाल' आहेत व त्यांचा 'प्रतिपाळ कीजे मातुश्रिया', त्यांच्यावर देखरेख राजमातेची आहे. राजघराण्यांत एकोपा आहे. 'नृपनाथ बहिरामश्याह' हे न्यायनीतीनें राज्य करीत आहेत. त्यांच्या भोजनकाळीं 'अन्नोदकादि सेव्यपदार्थ ते मातृहस्तें' सेवन करतात! वाड्यांत राजाजवळ 'अंगलग विश्वासिये नेमस्त सेवक' असतात.

अशा बहिरामश्याहांच्या राजसभेंत धर्मचर्चा नित्य चालत असते व

**ग्रंथसमाप्तीचा काल**

त्या सभेंत चतुःशास्त्रवेत्ते पंडित यांच्यासमवेत राजासमक्ष मी कथाकल्पतरूचे हे सात स्तबक संपूर्ण केले असें कवीनें म्हटलें आहे.

ग्रंथसमाप्तीचा काळ कवीनें दिला आहे –

**विक्रमार्कसमयासी। संवत् जाणिजे सोळाशें ऐसी।**
**कीं शालिवाहन शकासी। पंधराशें पंचेचाळीस ॥ २०६ ॥**
**रुधिरोद्गारी संवत्सर। विजयादशमी सोमवार।**
**तैं पूर्ण जाहला ग्रंथ। राजसंनिधानीं ॥ २७८ ॥**

बहिरामश्याह नीतीनें राज्य करीत असतां त्याच्या पंडितांनीं गजबजलेल्या सभेंत –

**तयासमक्ष सकळिक। कथाकल्पतरूचे स्तबक।**
**म्यां संपूर्ण केले सम्यक। शोधोनियां ॥**
**ऐसा कल्पतरू सासिन्नला। कथाफळभारीं पाडासि आला।**
**भवदवतप्ता विश्राम जाहला। त्याचिये छाये ॥**

**इतिहासाची कसोटी**

हें सारें वर्णन पूर्ण ऐतिहासिक व यथातथ्य आहे हें मला आतां दाखवावयाचें आहे. त्रिकूट किंवा त्रिशृंग पर्वतावर ही वाटिकनामक राजधानी वसली असून अतिसंपन्न होती. त्रिकूट कोणतें? नाशिक गॅझिटीअरमध्यें लिहिलें आहे –

"Mulher (मुल्हेर) is half reached from a range of mountains which rises westward till it culminates in Saler (साल्हेर). The hill has three fortified peaks near one another, Mulher in the middle, Mora to the east and Hatgad to the west."

नाशिक जिल्हा, बागलाणासकट, तेराव्या शतकापर्यंत देवगिरीच्या यादवराजांच्या अमलांत होता. बागलाणची राजधानी साल्हेरमुल्हेरच्या किल्ल्यावर होती. पांडवांच्या वेळीं मयूरध्वज व ताम्रध्वज यांचें राज्य बागलाणप्रांतींच होतें. ते या किल्ल्यावर राहत असत. यादवांचें राज्य बुडाल्यावर शक १२६२ (इ० स० १३४०) मध्यें तेथें मानदेव नांवाचा हिंदु राजा राज्य करीत असे, असे उल्लेख मुसलमानांच्या तवारिखींत आहेत. नारायणशाह, प्रतापशाह, बहिरामशाह व भारजीशाह ह्या घराण्यानें बागलाण प्रांतावर राज्य केल्याचें स्पष्ट आहे. शक १५५९ (इ० स० १६३७) मध्यें हा प्रांत मुसलमानांच्या ताब्यांत जाईतोंपर्यंत तेथें सतत हिंदूंचें राज्य होतें व पुढें तरी २५।३० वर्षांनंतर तें मोरोपंत पिंगळे यांनीं जिंकून मराठी राज्यास जोडलें. तें प्रायः १८१८ पर्यंत मराठी राज्यांतच मोडत होतें. बागलाण प्रांत, ३०।३५ वर्षांची वजावट केली तर, १८१८ पर्यंत स्वराज्यसुख पूर्णपणें अनुभवीत होता.

**मराठी साम्राज्यांत**

ऐनी अकबरी, इलियट व डॉसेन यांचे गुजराथचे इतिहास, इत्यादि ग्रंथांतून बागलाणच्या ह्या हिंदु राज्याचे उल्लेख आहेत. प्रतापशाह व बहिरामशाह हे राठोड (रजपूत)

घराण्यांतले होते. पण ते महाराष्ट्राशीं इतके एकजीव झाले होते कीं, त्यांचे सर्व व्यवहार मराठी भाषेंतच होत. बहिरामशाह याच्या सदरेंत मधुकर कवि आपला कल्पतरु ग्रंथ वाचून दाखवी. महादेव, राम व गणपति यांचीं मंदिरें मोडकळलेल्या स्थितींत आजही तेथें आहेत व गणपतिमंदिराचा सभामंडप शके १५३४ परिधावी संवत्सरीं बांधल्या-बद्दलचा त्यावर मराठी चार ओळींचा शिलालेख आहे व तो देवनागरी लिपींत आहे. तो प्रतापशाह यानें खोदविला आहे. 'राजा राठोड जातीचा असून त्याचेपाशीं ८ हजार घोडदळ व ५ हजार पायदळ सज्ज आहे,' असें ऐनी अकबरींत ( इ० स० १५९० ) म्हटलें आहे.

इ० स० १५९० मध्यें अकबरानें साल्हेरमुल्हेरचा किल्ला घेण्याचा प्रयत्न केला. त्याने सात वर्षें किल्ल्याला वेढा दिला, पण त्याचें कांहीं चाललें नाहीं. अकबरानें शेवटीं प्रतापशाह यास उलट कांहीं गांवें देऊन त्याच्याशीं समेट केला! पुढें इ० स० १६३७ मध्यें भारजीशाह याचेवेळीं गड व राज्य मुसलमानांनीं घेतलीं! हा बागलाण प्रांत इ० स० १६७० पर्यंत ३३ वर्षें मुसलमानांच्या अंमलाखालीं होता. त्या मगरमिठींतून त्याला शिवाजीमहाराजांचे पराक्रमी व राजकार्यधुरंधर असे मुख्य प्रधान, मोरोपंत पिंगळे, यांनीं सोडविलें व मराठी साम्राज्यांत मिळवून घेतलें ( इ० स० १६७०–७२ ).

असा ह्या एका अज्ञात हिंदु ( महाराष्ट्रीय म्हणण्यास हरकत नाही ) मराठी राज्याचा इतिहास आपणांस मराठी काव्यग्रंथांत मिळाला व नाशिक जिल्ह्याचें गॅझेटिअर व इतर इतिहासग्रंथ यांत त्याचा पडताळाही पाहण्यास मिळाला. हें बागलाणचें राज्य आपला प्रांत संभाळून होतें, पण एवढ्यानें समर्थ व शिवराय यांची व महाराष्ट्रीयांची तृप्ति होणारी नव्हती. त्यांना मुसलमानांच्या पकडींतून 'हिंदुस्थान' सोडवायचें होतें. सर्वभर हिंदु संस्कृतीचा जयजयकार करावयाचा होता. शिवराजाची मुद्रा

'वर्धिष्णु व विश्ववंदिता' अशी होती. पुढें होणाऱ्या अफाट मराठी साम्राज्याची प्रभात नुकतीच होत होती व त्यासाठींच समर्थ व शिवराय निर्माण झाले होते. समर्थांनीं आपल्या कार्याची दिशा ठरविली व शिवरायास साह्य करण्याकरितां कृष्णातीरीं समर्थसंप्रदायाची उभारणी केली. तो वृत्तान्त पुढील प्रकरणांत पाहूं.



# ६ कृष्णातीरीं संप्रदायाची उभारणी



**त्याग केला सर्व उपासनेलागीं । निस्पृहता अंगीं कडकडीत ॥**
**कडकडीत निस्पृहता समर्थातें । जगदोद्धारातें भक्ति केली ॥**
**भक्ति केली श्रेष्ठ अधिक वाढली । उपासना केली आधीं पुढें ॥**
**आधीं पुढें रामनौमीचे उत्छाव । मग समुदाव दर्शनासी ॥** (गिरिधर)

१ सहा वर्षांचा उत्कर्षाचा काळ. २ पहिलें शिष्यमंडळ. ३ मारुतिमूर्तिस्थापना. ४ पचवटीच्या बाळमित्रांना समर्थाचें पत्र. ५ चाफळचें देवस्थान. ६ रामदासी संप्रदाय व त्याचें वैशिष्ट्य. ७ समर्थ व शिवराय यांची भेट—हनूमंतस्वामींची बखर, वाकेनिसी टिपणें, अमात्यांचें वंशवृत्त, तुकोबांची भेट. ८ समर्थांची भूतदया—तीन गोष्टी. ९ एकवीससमासी—श्रोता आणि वक्ता, निंदा आणि निंदक. १० समर्थरामायण-लंकेचें वर्णन, महारण्यें व झाडखडें, वीररसाची वाणी, ११ लघुरामचरित्र.

## १ सहा वर्षांचा उत्कर्षाचा काळ

शके १५६६ ते १५७१ हा सहा वर्षांचा काळ तुकोबा, रामदास व शिवाजी ह्या तिघांच्याही चरित्रांत उत्कर्षाचा आहे. तुकोबांची परमार्थसिद्धि पूर्ण होऊन त्यांच्या कीर्तनभक्तीचा उत्कर्ष या काळांत झाला. शहाजीराजे तीन पातशाह्यांशीं कधीं सख्यत्वानें व कधीं विरोधानें आपला उत्कर्ष साधण्याच्या प्रयत्नांत होते. या सहा वर्षांत शिवाजीराजे यांनीं आपल्या पुण्यप्रतापानें स्वराज्यसिद्धीचा प्रयत्न यशस्वी करून मुसलमानी राज्यांना दहशत पाडली व स्वातंत्र्याचें वारें महाराष्ट्रांत खेळवून आपली राजा ही पदवी सार्थ करून दाखविली व बारा मावळें काबीज करून डबीर, अमात्य, सबनीस, पेशवे, इत्यादि अष्टप्रधानांच्या नेमणुकाही करून टाकल्या; आणि स्वराज्यसाधनाच्या मार्गांतला पहिला टप्पा गांठून आपल्या यशकीर्तिप्रतापानें महाराष्ट्र दुमदुमून सोडला. तुकोबा व रामदास दोघेही

शके १५६६ मध्यें वयाच्या व कर्तबगारीच्या मध्यावर आले होते. ह्या सहा वर्षांत तुकोबा, शिवबा व समर्थ ह्या महापुरुषांनीं महाराष्ट्राच्या उज्ज्वल इतिहासाचा भक्कम पाया रचिला. धर्मसंस्थापना हें तिघांच्याही अवतारांचें मुख्य कार्य होतें व तें त्यांनीं सख्यत्वानें पार पाडले. शिवाजी राजे यांचें घराणे धर्मशील व सुखसंपन्न होते. साधुसंतांच्या गांठीभेटींची व आशीर्वादांची शिवबांना मनापासून आवड होती. त्यांनीं तुकोबारायांचीं कांहीं कीर्तनें १६७०।७१ ह्या वर्षांत ऐकलीं, व चिंचवडच्या मोरया गोसाव्यांचा आशीर्वाद घेतला. दोघांनींही रामदासस्वामींकडे बोट दाखविलें व 'ते तुमचे गुरु भगवत्संकल्पाने ठरलेले आहेत, तरी त्यांना शरण जाऊन कृतार्थ व्हा,' असे सांगितले. रामदासस्वामी तीर्थयात्रा संपवून व सर्व भरतखंड डोळ्यांनीं पाहून शके १५६६ च्या वैशाखांत रामाज्ञेवरून कृष्णातीरीं आले व पुढील ३६ वर्षे त्यांनीं कृष्णातटाकींच्या प्रांतांतच राहून महाराष्ट्राचे बहुविध कार्य केले. पहिल्या २।४ वर्षांतच त्यांचे प्रमुख शिष्य दिवाकरभट, कल्याणस्वामी, दत्तात्रयगोसावी, भीमस्वामी, गिरिधर, सतीबाई, वेणाबाई, आक्का, इ० त्यांच्याभोंवतीं जमले व परमनिष्ठेनें राहिले. सांप्रदायिकांसाठीं समर्थांनीं चाफळचें देवस्थान उभें केलें व दासबोधाचा पहिला टप्पा जो एकवीससमासी उर्फ जुना दासबोध तो ग्रंथ रचिला, जागोजाग मारुतीचीं मंदिरें स्थापून जनता राममारुतींच्या भजनीं लावली, मारुतीच्या पराक्रमाचीं दोन कांडें (सुंदरकांड व युद्धकांड) श्लोकबद्ध लिहिलीं, हजारों लोक रामोपासनेला लावले व बरोबर पांच वर्षांनीं म्ह० शके १५७१ च्या वैशाखांत शिवरायावर व त्याचे प्रधान निळो सोनदेव व बाळाजी आवजी यांच्यावर अनुग्रह करून त्यांस आपल्या संप्रदायांत घेतलें. ही सर्व कामगिरी समर्थांनीं ह्या काळांतच केली. ह्या समर्थांच्या चळवळींची हकीकत प्रस्तुत प्रकरणांत सांगावयाची आहे. तुकोबा शके १५७१ अगर ७२ च्या फाल्गुनांत

सदेह वैकुंठास गेले. यानंतर समर्थ व शिवबा यांनीं धर्मकारण व राजकारण कसें केलें हें इतिहासज्ञांस विदितच आहे. त्याचा थोडासा परिचय ह्या ग्रंथांत पुढें यथाकाल होईलच.

## २ पहिलें शिष्यमंडळ

आईचा आशीर्वाद घेऊन समर्थ जांबेहून लोकोद्धारकार्यार्थ निघाले ते 'तारण' नाम संवत्सरीं, महाराष्ट्र तारण्यासाठीं, शके १५६६ च्या वैशाखांत कृष्णातीरीं आले. "शिसोदियांचे वंशीं सांबवरे करून (शंकराच्या प्रसादानें) व देवीच्या वरे करून (भोसल्यांची कुलस्वामिनी भवानीदेवी हिच्या आशीर्वादानें) शिवनामा राजा झाला आहे, त्यास उपासना सांगून त्याचेकडून धर्मस्थापना करवावी,' अशी श्रीरामचंद्राची समर्थांस आज्ञा पूर्वीच (शके १५५४) झाली होती व समर्थांनीं कृष्णातीरीं आल्यापासून लहानथोरांत मिळून मिसळून व त्यांना उपासना सांगून धर्मस्थापनेच्या कार्यास सुरवात केली. तीर्थयात्रा करीत असतांना मार्गांत जे जे अधिकारी जीव त्यांना आढळले त्यांना त्यांना रामोपासना देऊन व कोठेंकोठें मारुतिस्थापना करून संप्रदाय वाढविण्यास त्यांनीं आरंभ केला होताच, तथापि कृष्णातीरचा प्रदेश त्यांना आपले कार्यक्षेत्र करण्यास योग्य वाटल्यावरून रामभक्तिसंप्रदाय वाढविण्याचा उद्योग त्यांनीं तेथें व्यवस्थित रीतीनें सुरू केला. समर्थ प्रथम महाबळेश्वरीं आले. तेव्हां तेथें गर्द झाडी असून हिंस्रपशु निर्भयपणें इतस्ततः हिंडत असत. हवा थंड, देखावे मनोहर. तेथें समर्थांनीं पहिला चातुर्मास कृष्णानदीच्या उगमापाशीं केला. दिवाकरभटास अनुग्रह दिला आणि उगमाच्या मागच्या उंचवट्यावर मारुतीची स्थापना केली. मार्गशीर्षांत ते वांईस आले. तेथें पिटके, चित्राव, थिटे, वगैरे मंडळी त्यांच्या शिष्यवर्गांत आली. वांईस कृष्णातीरीं त्यांनीं मारुतीची स्थापना केली. त्यास रोकडोबाचा मारुति म्हणतात. वांईहून समर्थ माहुलीस गेले. तेथें कृष्णावेण्यांचा संगम आहे. तेथें

‘ सुखसरिता गुणभरिता दुरिता नीवारी । निःसंगा भवभंगा चिद्गंगा तारी ’ अशी कृष्णाबाईवर त्यांनीं एक आरती केली.

**हरिहर सुंदर ओघ ऐक्यासी आले । परमानंदबोधें मिळणीं मिळाले ऐसीये संगमीं मिसळोनी गेले । रामदास त्यांचीं वंदी पाउलें ॥**

कृष्णावेण्यांच्या संगमांत हरिहरांचें ऐक्यसुख भोगणाऱ्या प्रेमळांचें स्मरण होणें हें शुभाशयावांचून कोणाला सुचणार आहे ? माहुलीहून समर्थ जरंड्यास गेले. तेथें मारुतीचें पुरातन स्थान आहे. तेथें असतांना ते रोज माहुलीस स्नानसंध्यादि करण्यास जात असत ! कऱ्हाडास कृष्णाकोयनांच्या संगमीं समर्थ कांहीं काळ राहिले. कऱ्हाडाहून पांच मैलांवर शहापूर आहे. शहापुराहून मसूर एक कोसावर आहे, व तेथून चाफळ पांच कोस आहे. शहापूरच्या डोंगरावर राहून कऱ्हाडच्या प्रीतिसंगमावर स्नानसंध्येस ते जात. असा कांहीं काळ गेला. डोंगरावर निवान्त स्थळीं रहावें व स्नानसंध्येपुरतें जवळपासच्या संगमावर जावें हें त्यांना मनापासून आवडे. कऱ्हाडचे कुळकर्णी बाजीपंत व त्यांची स्त्री सतीबाई यांनीं समर्थांचा अनुग्रह घेतला. ( शके १५६७ ). ‘ तिनें ओळखिले खेळतां पोरांत। जैसे तें केरांत रत्न शोभे. ’ भीमस्वामींनीं समर्थचरित्रांत एक कडका दिला आहे त्यांतला उतारा : “ कृष्णेच्या तीरा आलें । पिसें जसें तसें बोले ॥ परीक्षितां मना मिळे । ग्रामवासी बाळें मुलें ॥ त्यांत ब्रह्मानंद खेळे । पदांबुजीं देहे गळे ॥ तेचि खूण बरी पूर्ण । पाहोनियां रामध्यान । सतीबाईने वोळखिलें रे. ”

बाजीपंत कुळकर्णी शहापूरकर यांना, गांवकीच्या हिशेबांत कांहीं चूक झाली म्हणून अधिकाऱ्यांनीं धरून नेलें तेव्हां त्यांची स्त्री सतीबाई चिंताग्रस्त बसली असतां समर्थांनीं ‘ बाजीपंत अकरावे दिवशीं सुटून येतील, ’ असें सांगितलें. त्याप्रमाणें घडलें तेव्हां उभय पतिपत्नींची समर्थांवर श्रद्धा बसून त्यांनीं समर्थांचा अनुग्रह घेतला. त्यांच्यासाठीं

समर्थांनीं शहापूर येथें 'प्रतापमारुती'ची स्थापना केली, व त्याचें मंदिर बांधलें. हा प्रतापमारुति समर्थांच्या अकरा मारुतींतला पहिला होय. सतीबाई शहापूरकर यांच्या सासरच्या व माहेरच्या सर्व माणसांनीं समर्थांचा अनुग्रह घेतला. जवळ चरेगांवचा डोंगर आहे त्यावर समर्थांनीं एक गुहा स्वतःसाठीं तयार केली. त्या गुहेंत ते कांहीं काळ राहिले. वांई-कऱ्हाड-माहुली-मसूर या प्रांतीं समर्थांचे नांव दुमदुमूं लागले.

चंद्रगिरीच्या डोंगरावरचे एकान्तस्थान समर्थांना अतिशय आवडे. त्यावर त्यांचें एक डफगाणे फार मनोरम आहे. सृष्टिसौंदर्याचे व विशेषतः कृष्णातीराकडील रम्य प्रदेशाचें हें गोड वर्णन काव्यरसिकांनाही आवडावें असें आहे. हें स्वभावोक्ति अलंकाराचें सुरेख उदाहरण आहे —

**चंद्रगिरीचा डोंगर । त्यांत गुप्त येक शिखर । तेथें राहे योगेश्वर । निरंजन ॥ १ ॥ रे नवल त्या निरंजनाचें । शिखर पाहे आकाशाचें । ऐसें पृथ्वीमध्यें कैचें । पाहों जातां ॥ २ ॥ तेथें अखंड नाहीं वात । म्हणोनि जागा तो निर्वात । सीतकाळीं घुमघुमीत । वस्त्र न लगे ॥ ३ ॥ कृष्णा कोन्या दोहींकडे । मध्यें पर्वताचे कडे । मंडळ पाहतां चहूंकडे । समाधान ॥ ४ ॥ तळीं असती शेतभातें । तेथें फिरताती आउतें । नानापरीचीं मार्गस्तें । येती जाती ॥ ५ ॥ वरती सेरडें मेंढरें । गुरें सिंगुरें वासुरें । ठायीं ठायीं गुराखीं पोरें । क्रीडा करिती ॥ ६ ॥ भोंवतीं डोंगराचीं थाटें । दिसती कडे आणि कपाटें । सवेंचि येऊनि धुकटें । झांकोळिती ॥ ७ ॥ तळीं पाहतां आकाश । दिसे दुसरें कैलास । तेथें जावया संतोष । वाटतसे ॥ ८ ॥ तया खालती आहे माण । वरतें आहे तळकोंकण । कऱ्हाड दत्तागिरी पट्टण । पंचक्रोशी ॥ ९ ॥ राया रघुरायाचें येणें । जालें हनुमंताकारणें । देव पाहावया पारणें । लोचनाचें ॥ १० ॥ रामदासाचा विसावा । रुद्र जाहला आक्रावा । भक्तजन वेगीं धांवा । दर्शनेसी ॥ ११ ॥**

समर्थांना लहान मुलांच्या मेळ्यांत खेळणें फार आवडे. त्यांनीं मुलांना झोळींतून नेहमीं खाऊ काढून द्यावा, त्यांच्यासवें खेळावें, त्यांना रामाच्या व मारुतीच्या गोष्टी सांगाव्यात व भजन करायला लावावें, त्यांच्याबरोबर नाचावें, त्यांच्यांत त्यांच्यासारखें होऊन जावें. ह्या लहान वयांत मुलांना जसें वळण लावावें तसें लागतें. त्यांचीं मनें कोमळ व संस्कारक्षम असतात. आपल्याला लहान मुलें कां आवडतात यावर त्यांचा एक मार्मिक व सुंदर श्लोक आहे —

**वयें थोर ते चोर भावार्थ नाहीं। विकल्पें बुडाले अहंभावडोहीं ॥**
**अहंता नसे हो तया लेंकुरांसी। म्हणोनी बहु आवडी रामदासीं ॥**

शहापुराहून समर्थांचें चाफळखोऱ्यांत जाणें येणें होऊं लागलें. चाफळ-खोऱ्यांत शिवाजीमहाराजांचे नरसोमलनाथ अंबरखाने हे मामलतदार होते. त्यांनीं व चाफळचे देशपांडे आनंदराव यांनीं समर्थांचा अनुग्रह घेतला. भानजी जोशी गोसावी यांनीं उपदेश घेतला. ते नेहमीं समर्थांबरोबर असत. कऱ्हाडास रुद्राजीपंत देशपांडे यांची बालविधवा कन्या आक्का यांना समर्थांनीं रामाची उपासना दिली. कऱ्हाडाहून समर्थ कांहीं शिष्य बरोबर घेऊन मिरजेस गेले. तेथें गोपजीपंत देशपांडे यांची बालविधवा कन्या वेणूबाई यांनीं अनुग्रह घेतला. या आक्का व वेणू समर्थांच्या शिष्यवर्गांत पुढें फार नामांकित झाल्या.

समर्थ मिरजेहून कोल्हापूर प्रांतीं गेले. तेथें महालक्ष्मीच्या देवालयांत त्यांचें कीर्तन झालें. कीर्तनश्रवणास करवीरचे सुभेदार पाराजीपंत बरवे कुळकर्णी हे आले होते. त्यांच्या मनाला आनंद वाटून त्यांनीं समर्थांस दुसरे दिवशीं आपल्या घरीं नेलें, त्यांची पूजा केली व कांहीं समागम घडल्यावर त्यांचा अनुग्रह घेतला. बरवे हे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. बरवे, दातार, काळे, गोरे, ठोसर हे कोंकणस्थांप्रमाणें देशस्थांतही आहेत ! अनुग्रहाचे दिवशीं तीर्थप्रसादाचे वेळीं एक दहा वर्षांचा चुणचुणीत

मुलगा पूजासाहित्य व पाटरांगोळ्या मोठ्या आवडीनें करीत असतांना समर्थांनीं पाहिला व पूर्व ऋणानुबंधानें तो समर्थांच्या मनीं भरला. समर्थांनीं पाराजीपंतांस विचारिलें कीं, 'हा मुलगा कोणाचा कोण ?' यावर पंतांनीं उत्तर केलें कीं, 'हा माझ्या बहिणीचा मुलगा, माझा भाचा. याचें नांव अंबाजी. हा व याचा धाकटा भाऊ दत्ता हीं दोन मुलें व त्यांची आई मजजवळच असतात. या मुलांचा बाप कृष्णाजीपंत कुळकर्णी, बाभूळगांवकर, हा माझा पूर्वीचा मातुळपुत्र. माझी बहीण कृष्णाजीपंतास दिली आहे व तीस म्ह० ह्या रखुमाबाईस कृष्णाजीपंतापासून हे दोन पुत्र झाले. कृष्णाजीपंत मूळचे विरक्तच होते. ते काशीस गेले व तेथेंच संन्यास घेऊन राहिले. तेव्हांपासून ही माझी बहीण मुलांसह माझेकडेच आहे.' ही मनोरंजक कथा ऐकून समर्थ म्हणाले, 'हा अंबाजी आम्हांस द्यावा.' पंतांनीं उत्तर केलें, 'त्रिवर्गाचें मी पोषण करितों, पण मुलांवर त्यांच्या आईची सत्ता आहे. ती स्वतंत्र आहे.' यावर रखमाबाईपाशीं समर्थांनीं मुलाची मागणी केली. समर्थ महापुरुष लोकोद्धारार्थ अवतरले आहेत हें जाणून रखमाबाई भक्तिनम्र होऊन म्हणाली, 'महाराज ! अंबाजीस नेतां मग आम्हां दोघांस कां बरें टाकतां ? तरी समर्थांनीं कृपाळु होऊन आम्हां तिघांसही न्यावें. आम्ही शरण आहोंत व आपण शरणागतवत्सल आहांत.' यावर समर्थांनीं तिघांवरही अनुग्रह केला व त्यांस आपल्या संप्रदायांत घेतलें. वरील दोन मुलांपैकीं थोरला अंबाजी तेंच समर्थांचे पुढें पट्टशिष्य म्हणून नाणावलेले कल्याणस्वामी होत ! समर्थांजवळ राहून दोन्ही भावांनीं समर्थांची अपूर्व सेवा केली. कल्याण आजन्म ब्रह्मचारी राहिले. समर्थांनीं डोमगांव मठावर कल्याणस्वामींची योजना केली, व दत्तात्रेयांना गृहस्थाश्रम देऊन त्यांची शिरगांवमठावर स्थापना केली. दत्तात्रेय यांचा कंठ मधुर होता. कल्याणस्वामी व दत्तात्रेय या उभयतांच्या हातच्या दासबोधाच्या प्रती आज उपलब्ध आहेत. सतीबाईच्या चुलतभावाचा मुलगा भीम हाही समर्थांचा



पुणें
मुळा मुठा नदी
सिंहगड किल्ला
मा व ळ
पुरंदर
शिरवळ
निरा नदी
शिवथर
ब्रह्मारण्य
महाबळेश्वर
प्रतापगड
वेण्णा नदी
माहुली
परळी उर्फ
सज्जनगड
सातारा
उरमोडी नदी
तारळे
कळंबे
कुबडीतीर्थ
रामघळ
चाफळ
कोयना नदी
वारणा नदी
पन्हाळा
कोल्हापूर
पंचगंगा नदी
जुनी गुप्तवाट
स्केल


परळी
उरमोडी नदी
कृष्णा नदी
स्केल
४ ० ४ ८ १२
तारळी नदी
शमनोपीर
पाली
शिरगाव
शिगणवाडी
चाफळ
उंब्रज
मसूर
माजगाव
चरेगाव
शहापूर
कोयना नदी
चंद्रगिरी
दासटेकडी
वसंतगड
कऱ्हाड
कृष्णा नदी
बेहे
वारणा नदी
शिराळे
पारगाव
मनपाडळे
पन्हाळा
जोतीबा
कोल्हापूर
पंचगंगा नदी

अनुग्रह घेता झाला. याची पुढें समर्थांनीं तंजावर मठावर स्थापना केली. ह्याप्रमाणें समर्थ कृष्णातीरीं आल्यापासून ५।६ वर्षांतच त्यांच्याभोंवतीं निष्ठावंत शिष्यमंडळ जमा झालें व बहुतेक ह्या काळांत मिळालेले शिष्यच पुढें नांवालौकिकास चढले.

## ३ मारुतिमूर्तिस्थापना

समर्थांनीं रामरायाच्या मंदिरांपेक्षां मारुतीच्या मूर्तिस्थापनेकडे जास्त लक्ष दिलेलें दिसतें. समर्थांना वयाच्या आठव्या वर्षीं जांब येथें मारुतिरायांच्या मंदिरांत प्रभु रामचंद्रांनीं अनुग्रह दिला व मारुतिरायांच्या स्वाधीन केलें, त्या वेळेपासून त्यांची मारुतीवर अतिशय भक्ति बसली. मारुतीला त्यांनीं आपला सखा, कैवारी, संरक्षक, देव म्हटलें आहे. टाकळीस त्यांनीं गोमयाची मारुतीची मूर्ति स्वहस्तें तयार केली व तेथें उद्धवास ठेवलें. ही समर्थांची मारुतीची पहिली मूर्ति, टाकळीचा मठ हा पहिला मठ व उद्धव हा पहिला शिष्य होय. समर्थ तीर्थयात्रेस बाहेर पडल्यावर काशीक्षेत्रीं गंगातीरीं मारुतीची त्यांनीं स्थापना केली व त्या वेळेपासून त्या घाटास हनूमंतघाट असें म्हणूं लागले. द्वारका व मथुरा येथेंही समर्थांनीं मारुतिस्थापना केल्याचें तेथील लोक सांगतात, पण तीं स्थळें शोधूनही आम्हांस सांपडलीं नाहींत. केदारेश्वरीं पर्वतशिखरीं ध्यानस्थ बसलेल्या श्रीश्वेतमारुतीचें प्राचीन मंदिर आहे. तेथें समर्थांना शैत्य झालें तेव्हां त्यांनीं मारुतिप्रार्थना केली. शैत्यनिवारण करून तेथें मारुतिरायांनीं समर्थांना 'टोप, मेखला, वल्कलें, ढुरमुजी रंगाचीं वस्त्रें, जपमाळ, खडावा व कुबडी' अशा वस्तु दिल्या. समर्थांनीं अकरा मारुति स्थापन केले ( शके १५६७–१५७२ ) अशी प्रसिद्धी आहे. हे अकरा मारुती सातारा जिल्ह्यांत आहेत. यांचीं नांवें हनुमंतस्वामींच्या बखरींत दिलीं आहेत तीं अशीं—

१ शहापूर, २ मसूर, ३ उंब्रज, ४ शिराळें, ५ मनपाडळें, ६ पारगांव, ७ माजगांव, ८ बेहेगांव, ९ शिंगणवाडी आणि १० व ११ चाफळ.

ह्यांतील ८ स्थानें कृष्णेच्या कांठीं किंवा कृष्णा व कोयना यांच्यामध्यें असून ३ वारणेच्या दक्षिणोत्तर आहेत. बहुतेक मारुती त्या त्या स्थळांतील शिष्यांच्या उपासनेसाठीं स्थापिले आहेत. चाफळ हें संप्रदायाचें मुख्य क्षेत्र असून तेथील श्रीराममूर्तीच्या सन्मुख दासमारुति व मागें भीममारुति यांची स्थापना केली आहे. हे बहुतेक सारे प्रतापमारुती आहेत. डावा हात कटीवर, डावा पाय दैत्याच्या मस्तकावर व उजवा हात वर उगारलेला हें प्रतापमारुतीचें रूप होय! रामापुढें हात जोडून उभा असणारा तो दासमारुति होय. ह्या अकरा मारुतींशिवाय सज्जनगडावर नैऋत्यदिशेस एक, प्रतापगडावरील बालेकिल्ल्याच्या तोंडाशीं एक, उरमोडी नदीच्या कांठीं डोळेगांवांत एक, असे मारुती समर्थांनीं स्वतः स्थापिले आहेत. एलिचपूर येथें समर्थांनीं स्थापिलेला एक मारुति आहे. समर्थांनीं दिलेली एक मारुतीची सुंदर धातुमूर्ति बहिणाबाईच्या घरीं आहे. याशिवाय समर्थांनीं आणखी शेंकडों ठिकाणीं मारुतींच्या मूर्तींची स्थापना केली किंवा करविली आहे. समर्थांच्या धर्मजागृतीच्या कार्यांत मारुतिउपासना वाढविणें हें एक महत्त्वाचें अंग आहे.

## ४ पंचवटीच्या बाळमित्रांना समर्थांचें पत्र

समर्थ पंचवटीनाशिकाजवळील टाकळी येथें बारा वर्षें ( १५४२ ते १५५४ ) पुरश्चरणास होते तेव्हां साहजिकच तेथील रामोपासकांचें व त्यांचें सख्य जमलें होतें. कृष्णातीरीं गेल्यावर कांहीं काळानें पंचवटीच्या श्रीरामाचें सप्रेम स्मरण होऊन त्यांनीं आपल्या वतीनें श्रीरामाची प्रार्थना करण्यास तेथील प्रेमीजनांस एका पत्रांत विनविलें आहे. ‘जेथें पडली कृपादृष्टी। रघूत्तमारायाची’ तें श्रीरामाच्या साक्षात्काराचें पुण्यस्थल समर्थांना परमप्रिय वाटावें हें साहजिक आहे. या पत्रांत समर्थांच्या मनाची कोमलता पराकाष्ठेची प्रगट झाली आहे. त्यांची निस्सीम रामभक्ति, त्यांची निरहंकार शालीनता, रामोपासक बंधुवर्गावरील त्यांचा प्रेमविश्वास व

'बाळवृद्ध नरनारींचें' व त्यांचें अन्योन्य प्रेम,' त्यांनीं पुढें उभारलेल्या संप्रदायाची शुद्ध उपासना, विमळज्ञान, वैराग्य, ब्राह्मण्यरक्षण व गुरुपरंपरापरिपालन ही बीजरूप पंचसूत्री, हें सर्व या बारा ओव्यांत सुव्यक्त झालें आहे.

जनस्थान गोदातटीं । परमपावन पंचवटी ।
जेथें पडली कृपादृष्टी । रघूत्तमारायाची ॥ १ ॥
तेथील रामउपासक । त्यांच्या सेवकांचा सेवक ।
तुम्हांमध्यें मी येक रंक । सरतें करावें ॥ २ ॥
तुम्ही निकट देवापासीं । आणि मी पडलों दुरि देसीं ।
कृपाळुपणें रघुनाथासी । माझी करुणा भाकावी ॥ ३ ॥
म्हणावें 'ते अनाथ । समर्था ! तूं दीनानाथ' ।
म्हणावें 'ते पतित । तूं पतितपावनु' ॥ ४ ॥
म्हणावें 'ते परमकिंकर । देवा ! तूं करुणाकर' ।
म्हणावें 'ते निराधार । आधार इच्छी ॥ ५ ॥
सत्य मिथ्या तुझा म्हणवी । त्याची चिंता असों द्यावी' ।
ऐसी करुणा भाकावी । नानाप्रकारीं ॥ ६ ॥
तुम्हां दासांमध्यें मी हीण । माझे कोट्यवधी अवगुण ।
परंतु आहें अनन्य । सेवक रघुनाथाचा ॥ ७ ॥
पुढें म्यां ऐसेंचि असावें । माझें मन न पालटावें ।
इतुकें देवासी मागावें । तुम्हीं बंधुवर्गीं ॥ ८ ॥
प्रत्यहीं माझा नमस्कार । देवासी करावा निरंतर ।
मजकारणें शरीर । इतुकें कष्टवावें ॥ ९ ॥
बाळवृद्धनरनारी । सकळ भक्त कुमारकुमारी ।
समस्तांसी नमस्कारी । 'कृष्णातीरवासी' ॥ १० ॥
शुद्धउपासना विमळज्ञान । वीतराग आणि ब्राह्मण्यरक्षण ।
गुरुपरंपरेचें लक्षण । शुद्धमार्ग ॥ ११ ॥
ऐसें पंचधा बोलिलें । इतुकें पाहिजे यत्नें केलें ।
म्हणिजे सकळही पावलें । म्हणे दासानुदास ॥ १२ ॥

शेवटल्या दोन ओव्यांत सांगितलेली पंचसूत्री त्यांनीं दासबोधांतही (द० ४, स० २) सांगितली आहे: 'ब्राह्मण्य रक्षावें आदरें। उपासनेचीं भजनद्वारें। गुरुपरंपरा निर्धारें। चळोंच नेदावी ॥ करावें वैराग्यरक्षण। रक्षावें ज्ञानाचें लक्षण। परमदक्ष विचक्षण। सर्वेही सांभाळी ॥'

पंचवटीच्या रामाविषयीं समर्थांचें प्रेम कांहीं और होतें.

'प्रभू देखिला दास संतुष्ट झाला' ह्या प्रकरणांत रामाचें सत्यव्रत, दीनानाथ ही विख्यात पदवी, देवांना बंदींतून सोडविणारा पराक्रम, प्रतापानें त्रैलोक्याला दिलेला आनंद या रामगुणांचें वर्णन करीत 'येथें भाग्यानें माझा वास झाला' असा संतोष व्यक्त केला आहे: 'बहू सुकृताचा बरा काळ आला। प्रभू देखिला दास संतुष्ट झाला.' आणखीही ते म्हणतात: 'जनस्थान गोदातटीं वास केला। प्रभू देखिला दास संतुष्ट झाला.' ते कायावाचामनानें पुढें चाफळासच स्थिर झाले.

गिरिधर म्हणतात —

**सर्वात्मा राम सर्वांतरीं। अवतार घेउनी गोदातीरीं।**
**ब्रह्मचर्यें सचराचरीं। वैराग्ययोगें विचरला ॥**
**कृष्णातीरस्थ नाम साजे। रघुनाथकीर्ति जेथूनि गाजे।**
**जयाच्या तीव्रवैराग्यें रिझे। हृदय तापसांचें ॥**

## ५ चाफळचें देवस्थान

शिष्यमंडळ जसजसें वाढत चाललें तसतशी त्यांच्या उपासनेची सोय लावण्याची आवश्यकता समर्थांना वाटूं लागली. रामनवमीचा उत्सव व हनुमंतजयन्तीचा उत्सव असे दोन उत्सव सालोसाल थाटानें करणें हा या संप्रदायाचा मुख्य भाग होता. मसूर येथें ३।४ वर्षें रामनवमीचे उत्सव झाले. आतां रामरायाचें स्वतंत्र मंदिर उभारावें व तेथें प्राणप्रतिष्ठा करून राममूर्तीची स्थापना करावी अशी समर्थांना उत्कंठा लागली व त्यांनीं

राममूर्ति घडविण्याची तयारी केली ( शक १५६९ ). पण रामरायाचे मनांत आपण होऊन समर्थांकडे यायचें आलें. तो प्रकार असा : समर्थ रंगनाथस्वामींच्या भेटीस जाऊन निगडीहून परत येत असतां रहिमतपूर-नजीक अंगापूरच्या रानांत कृष्णातीरीं शिवनाथ म्हणून एक स्वयंभूस्थान आहे, तेथें स्नान करून ध्यानास बसले असतांना डोहांतून त्यांच्या कानीं शब्द आला कीं, 'ज्या ध्यानाची मूर्ति तुम्हांस पाहिजे तेंच मूर्तिध्यान या डोहांत आहे.' समर्थांनीं तत्काळ डोहांत उडी घातली व दोन हातांत दोन मूर्ति घेऊन वर आले. एक मूर्ति धनुर्धारी रामाची होती व एक महिषासुरमर्दिनीची होती. समर्थांचीं दोन्ही उपास्यें आवडीचीं. त्यांना परमसंतोष वाटला. त्यांनीं भक्तिभावानें त्यांची पूजा केली व शिष्यांना मूर्ति चाफळास घेऊन येण्यास सांगून आपण रामाच्या सत्कारार्थ पुढें गेले. वाद्यें व भजनीभक्त रामाला घेण्यास पुढें पाठविले व ते वाजतगाजत रामाला घेऊन येत आहेत आणि समर्थ दारांत परमोत्कंठेनें वाट पाहत आहेत, तों त्यांना शुभचिन्हें होऊं लागलीं. समर्थांच्या मनाची कोमलता व प्रेमलता पुढील श्लोकांत व्यक्त झाली आहे —

लवे नेत्रपातें स्फुरे आजि बाहे
दिनानाथ हा राम येणार आहे !
जयाचेनि योगें सुखानंद लोटे
तया देखतां अंतरीं बाष्प दाटे ॥ १ ॥

ळळे पाळितो राम आम्हां दिनांचे
कृपासागरू भाव जाणे मनाचे ।
नुपेक्षी कदा संकटीं धांव घाली
तया देखतां मानसें तीं निवालीं ॥ २ ॥

लघूलाघवी राम कोदंडधारी
मनीं चिंतितां शोक संताप हारी ।
महासंकटें नाम घेतां निवारी
भवसागरीं मूढ पाषाण तारी ॥ ३ ॥

समर्थांच्या अतिमधुरभक्तीचें हें विमल स्वरूप पाहून कोणा प्रेमळ भाविकाचें अंतःकरण सद्गदित होणार नाहीं ?

श्रीराममंदिर उभारलें गेलें. हें स्थान परमरमणीय आहे. चारी बाजूंला डोंगर असून मध्यभागीं श्रीरामाचें देवालय आहे. या देवालयांत पहिला रामनवमीचा उत्सव शके १५७० मध्यें झाला. तेव्हांपासून तो उत्सव तेथें सतत होत आहे. त्यावर समर्थांनींच एक डौरगाणें केलें आहे.

**भोंवतीं डोंगराचे फेर। मध्यें देवाचें शिखर।**
**पुढें मंडप सुंदर। नवखणांचा ॥ १ ॥**
**चहूंखांबांवरी रचना। वरत्या चोवीस कमाना।**
**कमकटाऊ नयनां। समाधान ॥ २ ॥**
**नानातरु आंबेवनें। दोहींकडे वृंदावनें।**
**वृंदावनीं जगज्जीवनें। वस्ति केली ॥ २ ॥**
**दमामे चौघडे वाजती। धडाके भांड्यांचे** (तोफांचे) **होती।**
**फौजा भक्तांच्या साजती। ठाईं ठाईं ॥ ५ ॥**
**दास डोंगरीं राहतो। यात्रा देवाची पाहतो।**
**देव भक्तासवें जातो। ध्यानरूपें ॥ २० ॥**

ह्या गाण्यांत नानावाद्यांचें, हरिकथाभजनांचें, यात्रेकरूंच्या गलबल्याचें, बाणचंद्रज्योतींचें, 'पैस नाहीं राजांगणीं दाटी जाहली' अशा जनसमूहाचें वर्णन आहे. श्रीराममंदिर शिष्यमंडळीनें पैसे जमवून मोठ्या उत्साहानें बांधलें. समर्थशिष्य मामलेदार नरसोमलनाथ यांचे मार्फत ३०० होन मिळाले. पहिल्याच वर्षी विजापूरचे दिवाण द्यानतराव यांनीं व घोरपडे बाजी राजे यांनीं सातारा जिल्ह्यांत जमिनी दिल्याच्या सनदा उपलब्ध आहेत. चाफळचें देवस्थान थाटांत उभें राहिलें. समर्थांना व सांप्रदायिकांना भजनकीर्तनाचा मोठा आनंद मिळाला.

**वेधलें मानस माझें । भक्तजनपूर्णकामें ।**
**सेवक तारिले नेमें । बुद्धियोगें भूमंडळीं ॥**
**निरंतर तो उत्छाह । हरिकथा महोत्साह ।**
**प्रसन्न जाहला देव । सकळ कामनासिद्धी ॥**

हनूमंतस्वामी लिहितात: 'समर्थ चाफळखोऱ्यांत आले ते समयीं शिवाजीमहाराजही राजगड इ० किल्ले घेऊन पुणें प्रांत, नाशकापासून करवीरपर्यंत मुलूख व कोंकणपट्टी सर करून राज्य आक्रमण करीत चालले होते, म्लेंच्छांचा उच्छेद करून धर्मस्थापना करावी म्हणून महाराष्ट्रराज्याची स्थापना करीत चालले होते, तों स्वामी चाफळखोऱ्यांत डेरवणचे डोंगर-घळींत किंवा वाघापूरचे सड्यावर किंवा भैरवगडचे घळींत किंवा चंद्रगिरीवर किंवा कळंब्याचे घळींत राहत असत.' लौकरच शके १५७१ चे वैशाखांत हे दोन महापुरुष एकत्र झाले. शिवाजी व रामदास हे दोन गंगायमुनांचे प्रचंड ओघ धर्मसंस्थापनस्फूर्तीच्या हिमाचलावर उगम पावून राज्यआक्रमण व भक्तिज्ञानवैराग्य ह्या दोन मार्गांनीं सभोंवारचा प्रदेश प्रेमप्रतापजलानें भिजवीत चाफळखोऱ्यांत एकवटले व साऱ्या महाराष्ट्राचा त्यांनीं प्रयाग बनविला! हा सर्व इतिहास उज्ज्वल व स्फूर्तिदायक आहे. त्यांतच तुकारामसरस्वतीचा अंत:प्रवाह मिळाला व तिघांनीं मिळून महाराष्ट्राचें 'आनंदवनभुवन' केलें.

## ६ रामदासी संप्रदाय व त्याचें वैशिष्ट्य

(१) समर्थांचा संप्रदाय अर्थात् रामोपासनेचा. समर्थांना उपदेश प्रत्यक्ष श्रीरामाचा. भक्ताचें ध्यानबल पाहून राम सगुणरूप धारण करितात व एकनिष्ठ भक्तावर अनुग्रह करितात. याला प्रमाण समर्थवचनांचें. रामानें स्वतःच त्यांना मंत्रोपदेश केला व मारुतीच्या सुपूर्त केलें.

## अभंग

१

'आदिनारायण' सद्गुरु आमचा। शिष्य जाला त्याचा 'महाविष्णु' ॥१॥
तयाचा जो शिष्य तो जाणावा हंस। तेणें 'ब्रह्मयास' उपदेशिलें ॥२॥
ब्रह्मदेवें केला उपदेश 'वसिष्ठा'। तेथें धरा निष्ठा शुद्धभाव ॥३॥
वसिष्ठ उपदेशी 'श्रीरामरायासी'। रामें 'रामदासीं' उपदेशिलें ॥४॥

२

उपदेश देवोनि दिधला मारुती। स्वयें रघुपति निरवीत ॥१॥
निरवितां तेणें जालों रामदास। संसारीं उदास म्हणोनियां ॥२॥
म्हणोनी आमुचे कुळीं कुळदैवत। रामहनूमंत आत्मरूपी ॥३॥
आत्मरूपी जाला रामीरामदास। केला उपदेश दीनोद्धारा ॥४॥

३

हनुमंत आमची कुळवेली। राममंडपीं वेला गेली।
श्रीरामभजनें फळली। रामदास बोले ॥ १ ॥
आमुचे कुळीं हनुमंत। हनुमंत आमुचें दैवत।
तयावीण आमुचा परमार्थ। सिद्धीतें न पावे कीं ॥ २ ॥
साह्य आम्हांसी हनुमंत। आराध्यदैवत श्रीरघुनाथ।
गुरु श्रीराम समर्थ। उणें काय दासासी ॥ ३ ॥
दाता एक रघुनंदन। वरकड लंडी देईल कोण।
हे त्यागोन आम्ही जन। कवणाप्रती मागावें ? ॥ ४ ॥
म्हणोनि आम्ही रामदास। रामचरणीं आमुचा विश्वास।
कोसळोनि पडो हें आकाश। आणिकाची वास न पाहों ॥ ५ ॥
स्वरूप संप्रदाय अयोध्यामठ। जानकीदेवी रघुनाथ दैवत।
मारुतीउपासना नेमस्त। वाढविला परमार्थ रामदासीं ॥ ६ ॥

हीच परंपरा कल्याणस्वामींनीं 'नारायण विधि वसिष्ठ राम। रामदास कल्याणधाम' ह्या मंत्रांत सांगितली आहे. संप्रदायांत रामनामाचे अनेक मंत्र चालू आहेत, पण 'श्रीराम जयराम जयजयराम' ह्या मुख्य

त्रयोदशाक्षरी मंत्राचा गोदातीरीं टाकळी येथें समर्थांनीं तेराकोटि जप केला व त्याला सिद्धत्व आणलें व तोच मंत्र सर्वांस दिला.

( २ ) समर्थांचा हा रामदासीसंप्रदाय भागवतधर्माचाच एक भाग असून तत्त्वदृष्ट्या वारकरीसंप्रदायाहून तो फारसा भिन्न नाहीं. भागवतधर्मपरंपरेचा विचार दुसऱ्या खंडांत ( पृ० ३६०–३६२ ) सांगितला असून मूळ भागवतग्रंथाचें स्वरूप पहिल्या खंडांत ( पृ० १११ ते १८१ ) सत्तर पृष्ठांत सविस्तर दाखविलें आहे. ज्ञानेश्वरनाथांचा नाथसंप्रदाय, तुकोबांचा चैतन्यसंप्रदाय व समर्थांचा स्वरूपसंप्रदाय हे तीन्ही एकाच भागवतधर्माचे विकास आहेत. 'रामकृष्णहरी' हा वारकरी संप्रदायाचा मंत्र राम व कृष्ण या दोन्ही उपासनांवर आधारलेला आहे. वारकरी संतांचा ओढा कृष्णाकडे आहे व रामदासांचा ओढा रामाकडे आहे; पण दोघांना रामकृष्ण हेंच उपास्य आहे. नाथांचा 'भावार्थरामायण' हा रामचरित्रपर ग्रंथ मराठींत सर्वमान्य असून समर्थांनीं वाल्मीकिरामायणाबरोबर तोही पाहिला होता हें स्पष्ट आहे. समर्थांची कृष्णप्रीति त्यांच्या कृष्णगुणगौरवपर अनेक पद्यांवरून अगदीं उघड होत आहे. गीताभागवत हे भागवतधर्माचे मुख्य आधारस्तंभ असून त्यांच्या छायेखालीं हे संप्रदाय पोसले आहेत. दासबोधाचा चौथा नवविधाभक्तीचा दशक मूळ भागवतांतील श्रवणंकीर्तनं' ह्या श्लोकाच्या स्पष्टीकरणार्थच लिहिला आहे. समर्थांनीं नवविधा-भक्तीचें व गीताभागवतांचें दहावीस वेळ अगदीं वारकरी संतांप्रमाणेंच गौरव केलें आहे. सगुणनिर्गुणसमन्वयाचे विचार व अनुभव दोघांचे अगदीं एक आहेत. तात्पर्य: समर्थ इतर महाराष्ट्रसंतांप्रमाणेंच पूर्ण भागवतधर्मी आहेत. ज्ञानोबा, नाथ व तुकोबा यांचेंच भागवतधर्मप्रसाराचें कार्य समर्थांनीं पुढें चालविलें; अनुकूल परिस्थिति, स्वभावविशेष व भगवंताची प्रेरणा यांमुळें त्या वेळच्या राजकारणाला त्यांनीं चालना दिली व लोकांना व्यवहारदक्षतेचें शिक्षण दिलें. पूर्वपरंपरेच्या साधुसंतांनीं राष्ट्रांतील

अठरापगड जातींच्या सर्व स्त्रीपुरुषांना अध्यात्मभक्तिप्रेमाचा मार्ग दाखविला; समर्थांना आपल्या आवडीप्रमाणें समाजसंघटनेचें आणखी कांहीं कार्य करावयाचें होतें म्हणून त्यांनीं आपला 'सवता सुभा' उभारला. त्यांनीं रामोपासनेचा विशिष्ट संप्रदाय उभा केला, राममारुतींच्या उपासनेला कांहीं नवी दृष्टि दिली, आपलें नवें संस्थान चाफळ येथें उभें केलें, पांढरपेशा व विशेषतः ब्राह्मणवर्गाच्या तरुणांना हाताशीं धरून त्यांना कार्यकर्तृत्वाची नवी दीक्षा दिली, लोकांतील आळस व नाकर्तेपणा झाडून टाकून त्यांना कर्तृत्वाची दिशा दाखविली, प्रयत्नवादाचा पुरस्कार केला, व प्रयत्नही कसा करावा हें स्वतः आचरून शिकविलें. समर्थांनीं राष्ट्राच्या प्रपंचाकडे अधिक व्यापकदृष्टीनें पाहिलें यांत शंकाच नाहीं. त्यांनीं उपासनेची ढाल पुढें करून रामराज्याचें ध्येय लोकांपुढें ठेवलें. दुर्दैवाची गोष्ट एवढीच कीं, त्यांच्या दृष्टीचा व्यापक कार्यकर्ता त्यांच्या संप्रदायांतही त्यांच्या पश्चात् कोणीही झाला नाहीं ! १ पहिलें हरिकथानिरूपण, २ दुसरें राजकारण, ३ तिसरें सर्वविषयीं सावधपण व ४ चौथा अत्यंत साक्षेप ही समर्थ-संप्रदायाची चतुःसूत्री आहे ( दास० ११-५ ). त्यांच्या सांप्रदायिकांनीं त्यांच्या पश्चात् हरिभजनाची परंपरा मात्र कशीबशी चालविली आहे. गेल्या ५० वर्षांत कांहीं सुशिक्षितांचें लक्ष समर्थांकडे वेधलें आहे पण तेही त्यांच्या राजकारणावरच टोकून बसले आहेत. तेही समर्थांच्या शिकवणीचा सर्वांगांनीं विचार करीत नाहींत, मग त्या आचरणांत आणणें दुरापास्तच आहे ! वरील चतुःसूत्रीचा पूर्ण विचार दासबोधांत केला आहे. दासबोध हा अध्यात्मशास्त्राचा तसाच हिंदु समाजशास्त्राचा एक महनीय ग्रंथ आहे. असा दुसरा ग्रंथ मराठी भाषेंतच काय पण दुसऱ्या कोणत्याही भाषेंत सांपडणें कठिण आहे. असो. तूर्त एवढेंच सांगणें आहे कीं, समर्थसंप्रदायाचें थोडेंसें वैशिष्टय आहे व या दृष्टीनें समर्थांनीं आपला स्वतंत्र संप्रदाय उभारला हें योग्यच झालें. रामाची उपासना हा तर

त्यांच्या संप्रदायाचा आत्मा आहे, तथापि रामदासी संप्रदायाचे रामदासस्वामी हेच मुख्य आधार आहेत म्हणजे हा व्यक्तिनिष्ठ संप्रदाय आहे.

(३)

**कदाकाळीं राम दासा उपेक्षिना । रामउपासना ऐसी आहे ॥ १ ॥**
**ऐसी आहे सार राघोबाची भक्ति । भक्तीची विभक्ति जेथें नाहीं ॥ २ ॥**
**जेथें नाहीं कांहीं वाउगें मायिक । रामउपासक दास म्हणे ॥ ३ ॥**

**जाणे सुखदुःख राम माझा येक । येरें तीं मायिक वैभवाचीं ॥ १ ॥**
**जिवलग नाहीं श्रीरामावांचूनी । हाचि माझे मनीं दृढ भावो ॥ ३ ॥**
**मायबाप बंधु सज्जन सोयरा । एका रघुवीरावीण नाहीं ॥ ७ ॥**
**अंतरींचें गुज राम सर्व बीज । रामदासीं निज प्रगटलें ॥ १० ॥**

**पुण्याचें माहेर साधकाचें घर । बहुतांचें छत्र स्वामी माझा ॥ १ ॥**
**स्वामी माझा राम रायांचें मंडण । संसारखंडण महाभय ॥ २ ॥**
**महाभय कैचें अभेदभक्तासी । रामीरामदासीं धन्य बोल ॥ ३ ॥**

(४) समर्थांच्या शिकवणी त्यांच्या दासबोधांत व इतर ग्रंथांत सविस्तर दिल्याच आहेत. ते आपल्या शिष्यांना सामान्य बोध काय देत तें त्यांच्या एका शिष्याच्या (**गिरिधरांच्या**) वचनाधारें सांगतों —

**गिरिधरांचीं** स्वामिदर्शन व देवदर्शन अशीं दोन बहारीचीं प्रकरणें आहेत त्यांत समर्थसंगतींत उपासनेचा मार्ग शिष्यांना कसा लागत असे व शिष्यांना प्रचारार्थ दूरदेशीं पाठवितांना समर्थ त्यांना कसा बोध देत असत याचें अत्यंत प्रेमळपणानें वर्णन केलें आहे.

**देवालयीं कथाकीर्तनें होताती । स्वामि ऐकताति मुख्यासनीं ॥**
**मुख्यासनीं स्वामीपुढें पुराणिक । नगरवासी लोक दाटलासे ॥**

पुराणाचा विषय रामचंद्राचें रामायणांतर्गत चरित्र हा असायचा. सातही कांडें संपलीं कीं व्यासाब्राह्मणांची पूजा व्हायची. समर्थ कोणा शिष्यालाही अधूनमधून कीर्तनाला उभे करीत. ‘पाठीमागें भरी चाले ध्रुपद्यांची ।

ताळामृदंगांची धुमाळी हे.' हे शिष्य 'ठेवीचीं पाठान्तरें' काढीत त्यांत मुख्यतः स्वामींनीं म्ह० समर्थांनीं शिकविलेलीं 'आवडीचीं ध्यानें' असत. 'प्रभातीचीं भूपाळीचीं ध्यानें' म्हणून आरती होत असे. समर्थ उत्तर-रात्रीं थोडेसे निजत—त्यांना निद्रा कमीच होती. पहाटेस ते स्नानसंध्या करीत.

**स्वामियानें पूजा देवाची करावी । लोकांसी कळावी उपासना ॥**
**भक्तिमार्गकर्मउपासनाज्ञानें । देवदेवार्चन करीतसे ॥**
**आरतीची वेळ वाद्यें तीं वाजती । येकार्ति धूपार्ति सांग जाली ॥**

आरती समर्थ स्वतः करीत. मंत्रपुष्पांजलि झाल्यावर 'फळें ढीग केला देवापुढें.'

**लागलीयां हारी नमस्कारासाटिं । तेथें लोकदाटि वोसरेना ॥**

नंतर पुराणाचा एक अध्याय प्रातःकाळीं झाल्यावर भोजनाची सिद्धता होत असे. कांहीं कथावार्ताचर्चा होऊन समर्थ 'मृदुशेजशयना विजणें वारे' अशा प्रकारें वामकुक्षी करीत. नंतर चंदनाची उटी व पुष्पमाळा रामास व समर्थांस अर्पण होत. 'राघवाची कीर्ति समर्थाची मूर्ति' पाहत शिष्य व श्रोते रिझून जात व सारें वातावरण राममय होत असे. त्या वेळीं समर्थांचे वीरभाटीव कडके, अभंग, पदें होऊन रामकथेचें गायन होत असे. असा हा उपासनेचा गजर चढत्या वाढत्या प्रमाणावर होत असे. हा प्रकार गिरिधरांनीं पाहून व 'कांहीं दिवस समर्थसंगतीला राहून' यथादृष्ट वर्णन केला आहे. शिष्य दूरदेशीं पाठवितांना त्याला समर्थांचा सामान्य उपदेश असे तोही गिरिधरांनीं स्वानुभवानें वर्णिला आहे: दासबोधाचा ग्रंथगर्भ देऊन व स्वहस्तें श्रीकंठमेखळा देऊन—

**निरोपिती कोठें वाद घालूं नको । भक्ति सोडूं नको राघवाची ॥**
**राघवाची भक्ति ग्रंथाचें पूजन । स्वजनशोधन समुदाई ॥**

**सावधान रामीं असतां विवेकें । बोलेतिना लोकें काय तुला ? ॥**
**सोडूं नको ग्रंथ उपासनादीक्षा । सर्वकाळ भिक्षा सोडूं नको ॥**
**सोडूं नको नित्य साधन आपुलें । पाठांतर केलें पाहिजे तां ॥**
**पाहिजे तो आपुला आचार रक्षिला । वेद सांभाळिला पाहिजे तो ॥**
**वर्तावें तां सुखस्वरूपें असावें । चंचळाच्या नांवें शून्याकार ॥**
**ग्रंथामध्यें बरा पाहुनि विवेक । वर्तावें सम्यक लोकांमध्यें ॥**

तात्पर्य : श्रीराम, हनूमंत व रामदासस्वामी समर्थ ह्या तीन विभूतींविषयींची पूज्यता व उपासना म्हणजेच रामदासी संप्रदाय होय.

(५) रामदासी ओळखावयाचा कसा ? बाह्य दीक्षेवरून कोणीही त्याला ओळखूं शकेल. काखेंत कुबडी, हातांत चिपळ्या, गळ्यांत भिक्षेची झोळी, अंगांत भगव्या रंगाचें कौपीन व तोंडांत मनाचे श्लोक ह्या लक्षणांनीं रामदासी सामान्यतः ओळखला जातो. समर्थांनीं कोणते गुण खऱ्या रामदासीयाच्या अंगीं असावेत हें दासबोधांत स्पष्ट सांगितलें आहे. अंतरंग-अधिकार व बाह्य दीक्षा दोन्ही ज्याच्या अंगीं आहेत तोच खरा रामदासी. हा उदासीनांचा म्ह० निःसंग रामोपासकांचा पंथ आहे. कोणा **हरिस्वामींनीं** म्हटलें आहे —

**जाणावा रामदासांचा । हाचि संप्रदाय ॥ ध्रु० ॥**
**व्रत ज्याचें ब्रह्मचारी । वस्त्रें ज्याचीं हुर्मुजी बरीं ।**
**विवेकवैराग्य तें भारी । तारी जडजीवांतें ॥ १ ॥**
**नित्य वाची दासबोध । शोधी सारासारशोध ।**
**सांगे भाविकांसी बोध । करी रोध इंद्रियां ॥ २ ॥**

रामदासी ब्रह्मचारी वा गृहस्थाश्रमी असूं शकतो. विवेकवैराग्य (हेकाड-पिसें वैराग्य नव्हे), सारासारविचारणा व निस्पृहपणानें जनांस तारक बोध देणें हें रामदासीयांचें मुख्य लक्षण येथें सांगितलें आहे. रामदासी पाहिला कीं त्याच्या तोंडचे दोन शब्द ऐकायला 'नारी नर धांवती' अशी

५० वर्षांपूर्वीपर्यंत स्थिति होती. पुढील श्लोक प्रसिद्ध आहेत. कर्ता माहीत नाहीं.

**भव्यरूप अतिसुंदर दीक्षा। रामनामस्मरणें करि भिक्षा।**
**वृत्ति होइल उदासिन जेव्हां। रामदास म्हणणें मग तेव्हां ॥ १ ॥**
**करि कथा परि न वांछित कांहीं। चित्तवृत्ति अवघी हरिपायीं।**
**कल्पना समुळ तोडिल जेव्हां। रामदास म्हणणें मग तेव्हां ॥ ४ ॥**

'स्वानुभवदिनकर'कर्ते **दिनकर गोसावी** समर्थसंबंधानें म्हणतात —

**रामदासीं श्रीराम आराधिला। आराधुनी गुरूत्वें वरिला।**
**स्वरूपसाक्षात्कार करूनि साधिला। प्रपंचपरमार्थ ॥ १ ॥**
**श्रीरामचंद्रें रामदासासी। जेव्हां केलें निज अनुग्रहासी।**
**तेव्हां निरविलें श्रीहनुमंतजीसी। रामदासपरंपरा ॥ २ ॥**

दिनकरस्वामींनीं पुढें वर्णाश्रमधर्मानुसार क्रिया, विवेकयुक्त वैराग्य, निःसंगता व निस्पृहता, बोलाप्रमाणें क्रिया, अध्यात्मनिरूपण, श्रीरामगुणानुवाद-कीर्तन व 'श्रीराम जयराम जयजयराम' ह्या त्रयोदशाक्षरी मंत्रजपाचा नित्यनेम हे गुण रामदासी म्हणविणाऱ्याच्या अंगीं अवश्य पाहिजेत असें सांगितलें आहे. खुद्द **समर्थांचें** 'तरीच श्लाघ्यवाणें रामदास्य' यावर एक पद आहे त्यांत 'कायावाचामनें यथार्थ रामीं मिळणें' हें मुख्य लक्षण दिलें आहे. मायानिवर्तक ज्ञानाने ज्ञेय होणें म्ह० निर्गुणसुख लाधणें हें राम-दास्याचें फळ होय.

(६) पूर्वी शंकराचार्यांनीं भरतखंडांत धर्मस्थापनेचें जें महत्कार्य केलें तेंच समर्थांनीं १६ व्या शतकांत केलें. 'समर्थप्रताप'कार गिरिधरांनीं तें संक्षेपानें वर्णिलें आहे. ते म्हणतात कीं, समर्थांचें अवतारकार्य पाहिलें म्हणजे त्यांस 'आचार्यस्वामींची साजे उपमा.' आचार्यांनीं 'ब्रह्मसूत्र' रक्षिलें तर समर्थांनीं 'ब्रह्मारण्य व ब्राह्मण्य' संरक्षिलें. आचार्यांनीं संन्यास ग्रहण करून यतिधर्माची महती वाढविली तर समर्थांनीं ब्रह्मचर्याश्रमांतच

परमहंसमहिमा दाखवून ‘ विचारसंन्यासाचें ’ महत्त्व वाढविलें. आचार्य शंकरमूर्ति तर समर्थ महारुद्रमूर्ति. समर्थांनीं स्मार्त व वैष्णव या पंथांचें ऐक्य करून भगवत्स्वरूपीं साधुसंतमिळणी केली, म्ह० सर्व संत स्वरूपीं एकरूप असल्यामुळें ‘ अवघे मिळोनि येकचि जाले। देहातीत वस्तु ’ याप्रमाणें समन्वय केला. असो; समर्थांनीं ‘ तपोश्रम बहुत केले. ’ आचार्यांचा अद्वैत वेदान्त समर्थांनीं पूर्णपणे अंगिकारला आहे.

**समर्थें नाना पंथ शोधिले। समर्थें नानालोक बोधिले।**
**समर्थें नाना लोक वेधिले। हनुमान स्वामी सर्वेश्वरु॥**
**समर्थें भरतखंडीं आटणें केलीं। समर्थें तीर्थें पावन केलीं।**
**समर्थें गुप्तप्रगट सामर्थ्यें दाविलीं। सद्गुरुनाथ जगदीश्वरु॥**

येथें एक लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, रामदास श्रीरामरायाला समर्थ म्हणत. त्यांच्या भाषेने समर्थसंप्रदाय म्हणजे समर्थ जे राम त्यांच्या उपासनेचा संप्रदाय. मनोबोधांत ‘ समर्थाचिया सेवका वक्र पाहे ’ असा चरण आहे तेथें ‘ रामाच्या भक्ताला ’ असा समर्थांचा अभिप्रेतार्थ आहे. पण राम व रामदास एकरूपपणाने प्रत्ययास आले तेव्हां, शिष्य रामदासस्वामींनाच समर्थ म्हणूं लागले. ज्याच्या अंगीं ‘ इदं ब्राह्ममिदं क्षात्रं ’ हें उभयविध सामर्थ्य आहे तो समर्थ. समर्थांच्या हयातींतच त्यांना लोक समर्थ म्हणूं लागले. राष्ट्राचा अभ्युदय आणि निःश्रेयस्, किंवा प्रपंच व परमार्थ दोन्ही साध्य करून देणारा, राष्ट्राला युक्तिबुद्धिशहाणपण शिकवणारा, धर्मासाठीं राज्यसाधन व परमार्थ करण्यास आत्मप्रचीतीनें सांगणारा तो समर्थ, अशा अर्थानें समर्थसंप्रदाय याचा अर्थ समर्थ रामदासस्वामींचा संप्रदाय हा होय. धर्म, उपासना, कर्म, ज्ञान, व्यवहार, अध्यात्म, राजकारण व रामभक्ति यांचा प्रसार लोकोद्धारार्थ करणारे कार्यकर्ते समर्थांना पाहिजे होते व ते तयार करणारें प्रचंड विद्यापीठ समर्थांनीं चाफळास स्थापिलें. आतां या विद्यापीठांतून निघणारे कोणकोण विद्यार्थी कसे उत्तीर्ण झाले हें समर्थच

जाणोत ! पहिल्या वर्गातला अगदीं पहिल्या श्रेणीचा त्यांना एक विद्यार्थी मिळाला. त्याच्या गांठीभेटीच्या प्रसंगाचें वर्णन आपण आतां ऐकूं.

## ७ समर्थ व शिवराय यांची भेट

**हनुमंतस्वामींची बखर**

हनुमंतस्वामींच्या बखरींत समर्थ-शिवरायांचें अत्यंत रसभरित वर्णन आलें आहे. तें इतकें सरळ, सहज व प्रेमळ आहे आणि इतकें अकृत्रिम आहे कीं, ऋजु अंतःकरणाच्या मनुष्याला तें पटलेंच पाहिजे. शिवाजीराजे उच्च आर्य संस्कृतींत वाढले होते. ते हाडाचे धर्मशील व श्रद्धावंत होते, देवाब्राह्मणांवर त्यांची पूर्ण निष्ठा होती व हिंदु राष्ट्राच्या पूर्वपरंपरेप्रमाणें सद्गुरुकृपेची त्यांना तळमळ लागली होती, या गोष्टी अर्वाचीनांस न पटल्या तर ते हिंदुसंस्कृतीला पारखे झाले आहेत असेंच म्हणणें भाग आहे. मी येथें प्रायः हनुमंतस्वामींच्या शब्दांनींच ह्या अलौकिक गुरुशिष्यांच्या भेटीचे वर्णन देतों. " समर्थांची कीर्ति ऐकून त्यांचें दर्शन घ्यावें अशी इच्छा धरून म्लेंच्छांचा उच्छेद करून देवब्राह्मणांचें पालन व महाराष्ट्रराज्याची वृद्धि व धर्मरक्षण होऊन प्रजेची पीडा दूर व्हावी या कार्यास त्यांचा आशीर्वाद मिळविण्याचा हेतु धरून शिवाजीची स्वारी महाडास आली. तेथें महाराजांनीं एक कीर्तन ऐकलें त्यांत ध्रुवाख्यान लावलें होतें. नारदाने ध्रुवास कृतार्थ केलें हें ऐकून आपणास असे सद्गुरु केव्हां भेटतील अशी त्यांस उत्कंठा लागली. प्रतापगडीं गेले. तेथें देवीनेंही त्यांस दृष्टान्त देऊन 'रामदासस्वामींसच शरण जा कारण ते साक्षात् मारुतीचा अवतार तुम्हांकरितांच उत्पन्न झाले आहेत' असें सांगितलें. मग शिवराजाची स्वारी चाफळास आली. त्या काळीं नरसोमलनाथ अंबरखाने हे समर्थांचे शिष्य व सरकारच्या पदरचे चाफळखोऱ्याचे अधिकारी होते. त्यांनीं शिवाजीस समर्थांचें सर्व वर्तमान सांगितलें. समर्थ नेहमीं मठांत राहत नाहींत, अरण्यवास करितात, हें ऐकून 'तर मग हें रामाचें देवालय कोणी बांधिलें ?'

असा त्यांनीं प्रश्न केला तेव्हां 'देवालयास द्रव्य आपलेंच लागलें आहे' असें उत्तर मिळालें. तेव्हां हें कसें असा प्रश्न निघाला. त्यावर 'आपण पूर्वी गिरिगोसावी नाशिककर यांचें कीर्तन ऐकून त्यांस ३०० होन देऊं केले होते तेव्हां त्यांच्याच सांगण्यावरून आपण ते होन श्रीच्या देवालया-साठीं पाठवून दिलेत, शिवाय आपल्या पदरचे नरसोमलनाथ यांनीं व इतरांनींही कांहीं द्रव्य दिलें त्यावरून हें मंदिर बांधण्यांत आलें आहे. तेव्हां चाफळच्या श्रीरामाच्या देवालयास पैका आपलाच लागला आहे.' हें उत्तर ऐकून शिवाजीस आश्चर्य वाटलें. तेव्हां राजे यांनीं देवळासभोंवतें फिरून पाहिलें व नरसोमलनाथ यांजपाशीं बंधारा बांधण्यास ७०० होन दिले व त्यांजकडे भोजन करून ते समर्थांच्या शोधार्थ निघाले. शोध लागेना तेव्हां उद्विग्न होऊन प्रतापगडीं गेले, हेर व कारकून यांस समर्थांच्या शोधार्थ पाठविलें. 'स्वामिदर्शन व अनुग्रहप्रसाद झाल्याशिवाय' त्यांस चैन पडेना — शिवाजीमहाराजांनीं देवीसन्निध वैशाख शुद्ध ४ मंदवारीं दिवसा उपोषण करून रात्रौ शुचिर्भूत होऊन निद्रा केली तों प्रभातसमई स्वप्नांत पायीं पादुका, कटीं कौपीन, हातीं माळ, काखेस कुबडी, गळां मेखळा, मस्तकीं जटाभार व टोप याप्रमाणें स्वामींची मूर्ति अग्रभागीं उभी पाहून महाराजांनीं साष्टांग नमस्कार केला. स्वामींनीं मस्तकीं हस्त ठेवून आलिंगन दिलें. आणि मस्तकीं अवघ्राण करून नारळ प्रसाद दिला. स्वामी बोलिले, "इतके दिवस तुझ्या राज्यांत असून आमचा समाचार घेतला नाहीं. तूं धर्मिष्ठ व देवब्राह्मणसेवक आणि धर्मस्थापनेविषयीं तुजला श्रीची आज्ञा झाली आहे आणि तुळजाभवानीही तुजविषयीं साभिमान आहे. आतां तुजला आमच्या भेटीची अपेक्षा झाली म्हणून चाफळाहून आलों आहें. धर्माचा उच्छेद जाहला आहे त्याची स्थापना करून देवाब्राह्मणांचे ठायीं परम सादर असावें, राज्यकारभार अवलंबिला आहे तोच चालवावा इतकेंच सांगावयाचें आहे," इतकें बोलून स्वामी अदृश्य जाहले.

शिवाजीमहाराज परमसंतोषातें पावून आनंदाश्रु नेत्रांतून येत आहेत, शरीरावर रोमांच उभे राहिले आहेत अशा अवस्थेंत जागृत जाहले परंतु त्यांनीं दिलेला प्रसाद नारळ मात्र हातीं आहे ! स्वामींचे दर्शन स्वप्नांत घडले पण पुनः प्रत्यक्ष दर्शन होईल तो खरा सुदिन ! नित्यक्रमाप्रमाणें महाराजांनीं प्रातःस्मरणादिक सारून शिवपूजा केली व निवडक मंडळीसह महाबळेश्वरीं आले. तेथे देवदर्शन करून दानधर्म केला व तेथून वाईवरून माहुलीस आले. इतक्या संधींत स्वामींकडून एक शिष्य पत्र घेऊन आला —

**निश्चयाचा महामेरु । बहुत जनांसी आधारु ।**
**अखंडस्थितीचा निर्धारु । श्रीमंत योगी ॥ १ ॥**
**परोपकाराचिया राशी । उदंड घडती जयासी ।**
**तयाचे गुणमहत्त्वासी । तुलना कैंची ॥ २ ॥**
**यशवंत कीर्तिवंत । सामर्थ्यवंत वरदवंत ।**
**पुण्यवंत आणि जयवंत । जाणता राजा ॥ ४ ॥**

* * * *

**तीर्थक्षेत्रें तीं मोडिलीं । ब्राह्मणस्थानें बिघडिलीं ।**
**सकळ पृथ्वी आंदोळली । धर्म गेला ॥ ७ ॥**
**देवधर्मगोब्राह्मण । करावयासी संरक्षण ।**
**हृदयस्थ जाला नारायण । प्रेरणा केली ॥ ८ ॥**
**या भूमंडळाचे ठायीं । धर्म रक्षी ऐसा नाहीं ।**
**महाराष्ट्रधर्म राहिला कांहीं । तुम्हांकरितां ॥ १० ॥**
**कित्येक दुष्ट संहारिले । कित्येकांस धाक सूटले ।**
**कित्येकांसि आश्रय जाहले । शिवकल्याणराजा ॥ १२ ॥**
**सर्वज्ञ मंडळी धर्ममूर्ती । सांगणें काय तुम्हांप्रती ।**
**धर्मस्थापनेची कीर्ती । सांभाळिली पाहिजे ॥ १४ ॥**

स्वामींचें पत्र वाचून पाहून शिवाजीमहाराज परम सद्गदित जाले. ‘ या देशीं साधुवृंदें बहुत आहेत, त्या सर्वत्रांची यथाशक्ति सेवा, दर्शन व

भाषण करीत आहें परंतु आजपर्यंत समर्थांस भेटलों नाहीं' असा पश्चात्ताप पावून त्यांनीं क्षमा करण्याविषयीं उत्तरांत लिहिलें. समर्थदर्शनासाठीं ते दुसरेच दिवशीं निघाले. बाळाजी आवजी चिटणीस, निळो सोनदेव, मुजूमदार, वगैरे १०।५ मंडळी बरोबर घेऊन चाफळास आले. देवदर्शन घेतलें. अकांनीं सांगितले कीं, 'समर्थ सिंगणवाडीस श्रीमारुतीपाशीं आहेत. आपले पत्र काल अस्तमानीं पावले तें घेऊन कल्याण गोसावी आजच स्वामींकडेस गेले आहेत.' अकांनीं भोजनाचा आग्रह केला तेव्हां महाराज म्हणाले, 'आज समर्थांचे पाय पाहिल्यावांचून अन्नग्रहण करावयाचें नाहीं.' मग दिवाकरभट यांस बरोबर घेऊन महाराज सिंगण-वाडीच्या मारुतीस गेले. समर्थ उंबराखालीं जेठा घालून बसले आहेत व जवळ दासबोध (एकवीससमासी म्ह० जुना दासबोध) लिहिण्याचा क्रम चालला होता त्याचीं पानें होतीं व पुढें कल्याणस्वामी उभे आहेत अशा समयीं शिवाजीमहाराज आल्याची समर्थांस वर्दी देण्यांत आली. दर्शन झाले. शिवाजीचा कंठ सद्गदित झाला, नेत्रांतून अश्रुपात होऊं लागले व परमविनयानें बोलले, 'महाराज ! मी सर्वस्वी अपराधी आहें आणि समर्थ क्षमाशील आहेत. दर्शनाची इच्छा पूर्ण झाली. दुसरी इच्छा आहे ती समर्थांनीं पूर्ण केली पाहिजे.' समर्थ म्हणाले, 'तुम्हांस प्रतापगडीं मंदवारीं रात्रीस जें सांगावयाचें तें सांगून नारळ प्रसाद दिलाच आहे. त्यापरती काय इच्छा आहे?' तेव्हां महाराज म्हणाले, 'आज्ञा जाहली ती प्रमाण परंतु स्वामींनीं कृपापूर्वक अनुग्रहप्रसाद देऊन पावन करावें' असें म्हणून बहुत प्रकारें प्रार्थना केली. नंतर पूजासामग्री आणली. महाराजांनीं श्रीचे देवालयापासून सिंगणवाडीपर्यंत मनुष्यांची डाक ठेवली होती. निळो सोनदेव व बाळाजी आवजी यांनीं पूजासाहित्य आणलें व महाराज स्नान करून आले. भटजींनीं यथापद्धती सांगितल्याप्रमाणें महाराजांनीं पूजा केली. नंतर समर्थांनीं महाराजांस त्रयोदशाक्षरी मंत्रानुग्रह

केला. तेव्हां महाराजांनीं कृतकृत्यता मानून साष्टांग दंडवत करून परम-युक्तीनें नम्र होऊन परमार्थाविषयीं प्रश्न केला. तेव्हां त्यांची धारणा पाहून समर्थांनीं आत्मानात्मविचार थोडक्यांत समजावा म्हणून सांगितला तो पुढें थोरल्या दासबोधांत समाविष्ट केला आहे.

राजश्रीची धारणा पाहून स्वामी संतुष्ट झाले व वरदहस्त मस्तकीं ठेवतांच बोलले कीं, ‘ राजा ! तूं परमसुखातें पावलास. ’ महाराज म्हणाले, ‘ महाराज ! आपण मला अनाथास सनाथ केले. ’ राजा पूर्ण बोधातें पावला हें पाहून समर्थांस फार आनंद झाला. समर्थांनीं श्रीफळ, मूठभर माती, दोनमुठी लीद, व चारमुठी खडे याप्रमाणें प्रसाद महाराजांचे पदरांत घातला. या प्रसादाचा अर्थ महाराजांनीं पुढें मातुश्री जिजाबाईस सांगितला तो असा : ‘ नारळ प्रसाद हा माझे कल्याणार्थ. माती दिली येणें-करून पृथ्वी प्राप्त होईल व खडे दिले येणेंकरून बहुत किल्ले ताब्यांत राहतील व लीद दिली येणेंकरून पागा पदरीं पुष्कळ राहतील असे भाव समर्थांनीं सुचविले. ’ इतर मंडळीप्रमाणें मला सेवेला सन्निध ठेवावें असें महाराज म्हणाले तेव्हां समर्थांनीं त्यांस यथोचित उपदेश केला. ते म्हणाले, “ तुमचा मुख्य धर्म क्षात्र. क्षात्रधर्मी पुरुषांनीं राज्यरक्षण करून प्रजेचें पालन करावें, देवब्राह्मणांची सेवा करावी, तुमचे हातून अमानुष कर्में पुष्कळ व्हावयाचीं आहेत, फार दिवस म्लेच्छमय पृथ्वी झाली आहे त्याचें निवारण तुमचे हातून करवावें अशी श्रीरघुपतीची इच्छा आहे.

**बहुता दिवसांचें हें बंड । म्लेंच्छ माजले उदंड ।**
**यांचें करूनि दुखंड । राज्य करावें ॥**

आणि तो क्षात्रधर्मच तुम्हांस मुख्य धर्म होय. श्रींनीं तुम्हांस म्लेंच्छनिवारणार्थच उत्पन्न केलें आहे म्हणून आम्हांस पंचवटीस आज्ञा जाहली. तुम्ही वर्णाश्रमधर्मेंकरून श्रींचे आज्ञेप्रमाणें धर्मसंस्थापना करावी यांतच स्वार्थ व परमार्थ आहे. तुमचे पूर्वज कोणत्या वंशांतील हें लक्षांत

आणावें. तुमचे पूर्वजांतील शिसोदसिंह, पृथ्वीपालसिंह व लक्ष्मणसिंह इत्यादिकांनीं प्रताप केलेले लक्षांत आणून राजधर्म व क्षात्रधर्म करावा. तें टाकून भलतेंच कर्म करण्याची इच्छा करूं नये." यानंतर समर्थांनीं शिवरायास राजधर्म व क्षात्रधर्म हीं २०।२० ओव्यांचीं बहारीचीं प्रकरणें सांगितलीं. त्यांचा मी येथें विस्तार करीत नाहीं. फक्त त्यांतील ८।१० उत्कृष्ट ओव्या येथें देतों —

**अमर्याद फितवेखोर। यांचा करावा संहार।**
**शोधिला पाहिजे विचार। यथातथ्य।**
**उपाधीस जो कंटाळला। तो भाग्यापासून चेवला।**
**समयीं धीर सोडिला। तोही खोटा॥**
**मोहरा पेटला अभिमाना। मग तो जिवास पाहेना।**
**मोहरे मिळवूनि नाना। वरी चपेटे करी॥**
**जयास जिवाचें वाटे भये। त्यानें क्षात्रधर्म करूं नये।**
**कांहीं तरी करूनि उपाये। पोट भरावें॥**
**मारितां मारितां मरावें। तेणें गतीस पावावें।**
**फिरोन येतां भोगावें। महद्भाग्य॥**
**जैसा भांड्याचा गलोला। निर्भय भारामध्यें पडिला।**
**तैसा क्षत्री रिचवला। परसैन्यामध्यें॥**
**मर्दें तकवा सोडूं नये। म्हणजे प्राप्त होतो जये।**
**कार्य प्रसंग समये। वोळखावा॥**
**देवमात्र उच्छेदिला। जित्यापरिस मृत्यु भला।**
**आपुला स्वधर्म बुडविला। ऐसें समजावें॥**
**मराठा तितुका मेळवावा। आपुला महाराष्ट्रधर्म वाढवावा।**
**येविषयीं न करितां तकवा। पूर्वज हांसती॥**
**देवद्रोही तितुके कुत्ते। मारूनि घालावे परते।**
**देवदास पावती फत्ते। यदर्थीं संशय नाहीं॥**
**देव मस्तकीं धरावा। अवघा हलकल्लोळ करावा।**
**मुलुख बडवावा कां बुडवावा। धर्मस्थापनेसाठीं॥**

बाळाजी आवजी व निळो सोनदेव यांनाही त्या वेळीं अनुग्रहप्रसाद समर्थांपासून प्राप्त झाला. महाराजांनीं वस्त्रेंआभरणें, जवाहीरमोतीं, पोवळीं व पुतळ्या इ० अपरिमित द्रव्य आणून समर्थांस अभिषेक केला. समर्थांनीं तें द्रव्य चहूंकडे उधळलें व गुराख्यांच्या पोरांस बोलावून आणवून तें नेण्यास सांगितलें व आपण उठून डोंगरांत चालते झाले ! समर्थ दुसरे दिवशीं मठांत आले व त्रिरात्र शिवबास मठांत ठेवून घेतलें. तिसरे दिवशीं राजश्रीसह सर्वांचीं भोजनें झालीं. ज्या ज्या ज्ञाती होत्या त्यांच्या त्यांच्या अधिकाराप्रमाणें त्यांच्या पंक्ती मांडून सर्व सैनिकांसही भोजनप्रसाद दिला. नंतर श्रीचे मंडपांत सभा भरली, तेव्हां राजश्रींनीं समर्थांस राज्यअवलंबनास प्रारंभ केल्यापासून सर्व वृत्त निवेदन केलें. ते समयीं 'शिवबा ! फार चांगलें केलेंस,' असें समर्थ म्हणाले. नंतर समर्थांनीं बाळाजी व निळोपंत यांसकट सर्व सेवकांस दोन समासांत सेवकधर्म सांगितले. नंतर शिवाजीराजे प्रतापगडीं जाण्यास निघाले तेव्हां समर्थचरणीं मस्तक ठेवून मुहूर्तमात्र पडून राहिले. समर्थांनीं स्वहस्तें उचलून दृढ आलिंगन दिलें व "शिवबा ! तूं धन्य आहेस. तुझा सर्व भार श्रीहरीवर आहे. पूर्वीं आम्हांस पंचवटीस व टाकळीस पुरश्चरण करितांना तुझ्या साह्यतेविषयीं वारंवार श्रीरघुपतीची आज्ञा झाली आहे," असें सांगून समाधान केलें.

समर्थांनीं शिवाजीमहाराजांस शके १५७१ च्या वैशाख शुद्ध ९ स गुरुवारीं ( दीक्षितांच्या जंत्रीवरून त्यादिवशीं बुधवार येतो ) शिंगणवाडीच्या बागेंत अनुग्रह दिला.

**वाकेनिसी टिपणें**

बखरीनें शिवोपदेशाचा जो काळ वर दिला आहे त्याला वाकेनिसी टिपणांचा आधारही मिळाला आहे. हें समर्थचरित्रपर व कालानुक्रम दिलेलें अत्यंत महत्त्वाचें टिपण राजवाडे यांनीं प्रकाशांत आणलें आहे. समर्थांच्या लीला वेळोवेळीं

त्यांच्या शिष्यमंडळीने लिहून ठेवल्या होत्या. कल्याणस्वामी, उद्धव गोसावी, वेणाबाई, बाजीपंत, त्रिंबक गोसावी, दिवाकर गोसावी ह्या समर्थसंगतींत वाढलेल्या त्यांच्या प्रमुख शिष्यांनीं लिहिलेल्या समर्थलीलांचे उल्लेख प्रस्तुत वाकेनिसी टिपणांत आहेत व त्यांच्या आधारावरच हा लेख उभारला आहे. वरील समर्थशिष्यांनीं लिहिलेलीं टिपणें अगर चरित्रें आज उपलब्ध झालीं असतीं तर काय बहार झाली असती ! त्यांच्याइतकें अगदीं जवळून समर्थांना पाहिलेले व त्यांच्या लीला अनुभविलेले असे दुसरे कोण आहेत ? शंकरराव देवांना ३० वर्षें एवढे परिश्रम करूनही त्यांतलें एकही चरित्र प्रसिद्ध करितां आलें नाहीं हें आपले दुर्दैव होय ! पण दुधाची तहान ताकावर भागवावी त्याप्रमाणें तूर्त ह्या टिपणांवरच आपणांस समाधान मानून राहिलें पाहिजे. हें टिपण अत्यंत विश्वसनीय असें आहे. समर्थांच्या प्रयाणानंतर अगदीं चारच दिवसांनीं ही समर्थचरित्राची जंत्री अगर अनुक्रमणिका लिहिलेली आहे, आणि ती कोणी लिहिली तर ‘ दिवाकर गोसावी यांणीं सांगितल्या-वरून अंताजी गोपाळ वाकेनीस देशकुळकर्णी कुडाळकर यांणीं लिहिली.’ समर्थ शके १६०३ माघ वद्य ९ शनिवार या दिवशीं निजधामास गेले. त्यानंतर माघ वद्य १३ बुधवारीं हें स्मरण–टिपण लिहिलें आहे ! हें टिपण दिवाकर गोसावी यांनीं कुडाळकर देशपांडे यांच्याकरवीं लिहून काढविलें व त्याची नक्कल गोपाळ अंबाजी शहापूरकर यांनीं फाल्गुन शुद्ध ५ स केली. कुडाळकर व शहापूरकर हीं घराणीं समर्थसेवेंत वाढलीं होतीं व दिवाकर गोसावी हे तर समर्थांस शके १६६६ मध्येंच शरण आले होते व त्यांना समर्थचरित्र सर्व माहीत होतें. अशा समर्थशिष्यांनीं लिहिलेलें हें टिपण किती महत्त्वाचें आहे हें सांगावयासच नको. असो. या टिपणांत समर्थ व शिवबा यांच्या भेटीविषयीं जे उल्लेख आले आहेत ते येणेंप्रमाणे —

( १ ) “ मारुतीच्या देवालयीं रघुपतींनीं येऊन अनुग्रह करून रामदास हें नाम ठेविलें. कृष्णातीरास जाऊन जगदोद्धार करावा, शिसोदे याचे वंशीं

सांबवरेंकरून व देवीच्या वरेंकरून शिवनामा होणार आहे त्यास उपासना सांगावी, धर्मस्थापना करावी, म्हणौन आज्ञा जाहली. वरदहस्त मस्तकीं ठेवून अदृश्य जाले. शक १५३८ नळनाम संवत्सरे माध्यान्हीं दोन प्रहरीं श्रावण शुद्ध नवमीस मारुतीच्या देवालयीं अनुग्रह जाला."

समर्थांचें वय या वेळीं अवघें ८ वर्षांचें होतें व शिवराय जन्मले नव्हते.

( २ ) "शके मजकुरीं १५५४ आंगीरानाम संवत्सर शिवनामा उत्पन्न जाला आतां कृष्णातीरास जावें ( पण आधीं ) पृथ्वीप्रदक्षिणा करून येतों म्हणोन गेले फाल्गुनमासीं शुक्लपक्षीं...."

शिवनामा शिवनेरीस शके १५४९ मध्यें जन्मास आला व तो पांच वर्षांचा असतांनाच त्याची आठवण ठेवून समर्थ तीर्थयात्रेस गेले.

( ३ ) "शिवाजीमहाराज यांस अनुग्रह शके १५७१ शिंगणवाडीचे बागेंत वैशाख शुद्ध ९ गुरुवारीं झाला."

**अमात्यांचें वंशवृत्त**

शिवरायास अनुग्रह झाला त्या वेळीं त्यांचेबरोबर निळो सोनदेव होते व त्यांनाही समर्थांचा उपदेश झाला असें बखरींतील मागें दिलेल्या उताऱ्यावरून स्पष्ट दिसतें. निळो सोनदेव यांचे पुत्र रामचंद्र निळकंठपंत अमात्य, बावडा संस्थानचे संस्थापक, यांचें वंशवृत्त प्रसिद्ध झालें आहे. बावडा दप्तरांतील अस्सल कागदपत्र व सनदा यांच्या आधारे प्रस्तुत वंशवृत्त छापलें आहे. त्यांतही निळो सोनदेव मुजुमदार यांना शिवाजीमहाराजांबरोबरच समर्थांनीं शके १५७१ मध्येंच अनुग्रह दिला असें लिहिलें असून पुढें म्हटलें आहे कीं, "त्या वेळेपासून निळोपंतांचे घराण्यांत आराध्यदैवत रघुपति व रामदाससंप्रदाय हीं चालू झालीं. निळोपंत वारंवार स्वामींचे दर्शनास जात. शके १५८१ त चाफळ मुक्कामीं उद्धव गोसावी यांचे कीर्तनांत स्वामी श्रवणास बसले असतां शिवाजीमहाराजांनीं मोरचेल व निळोपंतांनीं भालदारकाठी हातांत घेतली होती."

शके १५७१ च्या वैशाखानंतर समर्थ व तुकोबाराय यांची भेट

**तुकोबा व समर्थ यांची भेट**

झाली असावी. उभयतांच्या मनोरचनेवरून पाहतां तुकोबा उठून समर्थांच्या भेटीस गेले असतील असें फारसें वाटत नाहीं; पण 'महंतें महंत शोधावा,' 'भिक्षामिषें लहान थोरें। परीक्षूनि सोडावीं' ह्या समर्थांच्या रीतीप्रमाणें समर्थांनीं तुकोबारायांची भेट स्वतः जाऊन घेतली असेल. तुकोबा पंढरी, आळंदी, पैठण, त्र्यंबकेश्वर, पुणतांबें ह्या वारकरी संप्रदायाच्या गाद्या सोडून अन्यत्र फारसे गेले नाहींत. तुकोबा व समर्थ यांची गांठ शके १५७१ च्या चतुर्मासांत पंढरीस पडली असावी —'**उद्धवसुत**' कृत समर्थचरित्रांत (अ० ४२) रंगनाथस्वामी, जयरामस्वामी, निंबराज दैठणकर, बोधलेबुवा व तुकोबाराय हे समर्थांस तेथें भेटल्याचें वर्णन आहे. सर्वांना तेथें परस्परमेळ्यांत कीर्तनसुखाचा आनंद झाला. ह्या ग्रंथांत महिपतबावांनीं न लिहिलेल्या तुकोबांच्या अनेक गोष्टी दिल्या आहेत. **दासविश्रामधामांत**ही समर्थतुकोबांच्या भेटीचीं अनेक वर्णनें आलीं असून तुकोबांच्या कांहीं नवीन आख्यायिका सांगितल्या आहेत. पंढरीस समर्थांच्या कीर्तनास बाबजीबावा, नाना, जयराम, बोधला, गुंडा, तुकाराम, गणेशनाथ, पुरुषोत्तम, इ० संत मिळाल्याचें ह्या ग्रंथकारानें लिहिलें असून समर्थ हे तुकोबांच्या भेटीस देहूस गेल्याचेंही वर्णन केलें आहे. 'पूर्ण सज्ञानी दोघे सज्जन भेटले.' तेव्हां समर्थ म्हणाले, 'मित्र आमुचा हा तुका सद्भक्त.' **हनूमंतस्वामींनीं** समर्थांच्या बखरींत पुढील बोधप्रद गोष्ट दिली आहे. समर्थांचा एक शिष्य तुकोबांकडे जाऊन त्यांचा अनुग्रह मागूं लागला. तूं पूर्वीं कोणाचा उपदेश घेतला आहेस काय असें तुकोबांनीं त्यास विचारिलें. त्या भोळ्या ब्राह्मणानें मी समर्थ रामदासस्वामींचा उपदेश घेतला आहे असें उत्तर दिलें. तेव्हां तुकोबा त्यास म्हणाले, 'स्वामींकडे जाऊन त्यांचा मंत्र त्यांस देऊन माघारा ये, नंतर तुला उपदेश देऊं.'

यानंतर तो ब्राह्मण स्वामींकडे गेला व त्यांस त्याने खरी गोष्ट सांगितली. स्वामी म्हणाले कीं, 'मुखांत उदक घेऊन सांगितल्या अक्षरांचा जप करून खडकावर गुळणी टाक व जा.' त्या ब्राह्मणाने त्याप्रमाणें करितांच 'मंत्राचीं तेरा अक्षरें खडकावर उमटलीं व त्याची वाचा बंद झाली!' तो परत तुकोबांकडे गेला व बोलतां येईना म्हणून त्यानें तीं अक्षरें लिहून दाखविलीं. तुकोबांनीं त्या ब्राह्मणाचा निषेध केला व त्याला घेऊन स्वामींकडे आले व त्या मूढावर दया करण्याची विनंति केली. त्या ब्राह्मणाला तीं अक्षरें जिभेने चाटून घेण्यास समर्थांनीं सांगितलें व त्यानें तसें करितांच त्याची वाचा परत आली! असो.

समर्थसंप्रदायांत तुकोबासमर्थांच्या भेटी व संवाद झाल्याचीं वर्णनें अनेक आहेत. महिपतबावांनींही त्यांची भेट झाल्याचें लिहिलें आहे. त्यांच्या भेटी झाल्या असण्याचा पूर्ण संभव आहे. एकाच प्रांतांत राहून एकच धर्मस्थापनेचें कार्य करणाऱ्या ह्या दोन महापुरुषांनीं एकमेकांच्या गांठी घेतल्या नसतील हें मनाला पटणारें नाहीं—तुकोबांची कीर्ति महाराष्ट्रांत सर्वत्र पसरली होती अशा वेळीं समर्थांचें कृष्णातीरीं आगमन झालें. पुणेंप्रांतीं शिवाजीमहाराज स्वराज्यस्थापनेच्या कार्याचा 'ओनामा' वळवायला लागले होते तों त्यांच्या कानांत तुकाराममहाराजांनीं स्वधर्मप्रेमाचा मंत्र सांगितला. तुकोबांचीं कीर्तनें ऐकून शिवरायांची स्वधर्मनिष्ठा प्रज्ज्वलित झाली. शिवरायांच्या पूर्ववयांत त्यांना तुकोबांचा सहवास झाला होता, तर उत्तरवयांत समर्थांचा पूर्ण पाठिंबा मिळावयाचा होता. धर्मश्रद्धेचें कवच अंगावर असल्यावांचून सात्त्विक राजकारण सिद्धीला जात नाहीं. शके १५७२ मध्यें तुकोबांनीं वैकुंठगमन केलें तेव्हां शिवराय २३ वर्षांचे होते व समर्थ ४२ वर्षांचे होते. समर्थ शके १५६६ मध्यें कृष्णातीरीं आले व १५६६ ते १५७२ च्या दरम्यानच्या ६ वर्षांत तुकोबा व समर्थ यांच्या परस्पर भेटी झाल्या असण्याचा पूर्ण संभव आहे. कदाचित् या काळांत तुकोबा, समर्थ

व शिवराय या त्रिमूर्तीची एखाददुसरी भेट झाली असणेंही अशक्य नाहीं.

शके १५७१ च्या वैशाखांत समर्थांनीं शिवाजीमहाराजांवर अनुग्रह-प्रसाद केला व त्यानंतरच तुकोबारायांकडे शिवाजीमहाराजांनीं दिवट्या, छत्री, घोडे, वगैरे पाठविले. त्यांचा त्या विरक्त महापुरुषानें स्वीकार न करितां ते परत पाठविले व त्याबरोबर १३ अभंगांचें पत्र पाठविले त्यांत—

**सद्गुरु श्रीरामदासाचें भूषण । तेथें घालीं मन चळों नको ॥**
**बहुतां ठायीं वृत्ति चावळली जेव्हां । रामदास्य तेव्हां घडे कैसें ? ॥**
**आत्मारामीं मन ठेवूनियां राहें । रामदासीं पाहें आपणेयां ॥**

असे चरण आहेत. ह्या वरील सर्व प्रमाणांवरून समर्थशिवरायांची भेट व अनुग्रह शके १५७१ च्या वैशाखांत झाला हें निश्चित ठरतें.

समर्थ व शिवबा यांच्या भेटींचा एवढा विस्तार करण्याचें कारण ही भेट शके १५७१ मध्यें झाली नसून पुढें शके १५८० अगर १५९५ मध्यें झाली असा पूर्वपक्ष गेल्या २५।३० वर्षांत कित्येकांनीं केला आहे हें होय. पूर्वपक्षाचे उत्कृष्ट खंडण राजवाडे, आळतेकर व अनंतदास रामदासी ह्या तिघांनीं केलें आहे व तें मला मान्य असल्यामुळें हा वाद पुन्हा येथें मांडून त्याचें खंडण करण्याच्या खटाटोपांत मी पडत नाहीं. समर्थांचा शिवाजीमहाराजांस अनुग्रह शके १५७१ च्या वैशाखांत झाला हा निश्चितार्थ समजावा.

समर्थांनीं शिवबांस काय उपदेश केला ते 'गुरुशिष्यांच्या एकान्तांतील गोष्ट' बाहेरच्या लोकांस कळणें अशक्य आहे तथापि संप्रदायाचा अनुक्रम पुढील छत्रपतींच्या घराण्यांत जो चालू झाला त्याचा मूळ खर्डा राजवाडे यांनींच प्रसिद्ध केला आहे त्यावरून अनुमान करितां येतें. त्या खर्ड्याच्या १९ कलमांचें तात्पर्य —

"मुख्य देवाचा जप ( श्रीराम जयराम जयजयराम ह्या मंत्राचा १३०० जप) एका आसनावर व्हावा. असें न होईल तर जसजसा अवकाश होईल तसतसा करावा. नित्य प्रातःकाळीं अकरा भीमरूपींतून एक भीमरूपी पढावी. मनोबोध श्लोक २०५ तून १३ किंवा ५ दररोज रात्रीस वाचावे. दासबोध ग्रंथाचे रोज दुपारास २ किंवा १ समास निदान ५ ओव्या तरी वाचाव्या. चैत्र शुद्ध ९ श्रीरामनवमीस श्रीराम, मारुती व दासबोध यांची पूजा करावी. हनूमज्जयन्तीचे पहिले दिवशीं उपोषण किंवा धान्योपाहार घ्यावा व जयन्तीचे दिवशीं सूर्योदयास पारणें व रात्रीस ब्राह्मणांची वसंतपूजा व्हावी. श्रावण वद्य ८ स कृष्णजयन्तीस उपोषण किंवा धान्योपाहार. पारण्यास ब्राह्मणभोजन. वैकुंठचतुर्दशीस प्रहर रात्रीं शिवपूजा. श्रीमहाशिवरात्रीस शिवपूजा. जपमाळेस तुळसीचे मणि ११३ असावेत. स्वर्णमारुतीची पूजा करावी. प्रतापवीर मारुती सोन्याचे करावे. याप्रमाणें नित्यनैमित्तिक कृत्यें करण्याबरोबर सवड साधून मनोबोध व दासबोध यांचा अर्थविचार करावा. मनांत **भूतमात्रीं दया ठेवावी, गोब्राह्मण, प्रजा आणि संतमंडळी यांचा सांभाळ व्हावा,**" इ० इ० ह्या खर्डा जरी समर्थांच्या पश्चात् तयार झाला असला तरी शिवरायांस उपदेश झाल्यावर वरच्यासारखा कांहींतरी नित्यनेम त्यांना करावाच लागला असणार. समर्थ व शिवराय यांच्या यापुढें वारंवार गांठी पडत त्या वेळीं त्यांचे काय संवाद होत तें कोणी सांगावें ? दासबोधांत त्याचा सुगावा थोडाफार लागतो. शिवरायांच्या पुढील चरित्रांत समर्थसंबंध कृतिरूपानें व्यक्तच आहे.

## ८ समर्थांची भूतदया—तीन गोष्टी

(१) समर्थ चाफळास असतांना एके रात्रीं नित्यनेमाची पंचार्ती व शेजार्ती होऊन ते निद्रा करायला गेले. आसपास उद्धव, कल्याण, आक्का, वेणु वगैरे दहा पांच शिष्यमंडळी निद्रावश होण्याच्या बेतांत होती.

मध्यरात्र उलटून गेल्यावर चोर आले, चोर आले, म्हणून हाकाटी झाली. शिष्यांतले पुरुष हातांत बर्च्या, भाले घेऊन मठरक्षणार्थ सज्ज झाले.

**समर्थ :** ही तयारी कशासाठीं चालली आहे ?

**कल्याण :** महाराज! चोरटे आले आहेत त्यांचा बंदोबस्त केला पाहिजे.

**समर्थ :** अरे! ते आमचें काय नेणार ? मठांतील विषय नेतील तर हा विषय तुमचाही नाहीं व आमचाही नाहीं. हें रघुपतीचें भांडार-घर आहे. कांहीं गडबड करूं नका.

**सर्व :** आपण म्हणतां हें प्रमाण, पण चोरांस कसें नेऊं द्यावें ?

**समर्थ :** चोर लोकांचे आणि तुम्ही मात्र देवाचे, असा अर्थ नाहीं ! तेही रघुपतीचेच घरचे आहेत.

चोर मठांत शिरून पाहिजे तितका विषय घेऊन मोटा बांधूं लागले. ते मोटा बांधून मठाच्या दक्षिणेकडून जांभळीचे वावरांतून पसार झाले !

**कल्याण :** महाराज ! आज्ञा होईल ती प्रमाण, पण आम्हां सर्वांस शपथ घाळून चोरांशीं दोन हात करूं न देण्यांत अन्याय झाला. देवाचा धर्म न्यायेंकरून व्हावा तों न होतां तस्करांनीं नेला यांत धर्म तो काय झाला ?

**समर्थ :** बाबा ! येथें जरी खर्च झाला तरी उदरनिर्वाहासच खर्च होणार, व चोरांनीं लुटून नेला तरी त्याचा त्यांच्या उदरनिर्वाहासच खर्च होईल ! ईश्वराचे घरीं जीव सारे सारखेच आहेत.

**कल्याण :** महाराज! सर्वभूतांचे ठायीं आत्मा एकच आहे असें आपण सांगतां पण आपणासारखे पुण्यात्मे आणि कर्माधीन व पापपुण्याच्या योगें स्वर्गनरक भोगणारे सामान्य जीव यांची योग्यता सारखीच कशी होईल ?

**समर्थ :** (हांसून) पण सर्वभूतांचे ठायीं भेद मानून कितीएकांस त्रास द्यावा असें तरी कोठें आहे ?

**कल्याण :** पण विधि आणि अविधि हे धर्म तरी कोणी केले ?

समर्थांनीं हा वाद येथेंच सोडून दिला, व 'मर्जीस येईल तसें करा पण चोरांस मारहाण करूं नका' असें सांगितलें. मग शिष्यमंडळीनें चोरांच्या मागोमाग जाऊन त्यांस पकडले, त्यांच्याजवळचीं शस्त्रें काढून घेतलीं, मठाची चीजवस्त परत घेतली व चोरांना समर्थांपुढें आणून उभें केलें. चोरांनीं समर्थांस पाहून साष्टांग दंडवत घातले. समर्थांनीं त्यांस जेवायला आग्रहानें ठेवून घेतलें व सदुपदेश करून सन्मार्गास लावलें. चोरांनीं चोरीचा धंदा सोडून दिला व चोरांचे साव झाले !

(२) समर्थांचे संगतीला एक बोका राहिला होता. त्याला समर्थ प्रत्यहीं दूधभात पोटभर जेऊं घालीत. त्याच्यासाठीं पाणी प्यायची एक वेगळी वाटी ठेवली होती. तो जेवला व पाणी प्याला म्हणजे समर्थ त्याला 'रामा ! तूं तृप्त झालास ना ?' असें विचारून मग आपण भोजनास बसत ! त्या बोक्याने एकदां जातिस्वभावानुसार दुभत्यास फार उपद्रव दिला तेव्हां शागीर्दमंडळीपैकीं एकानें त्याला धरून त्याचे डोळ्यांत तिखट भरलें ! त्यामुळें अत्यंत पीडा पावून तळमळ करीत तो बोका एका कोंपऱ्यांत दडून बसला. समर्थांनीं भोजनसमयीं 'रामाची' चौकशी केली, तेव्हां त्यांना वरील हकीकत कळविण्यांत आली. समर्थांच्या सकरुण हृदयास त्यामुळें दुःख झालें. त्यांनीं त्या बोक्यास आपल्या पानाजवळ आणलें, त्याचे डोळ्यांतून पाणी गळत असतांना समर्थांच्याही डोळ्यांस पाणी आलें ! त्या मुक्या जनावरास समर्थांचें सदय हृदय कळलें. जीवमात्राला तोंडाकडे व विशेषतः डोळ्यांकडे पाहून मनोभाव बरोबर कळतात. 'रामा ! तुला फार त्रास झाला रे' असें म्हणत त्यांनीं त्याचे अंगावरून ममतेनें हात

फिरविला. रामाला समर्थांच्या पंक्तीचें भोजन मिळालें. समर्थांनीं भोजनोत्तर त्या बोक्याचे डोळ्यांत कसलासा रस घातला व त्याचा डोळा बरा झाला.

दिव्याखालीं अंधेर, याप्रमाणें कोमळचित्त थोर पुरुषाच्या सान्निध्यांत राहूनही दुर्जन आपलें दुर्जनत्व टाकीत नाहींत हें नवल आहे !

( ३ ) शिवाजीराजे साताऱ्यास होते. समर्थ शिष्यमंडळीसह परळीस जाण्यास निघाले होते. वाटेंत हुरडा तयार पाहून शिष्यांच्या तोंडास पाणी सुटले व त्यांना हुरडा खाण्याची इच्छा झाली ! शेताचा मालक जवळपास दिसला नाहीं. समर्थांच्या बळावर शिष्य हुरडा तोडून भाजून खाण्यास उतावळे झाले. म्हणतात ना ‘ मायजीच्या जिवावर बायजी उदार. ’ एकेका शेतांतून दहादहा वीसवीस कणसें तोडीत शिष्यमंडळी देहेगांव-नजीक आली. तेथील पाटलाच्या शेतांत विहिरीवर सर्व उतरले. समर्थ एका आंब्याच्या झाडाखालीं निवान्त बसून राहिले. लाडावलेल्या पण उनाड मुलांप्रमाणें शिष्यांनीं कणसें एकत्रित केलीं व आगटी पेटवून हुरडा प्रथम कांहीं समर्थांस देऊन नंतर आपण खात बसले. गांवच्या पाटलास ही बातमी कळतांच तो धांवतच आला व समर्थांस पाहतांच हेच मंडळाचे म्होरके आहेत असें समजून तींच ताटें घेऊन त्यानें समर्थांस झोडपून काढलें ! शिष्य मारामारीस तयार झाले, पण समर्थांनीं त्यांचें निवारण केलें. ते म्हणाले, ‘ अरे, याच्या शेतांतील कणसें घेऊन खातां आणि यासच मारूं पाहतां ? तुम्ही अन्याय करून वर शिरजोरपणा दाखवितां हें अनुचित आहे. ’ स्वामींनीं चार दोन गोड शब्द बोलून पाटलाचें समाधान केलें ! समर्थांची शांति व सहनशीलता पाहून पाटील चकित व लज्जित झाला. समर्थ परळीस जाऊन पोंचले. समर्थ परळीस आले आहेत हें कळतांच शिवराय सरंजामासह त्यांच्या दर्शनास आले. समर्थांना चौरंगावर बसवून त्यांस अभ्यंगस्नान घातलें व भोजनाची सिद्धता करविली. स्नानाचे वेळीं समर्थांच्या पाठीवर शिवरायांनीं

तीन वळ पाहिले तेव्हां त्यांना वाईट वाटले व समर्थांना ज्यानें मारलें असेल त्याला जबर शिक्षा करण्यास ते तयार झाले. हुरड्याची गोष्ट शिवरायास सांगूं नका असें समर्थांनीं शिष्यांस सांगितले असतांही पाटलाचा सूड उगविण्याची खुमखुम असलेल्या एका अल्लड शिष्यानें ती शिवरायांस सांगितलीच ! शिवरायांनीं ताबडतोब शिपाई पाठवून देहेगांवकर पाटलास पकडून आणले. समर्थांनीं शिवबास सांगितले कीं, 'तुझे मनांत पाटलाचें पारिपत्य करावयाचें असल्यास आम्ही सांगूं त्याप्रमाणें करावें. त्यास मारहाण न करितां मानाचें पागोटें व बनात देऊन ती जमीन त्यास इनाम करून द्यावी !' हें ऐकतांच पाटील समर्थांच्या पायांवर लोळून क्षमा मागूं लागला. शिवरायांनीं समर्थांच्या आज्ञेप्रमाणें त्यास शिक्षा केली !

ही गोष्ट पुढें मोरोपंतांनीं एकाच आर्येंत सांगितली आहे—

**हुरडा घेतां ताडी पाडी देउनियांहि जो गाळी ।**
**साधु इनाम करुनि दे शेत सुता तातसा तया पाळी ॥**

मातृतीर्थ, पंचवटीच्या बाळमित्रांना पाठविलेले पत्र, चाफळच्या रामाची मार्गप्रतीक्षा, व वरीलसारख्या गोष्टी यांवरून समर्थांची हृदयकोमलता प्रतीतीस येते. वेदान्तनिरूपणप्रसंगीं तर्ककर्कश असलेले चित्त एरवीं किती उदार व प्रेमळ होतें हें पाहून त्यांची धन्यता वाटते.

## ९ एकवीससमासी

सांप्रदायिकांच्या नित्यपठणासाठीं समर्थांनीं याच सुमारास आपला एकवीससमासी ग्रंथ निर्माण केला. यालाच जुना दासबोध म्हणतात. दासबोध ग्रंथ तीन हप्त्यांनीं निर्माण झाला असें दिसतें. ही एकवीससमासी शके १५७०।७१ मध्यें झाली, दहा वर्षांनीं ७।८ दशकांचा दासबोध झाला व 'वीस दशक दासबोध । फोडूनि केला विशद' हा प्रकार समर्थांच्या प्रयाणापूर्वी म्ह० १६०१।२ मध्यें झाला. एकवीस-

समासीची ओवीसंख्या १३३५ आहे. यांतील कांहीं समास पुढें दासबोधांत घेतले आहेत—

१ समास ४ था 'सद्गुरुलक्षण'=दासबोध (द० ५, स० २)

२ समास ५ वा 'सच्छिष्यलक्षण'=दासबोध (द० ५, स० ३)

३ समास ६ वा 'वैराग्यलक्षण'=दासबोध (द० ३, स० १०)

४ समास ८ वा 'आत्मनिवेदन'=दासबोध (द० १२, स० ५)

५ समास २१ वा 'अनिर्वाच्य ब्रह्म.' याच्या ३० ते ३२ ओव्या दासबोधांत (द० ६, स० १०) घेतल्या असून तेथील समासाचें नांव 'अनिर्वाच्य समाधान' असें आहे. समास ७।१५।१६ हे भक्तिरसप्रधान आहेत, अत्यंत रसभरित आहेत. वक्ता आणि श्रोता, निंदा आणि निंदक, व दैव आणि प्रयत्न या तीन विषयांवर समर्थांनीं ह्या जुन्या दासबोधांत उत्कृष्ट शिकवणी दिल्या आहेत त्यांचा तेवढा येथें विचार सांगणार आहें.

जुना दासबोध समर्थांचाच आहे यांत संशय नाहीं. त्यांत ४।५ ठिकाणीं 'रामदास' या नांवाचा स्पष्ट उल्लेख आहे (पहा. समास १।९।१५।१६। २० ). 'पिसाट रामदास', 'ब्रह्मपिसा रामदास' असा त्यांनीं आपला नामोल्लेख केला आहे. 'तुजकारणें सर्वसंग। त्यक्त केला', 'तुजकारणें जिवलगांचा। संग सोडिला' असें त्यांनीं आपल्या वैराग्यशीलतेचें दिग्दर्शन येथें केलें आहे तें यथार्थच आहे. श्रोत्यांना 'ही प्राकृताची टीका' वाचावयास सांगतांना 'आज्य म्हणतां प्राप्त झाले। तूप म्हणतां तेंचि आलें,' 'अन्नाची चाड तरी नका। शब्दीं गुंतों' असें म्हटलें आहे. समर्थ ह्या एकवीससमासीलाही दासबोध म्हणत असावेत असें ९ व्या समासांतील 'रामदास ऐसें नांव। तरी मज कैंचा ठाव' व 'नांव दिधलें ग्रंथास। आपण नामरूपावेगळा' ह्या ओव्यांवरून वाटतें. 'स्वानुभवोद्गार आवरेना। यासी काय करूं?' म्हणून हा ग्रंथ मी लिहीत आहें असें त्यांनीं म्हटलें आहे.

तिसऱ्या समासांत श्रोता व वक्ता यांचीं लक्षणें सांगितलीं आहेत·

**श्रोता आणि वक्तालक्षणें**

तीं सर्व प्रकारच्या वक्तयाश्रोत्यांनीं ध्यानांत धरण्यासारखीं आहेत. प्रथम वक्ता कसा असावा तें पाहूं. ' जैसें बोलणे तैसीच क्रिया। ऐसा वक्ता जोडलियां। तात्काळ बाणे श्रोतया–। अंगीं निरूपण.' बोलण्यासारखें चालणारा वक्ताच पाहिजे. त्याचाच उपदेश लोकांच्या मनावर ठसतो. श्रोत्यांची क्रिया पालटेल, त्यांच्या वागण्यांत सुधारणा होईल, ते आपले दोष, दुर्गुण, दुर्व्यसनें टाकून सन्मार्गाला लागतील तरच वक्त्याचें व्याख्यान ऐकल्याचा उपयोग! वक्ता शांत, संयमी असावा, क्रोधानें चिणचिण करणारा नसावा. ' जयाचे हृदयीं वसे आस। तो वक्ता नको. ' कांहीं आशा धरून बोलणारा वक्ता नसावा. निरपेक्ष व निर्लोभी वक्त्याच्या शब्दांचा परिणाम होतो. लुलु म्ह० आशाळभूत गुरूच्या किंवा वक्त्याच्या शब्दाला मान नसतो. वक्त्याला श्रोत्यांच्या आशंकांचें व कुतर्कांचें सप्रमाण खंडण करितां आलें पाहिजे. ' वक्ता पाहिजे अनुभवाचा। ज्ञाता नसावा पुस्तकींचा। पुस्तकज्ञानें श्रोतयांचा। भ्रम तुटेना सर्वथा. ' श्रोत्यांची श्रवणेच्छा जागृत करण्याची शक्ति वक्त्यांत पाहिजे. वक्तृत्व ऐकून ' ऐकिलेचि ऐकावें। पुनःपुन्हा ' अशी श्रोत्यांत आतुरता उत्पन्न झाली पाहिजे. श्रोत्यांचीं वर्में काढून त्यांना टोंचून दुःख देणारा वक्ता काय कामाचा ? श्रोतेही उलट तसेंच वागूं लागले, कीं सभेत ' कोल्हाळ उठला एकसरा ' असें होऊन फड (सभा) मोडून जातो! 'जो सकळ जाणूनि नेणता' असा निरहंकारी वक्ता पाहिजे. 'भीड सांडूनि वर्में चुकवी। हितार्थ पोटस्तें शिकवी। कुशल वक्ता तोचि उगवी। श्रोतयांसी. ' हितार्थ बोलावें पण भीडही नसावी. सत्य पण प्रिय असें वक्तृत्वच उत्तम होय. श्रोत्यांशीं समतेनें वागून त्यांची समजूत पाडणारा व चित्तास समाधान देणारा वक्ता पाहिजे. असा सर्वगुणसंपन्न वक्ता प्रायः एका सद्गुरूवांचून दुसरा कोण सांपडणार ?

**श्रोता** सादर श्रवण करणारा व मननशील असावा. 'श्रोता आदरें श्रवण करी । तेणें उचंबळे आनंदलहरी । श्रोतेवक्ते अर्थान्तरीं । मिळोनि जाती' असें झालें पाहिजे. श्रोता कसा असावा? 'मुखाकडे लक्षी आदरें। बाहेरी निघतांचि उत्तरें। प्राशन करी कर्णद्वारें। विवरी स्वयें.' भिक्षुक, व्यापारी, मापारी हे आपापल्या व्यवसायांत जसे दक्ष असतात तसा श्रोता श्रवणाविषयीं दक्ष असावा. 'शूद्र शेतीं सांचळ (चाहूल) पाहे। कान देऊनि उभा राहे । श्वास उश्वास दीर्घ वाहे । म्हणोनि कोंडी बळें' इतक्या आदरानें पूर्ण अवधान देऊन ऐकणारा तोच श्रोता खरा. 'मिथ्यावादी अमंगळ व हरिकीर्तनीं उठे कपाळ' असा श्रोता काय करावा? 'वक्ता बहुभाष वाचाळ। तैसाचि श्रोताही तोंडाळ। दोन्ही मिळोनि खळखळ। उदंड करिती ॥ येकापुढें येक बोले । श्रोते अवघेचि वक्ते जाहले। जैसे ते जंबूक मिळाले । कोल्हाळ करिती ॥' अशा सभा अलीकडे पुष्कळांनीं पुष्कळ पाहिल्या असतील!! कावळ्याप्रमाणें वक्त्याचे गुणदोष मात्र पाहून निरूपणाकडे दुर्लक्ष करणारा श्रोता 'कोरडा खणखणित पाषाण। तैसें हृदय कठिण' असा भेटल्यावर वक्त्याच्या वक्तृत्वाचा त्यावर कांहींच परिणाम होणार नाहीं. कांहीं तमोगुणी श्रोते फारच झोंपाळु असतात. 'कडकडां जांभया देती । डकडकां डुकल्या घेती । घाबरे होऊनी पाहती । क्षणक्षणा दुश्चित ॥ निद्रा अज्ञानाची सावुली । निद्रा भ्रांतीची मावुली। निद्रा निरूपणीं केली। त्रिवसी ईश्वरें.' गोड निरूपणाकडे लक्ष न देतां आपल्या निद्रेचेंच कोड पुरविणारे श्रोते झोंड होत! जो अर्थान्तरीं सावध आहे त्याला निद्रा काय करील? जो स्वहिताला प्रवर्तला तोच श्रोता. वक्ता तसाच श्रोताही निरभिमानी असावा. मायबापांची क्रिया पाहून लेंकुरेंही तशींच वागतात, त्याप्रमाणें वक्त्याच्या उपदेशानुसार श्रोतेही वागतात. वक्त्याचा अधिकार मोठा आहे. वक्त्याकडे गुरुबुद्धीनें पहावें. श्रोत्यांच्या आदरप्रेमाच्या बळावर वक्त्याचें वक्तृत्व प्रभावशाली होत असतें, मग श्रोत्याला वाटतें:

**येका भावार्थासाठीं। उघडे शब्दरत्नपेटी।**
**अनर्घ्यरत्नांची गोमटी। माळ वस हृदयीं॥**

हा वक्त्याश्रोत्यांचा विषय दासबोधाच्या ३ ऱ्या समासांत असून १० व्या समासांत पुन्हा याचें विवेचन केलें आहे. वक्ता बुद्धिमंद असला तर त्याला कांहीं विचारूं नये, पण तो जर सुबुद्ध व सत्त्वगुणी असला तर त्याच्यापाशीं शंकासमाधान लीनतेनें विचारावें. लीनता हें मोठे रत्न आहे. 'लीनता अंगीं धरावी। देहबुद्धि जीवेंचि मारावी!' व्युत्पत्तीकडे व शब्द चघळण्याकडे चित्त न ठेवतां अर्थान्वय पहावा म्हणजे शांतिसमाधान मिळतें. 'पदप्रास आणि व्युत्पत्ति। क्षराक्षरज्ञातीची संपत्ती। यदर्थीं वृत्ति फांकती। त्या फांकों नेद्याव्या!' अर्थाची सोय धरावी. आंब्याची साल टाकून देऊन रस तेवढा घ्यावा, मनांत अहंकार न ठेवतां रससोय धरावी. ११ व्या समासांत ४।२ दृष्टान्त सुरस घेतले आहेत. चातुर्यनिधि असा राजहंस पाणी टाकून दूध घेतो, परीक्षावंत खोटें नाणें टाकून खरें घेतो, बाकस टाकून उसाचा रस घेतो, त्याप्रमाणें स्वहिताची गोष्ट तेवढी घ्यावी.

**निंदा व निंदक**

निंदा आणि निंदक यांविषयीं जुन्या दासबोधांत ४।५ ठिकाणीं समर्थांनीं साधकांस फार चांगली शिकवण दिली आहे तिचा आपण येथें एकवट विचार करूं. निंदा होते. देहाची, आणि देह तर मुळांतच निंद्य आहे. पण हें देहाभिमानामुळें मनुष्य विसरतो व देहाची निंदा ती आपलीच निंदा आहे असें म्हणून निंदकावर उसळतो. विचारानें पाहिलें तर निंदक हा आपला मित्र मानून त्याचे उपकार मानले पाहिजेत व निंदेनें खचून न जातां निंदा परमार्थबुद्धीला उपकारक आहे असें समजलें पाहिजे. 'देहाचें थोरपण तेचि उदास नागवण' आहे. 'देहमात्र तितुका निंद्य' आहे. देह विटाळाचें मूळ, देह अशुद्धाचा गाळ, देह कृमींचें कोठार, देह अस्थींचा पंजर

विष्टामूत्रवातपित्त यांनीं भरलेला हा कुश्चळ व विकारी देह, याचा अभिमान मूढावांचून कोण वाहील ? वस्त्राभूषणांनीं शृंगारून त्याच्या बळावर आपली थोरवी मिरवणें केवढें वेडेपणाचें काम आहे ! 'मी मी' म्हणतां म्हणतां आईबाप, आजेपणजे निघून गेले हें विसरून देहाला व देहसंबंधी स्त्री-पुत्रादिकांना 'मी—माझें' भावून अहंकार वाहणें अविचाराचें होय (स० ७). देहातीताच्या गोष्टी कराव्यात आणि देहाच्या स्तुतिनिंदेनें हंसावें रडावें हें काय परमार्थी मनुष्याला शोभतें ? जो स्तुतीनें चढतो तो निंदेने रडेलच !

**स्तुति होतां आनंदला । तो निंदा होतां रडला ।**
**या दोहींमध्यें न सांपडला । तोचि धन्य ! ॥ ६४ ॥**

प्रपंच करा पण क्रोध तरी आवरायला शिका ! समर्थ विचारतात—

**कासया सांगतां परमार्थगोष्टी । व्यर्थ करितां कपाळकुटी ।**
**वृंदावनफळासारखें पोटीं । काळकूट भरलें असे ! ॥ ६७ ॥**

ग्रंथ वाचावे, भजनाचा दंभ करावा, पण स्तुतिनिंदेचें विष पोटांत तसेंच ठेवावें हें विष्टेला चंदनाची उटी लावण्यासारखें व्यर्थ आहे ! (एकनाथासारखे सत्पुरुष होऊन गेले त्यांच्या शांतीच्या अद्भुत गोष्टी ऐकतां सांगतां पण त्यांचा तुमच्या मनावर कांहीं परिणाम घडला आहे काय ?)

**पूर्वी संतसमुदाय होता । त्याची क्रियाही ऐकतां ।**
**परी कांहीं तरी वर्ततां । तयासारिखे तुम्ही ? ॥ ६८ ॥**

'उलटाचि परमार्थ लौकिकीं । महत्त्वाकारणें !' असें मला दिसतें. स्वतःची स्तुति आवडणें तशीच दुसऱ्यांनीं केलेली निंदा न सोसणें हें देहबुद्धि जागृत असल्याचें लक्षण आहे !

**जरी देह हा निंदिला । तरी काय परमार्थ बुडाला ? ।**
**जवळून विवेकाला । देशधडी केलें ॥ ७२ ॥**

अरे शिष्य हो ! तुम्ही प्रतिष्ठेसाठीं झुरत आहांत ! ही परमार्थबुडवण आहे ! आतां तरी देहबुद्धि सोडा. ती सुटली नाहीं तोंवर तुमचा परमार्थ कानकोंडा आहे !

**बोलणें कठिण ऐकिलं । कीं वाईट लागलें ! ।**
**मुखश्रीचें चिन्ह पालटलें । ते देहबुद्धि नव्हे ? ॥ ७६ ॥**

हीं कठिण उत्तरें तुमच्या हितासाठींच बोलावीं लागत आहेत. 'हित सांगतां दुःख वाटे । तयाचें जाणावें प्रारब्ध खोटें !' स्थूळ देहाचा एकाद्या 'मैंद माउसीसारखा' (ठकाई मावशीसारखा) कां रे तुला एवढा कळवळा वाटतो ? 'तूं चारी देहांवेगळा' आहेस हें तुला अनेकवार सांगितलें आहे. असो. झाले तें झालें, आतां तरी विचार करून देहातीत हो.

**डगमगले तिहीं उठून जावें । उरले तिहीं सावध ऐकावें ।**
**आतां येथूनि लुटावें । मोक्षाचें भांडार ॥ ८१ ॥ ( स० ११ )**

पुढील समासांत खरोखरच 'मोक्षाचें भांडार' समर्थांनीं उघडलें आहे. वर गुरूनीं अंमळ खरमरीतपणें शिष्याचे कान उपटून त्याला देहबुद्धि सोड म्हणून सांगितलें. शिष्यांच्या मनांत आलें कीं, 'संतांची तरी देहबुद्धि पूर्णपणें सुटली असते काय ? खरोखर स्तुतिनिंदेचा त्यांच्या मनावर कांहींच परिणाम होत नाहीं ?' पण हें समर्थांना विचारायला तो भिऊं लागला व विचारल्यास मर्यादाभंग होईल कीं काय असें त्याच्या मनीं आलें. शिष्यास वाटेल तें विचारायचें पूर्ण स्वातंत्र्य देऊन आश्वासन देतांना समर्थ म्हणतात—

**जरी माझी मर्यादा धरिसी । तरी तूं स्वहितासी अंतरलासी ।**
**याकारणें मानसीं । शंका धरूं नको ॥ ३ ॥**

तुझ्या मनांत शंका असतील त्या मोकळ्या मनानें खुशाल विचार. तुझें समाधान करील तोच तुझा गुरु. शिष्याचें शंकासमाधान करितां आलें नाहीं तर आम्ही गुरु कशाचे ? 'परमार्थीं विचारितां कांहीं । सर्वथा

बळात्कार नाहीं' असें आश्वासन मिळाल्यावर शिष्यानें वरील शंका विचारली. 'संतांचीं क्षुद्रें दिसती' असें तो म्हणाला. यावर उत्तर करितांना संतांचें वर्णन समर्थांनीं केलें तें उत्कृष्ट आहे—

**अरे! संतांसी गुण कैंचे?। ते निर्गुण ठाईंचे।**
**गुणागुण हे मायेचे। संत निराळे मायेहूनी॥ ११॥**
**संत विश्वाचे मायबाप। संतांसी नाहीं पारिखे आप।**
**रूप आणि अरूप। याहीवेगळे जे॥ १४॥**
**संत दोष आच्छादिती। आपण स्वयें न करिती।**
**मर्यादा उलंघितां न येती। देहबुद्धीसी सर्वथा॥ १७॥**

देहमात्र निंद्य मानल्यामुळें स्वतःच्या देहाचाही त्यांना अहंकार नसतो. ते स्वरूपस्थितीनें असतात, शांत उदार असतात. अहंकाराचा वाराही तेथें नसतो.

**मोठें भय या स्थूळासी। तरी स्थूळ कचै हो आम्हांसी?।**
**हें जायाचें म्हणोनि रामासी। अनन्य शरण गेलों॥ २५॥**
**स्थूळाचें पांगिलें नसावें। होईल तैसें कौतुक पहावें।**
**आपण निंदेसी न प्रवर्तावें। आदरेंकरूनि॥ २८॥**

स्थूळाची निंदा ऐकून बहुतांना विषाद वाटतो, पण ते खरे परमार्थी नव्हत. 'परमार्थवेषें प्रपंच जाला!' देह हें लटिकें पण बहुतांना वेढा लावतें 'आणि अंतीं जातें। रांडिचें अमंगळ!' विवेकानें देहभाव सोड.

**जैसे अंकुशेवीण दंती। कां प्रधानावीण भूपती।**
**तैसी विवेकेंवीण शांती। होणार नाहीं॥ ३६॥**

बकवायसउद्धकांमध्यें जसा हंस, तसा कामक्रोधादिकांमध्यें विवेक एकटा आहे, तो प्रसंगीं टिकत नाहीं. आत्मस्वरूपाचा विसर झाला कीं देहबुद्धि वाढते, देहबुद्धीमुळें अहंकार, अहंकारामुळें क्रोध, क्रोधामुळें स्तुतिनिंदांचें प्रियाप्रियत्व! अशी ही सांखळी आहे. दुसरें असें पहा —

**जेणें हा देहो निंदावा। तो आपुला आप्त जाणावा।**
**तो निंदक म्हणावा। अविवेकबळेंकरूनियां ॥ ३९ ॥**

आम्हीच देहाची निंदा करतों, मग दुसरा जर या कामीं आम्हांस साह्य करूं लागला तर तो आमचा 'परमसखा' नव्हे काय? आपले गुणदोष अवश्य पहावेत व अध्यात्मश्रवणानें त्यापासून आपलें वेगळेपण अनुभवावें.

**श्रवण केलिया क्रिया पालटे। दिवसेंदिवस देहबुद्धि सुटे।**
**तरीच हें भवमूळ तुटे। जन्मजन्मांतरींचें ॥ ४७ ॥**

श्रवणांत श्रृंगारिक ऐकूं नये व वादविषयक कपाळकुटी करूं नये. ( स० १२ ).

आणखी एक सांगतों. जनीजनार्दन आपण म्हणतों व शास्त्रही सांगतें! मग जनांनीं आपले कांहीं दोष दाखविले तर वाईट कां वाटावें? आपलें वागणें जनीजनार्दनास पटलें नाहीं तर अद्याप आपणच दोषी आहोंत असें मानावें.

**जन आणि जनार्दन। यांसी नाहीं भिन्नाभिन्न।**
**म्हणोनियां जनापासून। अनृत न घडे ॥ ५२ ॥**
**तुझ्या ठायीं नाहीं विश्वास। आणि जनांसी ठेविसी गुणदोष।**

लोक बाष्कळ, उगाच दुसऱ्याची उठाठेव व निंदा करितात, असें म्हणावें तर त्यांची निंदा वृथा आहे असें जाणून आपण ती मनावरच घेऊं नये. आपली देहबुद्धि गेली नाहीं असें तूं ओळखावेंस व स्वहित साधावेंस याच हेतूनें लोक बोलतात! ( स० १७ )

निंदा व निंदक हे साधकाला कसे उपकारक आहेत हें समर्थांनीं उत्तम रीतीनें समजावून दिलें आहे. निंदेपासून कोणीही सुटला नाहीं व विवेकी मनुष्यानें सुटण्याची अपेक्षाही करूं नये. अन्यत्र ते म्हणतात—

**जनीं निंदितां सूटला कोण आहे?। जन सर्वदा सर्व निंदून राहे!॥**
**जया वर्णितां शीणली वेदवाणी। जनें निंदिला राम कोदंडपाणी॥**

सर्व सद्गुणांचा करंडक व कोदंडपाणी ( निंदकांना शिक्षा करण्यास समर्थ असा ) रामही लोकनिंदेपासून सुटला नाहीं. रामाच्या अवतारकालीं एक परीट रामनिंदक म्हणून पुढें आला व आतांही रामसीतामारुती-सारख्या विश्ववंद्य विभूतींची निंदा करणारा कोणी 'जाधव' प्रख्याती पावला आहे ! जेथें रामदासतुलसीदासांसारखे महात्मे रामनामबलानें लक्षावधि जीवांचा उद्धार करण्यास समर्थ झाले तेथें बापुड्या जाधवाची किंमत काय ? 'माध्यान्हीं थुंकतां सूर्यावरी । तो थुंका उडे आपणावरी ' याचा त्यास खचित अनुभव आला असेल. रामायणाचें इंग्रजी भाषान्तर करणाऱ्या ग्रिफिथ साहेबानें म्हटले आहे कीं, 'राम व सीता यांच्यासारखें सदाचारी व प्रेमळ दांपत्य जगाच्या इतिहासांत दुसरे झालें नाहीं व रामायण हें एकच काव्य असें आहे कीं, ज्याच्या वाचनानें आपल्या हृदयांत उत्तम गुणांचें संपूर्णतया प्रेम उत्पन्न होतें !' तसेंच गर्ट्रुड इमर्सन या अमेरिकन ग्रंथकर्त्रीनें Voiceless India नांवाच्या आपल्या ग्रंथांत म्हटले आहे कीं, "पाश्चात्य स्त्रियांना एका तरी आदर्श स्त्रीरत्नाचें नांव एकमुखाने सांगतां येईल काय ? मला शंका वाटते ! हिंदुस्थानांतल्या १२ कोट स्त्रिया सावित्री, कुंती, द्रौपदी, मैत्रेयी, दमयंती, इ० तारकांनीं परिवेष्टिलेल्या सीतादेवीचें नांव एकदम घेतील यांत शंका नाहीं. सीता ही केवळ काल्पनिक व्यक्ति नसून बारा कोटि स्त्रियांच्या हृदयांत स्फूर्तिरूपानें ती आजही जिवंत आहे ! असंख्य कोटि स्त्रीपुरुषांच्या जिव्हेनें सीतारामाच्या नांवाचा जप होत असतो. निंदकांना समर्थांनीं एक फटकारा तर मारलाच आहे —

**नरें मत्सरें पामरें पापरूपें । अतीकर्कशी जल्पती वागजल्पें ॥**
**तयां वाजटां मर्कटां कोण पूसे । सदा सर्वदा भुंकती श्वान जैसे ॥**

निंदकांनीं 'वंद्य मी निंद्य सर्व' असें न म्हणतां व परनिंदा न करितां 'आपनिंदा' म्ह० स्वतःचीच निंदा करावी—देहमात्र निंद्य नाहीं काय ?

अथवा देहातीताचा सर्वकाळ विचार करावा, म्ह० परनिंदा व आपनिंदा दोन्ही अपाप सुटतील !

## कांहीं विचाररत्नें

(१) सर्वस्वाची आस तुटे। तरीच सगुणमूर्ति प्रगटे।
दुःख संसारींचें फिटे। एकसरा॥

(२) एका भावार्थासाठीं। देव लागे भक्तांपाठीं।
भाव नसतां जगजेठी। प्राप्त नाहीं !॥

(३) सगुणमूर्तींचीं चरित्रें। श्रवण करावीं पवित्रें।
ध्यानें विविधें विचित्रें। अंतरीं धरावीं॥

(४) जयासी ज्याची आस। तयासी त्याचाचि ध्यास।
निदिध्यासें प्राणियास। तेंचि प्राप्ती॥
बहुतेक ध्यास मनीं। पूर्वाभ्यासेंकरूनी।
कांता पुत्र आणि धनीं। नेमस्त आहे॥

(५) श्रवण केलियां क्रिया पालटे। दिवसेंदिवस देहबुद्धि सुटे।
तरीच हें भवमूळ तुटे। अनंत जन्मांतरीचें॥

(६) जेव्हां वैभवहीन व्हावें। जिवलगीं वोसंडावें।
ते समयीं आपंगावें। कृपाळूपणें राघवें॥

(७) अज्ञान तें बरें। परी नायकावीं पाषांडउत्तरें।
मद्लंड पाखांडी खरें। तेंचि खोटें करिती !॥

(८) झांकावें आपणासी। आणि शिकवावें पुढिलांसी।
ऐसा हा सकळ सृष्टीसी। दंडकचि आहे॥
म्हणोनि आपण क्रिया करावी। मग पुढिलांसी न लगे सांगावी।
तुझी क्रिया देखोनि जीवीं। तेही तैसेंचि करितील॥

(९) सांडोनि प्रपंचसोहळा। परमार्थ दाखवावा आगळा।
दीन देखोनि कळवळा। आला पाहिजे॥

(१०) ज्याचा जो स्वधर्म तो तेणें। त्यागूं नये सर्वथा॥

(११) ज्याचे हृदयीं संदेह वसे। तेथें समाधान कदा नसे।

वरीलसारखीं विचाररत्नें एकवीससमासींत जागजागीं विखुरलेलीं आहेत.

## ९ रामायण

**रामायण**

समर्थांचें ‘ रामायण ’ हें इतर रामायणांहून अगदीं वेगळ्या प्रकारचें आहे. आधीं त्यांत सुंदरकांड व युद्धकांड अशीं दोनच कांडें आहेत. यांत समर्थांचा हेतु केवळ मारुतीचें गुणगायन करण्याचा उघड दिसतो. सुंदरकांडाचे १०० श्लोक व युद्धकांडाचीं १३ प्रकरणें मिळून १३०० वर श्लोक आहेत. तुळसीदासांच्या सुधामधुरवाणीचा अनुभव यांत नाहीं, एकनाथांच्या अध्यात्मपर पण रसाळ वाणीचा यांत प्रत्यय नाहीं, अध्यात्मरामायणांतील दिव्य स्तोत्रांची गोडी येथें नाहीं किंवा मोरोपंती रामायणांचें विविधत्व, वैचित्र्य व माधुर्यही नाहीं. येथें खणाखणीच्या युद्धवर्णनांची रेलचेल आहे ! भाषा दणदणीत व ओघवती आहे. शिवसंभाजीराजारामकालीं समर्थरामायणाच्या प्रती किल्लोकिल्लीं जाऊन तेथें त्यांचे रात्रौ वाचन होत असे असें म्हणतात. समर्थांनीं आपल्या ग्रंथांत ठिकठिकाणीं वाल्मीकीचा व त्याच्या रामायणाचा उल्लेख केला आहे व समर्थांच्या हातची वाल्मीकिरामायणाची एक प्रत सांपडल्याचें धुळेकर देवांनीं प्रसिद्ध केले आहे. समर्थांच्या आवडीचा व उपासनेचा रामचरित्रपर ग्रंथ तोच असल्यामुळें स्वतंत्र संपूर्ण रामायण लिहिण्याचें त्यांनीं मनावर घेतलें नसावें. शिवाय ज्यांत मारुति-पराक्रम वर्णिले आहेत तेवढाच भाग त्यांनीं वर्णनास घेतला. कदाचित् मराठे वीरांत युद्धप्रीति उत्पन्न करण्याचाही त्यांचा हेतु असेल !§ रामायण व मनोबोध यांच्या रचनाकाळांत फारसें अंतर नसावें. दोहोंमध्यें भाषेची धाटणी एकच आहे. ‘ दिल्हें अक्षई राज्य बीभीषणाला ’, ‘ गणाधीश जो

§ समर्थांनीं दोन कांडें लिहिल्याचें तिसरेंही एक कारण संभवतें : ‘ सोडिले बंद देवांचे । तो हा त्रैलोक्यनायकु ’-रामानें रावणास सकुल सपरिवार मारून देवांना त्याच्या जाळ्यांतून सोडविलें या एकाच गोष्टीचें त्यांना वर्णन करायचें होतें. त्यांचा जयजयकाराचा मंत्रही ‘ जयजय रघुवीर समर्थ ’ हाच होता.

ईश सर्वीगुणेसी', 'नुरावें परी कीर्तिरूपें उरावें', 'दुरात्मे महानष्ट चांडाळ पापी' इ० रामायणांतील चरण मनोबोधांतही आहेत. मनोबोधाची रचना अधिक सुश्लिष्ट व टापटिपीची आहे, तेथील प्रसादही कांहीं अलौकिक आहे. असो. रामायणांतील रावणाच्या **लंकेचें वर्णन** पहा—

**भयासूर तो भीम सिंधू उडाला। त्रिकूटाचळाहूनि पैलाड गेला।**
**अकल्पीत लंकापुरी कांचनाची। पुढें देखिली सौख्यदाती मनाची॥ १॥**

**गुढ्या गोपुरें देउळें ते अपारें। हुडे कोट जाळांधरें थोरथोरें।**
**सुवर्णाचळामाजि तें तेज फांके। तया पाहतां कीरणें दृष्टि झांके॥ २॥**

**गृहागोपुरांचा बहू दाट खेटा। सदा सर्वदा वाहती सर्व वाटा।**
**बिदी हाट बाजार कुंचे दुकाने। महामस्त ते हस्तजाती गुमाने॥ ३॥**

**सिलेभार संजूद ते राउतांचे। बरे फेर संगीत होती विरांचे।**
**दिसेना तयांलागिं झुंजार कोणी। बळें जिंकिले पीडिले लोक तीनी॥४॥**

**त्रिकूटाचळीं मारुती सर्व पाहे। लघूरूप होऊनि तो हिंडताहे।**
**गृहें गोपुरें पाहिल्या धर्मशाळा। अकस्मात त्या देखिल्या बंदिशाळा॥५॥**

**हिणांसारिखे देव ते दीन जाले। नसे शक्ति ना युक्ति पोटीं गळाले।**
**भयाभीत ते कांपती दैन्यवाणे। बहू गांजिले दुःख तें कोण जाणे॥ ६॥**

**सुरांकारणें कोप भीम सि आला। मनामाजि आवेश तो थर्थरीला।**
**रुपें भर्भरीला तमें गर्गरीला। प्रसंगीं तये मारुती गुप्त जाला॥ ७॥**

**महारण्यें व झाडखंडें**

समर्थांच्या रामायणांत अरण्यांचीं व झाडखंडांचीं वर्णनें चारदोन स्थळीं फार सुंदर आलीं आहेत. मारुतिराय सीताशुद्धीसाठीं वानरमंडळ्या घेऊन बाहेर पडले—

**गिरीकंदरें देश नानापरीचे। तडागें नद्या ओघ जाती गिरीचे।**
**पुरें पट्टणें अट्टणें धुंडिताती। कपीवीर दाही दिशा हिंडताती॥**
**बनें भूवनें रम्य नानापरीचीं। बरीं शोधिलीं तीं गिरीकंदरींचीं।**
**दरें, शृंग, पाठार, मैदान, दारीं। कपाटें, गव्या, वीवरें तीं भुयेरीं॥**

समर्थांनीं हे सृष्टिसौंदर्याचे सारे प्रकार नित्यशः पाहिलेले होते. महारण्यांत वृक्षावर उड्या मारणारीं वानरेंही त्यांच्या चांगलींच परिचयाचीं होतीं. युद्धकांडांत ते म्हणतात—

**कितीएक हेलावती वृक्ष अंगें। किती एक ऊफाळती लागवेगें।**
**कितीएक ते झोंबती आंग वेस्तें। किती एक ते लोंबती येक हस्तें ॥**
**किती येक पोटाळिती वाड झाड। किती मोडती अंगभारें कडाडें।**
**बहू मांडिली झाडखंडीं धुमाळी। कितीयेक झेंपावती अंतराळीं ॥**

युद्धकांडाच्या ६ व्या शतकांत निकुंभिला महारण्याचें सुंदर वर्णन आलें आहे—

**महाघोर तो लंघिला मार्ग तेहीं। पुढें पाहतां पाहतां वाट नाहीं।**
**तरूचीं बनें लागलीं ते वितंड। प्रचंडें उदंडें बहू झाडखंडें ॥**
**भुमी दाटले वृक्ष वृक्षीं मिळाले। तयांअंतरीं वंश मिश्रीत जाले।**
**वरी पाहतां वाड आकाशपंथें। पुढें रीग नाहीं तया वारयातें ॥**

तेथील 'कर्करीट वाजणारीं' समविषम झाडखंडें, पर्वताचे तुटलेले कडे, मदानें मातलेले व काळगर्जना करणारे सिंहशार्दूल तसेच 'बहु सामरें चीतळे रानगाई। सुन्यां सूकरां मर्कटां मित्य (मिति, संख्या) नाहीं' अशीं नानाप्रकाराचीं व नाना स्वरांचीं श्वापदें, किंकाटघोष करून पळणारीं गजांचीं दाट थाटें, झाडखंडीं वेटाळलेले विषारी व्याळ, विषाचे वाहणारे ओघ, गिरीशीं बळें आदळणारे तोयराशि,—असें हें त्या महारण्याचें सुंदर वर्णन आहे. त्यांतील शेवटचे दोनच श्लोक देतों—

**गिरीशृंग, पाठार, दारीं कपाटें। शिळा शीखरें वृक्ष पाषाण थाटें।**
**दरें दर्कुटें घोर भ्यासूरवाणें। बहूतांपरीचे तरू ते पुराणे ॥**
**धबाबा नद्या लोटल्या व्योमपंथें। भुमी तूटल्या थोर घातें निघातें ॥**
**कडे कापले तोय नेटें भडाडी। गिरीकंदरीं घोष तेणें धडाडी ॥**

द्रोणागिरीच्या वर्णनांतला एक श्लोक—

**वनें पोफळी कर्दळी नारिकेळी।**
**बनें आवळी जांबळी रम्य वोळी॥**
**बहू वृक्षजाती बहू पुष्पजाती।**
**बहू कूप वापी तळीं ओघ वाती (वाहती)॥**

**वीररसाची वाणी**

प्रस्तुत ग्रंथाच्या शब्दसृष्टीकडे आपण थोडेंसें लक्ष पुरवूं. रामदास हे शब्दसृष्टीचे खरोखरीच ईश्वर आहेत. भाषेंतले रूढ 'शब्द' तर त्यांजपुढें हात जोडून उभेच असतात, पण ते आपला मनोभाव व्यक्त करितांना प्रसंगीं शब्दांच्या हातापायांत बेड्या अडकवून त्यांना मजुरांप्रमाणें हवे तसे वांकवितात! ऱ्हस्व, दीर्घ, काना, मात्रा, यतिभंग, पदच्युति इत्यादि काव्यशास्त्रानें ठरविलेले निर्बंध त्यांच्या गांवींही नाहींत! त्यांच्या वेळच्या लेखनकलेनेंही कांहीं सवलती त्यांना दिल्या आहेत, पण समर्थ काव्यशास्त्राचे गुलाम नाहींत, त्याचे प्रणेते आहेत. शब्द व अलंकार सहजासहजीं येतील तसे ते त्यांना राबवून घेतात. लुसलुसित कोंवळे मंजुळ शब्द त्यांना नको आहेत असें नाहीं, पण ते त्यांची खुषमस्करी करणारे नाहींत. भक्तिरस, वीररस व करुणरस व यांना पोषक असेल तर प्रसंगीं वत्सलरस ह्या रसांपलीकडे ते बहुधा जात नाहींत. शृंगाररसाचें त्यांना वावडें आहे. भक्तिरस हा मराठी संतकर्त्रींप्रमाणें त्यांच्याही कवितेचा आत्मा आहे. त्यांची स्फूर्ति मर्दानी स्वरूपाची आहे, जनानी नाहीं! मारुतिरायाने उपजतांच पक्व फळ म्हणून सूर्यमंडळावर झेंप घातली, किंवा तोफेचा गोळा शत्रुसैन्यांत घुसून दाणादाण करितो—'तयाचेपरी स्फूर्ति दे रामराया' असें त्यांनीं रामापाशीं मागणें मागितलें आहे. त्यांचा हा रामायण ग्रंथ वीररसात्मक असल्यामुळें फासक्या फुसक्या गोष्टींकडे त्यांचें लक्षच नसे.

रामायणांत खुसीहाल ( खुशालीची वार्ता पोंचविणारे तोफांचे आवाज ), दशघ्नी ( दहांचा प्राण घेणारी तोफ ), शतघ्नी ( शंभरांचे प्राण घेणारी तोफ ), ज्वाळबंबाळ, गोळांगुळांचे ( वानरांचे ) भार, राक्षसांचीं सिसाळें ( मस्तकें ), पायिच्यांचे ( पायदळांचे ) व राऊतांचे ( घोडेस्वारांचे ) देह, प्रेतांची वढाणी ( दुर्गंधी ), रक्तमासांची चिडाणी ( चिखल ), रिसावानरांचे थोवे ( थवे, समूह ), लौद ( लठ्ठंभारती ), धिंग ( आडदांड ), नव्हाटे—जुनाटे ( नवेजुने ) लोक, इत्यादि शब्द वारंवार येतात. मारुतीनें 'बहू लाटिले लूटिले चूर केले' अशा राक्षसांची दैना उडाली. लक्ष्मणानेंही 'टणत्कारिलें चाप काळाग्निरोषें। थरारी मही सप्तपाताळ घोषें'. लंकादहनाच्या वेळीं 'असंभाव्य या मारुतीचा चपेटा' राक्षसांस खावा लागला. 'उफाळे तया धांवतां भूमि थोडी.'

**बळें लागला चंडवारा भरारां। पुरीमाजि तो वन्हि धांवे सरारां।**
**शिखा चालल्या अंतराळीं भडाडां। जळों लागली दिव्य लंका धडाडां॥**
**रिपू झोडिले पाडिले वृक्षघातें। भुमी लोळती दैत्य होवोनि प्रेतें।**
**पुढें देखतां जंबुमाळी कुटीला। बळें आखया आपटीला पिटीला॥**
**पळाले फळी फूटली राक्षसांची। पुढें हाक गेली तया आखयाची।**

* * *

**असंभाव्य ते तूटले पादपाणी। धडें मस्तकें थोर विक्राळवाणी।**
**नदी शोणिताचे महापूर जाती। धडें कोथळे फूगले ते वहाती॥**

वीररसाचीं सर्व वर्णनें याच थाटाचीं आहेत. श्लोक धांवते, सरळ व तेजाळ आहेत. हीं वर्णनें ऐकून शिवशंभुकालीन मराठ्यांचे बाहु वीरश्रीनें फुरफुरत असतील.

समर्थांच्या रामायणानें शब्दांच्या कशा माना मोडल्या आहेत तें पहा: अक्षै ( अक्षयी ), ग्रिवा ( ग्रीवा ), दमंती ( दमयंती ), लंकनाथ ( लंकानाथ ), बडीगा ( बडगा ), वगत्रें ( वक्त्रें, तोंडानें ), आसीळता

(असिलता), आचळ (अचळ, पर्वत), अश्रिणी (अशरीरिणी, आकाशवाणी), शर्भ (शरभ), कूडभावें (कुड्या भावानें), त्रीजटा, (त्रिजटा), सुपारश्व (सुपार्श्व सेनापति) इत्यादि शब्द समर्थांच्या दिव्यस्फूर्तीपुढें भुसासारखे उडत असतात! त्यांना म्हणून हे दोष माफ आहेत, सामान्य कवींना हे माफ नाहींत.

## १० लघुरामचरित्र

रामलीलापर छोट्याशा ४।५ प्रकरणांतही समर्थांनीं रामायणाचाच विषय आणला आहे. लघुरामचरित्र हें त्यांचें पहिल्या पहिल्या काव्यांपैकीं एक असावें. तेथें संतांच्या प्रार्थनेंत 'लहानसा कवी नवा। रघूत्तमासि वीनवा' असा एक चरण आहे! या काव्याच्या शेवटींही रामभक्ताच्या घरीं शरीर पडो व 'मनांत राम सांपडो' अशी एक ओळ आहे. रामभक्ति दृढ झाल्यावरचें व उपासना जनांत वाढविण्याचा उद्योग सुरू झाल्यावरचेंच हें काव्य आहे. यांत १२५ सुंदर पद्यें आहेत.

**समर्थ हे उपासना जनांत आणिती मना।**
**रघूत्तमा उपासिती सखेचि तेचि वाटती॥**
**शरीर वीकिलें गुणीं अनन्यभाव निर्गुणीं।**
**जना उपासनागुणें कळोनि मोक्ष पावणें॥**

देह सगुण रामाच्या उपासनेला विकला असून निर्गुणस्वरूपाच्या ठिकाणीं अनन्यता ही समर्थांची बैठक स्थिर झाली होती व रामभक्त त्यांना 'माझिये जातीचे' वाटत होते.

रावणाच्या बंदींत देव पडले व 'हिनादिनाचियेपरी' त्याच्या सेवेंत राबत होते याचें येथलें वर्णन अन्यत्र घेतलें आहे. वानर व राक्षस यांच्या युद्धाचें खणाखणीचें वर्णन येथें केलेलें आहे. 'समस्त देव गादले' होते व रावण मेल्यावर त्यांचे बंद तुटले. युद्धवर्णन वीररसान्वित आहे. थोडे श्लोक देतों—

उठावलीं कपीदळें पुरीस वेढिलें बळें ।
विरांविरांसि तांतडी बळावली धडाधडी ॥
त्रिकूट तो तडाडिला तडक वाजला भला ।
कडाडिले खडाडिले बहू हुडे धडाडिले ॥
असंख्य वीर जातसे धुळार गर्द होतसे ।
थरार मारिती शिरें कितेक हाणती करें ॥
पडोनियां उफाळिती बळें बळी धुमाळिती ।
बळेंचि पोट फाडिती निशाचरा विभांडिती ॥
कपी चपेट सूटले कितेक दैत्य आटले ।
झपेटिती लपेटिती पिटून कूटकूटिती ॥
तडाड तूटलीं शिरें उलंडलीं कळेवरें ।
कपी तुफान सूटले असंख्य सैन्य आटलें ॥
कडाडिले खडाडिले गडाडिले घडाडिले ।
तडाडिले थडाडिले दडाडिले धडाडिले ॥

समर्थांच्या युद्धवर्णनाची हीच तऱ्हा सर्वत्र आढळते. रामराज्याचें वर्णन अन्य मराठी कवींनीं केलें आहे तसेंच समर्थांनींही केलें आहे. 'मानपंचक' ह्या छोट्या प्रकरणांत रामराज्याचें सुरस वर्णन आलें आहे. समर्थांचीं कांहीं अध्यात्मप्रकरणेंही या कवित्वस्फूर्तीच्या पहिल्या भरांत झालीं असावींत.



# ७ श्रीदासबोधाचा परिचय



**समस्तांसि द्याया सुखानें सुबोध**
**सुधा नाम साजेलसा दासबोध।**
**प्रपंची विरागी रमे जेथ ऐसा**
**महद्ग्रंथ निर्मीयला रामदासा!॥१॥**

प्रास्ताविक १ पहिला स्तवनदशक. २ कुविद्येचे व सद्विद्येचे प्राणी. ३ संसारदुःखनिरसन. ४ नवविधाभक्ति. ५ सद्गुरु, सच्छिष्य व शुद्धज्ञान. ६ देवाचा शोध. ७ चौदा ब्रह्मांचें निरसन व केवलब्रह्म. ८ ज्ञानदशक. ९ उत्तरार्धातील महत्त्वाच्या टिप्पणी— १ निषेधमुखानें ब्रह्म. २ अहंतानिरास. ३ विडंबन. ४ पिंडीं तें ब्रह्मांडीं. ५ मूळमायेंतच त्रिगुण. ६ विकल्पनिरसन. ७ अंतरनिष्ठा. ८ सकळाचे अतःकरण एक का अनेक. ९ पंचप्रळय. १० भ्रम. ११ सगुणभक्ति. १२ प्रचीती. १३ चंचल आणि निश्चळ. १४ मतामतांचा गलबला व चार देव. १५ चचळ नदी गुप्तगंगा. १६ नित्यानित्य व सारासार. १७ हरिहरब्रह्मांची कहाणी. १८ कर्ता कोण? १९ अखंड ध्यान. २० निर्गुण. २१ दृष्टान्तांची गर्दी. २२ पंचभूतात्मक दैवतें. २३ एक चौदा, पांच चारी. २४ नाना उपासना. २५ उपासनेचें रहस्य.

## प्रास्ताविक

१ श्रीदासबोध ग्रंथाची रचना केव्हां व कशी झाली याविषयीं निर्बाध प्रमाणें अजून सांपडलीं नाहींत. समर्थ कृष्णातीरीं आले शके १५६६ मध्यें. ह्यानंतर त्यांचा शिष्यसंप्रदाय जमत चालला तेव्हां शिष्यांच्या बोधासाठीं त्यांनीं शके १५६९।७० मध्यें प्रथम एकवीससमासी दासबोध सांगितला. संप्रदाय आणिक वाढत चालला तेव्हां हा ग्रंथ त्रोटक आहे असें वाटून त्यांनीं शके १५८०।८१ मध्यें सातदशकी दासबोध तयार केला व पूर्वीच लिहिलेला आठवा ज्ञानदशक त्यास जोडला.

वेळोवेळीं प्रसंगानुसार समर्थांनीं आपले उपदेश अनेक स्फुटसमासांत सांगितले होते. पण हे सर्व इतस्ततः विखुरलेले स्वतंत्र समास एकत्र करून व त्यांचीं अनेक दशकें बनवून वीसदशकी दासबोध प्रयाणापूर्वीं म्ह० शके १६०० च्या सुमारास त्यांनीं तयार केला. म्हणजे एकवीससमासी शके १५७० मध्यें लिहिला व आठदशकी श० १५८१ मध्यें रचला आणि वीसदशकी म्हणजे संपूर्ण दासबोध शके १६०० मध्यें संकलित केला. दासबोधग्रंथ ह्याप्रमाणें तीन टप्प्यांनीं तयार झाला असावा असें माझें अनुमान आहे.

दासबोधांत (द० ६, स० ४) 'चारी सहस्र सातशें साठी। इतुकी कलियुगाची राहाटी' असा ७ व्या ओवीचा प्रथमार्ध आहे. त्यावरून गतकलि ४७६० म्ह० शके १५८१ ह्या वर्षीं साहव्या दशकाच्या ४ थ्या समासापर्यंत दासबोधग्रंथाची रचना झाली होती ही एक गोष्ट अगदीं सिद्ध आहे. ७ व्या दशकाच्या शेवटीं 'सरली शब्दाची खटपट। आला ग्रंथाचा सेवट' असें म्हटलें असून पुढील आठ ओव्या उपसंहारात्मक आहेत. ह्यावरून त्या वेळीं दासबोध सात दशकांचाच होता असें स्पष्ट दिसतें. ह्या सात दशकांत आरंभापासून अखेरपर्यंत समर्थांना सांगावयाचा होता तो सारा परमार्थ त्यांनीं पद्धतशीर रीतीनें सांगितला आहे. त्यांत समासांचा व दशकांचाही अन्वय आहे, विचारांची अत्रुटित सांखळी आहे. शके १५७५ च्या सुमारास एक स्वतंत्र 'ज्ञानदशक' त्यांनीं लिहून ठेवला होता तो शेवटीं जोडून आठदशकी दासबोध त्यांनीं पुरा केला. आठव्याच्या शेवटीं 'येथून हा ज्ञानदशक संपूर्ण जाहला' असें म्हटलें आहे; हा ज्ञानदशक एका प्रकारें अगदीं स्वतंत्र आहे. नवव्या दशकाच्या ६ व्या समासांत मूळमायेचें स्वरूप सांगतांना 'हें दासबोधीं असे बोलिलें। ज्ञानदशकीं प्रांजळ केलें' असें म्हटलें आहे. 'ज्ञानदशकाचे' उल्लेख द० ४, स० १० व द० ५, स० १० मध्यें आले आहेत; यावरून वीसदशकीनंतर व सप्तदशकीपूर्वीं

मध्येंच हा ज्ञानदशक केव्हां तरी समर्थांनीं स्वतंत्रपणें लिहिला होता हें उघड दिसतें. जे समास ओळीनें सांगितले गेले त्यांच्यांत अन्वय आहे. पुढें वीसदशकी दासबोधांत स्फुटसमासांचें संकलन केलें आहे. विसाव्या दशकाच्या शेवटीं ' वीस दशक दोनशें समास। साधकें पाहावे सावकाश ' असें म्हटलें आहे.

हे पुढील समास इतके स्वतंत्र व अलग आहेत कीं, मागच्या समासाचा पुष्कळदां पुढच्या समासाशीं कांहीं संबंध नसतोही, तथापि एवढें निश्चित आहे कीं, सारे २०० ही समास एकाच मुखांतून आले असून त्यांतील एकाही ओवीला दुसऱ्या मुखाचा स्पर्श झालेला नाहीं; म्हणजे कांहीं समास भिन्नभिन्न प्रसंगीं व भिन्नभिन्न विषयांवर सांगितले गेले असले तरी आद्यंत सारा दासबोध एकाच म्हणजे समर्थांच्याच मुखांतून निघालेला आहे. मायाजन्य नाना जिनसांतून एकजिनसी परब्रह्म जसें ओतप्रोत भरलें आहे, तसें नानाविध विषयांचें प्रतिपादन दासबोधांत केलेलें असलें तरी त्या सर्व प्रतिपादनांतून श्रीसमर्थांचाच अंतरात्मा स्पष्ट दिसतो. माया आणि ब्रह्म, प्रपंच आणि परमार्थ, चौदा ब्रह्में आणि निश्चळ ब्रह्म, सर्वब्रह्म आणि विमळब्रह्म, मायोद्भव आणि पंचप्रळय, सृष्टीची उभारणी आणि संहारणी, कुविद्या आणि सुविद्या, करंटे आणि सदैव, बंध आणि मोक्ष, टोणपसिद्ध आणि खरे सिद्ध, संसाराचें रूप आणि सायुज्यमुक्तीचें स्वरूप, बाष्कळ आणि नेमक, जडचंचळ आणि निश्चळ, नवविधाभक्ति आणि चतुर्विधा मुक्ति, त्रिगुणवर्णन आणि त्रितापवर्णन, असद्गुरु आणि सद्गुरु, असच्छिष्य आणि सच्छिष्य, बहुधाज्ञान आणि शुद्ध ब्रह्मज्ञान, विवेकवैराग्य, महंतलक्षण, निस्पृहलक्षण, कविकाव्यलक्षण, चातुर्यलक्षण व राजकारण, कीर्तनविषयक विविध विचार, शास्त्रधाटी आणि प्रचीति, सर्वविषयीं सावधपण, अंतरात्मलक्षण, महावाक्यविवरण व पंचीकरण, नानादेव-नानापंथ-नानामतें आणि एक मुख्य परमेश्वर आणि त्याची शुद्ध उपासना, बद्धादि चतुर्विधजन,

लेखन, विवरण आणि निरूपण, लोकसंग्रह इ० विविध विषयांचें दासबोधांत जें एकसूत्रीपणाचें विवरण आलें आहे, त्यावरून दासबोधांतील प्रत्येक अक्षरांत समर्थच भरून राहिले आहेत किंवा दासबोध ही समर्थांची वाङ्मयीमूर्ति आहे याविषयीं शंका घेण्याचें कारण नाहीं. असा हा ग्रंथ एकमुखी, एकसूत्री व एकरस आहे. समर्थ शक १५७६–१५८६ पर्यंत बहुधा शिवथरच्या घळींत होते; तेथें सातदशकी दासबोधाची उभारणी झाली यांत शंका नाहीं.

प्रस्तुत प्रकरणांत दासबोधाचें यथार्थ स्वरूप वाचकांच्या ध्यानांत आणण्याचा मीं प्रयत्न केला आहे. समर्थांच्याच शब्दांत व त्यांच्याच विचार-सरणींत त्यांच्या शिकवणी वाचकांच्यापुढें क्रमानें ठेवावयाच्या आहेत. प्रथम आठदशकी दासबोधाचें सार समासशः सांगून त्यानंतर मी पुढील दशकांतील महत्त्वाचीं अशीं पंचवीस टिप्पणें देणार आहें. अष्टदशकांतीलच विषयांचा परिपोष व परिपूर्ती करणाऱ्या या टिप्पणी आहेत. आठ दशकांत जितक्या ओव्या आहेत, जवळजवळ तितक्याच ओव्या पुढील बारा दशकांत आहेत, म्हणजे आठदशकी पूर्वार्ध व बारादशकी उत्तरार्ध असे दासबोधाचे दोन विभाग कल्पिले तरी चालण्यासारखें आहे. परमार्थ हा दासबोधाचा आत्माच आहे म्हणून प्रस्तुत प्रकरणांत समर्थांच्या मुखानें आपण पूर्णतया परमार्थ श्रवण करूं, राजकारण व समाजकारण यांचा विचार पुढें ऐकूं.

२ श्रीसमर्थांचा दासबोधग्रंथ एका दृष्टीनें मराठी वाङ्मयांत अपूर्व आहे. त्याच्यापूर्वींचे त्याच्यासारखेच लोकमान्य झालेले ग्रंथ म्हणजे विवेकसिंधु, ज्ञानेश्वरी व एकनाथी भागवत हे होत. त्या ग्रंथांचे व ह्या ग्रंथाचे विषय एकच असले तरी दासबोधाच्या मांडणींत एक वैशिष्ट्य आहे. ज्ञानेश्वरी किंवा नाथभागवत हे ग्रंथ स्वानंदाचे उद्गार आहेत, थोड्याफार बरोबरीच्या श्रोत्यांत निघालेले हे स्वात्मसुखाचे बोल आहेत. दासबोध हा शिष्यश्रोत्यांच्या बोधार्थ सांगितलेला शिकवणुकींचा ग्रंथ आहे. दासबोधाचे २०० समास

हीं दोनशें व्याख्यानें आहेत, प्रत्येक समासांत एक स्वतंत्र विषय प्रायः गुरुशिष्यं किंवा वक्ताश्रोता यांच्या संवादरूपानें सांगितला आहे. शिष्य किंवा श्रोते यांना समर्थ शिकवायलाच बसले आहेत. ज्ञानेश्वरनाथांचे श्रोते थोडेफार परमार्थांत मुरलेले होते, समर्थांचे श्रोते त्यांचे शिष्य आहेत, त्यांचे सांप्रदायिक आहेत. त्यांना संप्रदायाची दीक्षा दिल्यावर किंवा देतांना केलेला दासबोध हा उपदेशरूप ग्रंथ आहे. शिष्यांची खात्री पटविण्यासाठीं समर्थांनीं आपला स्वानुभवही जागोजाग सांगितला आहे व प्रसंगविशेषीं उपासनेची आण घेऊनही सांगितला आहे. जेथें सांगणे थकतें तेथें 'परी हें अवघें प्रांजळ कळे। सद्गुरु केलियां' असेंही म्हटले आहे. शिष्यांच्या शंकाआशंका किंवा तर्ककुतर्क फेडीत असतांना समर्थांच्या विचक्षण तर्कबुद्धीची सूक्ष्मता वारंवार प्रत्ययास येते. तोच तो विषय पुनरुक्तिदोष पत्करूनही त्यांनीं शिष्यप्रबोधार्थ सांगितला आहे. ज्ञानेश्वरी किंवा नाथभागवत हे ग्रंथ गीता व एकादश स्कंध यांच्या विस्तृत टीका आहेत तरी तेही ग्रंथ स्वतंत्रप्राय असल्यामुळें त्यांत प्रसंगाप्रसंगानें जे विषय आले आहेत ते दासबोधांत समर्थांनीं अगदीं स्वतंत्रपणें सांगितले आहेत. समर्थ एखाद्या विश्वविद्यालयांतल्या नाणावलेल्या कुलगुरूप्रमाणें आपल्या विद्यार्थीशिष्यांस अध्यात्मज्ञानवैराग्याचीं व्याख्यानें देत आहेत व आपल्या विषयांच्या स्पष्टीकरणार्थ नाना ग्रंथांच्या संमति मधूनमधून देत आहेत. त्यांचे बोल 'साधे व सप्रचीत' आहेत. दासबोधाची रचना स्वतंत्र असल्यामुळें त्यावरील आमचा हा अनुवाद त्यांच्याच शब्दांत व विचारसरणींत दिलेला आहे. ह्यावरून दासबोधाचें स्वरूप तर वाचकांच्या पूर्ण लक्षांत येईलच पण अध्यात्मविषयाचीही त्यांना चांगली ओळख पटेल असा मला भरंवसा वाटतो.

३ दासबोधांत काय आहे हें समर्थांनीं पहिल्याच प्रास्ताविक समासांत विशद करून सांगितलें आहे. ग्रंथाची प्रस्तावना ग्रंथ लिहून झाल्यावर शेवटीं लिहावयाची असते. प्रस्तुत समासही शेवटीं म्ह०. २०. दशकांचा

दासबोध बांधून झाल्यावर सांगितला आहे. त्यांत ग्रंथाचें नांव, ग्रंथांतील प्रतिपाद्यविषय व शेवटीं फलश्रुति दिली आहे.

**ग्रंथा नाम दासबोध । गुरुशिष्यांचा संवाद ।**
**येथ बोलिला विशद । भक्तिमार्ग ॥ २ ॥**
**नवविधाभक्ति आणि ज्ञान । बोलिलें वैराग्याचें लक्षण ।**
**बहुधा अध्यात्मनिरूपण । निरोपिलें ॥ ३ ॥**

दासबोधांत भक्तिमार्ग स्पष्ट करून सांगितला आहे. अज्ञानाची किंवा भोळ्याभावाची भक्ति समर्थांनाही मान्य नाहीं, भक्ति डोळस असावी म्हणून त्यांनीं बहुत प्रकारांनीं अध्यात्मनिरूपण केलें आहे व भक्तिज्ञानाला वैराग्याची भूमिका दिलेली आहे; म्हणजे पूर्वीच्या ग्रंथांप्रमाणेंच हाही ग्रंथ मुख्यतः भक्तिज्ञानवैराग्याचा ग्रंथ आहे. मात्र याच्या मांडणींत कांहीं नावीन्य आहे. विषय जुनाच पण अंमळ नव्या पद्धतीने मांडला आहे. 'भक्तीचेनि योगें देव। निश्चयें पावती मानव' हा या ग्रंथाचा अभिप्राय आहे. मुख्यभक्तीचा निश्चय, शुद्धज्ञानाचा निश्चय, आत्मस्थितीचा निश्चय, शुद्ध उपदेशाचा निश्चय, सायुज्यमुक्तीचा निश्चय, मोक्षप्राप्तीचा निश्चय, शुद्धस्वरूपाचा निश्चय, अलिप्तपणाचा निश्चय, मुख्य देवाचा निश्चय, मुख्य भक्ताचा निश्चय, जीवाशिवांचा निश्चय, मुख्य ब्रह्माचा निश्चय, नानामतांचा निश्चय व आपण कोण हा निश्चय येथें बोलिला असे; म्हणजे हा निश्चयात्मक ज्ञानभक्तीचा ग्रंथ आहे. येथें 'शुद्ध' व 'मुख्य' ह्या उपपदांना अर्थ आहे. जें शुद्ध व मुख्य नव्हे त्याचें येथें निराकरण केलें आहे. उदाहरण—बहुधाज्ञानाचें निराकरण करून शुद्धज्ञान सांगितलें आहे, चौदा ब्रह्मांचा निरास करून केवळब्रह्माचें स्वरूप दाखविलें आहे इ० इ०. याशिवाय मुख्य उपासना, कवित्व, चातुर्य, मायोद्भव, पंचभूतें, कर्ता कोण इ० विषय येथें विशद करून सांगितले आहेत. 'ऐसें बहुधा निरूपिलें' आहे. 'नाना किंत (किंतु) निवारिले । नाना संशयो छेदिले । नाना आशंका फेडिले । नाना प्रश्न.'

दासबोधाचे दशकवार विभाग पाडले असून त्या त्या दशकांतले विषय तेथल्या तेथेंच दाखविले आहेत. प्रत्येक दशकांत दहा समास आहेत. स्थळोस्थळीं नाना ग्रंथांच्या संमति घेतल्या आहेत (या ग्रंथांचा विचार पृ० १३० वर मागें केलाच आहे), त्यामुळें ह्या ग्रंथाला मिथ्या म्हणतां येणार नाहीं, शिवाय हें प्रचीतीचें बोलणें असून श्रोत्यांनाही त्याचा अनुभव येणार आहे. भगवंताच्या वचनाधारें हें सर्व लिहिलें आहे व 'भगवद्वचनीं अविश्वास ठेवण्याइतका पतित' कोण आहे? 'पूर्ण ग्रंथ पाहिल्याविण। उगाच ठेवी जो दूषण। तो दुरात्मा' दुरभिमानी व मत्सरीच म्हटला पाहिजे. 'अमृत सेवितांचि पावला। मृत्यु राहो' तसाच तो! आतां ग्रंथवाचनाची फलश्रुति सांगतात—

**आतां श्रवण केलियाचें फळ। क्रिया पालटे तात्काळ।**
**तुटे संशयाचें मूळ। येकसरां॥ २८॥**
**भ्रांत अवगुणी अवलक्षण। तेचि होती सुलक्षण।**
**धूर्त तार्किक विचक्षण। समयो जाणती॥ ३२॥**
**आळशी तेचि साक्षपी होती। पापी तेचि प्रस्तावती।**
**निंदक तेचि वंदूं लागती। भक्तिमार्गासी॥ ३३॥**

अज्ञान, दुःख व भ्रांति जाऊन वैराग्य तत्काळ अंगीं बाणेल व विवेक प्राप्त होईल—सविवेक वैराग्य होईल; 'चातुर्य कळे यथायोग्य। विवेकेंसहित.' बद्ध मुमुक्षु होतील, मूर्ख दक्ष होतील, अभक्त भक्तिमार्गें मोक्ष पावतील, अंगचे नानादोष जाऊन पतित पावन होतील. देहबुद्धीचे धोके जाऊन व संदेहाचे किंतु जाऊन संसाराचे उद्वेग नष्ट होतील. तात्पर्य 'श्रवणें चुके अधोगति। मनास होय विश्रांति। समाधान.' भावार्थासारखा लाभ होईल.

ही फलश्रुति विचारणीय आहे. तिच्यावरून समर्थांनीं हा ग्रंथ कोणासाठीं लिहिला व त्याच्या वाचनपठणानें काय लाभ होतील हें समजून येतें. आळशी, बद्ध, मूर्ख, अभक्त व पतित यांच्यांत सुधारणा होऊन ते

भक्तिमार्गाला लागून उद्धरावेत अशा परम कारुणिक बुद्धीनें समर्थांनीं हा परमार्थग्रंथ लिहिला आहे. देहबुद्धीचे धोके सोसणारे संसारी लोक यांना ज्ञानाचें समाधान मिळेल. निःसंदेह ज्ञान व सुखसमाधान सर्वांसच मिळणारें आहे. हा ग्रंथ निर्मत्सरबुद्धीनें वाचतील तर भक्तिमार्गाचे निंदकही त्याला वंदूं लागतील. अर्वाचीनांनाही पटेल अशी या अध्यात्मग्रंथाची मांडणी सुबोध व तर्कशुद्ध आहे.

दासबोध हा परमार्थाचा म्ह० हरिकथानिरूपणाचा ग्रंथ आहे. प्रपंच-ज्ञान व व्यवहारचातुर्य कोठें कोठें सांगितलें आहे. चारदोन राजकारणाचे समास त्यांत आहेत; विशेषतः १९ व्या दशकाचा ९ वा समास तर सर्वस्वी राजकारणाचा आहे. परमार्थाशिवाय आणखी एक महत्त्वाचा विषय दासबोधांत आहे. कार्यकर्ते कसे असावेत, त्यांनीं कसें वागावें, कोणत्या साधनांत असावें, लोकसंग्रह कसा करावा, लोक कसे राजी राखावेत, निस्पृह-पणानें व निर्दंभपणानें लोककार्य कसें करावें, हा विषय आजकालच्या देशभक्तांनाही मार्गदर्शक होणारा आहे व ह्याचें विवरण पुढें करण्यांत येणार आहे. दासबोधावर दासबोधाची किल्ली, कुबडी इ० जे चार दोन छोटे ग्रंथ आहेत त्यांनींही दासबोध हा अध्यात्माचा ग्रंथ आहे असें म्हटलें आहे. श्रीकल्याणस्वामींनीं दासबोधाच्या आरतींत ‘वेदांतसंमतीचा काव्यसिंधु भरला। अज्ञानजडजीवां मार्ग सुगम जाला’ असें म्हटलें आहे. शिवाय गेल्या २५० वर्षांत ज्या ज्या लोकांनीं दासबोधाचें श्रवणपठण केलें त्यांनींही दासबोधाकडे परमार्थदृष्टीनेंच पाहिलें आहे.

## १ पहिला स्तवनदशक

दुसऱ्या समासापासून १० व्या समासापर्यंत ९ समास स्तवनांचे आहेत. हा दशक नमनस्तवनांचा असल्यामुळें मंगलाचरणरूप आहे. गणेश, शारदा व सद्गुरु यांच्या स्तवनांचे पहिले तीन समास असून पुढें क्रमानें संत, श्रोते, कवीश्वर, सभा, परमार्थ व नरदेह ह्या सहा स्तवनांत

समर्थांनीं परमार्थाची बैठक विशद केली आहे. **गणेशाचें** ध्यान करितांना म्हटलें आहे—

> **ॐ नमोजी गणनायका। सर्वसिद्धिफलदायका।**
> **अज्ञानभ्रांतिछेदका। बोधरूपा॥ १॥**
> **माझिये अंतरीं भरावें। सर्वकाळ वास्तव्य करावें।**
> **मज वाक्शून्यास वदवावें। कृपाकटाक्षेंकरूनी॥ २॥**
> **तुझिये कृपेचेनि बळें। वितुळती भ्रांतीचीं पडळें।**
> **आणि विश्वभक्षकें काळें। दास्यत्व कीजे॥ ३॥**
> **येतां कृपेची निजउडी। विघ्नें कांपती बापुडीं।**
> **होऊनी जाती देशधडी। नाममात्रें॥ ४॥**

पुढें गणेशाच्या भव्य रूपाचें सुंदर वर्णन आहे. ' सप्रचीत भजनस्वार्थ। कलौचंडीविनायकौ ' म्ह० कलियुगांत गणेश व शारदा यांची भक्ति जीवांना तत्काळ फलप्रद होते. **शारदेचें** स्तवन सरस आहे. शारदा ही शब्दसृष्टीचें मूळ- म्हणून वेदमाता आहे. मूळमाया हें तिचें रूप. ' वायू जाणीव मिळोन मेळा। मूळमाया बोलिजे ' ( द० १०, स० ९ ); वायु व जाणीव मिळून मूळमाया. वायु म्ह० प्रकृति किंवा शारदा व जाणिवेचा जो अंश तो पुरुष किंवा गणेश. ब्रह्माच्या संकल्पाबरोबर गणेशशारदारूप मूळमाया झाली म्हणून तिला ' ब्रह्मसुता ' म्हटले आहे.

> **सिद्धीं वाचा अंतरीं आलें। तें वैखरिया प्रगट केलें।**
> **म्हणोनि कर्तृत्व जितुकें जालें। तें शारदागुणें॥ १४॥**

चार वाणींच्या द्वारें हीच सृष्टीची घडामोड करिते. ' जें जें दृष्टीनें देखिलें। जें जें शब्दें बोळखिलें। जें जें मनास भासलें। तितकें रूप जियेचें '—दृश्यभास हें शारदेचें रूप. गणेश व शारदा यांच्या स्तवनानें प्राप्य जें मूळ परब्रह्म तेंच **सद्गुरूचें स्वरूप** होय. त्या केवळस्वरूपाच्या ठिकाणीं मन वाचा कुंठित होते.

**नातुडे मुख्य परमात्मा । म्हणोनि करावी लागे प्रतिमा ।**
**तैसा मायायोगें महिमा । वर्णीन सद्गुरूचा ॥ ६ ॥**
**मायेच्या बळें करीन स्तवन । ऐसें वांछित होतें मन ।**
**ते माया जाहली लज्जायमान । काय करूं ? ॥ ७ ॥**

' आतां असाल तैसे असा । सद्गुरुस्वामी ' म्हणून सद्गुरूचें—रामाचें—स्तवन केले आहे. सद्गुरूच्या उपमेला ब्रह्मांडांत कोणतीही वस्तु पुरत नाहीं. आदित्य, परीस व सुवर्ण, सागर, मेरु, गगन, जगती, जळ, अमृत, कल्पतरु, कामधेनु इ० सर्वांपेक्षां सद्गुरु श्रेष्ठ आहेत.

**हरिहरब्रह्मादिक । नाश पावती सकळिक ।**
**सर्वदा अविनाश येक । सद्गुरुपद ॥ २९ ॥**

गणेश, शारदा व सद्गुरु हे समर्थांच्या सर्व मंगलाचरणांचे तीन मुख्य पदार्थ आहेत. पुढें **संत** व **श्रोते** यांना नमन केलें आहे. जुन्या जमान्यांत परमार्थाचे अभ्यासु, जिज्ञासु व अधिकारी बरेच असत व ते प्रसंगीं वक्त्यापेक्षांही अधिक योग्यतेचे किंवा निदान त्याच्या बरोबरीचे असत. तेव्हां प्राचीन संतांच्या ग्रंथांतून संतश्रोत्यांचें जें स्तवन केलेलें असे तें केवळ औपचारिक नसे. त्यांत वक्त्याची शालीनता व संतश्रोत्यांचा अधिकार दोन्ही तुल्यबळ असत. शिवाय ग्रंथकार आपल्यासमोर बसलेल्यांनाच उद्देशून बोलत नसत, तर पुढील काळांतल्या वाचक-पाठकांनाही नजरेसमोर ठेवून बोलत, किंबहुना तीनही काळांतल्या अधिकारी व्यक्तींना उद्देशून व आपल्याकडे लघुत्व घेऊन विनयानें बोलत. जें गुह्यज्ञान कोणत्याही साधनानें प्राप्त होत नाहीं, जें रविचंद्रांनाही दाखवितां येत नाहीं—' जेथें आक्षेप आटले । जेथें प्रेत्न प्रस्तावले । जेथ तर्क मंदावले । तर्कितां निजवस्तूसी '—जेथें वेदाचीही मति कुंठित होते—' तेचि वस्तु संतसंगें । स्वानुभवें कळों लागे ', कां कीं वस्तु अनिर्वचनीय आहे व तेंच संतांचें स्वरूप आहे. परमात्मवस्तु संतरूपानें प्रगट होते.

ब्रह्माचे सगुणावतार, ब्रह्माची प्रत्यक्ष मूर्ति म्हणजे संत आहेत. त्यांच्या संगतींत त्यांच्या कृपाप्रसादानें आपला आपणास लाभ होतो.

**संत आनंदाचें स्थळ । संत सुखचि केवळ ।**
**नाना संतोषाचें मूळ । ते हे संत ॥ १६ ॥**
**संत धर्माचें धर्मक्षेत्र । संत स्वरूपाचें सत्पात्र ।**
**नातरी पुण्याची पवित्र । पुण्यभूमि ॥ १८ ॥**

संत समाधीचें मंदिर, विवेकाचें भांडार, सायुज्यमुक्तीचें माहेर, सत्याचा निश्चय—जें म्हणावें तें कमीच आहे.

**मोक्षश्रिया आळंकृत । ऐसे हे संत श्रीमंत ।**
**जीव दरिद्री असंख्यात । नृपति केले ॥ २१ ॥**
**महाराजे चक्रवर्ती । जाले, आहेत, पुढें होती ।**
**परंतु कोणी सायुज्यमुक्ती । देणार नाहीं ॥ २३ ॥**
**जें त्रैलोक्याहून वेगळें । जें वेदश्रुतीसी नाकळे ।**
**तेंचि जयांचेनि वोळे । परब्रह्म अंतरीं ॥ २५ ॥**

मुख्य परमात्मा त्यांच्या कृपेनें प्रगट होतो एवढा संतांचा महिमा आहे. असाच 'भक्त ज्ञानी व संत सज्जन,' अशा श्रोत्यांचा अधिकार आहे. 'नाना अर्थामृताचे भोक्ते । प्रसंगीं वक्तयाचे वक्ते' असे श्रोते समोर असले कीं 'वक्तृत्वरस तुंबळे अंतरंगीं.' असे श्रोते हे 'स्फूर्तिकिरणाचे दिनकर' आहेत.

**ज्यांचे दृष्टीखालून गेलें । ऐसें कांहींच नाहीं उरलें ।**
**पदार्थमात्रासी लक्षिलें । मनें जयांच्या ॥ ६–९॥**

समर्थांनीं 'मी येक वाग्दुर्बल। श्रोते परमेश्वरचि केवळ' असें श्रोत्यांचें गौरव करून आपल्याकडे लघुत्व घेतलें आहे—

**व्युत्पत्ति नाहीं कळा नाहीं । चातुर्य नाहीं प्रबंध नाहीं ।**
**भक्तिज्ञानवैराग्य नाहीं । गौल्यता नाहीं वचनाची ॥ १५ ॥**
**ऐसा माझा वाग्विळास । निःशंक बोलतों सावकाश ।**
**भावाचा भोक्ता जगदीश । म्हणोनियां ॥ १६ ॥**

तुम्हां जाणत्या श्रोत्यांपुढें 'माझी व्युत्पत्ती किती?' परंतु बुद्धिहीन अल्पमति 'मी सलगी करितों.' समर्थाचा पुत्र मूर्ख असला तरी सामर्थ्यवंत असतो तसा मी 'तुम्हां संतांचा' आहें.

**व्याघ्रसिंह भयानक। देखोनि भयचकित होती लोक।**
**परी त्यांची पिलीं निःशंक। तयांपुढें खेळती॥ १९॥**

मूल वेडेंबोबडें बोललें तरी मायबाप त्याची संपादणी करितात त्याप्रमाणें 'माझी चिंता तुमचें चित्त वाहेलचि कीं.' आतां न्यून तें पूर्ण करावें व पुढें 'कथेसी अवधान द्यावें। म्हणे दासानुदास.'

(लीनतेमुळें, निरहंकारामुळेंच स्फूर्तीचे लोट वाहत असतात. अहंकारानें ग्रंथ शापित होतो, अहंकार पायातळीं घातल्यानें संतश्रोते व देव प्रसन्न होऊन प्रेमप्रसादस्फूर्ति देतात, आत्मप्रसाद होतो.)

यापुढें **कवीश्वरांचें** स्तवन केलें आहे. त्याचा उपन्यास पूर्वी केला आहे (पृ० १२६). महाकवींची काव्यरचना ब्रह्मांडरचनेहूनही श्रेष्ठ आहे असें समर्थांनीं म्हटलें आहे.

आठव्या समासीं **सभास्तवन** केलें आहे. देवाचे भक्त जेथें गातात त्या सर्वकालीन व सर्वस्थलीन सभांना व त्यांतील ज्ञानी भक्तभाविकांना येथें नमन केलें आहे. 'भक्त गाती तें वैकुंठ.' 'प्रेमळ भक्तांचीं गायनें। भगवत्कथा हरिकीर्तनें। वेदव्याख्यानपुराणश्रवणें। जेथें निरंतर' अशा सभांना समर्थ वंदन करितात—ह्या सभांतून देवाचे गुणानुवाद व अध्यात्मचर्चा चालतात. तेथें 'भक्त प्रेमळ भाविक। सभ्य सखोल सात्त्विक। रम्य रसाळ गायक। निष्ठावंत' एकत्र मिळतात. धर्मशील, आचारशील, नेमक म्ह० नित्यनेमानें चालणारे, विरक्त, निस्पृह, तपस्वी, मनस्वी, उपासक, सज्जन, पंडित, इ० भले लोक जेथें जमतात त्या सभा. 'कलौ कीर्तन वरिष्ठ। जेथें होय ते सभा श्रेष्ठ.' 'वृद्ध तरुण आणि

बाळ । पुरुष स्त्रियादिक सकळ' मिळून भगवंताचे गुणानुवाद गातात व आत्मनिरूपण करितात व ऐकतात त्या सर्वांना माझें अभिवंदन असो. ह्या सर्व समासांत सर्व सज्जनांना आवाहन केलें आहे.

नवव्या समासांत **परमार्थस्तवन** आहे. सर्व योगांत समर्थ असा योग म्हणजे परमार्थ. हा परमार्थ परमसुगम आहे पण सत्समागमाचें वर्म चुकल्यामुळें जनांस दुर्गम झाला आहे! इतर साधनें उधारीचीं आहेत पण परब्रह्मसाक्षात्कार रोकडा आहे, तत्काळ प्रचीतीस येणारा आहे. '**आकाशमार्गी गुप्त पंथ । जाणती योगिये समर्थ**'—हा आकाशमार्गींचा गुप्त पंथ आहे म्ह० परमसूक्ष्म जें आकाशतत्त्व त्यांतूनही विवेकानें पैलपार गेल्यानेंच हा अध्यात्मयोग साधणारा आहे. परमात्मतत्त्व हें साराचेंही सार आहे. तें अखंड अक्षय अपार आहे. हें धन चोरांना चोरतां येत नाहीं. याला राजभय नाहीं, अग्निभय नाहीं, श्वापदभय नाहीं! तें हलत नाहीं, अचळ व अढळ आहे. हें 'निज ठेवणें' कमजास्त होत नाहीं. तथापि 'हें पाहतां दिसेना। गुरुअंजनेंविण.' हा गुरुगम्य मार्ग आहे. 'मार्ग तरी अंतरिक्ष । जेथें सर्वही पूर्वपक्ष' असें पुढें पादसेवनभक्तींत (द० ४, स० ५) पुन्हा म्हटले आहे. हा आकाश-मार्ग किंवा अंतरिक्षमार्ग काय आहे ह्याचा येथेंच उलगडा करितों. हा अंतरिक्ष मार्ग आहे म्ह० आंत (अंत) पाहतां पाहतां (ईक्ष) दिसत जाणारा आहे. अंतरिक्ष म्ह० आकाश. स्थूलांत सूक्ष्म, सूक्ष्मांत कारण, कारणांत महाकारण किंवा ज्ञान, त्याच्यापलीकडे द्रष्टा व द्रष्टयाच्याही-पलीकडे सद्वस्तु असा अंतर्मुखदृष्टीनें पाहतां पाहतां आढळणारा हा मार्ग आहे. जेथून पाहतां वेदशास्त्रपुराणें सर्वही पूर्वपक्षांत येतात! साक्षित्वानें तो पाहतां येत नाहीं, कारण साक्षित्व ही एक वृत्ति आहे व तो वृत्तींपलीकडे आहे. सद्गुरुसंतसमागमाशिवाय हा अनुभवाला येत नाहीं. 'सद्गुरुविण सर्वथा सन्मार्ग नसे' हा सिद्धान्त आहे. परमार्थ हा योग्यांचें साध्य आहे,

याला 'परमगुह्य' म्हणतात. सारासारविचारानें माया मावळते व 'परब्रह्म तेंही निवळे । अंतर्यामीं.'

**ब्रह्मस्थिति बाणतां अंतरीं । संदेह गेला ब्रह्मांडाबाहेरी ।**
**दृश्याची जुनी जर्जरी । कुहिट जाली ॥ १७ ॥**

ब्रह्मस्थिति अंतरीं बाणली कीं निःसंदेहता येते व जुनी जर्जरित झालेली मायेची गोधडी फाटून नाहींशी होऊन जाते. ब्रह्मादि देव व संतमुनि ह्या परमार्थांत विश्रांति पावतात.

**परमार्थी तो राज्यधारी । परमार्थ नाहीं तो भिकारी ।**
**या परमार्थाची सरी । कोणास द्यावी ? ॥ २३ ॥**
**अनंतजन्मींचें पुण्य जोडे । तरीच परमार्थ घडे ।**
**मुख्य परमात्मा आतुडे । अनुभवासी ॥ २४ ॥**
**असो भगवत्प्राप्तीवीण । करी संसाराचा शीण ।**
**त्या मूर्खाचें मुखावलोकन । करूंच नये ॥ २६ ॥**
**भल्यानें परमार्थीं भरावें । शरीरसार्थक करावें ।**
**पूर्वजांस उद्धरावें । हरिभक्ति करूनी ॥**

दहावा समास **नरदेहस्तवन** नांवाचा आहे. असा हा परमश्रेष्ठ परमार्थ ज्या नरदेहांत साधतो तो नरदेह धन्य होय.

**धन्य धन्य हा नरदेहो । येथील अपूर्वता पाहो ।**
**जो जो कीजे परमार्थलाहो । तो तो पावे सिद्धीतें ॥ १ ॥**

ह्या नरदेहांतच अनेक सिद्ध, मुनि, संत, योगी कृतार्थ झाले आहेत.

**या नरदेहाचेनि आधारें । नाना साधनांचेनि द्वारें ।**
**मुख्य सारासारविचारें । बहुत सुटले ॥ १८ ॥**

सुटले म्ह० 'अहंता सांडूनि स्वानंदें । सुखी जाले.' नरदेहांत कोणतेंही व्यंग नसून जे परमार्थ साधीत नाहींत ते अभागी होत. देहाचा कसला अभिमान बाळगायचा आहे ? मूषक म्हणती आमुचें घर, पाली म्हणती आमुचें घर....तस्कर म्हणती आमुचें घर, राजकीय म्हणती आमुचें घर—

ह्या देहावर सर्वच प्राणी आपापली सत्ता सांगतात—आणि 'हें मूर्खही म्हणे माझें घर!' देह परमार्थी लावलें तरच याचें सार्थक 'नाहीं तरी वेर्थचि गेलें। नाना आघातें मृत्युपंथें.'

ह्याप्रमाणें हा पहिला दशक अत्यंत बहारीचा आहे. ह्यांतील सर्व मंगलाचरणें पाहतां दासबोध हा परमार्थासाठींच सांगितलेला ग्रंथ आहे हें, मला वाटतें, सर्वांस पटलें पाहिजे.

## २ दुसरा दशक : कुविद्येचे व सद्विद्येचे प्राणी

पहिल्या समासांत मूर्खलक्षणें सांगितलीं असल्यामुळें ह्याला मूर्खलक्षणाचा दशक असें नांव जरी दिलेलें असले तरी याच्या पांच समासांत कुविद्येचीं लक्षणें व पांच समासांत सद्विद्येचीं लक्षणें सांगितलीं आहेत. सृष्टींत चांगलीं आणि वाईट अशीं दोन्ही प्रकारचीं माणसें आढळतात. गीतेच्या १४ व्या अध्यायांत त्रिगुणांचीं लक्षणें सांगितलीं असून १६ व्या अध्यायांत दैवी संपत्तीचीं व आसुरी संपत्तीचीं लक्षणें सांगितलीं आहेत. दिवस आणि रात्र किंवा प्रकाश आणि अंधार दोन्ही मिळून सृष्टि आहे. जगांत भलेबुरे सज्जनदुर्जन सर्व कांहीं आहे. वाईट लक्षणें टाकून चांगलीं घेतां येतात, वाईट मनुष्य चांगला होऊं शकतो, मनुष्यांत सुधारणा होणें शक्य आहे असा समर्थांचा आशावाद दांडगा असल्यामुळें त्यांनीं त्यागार्थ कुलक्षणें व ग्रहणार्थ सुलक्षणें सांगितलीं आहेत.

स० १ मूर्खलक्षण—स० २ उत्तमलक्षण
स० ३ कुविद्या — स० ४ भक्तिप्रबोधन
स० ५ रजोगुण — स० ७ सत्त्वगुण
स० ६ तमोगुण — स० ८ सद्विद्यानिरूपण
स० १० पढतमूर्ख — स० ९ विरक्त

एकंदर ४७० ओव्यांपैकीं २३८ ओव्या कुविद्येला व २३२ सद्विद्येला दिल्या आहेत!

गणेश, शारदा व सद्गुरु यांना वंदन करून व रघुनाथस्मरण करून ‘ त्यागार्थ ’ मूर्खलक्षणें सांगितलीं आहेत. हीं सांगतांनाच ‘ पढतमूर्खाचें लक्षण । पुढिले समासीं निरूपण ’ करूं असें त्यांनीं म्हटलें आहे; पण तो समास १० वा असून मध्यें इतर समास आले आहेत ! पहिला समास मूर्खांचा व दहावा पढतमूर्खांचा ! पहिल्यांत सर्वसामान्य मूर्खांचीं लक्षणें सांगितल्यावर समर्थांना वाटलें असावें कीं, सुशिक्षित किंवा विद्वान् माणसांतही विविध प्रकारचें मूर्खत्व असतें म्हणून त्यांचा विशेष आदर करण्यासाठीं त्यांनीं पढतमूर्खांचीं लक्षणें स्वतंत्र समासांत दिलीं आहेत ! ‘ शाहणे असोनि मूर्ख । तयां नांव पढतमूर्ख ’ असें त्यांनीं पढतमूर्खांचें लक्षण केलें आहे व ‘ श्रोतीं न मानावें दुःख । अवगुण त्यागितां सुख । प्राप्त होय ’ अशी त्यांची एक प्रकारें क्षमा मागितली आहे ! मूर्खांचीं बहुतेक लक्षणें पढत-मूर्खांचे अंगीं असतातच, त्याशिवाय विद्वत्तेमुळें जीं आणखी कांहीं कुलक्षणें त्यांच्या अंगीं जडतात तीं या १० व्या समासांत सांगितलीं आहेत. साध्या मूर्खापेक्षां पढतमूर्खाजवळ मूर्खत्वाच्या लक्षणांचा भरणा अधिक असतो ! हीं वाचतांना प्रत्येक वाचकास वाटतें कीं, माझें चरित्र समर्थांना इतकें बारकाईनें कोणी जाऊन सांगितले ? त्याला ह्या मूर्खलक्षणांत साक्षात्कार तत्काळ होतो ! ब्रह्मसाक्षात्काराला नवविधाभक्तीचा सोपान चढून जावा लागतो पण मूर्खत्वसाक्षात्कार सर्वांना सहजसिद्ध आहे. असो. मूर्खांचीं व पंडितांचीं लक्षणें महाभारतांत ( उद्योगपर्व, अ० ३३ ) सांगितलीं आहेत व त्यांतील मूर्खलक्षणांवर मुक्तेश्वरांनीं ११३ ओव्या लिहिल्या आहेत. समर्थांनीं हीं मूर्खलक्षणें अगदीं स्वतंत्रपणें व लोकस्थिति पाहून लिहिलीं आहेत. समर्थ ग्रंथ पुढें ठेवून कधीं लिहीत नाहींत, त्यांच्या डोळ्यांपुढें नेहमींच लोकस्थिति असते.

१ **मूर्खलक्षणें :** हीं सांगतां अपार आहेत. ‘ जे प्रापंचिक जन । जयांस नाहीं आत्मज्ञान ’ त्यांचीं हीं लक्षणें आहेत. ‘ जन्मला जयांचे

उदरीं । तयांसीं जो विरोध करी ' तो मूर्खांत पहिला मूर्ख. स्त्रीच्या नादानें आईबापांशीं वैर करणारा, कुळेंविण कन्या वरणारा म्ह० कुलशीलाकडे न पाहतां शिक्षण व सौंदर्य यांजवरच भुलून वाटेल त्या जातीच्या मुलीशीं लग्न करणारा, समर्थावर अहंता धरून सामर्थ्यैविण सत्ता करणारा, वडिलांची कीर्ति गाऊन स्वदेशीं विपत्ति भोगणारा, दुसऱ्याचा विश्वास धरून प्रयत्न सांडणारा, निलाजरेपणाने अमर्याद विषयभोग घेणारा, उद्योग न करितां सदा दुश्चित्त राहणारा, देव व पितर यांना न मानणारा, वस्त्र शस्त्र दोन्ही नसतां सभेंत उंच स्थळीं जाऊन बसणारा, देवीं ब्राह्मणीं सत्ता करणारा, मर्यादेविण सुणें ( श्वान ) पाळणारा, शरीर स्वच्छ न ठेवणारा, अंतर्बाह्य मळिण, हीनांसी देणेंघेणें करणारा, वारांगनेसी प्रेम किंवा कलह करणारा—

**विद्या वैभव ना धन । पुरुषार्थ सामर्थ्य ना मान ।**
**कोरडाच वाहे अभिमान । तो एक मूर्ख ॥ ३२ ॥**
**पुत्र कळत्र आणि दारा । इतुकाचि मानूनीयां थारा ।**
**विसरोन गेला ईश्वरा । तो एक मूर्ख ॥ ४० ॥**
**देवद्रोही गुरुद्रोही । मातृद्रोही पितृद्रोही ।**
**ब्रह्मद्रोही स्वामिद्रोही । तो एक मूर्ख ॥ ४४ ॥**

**२ उत्तमगुण :** हा समास उपदेशपर आहे. येथें काय करूं नये व काय टाकावें हें सांगतात. वाट पुसल्याविण जाऊं नये, फळ वोळखिल्याविण खाऊं नये, शोधिल्याविण कुळहीन कांता करूं नये, प्रीतीविण रुसों नये, विचारेंविण बोलों नये, पापद्रव्य जोडूं नये, पुण्यमार्ग सोडूं नये, निंदाद्वेष करूं नये, ऐक्यतेसी फोडूं नये, विद्याभ्यास सोडूं नये, शिकविणेचा वीट मानूं नये, पत्रेंविण ( लेखावांचून ) पर्वत ( देण्याघेण्याचा व्यवहार ) करूं नये, कोणाचा उपकार घेऊं नये व घेतला तर राखूं नये ( फेडावा ), असत्य, विश्वासघात व बहुचकपणा करूं नये.

**सुखा अंग देऊं नये । प्रेत्न पुरुषें सांडूं नये ।**
**कष्ट करितां त्रासों नये । निरंतर ॥ १४ ॥**

**व्यापकपण सांडूं नये। पराधेन होऊं नये।**
**आपुलें वोझ घालूं नये। कोणी येकासी ॥ १९ ॥**

३ **कुविद्येचीं लक्षणें :** कुविद्येच्या प्राण्याच्या ठिकाणीं सर्व अवगुणांची समृद्धि असते. 'काम क्रोध मद मत्सर। लोभ दंभ तिरस्कार। गर्व ताठा अहंकार। द्वेष विषाद विकल्पी.' येथें समर्थांनीं कुलक्षणांचा नुस्ता कोष दिला आहे ! कुलक्षणांचा कंटाळवाणेपणा घालविण्याकरितांच कीं काय कोण जाणे त्यांनीं २१ ओव्यांत मध्येंच अत्यंत मार्मिकपणा व्यक्त केलेला आहे. थोडा भाग उलगडून दाखवितों.

**आळसी आणि खादाड। दुर्बळ आणि लाताड।**

'आणि' हा शब्द 'असून' या अर्थी वापरला आहे. आळशी असून खादाड. स्वतः उद्योगानें मिळवून खात असेल तर त्याचा दुसऱ्यांना उपसर्ग पोंचत नाहीं. बरें आळशी असून त्याच्या खाण्यापिण्याचा कोणाला त्रास होत नसेल तरीही कांहीं बिघडत नाहीं, पण स्वतः कष्ट करून मिळवायला नको आणि जेवायला मात्र चारी ठाव चमचमीत व पुष्कळ पाहिजे, मग त्या दोषाला काय म्हणावें? तसेच 'दुर्बळ आणि लाताड.' लाताड म्ह० तिरसट, भांडखोर. दुर्बळ असून गरीबीनें वागत असेल तर लोक त्याला मिळवून घेतील, सबळ असून लाताड असेल तर चार लाथा खाईल व चार देईल, बरोबरीनें वागेल. शक्ति नाहीं म्हणून दुर्बळ आणि त्यांत पुन्हा लाताड! कोण सहन करील? याप्रमाणेंच पुढील जोड्या समजाव्या. तुटक आणि लबाड, मूर्ख आणि तापट, वेडा आणि वाचाळ, लटका आणि तोंडाळ, नेणे आणि नायके, छळवादी आणि दोषी, पापी आणि निंदक, दुःखी आणि हिंसक, हीन आणि कृत्रिमी (ढोली, नटव्या), बाष्कळ आणि परोपदेशी, लंडी म्ह० भित्रा आणि उद्धट, मठ्ठ आणि वादक, इ० इ०. समर्थांनीं 'आणि' शब्दाचा असा मार्मिक उपयोग आपल्या वाङ्मयांत चार दोन ठिकाणीं केला आहे.

**भक्तिहीन भावहीन । ज्ञानहीन वैराग्यहीन ।**
**शांतिहीन क्षमाहीन । सर्वहीन क्षुल्लकु ॥ ३७ ॥**
**समयो नेणे प्रसंग नेणे । प्रेत्न नेणे अभ्यास नेणे ।**
**आर्जव नेणे मैत्री नेणे । कांहींच नेणे अभागी ॥३८ ॥**

**४ भक्तिनिरूपण :** कारल्याची भाजी खाऊन तोंड कडवट झाल्यावर जिलबीचा तुकडा तोंडांत टाकावा त्याप्रमाणें कुविद्येचीं लक्षणें वाचल्यावर ह्या समास पाहिला म्हणजे वाटतें! 'भाग्य सफळ तरीच सन्मार्ग लागे.' नरदेहीं विशेष ब्राह्मण, त्यावरी संध्यास्नान, त्यावरी भगवद्भक्ति आणि त्याहीवरी सत्समागम–हेंच जन्मसार्थक्याचें लक्षण होय. (हें येथें सारालंकाराचें उत्तम उदाहरण आहे.)

**विधियुक्त ब्रह्मकर्म । अथवा दयादानधर्म ।**
**अथवा करणें सुगम । भजन भगवंताचें ॥ ६ ॥**
**अनुतापें करावा त्याग । अथवा करणें भक्तियोग ।**
**नाहीं तरी धरणें संग । साधुजनांचा ॥ ७ ॥**
**नानाशास्त्रें धांडोळावीं । अथवा तीर्थें तरी करावीं ।**
**अथवा पुरश्चरणें बरवीं । पापक्षयाकारणें ॥ ८ ॥**
**नरदेहाच उचित । कांहीं करावें आत्महित ।**
**यथानुशक्त्या चित्तवित्त । सर्वोत्तमीं लावावें ॥ १३ ॥**

कायावाचामनानें देवाच्या मार्गाला लागावें नाहींतर मनुष्य निर्फळ भूमिभार होय. 'पाळावी वेदाची आज्ञा । कर्मकांड उपासना'–परमार्थाचा अधिकार प्राप्त करून घ्यावा. देव, धर्म, विद्या, वैभव कांहींच नाहीं तें जिणें कसलें ?

ह्यापुढील ३ समासांत रजोगुण, तमोगुण व सत्त्वगुण ह्या तीन गुणांचा विचार सांगितला आहे. सृष्टि त्रिगुणात्मक आहे. प्राणी रजोगुणानें संसारचक्रांत फिरत राहतात (पुनरावृत्ति), तमोगुणानें अधोगति व

सत्त्वगुणानें भगवद्भक्ति पावतात. त्यांतही शुद्ध व सबळ म्ह० मिश्र असे दोन प्रकार आहेत–‘ शुद्ध तो परमार्थी जाण। शबळ तो संसारिक. ’ तीन गुणांपैकीं एकाचें प्राबल्य झालें कीं दुसरे दोन गुण कमजोर होतात.

५ **रजोगुण :** ‘ माझें घर माझा संसार ’ यांतच गुरफटून राहण्याची आवड तो रजोगुण. बायकापोरांतच रमून राहावें, खावें प्यावें ल्यावें, दुसऱ्याचें अभिलाषावें, देवधर्म व पापपुण्य यांना तुच्छ लेखावें, आचारधर्म सोडून अनाचारीं रत असावें, ‘ मन होय द्रव्यासक्त । अत्यंत कृपण जीवित, ’ तो रजोगुण.

**वैभव देखोन दृष्टी । आवडी उपजली पोटीं ।**
**आशागुणें हिंपुटी । तो रजोगुण ॥ २२ ॥**
**विनोदार्थीं भरे मन । शृंगारिक करी गायन ।**
**रागरंग तान मान । तो रजोगुण ॥ २४ ॥**
**टवाळी ढवाळी निंदा । सांगणें घडे विवादा ।**
**हास्यविनोद करी सर्वदा । तो रजोगुण ॥ २५ ॥**
**शृंगारिक तें आवडे । भक्तिवैराग्य नावडे ।**
**कळालाघवीं पवाडे । तो रजोगुण ॥ ३२ ॥**

करमणुकीचे नाना खेळ किंवा उपभोगाचे गोंधळ, उन्मत्त द्रव्याची आवड, पिंडपोषणाची आवड व उपोषणाचा त्रास, देव-धर्म नको, बाकी संसारांतलें सर्व हवें तो रजोगुण. आतां प्रपंचीं गुंतली वासना यास उपाय कोण ? उपाय एक भगवद्भक्ति.

**काया वाचा आणि मनें । पत्रें पुष्पें फळें जीवनें ।**
**ईश्वरीं अर्पूनियां मनें । सार्थक करावें ॥ ३७ ॥**

वर वर्णन केलें तो सबळ रजोगुण. शुद्ध रजोगुण सत्त्वगुणांत समाविष्ट होतो.

६ **तमोगुण :** निद्रा, आळस, प्रमाद, दुश्चित्तपण, क्रोध, भांडखोरपणा, निष्ठुरता, इ० तमोगुणाचे धर्म होत. 'करूं आवडे गोहत्त्या । तो तमोगुण !'

> **दुसऱ्याचा प्राण घ्यावा । कीं आपण स्वयें द्यावा ।**
> **विसरवी जीवभावा । तो तमोगुण ॥ ४ ॥**
> **डोळां युद्धचि पाहावें । रण पडिलें तेथें जावें ।**
> **ऐसे समई घेतलें जीवें । तो तमोगुण ॥ ७ ॥**
> **युद्ध देखावें ऐकावें । स्वयें युद्धचि करावें ।**
> **मरावें कीं मारावें । तो तमोगुण ॥ १६ ॥**

भक्तिपंथ मोडावा, देवालयें फोडावींत, पशुपक्षी व जीवजंत मारावे, हत्या व कलह यांत शिरावें, 'ब्रह्मवृत्तींचा उच्छेद । जीवमात्रांस देणें खेद' यांत उत्साह वाटावा, भांडणें लावून कौतुक पहावें,–

> **नावडे भक्ति नावडे भाव । नावडे तीर्थ नावडे देव ।**
> **वेदशास्त्र नलगे सर्व । तो तमोगुण ॥ २४ ॥**
> **चेटक विद्येचा अभ्यास । शस्त्रविद्येचा हव्यास ।**
> **मल्लविद्या व्हावी ज्यास । तो तमोगुण ॥ २८ ॥**

तमोगुणानें स्वतःस व जगास अत्यंत क्लेश होतात.

७ **सत्त्वगुण :** दुःखमूळ संसाराचा निरास करणारा सत्त्वगुण होय. येणें 'मार्ग फुटे भगवंतीं । पाविजे सायुज्यतामुक्ती.' सत्त्वगुण परमार्थाचें मूळ आहे, हा जन्ममृत्यु निवारून परमानंद देणारा आहे.

> **ईश्वरीं प्रेमा अधिक । प्रपंच संपादी लौकिक ।**
> **सदा सन्निध विवेक । तो सत्त्वगुण ॥ ९ ॥**

सत्त्वगुणामुळें भावार्थाची गोडी कळते; परोपकाराची आवड उत्पन्न होते, दयादानधर्म यांत आयुष्य वेंचतां येतें; 'व्रतेंउद्यापनें, दानें व तिथि पर्वे महोत्सव' यांत चित्त रमतें, देवद्वारीं दास्यत्व करण्यांत उत्साह वाटतो.

**देहाभिमान गळे। विषयीं वैराग्य प्रबळे।**
**मिथ्या माया ऐसें कळे। तो सत्त्वगुण ॥ ४२ ॥**
**अंतरीं स्फूर्ति स्फुरे। स्वस्वरूपीं तर्क भरे।**
**नष्ट संदेह निवारे। या नांव सत्त्वगुण ॥ ५० ॥**
**शांति क्षमा आणि दया। निश्चय उपजे जया।**
**सत्त्वगुण जाणावा तया। अंतरीं आला ॥ ५२ ॥**
**जयास अहंकार नसे। नैराश्यता विलसे।**
**जयापासीं कृपा वसे। तो सत्त्वगुण ॥ ६१ ॥**
**श्रवण आणि मनन। निजध्यासें समाधान।**
**शुद्ध जालें आत्मज्ञान। तो सत्त्वगुण ॥ ६२ ॥**
**आपकार्याहूनि जीवीं। परकार्यसिद्धी करावी।**
**मरोन कीर्ती उरवावी। तो सत्त्वगुण ॥ ६५ ॥**
**सन्मार्ग दाखवी जना। जो लावी हरिभजना।**
**ज्ञान शिकवी अज्ञाना। तो सत्त्वगुण ॥ ७९ ॥**

ग्रंथसामग्री करी, तो सत्त्वगुण. जया राहे पाठान्तर तो सत्त्वगुण. परपीडेचें वाहे दुःख, परसंतोषाचें सुख—तो सत्त्वगुण. 'देवीं धर्मीं ज्याचें चित्त। भजे कामनारहित' तो सत्त्वगुण. असा हा सत्त्वगुण संसारसागरीं तारक आहे. यानें भक्तिज्ञानवैराग्याचा लाभ होऊन सायुज्यता मिळते.

८ **सद्विद्येचीं लक्षणें :** मागां कुविद्येचीं लक्षणें सांगितलीं, आतां त्याच्या उलट सद्विद्येचीं लक्षणें सांगतात. हीं उत्तमाचीं लक्षणें आहेत. येथें 'आणि' ह्या अव्ययाचा उपयोग 'असून' असाच केला आहे. संपन्न आणि उदार, ज्ञाता आणि भक्त, तपस्वी आणि शांत, पंडित आणि विरक्त, सबळ आणि धीर—येथें सामान्यतः व्यवहारांत विरुद्ध दिसणारे गुण सज्जनाच्या ठिकाणीं एकवटतात. तसेंच—

**वक्ता आणि नैराश्यता। सर्वज्ञ आणि सादरता।**
**श्रेष्ठ आणि नम्रता। सर्वत्रांसीं ॥ ६ ॥**

**राजा आणि धार्मिक । शूर आणि विवेक ।**
**तारुण्य आणि नेमक । अतिशयेसीं ॥ ७ ॥**

ह्या जोड्या चतुर वाचकांनीं नीट लावून पहाव्या. विस्तारभयास्तव मी त्या उलगडून दाखवीत नाहीं. सद्विद्येचीं लक्षणेंही पुष्कळ सांगितलीं आहेत. येथेंही सद्गुणांचा मोठा कोष आयता मिळतो.

**मित्रपणें परहितकारी । वाङ्माधुर्यें परशोकहारी ।**
**सामर्थ्यपणें वेत्रधारी । पुरुषार्थें जगमित्र ॥ २१ ॥**

तो मित्र म्हणून परहितार्थ झटतो, मधुरवाणीनें दुसऱ्यांच्या दुःखशोकांचें निवारण करितो, अंगीं सामर्थ्य असून लोकांचा काठीधर म्ह० सेवक होतो, पराक्रमानें जग वश करितो. तो स्वतः कसा असतो ?—

**सुखरूप संतोषरूप । आनंदरूप हास्यरूप ।**
**ऐक्यरूप आत्मरूप । सर्वत्रांसी ॥ २५ ॥**

सद्विद्येच्या या लक्षणांचा अभ्यास करावा.

**रूपलावण्य अभ्यासितां नये । सहजगुणांसी न चले उपाय ।**
**कांहींतरी धरावी सोय । आगंतुक गुणांची ॥ ३१ ॥**

सौंदर्य अभ्यासानें येत नाहीं व सहज गुण बदलत नाहींत, म्हणून कांहीं तरी आगंतुक गुण अभ्यासानें अंगीं आणावेत, विशेषतः विरक्तानें त्यांचा अभ्यास करावा.

**९ विरक्ताचीं लक्षणें :** विवेकसहित वैराग्य असलें म्हणजे परमार्थाचा लाभ होतो व ‘आनंद हेलावतो.’ हीं लक्षणें अर्थात् सद्विद्येच्या लक्षणांसारखींच चांगल्या गुणांचीं आहेत. हीं लक्षणें अंगीं असून वैराग्य असलें कीं ‘विख्यात होइजे भूमंडळीं’ हें सहजच होतें.

**विरक्तें राखावें साधन । विरक्तें लावाव भजन ।**
**विरक्तें विशेष ब्रह्मज्ञान । प्रगटवावें ॥ ८ ॥**
**विरक्तें धर्मस्थापना करावी । विरक्तें नीति अवलंबावी ।**
**विरक्तें क्षमा सांभाळावी । अत्यादरेंसी ॥ ११ ॥**

**विरक्तें दृढ निश्चयो धरावा । संसार सुखाचा करावा ।**
**विश्वजन उद्धरावा । संसर्गमात्र ॥ २१ ॥**
**विरक्तें असावें जगमित्र । विरक्तें असावें स्वतंत्र ।**
**विरक्तें असावें विचित्र । बहुगुणी ॥ ३४ ॥**
**विरक्तें शास्त्रें धांडोळावीं । विरक्तें मतें विभांडावीं ।**
**विरक्तें मुमुक्षें लावावीं । शुद्धमार्गीं ॥ ३६ ॥**
**विरक्तें निंदक वंदावे । विरक्तें साधक बोधावे ।**
**विरक्तें बद्ध चेतवावे । मुमुक्षु निरूपणें ॥ ३८ ॥**

समर्थांनीं दिलेलीं हीं लक्षणें पाहिलीं म्हणजे त्यांना नुस्ते निष्क्रिय, अकिंचित्कर, लोहलोष्ठपाषाणांप्रमाणें अचेतन राहणारे विरक्त नको होते तर समाजांत राहून समाजाला उठवून जागे करणारे विरक्त पाहिजे होते असें स्पष्ट होतें. आमच्याइकडे सामान्य समजूत अशी आहे कीं, विरक्त किंवा संन्यासी म्हणजे ज्याला समाजाचें कांहींच काम करावयाचें नाहीं तो! विरक्ताला घरदारसंपत्ति नको असली तरी त्यानें धर्मस्थापनेचें व्यापक कार्य केलें पाहिजे, व त्यासाठीं त्यानें नाना शास्त्रें धुंडाळून अधर्मी किंवा पाखंडी लोकांच्या मतांचें खंडण केलें पाहिजे व मुमुक्षूंना साधनमार्ग दाखविला पाहिजे. निष्क्रिय व जड झालेल्या समाजांत त्यानें कर्तृत्वाचें वारें खेळविलें पाहिजे. ‘विश्वजन उद्धरावा। संसर्गमात्रें’ हें विरक्ताचें मुख्य काम आहे. विरक्त कोणाचा ओशाळगत नसावा, स्वतंत्र असावा, म्हणजे त्याला निस्पृहपणानें लोककार्य करितां येतें. विरक्त जगमित्र असावा. मोडलेला परमार्थ त्यानें उभा केला पाहिजे, तो निश्चयाचें समाधान देणारा पाहिजे. ‘विरक्तें अभ्यास करावा। विरक्तें साक्षेप धरावा’ असा विरक्त कार्यकर्ता असला पाहिजे. ह्या विरक्ताच्या लक्षणांत समर्थांच्या चरित्राचा रंग तर भरलेलाच आहे पण त्यांनीं पुढें जे कार्यकर्ते निर्माण केले त्यांच्याही स्वरूपाची दिशा येथें स्पष्ट दाखविली आहे. रामतीर्थ व विवेकानंद यांसारखे लोककार्यकर्ते विरक्त समर्थांना पाहिजे होते.

१० **पढतमूर्ख :** गेल्या तीन समासांत जें सद्गुणांचें छत समर्थांनीं उभें केलें तें आपण पाहिलें. हीं चांगलीं लक्षणें न घेतां समजूतदार लोकही बाष्कळपणा कसा करितात हें सांगण्यासाठीं हा पढतमूर्खांचा समास सांगितला आहे. बहुश्रुत व व्युत्पन्न असून व ब्रह्मज्ञान प्रांजळपणानें सांगणारा वक्ता असूनही जर त्याचे पोटांत ‘ दुराशा व अभिमान ’ असेल तर तो पढतमूर्खांचा राजा होय ! विद्या असून स्वच्छंदीपणा व स्वेच्छाचार शिकविणारा—

**मुक्तक्रिया प्रतिपादी। सगुणभक्ति उच्छेदी।**
**स्वधर्म आणि साधन निंदी। तो येक पढतमूर्ख ॥ ४ ॥**

समग्र ग्रंथ न पाहतां त्याची निंदा करणारा, गुण सांगतां अवगुण पाहणारा, अधिकार नसतां वक्तृत्वाचा शीण करणारा, वाचाळपणें परदोष उच्चारणारा, पढिक असून लोकांस समाधान न देणारा, परस्त्रियांशीं संग धरणारा, देव सोडून माणसांची स्तुति करणारा, स्त्रियांचे अवयव व हावभाव यांचें वर्णन करणारा, पाखांड मताला उचलून धरणारा, क्रियेविण ब्रह्मज्ञान बोलणारा, प्रपंचीं आदर व परमार्थीं अनादर ठेवणारा, गुरूची उपेक्षा करणारा, द्रव्यासाठीं परमार्थ सांगणारा, देवांब्राह्मणांचा द्वेष करणारा—हे सारे पढिक असले तरी पढतमूर्ख होत ! मूर्ख व पढतमूर्ख या सर्वांत ‘ जो संसारीं मानी सुख ’ तो परममूर्ख होय. संसारदुःखाचें वर्णन पुढील दशकांत होईल.

## ३ तिसरा दशक : संसारदुःखनिरसन

ह्या दशकाला सगुणपरीक्षा असें नांव आहे. ‘ पंचभूतिक सगुण नाशिवंत आहे ’ ( द० ६–२–८ ) व ह्या दशकांत पंचभौतिकाचें जन्मापासून मरणापर्यंतचें वर्णन आहे. पहिल्या पांच समासांत संसाराचें यथार्थ चित्र उभें केलें आहे; पुढील तीन समासांत त्रिविधतापांचें व ९ व्या

समासांत मृत्यूचें सर्वंकषत्व दाखविलें आहे. ह्याप्रमाणें नऊही समास संसाराला दिले असून शेवटच्या समासांत संसारदु:खनिरसनाचा उपाय सांगितला आहे. गर्भवासाच्या दु:खापासून मरणापर्यंतच्या मानवी चरित्राचा हा सामान्य नकाशा आहे व हा दु:खदायकच आहे. 'संसारसंगें सुख जाहलें। ऐसें देखिलें ना ऐकिलें' असा समर्थांचा सिद्धान्त असल्यामुळें संसाराचें दु:खरूपत्व येथें त्यांनीं पूर्णपणें वर्णिलें असून शेवटच्या समासांत वैराग्याची उठावणी अत्यंत प्रेमळ व स्फूर्तिदायक वाणीनें केली आहे. तो समास कितीही वेळ वाचला तरी तृप्ति होत नाहीं इतका तो गोड आहे. वाचकांनीं तर तो नित्यपाठांत ठेवावा. नऊ समासांत सर्वांग भाजणारा संसाराचा रखरखित उन्हाळा असून १० व्यांत संसारतप्त जीवांवर अमृताची वृष्टि केली आहे!

**समास १ ते ५ : संसारचित्र :** 'जन्म दु:खाचा अंकुर। जन्म शोकाचा सागर। जन्म भयाचा डोंगर। चळेना ऐसा.' जन्म हा अतिकुश्चळ आहे. शरीराचें मूळ अत्यंत अमंगळ आहे, 'रजस्वलेचा जो विटाळ। त्यामध्यें जन्म यासी.' 'अस्थिपंजर उभविला। शिरानाडीं गुंडाळिला। मेदमांसें सरसाविला। सांदींसांदीं भरोनी' असा हा देह आहे. मळ, मूत्र आणि वमन हेंचि देहाचें जीवन. 'लाळ थुंका आणि मळ। पीत श्लेष्मा प्रबळ। तयास म्हणती मुखकमळ। चंद्रासारिखें!' गर्भवास, बाळंतपण, जन्म, बाळपणाचे क्लेश या सर्वांचें विस्तृत वर्णन पाहून 'नको हा जन्म' असेंच कोणासही वाटावें. 'संसार हाचि दु:खमूळ। लागती दु:खाचे इंगळ.' मातेचे बाळंतपणाचे क्लेश व बाळपणींचे अपघात यांतून कदाचित् वांचलाच तर पोरांचा कळप मेळवून त्यांतच हा रमून जातो. वयांत आला कीं प्रीति कामिनीसी लागते. मन चंचल व विषयाकार होऊन आईबाप बहीणभाऊ सर्व यास नकोसे होतात. 'तुझिया माझिया जीवांतील जीव। म्हणोनि अत्यंत लाघव'—

**तिये भार्येचेनि कैवारें। मायबापांसी नीच उत्तरें।**
**बोलोनियां तिरस्कारें। वेगळा निघे॥**

यानें स्त्रीसाठीं आईबाप, लोकलाज, तीर्थयात्रा, स्वधर्म सर्व कांहीं सोडिलें ! तंव ते स्त्री अवचिता मरोन गेली. 'ऊर बडवी पोट बडवी.' 'म्हणे माझें बुडालें घर। आतां न करीं हा संसार.' स्मशानवैराग्य आलें! 'जोगी का महात्मा' होऊन जाण्याची भाषाही बोलूं लागला ! लोकाग्रहास्तव दुसरें लग्न केलें व मागील दुःख विसरून पुन्हा संसार गोड करून म्हणजे त्यांतच डोकें खुपसून राहिला !

द्वितीय संबंध ! बायकोच्या हौसेसाठीं द्रव्य पाहिजे म्हणून त्यानें देवकार्यें, पितृकार्यें सारीं टाकून दिलीं, अतिथि व पाहुणे येणें बंद केले, सर्व धर्मकृत्यांना कांट दिला ! 'स्त्री केली परी धाकुटी। धीर न धरवेचि पोटीं। विषय-लोभें शेवटीं। वोळखी सांडिली.' झाला पापी परद्वारी, दंड पावला राजद्वारीं ! व्याधी भरली सर्वांगीं—दुर्धर रोगामुळें अत्यंत क्लेश झाले. मरत मरत वांचला, पुनर्जन्म झाला, माणसांत पडला ! असल्या पापी पतीशीं दुसऱ्या बायकोला संसार करणें भाग झालें ! पुत्रसंतान नाहीं म्हणून पुन्हा रडूं लागला. मुलासाठीं 'तीर्थें व्रतें उपवास। धरणीपारणीं मांडिलीं !' वांज नांव पडले, मरतवांज हीही पदवी मिळाली. नवस सायास केले. नाना कवटाळें केलीं ! कालान्तरानें मुलें होऊन वांचूं लागलीं !

यापुढील वर्णनाच्या १०।२० ओव्या द्याव्याशा वाटतात. साध्या, सरळ व अस्सल मराठी लोकभाषेचा सुंदर नमुना म्हणून त्याकडे वाचकांनीं पहावें. या पांचही समासांत सुंदर लोकोक्तींचा भरपूर भरणा आहे. सारी भाषा अगदीं घरऊ आहे. अशा ओढगस्त संसाराचा अनुभवही शेंकडा ९५ लोकांस असतोच !

लेंकुरें उदंड जालीं। तों लक्ष्मी निघोन गेली।
बापडीं भिकेसी लागलीं। खावया अन्न मिळेना ॥ स० ४-१ ॥
लेंकुरें खेळती धाकुटीं। येक रांगती येकें पोटीं।
एसी घरभरी जाली दाटी। कन्या आणि पुत्रांची ॥ २ ॥
दिवसेंदिवस खर्च वाढला। यावा होता तो खुंटोन गेला।
कन्या उपवरी जाल्या त्यांला। उजवावया द्रव्य नाहीं ॥ ३ ॥
भरम आहे लोकाचारीं। पहिली नांदणूक नाहीं घरीं।
दिवसेंदिवस अभ्यंतरीं। दरिद्र आलें ॥ ५ ॥
ऐसी घरवात वाढली। खातीं तोंडें मिळालीं।
तेणें प्राणियास लागली। काळजी उद्वेगाची ॥ ६ ॥
मागें रुण ज्यांचें घेतलें। त्यांचें परतोन नाहीं दिलें।
ऐसें आभाळ कोसळलें। उद्वेगाचें ॥ १० ॥
आपण खातों अन्नासी। अन्न खातें आपणांसी।
सर्वकाळ मानसीं। चिंतातुर ॥ ११ ॥
पत अवघीच मोडली। वस्तभाव गहाण पडली।
अहा देवा! वेळ आली। आतां दिवाळ्याची ॥ १२ ॥
कांहीं केला ताडामोडा। विकला घरींचा पाडारेडा।
कांहीं पैका रोकडा। कळांतरें काढिला ॥ १३ ॥
ऐसें रुण उदंड जालें। रिणाइतीं वेढून घेतलें।
मग प्रयाण आरंभिलें। विदेशाप्रती ॥ १५ ॥
दोनी वरुषें बुडी मारिली। नीच सेवा अंगीकारिली।
शरीरें आपदा भोगिली। अतिशयेसी ॥ १६ ॥
कांहीं मेळविलें विदेशीं। जीव लागला मनुष्यांपासीं।
मग पुसोनियां स्वामीसी। मुरडता जाला ॥ १७ ॥

यावा = मिळकत. भरम = भ्रम. कळांतरें = व्याजानें. रिणाईत = सावकार. मुरडता झाला = परतला, घरीं आला.

घरीं बायको व मुलें याची वाट पाहातच होतीं, 'आतां काय खावें। किती उपवासी मरावें। ऐसियाचे संगतीस देवें। कां आह्मांसी घातलें?' असें म्हणत याच्या नांवानें खडे फोडीत होतीं. जो तो आपलें सुख पाहतो, दुसऱ्याचें दुःख जाणत नाहीं, शक्ति गेल्यावर तर अंतीं कोणीच कामास येत नाहीं! ह्याला दारांत पाहतांच स्त्री आनंदली, मुलें 'ताता भागलास' म्हणोन याचे गळां पडलीं. चार दिवस आनंदाचे जातात न जातात तोंच यानें आणलेलें द्रव्य संपल्यावर मग काय खावें या चिंतेंत सारीं पडलीं! आंग्या टोप्या व खाऊ आणल्याचा आनंद चार दिवसांत ओसरला. यानें पुन्हा विदेशास जावें व आणखी मिळवून आणावें अशी सकळांची वासना! 'अवघीं सोइरीं सुखाचीं' असा त्यास अनुभव आला. चार दिवस विश्रांतीसाठीं घरीं आला तों पुन्हा जाणें ओढवलें. मायामात्रा सिद्ध केली, सामग्री बांधली, मार्गस्थ झाला. स्त्रीच्या वियोगानें चित्त दुःखी झालें. 'प्रारब्धसूत्र तुटलें रुणानुबंधाचें' असें मनांत येऊन त्याला रडूं आलें. पुन्हा भेट होईल न होईल कोणी सांगावें? चित्त भ्रमलें संसारउद्वेगें. ते समयीं माता आठवली. आईचे उपकार व निष्काम प्रेम यांचें स्मरण झालें. 'पुत्र वैभवहीन भिकारी। माता तैसाचि अंगिकारी। दगदगला देखोनि अंतरीं। त्याच्या दुःखें दुःखवे.' हें सकळ जोडे न जोडे माता असें आठवून मातृभक्तीनें क्षणभर गहिंवरला व रडला. चिंतेच्या महापुरांत बुडाला, 'ईश्वरीं कानकोंडा जाला कुटुंब काबाडी' त्याच्या अरण्यरुदनाला बुझावता कोण? तसाच विदेशीं गेला, दोन चार वर्षें नाना कष्ट सोसून द्रव्य मिळविलें व परत स्वदेशीं आला. तों कळलें कीं देशीं अवर्षण पडल्यामुळें लोकांचे मनस्वी हाल झाले. कांहीं पोरें मेलीं, कांहीं दीनवाणीं झालीं. बायको मरून गेली होती! 'लेंकुरा नाहीं वाढवितें। अन्न करावें आपुले हातें। बहु त्रास घेतला चित्तें। स्वयंपाकाचा॥ लोकीं भरीस घातले। पुन्हा मागुतें लग्न केलें!'

तिसरी बायको! दुसऱ्या बायकोचीं मोठीं झालेलीं मुलें! 'स्त्री झाली न्हातीधुती। पुत्र देखों न सकती। भ्रताराची गेली शक्ती। वृद्ध जाला.' म्हाताऱ्या नवऱ्याची तरुण भार्या– 'वनिता अत्यंत प्रीतीचें प्रीतिपात्र!' घरांत भांडणें सुरू झालीं. पंच मिळवून वांटण्या केल्या. 'बापलेंकां भांडण जालें। लेंकीं बापास मारिलें। तंव ते मातेनें घेतलें। शंखतीर्थ!' बाजारबुणगे मिळून 'बापास लेक कामा आले' म्हणून तमाशा पाहत राहिले! पुन्हा पंचांनीं पांच वांटे केले. बापाला वेगळें घातलें व कोपट बांधून दिलें. चार दिवस मजा करीत असतां परचक्र आलें व त्या धांदलींत या म्हाताऱ्याची तरुण बायको बंदी धरून नेली. वस्तभाव चोरीस गेलें. कांता भ्रष्टली हें ऐकून त्यानें मूर्छित होऊन अंग टाकलें. मग देव आठवला. 'द्रव्य नाहीं कांता नाहीं। ठाव नाहीं शक्ति नाहीं। देवा मज कोणीच नाहीं। तुजवेगळें.' पस्तावा झाला. वृद्धपणींची अवकळा अंगीं आली. दांत गेले, डोळे गेले, हातांपायांची शक्ति गेली, 'सर्वांगीं लोंबलें मांस चिरगुटासारिखें!' बळ गेलें, तारुण्य गेलें, जन्मापासून पोसलीं तीं उलटून पडलीं. सारी वाताहत झाली.

**असो ऐसें वृद्धपण। सकळांस आहे दारुण।**
**म्हणोनियां शरण। भगवंतास जावें॥ ५–५३॥**

वासना राहिल्यामुळें पुनर्जन्म टळला नाहीं. अनेक जन्मांत अनंत दुःखें आहेत. तीं दुःखें तीन प्रकारांनीं जीवास भोगावीं लागतात.

**समास ६-७-८: तापत्रयाची जाचणी:** बंदिस्ताचें बंधन तोडतांच त्याला जसें सुख होतें, किंवा महापुरांत जाजावलेला पैलतीरास नेला म्हणजे जसा आनंद पावतो अथवा रोग्याला सप्रचीत व शुद्ध औषध मिळतांच समाधान होतें—

**तैसा संसारें दुखवला। त्रिविधतापें पोळला।**
**तोचि येक अधिकारी जाला। परमार्थासी॥**

आतां ते त्रिविध ताप कोणते? आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक, हे ते होत.

शरीर, प्राण, इंद्रियें व मन यांच्यायोगानें ज्या सुखदु:खादि यातना होतात त्यांना आध्यात्मिक ताप म्हणतात. येथें समर्थांनीं नाना व्याधींचीं व इंद्रियवैकल्याचीं नांवें दिलीं आहेत. समर्थांचा शब्दकोश केवढा प्रचंड होता त्याचें हें एक प्रमाण आहे. भूतांच्या संसर्गापासून जे ताप होतात ते आधिभौतिक ताप होत. इतर पशुपक्षी, जीवजंतू इ० प्राणी किंवा पृथिव्यादि पंचभूतें खवळलीं असतां जे आघात होतात त्यांचा येथें विचार सांगितला आहे. बुडून मरणें, गृहें किंवा धान्यकोठारें दग्ध होणें, राजकीय आपदा येणें, स्त्रीपुत्रादिकांपासून किंवा आप्तेष्टांपासून अथवा शत्रूपासून पीडा होणें हे सर्व आधिभौतिक ताप होत. या वर्णनांत त्या वेळच्या राज्यकर्त्यांकडून प्रजेस होणाऱ्या नानाविध क्लेशांचाही समावेश केला आहे. शुभाशुभकर्मांच्या योगानें देहान्तीं ज्या यमयातना होतात किंवा येथें राजदंड पापामुळें भोगावे लागतात ते आधिदैविक ताप होत. तीन तापांच्या वर्णनांत संसारांतील सर्व दु:खांचा पाढा वाचला आहे.

**समास ९: मृत्युनिरूपण:** संसार म्हणजे प्राण्याच्या जन्मापासून मरणापर्यंत त्याच्या निरंतर पाठीशीं असलेला यमदूतच होय. ‘नित्य काळाची संगती। न कळे होणाराची गती’ हें मनुष्य विसरतो. क्षणाचा भरंवसा नाहीं. मृत्यु पळाचा अवकाश देत नाहीं. तो आला कीं प्राण्याला कोणी पाठीशीं घालूं शकत नाहीं. मृत्यूपुढें लहानथोर भलाबुरा हा भेद नाहीं. मृत्यु न म्हणे हा शूर, मृत्यु न म्हणे हा झुंजार–बलाढ्य, गुणाढ्य, धनाढ्य, भूपति, चक्रवर्ति, करामती, कलाकुशल व राजकारणी पुरुष, सर्वांवर मृत्यूचा तडाखा सारखाच बसतो! हा वर्णाश्रम ओळखीत नाहीं. वेदज्ञ, शास्त्रज्ञ, गायक, पुरश्चरणी, काळवंचक (योगाभ्यासी), पंचाक्षरी, कवीश्वर, संतमहंत–मृत्यु निमिषार्धही कोणाची गय करीत नाहीं.

ब्रह्महत्या, गोहत्या, बालहत्या यांचें त्याला भय नाहीं. नानामतवादी, विवादी, पंडित, संपन्न, उदार, फार काय पण अवतारादिक सर्व गेले. हा मृत्युलोक विख्यात आहे.

**असो ऐसे सकळही गेले। परंतु येकचि राहिले।**
**जे स्वरूपाकार जाले। आत्मज्ञानी ॥ ९–५९ ॥**

पुढें (द० १२, स० ८) एका समासांत 'काळरूपाचें' वर्णन केलें आहे तेथें समर्थ म्हणतात—

**राजा असतां मृत्यु आला। लक्ष कोटी कबुल जाला।**
**तरी सोडीना तयाला। मृत्यु कांहीं ॥ ३२ ॥**
**ऐसें हें पराधीन जिणें। यामध्यें दुखणेंबाहणें।**
**नाना उद्वेग चिंता करणें। किती म्हणोनी ॥ ३३ ॥**
**हाट भरला संसाराचा। नफा पाहावा देवाचा।**
**तरीच कांहीं या कष्टाचा। परिहार होतो ॥ ३४ ॥**

* * * *

**येथील येथें अवघेंचि राहातें। ऐसें प्रत्ययास येतें।**
**कोण काय घेऊन जातें। सांगाना का? ॥ २८ ॥**
**पदार्थी असावें उदास। विवेक पाहावा सावकाश।**
**येणेंकरितां जगदीश। अलभ्य लाभे ॥ २९ ॥**
**जगदीशापरता लाभ नाहीं। कार्याकारण सर्व कांहीं।**
**संसार करीत असतांही। समाधान ॥ ३० ॥**
**प्रपंचीं असोन परमार्थ पाहे। तोचि ये स्थितीतें लाहे।**
**प्रारब्धयोगेंकरून राहे। लोकांमध्यें ॥ २१ ॥**

संसारांत असून परमार्थलाभ घेतां येतो हा समर्थांचा बोध सर्वांसच पटण्यासारखा आहे. 'कीर्ति करून नाहीं मेले। ते उगेच आले आणि गेले.' हें यश जरी सर्वांसच साधण्यासारखें नाहीं तरी प्रत्येकास आपल्यापुरता संसार परमार्थरूप करितां येतो ही समर्थांची शिकवण सर्वांसच धीर

देणारी आहे. व्यष्टीचाच काय पण समष्टीचाही संसार राज्य करणारासही चांगला करितां येतो.

**मागां होते जनकादिक । राज्य करितांही अनेक ।**
**तैसेचि आतां पुण्यश्लोक । कित्येक असती ॥ ३१ ॥**

ह्या ओवींत ' पुण्यश्लोक ' ही पदवी समर्थांनीं शिवरायास दिलेली दिसते.

**समास १०: वैराग्यभक्तिनिरूपण :** संसाराचें भयाण पण यथातथ्य निरूपण करून व त्रिविध तापांचें उग्र चित्र उभें करून वाचकांच्या मनांत तीव्र वैराग्य उत्पन्न करावें व भगवंताला अनन्यभावें शरण जाण्यास त्यांना प्रवृत्त करावें असेंच समर्थांच्या मनांत होतें हें ह्या गोड समासावरून स्पष्ट होतें. बहुतेक प्राणी संसाररूप महापुराच्या धारेंत सांपडले आहेत, त्यांना विखार काळसर्प डंखूं पाहत आहे, आशा ममता या सुसरी तडातोड करीत आहेत, अहंकारनक्र उडवून पाताळांत बुडवीत आहे, वासनाधामीण गळां पडली असून तिचें वेटाळें पडलें आहे, याच्या डोक्यावर मान मोडेल एवढें प्रपंचाचें ओझें आहे—अशा जीवांची सोडवणूक कशी व्हावी ?

**बहुतेक आवर्तीं पडले । प्राणी वाहातचि गेले ।**
**जेहीं भगवंतासी बोभाइलें । भावार्थबळें ॥ ८ ॥**
**देवें आपण घालूनि उडी । तयांस नेलें पैलथडी ।**
**येर तीं अभाविकें बापुडीं । वाहातचि गेलीं ॥ ९ ॥**

संसारसागरांतून तारून नेणारा एक देवच आहे, पण त्याच्यावर पूर्ण निष्ठा पाहिजे.

**भगवंत भावाचा भुकेला । भावार्थ देखोन भुलला ।**
**संकटीं पावे भाविकाला । रक्षितसे ॥ १० ॥**

हा हजारों भक्तभाविकांचा अनुभव आहे. भक्ति दांभिकपणाची नको—

**जयास भगवंत आवडे । तयाचें देवासी सांकडें ।**
**संसारदुःख सकळ उडे । निजदासाचें ॥ ११ ॥**

**जैसा भाव जयापासीं । तैसा देव तयासी ।**
**जाणे भाव अंतरसाक्षी । प्राणिमात्रांचा ॥ १३ ॥**
**जरी भाव असेल माइक । तरी देव होय महाठक ।**
**नवल तयाचें कौतुक । जैशास तैसा ॥ १४ ॥**

'ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्' अशी त्याची प्रतिज्ञाच आहे. 'जैसें जयाचें भजन । तैसेंचि दे समाधान.' दर्पणांत बिंबासारखेंच प्रतिबिंब दिसतें.

**जैसा भाव प्रतिबिंबला । तयाचाचि देव जाला ।**
**जो जैसें भजे त्याला । तैसाचि बोळे ॥ १९ ॥**

सर्व सूत्र तर आपणापाशींच आहे. भावानें परमार्थाच्या वाटा वाहतात. 'भरला मोक्षाचा चोहटा सज्जनसंगें.' जे भावानें भजतात ते स्वतः तरून इतरांसही तारतात. जे हरिभजनीं लागले ते धन्य होत, त्यांनींच जन्माचें सार्थक केलें.

**आयुष्य हेचि रत्नपेटी । माजीं भजनरत्नें गोमटीं ।**
**ईश्वरीं अर्पूनियां लुटी । आनंदाची करावी ॥ २७ ॥**
**हरिभक्त वैभवें कनिष्ठ । परी तो ब्रह्मादिकां वरिष्ठ ।**
**सदा सर्वदा संतुष्ट । नैराश्यबोधें ॥ २८ ॥**

भक्त तेच, कीं ज्यांना भगवंतच प्रियतम असतो; ते संसारसुखांत लोधून पडत नाहींत.

**जयांचा ईश्वरीं जिव्हाळा । ते भोगिती स्वानंदसोहळा ।**
**जयांचा जनांवेगळा । ठेवा अक्षयी ॥ ३१ ॥**
**त अक्षयसुखें सुखावले । संसारदुःखें विसरले ।**
**विषयरंगीं वोरंगले । श्रीरंगरंगीं ॥ ३२ ॥**

भक्त विषयसुखाविषयीं पूर्ण निरिच्छ असतात व श्रीरंगरंगीं रंगतात. त्यांचा अक्षय्य ठेवा सामान्यजनांच्या कपाळीं कोठून असणार ? सामान्य जनांला तो

कळतही नाहीं. देव भाविकांना सबाह्य संभाळतो ( आंत षड्रिपूंपासून व बाहेर जगापासून—प्रल्हादवत् ). नरदेहासारखें निधान जोडून करंटे अभाविक तें कवडीमोल करून टाकतात. हातांत परीस पडून हा करंटा दारिद्र्य भोगतो. 'जैसे पक्षी दाही दिशा उडोन जाती'—तसे पुत्रकळत्रादि सकळ स्वजन व धनदौलत हे विघडून जायला वेळ लागत नाहीं—हा 'अंतीं येकलाचि गेला। हात झाडूनी.' श्वानशूकरादि योनींत हा आत्मसुखाचा प्रसंग नाहीं.

**कैंची माता कैंचा पिता। कैंची बहीण कैंचा भ्राता।**
**कैंचीं सुहृदें कैंची वनिता। पुत्रकलत्रादिक ॥ ४५ ॥**
**हे तूं जाण मायेचीं। अवघीं सोइरीं सुखाचीं।**
**हे तुझ्या सुखदुःखाचीं। सांगाती नव्हती ॥ ४६ ॥**

तारुण्य, वैभव, सुखसोहळे, इष्टमित्र हे सर्व मायिक आहेत. कर्मयोगानें मिळतात व जातात!

**तुवां भोगिल्या पुनरावृत्ती। ऐसीं मायबापें किती।**
**स्त्री कन्या पुत्र होती। लक्षानलक्ष ॥ ५१ ॥**

पोटासाठीं कष्ट करितोस अन् ज्याने नरदेह दिला त्याला विसरतोस!

**येका दुर्भराकारणें। नाना नीचांची सेवा करणें।**
**नाना स्तुति आणि स्तवनें। मर्यादा धरावी ॥ ५४ ॥**
**जो अन्न देतो उदरासी। शरीर विकावें लागे त्यासी।**
**मा जेणें घातलें जन्मासी। त्यासी कैसें विसरावें ? ॥ ५५ ॥**

दुर्भर म्हणजे पोट. गाड्यांच्या गाड्या मिळवून त्यांत घातल्यास तरी गडप, कधीं भरायचेंच नाहीं. परमात्मा केवढा समर्थ आहे? त्याला सर्व जीवांची चिंता आहे. 'मेघ वर्षे जयाची सत्ता। सिंधु मर्यादा धरी.' देवावांचून जी आशा ती निराशाच होय.

**सांडून राम आनंदघन। ज्याचे मनीं विषयचिंतन।**
**त्यासी कैंचें समाधान। लोलंगतासी ? ॥ ६२ ॥**

ज्याला परमसुख पाहिजे त्यानें सर्वत्याग करून रघुनाथभजनीं लागावें. ‘ विषयवासना मोडे । तो येक सुखी. ’ विषयसुखांत ‘ पूर्वी गोड अंतीं शोक ’ नेमस्त आहे. राम सदा सुखरूप आहे. हें ऐकून भाविक विचारतो ‘ कैसेनि घडे जी सार्थक ? ’

**देवासी वास्तव्य कोठें ? । तो मज कैसेनि भेटे ? ।**
**दुःखमूळ संसार तुटे । कोणेपरी स्वामी ? ॥ ६९ ॥**
**कैसें करावें भगवद्भजन । कोठें ठेवावें हें मन ।**
**भगवद्भजनाचें लक्षण । मज निरोपावें ॥ ५२ ॥**

याचें उत्तर देण्यासाठींच आतां नवविधाभक्तीचा दशक सांगावयाचा आहे. ‘ स्वानंद तुंबळेल आतां ’ हें आधींच सांगून ठेवतात.

## ४ चौथा दशक : नवविधाभक्ति

भक्तशिरोमणि प्रल्हाद याच्या मुखांतून नवविधाभक्तीचा उपदेश जगाला प्रथम मिळाला. भागवत स्कंध ७ मध्यें प्रल्हादाची कथा आहे. नारायणाविषयीं प्रल्हादाचें नैसर्गिक प्रेम होतें. देहात्मवादी हिरण्यकशिपूनें त्याला शिकवायला एक गुरुजी ठेविले होते. हिरण्यकशिपु हा देहात्मवादी म्ह० पाखंडी होता. ‘ देह तोचि देव भोजन ते भक्ति । मरण ते मुक्ति पाखंड्याची ’ असें या नास्तिकांचें वर्णन तुकोबांनीं केलें आहे. प्रल्हाद तर उपजत भक्त. त्याच्या मुखाने अखंड नामस्मरण होत होतें. त्याला ह्या पुण्यकर्मापासून परावृत्त करण्याची त्याच्या बापानें पराकाष्ठा केली. एके दिवशीं मुलाची परीक्षा घेण्यासाठीं बाप स्वतः शाळेंत गेला व ‘ बाळा प्रल्हादा ! तूं जें अध्ययन केलें आहेस त्यांतला एखादा चांगलासा पाठ मला म्हणून दाखीव पाहूं !’ असे म्हणाला. तेव्हां भक्तराज प्रल्हाद म्हणाला —

**श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ।**
**अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ २३ ॥**
**इति पुंसार्पिता विष्णौ भक्तिश्चेन्नवलक्षणा ।**
**क्रियते भगवत्यद्धा तन्मन्येऽधीतमुत्तमम् ॥ २४ ॥**

" विष्णूचें कथाश्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवा, पूजन, वंदन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन ह्या लक्षणांनीं युक्त अशी भक्ति ज्याच्यायोगानें होते तें अध्ययन उत्तम होय असें मीं समजतों." (भागवत, स्कंध ७, अ० ५) प्रल्हादासाठीं भगवान् स्तंभांतून प्रगटले ही कथा प्रसिद्ध आहे. प्रल्हादानें सांगितलेली ही नवविधाभक्ति भक्तमंडळांत अत्यंत लोकप्रिय आहे. ही भक्ति भगवद्गीतेंत कशी सांगितली आहे, ज्ञानेश्वरएकनाथांनीं हिचें वर्णन कसें केलें आहे, हें आमच्या 'नवविधाभक्ति' ह्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत सविस्तर लिहिलें आहे तें वाचकांनीं तेथेंच पहावें. समर्थांनीं ह्याच नवविधाभक्तीचें निरूपण चौथ्या दशकांत कसें केलें आहे तेवढेंच आपणास येथें पहावयाचें आहे. समर्थ म्हणतात —

**श्रोतेन पुसिलें बरवें । भगवद्भजन कैसें करावें ।**
**म्हणोनी बोलिलें स्वभावें । ग्रंथांतरीं ॥ ४ ॥**
**सावध होऊन श्रोतेजन । ऐका नवविधाभजन ।**
**सच्छास्त्रीं बोलिलें पावन । होइजे जेणें ॥ ५ ॥**

१ **श्रवण :** परमात्मा सगुण निर्गुण उभयरूप असल्यामुळें त्याच्या सगुणलीला ( रामायणभागवतादि ग्रंथांतून ) ऐकाव्यात व त्याच्या निर्गुण स्वरूपाचें ज्ञान ( उपनिषदादि ग्रंथांतून ) ऐकावें म्हणजे त्याचें स्वरूपज्ञान यथार्थ होईल. देवचरित्रश्रवणानें भक्ति व अध्यात्मश्रवणानें ज्ञान होऊन ज्ञानभक्तीच्या समरसतेनें जीवाचा उद्धार होतो.

**प्रथम भजन ऐसें जाण । हरिकथापुराणश्रवण ।**
**नाना अध्यात्मनिरूपण । ऐकत जावें ॥ ८ ॥**
**कर्ममार्ग उपासनामार्ग । ज्ञानमार्ग सिद्धांतमार्ग ।**
**योगमार्ग वैराग्यमार्ग । ऐकत जावे ॥ ९ ॥**
**नाना पिंडांची रचना । नाना भूगोलरचना ।**
**नाना सृष्टीची रचना । कैसी ती ऐकावी ॥ १० ॥**

नानाग्रंथ धांडोळावे, नानामतें व सिद्धान्त पहावे, चौदा विद्या व चौसष्ट कला—सर्व कांहीं ऐकावें, महावाक्यांचीं विवरणें, चार देह व त्यांचीं निरसनें ऐकावींत—

**ऐसें हें अवघेंचि ऐकावें । परंतु सार शोधून घ्यावें ।**
**असार तें जाणोनि त्यागावें । या नांव श्रवणभक्ति ॥ ३० ॥**

पुन्हा सांगतात, ‘ सगुणाचीं चरित्रें ऐकावीं । कां ते निर्गुण अध्यात्में शोधावीं. ’

**ऐसें श्रवण सगुणाचें । अध्यात्मनिरूपण निर्गुणाचें ।**
**विभक्ति सांडूनि भक्तीचें । मूळ शोधावें ॥ ३४ ॥**

सर्व कांहीं ऐकावें पण विभक्ति ( वेगळेपण ) सोडून भक्तीचें ( तादात्म्याचें ) मूळ शोधावें. देवभक्तांचें ऐक्य अनुभवावें. श्रवणभक्तीविषयीं ‘ ग्रंथ आणि ग्रंथाध्ययन ’ ह्या प्रकरणांत मागें सविस्तर लिहिलें आहे.

२ **कीर्तन :** श्रवणाचें मनन होऊन दृढाभ्यासानें तें मुरलें म्हणजे कीर्तन करण्याचा अधिकार प्राप्त होतो.

**बहुत करावें पाठांतर । कंठीं धरावें ग्रंथान्तर ।**
**भगवत्कथा निरंतर । करीत जावी ॥ ३ ॥**

उत्तमोत्तम ग्रंथांचें श्रवण, वाचन, मनन, पाठान्तर नित्य सुरू ठेवावें. मन अर्थारूढ होऊन स्वतः रंगावें. ‘ आपुलिया सुखस्वार्था । केलीच करावी हरिकथा ’—आपल्या स्वानंदासाठीं कीर्तन करावें, जनमनोरंजन हा कीर्तनाचा प्रधान हेतु नसावा.

**नित्य नवा हव्यास धरावा । साक्षेप अत्यंतचि करावा ।**
**हरिकीर्तनें भरावा । ब्रह्मगोळ अवघा ॥ ५ ॥**

**मनापासून आवडी । जीवापासून अत्यंत गोडी ।**
**सदासर्वदा तांतडी । हरिकीर्तनाची ॥ ६ ॥**

कीर्तनानें परमात्मा प्रसन्न होतो, स्वतःला भक्तिसुखभोग घडतो व बहुत जनांस भक्तिमार्गाचें वळण लागतें. भगवंताचीं ध्यानें अंतरीं लक्षून प्रेमानें कथा करावी.

कथेंत बहुप्रकारचें वक्तृत्व उभारावें. नामघोषानें विश्व दुमदुमून सोडावें. प्रसंगानुसार धातमाता ( कल्पित व घडलेल्या कथा ) नेमस्त म्ह० थोडक्यांत सांगून भगवत्प्रेमा अनिवार वाढवावा. अवान्तर गोष्टींत रमून मुख्य कथानुसंधान मात्र केव्हांही सोडूं नये. कथा भीत भीत किंवा कचरत करूं नये. कोणाची भीड किंवा भीति बाळगूं नये. घडघडाटाने कथा दणकून करून श्रोत्यांचीं श्रवणपुटें आनंदाने भरावीं.

पदें, दोहरे, श्लोक, प्रबंध, अनेक प्रकारचे छंद, वीरश्रीचीं भाषणें व विनोद हेही प्रसंगानुरूप पण बेताने कथेत योजावेत. गद्यपद्यात्मक अनेक आधार काढून शास्त्राधारें भाषण करावें. अस्ताव्यस्त बोलूं नये.

कीर्तनांत निरूपणाचे विषय काय असावेत याबद्दल समर्थांचा दंडक असा आहे —

**भक्तिज्ञानवैराग्यलक्षण । नीतिन्यायस्वधर्मरक्षण ।**
**साधनमार्ग अध्यात्मनिरूपण । प्रांजळ बोलावें ॥ १७ ॥**
**प्रसंगें हरिकथा करावी । सगुणीं सगुणकीर्ति धरावी ।**
**निर्गुणप्रसंगें वाढवावी । अध्यात्मविद्या ॥ १७ ॥**

देव सोडून नादांत मग्न होऊं नये. मन कलाकार झाल्यावर देव कोठून आठवणार ? कलेला प्राधान्य नाहीं, कलेसाठीं कला नाहीं !

भक्ति, ज्ञान व वैराग्य यांचीं लक्षणे सांगावींत; नीति, न्याय आणि स्वधर्म यांचें रक्षण होईल असें बोलावें; भक्ति व ज्ञान जेणेंकरून श्रोत्यांच्या मनांत ठसतील असेंच भाषण करावें; ब्राह्मण्य रक्षून बोलावें; जातीजातीचा अभिमान उठवून तंटे वाढवूं नयेत व वर्णसंकरही प्रतिपादूं नये.

मायाब्रह्माचें विवरण साकल्य वदावें. पूर्वपक्षाचें खंडन करून सिद्धान्त श्रोत्यांच्या मनावर बिंबवावा. उपासनामार्ग बळावेल असें बोलावें.

**सगुणकथा या नांव कीर्तन । अद्वैत म्हणजे निरूपण ।**
**सगुण रक्षून निर्गुण । बोलत जावें ॥ २३ ॥**

**सकळ रक्षून ज्ञान सांगे । जेणें वेदाज्ञा न भंगे ।**
**उत्तम सन्मार्ग लागे । प्राणिमात्रांसी ॥ २५ ॥**

अथवा एवढी ऐपत नसेल, तर 'हें सकळ सांडून। करावें गुणानुवादकीर्तन.' कीर्तनभक्ति ती हीच. कीर्तनाने चित्ताचे दोष जातात व 'कीर्तनें भगवत्प्राप्ति । यदर्थी संदेह नाहीं,' मात्र वक्ता साचार अनुभवाचा पाहिजे.

द० १४, स० ४।५ मध्यें कीर्तनभक्तीचें विवरण पुन्हा केलें आहे तें पहावें. विशेषतः पांचवा समास अवश्य पहावा. श्रवणीं प्रेमळ भाविक असतील तर सगुणचरित्रें गावींत, ज्ञाते साधुजन असतील तर अद्वैत-निरूपण करावें. कीर्तनांत स्त्रियादिकांचें कौतुक वर्णू नये—'धारिष्टापासून चळे श्रोता' म्हणून, निःशंक निर्लज्ज होऊन भगवद्गुणानुवाद गातां रंग माजे !

**लाज सांडूनियां जनांची । आस्था सांडून धनाची ।**
**नीच नवी कीर्तनाची । आवडी धरावी ॥ १६ ॥**

अध्यात्मप्रकरणांत चतुर्थमान म्हणून एक छोटेंसें काव्य आहे त्यांत हरिदासास उत्कृष्ट शिकवण दिलेली पुढें आढळेल.

**३ नामस्मरण :** ही तर ह्या कळिकाळांतली मुख्य भक्ति. समर्थांसकट सर्व भक्तांचा मुख्य भर नामस्मरणावर—

**स्मरण देवाचें करावें । अखंड नाम जपत जावें ।**
**नामस्मरणें पावावें । समाधान ॥ २ ॥**

आधीं देवाचें स्मरण करावें, स्मरण करून अखंड नाम जपत जावें व नामस्मरणानें समाधान म्ह० समाधिसुख किंवा भगवद्योगसुख अनुभवावें. उपास्याच्या चरणकमलीं किंवा स्वरूपाच्या ठिकाणीं वृत्तीचा लय करून मीपणाला आपण उरलों नाहीं, म्हणजे संसाराचीं कोणतींही कामें आपण करीत असलों, तरी तीं बाधक होत नाहींत. नामस्मरणानें हीच बैठक साधावयाची आहे. समर्थ म्हणतात कीं, 'नामस्मरण सर्वकाळीं करीत जावें.' नामस्मरणावांचून पळभर राहूं नये अशी त्यांची व सर्व संतांची आज्ञा आहे. नित्यनेम प्रातःकाळीं, माध्यान्हकाळीं, सायंकाळीं, हर्षकाळीं, विषमकाळीं, पर्वकाळीं, प्रस्तावकाळीं, विश्रांतिकाळीं, निद्राकाळीं, सर्वकाळीं नामस्मरण करावें.

**बोलतां चालतां धंदा करितां । खातां जेवितां सुखी होतां ।**
**नाना उपभोग भोगितां । नाम विसरों नये ॥ ७ ॥**

समर्थांनीं नामस्मरणानें आपलें तपोबळ वाढविलें, व तपोबळावर प्रचंड राष्ट्रकार्य प्रत्यक्ष करून दाखविलें, अशा कार्यकर्त्या समर्थांच्या अनुभवाचा उपदेश आपण मानावयास नको काय ? समर्थ म्हणतात —

**संपत्ति अथवा विपत्ति । जैसी पडे काळगती ।**
**नामस्मरणाची स्थिति । सांडूंचि नये ॥ ८ ॥**
**आधीं अवदसा मग दसा । अथवा दसेउपरी अवदसा ।**
**प्रसंग असो भलतैसा । परंतु नाम सांडूं नये ॥ १० ॥**
**नामें संकटें नासती । नामें विघ्नें निवारती ।**
**नामस्मरणें पाविजेती । उत्तम पदें ॥ ११ ॥**
**बाळपणीं तारुण्यकाळीं । कठिणकाळीं वृद्धापकाळीं ।**
**सर्वकाळीं अंतकाळीं । नामस्मरण असावें ॥ १४ ॥**

समर्थांनीं पुढें 'नामाचा महिमा जाणे शंकर' याप्रमाणें शंकरांचें उदाहरण घेतलें आहे. शंकरांनीं जगाला जाळीत सुटणाऱ्या हालाहल

विषाचें औपकारिक बुद्धीनें प्राशन केलें, तेव्हां सर्वांगाचा दाह होऊन ते घाबरे झाले व त्यांनीं मस्तकावर गंगा धारण केली तथापि दाह शमेना, म्हणून त्यांनीं रामनाम कंठांत धारण केलें आणि त्यामुळें त्यांचा दाह शमला आणि जगतानें शंकरांस नीलकंठ ही पदवी अर्पण केली ! व्यक्तिक असोत किंवा राष्ट्रिक असोत, संकटांतून तारून नेणारा प्रभूवांचून दुसरा कोणी समर्थ नाहीं व प्रभूला आकळावयाचा मार्ग म्हणजे त्याच्या नामाचा जप करणें हाच होय. ‘ नाम अखंड स्मरावें । रूप मनीं आठवावें. ’

**चहूं वर्णांस नामाधिकार । नामीं नाहीं लहान थोर ।**
**जडमूढ पैल पार । पावती नामें ॥**

शंकर, वाल्मीक, प्रल्हाद, अजामिळ, असंख्य जन नामानें उद्धरले आहेत.

**४ पादसेवन :** ‘ सद्वस्तु दाखवी सद्गुरु ’—ब्रह्मरूपतेचा निर्धार ते अंगीं बाणवितात.

**सद्गुरुकृपेवीण कांहीं । भवतरणोपाव तों नाहीं ।**
**याकारणें लवलाहीं । सद्गुरुपाय सेवावे ॥ ४ ॥**

गुरूला आपलें सर्वस्व अर्पण करणें म्हणजे ज्या ३६ तत्त्वांचा आपला देह आहे त्यावरची आपलेपणाची बुद्धि सोडून देणें होय ! ! संसारावर तिळांजळी देऊन अहंभावापासून देहगेहापर्यंत सर्व संसार परमात्म्याच्या म्हणजेच सद्गुरूच्या पायीं वाहणें व आपण विवेकानें मुळींच शिल्लक न राहणें हीच सद्गुरूची खरी सेवा होय. पूजा हीच, उपासना हीच, भक्ति हीच. सद्गुरुपदीं अनन्यपण हेंच पादसेवन. वेगळेपणानें राहणें हें पाप, व अखंड ऐकात्म्य उपभोगणें ही सेवा. संगत्याग, आत्मनिवेदन, विदेहस्थिति, अलिप्तपणा, सहजस्थिति, उन्मनी व विज्ञान हे ‘सप्तही एकरूप’ आहेत. हे सात शब्द एकच तत्त्व प्रतिपादितात. हे शब्द निःसंगपणाचे पर्यायशब्द आहेत. संग म्हणजे संसार, निःसंग म्हणजे मोक्ष; संग म्हणजे

प्रवृत्ति, निःसंग म्हणजे निवृत्ति; संगत्यागावांचून वस्तुरूपता, स्वरूपता किंवा अनुभव नाहीं. संगत्याग, अनुभव, निवेदन, विदेहस्थिति इत्यादि अभिधानें हीं 'समाधानाचीं संकेतवचनें' आहेत, म्हणजे समाधानाचें स्वरूप कांहींसें दाखविणारे हे शब्द आहेत, यापलीकडे यांत कांहीं नाहीं. खरा अनुभव किंवा खरें समाधान हें शब्दांनीं दाखवितां येणार नाहीं, तें 'सकळ कांहीं पादसेवनें। उमजों लागे.' बहुधा सर्वच 'अनुभवाचीं अंगें। सकळ कळती संतसंगें.' म्हणूनच सद्गुरूचे पाय धरावेत. ह्या चौथ्या म्हणजे पादसेवनभक्तीच्या प्रसंगानें गौप्य तें प्रगटतें. अंतरिक्षमार्ग केवळ गुरुगम्य आहे. गुरुचरणसेवा हें पादसेवन होय.

**५ अर्चन :** **पांचवी भक्ति ते अर्चन। अर्चन म्हणजे देवतार्चन।**
**शास्त्रोक्त पूजाविधान। केलें पाहिजे ॥ २ ॥**

पूजा वैदिक, तांत्रिक व मिश्र अशी तीन प्रकारची आहे. मूर्ति अष्टविध आहे: पाषाणमय, काष्ठमय, सुवर्णादि धातुमय, मृत्तिकाचंदन इत्यादिकांची, चित्ररूप, वालुकामय, मनोमय व रत्नमय. मूर्ति चल किंवा अचल असूं शकेल. चलमूर्तीवर आवाहन–विसर्जन करायचीं असतात, पण अचल मूर्तीवर तीं करूं नयेत. निष्कामबुद्धीनें देवाची पूजा नित्य करावी. सुखदुःख प्रारब्धाच्या माथीं मारून शुद्धप्रेमवश होऊन पूजा करावी. न्यास करून गंधमाल्यधूपदीप इत्यादि साहित्यासह पूजा करावी. मूर्ति जड आहे असें मानूं नये.

**देवब्राह्मणअग्निपूजन। साधुसंतअतीतपूजन।**
**यतिमहानुभावगायत्रीपूजन। या नांव पांचवी भक्ति ॥ ४ ॥**
**धातुपाषाणमृत्तिकापूजन। चित्रलेपसत्पात्रपूजन।**
**आपुले गृहींचें देवतार्चन। या नांव पांचवी भक्ति ॥ ५ ॥**

कुळधर्म व कुळाचार सर्व पाळावेत, घराण्याची परंपरा कायम राहते. जें आपणास अत्यंत प्रिय तें देवास वहावें. बुद्धिवंतानें आपली बुद्धि देवास

वहावी. ज्याची रसवंती रसाळ असेल त्यानें ती देवास अर्पण करून कीर्तनस्मरणादिकांनीं अखंड रंगवावी. ज्याची शरीरयष्टि मजबूत असेल त्यानें देवद्वारीं पडेल तें काम करून आपली काया झिजवावी. ज्याच्या-पाशीं द्रव्य असेल त्यानें देवब्राह्मणमहानुभाव यांच्या सेवेंत तें खर्चावें, नाना पक्वान्नांचे नैवेद्य देवास अर्पावेत, शिबिका, छत्र्या, सुखासनें, अबदागिरी देवास अर्पाव्यात. वापी, कूप, सरोवरें, देवालयें, धर्मशाळा, पाठशाळा, मंडप, चांदवे, पुष्पवाटिका, पर्णकुट्या उभाराव्यात. शुक, सारिका, मयूर, चक्रवाक, गाई, हत्ती, घोडे, उंट, रथ, इत्यादि देवालयीं समर्पावींत. थोडक्यांत सांगायचें म्हणजे—

**काया वाचा आणि मनें। चित्तें वित्तें जीवें प्राणें ॥**
**सद्भावें भगवंत अर्चणें। या नांव अर्चनभक्ति ॥ २९ ॥**

परमेश्वराहून सद्गुरु भिन्न नसल्यामुळें जी भगवदुपासनेची पद्धत आहे तीच गुरुपूजेलाही लागू आहे. सामग्री जवळ नसेल तर मानसपूजा करून संकल्पानें सर्व समर्पावें.

**जें जें आपणास पाहिजे। तें तें कल्पून वाहिजे।**
**येणेंप्रकारें कीजे। मानसपूजा ॥ ३३ ॥**

पुढें दासबोधांत व अन्यत्र समर्थांनीं एका निर्गुण ब्रह्माची उपासना सांगितली असली तरी लोकांत रूढ असलेल्या अनेक देवदेवतांच्या उपासना व भजनपूजनादि सत्कर्में यांना त्यांनीं कोठेंही धक्का लावला नाहीं. त्यांची बुद्धि व्यापक व सर्वसंग्राहक होती. त्यांनीं कुळधर्म, कुळाचार पाळायला सांगितले आहेत. त्यांनीं अनेक तीर्थक्षेत्रें केलीं व अनेक देवतांवर आरत्या पदें केलीं आहेत. 'अनेकीं सदा एक देवासि पाहे' असा त्यांचा दंडक आहे. नानादेवांच्या उपासना एका अंतरात्म्याला म्ह० मुख्यदेवालाच पावतात हें त्यांनीं द० १६, स० ९ मध्यें स्पष्ट सांगितलें आहे तें अवश्य लक्षांत ठेवावें. १८ व्या दशकाच्या पहिल्याच समासांत

विष्णु, शंकर, व्यंकटेश, तुळजाभवानी, बनशंकरी, खंडेराय, पांडुरंग व रामकृष्णादि अवतार यांचें आदरपूर्वक वर्णन केलें असून ' सकळ देवांचें मूळ। तो हा अंतरात्माचि केवळ। भूमंडळीं सकळ भोग। त्यासीच घडे ' असा सिद्धान्त सांगितला आहे. तोच नाना देवदेवी झाला आहे. 'अधिकारें नाना दैवतें भजत जावीं ', कां कीं ' नानादेवीं भजन केलें। तें मूळपुरुषासी पावलें.' ( द० १९, स० ५ )

६ **वंदन :** देव व संत यांस साष्टांग नमस्कार घालावे. इतरांस यथोचित वंदन करावें.

**साष्टांग नमस्कारास अधिकारु। नाना प्रतिमा देव गुरु।**
**अन्यत्र नमनाचा विचारु। अधिकारें करावा ॥ ४ ॥**

पशुपति, श्रीपति, गभस्ती व मारुति यांस नित्य नेमानें साष्टांग नमस्कार घालीत असावें. वेदज्ञ, शास्त्रज्ञ, पंडित, पुराणिक, हरिदास, याज्ञिक, वैदिक या सर्वांस योग्यतेनुरूप नमस्कार करावेत. ' देवद्विजगुरुप्राज्ञपूजन ' हें शारीर तप आहे. विद्याविनयादि गुणांनीं जे जे आपल्याहून वडील आहेत, त्यांस नमस्कार करावेत. गणेश, शारदा, हरिहरांच्या अवतारमूर्ति, पृथगाकारांस आलेल्या देवाच्या अनंत मूर्ति यांस लोटांगणें घालावींत. ' सर्वदेवनमस्कारः केशवं प्रतिगच्छति ' हें वचन यथार्थ आहेच. नमन म्हणजे नम्रता, लीनता, निरहंकारता. ' नमस्कारें कृपा उचंबळे। नमस्कारें प्रसन्नता प्रबळे.' नमस्कारास दोष माफ होतात. **नमन** हें खरोखरीच **न-मन** पाहिजे. मनच उरत नाहीं तेथें अहंता कोठची ? यासाठीं ' देवभक्त अखंड वंदावे. '

**नमस्काराऐसें नाहीं सोपें। नमस्कार करावा अनन्यरूपें।**
**नाना साधनीं साक्षेपें। कासया शिणावें ? ॥ २३ ॥**

**साधक भावें नमस्कार घाली। त्याची चिंता साधूस लागली।**
**सुगम पंथें नेऊन घाली। जेथील तेथें ॥ २४ ॥**

नमस्कार अनन्यरूपें म्हणजे निष्कपटपणानें किंवा एकात्मतेच्या भावानें घालावा, म्हणजे साधकाची काळजी सिद्ध पुरुष करितो व सोप्या उपायानें '**जेथील तेथें नेऊन घालतो!**' स्वस्वरूपाच्या मूळच्या बैठकीवर तो नेऊन बसवितो.

दोन्ही हात जोडून ते भ्रूमध्यभागीं ठेवले म्हणजे दोन्ही हातांतील Positive व Negative म्हणजे धन व ऋण असे दोन्ही हातांच्या बोटांतून वाहणारे विद्युत्प्रवाह अंजुळी मिटल्यानें निरुद्ध होऊन एकाग्रतेच्या ध्यानास मोठें साह्य करितात. शिवाय दुसऱ्या पूज्य व्यक्तीस वांकून नमन केल्यानेंही त्याच्या शरीरांत अखंड वाहणाऱ्या विद्युत्प्रवाहाचा ओघ आपल्या शरीरांत शिरून शरीरांतील दूषित विद्युत्चा म्हणजेच कलिकल्मषाचा नाश होऊन आपला ज्ञानाधिकार वाढत जातो!

**७ दास्य:** दास्यभक्ति समर्थांची आवडती. हनुमंतानें दास्यभक्ति केली. समर्थांनींही हाच बोध त्यापासून घेतला व आपणास 'रामदास' व आपल्या ग्रंथास 'दासबोध' म्हणविलें. राम आपला धणी व आपण त्याचे दास, आपलें असें कांहीं नाहीं, सर्व कांहीं रामाचें आहे, ही दासाची निष्कपटबुद्धि असते. सर्व सत्ता स्वामीची, त्याची आज्ञा पाळणें हा आपला धर्म: 'स्वामीचें जें मनोगत। तेंचि आपुलें उचित.'

**सातवें भजन तें दास्य जाणावें। पडिलें कार्य तितुकें करावें।**
**सदां सन्निधचि असावें। देवद्वारीं ॥ २ ॥**
**देवाचें वैभव सांभाळावें। न्यूनपूर्ण पडोंचि नेदावें।**
**चढतें वाढतें वाढवावें। भजन देवाचें ॥ ३ ॥**

काया, वाचा, मन आणि धन सर्व भगवंताचीं आहेत असा निश्चय मनांत बाळगून तदनुसार तीं भगवत्प्रीत्यर्थ योजणें ही दास्यभक्ति होय. 'देवाचें सांभाळावें' ही दासाची मुख्य मनीषा असते. शरीर रामकार्यांत झिजवावें, वाचेनें रामाचें भजन करावें व करवावें, मनानें रामाचें ध्यान

करावें व धन रामकार्यीत वेंचावें म्हणजे रामाचा संतोष होतो. धन व तन रामकार्यीं कशीं खर्चावीं याचेंच समर्थांनीं दास्यभक्तीच्या समासांत सविस्तर वर्णन केलें आहे. तें असें—भंगलीं देवालयें करावीं; मोडलीं सरोवरें बांधावीं; सोपे, धर्मशाळा, विहिरी इत्यादिकांचे जीर्णोद्धार करावे; गजरथतुरंग, सिंहासनें, चौक्या, शिबिका, सुखासनें तयार करून देवालयांत अर्पण करावींत; मेघडंब्रें, छत्रें चामरें, सुवर्णासनें, भुवने, कोठारें, पेट्या, रांजण, हंड्या, बत्ते, दागदागिने, दिव्यांबरें, पुष्पवाटिका, तरुवरांचीं वनें, स्वयंपाक-गृहें इत्यादि अनेक वस्तु व स्थळें देवास यथाशक्ति अर्पण करून देवाचे उत्सव व महोत्सव करावेत.

**जयंत्या पर्वें महोत्साव। असंभाव्य चालवी वैभव।**
**जें देखतां स्वर्गींचे देव। तटस्थ होती॥**
**ऐसें वैभव चालवावें। आणि नीच दास्यत्वही करावें।**
**पडिले प्रसंगीं सावध असावें। सर्वकाळ॥ १९॥**

आणखी देवास काय अर्पावें? :

**चरणक्षाळणें स्नानें आचमनें। गंधाक्षतें वसनें भूषणें।**
**आसनें जीवनें नाना सुमनें। धूप दीप नैवेद्य॥ २१॥**
**सडे संमार्जनें करावीं। उदकपात्रें उदकें भरावीं।**
**वसनें प्रक्षाळूनि आणावीं। उत्तमोत्तमें॥ २४॥**

देवदर्शनासाठीं येतील त्यांचा समाचार (पारपत्य) मंजुळ वाणीनें घ्यावा.

**ऐसें दास्य करावें देवाचें। येणेंचि प्रकारें सद्गुरूचें।**
**प्रत्यक्ष न घडे तरी मानसपूजेचें। करीत जावें॥ २८॥**

८ **सख्य :** सख्यभक्ति अर्जुनानें केली :

**देवासी परमसख्य करावें। प्रेमप्रीतीनें बांधावें।**
**आठवे भक्तीचें जाणावें। लक्षण ऐसें॥ २॥**
**देवास जयाची अत्यंत प्रीती। आपण वर्तावें तेणें रीती।**
**येणेंकरितां भगवंतीं। सख्य घडे नेमस्त॥ ३॥**

देवाला काय आवडतें? आपणांस तेंच आवडावें म्हणजे सख्य सहजच घडतें.

**भक्तिभाव आणि भजन । निरूपण आणि कथाकीर्तन ।**
**प्रेमळ भक्तांचें गायन । आवडे देवा ॥ ४ ॥**

देवाचें मनोगत वेदशास्त्रपुराणांतून, महात्म्यांच्या चरित्रांतून, संतांच्या वाणींतून व्यक्त झालें आहे त्याप्रमाणें आपण वागावें. दया, क्षमा, शांति हे देवाचे गुण आपणांस आवडावेत. देवाला संत प्रिय आहेत, आपणांसही ते प्रिय असावेत. धर्मसंस्थापनेसाठीं देवाचा अवतार असतो, आपणांसही धर्मसंस्थापना आवडावी. निरूपणकीर्तनकथावार्ता देवाच्याच कराव्या. बाष्कळ गोष्टी बोलूं नयेत. धर्माज्ञेप्रमाणें वागावें. सर्वांत श्रेष्ठ, सर्वांत प्रिय देवच असावा. आपण देवाला प्रेमप्रीतीनें बांधलें कीं 'देवास लागे भक्ताची चिंता.' देव अनन्यास उपेक्षीत नाहीं, सदा संकटीं धांवतो, त्यानें 'पांडव लाखाजोहरीं जळतां । विवरद्वारें काढिले'.

**मेघ चातकावरी वोळेना । तरी चातक पालटेना ।**
**चंद्र वेळेसि उगवेना । तऱ्ही चकोर अनन्य ॥ १६ ॥**
**सखा मानावा भगवंत । माता पिता गणगोत ।**
**विद्या लक्ष्मी धन वित्त । सकळ परमात्मा ॥ १७ ॥**

बहुतेक लोकांचा दंडक असा आहे कीं, आपल्या मनासारखें झालें कीं देवावर प्रेम करावयाचें पण मनासारखें झालें नाहीं कीं देवाला शिव्या द्यायच्या! निष्ठावंत भक्तांचा हा मार्ग नाहीं. देवघेवीचा व्यापार देवाकडेही करायची धनलोभ्याची रीत आपली नसावी. समर्थ म्हणतात:

**आपुलिया मनोगताकारणें । देवावरी क्रोधास येणें ।**
**ऐसीं नव्हेत कीं लक्षणें । सख्यभक्तीचीं ॥**
**देवाचें जें मनोगत । तेंचि आपुलें उचित ।**
**इच्छेसाठीं भगवंत । अंतरूं नये कीं ॥**

**देवाचे इच्छेनें वर्तावें । देव करील तें मानावें ।**
**मग सहजचि स्वभावें । कृपाळु देव ॥**

पतिव्रतेला जशी स्वतंत्र इच्छा नसून पतीचे इच्छेसरसें वर्तावें एवढेंच तिला ठाऊक असतें, त्याप्रमाणें भक्ताला स्वतःची कांहीं निराळी इच्छा नसून भगवदिच्छा हीच त्याची इच्छा, हाच त्याचा कायदा, हाच त्याचा न्याय व हेंच त्याचें सुख. देव कृपेचा सागर व करुणेचा जळधर आहे, देवाचें सख्य तुटत नाहीं व प्रीति विटत नाहीं, म्हणून देवाशींच हितगुज करावें, सुखदुःख त्याला सांगावें, सर्वोपरी देव आपला सखा करावा.

९ **आत्मनिवेदन :** सायुज्यता देणारी सर्वश्रेष्ठ भक्ति म्हणजे आत्मनिवेदन.

**ऐका निवेदनाचें लक्षण । देवासी वाहावें आपण ।**
**करावें तत्त्वविवरण । म्हणिजे कळे ॥ ३ ॥**

आत्मनिवेदन म्हणजे 'देवासी वाहावें आपण' हें होय. देव कोण, आपण कोण व वाहणें म्हणजे काय हें नीट कळल्याशिवाय आत्मनिवेदन यथार्थ होणार नाहीं, यासाठीं 'करावें तत्त्वविवरण म्हणजे कळे.' देवाला म्हणजे उपास्यमूर्तीला गंध, फूल, धूप, नैवेद्य, वस्त्र हें वाहतां येतें; नाथांनीं म्हटल्याप्रमाणें 'दारासुतगृहप्राण । करावें भगवंतासी अर्पण' हेंही वेळेला करितां येईल; पण आपण आपल्याला वाहायचें म्हणजे काय हें मात्र कळणें कठिण आहे ! आपलीं बायकामुलें, घरदार, जमीनजुमला, स्थावरजंगम मिळकत, आपली बुद्धि, आपलें मन व आपला अहंकार हीं सर्व देवाला वाहिल्यावरही जो 'आपण' म्हणून उरतो तोही देवाला वाहणें ही खरी आत्मनिवेदनभक्ति होय; व ह्या भक्तीचें महत्त्व इतकें आहे कीं, 'नवमभक्ति आत्मनिवेदन । न होतां न चुके जन्ममरण' असें समर्थांनीं म्हटलें आहे व 'हें वचन सत्य प्रमाण । अन्यथा नव्हे' असें पुनः निक्षून सांगितलें आहे ! सलोकता, समीपता व सरूपता ह्या तीन

मुक्ति चळ आहेत, सायुज्यतामुक्ति मात्र अचळ आहे. सगुणभक्ति ते चळे । निर्गुणभक्ति ते न चळे ।' अशी अचळ भक्ति व अचळ मुक्ति आत्मनिवेदनाशिवाय प्राप्त होत नाहीं व तें आत्मनिवेदन कळण्यास तत्त्वविवरण करावें असें समर्थांनीं म्हटलें आहे. श्रवणभक्ति हा प्रारंभ व आत्मनिवेदनभक्ति हा शेवट. अशी अचळ सायुज्यमोक्ष देणारी आत्मनिवेदनभक्ति म्हणजे काय तें पाहूं.

आत्मनिवेदन यथाशास्त्र होण्यास देव कोण व मी कोण याचा विवेकानें उलगडा झाला पाहिजे. देव कोण तो ओळखावा व आपला आपण अंतर्यामीं शोध घ्यावा. देव आणि भक्त हे अभिन्नपणानें पाहिले कीं आत्मनिवेदन सहज घडतें. 'भक्त म्हणिजे विभक्त नव्हे । आणि विभक्त म्हणिजे भक्त नव्हे !' भक्त तोच कीं देवाहून जो वेगळा उरत नाहीं आणि जो वेगळा राहतो तो भक्तच नव्हे ! 'मी'चा आधीं शोध करावा.

**मी कोण ऐसा निवाडा । पाहों जातां तत्त्वझाडा ।**
**विचार करितां उघडा । आपण नाहीं ॥ ८ ॥**
**तत्त्व तत्त्वें जेव्हां सरे । तेव्हां 'आपण' कैंचा उरे ? ।**
**आत्मनिवेदन येणेंप्रकारें । सहजचि जालें ॥ ९ ॥**

पिंडीं तें ब्रम्हांडीं असा न्याय आहे. पिंड कोणत्या २५ किंवा ३६ किंवा ७० तत्त्वांचा बनला आहे तें आधीं समजून घ्यावें. सकळदृश्य तत्त्वरूप आहे, तत्त्वांचें गांठोडें आहे, तें विवेकानें सोडून पहावें. तत्त्वांचा उलगडा झाला, पिंडांतलें तत्त्व ब्रह्मांडांत त्या त्या तत्त्वाशीं मिळविलें, तत्त्वांचा हिशेबझाडा झाला म्हणजे 'आपण' ही वस्तु कांहीं त्यांत सांपडत नाहीं ! गांठोड्यांतल्या वस्तु ज्याच्या त्याला देऊन फडकें झाडून फेंकून दिलें कीं 'गांठोडें' कांहीं उरत नाहीं; त्याप्रमाणें तत्त्वांत मिसळून गेलें कीं 'मी' कांहीं बाकी राहत नाहीं !

'मी'ला आपण शोधीत नाहीं तोंवर तो आपला अंमल इंद्रियांवर चालवीत असतो, पण 'मी'चा शोध लावूं लागलों कीं 'मी' आपला नाहींसा होतो; 'विचारे पाहों जातां कांहींच नाहीं' ही तत्त्वात्मक सृष्टि म्हणजे प्रकृति.

**येक मुख्य परमेश्वरु। दुसरी प्रकृति जगदाकारु।**
**तिसरा आपण कैंचा चोरु। आणिला मध्यें ? ॥ ११ ॥**

तत्त्वांचा विचार पुढें दशक १७ समास ८ मध्यें केला आहे तो पहावा. प्रकृति ही वस्तुतः नाहीं पण दृश्याचा प्रपंच लावण्यासाठीं मानली आहे.

**तत्त्वें साक्षत्वें वोसरती। साक्षत्व नुरे आत्मप्रचीती।**
**आत्मा असे आदिअंतीं। आपण कैंचा ? ॥ १४ ॥**

मी तत्त्वांचा साक्षी आहें, तेव्हां त्याहून भिन्न आहें असें आधीं जाणावें. हा अभ्यास दृढ झाल्यावर मग तें साक्षित्वही आत्मप्रचीतीनें दूर करावें; कारण समर्थांनीं दुसरीकडे म्हटल्याप्रमाणें 'त्यांत साक्षत्वाचा दोरा। तोही तत्त्वरूप!' तत्त्वें साक्षित्वानें दूर करावींत व साक्षित्व निश्चळपदप्राप्तीनें दूर करावें. निश्चळपद तुटेना, फुटेना, चळेना, ढळेना असें आहे. अशा स्वरूपाची प्राप्ति हीच सायुज्यगति, हाच मोक्ष, हेंच सर्वांस साधावयाचें अंतिम ध्येय आहे. आत्मा स्वानंदघन आहे, आणि त्या वचनाशीं 'अहमात्मा' हें दुसरें वचन मिळतें केलें म्हणजे 'आपण कैंचा भिन्न उरला तेथें?' आत्मा आहे निर्गुण व निरंजन आणि त्याच्याशीं आपण अनन्य झाल्यावर आपण अन्यपणानें उरणार कसे? आत्मा आहे अद्वैत, मग माझ्यावेगळ्या द्वैताला अवकाश कसूचा सांपडणार? 'आपण मिथ्या साच देव। देव भक्त अनन्यभाव' असा अनुभव आला म्हणजे आत्मनिवेदन सहजच होतें. स्वरूपीं दृढबुद्धि झाल्यावर जीवशिवउपाधीच समूळ नाहींशी होते. मग मीपणाला वाव कोठें मिळणार? 'वस्तु ठायींची अभेद,' वस्तु आहे तशीच आहे, ती स्वतःसिद्ध आहे, मीही मुक्तच

आहें, पण अज्ञानपणाचें आभाळ उडवावयाचें आहे, त्यासाठीं परमार्थाचा हा सारा खटाटोप आहे ! ' आहे तैसें आहे कल्पना न साहे। दास म्हणे पाहें शोधोनियां. ' देवाशीं अभिन्नपणाची जी अखंड भावना तेंच खरें आत्मनिवेदन होय. समर्थांनीं आत्मारामग्रंथांत म्हटलें आहे —

**प्राप्त झालें अद्वैतज्ञान । अभिन्नपणें जें विज्ञान ।**
**तेंचि जाण आत्मनिवेदन । जेथें मी तूं नाहीं ॥**

देव कोण, आपण कोण व आत्मनिवेदन कोणतें हा विषय सहाव्या दशकाच्या २ ऱ्या व ३ ऱ्या समासांत फारच उत्कृष्ट प्रकारें सांगितला आहे. ' चंचळ कर्ता तो जगदीश । प्राणीमात्र त्याचा अंश । त्याचा तोचि आपणास । ठाव नाहीं, ' म्हणजे ' कर्ता देव तो आपण । कोठेंचि नाहीं ' हें आत्मनिवेदनाचें वर्म ( द० १२, स० ५ ) सांगितलें आहे.

## ५ पांचवा दशक : सद्गुरु, सच्छिष्य व शुद्धज्ञान

नवविधाभक्तीच्या योगानें, विशेषतः त्यांतील नवत्री जी आत्मनिवेदन-भक्ति तिच्या योगानें, सायुज्यमुक्ति मिळते हें ४ थ्या दशकांत सांगितलें. ज्ञानाशिवाय मोक्ष नाहीं, ' ज्ञानादेव तु कैवल्यम् ' हा सिद्धान्त फार प्राचीन व सकलसुजनसंमत आहे. संसार हा अज्ञानजन्य आहे व अज्ञानाचें प्रतियोगी ज्ञान आहे. अंधार घालवायचा असेल तर तो प्रकाशानेंच घालवितां येतो, त्याप्रमाणें अज्ञानाचें निरसन केवळ ज्ञानयोगानेंच होतें. आतां ज्ञान म्हटलें म्हणजे कोणतें ज्ञान हें यथार्थ समजलें पाहिजे, म्हणून यापुढें ज्ञानाचा विचार सांगण्यासाठीं समर्थांनीं पांचवा दशक लिहिला आहे. ज्ञानदाता सद्गुरु कां व तो कसा पाहिजे, ज्ञानेच्छु शिष्य कसा पाहिजे, व शुद्ध ज्ञान कशास म्हणतात या तीन मुख्य गोष्टींचा विचार पहिल्या ६ समासांत सांगितला आहे व मानवजातींत ज्ञानाचा अधिकार कोणाला येतो हें स्पष्ट करण्याकरितां मनुष्यांचे चार वर्ग जे बद्ध, मुमुक्षु, साधक व सिद्ध त्यांचा

विचार पुढील ४ समासांत केला आहे. आतां आपण प्रथम सद्गुरु, सच्छिष्य व शुद्धज्ञान यांबद्दल समर्थांनीं काय बोध केला आहे तो पाहूं. गुरुनिश्चय, गुरुलक्षण, शिष्यलक्षण, उपदेशलक्षण, बहुधाज्ञानलक्षण व शुद्धज्ञाननिरूपण असे सहा विषय सहा समासांत निरूपिले आहेत.

प्रथम 'गुरुनिश्चय' झाला पाहिजे. जें वेदांस सांकडे, जें शब्दास कानडे, तें ब्रह्म श्रीगुरुयोगानें 'आपणचि होइजे अंगें' म्हणून श्रीगुरूंना प्रथम वंदन करून विषयास आरंभ करितात. 'गुरु तो सकळांसी ब्राह्मण.' एवढें काय ब्राह्मणांचें महत्त्व आहे ? तपोनिष्ठ ब्राह्मणांची परंपरा मोठी आहे. धातुपाषाणमूर्तींच्या ठिकाणीं ब्राह्मणांच्या मुखांतून येणाऱ्या मंत्रांच्या योगानें देवपण येतें, ब्राह्मणकुळीं जन्म मिळाला तरी ब्राह्मणांनीं समंत्रक मौंजीबंधन करून द्विजत्व द्यावें लागतें, वेदांनींही 'सकळांसी पूज्य ब्राह्मण' अशी आज्ञा केली आहे, व योगयागव्रतदानादि कर्ममार्ग ब्राह्मणाविणें होणार नाहीं. 'स्वधर्मकर्मीं ब्राह्मण पूज्य' आहेत तरी पण ब्रह्मज्ञान सद्गुरूवांचून होणार नाहीं. कार्तिकस्नानादि व्रतें, जपजाप्य, तीर्थाटणें, झळफळीत देवतार्चनें, उपोषणें, निष्ठानेम, यज्ञयागादि अनेक साधनें केलीं, चौदा विद्यांचा अभ्यास केला व रिद्धिसिद्धि प्राप्त झाल्या—'तरी सद्गुरुकृपेविरहित। सर्वथा न घडे स्वहित.' ब्रह्मज्ञान नाहीं तर सर्व फोल आहे, अंधारांत आंधळ्यानें चांचपडण्यासारखेंच तें आहे. 'पुस्तकज्ञानें निश्चयो करणें। तरी गुरु कासया करणें ?' म्हणून गुरुमुखाने ज्ञान घेऊन तें आपल्या प्रत्ययानें विवरावें. गुरुविश्वासानें कृतार्थता येते (द. १२, स. ६ ).

**जैसें नेत्रीं घालितां अंजन। पडे दृष्टीस निधान।**
**तैसें सद्गुरूवचनें ज्ञान-। प्रकाश होय॥ १–३८॥**
**सद्गुरूचेनि अभयकरें। प्रकट होइजे ईश्वरें।**
**संसारदुःखें अपारें। नासोनि जाती॥ ४०॥**
**असो जयासी मोक्ष व्हावा। तेणें सद्गुरु करावा।**
**सद्गुरुविण मोक्ष पावावा। हें कल्पांतीं न घडे॥ ४४॥**

मागें मोठमोठे संतमहंत झाले, रामकृष्णादि अवतारही झाले, पण त्या सर्वांनीं गुरुदास्य केलें व त्यांना ज्ञानविज्ञानविचार सद्गुरूकडूनच प्राप्त झाला, म्हणून सद्गुरुकृपा अवश्य जोडली पाहिजे.

'गुरुनिश्चय' झाला; आतां '**गुरुलक्षणें**' वर्णितात. करामती दाखविणारे; चेडेचेटके करणारे; औषधीप्रयोग, किमया, दृष्टिबंधन शिकविणारे; साहित्यसंगीतरागज्ञान देणारे; आपापल्या जातीचे व्यापार शिकविणारे, हे सर्व पोटभरी विद्या शिकविणारे गुरु मोक्षदाते सद्गुरु नव्हत! आईबाप व गायत्रीमंत्र देणारे कुळगुरु हेही गुरु आहेत, 'परी पैलपार पावविता। तो सद्गुरु वेगळा' आहे. मंत्रगुरु, यंत्रगुरु, राजगुरु, वस्तादगुरु, कुळगुरु, विद्यागुरु, राजागुरु, जगद्गुरु, इ० १७ प्रकारचे गुरु आहेत. स्वप्नगुरु, दीक्षागुरु, प्रतिमागुरु, एक म्हणती स्वयें गुरु—असे उदंड गुरु आहेत, परी 'जो मोक्षदाता सद्गुरु। तो वेगळाचि असे.'

**जो ब्रह्मज्ञान उपदेशी। अज्ञानअंधार निरसी।**
**जीवात्मया। शिवात्मयासी। ऐक्यता करी ॥ २–९ ॥**
**जीव येकदेसी बापुडें। तयास ब्रह्मचि करी रोकडें।**
**फेडी संसारसांकडें। वचनमात्रें ॥ १६ ॥**
**अंतरीं शुद्ध ब्रह्मज्ञान।** (आणि) **बाह्य निष्ठेचें भजन।**

सद्गुरूंचें मुख्य लक्षण हें आहे कीं, त्यांजपाशीं निश्चयाचें समाधान असतें. त्याची स्वरूपस्थिती अढळ असते; त्याचें वैराग्य प्रबळ असतें; त्याचा आचार निर्मळ असतो; त्याच्याजवळ अध्यात्मश्रवण व हरिकथा-निरूपण नित्य चाललेलें असतें; तेथें बहुतांचा आधार जी नवविधाभक्ति ती अनायासें घडते; धर्मकर्म, क्रिया व भजन यांचा आनंद तेथें दुमदुमीत असतो म्ह० कर्मज्ञानउपासना या त्रिविध अंगांनीं तो पूर्ण असतो. तात्पर्य, ज्ञान, वैराग्य, भजन, स्वधर्मकर्म, साधन, श्रवणमनन, नीतिन्याय-

मर्यादा 'हें सर्वही विलसे सद्गुरूपाशीं.' असा महापुरुष पाहून त्याला सद्गुरुभावानें कायावाचामनेंसहित शरण जावें.

**शिष्यास न लाविती साधन । न करविती इंद्रियदमन ।**
**ऐसे गुरु अडक्याचे तीन । मिळाले तरी टाकावे ॥ २१ ॥**

ज्ञान बोधून अविद्याच्छेद करील व इंद्रियदमन शिकवील तोच सद्गुरु. 'आचार उपासना सोडणारा' गुरु गुरुत्वपदास योग्य नाहीं. ज्याच्या ठायीं 'कर्मउपासनेचा अभाव' तो गुरु कशाचा ? 'नीच यातीचा गुरु । तोही कानकोंडा विचारू,' कां कीं त्याचा ब्रह्मसभेंत तीर्थप्रसाद घेतां येत नाहीं, व तो न घेतल्यानें गुरुभक्तीला कमीपणा येतो. गुरुमर्यादा राखली तर ब्राह्मणक्षोभाचें पाप घडतें, ब्राह्मण्य रक्षूं गेलें तर गुरुक्षोभ घडतो— 'नीच यातीस गुरुत्व न घडे याकारणें.'

**तथापि आवडी घेतली जीवें । तरी आपणचि भ्रष्टावें ।**
**बहुतजनांसी भ्रष्टवावें । हे तों दूषणचि कीं ॥ २-६३ ॥**

आतां '**सच्छिष्याची ओळखण**' करून देतात. सद्गुरूंना सच्छिष्य, सच्छिष्याला सद्गुरु भेटले तरच आनंद. भूमि उत्तम पण पीक किडखाद किंवा बीज उत्तम पण भूमि खडकाळ असा संबंध झाल्यास उपयोग नाहीं. भूमि उत्तम व बीज उत्तम पण पर्जन्यावीण उगवत नाहीं; तसे गुरुशिष्य अधिकारी भेटले तरी अध्यात्मनिरूपणावांचून पीक येत नाहीं. शेत पेरलें आणि उगवलें पण निगा राखली नाहीं तर वायां जातें. तसें गुरु, शिष्य व अध्यात्मनिरूपण हा त्रिवेणीसंगम झाला तरी साधनावांचून साधकाच्या पदरांत कांहीं पडत नाहीं ! 'पीक आलियाही उगें । राहोंचि नये'—

**तैसें आत्मज्ञान जालें । परी साधन पाहिजे केलें ।**
**येक वेळ उदंड जेविलें । तऱ्हीं सामग्री पाहिजे ॥ ३-११ ॥**

म्हणून सद्गुरु, सच्छिष्य, सच्छास्त्रविचार आणि साधनक्रम या चौघांचाही मेळ पडला पाहिजे. सत्कर्म, सद्वासना, सदुपासना, स्वधर्म, सत्संग व

नित्यनेम यांचा साधनांत अंतर्भाव होतो. या सर्वांचा मेळ जमला तरच विमळ ज्ञानाचा लाभ घडतो—' नाहीं तरी पाखांड संचरे बळें। समुदायीं!'

**मुख्य सच्छिष्याचें लक्षण। सद्गुरुवचनीं विश्वास पूर्ण।**
**अनन्यभावें शरण। त्या नांव सच्छिष्य ॥ १९ ॥**

ह्या मुख्य लक्षणांत सर्व कांहीं आलें, तथापि आणखी कांहीं लक्षणें सांगतात—

शिष्य निर्मळ, आचारशील, विरक्त, अनुतापी, साक्षेपी, कष्टाळू, उद्योगी, सर्व प्रकारीं नेमस्त, परमार्थाविषयीं अतितत्पर, अर्थान्तरीं प्रवेशकर्ता, प्रज्ञावंत, श्रद्धावंत, नीतिवंत, प्रेमळ, धारिष्टवान् , दृढव्रती, कायाक्लेशी, स्वतंत्र, जगमित्र, एवंगुणविशिष्ट असावा. शिष्य गर्भसुखी नसावा.

**जो संसारदुःखें दुःखवला। जो त्रिविधतापें पोळला।**
**तोचि अधिकारी जाला। परमार्थासी ॥ ३४ ॥**

विषयासक्ताला परमार्थ नाहीं, त्याला ज्ञान जिरणार नाहीं, हरिप्रेम व सत्संग यांचा त्याला आनंद मिळणार नाहीं, अद्वैतसुखभोग होणार नाहीं. नाना हीन व दुष्ट विकारांनीं चित्त भरलें असेल; क्षुधातृष्णा, मायामोह, निद्रा-आळस, कामक्रोध, निंदा, अहंकार इ० विकारांनीं चित्त लिडबिडलें असेल व दंभार्थ गुरूला शरण जाईल तर अशा करंट्याला परमार्थ कोठून मिळणार? दुसऱ्याचे गुणदोष पाहतो व स्वतःचे झांकतो, परदुःखांत सुख मानतो, सत्याचें वावडें, शरीर कष्टवीत नाहीं, सद्बुद्धि नाहीं, अशाला ना गुरु, ना ज्ञान, ना मोक्ष!

तीव्र वैराग्य, शुद्ध अनुताप, कायाक्लेशाची तयारी, हे गुण घेऊन श्रीगुरूला अनन्य शरण झालें पाहिजे. यालाच सच्छिष्य म्हणतात.

सद्गुरु व सच्छिष्य यांचीं लक्षणें सांगितलीं, आतां **बहुधाज्ञान** कोणतें तें प्रथम सांगतात——

भूतमात्रांत जाणीवकला असल्यामुळें सर्व प्राण्यांचे व्यापार ज्ञानावरच होत असतात. लौकिकांत अनेक प्रकारचे मंत्रतंत्र व विविधकला आणि

विद्या यांनाच ज्ञान म्हणतात, पण संसारचक्रांतून सोडविणारें व निर्भय ब्रह्म-पदीं बसविणारें ज्ञान तें वेगळेंच आहे. जगांत अनेक धर्मपंथ व विविध संप्रदाय पसरले असून जो तो आपल्या विचारांप्रमाणें संकुचित अर्थानें ज्ञानोपदेश करीत असतो. शिवमंत्र, भवानीमंत्र, गणेशमंत्र, मार्तंडमंत्र, सोपे अवघड 'जितके देव तितके मंत्र' सांगत असतात. कोणी नानाविध आसनें व मुद्रा शिकवितात. कोणी ध्वनींचा मार्ग लक्षायला सांगतात, कोणी मूलाधारादि षट्चक्रें सांगतात, तत्त्वांचा विस्तार सांगतात. योगी अष्टांगयोग शिकवितात. कर्मयोग, ज्ञानयोग, उपासनायोग इ० आहेतच. कोणी देव सगुण आहे म्हणतात, व कोणी निर्गुण आहे म्हणून प्रतिपादितात. कोणी महावाक्याचा जप करायला सांगतात, कोणी तप सांगतात, कोणी तीर्थाटन करवितात, कोणी अजपा निरूपितात; स्तंभनमोहनादि प्रकार व चेटकी विद्या आहेतच. 'ऐसे उपदेश अनेक। परी ज्ञानेंविण निरर्थक.' या सर्व प्रकृतिधर्मांतल्या उपासना आहेत. आत्मज्ञान प्रकृतीपलीकडील आहे व तेवढेंच तारक आहे. प्रकृतींतल्या विद्या अनेक आहेत पण त्या भवमोचक नाहींत. ज्ञानावीण विद्या व कळा त्या अवकळाच होत.

**जंव तें ज्ञान नाहीं प्रांजळ। तंव सर्व कांहीं निर्फळ।**
**ज्ञानरहित तळमळ। जाणार नाहीं ॥** ५-२ ॥

शुद्ध ज्ञान कोणतें व कोणतें नाहीं ? 'भूत भविष्य वर्तमान। ठाऊकें आहे परिच्छिन्न,' परी तें ज्ञान नव्हे.

**बहुत केलें विद्यापठण। संगीतशास्त्र रागज्ञान।**
**वैदिकशास्त्रवेदाध्ययन। हेंहि ज्ञान नव्हे ॥ ४ ॥**

अनेक व्यवसायांचें, दीक्षांचें व परीक्षांचें ज्ञान हें ज्ञान नव्हे. वनितांची परीक्षा; गजाश्वांची परीक्षा; रत्नांची परीक्षा; यानांची, धातूंची, व शस्त्रास्त्रांची परीक्षा; पशुपक्ष्यांची व मनुष्यांची परीक्षा; वाद्यांची परीक्षा; चिन्हांची परीक्षा (सामुद्रिक); भूमींची परीक्षा (भूगर्भशास्त्र); रसांची

बीजांची, वल्लींची व फलपुष्पांची परीक्षा ( वनस्पतिशास्त्र ); रोगांची व औषधींची परीक्षा ( वैद्यशास्त्र ); होणार परीक्षा ( ज्योतिष ); अनुमान-परीक्षा ( तर्कशास्त्र ); नाना शब्दांची, अर्थांची व भाषांची परीक्षा व नाना सृष्टींची परीक्षा; नाना पदार्थपरीक्षा, इ० नानाविध आधिभौतिक शास्त्रांचें ज्ञान–हें ज्ञान नव्हे! समयसूचकता, शीघ्रकवित्व, नेत्रपालवी, नादकला, वाग्विलास, मोहनकला, चित्रकला — ✓

**आदिकरूनि चौसष्टिकळा। याहिवेगळ्या नाना कळा।**
**चौदा विद्या सिद्धि सकळा। हें ज्ञान नव्हे॥ ३१॥**

सकळ कळा व विद्या यांनीं पूर्ण असला तरी तें ज्ञान नव्हे. तर मग **शुद्धज्ञान** कोणतें?

**ऐक ज्ञानाचें लक्षण। ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान।**
**पाहावें आपणासि आपण। या नांव ज्ञान॥ ६–१॥**

ज्ञान म्ह० आत्मज्ञान. 'पाहावें आपणासि आपण' हें खरें ज्ञान. बाहेर पाहूं नये. 'शोधूं जाणे सकळांसी। परी पाहों नेणे आपणासी' असें समर्थांनीं जनांच्या आटाटीचें वर्णन अन्यत्र केले आहे. आपल्या-बाहेर ज्ञान नाहीं, तें आपल्याजवळ आहे, आपणच ज्ञानस्वरूप आहों! 'मुख्य देवास जाणावें। सत्यस्वरूप वोळखावें,' नित्यानित्यविचार सतत जागृत ठेवावा म्ह० अनित्य तें विचारानें उडून जातें.

**जेथें दृश्यप्रकृति सरे। पंचभूतिक वोसरे।**
**समूळ द्वैत निवारे। या नांव ज्ञान॥ ३॥**

विवेकानें दृश्य जेथें आटून जातें तें ज्ञान. तें मनबुद्धिअगोचर आहे. मन, बुद्धि व परा वाणी जेथें पोंचत नाहींत, जेथें दृश्याचें भान उरत नाहीं, मी ब्रह्मरूप आहें अशी वृत्ति उठणेंही जेथें अज्ञान ठरतें, सर्वसाक्षी तूर्या अवस्थाही ज्या शुद्ध स्वरूपाच्या ठिकाणीं खालींच राहते तें शुद्धज्ञान होय. तुर्येचें ज्ञान शुद्ध नव्हे, कारण तुर्या म्ह० प्रत्यक्ष द्वैत.

शुद्धस्वरूपाच्या ठिकाणीं जागृति, स्वप्न, सुषुप्ति व तुर्या या अवस्था नाहींत व यांच्या अपेक्षेनें जिला उन्मनी म्हणतात तिचीही तेथें वार्ता नाहीं. जागृतींत देह व इंद्रियें कर्में करितात, स्वप्नांत सर्वेंद्रियें लीन होतात पण मन व्यवहार करितें, सुषुप्तींत इंद्रियें व मन यांचा अज्ञानांत लय होऊन गाढ निद्रा येते. तुर्या ही ज्ञानाची अवस्था आहे पण मी ज्ञानस्वरूप आहें हा तेथें फुंज असतो म्हणून तें अज्ञानच होय. शुद्ध-ज्ञान स्थूलादि देह व जागृत्यादि अवस्था यांच्यापलीकडे आहे.

'आपला आपणासि लाभ। हें ज्ञान परम दुर्लभ,' तेथें सकल मतमतान्तरें निर्विकार होतात. 'जेथून हें सर्वही प्रगटे। आणि सकळही जेथ आटे' त्या स्वसंवेद्य आत्मारामाचें ज्ञान होतां म्ह० तदाकार होतां सर्व भ्रांति दूर होते. आपलें मूळ ( मूळमाया ) शोधतां अज्ञान सहज उडून जातें व आपण शुद्ध स्वरूपाकार होऊन राहतों. देहांतील शुद्धस्वरूपाची ओळख होतांच एकीदेशीपणा नष्ट होतो. व्यास, वसिष्ठ, शुक, नारद, शौनक, सनक, आदिनाथ, गोरक्ष, सर्व सिद्ध मुनि याच ज्ञानानें परमपद पावले.

हा बोध झाल्यावर वृत्ति तेथें आसक्त होत नाहीं व मग दृश्य असूनही नसल्यासारखेंच होतें! जगन्मिथ्या हें तत्त्व पटल्यावर जगत् असूनही नाहींसेंच आहे! या बोधानें स्थूळादि चौदेहावेगळें व्हावें म्हणजे अन्वयानें सर्वांत मीच आहें हें ज्ञान होतें. हें आत्मज्ञान देहबुद्धि सोडल्याशिवाय होत नाहीं. गुरु सांगतात —

**शिष्या एकांतीं बैसावें। स्वरूपीं विश्रांतीस जावें।**
**तेणें गुणें दृढावे। परमार्थ हा ॥ ५८ ॥**

**अखंड घडे श्रवणमनन। तरीच पाविजे समाधान।**
**पूर्ण जालियां ब्रह्मज्ञान। वैराग्य भरे अंगीं ॥ ५९ ॥**

ब्रह्मज्ञान झालें तरी मी मुक्त या अभिमानानें इंद्रियें बाष्कळपणें मोकळीं सोडून अनर्गळ होऊं नये, कां कीं 'विषयीं वैराग्य उपजलें। तयासीच पूर्ण ज्ञान जालें.' हें पळभरही विसरूं नये. जागृतानें साधन सोडूं नये. 'साधन न मने जयाला। तो मुक्तपणें बद्ध झाला.' मी झालों असें वाटून साधनाचा कंटाळा आला कीं हा मुक्तपणाच्या बंधनांत पडलाच म्हणून समजावें. अशा 'अविरक्त विषयी' सिद्धापेक्षां अनुतापी मुमुक्षूच बरा! आतां ओघानेंच आलें म्हणून परमार्थाचा अधिकारी कोण व साधनमार्गाची महती काय हें स्पष्ट कळावें म्हणून बद्ध कोण, मुमुक्षु कोण, साधक कोण व सिद्ध कोण हें सविस्तर सांगतात.

**बद्ध, मुमुक्षु, साधक व सिद्ध :** ह्या सृष्टींत असंख्य मनुष्यप्राणी दाटले आहेत पण त्यांचे चार प्रकार सांगितले जातात. बद्ध, मुमुक्षु, साधक व सिद्ध. बद्ध कोणाला म्हणतात? बद्ध म्ह० ज्याला आंत दिसत नाहीं व बाहेरचें जगही यथार्थ दिसत नाहीं तो! अंतर्बाह्य आंधळा—'अंधारींचा अंध जैसा.' त्याला 'न दिसे नेणे कर्माकर्म। न दिसे नेणे धर्माधर्म। न दिसे सुगम। परमार्थमार्ग.' सच्छास्त्र, सत्संग, सन्मार्ग, सारासारविचार, स्वधर्माचार, परोपकार, भूतदया, भक्तिज्ञानवैराग्य, शुचिता, बंध व मोक्ष हें त्याला कांहीं कळत नाहीं व कळावें अशी वासनाही नाहीं! त्याला निजस्वार्थ कळत नाहीं, स्वहित उमजत नाहीं. 'जयास नाहीं आत्मज्ञान, हें मुख्य बद्धाचें लक्षण.' ज्ञानाचीं लक्षणें अंगीं नाहींत, कुलक्षणें मात्र भरपूर तो बद्ध! काम, क्रोध, मद, दंभ, खेद, कार्कश्य, मत्सर, अहंकार, वादप्रीति, ताठा, निंदा इ० बहु प्रकारचे दोष। या नांव बद्ध.' दुराशा, स्वार्थ, कलह, वाचाळपण, पाषांड, 'बहु विकल्पी बहु विषादी' या नांव बद्ध.

**परमार्थविषईं अज्ञान। प्रपंचाचें उदंड ज्ञान।**
**नेणें स्वयें समाधान। या नांव बद्ध ॥ ७-३६ ॥**

**हातीं द्रव्याची जपमाळ। कांताध्यान सर्वकाळ।**
**सत्संगाचा दुष्काळ। या नांव बद्ध ॥ ३९ ॥**
**काया वाचा आणि मन। चित्त वित्त जीवप्राण।**
**द्रव्यदारेचें करी भजन। या नांव बद्ध ॥ ४१ ॥**

संसारचिंता सर्वकाळ व तन्निमित्त नाना व्यवसाय व दुःखउद्वेग यांनीं चित्त भरलेलें—तो बद्ध. असाही बद्ध **मुमुक्षु**पणीं पालटूं शकतो.—

**जाला प्रपंचीं उदास। मनें घेतला विषयत्रास।**
**म्हणे आतां पुरे सोस। संसारींचा ॥ ८–४ ॥**

अशी पोटीं अवस्था लागली, बुद्धि पस्तावली, गतआयुष्य व्यर्थ गेलें असा अनुताप झाला. 'पूर्वीं नाना दोष केले। ते अवघेचि आठवले.' कृतकर्मांचें व सकळ पापांचें स्मरण होऊन 'आतां दुस्तर हा संसार। कैसा तरों?' असा जीव कासावीस झाला. मुमुक्षावस्थेंत पहिला काळ अनुतापांत जातो व अनुतापानें पूर्वपापांचे चित्तावरचे दुष्ट संस्कार धुऊन जाऊन चित्त शुद्ध होतें.

माझ्या हातून कांहींच सत्कर्म घडलें नाहीं, मी परोपकार केला नाहीं, देवाला स्मरलों नाहीं, व्यर्थ अनेक दोष आचरलों, लौकिक व दंभ यांसाठीं कष्टलों, अभिमानानें मत्त होऊन अनेकांस निंदिलें व छळलें, कांहीं पूजाश्रवणकीर्तन केलें असलेंच तर तें देवासाठीं नसून पोटासाठीं व लौकिकासाठीं केल्यामुळें व्यर्थ गेलें.—

**सत्य तेंचि उच्छेदिलें। मिथ्य तेंचि प्रतिपादिलें।**
**ऐसें नाना कर्म केलें। उदरंभराकारणें ॥ २२ ॥**
**ऐसा पोटीं पस्तावला। निरूपणें पालटला।**
**तोचि मुमुक्षु बोलिला। ग्रंथांतरीं ॥ २४ ॥**

संसारबंधापासून मुक्त होण्याची इच्छा झाली म्हणून मुमुक्षु. अनुताप हें मुमुक्षूचें मुख्य लक्षण: 'म्हणे मी अवगुणांची रासी। व्यर्थ आलों जन्मासी' इ० प्रकारें—

**आपणास निंदी सावकाश। पोटीं संसाराचा त्रास।**
**धरी सत्संगाचा हव्यास। या नांव मुमुक्षु ॥ ३७ ॥**

तीर्थयात्रादि नाना सायास केले, ग्रंथान्तरें शोधूनि पाहिलीं, तरी समाधान झालें नाहीं म्हणून 'म्हणे रिघों संतांस शरण । या नांव मुमुक्षु.' देहाभिमान, कुळाभिमान, द्रव्याभिमान इ० सर्व अभिमान सांडून 'संतचरणीं अनन्य' या नांव मुमुक्षु. तात्पर्य—

**स्वार्थ सांडून प्रपंचाचा। हव्यास धरिला परमार्थाचा।**
**अंकित होईन सज्जनाचा। म्हणे तो मुमुक्षु ॥ ४२ ॥**

आतां **साधक** कोण तें सांगतात. साधनमार्ग ज्यानें धरिला तो साधक.

**अवगुणांचा करूनि त्याग। जेणें धरिला सत्संग।**
**तयासी बोलिजे मग। साधक ऐसा ॥ ९–२ ॥**
**जो संतांसी शरण गेला। संतजनीं आश्वासिला।**
**मग तो साधक बोलिला। ग्रंथातन्रीं ॥ ३ ॥**
**उपदेशिलें आत्मज्ञान। तुटलें संसारबंधन।**
**दृढतेकारणें करी साधन। या नांव साधक ॥ ४ ॥**

या तीन ओव्यांत मुमुक्षु झाल्यापासूनचा क्रम सांगितला आहे. (१) अवगुणांचा (अनुतापपूर्वक) त्याग केला, (२) सत्संग धरिला, (३) संतश्रीगुरूला शरण गेला, (४) श्रीगुरूंनीं आश्वासिलें, (५) श्रीगुरूंनीं आत्मज्ञानाचा उपदेश केला, तेणेंकरून (६) संसारबंधन तुटलें; आणि याउपर (७) 'दृढतेकारणें करी साधन' तो साधक होय. ही एक प्रकारची सप्तपदीच होय !

गुरु ज्ञानोपदेश करितात, आत्मज्ञानाबरोबर संसारबंधन तुटून जातें व मग प्राप्त झालेलें ब्रह्मज्ञान मुरवण्याकरितां—त्याच्या दृढतेकरितां—याला अत्यंत निष्ठेने साधन करावें लागतें. श्रवण, मनन, निदिध्यास व साक्षात्कार किंवा नवविधाभक्ति हाच साधनमार्ग होय. साधक अद्वैतनिरूपणाची

गोडी धरितो व ‘ मननें अर्थान्तर काढी ’ म्ह० लक्ष्यांशाला झोंबतो व वाच्यार्थ सोडून देतो. सारासारविचाराने देहबुद्धीचा ‘संदेह छेदूनि दृढोत्तर आत्मज्ञान ’ पाहतो. शास्त्राचे सिद्धान्त, गुरूचा उपदेश व स्वतःची प्रतीति या तिहींची ऐक्यता अनुभवतो.

**विवेकबळें गुप्त जाला । आपेंआप मावळला ।**
**दिसतो, परि देखिला । नाहींच कोणी ! ॥ २५ ॥**
**उन्मनीच्या सेवटीं । आपली आपणा अखंड भेटी ।**
**अखंड अनुभवीं ज्याची दृष्टी । या नांव साधक ॥ २७ ॥**

स्वप्नभयानें भ्यालेला मनुष्य जागा झाला म्हणजे निर्भयता पावतो तसा माया सोडून साधक स्वरूपीं निर्भय होतो.

**अभ्यासाचा संग धरिला । साक्षेपासरिसा निघाला ।**
**प्रेत्न सांगाती भला । साधनपंथें ॥ ५५ ॥**

त्यागावांचून जर साधक होत नाहीं तर संसारिक साधक होऊं शकेल कीं नाहीं ?

**त्याग घडे अभावाचा । त्याग घडे संशयाचा ।**
**त्याग घडे अज्ञानाचा । शनैः शनैः ॥ १०–५ ॥**

जें अभावरूप आहे त्याचा त्याग करितां येतो. संशय हा सूर्यावर आलेल्या ढगासारखा आहे, त्याचा त्याग करितां येतो, कारण तो असत् आहे, पण सत्यसूर्याचा त्याग होत नाहीं. अज्ञानाचा त्याग होतो कारण अज्ञान ( माया ) अभावरूप आहे, पण ज्ञानाचा त्याग होत नाहीं. स्वस्वरूपाविषयीं संशय किंवा अज्ञान याचा त्याग ( तें अभावरूप असल्यामुळें ) होतो. राजहंस दूध व पाणी वेगळें करितो; किंवा भूस व धान्य एकवट असतांना पाखडलें तर फळकट भूस उडून जातें व घनवट धान्य खालीं राहतें, त्याप्रमाणें विवेकानें पाहिलें असतां असार प्रपंच ( असत्–अभावरूप ) निरसून जातो व आत्मा ( सत्–भावरूप ) तेवढा

राहतो. तात्पर्य, सारासारविचार जागता असला म्हणजे सूक्ष्म अंतस्त्याग निस्पृह व संसारिक या उभयतांसही घडतो व तोच मुख्य घडला पाहिजे. बाह्य पदार्थ मिथ्या असल्यामुळें ते धरणें व सोडणें हा मुद्दा गौण आहे.

साधक निःसंदेह झाला कीं तोच **सिद्ध !** संशयाचें ज्ञान भजन व वैराग्य, संशयाचा देव, संशयाचा भाव, संशयाची व्युत्पत्ति, संशयाचा मोक्ष, संशयाचें सर्व कांहीं निरर्थक आहे ! सिद्ध निःसंदेह असतो व त्यापाशींच निश्चयाचें समाधान असतें. आत्मनिश्चयानें समाधान प्राप्त होतें.

आतां **सिद्धाचीं लक्षणें** कांहीं सांगावीं तर सिद्ध देहातीत व लक्षणें देहसंबंधानें दिसणारीं ! तीं काय सांगावींत ?

**लक्षणें म्हणजे केवळ गुण । वस्तु ठाईंची निर्गुण ।**
**तचि सिद्धांचें लक्षण । वस्तुरूप ॥ ४४ ॥**

तथापि सिद्धलक्षणें कोणास पाहिजे असतील तर तीं ज्ञानदशकांत ( आठव्या दशकाच्या नवव्या समासांत ) सांगितलीं जातील.

तींही सिद्धलक्षणें येथेंच पाहून हा विषय पुरा करूं. सिद्ध, संत किंवा साधु 'अंतरीं गेलिया अमृत । बाह्य काय लखलखीत' असे आंत बाहेर दिव्य असतात. 'सिद्ध म्हणजे स्वरूप.' सिद्ध स्वरूपाहून मुळींच वेगळे नसतात. तत्त्वतः सिद्ध एक परमात्मवस्तु आहे, पण स्वरूपाकार झालेल्या संतांनाही सिद्ध म्हणतात.

**सदा स्वरूपानुसंधान । हें मुख्य साधूचें लक्षण ।**
**जनीं असोन् आपण । जनावेगळा ॥ ८-९७ ॥**

सिद्ध संदेहरहित असतात. 'बाह्य साधकाचेपरी । आणि स्वरूपाकार अंतरीं' असे ते वागतात. सिद्ध निचेष्ट होऊन पडतात असें नाहीं. त्यांची संसारचिंता सुटते पण ते लोकांच्या उपकारार्थ निरूपणादि करितात. अंतर्यामीं निश्चळ असून ते चंचळांत कार्य करितात. 'बाह्य भलतैसें

असावें। परी अंतर स्वरूपीं लागावें' हें सिद्धांचें लक्षण. गादीवर बसल्यावर राजलक्षणे सहज राजाच्या अंगीं जडतात; तसा सिद्धाच्या अंगीं 'स्वरूपीं लागतां जिव्हाळा। लक्षणें बाणती.' निर्गुणीं वृत्ति ठेवूनही सिद्ध साधनाभ्यास सोडीत नाहींत. सिद्धाच्या अंगचीं लक्षणें साधकाने अभ्यासावींत. सिद्धाला स्वरूपानंदामुळें दुसऱ्या कामना ठाऊक नसतात म्हणून त्याला काम नसतो. मनुष्याला हातची वस्तु गेली तर क्रोध येतो. पण आपला अक्षय्य ठेवा कोण नेणार म्हणून तो क्रोधरहित असतो. 'आपला आपण स्वानंद। कोणावरी करावा मद?' म्हणून तो गर्व, तिरस्कार, असूया इ० सर्व विकारांपासून मुक्त असतो. ज्याणे दृश्य उडविले त्या विवेकी पुरुषाला प्रपंच किंवा पांचभौतिक काय मोह पाडतील? तो सत्यस्वरूपानें अमरपद भोगतो म्हणून त्याला शोकमोह हे कोठून असणार? त्याचा स्वार्थ सर्वथा नष्ट झाल्यामुळें नैराश्य (आशाराहित्य) त्यापाशीं सहज असते. चिंता, मानापमान, इ० त्याजवळ कोठले? 'स्वरूपीं न साहे मळ। साधु स्वरूपच केवळ। म्हणून साधु तो निर्मळ' हें सहज आहे. 'सकळ धर्मामध्यें धर्म। स्वरूपीं राहणें हा स्वधर्म' हेंच मुख्य साधुलक्षण आहे. अशा साधूच्या संगतीं राहून त्याच्या मुखानें निरूपण ऐकावें म्हणजे साधकही सिद्धपद पावतो. साधु होऊन साधूला ओळखावें.

**योगी वोळखावा योगेश्वरें। ज्ञानी वोळखावा ज्ञानेश्वरें।**
**महाचतुर तो चतुरें। वोळखावा॥ ९-३१॥**

पिशाचानें झपाटलेलाही देहधारी व पंचाक्षरीही देहधारी, म्हणून दोघांची बरोबरी होणार नाहीं, तशी अज्ञान, पतित व ज्ञानी जीवन्मुक्त यांचें साम्य होणार नाहीं. जो ज्ञानें गुप्त झाला, विवेकें स्वरूपीं विराला, अनन्य झाल्यामुळें वेगळा उरलाच नाहीं, त्या साधुपुरुषाला कोठें कोण धुंडणार? 'शोधूं जातां तोचि व्हावें.' तो तत्त्वांत सांपडला नाहीं, देहांत नाहीं, ब्रह्मीं समरस झालेला असतो म्हणून वेगळेपणानें निवडतां यायचा नाहीं.

त्याचें अंतर शोधूं जाल तर तो निरंतर आहे. तात्पर्य, आपण ज्ञानस्वरूप व्हावें तेव्हांच ज्ञानस्वरूप साधूची ओळख पटते !

## ६ सहावा दशकः देवाचा शोध

**१ देवशोधन :** एखाद्या ग्रामांत किंवा देशांत राहणें झाल्यास तेथल्या प्रभूची भेट घेऊन त्याचें सख्य जोडावें म्हणजे सर्व ठीक होतें, नाहीं तर ‘ आपुलें महत्त्व जातां। वेळ नाहीं !’ ग्रामीं थोर ग्रामाधिपति, त्याहून थोर देशाधिपति, त्याहून थोर नृपति. राष्ट्राचा प्रभु तो राजा, बहुराष्ट्र तो महाराजा, महाराजांचाही राजा चक्रवर्ती. ‘ ऐसिया समस्तां। येक ब्रह्मा निर्माणकर्ता ’ पण त्यालाही कोणी निर्माता आहेच. ‘ ब्रह्मा विष्णु आणि हर। त्यांसी निर्मिता तोचि थोर। तो वोळखावा परमेश्वर। नाना यत्नेंकरूनी.’ प्रभूस न ओळखलें तर त्याचे नगरीं त्याचे अधिकारी वेठीस धरितात व तेथें न करितां चोरी अंगीं लागते ! हा सामान्य व्यवहाराचाच नियम विश्वप्रपंचासही लागू पडतो. म्हणून—

**जेणें संसारीं घातलें। अवघें ब्रह्मांड निर्माण केलें।**
**त्यासी नाहीं वोळखिलें। तेचि पतित ॥ १४ ॥**
**म्हणोनी देव वोळखावा। जन्म सार्थकचि करावा।**
**न कळे तरी सत्संग धरावा। म्हणिजे कळे ॥ १५ ॥**
**जो जाणेल भगवंत। तया नांव बोलिजे संत।**
**जो शाश्वत आणि अशाश्वत। निवाडा करी ॥ १६ ॥**

परमेश्वरास ओळखणें हेंच जन्मसाफल्याचें लक्षण. सत्संगांत देवाची ओळखण होते. संत तरी कोणास म्हणावें ? जो शाश्वत आणि अशाश्वत यांचा निवाडा करून असत् टाकून सत् म्ह० शाश्वत परब्रह्मास ओळखतो तोच संत. देव जाणतो तोच संत. ज्याचा शाश्वत परमात्म्याच्या ठायीं अचळ, अढळ व अनन्यभाव आहे तो संत. पोट भरायच्या नाना विद्या आहेत पण त्या सद्विद्या नव्हत; सर्वव्यापक परब्रह्माची तत्काळ

ओळख करून देते अशी सद्विद्या किंवा ब्रह्मविद्या ज्यापाशीं आहे तो संत. अशा संतांच्या संगतींतच देव जोडतो. 'ज्ञात्यावांचून नाहीं ज्ञान प्राप्त.' अज्ञान्यापाशीं ज्ञान कोठचें? करंट्याची संगत केल्यानें भाग्योदय थोडाच होणार आहे? रोग्यापाशीं आरोग्य, उन्मत्तापाशीं विवेक, भिकाऱ्यापाशीं भिक्षा मिळायची नाहीं तशी बद्धापाशीं मुक्तता मागून मिळायची नाहीं!

**याकारणें ज्ञाता पाहावा। त्याचा अनुग्रह घ्यावा।**
**सारासारविचारें जीवा। मोक्ष प्राप्त॥ १-३१॥**

**२ ब्रह्मपावन :** ब्रह्मज्ञानाविण उपदेश कामाचा नाहीं. 'नाना मतांचें पेरवणें। कामा नये सर्वथा.' काबाड किंवा पेंढा बडविणें, ताक घुसळणें, धुवण पिणें, साली काढणें, चोइट्या चोखणें, खोबरें नसलेली नरोटी घेणें—त्याप्रमाणें ब्रह्मज्ञानावांचून इतर ग्रंथोपदेश निरर्थक होय! असार सांडून सार म्ह० निर्गुण ब्रह्म ध्यावें; सृष्टि पंचभौतिक आहे व या पंचभूतांत 'निर्गुण देव' नाहीं, तो त्याहून वेगळा आहे. 'भूत म्हणतां मनुष्यातें। विषाद वाटे'—मग देवाला भूताची उपमा कशी देतां येईल? 'पंचभूतांसी आहे नाश। आत्मा अविनाशरूपी.' पंचभूतें व त्रिगुण मिळून अष्टधा प्रकृति. प्रकृतीला दृश्य म्हणतात व दृश्य नाशवंत आहे असें श्रुतीनें सांगितलें आहे, म्हणून निर्गुणब्रह्म दृश्यातीत आहे. तें शस्त्रानें तुटत नाहीं, अग्नि त्याला जाळीत नाहीं, पाणी त्याला बुडवीत नाहीं, पंचभूतें त्याचें कांहीं वांकडें करूं शकत नाहींत.

त्याला वर्ण नाहीं, नांव नाहीं, रूप नाहीं, 'परंतु असतचि असे। सर्वकाळ.' तें चर्मचक्षूला दिसलें नाहीं म्हणून काय झालें? परंतु 'तें सूक्ष्मचि कोंदाटलें। जेथें तेथें.' जें दिसेल तेवढेंच पहावें व तेंच खरें मानावें अशी मनुष्याला संवयच झाली आहे, पण दिसतें तें नाशवंत व असार आहे. आणि ब्रह्म सार असून अप्रगट, गुप्त आहे! पण 'गुरुमुखें हा विचार उमजों लागे!'

**जें उमजेना तें उमजावें। जें दिसेना तें पाहावें।**
**जें कळेना तें जाणावें। विवेकबळें॥ २२॥**
**गुप्त तेंचि प्रगटवावें। असाध्य तेंचि साधावें।**
**कानडेंचि अभ्यासावें। सावकाश॥ २३॥**

वेद, विरिंचि व शेष जेथें थकले तें 'अध्यात्मश्रवणें पावावें। परब्रह्म तें' तोच खरा देव आहे. सामान्य लोकांकडे पाहिलें तर 'जितुके गांव तितुके देव। जनांकारणें.' याप्रमाणें देवाचा निश्चय तर झाला. आतां 'आपणचि आपला। शोध घ्यावा.'

माझें शरीर, माझें मन असें आपण म्हणतों याचा अर्थ 'मी' देह व मन यांहून वेगळा आहें असा उघड होतो.

**पाहतां देहाचा विचार। अवघा तत्त्वांचा विस्तार।**
**तत्त्वें तत्त्व झाडितां सार। आत्माचि उरे॥ ३०॥**
**आपणासी ठावचि नाहीं। येथें पाहणें न लगे कांहीं।**
**तत्त्वें ठाईंचां ठाईं। विभागून गेलीं॥ ३१॥**
**बांधिली आहे तों गांठोडी। जो कोणी विचारें सोडी।**
**विचार पाहतां ही गांठोडी। आढळेना॥ ३२॥**
**तत्त्वांचें गांठोडें शरीर। याचा पाहतां विचार।**
**एक आत्मा निरंतर। आपण नाहीं॥ ३३॥**

देह तत्त्वांचें गांठोडे आहे व पिंडांतलीं तत्त्वें ब्रह्मांडाच्या तत्त्वाशीं मिळविलीं तर सकळ तत्त्वांहून भिन्न असा एक आत्माच उरतो; 'मी' अगर 'आपण' कोठें उरतच नाहीं. आत्मा एक निरंतर आहे, आपण नाहीं. 'आपण' नाहीं तेव्हां जन्ममृत्यु, पापपुण्य, बंध-मोक्ष, यमयातना इ० भानगड सगळीच संपली. देहबुद्धीने बांधलेला विवेकानें मोकळा झाला, कीं आत्म्याहून मी वेगळा नाहीं हा बोध होतो. हाच मोक्ष, हीच सायुज्यता मुक्ति. 'निर्गुण आत्मा व आपण येक' हा विचार नित्य जागृत

ठेवावा. ' जागे होतां स्वप्न सरे । विवेक पाहतां दृश्य वोसरे । स्वस्वरूपानुसंधानें तरे । प्राणिमात्र.'

**आपणास निवेदावें । आपण विवेकें नुरावें ।**
**आत्मनिवेदन जाणावें । याचें नांव ॥ ३९ ॥**
**आधीं अध्यात्मश्रवण । मग सद्गुरुपादसेवन ।**
**पुढें आत्मनिवेदन । सद्गुरुप्रसादें ॥ ४० ॥**

ब्रह्मबोधानें ब्रह्म होऊन देह हा प्रारब्धावर टाकावा. याचें नांव आत्मज्ञान. ' परब्रह्मीं अभिन्न । भक्तचि जाला.' मुख्य देवास वोळखिलें, देवाभक्तां ऐक्य जाहलें—

**आतां होणार तें होयेना कां । आणि जाणार तें जायेना कां ।**
**तुटली मनांतील आशंका । जन्ममृत्यूची ॥ ४४ ॥**

**३ मायोद्भव :** ब्रह्म घनदाट निर्मळ निश्चळ, सदोदित, गगनाहूनि वाड आणि सूक्ष्म आहे. ' जें दिसेना ना भासेना । जें उपजेना ना नासेना । जें येईना ना जाईना । परब्रह्म तें ॥ जें चळेना ना ढळेना । जें तुटेना ना फुटेना । जें रचेना ना खचेना । परब्रह्म तें ॥' हें अविनाश ब्रह्म निर्गुण आहे व नाशवंत माया सगुण आहे, पण ' सगुण आणि निर्गुण कालवलें ' म्हणून हा ब्रह्मांडाचा डोलारा उभा राहिला आहे ! उसांत रस तसा जगांत जगदीश. आत्म्यासारखी दुसरी वस्तूच नाहीं म्हणून त्याची दृष्टान्तानें समजूत पाडतां येत नाहीं. ' ऐसी आत्मस्थिति संचली । तेथें माया कैसी झाली ?' निर्गुण ब्रह्माच्या ठिकाणीं सगुणसाकार माया कशी झाली ? याला उत्तर—

आकाशांत वायूची पहिली झुळूक जशी वाहिली तशी ! आकाशापासून वायु, वायूपासून अग्नि, अग्नीपासून पाणी, पाण्यापासून पृथ्वी, पृथ्वीपासून असंख्य जीव झाले. ' परंतु ब्रह्म आदिअंतीं । व्यापूनि असे.' जें उपजतें

तें जातें, पण 'ब्रह्म संचलें जैसें तैसें.' अविनाश ब्रम्ह तेवढेंच ज्ञाते पुरुष नित्य पाहतात व तत्त्वांचें गांठोडें शरीर याचा मीपणा घेत नाहींत.

**तत्त्वझाडा निःशेष होतां। तेथें निमाली देहअहंता।**
**निर्गुण ब्रह्मीं ऐक्यता। विवेकें जाली॥ २१॥**

तत्त्वें तत्त्व वोसरलें, आपली वार्ता मायिक आहे हें कळलें. 'आपणा-विणें निर्गुण ब्रह्म। हेंचि निवेदनाचें वर्म' ध्यानीं येतां 'मी तूं' संपलें. विवेकाने मायिकाचा संहार झाला.

**तत्त्वांमध्यें मीपण गेलें। तरी निर्गुण सहजचि उरलें।**
**सोहंभावें प्रत्यया आलें। आत्मनिवेदन॥ ३१॥**
**आत्मनिवेदन होतां। देवभक्तांसी ऐक्यता।**
**साचार भक्त विभक्तता। सांडूनि जाला॥ ३१॥**
**तत्त्वीं गुंतला म्हणे कोहं। विवेक पाहतां म्हणे सोहं।**
**अनन्य होतां अहं सोहं। मावळलीं॥ ३५॥**

कोणी म्हणेल कीं पुनःपुन्हा तेंच तें काय सांगतां? याला उत्तर 'संदेहवृत्ति ते न भंगे। म्हणोनि बोलिलेंचि बोलावें लागे'—पुनरुक्तीची क्षमा करा महाराज!

**४ ब्रह्मनिरूपणः** चार युगांचीं लाखों वर्षें झालीं तरी 'अखंड खंडेना स्थिति परब्रह्माची!' जगांत अनेक देवांच्या उपासना आहेत व जो तो आपल्या उपास्यदेवतेलाच श्रेष्ठ म्हणत असतो, पण 'चित्रीं लिहिली सेना। त्यांत कोण थोर कोण साना?'—लहानथोर कोण ह्या विचाराचें वर्म जाणते जाणतात. 'जो जन्मास येऊन गेला। तो मी थोर म्हणतचि मेला!' ज्यांना आत्मज्ञान झालें ते परमेश्वरावांचून थोर कोणीच नाहीं असें म्हणतात. ब्रह्मप्रळयांत सगळ्यांचें निदान होईल, तथापि—

**ब्रह्म प्रळयावेगळें। ब्रह्म नामरूपानिराळें।**
**ब्रह्म कोणी येका काळें। जैसें तैसें॥ २१॥**

**करिती ब्रह्मनिरूपण । जाणती ब्रह्म संपूर्ण ।**
**तेचि जाणावे ब्राह्मण । ब्रह्मविद् ॥ २४ ॥**

**५ मायाब्रह्मनिरूपण :** ब्रह्म निर्गुण निराकार, माया सगुण साकार. ब्रह्म निश्चळ, माया चंचळ. ब्रह्म सम, माया विषम. ब्रह्म असतचि असे, माया निरसतांच निरसे. ब्रह्म अनिर्वाच्य, माया म्हणाल तशी. ब्रह्म निरुपाधिक, माया म्हणजे प्रत्यक्ष उपाधि–संतांस शरण गेल्यानें माया काय व ब्रह्म काय हें यथार्थ समजतें.

**६ सृष्टिकथन ( सृष्टि सत्य कीं मिथ्या ? ) :** हा समास प्रश्नोत्तर-रूप आहे.

**प्रश्न :** सृष्टि प्रत्यक्ष दिसत आहे ही सत्य कीं मिथ्या ?

**उत्तर :** ‘ जीवभूतः सनातनः ’ ह्या गीतावचनाप्रमाणें सृष्टीला सत्यपण येतें, पण ‘ यद्दृष्टं तन्नष्टं ’ ह्या श्रुतिवचनाप्रमाणें तिला मिथ्यात्व येतें. दोन्ही वचने प्रमाणच, म्हणून सृष्टि सत्य कीं मिथ्या ( माया सत् कीं असत् ) याचा निवाडा करितां येत नाहीं. ती सदसद्विलक्षण मानली पाहिजे. सत्य म्हणावी तर नासते, मिथ्या म्हणावी तर दिसते. यावर एक उपाय आहे व तो ज्ञात्यांचें मत प्रमाण मानावें हा होय. अज्ञानी जो आहे त्याचें मत सृष्टि सत्य आहे व देवधर्म तीर्थव्रत सर्व कांहीं सत्यच आहे. सृष्टि सत्य आहे म्हणून त्यांचे व्यवहार चालतात. ज्ञानी म्हणतो, सृष्टिप्रळयाच्या वेळीं देवच राहणार नाहींत तेथें त्या देवप्रतिमांच्या पूजा वगैरे कोठें राहतील ? तस्मात् सृष्टि मिथ्या हेंच खरें. ज्ञानी संतांचें वचन प्रमाण मानावें हेंच योग्य.

**प्रश्न :** सृष्टि मिथ्या म्हटल्यावर तीर्थाटन व गुरुसेवाही मिथ्याच कीं ! मग गुरूच्या वचनाचें तरी सत्यत्व कां मानावें ?

**उत्तर :** तुझ्या कल्पनेनें गुरु ह्या नुस्ता हाडामासाचा देह, पण गुरुस्वरूप 'ब्रह्मानंदं परमसुखदं' ह्या गुरुगीतेच्या श्लोकांत वर्णिल्याप्रमाणें द्वंद्वातीत, एक, निश्चल, तत्त्वमस्यादिलक्ष्यं असें शाश्वत आहे. ह्या गुरुस्वरूपाचें तूं ध्यान करशील तर तुला सृष्टिमिथ्याभानच उरणार नाहीं व तूं तरून जाशील. गुरु सांगतात, सृष्टि मिथ्या म्हणून ती मिथ्या मान.

**प्रश्न :** 'जीवभूतः सनातनः' ह्या वचनाधारें जर सृष्टि सत्य ठरते तर भगवंताचें वचन तरी अप्रमाण कां मानायचें ?

**उत्तर :** भगवंताच्या वचनाचें मर्म तुला समजलें नाहीं. देवांनीं 'अश्वत्थः सर्ववृक्षाणां' म्हणजे मी सर्व वृक्षांत अश्वत्थ आहें असें म्हटलें आहे, आणि 'नैनं छिन्दन्ति शस्त्राणि' हेंही देवाचेच वचन आहे. ह्या वचनाधारें तूं अश्वत्थावर कुऱ्हाड चालविलीस तर अश्वत्थ तुटल्याशिवाय राहील काय ? दुसरें उदाहरण 'इंद्रियाणां मनश्चास्मि' असें देव म्हणतात आणि मनाचा निग्रह करावयालाही ते सांगतात, हें विरुद्धपण नाहीं काय ? असलीं विरुद्ध भासणारीं वचनें अनेक आहेत. "वेदशास्त्रश्रुतिस्मृति। तेथें वाक्यभेद पडती। ते सर्वहि निवडती। सद्गुरुवचनें॥ वेदशास्त्रांचें भांडण। शस्त्रें तोडी ऐसा कोण ?। हें निवडेना साधुविण। कदा कल्पान्तीं.' विरुद्ध वचनांचा समन्वय स्वानुभवी संतांवाचून कोणाला करितां येणार ? वाद अनंत आहेत व वादांत पूर्वपक्ष व सिद्धान्त हे आहेतच. वाद शब्दानें कधीं तुटत नाहींत. वाद सोडून संवाद करावा, 'तेणें होय ब्रह्मानंद। स्वानुभवें.' सृष्टि एकच काय पण एका कल्पनेच्या पोटांत अनंत सृष्टि होतात आणि जातात. त्या सर्व काय सत्य मानायच्या आहेत ? म्हणून सृष्टि मिथ्या आहे व ब्रह्म सत्य आहे हाच सिद्धान्त.

कल्पनेनें देव उभा केला, तेथें दृढभाव ठेवला, त्या देवाला कांहीं अपाय (भंग इ०) झाला कीं देव आजारी झाला—देव मेला म्हणून

भक्त लागतो रडायला ! घडलेले देव मोडले तर त्यांत काय नवल आहे ? सोनार, पाथरवट इ० देव घडविणारे !

> **धातु पाषाण मृत्तिका । चित्रलेप काष्ठ देखा ।**
> **तेथें देव कैंचा मूर्खा । भ्रांति पडली ! ॥ ४४ ॥**

देव घडण्यामोडण्यापलीकडचा आहे. कल्पनेचे देव खोटे; खरा देव निर्विकल्प आहे.

> **सृष्टिपूर्वी सृष्टि चालतां । सृष्टि अवघी संहारितां ।**
> **शाश्वत देव तत्त्वता । आदिअंतीं ॥ ४८ ॥**

**प्रश्न :** एका कल्पनेच्या पोटांत अनेक सृष्टि होतात असें म्हणालांत त्या कोणत्या ?

**उत्तर :** एक कल्पनेची सृष्टि, दुजी शाब्दिक सृष्टि, तिसरी प्रत्यक्ष सृष्टि, चौथी चित्रलेपसृष्टि, पांचवी स्वप्नसृष्टि, सहावी गंधर्वसृष्टि, सातवी ज्वरसृष्टि, आठवी दृष्टिबंधनसृष्टि, अशा ह्या अष्ट सृष्टि आहेत. ह्यांतली कोणती श्रेष्ठ व सत्य मानावी ?

> **म्हणोनी सृष्टि नाशवंत । जाणती संतमहंत ।**
> **सगुणीं भजावें निश्चित । निश्चयाकारणें ॥ ५४ ॥**
> **सगुणाचेनि आधारें । निर्गुण पाविजे निर्धारें ।**
> **सारासारविचारें । सत्संगें ॥ ५५ ॥**

सृष्टि मिथ्या आहे व निर्गुण ब्रह्म सत्य आहे हा निश्चय होण्यासाठीं सगुणोपासना अवश्य म्हणून सांगितली आहे. सत्संगांत हें सर्व चांगलें समजतें म्हणून सत्संग करावा.

**७ सगुणभजन :** ह्यांतील विषय पूर्वी प्रसंगानें ( पृ० १५१।२ ) सांगितला आहे म्हणून येथें त्याची पुनरुक्ति करीत नाहीं. सगुणोपासना अवश्य व उपकारक कशी हें येथें फार चांगलें सांगितले आहे. ‘ रघुनाथभजनें ज्ञान झालें ’ हें समर्थांनीं येथें स्वानुभवपूर्वक सांगितले आहे. तात्पर्य —

**कर्ता राम मी नव्हें आपण । ऐसें सगुणनिवेदन ।**
**निर्गुणीं तें अनन्य । निर्गुणचि होइजे ॥ ३४ ॥**
**मी कर्ता ऐसें म्हणसी । तेणें तूं कष्टी होसी ।**
**राम कर्ता म्हणतां पावसी । यशकीर्तिप्रताप ॥ ३६ ॥**

म्हणून 'कर्ता राम हें असावें । अभ्यंतरीं.'

**ज्ञानबळें उपासना । आह्मी भक्त जरी मानूं ना ।**
**तरी या दोषाच्या पतना । पावों अभक्तपणें ॥ ४० ॥**
**देहास लागली उपासना । आपण विवेकें उरेना ।**
**ऐसी स्थिति सज्जना-। अंतरींची ॥ ४२ ॥**

ह्या ओव्या सद्भक्ताची खूण पटवणाऱ्या व म्हणून अत्यंत महत्त्वाच्या आहेत. सगुणोपासनेच्या योगानें ब्रह्मज्ञान झाल्यावरही उपासना सुटत नाहीं, म्हणून भक्तांच्या ठायीं उपासना व ज्ञान दोन्ही एकरूपतेनें आढळतात. हाच अनुभव अगदीं अशाच शब्दांनीं ज्ञानेश्वर सांगतात —

**तैसा शरीरीं हन कर्मैं । तो भक्त ऐसा गमे ।**
**परी अंतरप्रतीतिधर्मैं । मीचि जाहला ॥**

तुकोबारायही 'आधीं होता संतसंग । तुका जाला पांडुरंग ।। त्याचें भजन राहीना । मूळस्वभाव जाईना' अशीच आपली स्थिति वर्णितात. ज्ञानोत्तर भक्तीचें वर्म तिघांनींही एकच सांगितलें आहे.

### ८ दृश्यनिरसन ( दृश्य मिथ्या तरी दिसतें कां ? ):

**प्रश्नः** ज्ञात्यांच्या मतें दृश्य स्वप्नवत् मिथ्या आहे, तर मग हें दिसतें कां ?

**उत्तरः** 'देखिलें तें सत्यचि मानावें। हें ज्ञात्याचें देखणें नव्हे !' अज्ञानाला सृष्टि दिसते म्हणून काय वेदशास्त्र व संतमहंत यांच्या सिद्धान्ताला खोटें मानावें ? जगांत पुष्कळ गोष्टी दिसतात पण त्या खऱ्या नसतात. मृगजळ काय खरें ? तें खरें म्हणून मृग त्याच्यामागें धांवतें व उरीं फुटून मरतें ! स्वप्नांत पुष्कळ द्रव्य सांपडलें व ते व्यवहारांत पेरलें म्हणून काय

जागृतींत तें वसूल होणार आहे? कुशल चितारी हुबेहुब सुंदर स्त्रीचें चित्र काढतो म्हणून एखादा कामुक त्या स्त्रीला आलिंगन देऊं लागला तर त्याच्या अंगाला मात्र लागेल व त्याचें प्रेम अनाठायीं होईल! काष्ठ-पाषाणांच्या सुंदर पुतळ्या डोळ्यांला मनोहर दिसल्या किंवा गोपुरावरील स्त्रीचित्रें पाहून एखादा रसिक कामविव्हल झाला तरी त्यांचें तें 'वक्रांगें वक्रदृष्टी पाहती। लाघव देखतां भरे वृत्ति' हें सर्व मिथ्या नव्हे काय? नाटकांत व दशावतारी खेळांत नारी 'नेत्र मोडिती कळाकुसरी' पण पाहावें तों सारे धटिंगण! सृष्टिकर्ता मोठा बहुरूपी आहे, तो जीं दृश्यें दाखवितो तीं सत्य नसून अविद्याकृत आहेत. 'दृष्टी तरळतां भासलें तें सत्य कैसें मानावें?' आकाश वर पाहिलें तर पालथें व पाण्यांत पाहिलें तर उताणें! पाण्यांत चांदण्यांचा प्रकाश दिसतो तो काय सत्य आहे? शेंकडों ठिकाणीं मोठ्या माणसांचे पुतळे उभारले जातात तर तेथें काय तीं माणसें प्रत्यक्ष आहेत? नेत्रांत बाहुली नसून पहाव्या त्या वस्तूंचीं प्रतिबिंबें तींत दिसतात, पण तो सारा भासच कीं! आरसेमहालांत एकाच मुखाचीं अनेक मुखें दिसतात, एका सभेच्या दोन किंवा अनेक सभा दिसतात, शस्त्र परजलें कीं दोन शस्त्रें दिसतात, वाद्यतंतु टणत्कारला कीं दोन तंतु दिसतात, गाभाऱ्यांतून एका ध्वनीचे अनेक प्रतिध्वनि निघतात—

**ऐसें हें बहुविध असे। साचासारिखें दिसे।**
**परि हें सत्य म्हणोनि कैसें। विश्वासावें?॥ २३॥**

मनुष्यांची बाजीगिरी म्ह० गारुडविद्या, राक्षसांची वोडंबरी व भगवंताची माया ह्या सारख्याच लाघवी म्ह० फसव्या आहेत! रामकृष्णांच्या अवतारांत राक्षसांची कपटविद्या किती प्रकारांनीं प्रगट झाली आहे! माया ही साचासारखी दिसे, पण विचारितां साच नसे! साच म्हणावी तरी दिसेना, मिथ्या म्हणावी तरी दिसे, म्हणून तिच्या स्वरूपाचा निश्चय कोणालाही करितां येत नाहीं. दिसे हें स्वप्नाकार आहे असें जाणून

ज्ञाते परब्रह्माचा निश्चय करितात, व ह्या बहुविध बहुरंगी मायेचा नाद सोडून ते देवाला भजतात!

**प्रश्न:** हें सारें खरें असेल पण हा भास तरी मला सत्य कां वाटतो?

**उत्तर:** याला उत्तर थोडें आहे. तुझा देह अविद्यात्मक आहे म्हणून तुला सारें अविद्याकार्य खरें वाटतें!

**दृश्यभास अविद्यात्मक। तुझाही देहो तदात्मक।**
**म्हणून हा अविवेक। तेथें संचरला!॥ ३८॥**
**दृष्टीनें दृश्य देखिलें। मन भासावरी बैसलें।**
**तरी तें लिंगदेह जालें। अविद्यात्मक॥ ३९॥**
**देहबुद्धि केली बळकट। आणि ब्रह्म पाहों गेला धीट।**
**तों दृश्यानें रुधिली वाट। परब्रह्माची॥ ४३॥**

देहबुद्धि दृढ करून ब्रह्म पाहूं गेलास तों मध्यें दृश्याची धोंड आडवी आली! देहबुद्धि व मीपण आहे तोंवर ब्रह्मप्राप्ति होणार नाहीं. हाडा-मासाच्या सांपळ्यांत राहून चर्मचक्षूनें ब्रह्म पाहायला जाणें हें (ज्ञात्याचे नव्हे) मूर्खाचें म्ह० आंधळ्याचें लक्षण आहे. तात्पर्य—

**दृष्टीस दिसे मनास भासे। तितुकें काळांतरीं नासे।**
**म्हणोनि दृश्यातीत असे। परब्रह्म तें॥ ४७॥**

**९ सारशोधन:** ह्या सृष्टींत ज्ञानी आणि अज्ञानी, सभाग्य आणि करंटे, उत्तम आणि हीन असे दोन प्रकारचे जीव आहेत. (दुसरा दशक पहा). श्रीमंताच्या तळघरांत असंख्य व अमूल्य जडजवाहीर गुप्त असतें पण त्याचें दर्शनही सेवकाला घडत नाहीं. सरोवरांत उदंड द्रव्य ठेवून वर मोटांचें पाणी सोडलें तर लोकांना सरोवराचें पाणी दिसेल पण सभाग्याला तळचें द्रव्य दिसेल—

**तैसे ज्ञाते समर्थ। तेहीं वोळखिला परमार्थ।**
**इतर ते करिती स्वार्थ। दृश्य पदार्थांचा॥ ५॥**

'काबाडी वाहती काबाड आणि श्रेष्ठ भोगिती रत्नें जाड.' विचारवंत सुखासनीं आरूढ होतात आणि करंट्यांच्या कपाळीं कष्ट. जगांत सारग्राही भाग्यवंत विरळ. सार वस्तु गुप्त व दुर्लभ असतात व असार वस्तु उघड व विपुल असतात. परीस व चिंतामणि गुप्त असतात, खडे व कांचमणि जेथे तेथें! सोन्यारत्नांच्या खाणी महाप्रयासानें शोधाव्या लागतात, पाषाणमाती लागेल तेथें! उत्तम वनस्पति गुप्त पण एरंडधोत्रें सुकाळाचीं! कल्पतरु, कामधेनु व चंदन दुर्मिळ पण बोरीबाभळी सर्वत्र; तसे सारविचारी थोडे आहेत—

**तैसा ज्ञानी योगेश्वर। गुप्तार्थलाभाचा ईश्वर।**
**इतर ते पोटाचे किंकर। नाना मतें धुंडिती॥ १६॥**
**दिसेना जें गुप्त धन। तयास करणें लागे अंजन।**
**गुप्त परमात्मा सज्जन-। संगतीं शोधावा॥ १७॥**

रायाचे संगतींत सहजच धनलाभ होतो त्याप्रमाणे संतसंगतींत गुप्त परमात्मा प्रकट होतो. गुरुकृपेचें अंजन डोळ्यांत पडल्याशिवाय गुप्त धन दिसत नाहीं. परमात्मा दृश्यावेगळा असूनही दृश्याअंतरीं आहे, तो सचराचरीं भरला आहे, तो जवळी अंतरीं आहे, पण तो भेटण्यास संतांचा संग अवश्य आहे. संसारी व निस्पृही यांना तो सारखाच लभ्य आहे. त्यासाठीं संसार सोडणें नको.

**संसारत्याग न करितां। प्रपंच-उपाधि न सोडितां।**
**जनांमध्यें सार्थकता। विचारेंचि होय॥ २४॥**

सारासारविचाराला देव सुलभ आहे. 'पुढें जन्मांतरीं होणार' असें येथें नाहीं. परमात्मा उधारीचा नाहीं, ब्रह्मसाक्षात्कार रोकडा आहे. येथें अनुमानाचें काम नाहीं.

**सप्रचीत आणि अनुमान। उधार आणि रोकडें धन।**
**मानसपूजा प्रत्यक्षदर्शन। यांसी महदंतर॥ २६॥**

**येचि जन्मीं येचि काळें। संसारीं होइजे निराळें।**
**मोक्ष पाविजे निश्चळें। स्वरूपाकारें ॥ २९ ॥**

हें मी उपासनेची आण घेऊन निश्चयानें सांगतों. विवेकानें मुक्त व्हावयाचें आहे. 'देहींच विदेह होणें। करून कांहींच न करणें,' हें जीवन्मुक्ताचें लक्षण येथेंच अनुभवायला मिळणार आहे. तात्पर्य—

**देवपद आहे निर्गुण। देवपदीं अनन्यपण।**
**हाचि अर्थ पाहतां पूर्ण। समाधान बाणे ॥ ३२ ॥**

**१० अनिर्वाच्य समाधान:** आत्मसमाधान कसें आहे, अनुभव म्हणजे काय व स्वसुख अगम्य आहे असें जे ते सांगतात व 'मुक्यानें गूळ खादला। गोडी नये सांगायाला' हा दृष्टान्त देऊन पृच्छकाचें तोंड बंद करितात तर याचा थोडा उलगडा करून हा देवशोधनाचा विषय पुरा करूं. स्वस्वरूप हें समाधानाचें स्थळ आहे, तो अनुभव आहे, हें सारें खरें आहे. 'जें बोलास आकळेना। बोलिल्याविण कळेना' तें परब्रह्म संतसंगमांत कळून येतें. वस्तु अनिर्वाच्य आहे; समाधानही अनिर्वाच्य आहे; गुळाची गोडी तो खाल्ल्यावांचून समजायची नाहीं हें खरें आहे, पण 'सांगतां नये तें सांगणें। गोडी कळाया गूळ देणें। ऐसें हें सद्गुरुविणें। होणार नाहीं.' सद्गुरुकृपा म्हणजे कांहीं स्थूल क्रिया नव्हे. 'जो शोधील आपणासी' त्यालाच त्या कृपेचें रहस्य समजणार आहे.

**आपुलें मूळ बरें शोधितां। आपुली तों माइक वार्ता।**
**पुढें वस्तूचि तत्त्वता। समाधान ॥ १३ ॥**
**पदार्थज्ञान जेव्हां सरे। द्रष्टा द्रष्टेपणें नुरे।**
**ते समईं फुंज उतरे। मीपणाचा ॥ १४ ॥**

आत्मा सर्वसाक्षी, द्रष्टा आहे हें बोलणेंही अलीकडचें आहे, ह्याही मीपणाचा फुंज उतरतो तेव्हांच समाधानाचा लाभ होतो. मीपण मुरणें हीच अनुभवाची खूण आहे म्हणून समाधान अनिर्वाच्य आहे

असें म्हणण्यांत येतें. अत्यंत विचाराचे बोल असले तरी ते मायिक फोल आहेत. शब्द पाहतां अर्थ कळतो पण अर्थ शब्दापूर्वी स्वयम् आहे. शब्द भूस व अर्थ धान्य आहे, शब्दानें वाच्यांश कळतो पण वाच्यांश सोडून लक्ष्यांश शुद्ध स्वानुभवें लक्षावा—लक्ष्यांशही पूर्वपक्षांत जातो, कां कीं स्वानुभव हा 'लक्षिला न वचे.'

**जेथें गाळूनि सांडिलें नभा । जो अनुभवाचा गाभा ।**
**ऐसा तोही उभा । कल्पित केला ॥ ३७ ॥**

आकाश अतिसूक्ष्म आहे व ब्रह्माला आकाशाची उपमा देतात पण ज्याला आकाशांतूनही गाळून घेतलें आहे असा अनुभवही कल्पनेनेंच उभा केला आहे. कल्पना मिथ्या आहे म्हणून कल्पना अनुभवाची केली तरी ते मिथ्याच आहे. अनुभवांत द्वैत आहे; अनुभवांत अनुभव, अनुभविता व अनुभाव्य अशी त्रिपुटी आहे म्हणून अनुभवही खालींच राहतो. असें समाधान सूक्ष्मतम व अनिर्वाच्य आहे. 'वस्तु येक आपण येक' असा भेदच नाहीं, अभिन्नता मुळींच आहे. स्वरूप स्वयमेव समाधानरूप आहे. हेंही उमजण्यासाठीं एक काहणी सांगतात—

**अजन्मा होता निजेला । तेणें स्वप्नीं स्वप्न देखिला ।**
**सद्गुरूस शरण गेला । संसारदुःखें ॥ ३६ ॥**
**सद्गुरुकृपेस्तव । संसार जाला वाव ।**
**ज्ञान जालिया ठाव । पुसे अज्ञानाचा ॥ ३७ ॥**
**आहे तितुकें नाहीं जालें । नाहीं नाहींपणें निमालें ।**
**आहे नाहीं जाऊन उरलें । नसोन कांहीं ॥ ३८ ॥**

ही 'अजन्मा'ची काहणी आहे हें लक्षांत ठेवावें. मी संसाराला आलों हें पहिलें स्वप्न. संसाराला त्रासून मी श्रीगुरूला शरण गेलों व त्याच्या बोधामुळें तरलों हें दुसरें म्हणजे स्वप्नांतलें स्वप्न! तो बरळूं लागला: "मी गुरूला शरण गेलों व त्याच्या कृपेनें आत्मज्ञान होऊन मला ज्ञान

झाले व माझें अज्ञान निमालें. 'आहे तितुकें नाहीं झालें' म्ह० पांचभौतिक दृश्य विवेकाने उडालें, 'नाहीं नाहींपणें निमालें' म्ह० जें नाहीं म्ह० शून्य कीं जेथून सर्व दृश्य उभारलें तें नाहींपणानेंच नाहींसे झाले. याप्रमाणे आहे आणि नाहीं दोन्ही जाऊन जें उरले तें शुद्ध स्वरूप, पण तें 'नसोनि कांहीं' म्ह० विशेषत्वानें कांहींच सांगतां येत नाहीं, अर्थात् वर्णव्यक्तिरूपाने नसल्यामुळें त्याबद्दल कांहींच सांगतां येत नाहीं, तथापि तें 'कांहीं नसोन' उरले आहे म्हणून तें अनिर्वाच्य आहे. 'शून्यत्वातीत शुद्ध ज्ञान। तेणें जाले समाधान। ऐक्यरूपें अभिन्न। सहजस्थिति.' त्या अजन्म्याच्या बरळण्यावर समर्थ सांगतात: तो अजन्मा, ती त्याची जागृति, ती गुरुशरणागति, ती ऐक्यता, तो अनुभव हें सारें स्वप्नांतलें स्वप्न आहे. शब्दातीत अनिर्वाच्य सुख याहून वेगळेंच आहे.

वरील ओव्यांच्या अर्थावर कल्याणस्वामींच्या शिष्याचे प्रशिष्य आत्मारामबोवा यांनीं पुढील अभंग लिहिला आहे:—

**धन्य गुरुकृपा लाभतांचि वर। होय निर्विकार स्वयें वस्तु ॥ १ ॥**
**आहे स्थूळादिक जितुका दृश्याकार। करितां विचार 'नाहीं झालें' ॥२॥**
**नाहीं शून्यपण गेलें नाहीं सरिस। 'आहें मी ब्रह्मांश' भ्रांति उडे ॥ ३ ॥**
**नाहीं मजमाजी कांहींच म्हणणें। हेंही नसे भान अनुभवीं ॥ ४ ॥**
**अनुभवीं कैंचें भेदाचें सांगणें। कांहीं हें नसोन स्वयें तूं रे ॥ ५ ॥**
**उरलें मुरलें जेथ हें न साजे। खेळे सहजासहजें आत्माराम ॥ ६ ॥**

ही अजन्म्याची कथा कांहीं शिष्याला उमगली नाहीं तेव्हां ती समर्थांनीं त्यालाच लावून दाखविली.

## ७ सातवा दशक: चौदा ब्रह्मांचें निरसन व केवलब्रह्म

**समास १—मंगलाचरण:** ह्यांत गणेश, शारदा, व सद्गुरु यांचें केलेलें स्तवन मोठें बहारीचें आहे. संसार हें दीर्घ स्वप्न आहे व या स्वप्नांत जडजीव 'मी' व 'माझें' अशी भाषा बरळत असतात.

ज्ञानसूर्य मावळ्ला, अंधारानें सारा ब्रह्मगोळ भरला, थोडासा मार्ग दिसण्या-इतकें सत्त्वाचें चांदणेंही पडलेलें नाहीं, त्यामुळें सर्वत्र भ्रांति पडून आपलें स्वरूपच आपणास दिसेनासें झालें आहे !

**देहबुद्धिअहंकारें । निजेले घोरती घोरें ।**
**दुःखें आक्रंदती थोरें । विषयसुखाकारणें ॥ २३ ॥**
**निजेले असतांच मेले । पुन्हां उपजतांच निजेले ।**
**ऐसे आले आणि गेले । बहुत लोक ! ॥ २४ ॥**

मायेच्या निद्रेंत असतांनाच मरतात, पुन्हा जन्मतांच निजतात, सारा संसार मायेच्या निद्रेंतच करितात ! यांना पाहिले म्हणजे यांनीं 'नेणोनियां परमेश्वरा । भोगिले कष्ट' असें वाटतें. त्यांच्या कष्टांचें निरसन आत्मज्ञाना-शिवाय होणार नाहीं म्हणून हा 'अध्यात्मग्रंथ' निरूपिला जात आहे ! चंचळहृदयी माणसाला हा ग्रंथ समजायचा नाहीं, ज्याला परमार्थ सद्गुरु-कृपेनें जोडला आहे त्यानें दृढीकरणार्थ हा पहावा. ( येथें मराठी भाषेचें महत्त्व वर्णिलें आहे त्याचा आरंभीं प्रपंच केलाच आहे ). त्यांतील मुद्दयाची ओवी 'प्राकृतीं अद्वैत । सुगम आणि सप्रचीत । अध्यात्म लाभे अकस्मात । तरी अवश्य ध्यावें' ही आहे. मराठी ग्रंथ म्हणून याचा अव्हेर करूं नये. अध्यात्मश्रवणानें मोक्ष अनायासें मिळणार आहे. मायाब्रह्म वोळखावें याचें नांव अध्यात्म. माया बहुरूपी बहुरंगी असून नाशवंत आहे. माया आपुली कल्पना, ती ज्ञानेंवीण तुटणार नाहीं. आतां ब्रह्माचें स्वरूप पाहूं.

**समास २—ब्रह्मनिरूपण :** 'ब्रह्म सर्वांसी व्यापक । ब्रह्म अनेकीं एक । ब्रह्म शाश्वत हा विवेक । बोलिला शास्त्रीं. ' ब्रह्मासारखें दुसरें कांहींच नाहीं तर त्याला हेतुदृष्टान्तउपमेय काय द्यावें ? शब्दांनीं जें बोलाल त्याहून तें वेगळेंच आहे. 'परी तें श्रवणअभ्यासें । पाविजे ब्रह्म.' सत्संगा-

वांचून त्याचा अनुभव येत नाहीं, सद्गुरूवीण तें प्राप्त नाहीं. भांडारगृहें भरलीं असलीं तरी किल्ली सांपडल्यावांचून हातीं कांहींच येत नाहीं.

**सद्गुरुकृपा तेचि किली । जेणें बुद्धि प्रकाशली ।**
**द्वैतकपाटें उघडलीं । येकसरीं ॥ १५ ॥**

तेथें व्युत्पत्ति चालत नाहीं, मनाचा तेथें पोंच नाहीं. 'संग सोडावा आपुला। मग पाहावें तयाला.' आपण म्हणिजे मीपण, मीपण म्हणिजे जीवपण, जीवपण म्हणिजे अज्ञान—संग जडला ! सोडितां तया संगासी, ऐक्य होय निःसंगासी. ब्रह्म राजाला व रंकाला, स्त्रीला व पुरुषाला एकच आहे. तेथें उंच नीच नाहीं परी. ब्राह्मणाचें ब्रह्म सोवळें व शूद्राचें ब्रह्म वोवळें असें कांहींच नाहीं. सकळांसी मिळोन एकचि ब्रह्म. गुरुशिष्या एकचि पद. देहबुद्धीच्या अंतीं सकळांसी एकचि प्राप्ती. 'एकमेव अद्वितीयं' असें श्रुतिवचन आहे. तें नवें जुनें अधिक उणें नाहीं. सर्व संत देहातीत असतात. ते वेगवेगळे दिसले तरी स्वस्वरूपीं मिळतात. देहबुद्धीनें ब्रह्म दुरावतें. देहाचें जें थोरपण तेंच देहबुद्धीचें लक्षण. देहबुद्धि झडे तरीच परमार्थ घडे. ती सोडून सत्य परब्रह्मीं मिळून जावें. ब्रह्माला अनंत नांवें आहेत तरी ब्रह्म एकच आहे. नामें असंख्यात परी तो परेश नामातीत आहे.

**समास ३—चौदा ब्रह्में व त्यांचें निरसन :** सोनें पाहिजे तर आधीं माती गोळा करावी लागते, सोनें घेऊन माती टाकायची असते; त्याप्रमाणें विद्वान् भ्रमानें ज्याला ब्रह्म म्हणतात ते तसें नाहीं हें येथें दाखवून मग केवळब्रह्म दाखवूं. 'आधीं मिथ्या उभारावें। मग तें ओळखोन सांडावें। पुढें सत्य तें स्वभावें। अंतरीं बाणे.'

**१ शब्दब्रह्म :** ब्रह्माचें नुस्तें शब्दज्ञान काय कामाचें ? अनुभव हवा.

**२ ओमित्येकाक्षरब्रह्म :** एकाक्षरब्रह्म. जेथें क्षर नाहीं तें अक्षर म्हणजे अविनाशी आहे असें म्हणण्यांत काय अर्थ आहे ?

३ **खंब्रह्म :** खं म्ह० आकाश, व आकाश म्ह० शून्य. शून्याचा ज्ञानानें निरास होतो म्हणून आकाशब्रह्म खरे नाहीं.

४ **सर्वब्रह्म :** 'सर्वंखल्विदं ब्रह्म.' पांचभौतिक सृष्टींत जें जें दिसतें तें ब्रह्म असें म्हणतात. ब्रह्मप्रळयांत सर्व दृश्याचा नाश आहे म्हणून हें खरे नाहीं.

५ **चैतन्यब्रह्म :** जयास चेतवावें तेंच मुळीं मायिक, मग त्याला चेतविणाऱ्याला खरेपणा कोठून येईल ?

६ **सत्ताब्रह्म :** परिवारच नाहीं मग सत्ता कोणाची ?

७ **साक्षिब्रह्म :** पदार्थच नाहीं मग साक्षित्व कोठचें व कोणाचे ?

८ **सगुणब्रह्म :** गुण नाशवंत व खरे ब्रह्म अविनाशी आहे.

९ **निर्गुणब्रह्म :** जेथें नाहीं गुणवार्ता तेथें निर्गुण कुठले आणतां ?

**सत्ता चैतन्यता साक्षी। सर्वही गुणापाशीं।**
**ठाईचें निर्गुण त्यासी। गुण कैंचे ?॥ ३९॥**

गुणरहित ब्रह्माला निर्गुण हें नांव तरी कशाला पाहिजे ?

१० **वाच्यब्रह्म :** वाचेनें बोलले जाते त्याला नाश आहे.

११ **अनुभवब्रह्म :** हें त्रिपुटींतले असल्यामुळें शुद्ध ब्रह्म नाहीं.

१२ **आनंदब्रह्म :** आनंद ही एक वृत्तीच आहे. ब्रह्म वृत्त्यतीत आहे.

१३ **तदाकारब्रह्म :** तदाकार झाल्यावर त्याला कांहीं नांवच देतां येत नाहीं.

१४ **अनिर्वाच्यब्रह्म :** जेथें संवाद तुटून जातो तें. ही उन्मनी अवस्था आहे, पण शुद्ध ब्रह्म अवस्थातीत आहे.

याप्रमाणें चौदा ब्रह्मांचें निरसन झालें. निःसंगास भेटायचें तर निःसंग व्हावें.

**समास ४–विमलब्रह्म :** ब्रह्म निर्मळ, अरूप, विशाळ आहे. जळचरांना जळ, किंवा खेचरांना आकाश तसें तें जीवमात्रास आहे. 'जें अखंड

भेटलें । सर्वांगास लिगटलें । अतिनिकट परी चोरलें । सकळांसि जें ' तेंच होऊन जावें.

**आपुलेन अनुभवें । ज्ञानें जागृतीस यावें ।**
**मग माइक स्वभावें । कळों लागे ॥ १३ ॥**

ब्रह्माला आकाशाचा दृष्टान्त देतात. ' खंब्रह्म ' ( श्रुति ), ' गगनसदृशं ' ( स्मृति ); पण आकाश शून्य असून पांचभौतिकांतले अतएव नाशवंत आहे म्हणून आकाशाचा दृष्टान्तही येथें तोटका पडतो. पंचभूतांत असून तें पंचभूतांच्या गुणांना लिप्त नाहीं. तें नामरूपातीत आहे. तें सर्वाठायीं सदोदित भरले असून शाश्वत आहे. तें सर्वेंद्रियांत असून त्याला जाणलें कीं इंद्रियांची हांव मोडते.

**जें अनुभवेंचि जाणावें । सृष्टीचेनि अभावें ।**
**आपुलेन स्वानुभवें । पाविजे ब्रह्म ॥ ४७ ॥**
**ज्ञानदृष्टीचें देखणें । चर्मदृष्टी पाहों नेणे ।**
**अंतर्वृत्तीचिये खुणे । अंतर्वृत्ती साक्ष ॥ ४८ ॥**

ब्रह्म व माया जाणणारी सर्वसाक्षिणी अवस्था तुर्या ही वृत्ति व वृत्तिरहित ती उन्मनी या दोन्ही तेथें विरून जातात. ' जेथें अज्ञान सरे । ज्ञान तेही नुरे । विज्ञानवृत्ति मुरे । परब्रह्मीं. '

## समास ५–द्वैतकल्पनानिरसन :

**प्रश्न :** केवळ विमलब्रह्म अनुभवास आले आणि मायेचेंही अनुसंधान लागलें, ब्रह्म अंतरीं प्रकाशे आणि माया प्रत्यक्ष दिसे, हें द्वैत कसें निरसावें ? माया व ब्रह्म यांना जाणणारा कोण ?

**उत्तर :** ब्रह्माचा संकल्प व मायेचा विकल्प दोन्ही कल्पना करणारें मन आहे. तुर्या सर्वसाक्षिणी आहे पण सर्वच नाहीं तेथें जाणणारें कोण असणार ? घटमठाच्या सापेक्षतेनें आकाश त्रिविध आहे असें म्हटलें जातें

त्याप्रमाणें मायागुणामुळें ब्रह्माला सत्यत्व आहे असें म्हणतात. सर्वसाक्षी मनच उन्मन झाल्यावर मग तुर्यारूप ज्ञान मावळतें.

**जयास द्वैत भासलें। तें मन उन्मन झालें।**
**द्वैताद्वैताचें तुटलें। अनुसंधान ॥ १२ ॥**

तात्पर्य ब्रह्म आणि माया, अद्वैत आणि द्वैत हा वृत्तीचा—कल्पनेचा खेळ आहे.

**वृत्तिरहित जें ज्ञान। तेंचि पूर्ण समाधान।**
**जेथें तुटे अनुसंधान। मायाब्रह्मींचें ॥ १४ ॥**

कल्पनाच बंधन व कल्पनाच मोक्ष देते. कल्पना साधनाकडे वळली कीं मोक्षमार्गाला नेते. 'श्रवण आणि मनन। निजध्यासें समाधान। मिथ्या कल्पनेचें भान। उडोन जाय.' शुद्ध कल्पना तारक आहे व सबळ ( शबळ ) कल्पना बंधक आहे.

**सदा स्वरूपानुसंधान। करी द्वैताचें निरसन।**
**अद्वयनिश्चयाचें ज्ञान। तेचि शुद्ध कल्पना ॥ ३४ ॥**

यासाठीं सत्संगीं श्रवण पाहिजे. तात्पर्य 'जयास द्वैत भासलें। तें तूं नव्हेस सर्वथा.'

**समास ६—बद्धमुक्तनिरूपण :** हा समास फार महत्त्वाचा व बहारीचा आहे.

**प्रश्न :** हें ब्रह्मनिरूपण ऐकून मी तदाकार व्हावें, पुन्हा संसार-वृत्तीवर येऊं नये असें मला वाटतें. श्रवणबळें क्षणभर ब्रह्म व्हावें व क्षणभर संसारांत यावें, वृत्तींवर कोसळावें हें येणें जाणें मला नको.

**उपदेशकाळीं तदाकार। होतां पडे हें शरीर।**
**अथवा नेणे आपपर। ऐसें झालें पाहिजे ॥ ७ ॥**

ब्रह्म होऊन संसार करावा हें लाजिरवाणें वाटतें. ब्रह्म झाल्यावर कामक्रोध जवळ कां येतात ? एक ब्रह्म तरी व्हावें किंवा संसार तरी करावा. दोन्हीकडे भरंगळणे नको.

**ब्रह्मसुख नेलें संसारें । संसार गेला ज्ञानद्वारें ।**
**दोन्ही अपुरीं, पुरें । येकही नाहीं ॥ १४ ॥**

**उत्तर :** ब्रह्मच होऊन पडले तेवढेच मुक्त झाले आणि इतर व्यासादिक काय बुडाले ?

**प्रश्न :** 'शुको मुक्तो वामदेवो वा' अशी श्रुति आहे. त्यावरून हे दोघेच मुक्त झाले असें स्पष्ट दिसतें. वेदवचन काय खोटें आहे ?

**उत्तर :** वचन खरें आहे पण त्याचा अर्थ तुला समजला नाहीं. दोघेच मुक्त झाले असें म्हटलें तर अनेक ऋषि, मुनि, सिद्ध, योगी, आत्मज्ञानी झाले, 'प्रल्हादनारदपराशर' इ० व 'कविर्हरिरंतरिक्ष' इ० भागवती श्लोकांत वर्णिलेले सिद्ध व इतर अनेक सिद्ध झाले ते काय मुक्त झाले नाहींत ? हरिहरब्रह्मादि देव, दत्त, जनक, हे काय मुक्त नव्हत ? हे सर्व बुडाले असें पढतमूर्खाशिवाय कोण म्हणेल ?

**प्रश्न :** मग वेद असें कां बोलिला ?

**उत्तर :** वेदाने पूर्वपक्ष केला पण मूर्ख तेथेंच लक्ष लावतो ! हा वेदाचा सिद्धान्त आहे असें म्हटलें तर वेदाचें सामर्थ्य बुडेल, कां कीं वेद मग शुक व वामदेव या दोघांशिवाय इतर कोणासच उद्धरावयास समर्थ नाहीं असें होईल. पण वेदांत जन उद्धरावयाचें सामर्थ्य आहे हें निश्चित आहे. वेदाचें एक अक्षर कानीं पडले तर जन पावन होतात.

**वेदशास्त्रें पुराणें । कैसीं होती अप्रमाणें ? ।**
**दोघांवांचून तिसरा कोणें । उद्धरावा ? ॥ ३६ ॥**

बरें शुक काष्ठवत् पडले असें म्हणशील तर शुकांनीं तर परीक्षितीला भागवत सांगितलें आहे ! त्यांना तूं काय बद्ध म्हणशील ?

**म्हणोनी बोलतां चालतां । निचेष्टित पडिलें नसतां ।**
**मुक्ति लाभे सायुज्यता । सद्गुरुबोधें ॥ ४४ ॥**

ज्ञान होऊनही व्यवहार करीत असतात त्यांना जीवन्मुक्त म्हणतात, व देहभान विसरतात त्यांना विदेहमुक्त म्हणतात. स्वरूपबोधानें स्तब्धता किंवा तटस्थता प्राप्त होणें हा देहधर्म आहे. त्याचा स्वरूपबोधाशीं कांहीं संबंध नाहीं. याशिवाय नित्यमुक्त योगेश्वर असतात ते वेगळेच आहेत.

आपल्या स्वानुभवानें तृप्ति पावावी हें मुख्य वर्म आहे. पोटभर जेवून तृप्त झालेल्यास कोणी उपाशीं म्हटले तरी त्याचें काय नुकसान आहे ? बद्ध व मुक्त हें देहाच्या अंगानें बोललें जातें. देहबुद्धीचें मीपण हाच बंध. परब्रह्मस्वरूपीं बद्ध मुक्त या कल्पनाच नाहींत. मीपण गेल्यावर 'मुका अथवा बोलिला। तरी तो मुक्त.'

**मुक्तपण हेंचि बद्ध । मुक्त बद्ध हें अबद्ध ।**
**स्वस्वरूप स्वतःसिद्ध । बद्ध ना मुक्त ॥ ५४ ॥**
**म्हणोनि मुक्त विश्वजन । जयास जालें आत्मज्ञान ।**
**शुद्ध ज्ञानें मुक्तपण । समूळ वाव ॥ ६४ ॥**

तात्पर्य साधु देहातीत निःसंदेह समाधानरूप असतो, तो संसारांत किंवा लोकव्यवहारांत वागला तरी मुक्तच आहे.

हाच विषय नाथांनीं भागवतधर्माचें निरूपण करीत असतांना अगदीं याच शब्दांत समर्थांच्या पूर्वी सांगितला होता—

**कर्माचरणीं समाधि । एक म्हणती न घडे कधीं ।**
**ते पावले नाहीं निजात्मबोधीं । जाण त्रिशुद्धी विदेहा ॥**
**ताटस्थ्या नांव समाधी । म्हणे त्याची ठकली बुद्धी ।**
**ते समाधी नव्हे त्रिशुद्धी । जाण नुसधी मूर्च्छा आली ॥**

चालतां बोलतां सर्व कार्य करितां टिकते ती खरी समाधि. राज्य करितांना जनकाची समाधि भंग पावली नाहीं, म्ह० त्याची मुक्तता ढळली नाहीं. 'पाहें पां देवर्षि नारदु । विनोदें न मोडे समाधिबोधु.' समाधि म्ह० आत्मस्थिति.

**स्वरूप देखोनि मूर्छित जाला। तो आपणिया आपण तरला।**
**स्वयें तरूनि जन उद्धरिला। तो बोधू प्रकाशिला शुकवामदेवीं॥**

युद्ध करितांनाही अर्जुनाची समाधि न मोडेल असें आत्मज्ञान देवानें त्याला दिलें होतें:—

**अर्जुना देऊनि निजसमाधी। सर्वेचि घातला महायुद्धीं।**
**परी तो कृष्ण कृपानिधी। ताटस्थ्या त्रिशुद्धी नेदीच स्पर्शों॥**

ज्याच्यामुळें या राष्ट्राला भरतखंड हें नांव पडले त्या भरताचेंही उदाहरण देतांना नाथांनीं 'असतांही राज्यधर्मीं जाणा। तो आत्मखुणा न चुके' असे म्हटलें आहे. सद्गुरुकृपेनें आपली निजमुक्तता लाधली म्हणजे संसार, व्यवहार किंवा राज्यकार्य करीत असतांनाही ती भंग पावत नाहीं असा नाथांचा, समर्थांचा व भागवतधर्मीय साधुसंतांचा आशय आहे. नाथांची ब्रह्मस्थिति अखंड असतांनाच त्यांनीं स्वतःचा संसार व लोकजागृतीचें प्रचंड कार्य केलें हें प्रसिद्धच आहे.

**समास ७—साधनप्रतिष्ठा :** ब्रह्मज्ञान झाल्यावरही साधने सोडतां येत नाहींत. —

**प्रश्न :** निर्विकल्प ब्रह्म—न दिसे न भासे—तें कैसें वोळखावें ? जें वर्णव्यक्तीहून निराळें आहे म्ह० ज्याला रंग रूप कांहीं नाहीं ते जाणावें कसें ? विवेक धरावा, ज्ञाने प्रपंच सारावा, अहंभाव वोसरावा असें सांगतां पण अहंकार वोसरत नाहीं याला काय करावें ? ब्रह्म कशासारखेंही नव्हे तें कसें प्राप्त व्हावें ? तस्मात् असें वाटतें कीं, सत्यस्वरूप ब्रह्म ही कांहीं वस्तूच नाहीं !

**उत्तर :** स्वरूपाचा अभाव म्हणावा तर वेदशास्त्रें मिथ्या ठरतील, पण तीं मिथ्या नाहींत खास. व्यासादिकांची वाणी मिथ्या नव्हे. आत्मज्ञानाचे उपाय बहुतांनीं सांगितले आहेत; अद्वैतज्ञानाचा उपदेश गुरुगीतेंत शंकरांनीं पार्वतीस केला आहे. अवधूतगीता, हंसगीता, चतुःश्लोकी

भागवत, वासिष्ठसार, भगवद्गीता, इत्यादि ग्रंथ विश्वमान्य आहेत. अद्वैत-ज्ञान सत्य आहे; मिथ्या म्हणतां पतन होईल. 'आपणास नुमजे बरवें । म्हणोनि मिथ्या कैसें म्हणावें ?' संदेह अहंभावामुळें उत्पन्न होतो, तो अहंभाव समूळ टाकावा. तात्पर्य :—

**मीपण–जाणोनि त्यागावें । ब्रह्म–होऊन अनुभवावें ।**
**समाधान–तें पावावें । निःसंगपणें ॥ ५२ ॥**
**निर्विकल्पासी कल्पावें । परी कल्पितें आपण न व्हावें ।**
**मीपणासी त्यागावें । येणें रीती ॥ ५३ ॥**

मी कल्पिता आहें असा आपला ( वेगळेपणाचा ) संग सोडून निर्वि-कल्पास कल्पावें. कल्पनेंत येतें तें आपलें रूप नाहीं, आपण त्याहून वेगळे आहोंत. 'कांहींच नसावें असोनी' हें त्याचें वर्म आहे. 'पदींहून चळों नये । करावे साधन उपाये' म्हणजे निःसंगत्व प्रत्ययास येतें. राजा राजपदीं असतां त्याच्या सत्तेने कारभार चालतो, तो स्वतः कांहींच करीत नाहीं, तसें 'साध्यचि होऊन तत्त्वता । साधन करावें.' साधन देहाच्या माथां आलें, हा करून अकर्ता आहे! देहाचा अभिमानीच साधनत्याग करितो!

**साधनेंविण ब्रह्म होतां । लागों पाहे देहममता ।**
**आळस प्रबळे तत्त्वता । ब्रह्मज्ञानमिसें ॥ ६४ ॥**

मी ब्रह्मज्ञानी झालों, मला आतां साधन कशाला हवें, असें हा म्हणूं लागला कीं देहाहंकार डोकें वर काढतो व हा आळसाच्या स्वाधीन होऊन पडतो व पतन पावतो. मी मुक्त म्हटल्यानें दोष अंगीं वाजतात. 'साधन सोडितां होय । मुक्तपणें बद्ध.' शंकरासारखे अद्याप साधकदशेंत आहेत म्हणून ते नामस्मरणादि साधन करितात. सिद्ध एक परमात्मवस्तु आहे. 'अभ्याससारिणी विद्या' ही म्हण यथार्थ आहे. अभ्यास सुटला कीं विद्या याला सोडून जाते. आतां अभ्यास कोणता करावा ?

### समास ८।९– श्रवणाभ्यास :

**ऐका परमार्थाचें साधन । जेणें होय समाधान ।**
**तें तूं जाण गा श्रवण । निश्चयेंसी ॥ १ ॥**

श्रवणानें विरक्ति, भक्ति, अनासक्ति, चित्तशुद्धि, निश्चय हे सर्व लाभ होतात, पण सत्संगीं श्रवण पाहिजे. श्रवणाशिवाय तरणोपाय नाहीं. प्रवृत्तींत अथवा निवृत्तींत श्रवणानेंच मनुष्याचें मन वळते हें आपण पाहतोंच. 'ऐकिल्याविण कळेना' हा अनुभव आहे. प्रपंच, व्यवहार, भक्ति, ज्ञान, वैराग्य सर्व कांहीं श्रवणानेंच कळतें; सर्वांना श्रवण हें एकच सारभूत साधन आहे. श्रवणानें मनुष्य सुधारून पुण्यमार्गाला लागतो, 'मुख्य परमात्माचि आकळे । स्वानुभवासी.' श्रवणाचें मनन, पुढें निदिध्यास व शेवटीं साक्षात्कार हा मार्ग श्रुतीनेंच सांगितला आहे. सत्संगांत नित्यश्रवण हवें.

**सेविलेंचि सेवावें अन्न । घेतलेंचि घ्यावें जीवन ।**
**तैसें श्रवण मनन । केलेंचि करावें ॥ ८–४७ ॥**

ज्या वक्तृत्वांत निश्चयात्मक ज्ञान नाहीं, मन अनिश्चित होतें, तें ऐकूंच नये. 'येक्या ग्रंथें निश्चय केला । तो दुजयानें उडविला । तेणे संशयोचि वाढला । जन्मवरी.' असे ग्रंथ वाचून संशयाच्या ओघांत पडूं नये. ज्याला आपली सोडवणूक करून घ्यायची आहे त्यानें 'अद्वैतग्रंथ परमार्थी । श्रवण करावे.' ज्याला ज्याची आवडी त्याला त्याच श्रवणानें सुख वाटतें. उपासकांना आपापल्या उपास्याचे ग्रंथ आवडतात. ज्यांना स्वहित करणें आहे त्यांनीं अद्वैतग्रंथच पहावेत. अद्वैतापरता ग्रंथच नाहीं. 'इतर जे प्रपंचिक । हास्य विनोद नवरसिक । हित नव्हे तें पुस्तक । परमार्थासी.' ज्यानें उपरति होते, अवगुण पालटतात, परोपकार घडतो, धारिष्ट चढतें, मनोजयाचा मार्ग सांपडतो, भक्तिज्ञानवैराग्याचा लाभ होतो त्यालाच ग्रंथ म्हणावें व तेच वाचावे व ऐकावे. विविधप्रकारचे लोक

आहेत ते आपापल्या आवडीचे ग्रंथच वाचतात. ज्ञानी ज्ञानाचे व भक्त भक्तीचे ग्रंथ वाचतो. योग्याला योग, भोग्याला भोग व रोग्याला आरोग्याचा विषय पाहिजे असतो. कवीला काव्य, तार्किकाला तर्कवाद, भाविकाला गुरुशिष्यसंवाद, पंडिताला व्युत्पत्ति, कलावंताला कला, प्रेमळाला करुणपर अभंगपदें, विचक्षणाला चातुर्य, भक्ताला मूर्तिध्यान, संगीत जाणणाराला ताल व राग यांचें ज्ञान, तत्त्वज्ञाला तत्त्वज्ञान, वैद्याला नाडी व मात्रा, कामिकाला शृंगारशास्त्र ( नाटककादंबरी ), यंत्रप्रियाला यंत्रशास्त्र, 'टवाळा आवडे विनोद' व निंदक पाहे उणी संधी—

**ऐसे सांगावे ते किती। आवडीसारिखे ऐकती।**
**नाना पुस्तकें वाचिती। सर्वकाळ ॥ ५६ ॥**
**परी परत्रसाधनेविण। म्हणों नये तें श्रवण।**
**जेथें नाहीं आत्मज्ञान। तया नांव करमणूक ॥ ५७ ॥**

**समास १०—देहान्तनिरूपण :** मायाविभ्रमाचें बळ एवढें आहे कीं, 'मिथ्या तेंचि जाले सत्य। सत्य तेंचि जालें मिथ्य.' ब्रह्म सत्य असून त्यावर विश्वास नाहीं व जगत् मिथ्या असून त्यावर जनांची श्रद्धा! सत्य कळावें म्हणून नाना ग्रंथ व नाना निरूपणें झालीं 'तरी उठेना धरणें। असत्याचें.' वेदशास्त्रपुराणें सत्यब्रह्माचा निश्चय सांगतात तरी त्याची प्रचीति घेत नाहींत. असो. संतसंगीं आत्मज्ञान झालें, परमार्थाची खूण बाणली, निजवस्तूला निजस्वरूपानें ओळखिलें, 'प्रारब्धीं टाकिला देहो। बोधें फिटला संदेहो' हें झालें तरी ज्ञात्याच्या शरीराचें शेवटीं काय होतें याविषयीं मतभेद होतोच. 'शुक्लपक्ष उत्तरायण। गृहीं दीप दिवा मरण' म्हणजे उत्तम; पुण्यदिवशीं पुण्य नदीतीरीं साधूचा देह पडावा, असें शाहण्यांसही वाटतें! यावर निःसंदेह विचार सांगतात. ज्ञात्याचें शरीर जेथें पडतें तीच पुण्यभूमि होय. तो 'जीतचि मुक्त' पुण्यराशी असल्यामुळें व देह मिथ्यात्वें निर्विकार असल्यामुळें त्याचें शरीर केव्हांही कोठेंही पडलें तरी त्याचें सार्थकच

झालें. 'अंतीं भेटतो भगवंत' अशी नेणत्याची समजूत पण 'जितां नाहीं भगवद्भक्ति । मेल्यां कैंची होईल मुक्ति,' याचा विचार ते करीत नाहींत.

**जे कां जीवन्मुक्त ज्ञानी । त्यांचें शरीर पडो रानीं ।**
**अथवा पडो स्मशानीं । तरी धन्य जालें ॥ २५ ॥**

जो जन्मलाच नाहीं त्याला मृत्यु कैंचा? त्याला 'स्वस्वरूपानुसंधान-बळें । सगळी मायाच नाडळे,' त्याला जन्ममरणवार्ता § काय होय? तो जनीं दिसतो परी वेगळाच आहे.

**जो जीत असतांचि मेला । मरणास मारूनि जियाला ।**
**जन्ममृत्यु न स्मरे त्याला । विवेकबळें ॥ ३० ॥**

**११ उपसंहार :** अशा साधुपुरुषाच्या भजनाने जन पावन होतात. अद्वैतप्रांजळ निरूपणानें तुमचेही पूर्ण समाधान होईल हेंच 'साधकांस **निरवणें**' आहे.

**जो संतांसी शरण गेला । तो संतचि होऊन ठेला ।**
**इतर जनांसी उपेगा आला । कृपाळूपणें ॥ ३५ ॥**

म्हणून 'सत्संगापरतें साधन । आणिक नाहीं.'

**परमार्थाचें जन्मस्थान । तेंचि सद्गुरूचें भजन ।**
**सद्गुरुभजनें समाधान । अकस्मात बाणे ॥ ३८ ॥**
**सरली शब्दाची खटपट । आला ग्रंथाचा शेवट ।**
**येथें सांगितलें स्पष्ट । सद्गुरुभजन ॥ ४२ ॥**

ह्या ग्रंथांत ज्ञानाचा निश्चय सांपडेल. ग्रंथ प्राकृत आहे तरी 'समाधान निवळे । अंतर्यामीं' ही याची फलश्रुति आहे.

## ८ आठवा दशक : ज्ञानदशक

लोक जपतपतीर्थयात्रादि सर्व सायास देवाकरितां करितात. 'पावावया भगवंतातें । नाना पंथ नानामतें । तया **देवाचें स्वरूप** तें । कैसें आहे?'

§ हा विषय ज्ञानेश्वरीच्या ८ व्या अध्यायांत अगदीं असाच सांगितला आहे तो वाचकांनीं तेथेंच पाहावा.

शास्त्रें देवासाठीं भांडतात पण त्यांचा एक निश्चय होत नाहीं. ज्याणें केलें चराचर, केले सृष्ट्यादि व्यापार, रविचंद्रांना गति व तेज दिलें, सागराला मर्यादा घालून दिली, चौऱ्यायशी लक्ष योनी व तीन लोक व हरिहर-ब्रह्मादि निर्माण केले तो देव यांत शंका नाहीं. देव्हाऱ्यांतला देव हें सर्व कांहीं करूं शकत नाहीं. ' सर्वकर्ता तोचि देव । पाहों जातां निरावेव. ' विवेकहीन सृष्टीच्या पोटांत होणाऱ्या पाषाणांनाच देव म्हणतात. पांच-भौतिक सृष्टि त्यानें निर्माण केली तेव्हां तो सृष्टीपूर्वी होता हें उघड आहे. भांडीं करणारा कुंभार भांड्यांहून वेगळा आहे तसा सृष्टिकर्ता देव सृष्टीहून निराळा आहे. कार्य व कारण एक होऊं शकत नाहींत. सृष्टिकर्ता देव परी तो नव्हे सृष्टिभाव. खांबसूत्रींचीं बाहुलीं नाचविणारा पुरुष कांहीं बाहुल्यांतला नव्हे. ' तैसें जग निर्मिले जेणें। तो वेगळा पूर्णपणें । येक म्हणती मूर्खपणें । जग तोचि जगदीश. ' जग मिथ्या साच देव. 'पदार्थ-वस्तु नाशवंत, भगवंत पदार्थावेगळा. ' त्या निश्चळाला चंचल म्हणतां येत नाहीं. देव उपजला व देव मेला ही भाषा पापमय आहे. देव अमर आहे, जन्ममरणावेगळा आहे ( द० ८, स० १ ).

**प्रश्न :** तर मग **निरावयवीं चराचर कैसें जालें? उत्तर :** दोरीवर सर्प तशी ब्रह्मावर माया विवर्तरूप भासते. आदि एक नित्यमुक्त अक्रिय परब्रह्म तेथें सूक्ष्ममाया झाली. **प्रश्न :** ब्रह्म अखंड निर्गुण त्याला सृष्टि रचायची इच्छा कशी झाली? इच्छा सगुणावांचून नाहीं. सृष्टिकर्ता देव म्हणाल तर त्याला सगुणता चिकटूं पाहते. माया स्वतंत्र आहे, तिला कोणी केलें नाहीं असें म्हणाल तर देवाची गोष्टच बुडाली. सारें कर्तृत्व मायेकडे आलें तर ' भक्तांस उद्धरता देव नाहीं कीं? ' **उत्तर :** याविषयीं नाना शास्त्रांचीं नाना मतें आहेत. तूप थिजलें आणि विघुरलें, सुवर्ण आणि अलंकार, जल आणि लहरी इ० दृष्टान्त देतात, पण तुला सिद्धान्त सांगतों.

माया मुळींच मिथ्या असल्यामुळें त्या मिथ्या मायेला कर्ता कोणीच नाहीं. ‘ कर्ता ठाईचा अरूप । केले नेही मिथ्यारूप ।’ ( द० ८, स० २ )

‘ अरे जें जालेंचि नाहीं । त्याची वार्ता पुससी काई ?’ हा आहे अज्ञानवादाचा सिद्धान्त. दोरीकरितां भुजंग, जलाकरितां तरंग, मार्तंडाकरितां मृगजळ, कल्पनेकरितां स्वप्न, सिंपीकरितां रुपें, जळाकरितां गार, मातीकरितां भिंत, सिंधूकरितां लहरी, सोन्याकरितां अलंकार, तंतूकरितां चीर ( वस्त्र ), बिंबाकरितां प्रतिबिंब इ० अनेक दृष्टान्त दिले जातात, पण अद्वैतास हे द्वैताचे दृष्टान्त काय कामाचे ? आणि खरी गोष्ट अशी आहे कीं, द्वैताचा आश्रय घेतल्यावांचून लोकांस सृष्टिरचनेची कहाणी पटेल अशी सांगतां येत नाहीं ! सृष्टीचा मूळपुरुष म्ह० मूळमाया. तोच परमेश्वर : ‘ सकळ कांहीं कर्तेपण । तेथेंचि आलें.’ शब्दानें उघड सांगतां येत नाहीं व सांगितल्यास साधनोपाय मोडूं पाहतो, तथापि समजुतीसाठीं सांगणे प्राप्त आहे. देवापासून सकळ झालें हें सर्वांना पटतें तर मग तो आदिदेव म्हणजेच मूळमाया ! ‘ मूळमाया तोचि मूळपुरुष । तोचि सर्वांचा ईश । अनंतनामी जगदीश । तयासीच म्हणावें.’ सिद्धांचें निरूपण साधकांस ( त्यांची तितकी तयारी नसल्यामुळें ) पचत नाहीं म्हणून हें सांगतों.

दृष्टिबंधनें म्ह० गारुड्याचे खेळ होतात तसा **मूळमायेचा खेळ** आहे. निश्चळवायूंत चंचळ आकाश झालें तरी आकाश अभंग राहते तसा मायेचा खेळ चालला असून ब्रह्म निश्चळ राहतें. वायु दाखवितां येत नाहीं, धूळ उडते व झाडें कडाडतात त्यावरून तो प्रतीत होतो, तशी सृष्टिकार्यावरून माया ओळखावी—‘ आभाळ आलें आणि गेलें । तरी गगन तें संचलें । तैसें गुणा नाहीं आलें । निर्गुण ब्रह्म ’—आकाश निळें दिसतें, पालथें घातलेंसें दिसतें, पण तें अलिप्त आहे; तसें निर्गुण ब्रह्म अलिप्त आहे. रथ धांवतांना पृथ्वी चंचळ वाटते पण ती निश्चळ आहे तसें मायेच्या खेळांतही ब्रह्म निश्चळ आहे—आभाळ धांवतांना चंद्र धांवतोसा दिसतो,

किंवा अग्निजाळामुळें अंतराळ कंपित दिसतें तसें ब्रह्म सगुण वाटतें पण तें निर्गुणच आहे. 'ऐसी माया उद्भवली। वस्तु निर्गुण संचली। अहं ऐसी स्फूर्ति जाली। तेचि माया.' दृष्टि तरळली कीं गंधर्वनगरी व तिच्यांतली सेना दिसते तशी माया. ह्या मूळमायेंत त्रिगुण पंचभूतें बीजरूपानें आहेत तीं पुढें व्यक्त होतात. तत्त्वें मूळमायेंतच अतिसूक्ष्मरूपानें आहेत. आकाशांत वायूचें चळण हाच ओंकार. तेथून पंचभूतें प्रगट होतात. एकेक भूताच्या पोटांत पंचभूतें आहेत, तीं पुढें जडत्वास येतात. (द० ८, स० ३)

**ब्रह्मीं मूळमाया झाली,** तिच्या पोटीं सत्त्वरजतम हे त्रिगुण झाले म्हणून तिला गुणक्षोभिणी म्हणतात. त्यांत तमोगुणापासून पंचभूतें झालीं. पंचभूतांचीं लक्षणें सांगितलीं आहेत. जड आणि कठिण ती पृथ्वी. मृदु आणि ओलें तें आप. उष्ण आणि सतेज तें तेज. चैतन्य आणि चंचळ तो वायु. शून्य आणि निश्चळ तें आकाश. एकेकांत पांच भूतें आहेत म्हणून पांचांचीं पंचवीस झालीं. हा भूतकर्दम मूळीं सूक्ष्मांत झाला. पुढें अनंत ब्रह्मांडें झालीं. पुढें सप्तसागर, चतुर्दशभुवनें, देव, मनु इ० झाले. (द० ८, स० ४).

**पंचभूतांचा कर्दम** होऊन आपण पाहतों ही जड सृष्टि निर्माण झाली. आकाश हें ब्रह्मासारखेंच निर्मळ, निश्चळ, व्यापक व अलिप्त आहे, मग आकाशालाच ब्रह्म कां म्हणूं नये अशी शंका आली. तिचें निरसन केले पाहिजे. ब्रह्म निर्गुण आहे आणि आकाशाच्या अंगीं काम, क्रोध, शोक, मोह, भय, अज्ञान व शून्यत्व हे सप्तगुण शास्त्रानें सांगितले आहेत म्हणून तें भूतांत आलें. ब्रह्म पुरातन निर्गुण आहे. तांदूळ व पांढरे खडे, गूळ व गुळदगड, स्फटिक व रू (कापूस), सोनें व सोनपितळ सारखे दिसले म्हणून काय ते सारखे आहेत? तसे ब्रह्म आणि आकाश सारखे दिसले तरी एक नव्हत. आकाशाला वर्णव्यक्तिविकार नाहींत म्हणून त्याला शाश्वत म्हणायला काय हरकत आहे, अशी कोणी शंका काढील तर आकाश

मुळीं तमोगुणापासून झाले असून शून्य म्ह० अज्ञान हें त्याचें नांवच आहे. आकाश कठिण शून्य विकारवंत आहे. 'आकाश वेगळेपणें पाहावें। स्वरूपीं स्वरूपचि व्हावें' हा आकाश व ब्रह्म यांत भेद आहे. आकाश भूत आहे, ब्रह्म भूतांवेगळें शाश्वत आहे (द० ८, स० ५).

**किती दिवसांत मोक्ष होतो** हा श्रोत्यांचा प्रश्न व 'मुक्ति लाभे तत्क्षणीं। विश्वासतां निरूपणीं' हें वक्त्याचें उत्तर. सुचित असलें तरी मन दुश्चित होतें यास उपाय काय?

**मनाच्या तोडून वोढी। श्रवणीं बैसावें आवडी।**
**सावधपणें घडीनें घडी। काळ सार्थक करावा॥ ५॥**
**अर्थप्रमेय ग्रंथांतरीं। शोधून घ्यावें अभ्यंतरीं।**
**दुश्चितपण आलें तरी। पुन्हा श्रवण करावें॥ ६॥**

अर्थरूप झाल्याशिवाय जो श्रोता श्रवण करितो त्याला समर्थांनीं पाषाण म्हटले आहे! व 'टाकीने खपली फोडिली। ते मागुती नाहीं जडली। मनुष्याची कुबुद्धि झाडिली। तरी ते पुन्हा लागे' म्हणून पाषाण कोटिगुणें श्रेष्ठ समजावा असें त्याचें समर्थन केले आहे! पाषाणांतही माणिक, मोतीं, प्रवाळ, पाच इ० बहुमोल पाषाण असून कित्येकांच्या देवमूर्ति झाल्या आहेत, पण सदा दुश्चित अशा प्राण्याचा ना प्रपंच धड ना परमार्थ धड! दुश्चितपण व आळस या दोषांचें येथें समर्थांनीं खूप वर्णन केलें आहे तें मुळांत पहावें. 'किती दिवसां होते मुक्ति' हा येथें मुख्य प्रश्न आहे. सत्संग धरावा—

**लोहो परिसेंसी लागला। थेंबुटा सागरीं मिळाला।**
**गंगे सरिते संगम जाला। तत्क्षणीं॥ ४३॥**
**सावध साक्षेपी आणि दक्ष। तयास तत्काळचि मोक्ष।**
**इतरांस तें अलक्ष। लक्षिलें न वचे॥ ४४॥**

सावध म्ह० आत्महितीं सावध, साक्षेपी म्ह० उद्योगरत व दक्ष म्ह० शमदमादिकीं जागृत, अशा मनुष्यास सत्संगतींत तत्काळ मोक्ष होतो. येथें शिष्यप्रश्नाच मुख्य आहे. अनन्यास तत्काळ मोक्ष होतो. 'प्रश्नेविण अर्थ न कळे। विश्वासेंविण वस्तु नाकळे.' सावध, साक्षेपी, दक्ष, प्रज्ञावंत व अनन्य ह्या पांच गुणांचा ठेवा ज्यापाशीं आहे त्यास तत्काळ मोक्ष (द० ८, स० ६).

मोक्षाचें लक्षण व सत्संग याचा विचार येथें सांगितला आहे, पण यांत नवीन कांहींच नाहीं. 'प्राणी संकल्पें बांधला। जीवपणे बद्ध झाला। तो विवेकें मुक्त केला। साधुजनीं.' पंचवीस तत्त्वें व अष्ट देह यांचें निरसन करून परमात्म्याशीं मिळून जावें (द० ८, स० ७).

**आत्मदर्शन :** नवविधा भक्तीनें व मुख्यतः आत्मनिवेदनानें आत्मदर्शन होतें. 'आधीं पाहावें मी कोण। मग परमात्मा निर्गुण। वोळखावा' हें आत्मनिवेदनाचें वर्म पूर्वीं सांगितलेंच आहे. 'देवास वोळखों जातां। तेथें जाली तद्रूपता। देव भक्त विभक्तता। मूळींच आहे.' आत्मनिवेदनाच्या अंतीं जी अभेदभक्ति घडते तिलाच सायुज्यमुक्ति म्हणतात. कल्पान्तीं माया नासेल तेव्हां किंवा देहाचा अंत होईल तेव्हां आम्ही मुक्त होऊं असें कोणी म्हणतात पण हें कांहीं समाधानाचें लक्षण नाहीं. सैन्य मेल्यावर राजपद मिळवीन असें म्हणण्यासारखेंच हें वेडेपणाचें आहे! सैन्य असतांच राज्य करावें हें खरें राजपद. राजपद हातीं आल्यावर मग परिवार असेना, तसें 'माया असोनीच नाहीं। देहीं असतांच विदेही' असें झालें तर ती खरी मुक्ति. आत्मज्ञान झाल्यावर दृश्यभान राहिलें म्हणून काय झालें? होतें सन्निध चुकलें तें ज्याचें त्यास प्राप्त झालें, आतां दृश्य दृश्याच्या ठायीं राहिले व त्याचें भानही उरलें म्हणून काय हानी आहे? (द० ८, स० ८).

**सिद्धलक्षणें :** ‘अंतरीं गेलियां अमृत। बाह्य काया लखलखित’ तसे संतसाधु अंतर्बाह्य निर्मळ असतात. सिद्ध म्हणजे आत्मस्वरूप व संत त्याशीं अभिन्नता पावलेले असल्यामुळें त्यांनाही सिद्ध म्हणतात. ते कसे वागतात? स्वप्नरचना जशी जागृतींत नाहीं तसा दृश्यप्रपंच त्यांच्या स्वरूपजागृतींत नसतो.

**सदा स्वरूपानुसंधान। हें मुख्य साधूचें लक्षण।**
**जनीं असोन आपण। जनांवेगळा॥ ९॥**

त्याला संसारचिंता नसते, तो लोकांत लोकांसारखा वागला तरीं अंतरीं वेगळा असतो. ‘बाह्य साधकाचेपरी। आणि स्वरूपाकार अंतरीं.’ संदेहरहित होऊन तो साधन करीत असतो. चंचळांत वावरला तरी तो निश्चळ असतो. ‘बाह्य भलतैसें असावें। परी अंतर स्वरूपीं लागावें.’ राज्यावर बसलें कीं राजकळा अंगीं बाणतात, तसा स्वरूपीं जिव्हाळा लागला कीं सगळीं सुलक्षणें सिद्धाच्या अंगीं येतात. ‘स्वरूपीं भरतां कल्पना’ त्याला कामाचा विकार स्पर्शत नाहीं. हातचा ठेवा गेला कीं मनुष्यास क्रोध येतो पण याचा अक्षय्य ठेवा कधीं जातच नाहीं मग याला क्रोध यावा कसा? ‘आपला आपण स्वानंद। कोणावरी करावा मद?। याकारणें वादविवाद। तुटोन गेला.’ याप्रमाणेंच मदमत्सरदंभांचें पिसें साधूस नसतें. दृश्य मिथ्या या बोधामुळें प्रपंचही सहजच बाधित झाला म्हणून साधु प्रपंचांत असून निष्प्रपंच असतो. सर्व विश्व त्याचें घर झाल्यामुळें तो कशाचा लोभ करणार? ‘मोहें झळंबावें मन। तरी तें जाहलें उन्मन। याकारणें साधुजन। मोहातीत.’ साधु अद्वैत-वस्तु झाल्यामुळें त्याला दुजेपण उरत नाहीं म्हणून तो निर्भय असतो. सत्यस्वरूपीं अमर झाल्यामुळें त्याला भय नाहीं, परमार्थलाभामुळें क्षुद्र स्वार्थाचा विटाळ त्याला होत नाहीं, यामुळें नैराश्य ही साधूची वोळखण होय. साधु असाच वीतरागी, निरुपाधि, निर्मळ असतो.

**सकळ धर्मामध्यें धर्म । स्वरूपीं राहणें हा स्वधर्म ।**
**हेंचि जाणिजे मुख्य वर्म । साधुलक्षणाचें ॥ ५४ ॥**

अशा साधूच्या संगतींत स्वरूपस्थिति साधकालाही सहज लागते, मग साधूचे गुण अंगीं जडतात व अवगुण जातात. सत्संग यासाठीं साधनांत श्रेष्ठ आहे ( द० ८, स० ९ ).

**शून्यत्वनिरसन :** ज्ञानदशक खरोखर येथेंच संपला. ह्या समासांत सामान्य लोकांत मतामतांचा गलबला कसा माजतो व पुढें ज्ञात्यांतही मतभेद कसे माजतात हें फार चांगले सांगितलें आहे. सत्संगांत ज्यांना शुद्ध आत्मबोध झाला नाहीं त्यांचीं हीं मतें आहेत. बरेच पंडित शेवटीं शून्यापर्यंत जाऊन थडकतात. 'इकडे दृश्य तिकडे देव । मध्यें शून्यत्वाचा ठाव' त्या शून्यालाच ब्रह्म म्हणतात.

**रायास नाहीं वोळखिलें । सेवकांस रावसें कल्पिलें ।**
**परी तें अवघें व्यर्थ गेलें । राजा देखतां ॥ ६७ ॥**

त्याप्रमाणें परब्रह्म देखतां शून्याचा भ्रम दूर होतो. दृश्य सोडावें, शून्य वोलांडावें, मग मूळमायेपरतें देखावें परब्रह्म. शून्यांत द्वैत राहतें, परब्रह्मीं अभिन्नता आहे. ब्रह्मदर्शन वेगळेपणानें होत नाहीं; 'वस्तु आपणचि होणें । ऐसें वस्तूचें पाहणें.' हें खरें देवदर्शन आहे ! 'वस्तुरूप होऊन पाहीं । स्वानुभवें.'

**आपण वस्तु मुळीं येक । ऐसा ज्ञात्याचा विवेक ।**
**येथून हा ज्ञानदशक । संपूर्ण जाहला ॥ ८१ ॥**
**आत्मज्ञान निरूपिलें । यथामतीनें बोलिलें ।**
**न्यूनपूर्ण क्षमा केलें । पाहिजे श्रोतीं ॥ ८२ ॥**

## ९ उत्तरार्धातील महत्त्वाच्या टिप्पणी

**१ निषेधमुखानें ब्रह्म :** 'निराकार म्हणिजे काय ? निराधार म्हणिजे काय ?' याला उत्तर 'निराकार म्हणिजे आकार नाहीं । निराधार म्हणिजे

आधार नाहीं'—अशा प्रकारानें ब्रह्म निराभास, निरवयव, निष्प्रपंच, निरंतन, निरंजन, इ० इ० असें या समासभर सांगितलें आहे! 'तें नाहीं तें नाहीं' याचें हें स्पष्टीकरण आहे. शेवटची ओवी: 'परब्रह्म म्हणिजे सकळांपरतें। तयास पाहतां आपणचि तें। हें कळे अनुभवमतें। सद्गुरु केलिया' (द० ९, स० १).

२ **अहंतानिरास:** ब्रह्मस्वरूप म्ह० तें भगवंताचें निजरूप. 'स्वरूप तें असतचि असे। सर्वकाळ.' तें नामातीत असून त्याला संकेता-साठीं अनंत नामें दिलीं आहेत. त्या अभेदांत अहंता भेद वाढवीत असते! 'मी ब्रह्म आहें' हीही अहंताच आहे. 'असोन निःशेष नसावें। विवेकबळें' (द० ९, स० २).

३ **विडंबन:** 'असोन नसावें' यावर एका टवाळानें कुतर्क काढले. करून अकर्ता, भोगून अभोक्ता याचें वर्म न कळल्यामुळें 'कुटून नाहीं कुटिला, रडोन नाहीं रडला, पतित नसोन जाला, कुंथोन नाहीं कुंथिला' इ० प्रकारें त्यानें आडरान घेतलें व थोर सिद्धान्ताचें विडंबन केलें! विडंबनकाव्य केलें! समर्थांनीं उत्तर दिलें—

> **योगी ओळखावा योगेश्वरें। ज्ञानी ओळखावा ज्ञानेश्वरें।**
> **महाचतुर तो चतुरें। वोळखावा॥ ११॥**

बद्ध आणि सिद्ध सारखे दिसले तरी त्यांत भेद आहे. 'अज्ञान पतित व ज्ञानी जीवन्मुक्त' यांच्यांत काय साम्य आहे? ज्ञानदरिद्री शब्दच चघळायचा! अंधाला सगळेच अंध. राजा वाटेनें जात असतां 'भुंको लागलें श्वान। तरी तें श्वानचि आहे!' सिद्ध अंतरीं शोधला पाहिजे. 'जो ज्ञानें गुप्त झाला। जो विवेकें विराला। जो अनन्यपणें उरला। नाहींच कांहीं' त्याचा महिमा कळावयास अधिकार पाहिजे. टवाळांनीं 'माध्यान्हीं थुंकितां सूर्यावरी। तो थुंका उडे आपणावरी' हें लक्षांत घ्यावें (द० ९, स० ३).

**४ पिंडीं तें ब्रह्मांडीं :** पिंडाचे चार देह तसे ब्रह्मांडाचे चार देह आहेत. पिंडीं अंतःकरण तेंच ब्रह्मांडीं विष्णु; पिंडीं मन तें ब्रह्मांडीं चन्द्रमा; पिंडीं बुद्धि ते ब्रह्मांडीं ब्रह्म; पिंडीं अहंकार तो ब्रह्मांडीं रुद्र; हरिहरब्रह्मा यांचा नियंता कोण त्याचा विचार कळला पाहिजे (द० ९, स० ५).

**५ मूळमायेंतच त्रिगुण** सूक्ष्म रूपानें कसे असतात व पुढें ते स्पष्ट होतांच तिला गुणमाया कसें म्हणतात याचें विवेचन येथें केलें आहे. कणीस जसें उकलून बाहेर पडतें तशी मूळमाया उकलून गुणांस प्रसवते. जाणीव म्ह० सत्त्वगुण, नेणीव तमोगुण व जाणीवनेणीव मिळून रजोगुण. त्रिगुणपंचभूतें हा वायूचा कर्दम—विकार. ते एकमेकांत आहेत. उपाधी-मुळें व भासरूप असल्यामुळें आकाश भूतांत गणिलें जातें, निरुपाधि असतें तर त्यालाच ब्रह्म म्हटलें असतें. पंचभूतांचे विस्तार अखिल प्राणी होत (द० ९, स० ६).

**६ विकल्पनिरसन :** स्थूल आधीं आणि मग अंतःकरण, तसें आधीं ब्रह्मांड आणि मग मूळमाया निर्माण झाली असें कां म्हणूं नये या आशंकेस उत्तर असें आहे : आधीं किडे उत्पन्न होतात व मग त्यांचीं घरें होतात. त्याप्रमाणें आधीं सूक्ष्म मूळमाया झाली आणि मग ब्रह्मांड व त्यांतील अनंत प्राणी निर्माण झाले. यानंतरचा प्रश्न " कोण जन्मास घालतो आणि मागुता कोण जन्म घेतो ? जन्मतो तो कोण ? त्याची कैसी वोळखण ? पुण्याचें कैसें रूप आणि पापाचें कैसें रूप ? वासना जन्मास घालते असें म्हणतात पण अंतःकरणपंचकांच्या अनंतवृत्ति असून तत्त्वांचें गुंथाडें झाले आहे, तरी या गोंधळांत 'कोणें कोणास जन्मविलें कोण्या प्रकारें ?' कोणालाच जन्म नाहीं मग सत्संगाची महती एवढी कशाला वर्णितां ? वाळलें काष्ठ हिरवळत नाहीं त्याप्रमाणें मरोन गेलें तें जन्मासी मागुतें नये. मडकें फुटलें तें फुटोन गेलें तसें मेलेलें मनुष्य पुन्हा जन्मास

येत नाहीं. येथें ज्ञानी व अज्ञानी सारखेच झाले!" याला उत्तर: असें पाषांडमतांत शिरल्यानें कांहीं कोणाचें समाधान होत नाहीं.

**प्रेत्नेवीण कार्य जालें। जेविल्याविण पोट भरलें।**
**ज्ञानेविण मुक्त जाले। हें तों घडेना॥ ३३॥**

जो साधनसायास करून पोटभर जेवील त्याचेंच पोट भरेल, इतरांचें भरणार नाहीं. पोहायला शिकेल तो तरेल, न शिकेल तो बुडेल—तसें ज्यांना ज्ञान झालें ते तरले. 'ज्यांचे बंधन तुटलें तेचि मुक्त.' 'जयांस आत्मज्ञान जालें। तत्त्वें तत्त्व विवंचिलें। खुणेसी पावतांच बाणलें। समाधान.' ज्ञानानें जन्ममरण खंडित होतें. वेदशास्त्र व संतजन हें अनुभवानें सांगत आले आहेत, त्यांच्या मार्गानें जावें म्हणजे कुशंकांचे सारे ढग वितळून जातात. तात्पर्य, ज्ञानी ज्ञानानें मुक्त होतो, अज्ञानी आपल्या कल्पनेनें आपणासच बांधून घेतो. मोक्षाचा उपाय रोकडा आहे, येथें उधारी नाहीं. जाणीवकळा असल्यावांचून कोणी मोकळा होत नाहीं. अमृत पिणाराला मृत्यूची कल्पनाही बाधत नाहीं. 'धाल्याची अनुभवप्राप्ती। भुकेल्यास नाहीं.' विवेकानें आत्मस्थिति प्राप्त होते (द० ९, स० ७).

**वृत्ति ऐसी वाढवावी। पसरून नाहींच करावी।**
**पूर्णब्रह्मास पुरवावी। चहूंकडे॥ ( द० ९, स० ९–३५ )**

**७ अंतरनिष्ठा:** देव वोळखावा येक. 'देव पाहतां निराकार। आपला तों मायिक विचार। सोहंआत्मा हा निर्धार। बाणोन गेला.' साधनें जें साधावें तें आपणचि स्वभावें. 'शोधूं जाणे सकळांसी। परी पाहों नेणे आपणासी' असा एकदेशी पुरुष मुक्त नव्हे. मुक्ताचीं साधनें संपलीं. 'अंजनें ल्यावें अंजन। धनें साधावें धन। निरंजनें निरंजन। कैसें अनुभवावें?' ( द० ९, स० १० ).

**८ सकळांचें अंतःकरण एक का अनेक?** या प्रश्नास समस्तांचें अंतःकरण येक हें उत्तर मिळालें. 'तर मग एकमेकासी मिळत कां नाहीं?

एक जेवला कीं सगळ्यांचें पोट भरावें, एक मेला कीं सगळ्यांनीं मरावें असें कां होत नाहीं? एक सुखी एक दुःखी असें कां होतें? अंतःकरण एक असतें तर एकाचें एकास कळों येतें, कांहीं गुप्त म्हणून चोरतां आलें नसतें. सर्प डसाया येतो व प्राणी भिऊन पळतो असें होतें ना!' ह्या प्रतिप्रश्नास उत्तर: 'अंतःकरण म्हणिजे जाणीव, जाणता स्वभाव, देहरक्षणाचा उपाय. हा सर्वांसच कळतो. सर्प जाणून डंखूं आला, प्राणी जाणून पळाला. 'जाणीवरूपें अंतःकरण। सकळांसी येक हे प्रमाण। जीवमात्रास जाणपण। येकचि असे ॥ एके दृष्टीचें देखणें। एके जिव्हेचें चाखणें। ऐकणें स्पर्शणें वास घेणें। सर्वत्रांस येक.' भिन्न रुचि हा भेदस्वभाव आहे. अंतःकरण म्ह० जाणीव व जाणीव म्हणजे विष्णूचा अंश म्हणून विष्णु जाणीवेच्या रूपानें प्राण्याचें रक्षण करितो. जाणीवेंत उणेअधिकपणा असला तरी जिनसमसाला येक आहे (द० १०, स० १).

**म्हणोन धर्मस्थापनेचे नर। तेही विष्णूचे अवतार।**
**अभक्त दुर्जन रजनीचर। सहजचि जाले ॥ ४२ ॥** (द० १०, स० ४)

९ **पंचप्रळय:** पिंडांत दोन व ब्रह्मांडांत दोन असे चार प्रळय. निद्रा पिंडींची व ब्रह्मांडींची. निद्रा म्ह० हरिहरब्रह्मांची निद्रा. देहान्त म्ह० मरण हा पिंडींचा प्रळय. तिन्ही मूर्तींचा अंत होऊन ब्रह्मांडाचा कल्पान्त होतो तो ब्रह्मप्रळय. पांचवा विवेकप्रळय. 'प्रकृति असतांच विवेक कीजे' त्यास विवेकप्रळय म्हणतात. सूक्ष्म पंचभूतें व त्रिगुण यांची वळलेली जी मूळमाया तिचा लय होऊन शुद्धस्वरूपस्थिति उरते तो विवेक-प्रळय. हा तारक आहे (द० १०, स० ५).

१० **भ्रम:** परब्रह्म आहेच आहे. मध्येंच जो भ्रम भासतो (ब्रह्मांडाची उभारणीसंहारणीरूप) त्याला काळान्तरीं लय आहे. महापुरुष हा भ्रमापरता आहे. 'सृष्टीमध्यें उमजले। ऐसे थोडे' आहेत!

सृष्टींत भ्रम अनेक प्रकारचे आहेत. उन्मत्त द्रव्य सेविलें, भूतें झडपलें, मार्ग चुकले, एक असतां एक वाटलें, हे सारे भ्रमच. दुश्चिन्हें, अपशकुन हे लोकभ्रमांत येतात. ज्ञाते वैभवें दडपले या नांव भ्रम. कर्मठपणाच्या तोऱ्यानें ज्ञानाला तुच्छ लेखणें, ज्ञानबळानें भ्रष्टाचार करणें, समतावादाच्या अभिमानानें मर्यादा सोडून वागणें हे विद्वानांतले भ्रम होत ! देहाभिमान, कर्माभिमान, जात्यभिमान, कुलाभिमान, मोक्षाभिमान हे सारे भ्रम होत. प्रचीतीवीण ज्ञान सांगणें हा भ्रम.

**येक परब्रह्म संचलें । कदापि नाहीं विकारलें ।**
**त्यांवेगळें जें भासलें । तें भ्रमरूप ॥ ९ ॥**
**भ्रमरूप विश्व स्वभावें । तेथें काय म्हणोन सांगावें ?।**
**निर्गुणब्रह्मावेगळें आघवें । भ्रमरूप ॥ ३६ ॥** ( द० १०, स० ६ )

**११ सगुणभक्ति :** निर्गुणज्ञान झालें म्हणून कोणी सगुणोपासनेकडे दुर्लक्ष करील तर तो ना भक्ति ना ज्ञान असें होऊन दोहींकडे नागवेल ! म्हणून उपासना सोडूं नये. भक्ति मात्र निष्काम असावी.

**सांडील सगुणभजनासी । तो ज्ञाता परी अपेशी ।**
**म्हणोनियां सगुणासी । सांडूंचि नये ॥ १८ ॥**
**निःकामबुद्धीचिया भजना । त्रैलोकीं नाहीं तुळणा ।**
**समर्थेंविण घडेना । निःकामभजन ॥ १९ ॥**
**कामनेनें फळ घडे । निःकामभजनें भगवंत जोडे ।**
**फळ भगवंता कोणीकडे । महदंतर ! ॥ २० ॥**

निष्काम भजनानें सामर्थ्य अंगीं चढतें: ‘ भक्तें जें मनीं धरावें । तें देवें आपणचि करावें. ’ भक्ताच्या सर्व कामना पूर्ण होतात. देवाचें व भक्ताचें अशीं दोन्ही सामर्थ्यें एकत्र झालीं कीं त्यापुढें कळिकाळाची मात्रा चालत नाहीं.

**दोन सामर्थ्यें येक होतां । काळास नाटोपे सर्वथा ।**
**तेथें इतरांची कोण कथा । कीटकन्यायें ? ॥ २४ ॥**
**म्हणोन निःकाम भजन । वरी विशेष ब्रह्मज्ञान ।**
**तयास तुळितां त्रिभुवन । उणें वाटे ॥ २५ ॥**
**येथें बुद्धीचा प्रकाश । आणिक न चढे विशेष ।**
**प्रताप कीर्ति आणि यश । निरंतर ॥ २६ ॥**

ह्या ओजस्वी वाणींत समर्थांचा स्वानुभव स्पष्ट दिसत आहे. समर्थ हे आपलें चरित्र व आपल्या आयुर्मानांत प्रगट झालेलें उपासनेचें सामर्थ्य स्पष्ट सांगत आहेत. म्हणून सगुण भजन, त्यावरी ब्रह्मज्ञान आहे तेथें प्रत्ययाचें समाधान आहेच आहे ( द० १०, स० ७ ).

**१२ प्रचीती :**

**प्रचीतीवीण ज्ञान । तेथें नाहीं समाधान ॥...॥**
**माझे उपासनेचा बडिवार । ज्ञान सांगावें साचार ॥...॥**
**म्हणोनी सत्यचि बोलिलें । कर्त्यास पाहिजे ओळखिलें ।**
**मायोद्भवाचें शोधिलें । पाहिजे मूळ ॥** ( द० १०, स० ८ )
**श्रवण मनन निदिध्यास । प्रचीतीनें बाणतां विश्वास ।**
**रोकडा साक्षात्कार सायास । करणेंचि नलगे ॥** ( द०१०, स०९ )

**१३ चंचळ आणि निश्चळ :** निर्मळ निश्चळ निर्गुण परब्रह्माला परमात्मा म्हणतात. 'ऐसें कांहीं येक अचंचळ । तें अचंचळीं भासे चंचळ.' चंचळ ही मूळमाया. मूळमायेलाच सगळीं नांवें आहेत. मूळपुरुष, जगदीश, जगज्ज्योति, सत्ता, प्रकाश इत्यादि सर्व ईश्वरनामें या मूळमायेचीं आहेत. पुरुषनामें, स्त्रीनामें, नपुंसकनामें, अनंत नामें या मूळमायेचीं आहेत. द्रष्टा, साक्षी, अंतरात्मा, सर्वांतरात्मा सर्व कांहीं मूळपुरुष. हा अंतरात्माच अनंत देहांत बसून त्यांना चालवितो. 'तो कळतो परी दिसेना । प्रचीत येते परी भासेना । शरीरीं असे परी वसेना । एके ठाईं.' तो असंख्य

दृष्टींनीं देखतो, रसनांनीं चाखतो. तो सकळ देह चाळवितो. करून अकर्ता, क्षेत्रज्ञ, कूटस्थ सर्व कांहीं हा अंतरात्मा. त्याला ओळखून भजावें व मुख्य परमात्म्याशीं एकरस होऊन उद्धरावें ( द० १०, स० १० ).

या अंतरात्म्याची वोळखण द० ११, स० ७।८ मध्यें सुगम करून दिली आहे ती पहावी. देहाचा चालक जीवात्मा, ब्रह्मांडाचा अंतरात्मा. तोही तत्त्वांमध्यें आला म्हणून तयाउपरी परब्रह्म, त्याला पावावें. अंतरात्मा द० १३, स० १ मध्यें वोळखून घ्यावा.

**१४ मतामतांचा गलबला व चार देव :** ‘येक चंचळ येका निश्चळ’ पण ‘चंचळीं गुंतले सकळ’ असा हा ओघ आहे. ‘निश्चळाच्या गोष्टी सांगती। पुन्हा चंचळाकडे धांवती। चंचळचक्रीं निघोन जाती। ऐसे थोडे’—ब्रह्माच्या गोष्टी सांगतात आणि चंचळांतच वासना गुंतून राहतात, असेच सगळे; चंचळ मायेच्या सपाट्यांतून निसटून जाणारे अत्यंत विरळ ! जगांत नाना पंथ, नाना मतें, नाना रीति, नाना दंडक आढळतात. आचार-विचार भिन्नभिन्न; नाना मतें निर्माण झालीं, नाना बंड-पाखांडें वाढलीं.

**जैसा प्रवाहो पडिला। तैसाचि लोक चालिला।**
**कोण वारील कोणाला। येक नाहीं ॥ १७ ॥**
**देव जाले उदंड। देवांचें माजलें बंड।**
**भूतांदैवतांचें थोतांड। येकचि जालें ॥ २० ॥**
**शास्त्रांचा बाजार भरला। देवांचा गल्बला जाला।**
**लोक कामनेच्या व्रताला। झोंबोन पडती ॥ २३ ॥**
**मतामतांचा गल्बला। कोणी पुसेना कोणाला।**
**जो जे मतीं सांपडला। तयास तेंचि थोर ॥ २४ ॥**
**ऐसें अवघें नासलें। सत्यासत्य हारपलें।**
**अवघें अनावेक जालें। चहूंकडे ॥ २५ ॥**

लोक प्रवाहपतित आहेत. सर्वांना एका दावणींत आणणारा कोणी नाहीं. भूतें आणि देवता एकच करून भोळ्याभावानें भजतात. एकमत नाहीं. लोक भजतात पण आपला संसार चांगला चालावा, वासना पूर्ण व्हाव्यात अशा सकाम इच्छेनें भजतात. देवाला यथार्थ जाणून निष्काम भजन कोणी करीत नाहीं. सर्वत्र अनावेक झालें आहे. नाविक म्ह० कर्णधार, नायक, शास्ता. मतामतांचा विचार केला तर भजकांत चार प्रकारचे लोक आहेत, त्यांनीं देव चार प्रकारचे केले आहेत.

१ **प्रतिमापूजा :** बहुजनसमाज प्रतिमेवर विश्वास ठेवणारा आहे.

२ **अवतारपूजा :** रामकृष्णादि अवतारांचे उपासक. हे देवचरित्रें ऐकून जपध्यानपूजेमध्यें मग्न असतात.

३ **सर्वांतरात्मापूजा :** विश्वचालक, सर्वभूतांच्या अंतरीं राहून सर्वांना चालविणारा, द्रष्टा, साक्षी, ज्ञानात्मा अशा प्रकारें एकेश्वरपूजक आहेत.

४ **निर्गुणब्रह्मानुभवी :** निर्मळ निश्चळ परब्रह्माचे उपासक.

**येक नाना प्रतिमा । दुसरा अवतारमहिमा ।**
**तिसरा तो अंतरात्मा । चौथा निर्विकारी ॥ ३३ ॥**

प्रकृतींतले देव म्हणजे तो प्रकृतीचा स्वभाव. जो ज्याला भजतो तो तद्रूप होतो. सत्यस्वरूप जाणून लोकांत लोकांसारखें वर्तावें.

**अरे जो चंचळासी ध्याईल । तो सहजचि चळेल ।**
**जो निश्चळासी भजेल । तो निश्चळचि ॥ ३९ ॥**
**प्रकृतीसारखें चालावें । परी अंतरीं शाश्वत वोळखावें ।**
**सत्य होऊन वर्तावें । लोकांपैसें ॥ ४० ॥** ( द० ११, स० २ )

‘ ज्याच्या प्रतिमा तो परमात्मा । वोळखावा, ’ ‘ वोळखोनि भजन कीजे’ हें प्रतिमापूजकांनीं लक्षांत ठेवावें म्हणजे झालें ( द० ११, स० ८ ).

**१५ चंचळ नदी गुप्तगंगा :** मायेवर नदीचें रूपक ह्या समासांत केलें आहे. मूळमाया ही चंचळ असून व ब्रह्मांडांना वर्तवीत असून गुप्त आहे म्ह० प्रत्यक्ष कोठें दिसत नाहीं !

**केवळ अचंचळीं निर्माण जाली । अधोमुखें बळें चालली ।**
**अखंड वाहे परी देखिली । नाहींच कोणी ॥ २ ॥**

निर्गुणब्रह्मीं ती उगम पावली असून शुद्धांतून शबलाकडे, सूक्ष्मांतून स्थूलाकडे अशी ती अखंड वाहत आहे, पण तिला अजून कोणी पाहिलें नाहीं ! तिच्यांत अनेक वळणें, वांकणें, भोंवरे असून पाणी फांकीत व खडकांवर आपटत ती अधोमुख वाहत आहे. शुष्क फेंस, खळबळ, तुषार ( फुई ), केरकचरा घेऊन जाणें ( ओसाणें ), धबधबे ( झोतावे ), खडक, बेटें, वळसे सर्व कांहीं या मायानदींत आहे ( वृत्तींच्या अनेक लाटा तिच्यांत उठतात ). मृदुभूमि फाटून जातात व कठिण तशाच राहतात म्ह० सात्त्विक सूक्ष्मलहरी टिकत नाहींत व तामस स्थूळलहरी पर्वतप्राय मोठ्या होतात. सूक्ष्मांतून स्थूलाकडे असा तिचा प्रवाह आहे. ह्या मायानदीच्या प्रवाहाबरोबर कित्येक जीव वाहत जातात. कित्येक वळशांत ( प्रपंचफेऱ्यांत ) पडून खालींवर होतात. कित्येक कामक्रोधाच्या सांकडींत अडकतात, आपटतात, चिरडतात, अहंकाराने फुगून वर येतात !

**कित्येक बळाचे निवडले । ते पोहतचि उगमास गेले ।**
**उगमदर्शनें पवित्र जाले । तीर्थरूप ॥ १० ॥**

कांहीं पुण्यवंत जीव श्रद्धा, बुद्धि, ज्ञान यांच्या बळावर उलट पोहत अंतर्मुख होऊन उगमास जातात व पावन होऊन तीर्थरूप होतात. उगमापाशीं म्ह० मूळमायेच्याजवळ ब्रह्मादिकांचीं मूळस्थानें आहेत, देवदेवता आपल्या शुद्ध स्वरूपांत तेथें असतात, उफराटी गंगा पोहत जातांना त्यांची भेट होते. त्या जळासारखें निर्मळ कांहींच नाहीं.

**महानदी परी अंतराळीं । प्रत्यक्ष वाहे सर्वकाळीं ।**
**स्वर्गमृत्युपाताळीं । पसरली पद्दा ॥ १३ ॥**

अष्टदिशांना तिचें उदक उफाळत आहे. ती सर्वांचें उगमस्थान आहे. जगदीशासारखीच ती परमपावन आहे. त्या उगमाचें जळ ( चैतन्य ) अतिशुद्ध पण चंचळ आहे. तिच्या प्रवाहाचे मोठमोठे फांटे खालीं व वर ( पशुपक्षिकीटादि तामसयोनी, मध्यस्थ मनुष्ययोनी व वर देवयोनी ) सारखे पसरले आहेत. अनंत पात्रांत ( प्राणी ) ती भरली आहे. हें जळ कोठें संसारांत खर्च होतें व कोठें ( संतांच्या ठायीं ) पाझरून ओसरून जातें ! हें सात्त्विकांच्या संगतींत गोड, तामससंगतींत कडू व राजससंगतींत खारट तुरट तिखट होतें ! तें विषांत विष, अमृतांत अमृत, ज्या गुणांत मिळतें त्यासारखें होऊन जातें ! त्या उदकाचा महिमा अगाध आहे, तें अपरंपार आहे.

**उगमापैलीकडे गेले । तेथें परतोन पाहिलें ।**
**तंव तें उदकचि आटलें । कांहीं नाहीं ! ॥ २१ ॥**

जे मायानदी उलट पोहत मूळमायेच्यापलीकडे गेले व निर्गुणब्रह्मीं समरस झाले त्यांना मागें वळून पाहतां मायानदीच आढळत नाहीं ! त्या वृत्तिशून्य योगेश्वरांचा विचार करावा व तसें होऊन जावें ( द० ११, स० ७). ज्ञानेश्वरी अ० ७ मधील मायानदीचें रूपक पहावें. एकचि ओवी देतों: ‘येथ एकचि लीला तरले । जे सर्वभावें मज भजले । तयां ऐलीच थडी सरलें । मायाजळ!’

**१६ नित्यानित्य व सारासार :** ‘देह अनित्य आत्मा नित्य । हाचि विवेक नित्यानित्य.’ जड तितकें अनित्य व सूक्ष्म तितकें नित्य. पांचभौतिक सर्व अनित्य व आत्मा—अंतरात्मा—नित्य हें ओळखणें याला नित्यानित्यविवेक म्हणतात ( द० १३, स० १ ). आतां अंतरात्माही चंचळ असल्यामुळें असार आहे व निर्गुण ब्रह्म तेवढें सार आहे हें जाणणें हा सारासारविवेक. निर्विकल्प निर्गुण परब्रह्माशीं ऐक्यता पावणें हा मोक्ष सारासारविचारानेंच प्राप्त होतो ( द० १३, स० २ ). अनित्य कळण्या-

साठीं सृष्टीची उभारणी व संहारणी ( द० १३, स० ३ व ४ मध्यें ) सांगितली आहे. तेथली सारभूत ओंवी —

**दृश्य हलकल्लोळें नेलें। जडचंचळ वितुळलें।**
**याउपरी शाश्वत उरलें। परब्रह्म तें॥** ( द० १३, स० ४ )

**१७ हरिहरब्रह्मांची काहणी :** हरिहरब्रह्मे अनंतकाळाच्या पोटांत कित्येक होतात आणि जातात तरी एकाकारपणानें शाश्वत परब्रह्मच अखंड राहतें हें दाखविण्यासाठीं समर्थांनीं एक मौजेची काहणी सांगितली आहे ! ' येकें स्त्रीपुरुषें होतीं। उभयतांमध्यें बहुप्रीती। येकरूपेंचि वर्तती। भिन्न नाहीं '—गणेशशारदा, शिवशक्ति, अर्धनारीनटेश्वर, प्रकृतिपुरुष, मूळमाया इ० नांवांनीं अध्यात्मशास्त्रांत प्रसिद्ध असलेलें आद्य जोडपें एकपण न मोडतां दुजेपण दाखवीत परमप्रीतीनें नांदत होतें ( ही ओंवी नीट समजण्यासाठीं ज्ञानेश्वरांच्या अमृतानुभवाचें पहिलें शिवशक्तींचें प्रकरण वाचकांनीं वाचावें). कांहीं काळानें त्या दंपतीस एक पुत्र झाला. तो कार्यकर्ता आणि भला निघाला. पुढें त्यालाही मुलगा झाला. तो बापापेक्षां अधिक उत्साही व अर्धचतुर पण व्यापक कर्ता असा निघाला ! त्याला असंख्य प्रजा झाली, पण त्याचा ज्येष्ठ कुमार अज्ञान, रागीट व संहारकर्ता निघाला. दंपतीचा पहिला मुलगा सर्वज्ञ जाणता व भला; नातू अर्धा जाणता व पणतू तर पुरा नेणता; ' लेक सकळांचें पाळण करी। नातु मेळवी वरच्यावरी। पणतु चुकल्या संहार करी। अकस्मात. ' असा त्यांचा बराच काळ आनंदांत गेला. विस्तार वाढला. घरांत कोणाचें कोणाशीं पटेनासें झालें. घरकलह लागला. बेबंद झालें. नेणपणें भरीं भरले, पण यादव उन्मत्तपणाने परस्परांशीं युद्ध करून सगळेच मेले त्याप्रमाणें ' बापलेक नातु पणतु। सकळांचा झाला निःपातु। कन्यापुत्र हेतुमातु। अणुमात्र नाहीं. ' अशी काहणी उदंड वेळ होत जाते. ' आमची काहाणी

सरो। तुमचे हृदयीं भरो!' 'ऐसी काहाणी निरंतर। विवेकें ऐकती जे नर। दास म्हणे जगदुद्धार। तेचि करिती.'

येथें पुत्र म्हणजे सत्त्वगुणी जाणता विष्णु, नातू म्हणजे सृष्टिकर्ता अर्धा जाणता व अर्धा नेणता असा रजोगुणी ब्रह्मा व पणतू म्हणजे तमोगुणी नेणता रुद्र. हें नीट लक्षांत घेतलें म्हणजे काहणी उलगडते. (द० १३, स० ५)

**१८ कर्ता कोण ?:** कर्ता कोण हें ओळखणें याचें नांव विवेक. प्रत्येकजण आपापल्या उपास्यदेवतेला सृष्टिकर्ता म्हणतो! सृष्टि ऊर्फ माया सर्वांच्या आधीं हें ते विसरतात. सगुण कर्ता म्हणावें तर तो स्वतः कार्यांत येतो, कर्ता निर्गुण म्हणावें तर निर्गुणाला विकार नाहीं! सृष्टि मुळीं मिथ्या आहे. लटक्याचा कर्ता कोण ?

**लटक्याचा कर्ता कोण। हें पुसणेंचि अप्रमाण।**
**म्हणोनि हेंचि प्रमाण। जें स्वभावेंसि जालें॥ ३१॥ (द० १३, स० ८)**

**१९ अखंडध्यान:** 'आधीं देवास वोळखावें। मग अनन्यभावें भजावे। अखंड ध्यानचि धरावें। सर्वोत्तमाचें.' त्या पुरुषोत्तमाला ओळखण्यासाठीं आत्मा कोण व अनात्मा कोण हें पहावें. आत्मा द्रष्टा अंतरसाक्षी प्राणिमात्रांचा. तो 'देव वर्तती जगदंतरीं। तोचि आपुले अंतरीं.' तो अंतरात्मा 'मुळीं पाहणार येकला। सकळां ठाईं विभागला। देहप्रकृतीने जाला। भिन्नभिन्न.' तो सर्वांतर्यामी देव सर्वांना संतुष्ट करून प्रसन्न करावा. सज्जन दुर्जन हा देहसंबंध आहे, पण आत्मत्वीं अभेद आहे.

**नयनेंचि पाहावा नयन। मनें शोधावें मन।**
**तैसाचि हा भगवान। सकळां घटीं॥ २१॥**
**सहज सांडून सायास। हाचि कोणी येक दोष।**
**आत्मा सांडून अनात्म्यास। ध्यानीं धरिती॥ २५॥**

देह देऊळ, आत्मा देव, म्हणून देव वोळखोन जीव तेथेंचि लावावा. असें अखंड ध्यान धरावें. दंडकध्यान काय कामाचें? कल्पनेचा देव तारक होत

नाहीं. लोकांत दंडकध्यानाचाच प्रचार आहे. 'पिळेसी आई!' दंडक=लोकरीत, रूढी.

**ध्यान धरितें तें कोण । ध्यानीं आठवतें तें कोण ।**
**दोनीमध्यें अनन्यलक्षण । असिलें पाहिजे ॥ ३८ ॥**

अनन्य सहजच आहे. साधकानें अनन्यता शोधून अनुभवावी (द० १४, स० ८).

२० **निर्गुण :** अखंडध्यानाच्याही पुढें गेलें पाहिजे. पिंडीं आत्मानात्मविवेक व ब्रह्मांडीं सारासारविवेक करावा व शाश्वताला पावावें.

**देव अंतरात्मा सगुण । सगुणें पाविजे निर्गुण ।**
**निर्गुणज्ञानें विज्ञान । होत आहे ॥ १३ ॥ (द० १४, स० ९)**

२१ **दृष्टान्तांची गर्दी :** 'माया दिसे परी नासे, सत्य वाटे परी मिथ्या असे' हें दाखविण्यासाठीं समर्थांनीं एक समासभर दृष्टान्तांची नुस्ती गर्दी केली आहे. ती पाहतां त्यांच्या व्यापक प्रतिभेची धन्यता वाटते. दारेचे स्वप्नविलास व हावभाव, गंधर्वनगरे, रायविनोदाची (बहुरूप्याची) लक्ष्मी, दसऱ्याच्या सोन्याच्या लगडी, मेल्याचा महोत्सव, लक्ष्मी नांवानें राखेला किंवा भारदोरीला हाक मारणें, शुभानळूला (गोवऱ्या थापणाऱ्या बाईला) सरस्वती म्हणणें, घरीं अन्न खायला नसून देव्हाऱ्यांतल्या देवीला अन्नपूर्णा म्हणणें, कुत्र्याचें नांव वाघोबा, पुत्राचें नांव इंद्र, कुरूप स्त्रीला सुंदरी, मूर्खाला सकळकळाप्रवीण, रासभीला कोकिळा—'मातंगीचें नाम तुळसी । चर्मिकेचें नाम काशी । बोलणें अतिशूद्रिणीसी । भागीरथी ऐसें' इ० इ० ! (द० १४, स० १०)

**ज्ञानी भिडेनें दडपला । निश्चळ परब्रह्म कैंचें त्याला ? ।**
**उगाच करितो गलबला । मायेमध्यें ॥ (द० १५, स० ४)**

जडचंचळांच्या भिडेनें दडपलेला शब्दज्ञानी.

**कर्म उपासना आणि ज्ञान। त्रिकांड वेद हें प्रमाण।**
**ज्ञानाचें होतें विज्ञान। परब्रह्मीं ॥ (द० १५, स० ५)**

**२२ पंचभूतात्मक दैवतें :** सोळाव्या दशकांत समर्थांनीं अनेकांना धन्यवाद दिले असून त्यांच्याविषयीं कशी कृतज्ञताबुद्धि ठेवावी हें दाखविलें आहे. वाल्मीकि, सूर्य, वसुमती (पृथ्वी), आपोनारायण, वैश्वानर, वायुदेव, आकाश म्ह० अंतरात्मा यांच्या स्तवनांत पहिले सात समास खर्ची घातले आहेत. पृथिव्यादि पंचभूतांचें व्यापकपणें स्वरूपवर्णन केलें आहे. शिवाय वाल्मीकि, सूर्य व वायुनंदन मारुति यांच्या स्तवनांत त्यांची रामभक्ति व्यक्त झाली आहे. वाल्मीकि रामचरित्रकार म्हणून, सूर्य रामाचा पूर्वज म्हणून व मारुति रामभक्ताग्रणी म्हणून तिघांचेंही गौरव समर्थांनीं रामप्रेमानें केलें आहे. पृथ्वीस्तवनांत ‘नाना अवतारपंगती’ भूमंडळावरी’ असें म्हणून ‘सध्या रोकडें प्रमाण। कांहीं करावा नलगे अनुमान’ असें म्हटलें आहे. यावरून समर्थ आपल्या काळच्या कांहीं प्रतापी व पुण्यवंत लोकांना अवतारी मानीत होते असें स्पष्ट दिसतें ! वैश्वानरु म्ह० तमहिमरोगहर्ता अग्नि हा ‘रघुनाथाचा श्वशुर व जानकीचा पिता’ म्हणून त्यांना प्रिय होता. यांतही त्यांचें उपासनाप्रेम व्यक्त होतें. लग्नप्रसंगीं व यात्राप्रसंगीं लोक शोभेची दारू उडवीत व ‘घरोघरीं वैश्वदेव चालती। नानाक्षेत्रीं दीप जळती’ असा लोकाचार होता असें त्यांनीं अग्निवर्णनांत म्हटलें आहे. वायुवर्णनांत पुढील ओव्या आहेत —

**ऐसा हा समर्थ पवन। हनुमंत जयाचा नंदन।**
**रघुनाथस्मरणीं तनमन। हनुमंताचें ॥ ६–२४ ॥**

**हनुमंतास बोलिजे प्राणनाथ। येणें गुणें हा समर्थ।**
**प्राणेंविण सकळ व्यर्थ। होत जातें ॥ २५ ॥**

**म्हणोनि प्रतापी थोर। हनुमंत ईश्वरी अवतार।**
**याचा पुरुषार्थ सुरवर। पाहतचि राहिले ॥ २९ ॥**

**दैत्य अवघे संहारिले । देव तत्काळ सोडिले ।**
**प्राणिमात्र सुखी जाले । त्रैलोक्यवासी ॥ ३४ ॥** ( द० १६ )

**२३ 'एक चौदा पांच चारी':** एक म्हणजे निश्चळ परब्रह्म. चौदा म्ह० मूळमायेचीं चौदा नांवें, पांच म्हणजे पंचमहाभूतें व चार म्हणजे चारी खाणी चारी वाणीचे अनंत जीव. हे 'चारी जिनस' नीट उमजून घ्यावेत. ह्या २४ पदार्थांपैकीं २३ जडचंचळांतले व एक निश्चळ ब्रह्म. मूळमायेचीं चौदा नांवें चैतन्य, गुणसाम्य, अर्धनारीनटेश्वर, षड्गुणेश्वर, प्रकृतिपुरुष, शिवशक्ति, शुद्धसत्त्व, गुणमाया, सत्त्वरजतम व मन, माया, अंतरात्मा हीं होत. मूळमाया कर्दमरूप असून तिला हीं चौदा नांवें आहेत. 'मुळींहून सेवटवरी । विस्तार बोलिला नानापरी । पुन्हा विवरत विवरत माघारी । वृत्ति न्यावी.' मूळ चतुर्दश पाहिलेच पाहावें.

**अजपाजप व पंचीकरण:** हे विषय १७ व्या दशकांत आहेत. पंचीकरण १७ व्या समासांत सांगितले आहे. हा विषय मी आपल्या 'सार्थ दासबोध' ह्या ग्रंथांत अर्थद्वारां सुलभ केला असून तेथें स्थूलसूक्ष्म-देहांतील तत्त्वांचीं कोष्टकेंही दिलीं आहेत.

**२४ नाना उपासना:** अनेक देवदेवतांचीं भजनेंही अंतरा-त्म्याला म्ह० मुख्य देवाला पावतात —

**श्रोता—पृथ्वीमध्यें लोक नाना । त्यांस नाना उपासना ।**
**भावार्थें प्रवर्तले भजना । ठाईं ठाईं ॥ १ ॥**
**आपुल्या देवास भजती । नाना स्तुतिस्तवनें करिती ।**
**जे ते निर्गुण म्हणती । उपासनेसी ॥ २ ॥**
**याचा कैसा आहे भाव । मज सांगिजे अभिप्राव ।**
**वक्ता—अरे हा स्तुतीचा स्वभाव । ऐसा आहे ॥ ३ ॥**
**निर्गुण म्हणिजे बहुगुण । बहुगुणी अंतरात्मा जाण ।**
**सकळ त्याचे अंश हें प्रमाण । प्रचीत पहा ॥ ४ ॥**

सकळ जनांस मानावें तें । येका अंतरात्म्यास पावतें ।
अधिकारपरत्वें तें । मान्य कीजे ॥ ५ ॥

श्रोता (म्हणे)—हा अनुमान ! । मुळीं घालावें जीवन ।
तें पावे पानोपान । हे सद्यः प्रचीती ॥ ६ ॥

वक्ता (म्हणे)—तुळसीवरी । उदक घालावें पात्रवरी ।
वरी न थिरे निमिषवरी । भूमीस भेदे ॥ ७ ॥

श्रोता—थोरा वृक्षास कैसें करावें ? । सेंड्या पात्र कैसें न्यावें ? ।
याचा अभिप्राय देवें । मज निरोपावा ॥ ८ ॥

वक्ता—पर्जन्याचें उदक पडतें । तें तों मूळाकडेच येतें ।

श्रोता—हातचि पावेना तेथें । काय करिती ? ॥ ९ ॥

सकळांस मूळ सांपडे । ऐसें पुण्य कैंचें घडे ? ।
साधुजनांचे पवाडे । विवेकीं मन ॥ १० ॥

वक्ता—तथापि वृक्षांचेनि पडिपाडें । जीवन घालितां कोठें पडे ।
ये गोष्टीचें सांकडें । कांहींच नाहीं ॥ ११ ॥ (द० १६, स० ९)

देवदेवता भूतें दैवतें । मुळींचें सामर्थ्य आहे तेथें ।
अधिकारें नाना दैवतें । भजत जावीं ॥
नानादेवीं भजन केलें । तें मूळपुरुषासी पावलें ।
याकारणें सन्मानिलें । पाहिजे सकळ कांहीं ॥
कर्तृत्व वेगळें करावें । मग त्या देवासी पहावें ।
तरीच कांहींयेक पडे ठावें । गौप्यगुह्य ॥

**२५ उपासनेचें रहस्य :** पंधराव्या दशकाच्या शेवटच्या तीन समासांत उपासनेचें रहस्य सर्वांस समजेल व पटेल अशा सुबोधरीतीनें सांगितलें आहे, तिकडे आपण पाहून हा विषय समाप्त करूं. उपासनेची कड म्ह० अंतरात्मा, मूळमाया, परमेश्वर, मूळपुरुष ही होय. पलीकडे शुद्ध ब्रह्म व अलीकडे सृष्टि. अंतरात्मा हा मधला दुवा. ज्ञान, भक्ति

योग, उपासना या सर्वांच्या साह्यानें ह्या महाद्वारापर्यंत पोंचायचें आहे. शबलब्रह्म हें, सगुण हें, उपास्यांचें उपास्य हें, हरिहरब्रह्माचें विश्रांतिस्थान हें. सर्वभूतनिवास, सर्वभूतांतरात्मा, कर्माध्यक्ष, साक्षी, निर्गुण, सर्व कांहीं हें. देवोदेवींचें मूलस्वरूप हा अंतरात्मा. याच्यापलीकडे शुद्धब्रह्म. अंतरात्मा देव पाहूं. रामकृष्णादि अवतारांच्या उपासना जगांत चालू आहेत, तथापि ‘ सकळ देवांचें मूळ । तो हा अंतरात्माचि केवळ. ’ नाना देव, नाना शक्ति, नाना भोग, नाना कर्तृत्व यांचे बीज हा अंतरात्माच ( परमेश्वराचीं अनंत नांवें व वर्णनें व स्तुतिस्तोत्रें सारीं या अंतरात्म्याचीं ). सर्वांची—देवदेवांची व जीवमात्रांची भोगप्राप्ति या अंतरात्म्यालाच घडते. नाना देहांत तो नाना रंग खेळतो. भोगी, त्यागी, वीतरागी तो. माणसें देहाकडेच पाहतात व या अंतरात्म्यास चुकतात हें नवल आहे. त्याचें अनुसंधान पुण्यवंतांशिवाय राहणे कठिण आहे. ‘ अंतर्निष्ठ तितुके तरले । अंतर्भ्रष्ट तितुके बुडाले. ’ आतां अंतरात्म्याला ओळखायची खूण सांगतात. अणुरेणूपेक्षांही अत्यंत सूक्ष्म जीव विश्वांत आहेत. त्यांच्या मानानें त्यांचे आकार, युक्तिबुद्धि, ज्ञान, इन्द्रियें, विषयभोग सूक्ष्मच आहेत. सर्व जीवांत जीवेश्वराची वस्ति आहे. लहान किडेही ज्यांना पर्वताएवढे भासतात असे सूक्ष्म जंतु आहेत. पशुपक्षी, मत्स्य, सर्वांची एकच तऱ्हा. ‘ पक्ष्याएवढें थोर नाहीं । पक्ष्याएवढें लहान नाहीं ’– म्हणजे सूक्ष्म जीवांच्या मानानें कावळा मोठा आहे व गरुडासारख्या जीवांच्या मानानें लहान आहे. नाना वर्ण, नाना रंग— अशीं चढतीं वाढतीं शरीरें असंख्य आहेत. कांहीं सुंदर, कांहीं बेढब, कांहीं कोमल, कांहीं कर्कश, कांहीं वोंगळ, कांहीं देदीप्यमान, कांहीं भेकड, कांहीं उग्र ! जलांत मत्स्यादि अनेक जातींचे जीव आहेत. कांहीं प्राणी पक्ष फुटल्यावर जे उडतात ते पुन्हा पृथ्वीला स्पर्शत नाहींत. खेचर, भूचर, जलचर, वनचर वगैरे ८४ लक्ष योनींचे अनंत जीव कोणी

सांगावेत ! कित्येक इच्छादेह किंवा आपदेह आहेत. भगवंताची लीला अगाध आहे. ' शरीरभेदें आहारभेदें । वाचाभेदें गुणभेदें । अंतरीं वसिजे अभेदें । येकरूपें. ' पोटापुरती अल्पस्वल्प विद्या शिकून माणसें गर्वानें ताठ होतात, पण ह्या सर्वांतर्यामी ज्ञानस्वरूप परमेश्वराची थोरवी कोण पहातो? त्याचा महिमा अतर्क्य आहे. आपल्या देहांतील आपल्याला कळत नाहीं, मग पिंडब्रह्मांडांतील अमित जीवांचें काय कळणार आहे ? तथापि अल्पज्ञानानें जीव उतावळे व अहंकारी होतात हें नवल आहे. अणुप्राय जीवांच्या दृष्टीने आम्ही विराट् आहोंत, त्यांच्या हिशेबें आम्ही मार्कंडेयासारखे चिरंजीव आहोंत ! त्या सर्वांचे जीवनक्रम पाहणारे कोण आहेत? परमेश्वराची करणी धन्य आहे. अशा या अंतरात्म्यास ' विवेकें धुंडावें हें उत्तमोत्तम ' ( स० ८ ).

**रेणूहून सूक्ष्म किडे । त्यांचें आयुष्य निपटचि थोडें ।**
**युक्ति बुद्धि तेणेंचि पाडें । तयांमध्यें ॥ ९ ॥**
**त्यापुरतें त्यांचें ज्ञान । विषय इंद्रियें समान ।**
**सूक्ष्म शरीरें विवरोन । पाहतो कोण ? ॥ १० ॥**
**मुंगीसमान शरीरें । उदंड असती लहान थोरें ।**
**समस्तांमध्यें जीवेश्वरें । वस्ति कीजे ॥ ११ ॥**
**नाना क्षेत्रीं नाना किडे । त्यांस भासती पर्वताएवढे ।**
**आयुष्यहि तेणेंचि पाडें । उदंड वाटे ॥ १२ ॥**
**पक्ष्यायेवढें लहान नाहीं । पक्ष्यायेवढे थोर नाहीं ।**
**सर्प आणि मत्स्य पाहीं । येणेंचि न्यायें ॥ १३ ॥**
**मुंगीपासून थोरथोरें । चढतीं वाढतीं शरीरें ।**
**त्यांचीं निर्धारितां अंतरें । कळों येती ॥ १४ ॥**
**नाना वर्ण नाना रंग । नाना जीवनांचे तरंग ।**
**येक सुरंग येक विरंग । किती म्हणोन सांगावें ? ॥ १५ ॥**
**येक सुकुमारें येक कठोरें । निर्माण केलीं जगदीश्वरें ।**
**सुवर्णासारिखीं शरीरें । दैदीप्यमानें ॥ १६ ॥**

असो. त्या अंतरात्म्याचा--परमेश्वराचा आणखी थोडा विचार करूं. सर्व शरीरांत अंतरात्मा आहे. ईश्वर सर्वभूतांच्या हृदयांत आहे. देह अनेक पण सर्वांतर्यामी देव एक. रक्तरेतापासून देह होतात, पण त्यांचा अंतरात्मा एकच आहे. मोडे आणि वाढे हें देहाकडे. बीजफळन्यायानें घडामोड चालली आहे. बीज ( पृथ्वी ) व उदक मिळालें कीं अंकुर येतात. बीजापासून मुळ्या पृथ्वींत खोल जातात, व अग्रें वर आकाशांत हेलावतात. मुळ्या पाताळीं व अग्रें अंतराळीं धांवतात. 'नाना पत्रीं पुष्पीं फळीं । लिगडलीं झाडें.' मागें पहात चला. फळांवडील सुमनें ( पुष्पें ), सुमनांवडील पानें, पानांवडील काष्ठें, काष्ठांवडील मुळ्या, मुळ्यांवडील उदक, ( उदक आळून पृथ्वी होते ). या सकळांवडील पृथ्वी, पृथ्वीवडील आप, आपावडील तेज, तेजावडील वायु, वायुवडील आकाश ( स्वभाव अंतरात्म्याचा ). तात्पर्य सकळांवडील अंतरात्मा. तो चित्तांत ठेवून त्या देवाशीं अनन्य झालें म्हणजे प्रकृतीचे स्वभाव पालटूं लागतात. तो वडील म्ह० अंतरात्मा जेथें चेतला तो भाग्यवंत, तो जाणता.

**तया नारायणाला मनीं । अखंड आठवावें ध्यानीं ।**
**मग ते लक्ष्मी तयापासुनी । जाईल कोठें ? ॥ ( द० ९ )**

**नारायण असे विश्वीं । त्याची पूजा करीत जावी ।**
**याकारणें तोषवावी । कोणी तरी काया ॥**

**उपासना शोधून पाहिली । तों ते विश्वपाळिती जाली ॥**

त्या देवाला, त्या अंतरात्म्याला, त्या नारायणाला अखंड स्मरावें, मग त्याची ती अंगभूत लक्ष्मी ( शक्ति, प्रकृति ) त्याला सोडून कोठे जाईल ? नारायणाला जपावें कीं लक्ष्मी त्याच्यासवें आहेच. नारायण विश्वांत भरून उरला आहे, त्याची पूजा करावी म्ह० त्याला सर्वांभूतीं भजावें. सर्व भूतांचा संतोष म्ह० विश्वात्म्याचा संतोष. भूतांना सुखविणें, त्यांचा प्रतिपाल करणें, त्यांच्या कल्याणार्थ झटणें. याप्रमाणें उपासनेचें मूळ

शोधून पाहतां उपासना विश्वपाळिती दिसून आली. 'विश्वं विष्णुः.' सर्व देहांत नारायणाची व्याप्ति असल्यामुळें त्यांना समाधानसुख देणे ही त्या देवाची पूजा आहे. 'उपासना सर्वांठायीं । आत्माराम कोठें नाहीं?' हीच माझी रामाची उपासना आहे. ही 'नेऊन घाली निरंजना । पैलीकडे'—अंतरात्मा, नारायण, राम याची ही उपासना मूळमायेपलीकडचें निरंजन ( अंजन म्ह० माया, मायातीत ) निर्मळ विमळ परब्रह्म तेथें नेऊन सोडते. कर्म, ज्ञान, शास्त्रें, साधनें सर्व कांहीं त्या अंतरात्म्याच्या प्रसन्नतेसाठीं आहेत. उपासना ज्ञानांत लीन होते व ज्ञानाचें विज्ञान होतें ( सायुज्यता प्राप्त होते ). आवाहन ( मूळमायेपासून ब्रह्मांडाची उभारणी ) व विसर्जन होऊन स्वरूपस्थिति अनुभवास येते ( स० ९ ).

**विवरतां विवरतां सेवटीं । निवृत्तिपदीं अखंड भेटी ।**
**जालियानें तुटी । होणार नाहीं ॥ ८ ॥**
**वडिलांस शोधून पाहिलें । तों चंचळाचें निश्चळ जालें ।**
**देवभक्तपण गेलें । तये ठाईं ॥ १० ॥**

अज्ञानशक्ति निरसली, ज्ञानशक्ति मावळली, याचेंच नांव 'शक्तिपात!' महावाक्याचा विचार संन्यासी यांनीं किंवा दैवी कृपा ज्यांच्यावर झाली आहे त्यांनीं केला आहे.

**अवघें समजलें हें घडेना । शास्त्राशास्त्रांसी पडेना ।**
**अनुमानें निश्चय होयेना । कांहीं एक ॥ २२ ॥**

**समजणें तें विवेकाचें । तेंही आत्म्याविण कैंचें ।**
**कोणीयेकें जगदीशाचें । भजन करावें ॥ २७ ॥**

**उपासनेचा मोठा आश्रयो । उपासनेवीण निराश्रयो ।**
**उदंड केलें तरी जयो । प्राप्त नाहीं ॥ २९ ॥**

**समर्थाची नाहीं पाठी । तयास भलताच कुटी ।**
**याकारणें उठाउठी । भजन करावें ॥ ३० ॥**

**भजन साधन अभ्यास । येणें पाविजे परलोकास ।**
**दास म्हणे हा विश्वास । धरिला पाहिजे ॥ ३१ ॥**

(द० १६, स० १०)

' निर्माण वेगळें करून ' जगदीशाला पाहिलें पाहिजे. त्याचें अखंड ध्यान करावें, त्याचे गुणानुवाद गावेत, त्याच्याविषयींच संवाद व संभाषण तदंशेंचि करावें.

**उपासनेचे शेवटीं । देवा भक्ता अखंड भेटी ।**
**अनुभवी जाणेल गोष्टी । प्रत्ययाची ॥ ३० ॥** (द० १८, स० २)

मायामोहाची निद्रा संपली, जागृति आली—

**ज्ञाता तत्त्वें सांडूनि पळाला । तुर्येपैलीकडे गेला ।**
**आत्मनिवेदनें जाला । ब्रह्मरूप ॥ २४ ॥** (द० १८, स० ९)

परब्रह्म एकजिनसी आहे. ( द० २०, स० २ )

उपासना ज्ञानस्वरूप आहे. 'उपासना म्हणजे ज्ञान, ज्ञानें पाविजे निरंजन '—' उपासना आपणचि आहे. ' ( द० २०, स० ४ )

**परब्रह्म तें येकलें । येकदाचि सकळांसि व्यापिलें ।**
**सकळांस स्पर्शोन राहिलें । सकळां ठाईं ॥** (द० २०, स० १०)

**जालें साधनाचें फळ । संसार जाला सफळ ।**
**निर्गुण ब्रह्म तें निश्चळ । अंतरीं बिंबलें ॥ २६ ॥**
**भक्तांचेनि साभिमानें । कृपा केली दाशरथीनें ।**
**समर्थकृपेचीं वचनें । तो हा दासबोध ॥ ३० ॥**

(द० २०, स० २० )



## ८ अध्यात्मादि स्फुट काव्यें



**रूप रामाचें पाहतां । मग कैंची रे भिन्नता ॥ १ ॥**
**दृश्यअदृश्यावेगळा । राम जीवींचा जिव्हाळा ॥ २ ॥**
**वेगळीक पाहतां कांहीं । हे तों मुळींच रे नाहीं ॥ ३ ॥**
**रामदासीं राम होणें । तेथें कैंचें रे देखणें ॥ ४ ॥**

समर्थांचीं अध्यात्मउपासनादि परमार्थविषयक कांहीं स्फुट काव्यें आहेत त्यांची ओळख प्रस्तुत प्रकरणांत करून द्यावयाची आहे. हीं काव्यें परमार्थाच्या अभ्यासकाला अतिशय उपयोगाचीं आहेत. हीं सारींच बोधप्रद, मनोहारि असून त्यांतील बहुतेक वाचकांस स्वानंदसुखाच्या राशीवर बसविणारीं आहेत. यांतील विषय दासबोधांतीलच असून अगदीं सुलभ व धांवत्या भाषेंत सांगितले आहेत. चारपांच ठिकाणीं दासबोधाचे उल्लेख केले आहेत. समर्थांच्या शिकवणींत आडपडदे कोठेंही नसतात; बोल साधे, प्रचीतीचे, निर्भीड व खणखणीत असतात. दासबोधाचे पाठ करणारांच्या मननसुखार्थ व स्वात्मारामाला रिझविण्यासाठीं हीं लघुकाव्यें लिहिलेलीं आहेत. समर्थांचीं हीं प्रकरणे पाहतांना वाचकांनीं मुकुंदराजांचे परमामृत व नाथांचीं चतुःश्लोकी भागवत, हस्तामलक, स्वात्मसुख, आनंदलहरी इ० स्फुट प्रकरणे अवश्य पहावींत. प्रस्तुत प्रकरणांत समर्थांच्या १६ स्फुट काव्यांचा वाचकांस परिचय होईल. शेवटीं प्रस्तुत काव्यांतीलच कांहीं बोधमौक्तिकें एकत्र दिलीं असून समर्थांनीं आत्मसमाधानाचे व धन्यतेचे उद्गार वेळोवेळीं काढलेले दिले आहेत. दासबोध व स्फुट काव्ये मिळून या दोन्ही प्रकरणांत समर्थांनीं जगाला दिलेला परमार्थ संपूर्ण आला आहे. आतां पुढील प्रकरणांत मनोबोधाची वोळखण करून देऊं व समर्थांचे राजकारण व समाजकारण यांवरील शिकवणींचा त्यापुढें स्वतंत्रपणें विचार करूं.

१ पंचवीस प्रश्न व पंचीकरणादि अभंग ( अभंग २६० ), २ बारा ओव्याशतकें ( ओवी १२१८ ), ३ पूर्वारंभ (ओवी ६०), ४ अंतर्भाव (समास ६, ओवी १२०), ५ सगुणध्यान व निर्गुणध्यान ( ओवी २७+११९+१७५ ), ६ आत्माराम ( समास ५, ओवी १८३ ), ७ चतुर्थमान ( मान ४, श्लोक १०० ), ८ पंचमान ( मान ५, श्लोक १३४ ), ९ मानपंचक ( समास ५, श्लोक १०० ), १० जनस्वभाव गोसावी ( ओवी ७० ), ११ पंचसमासी ( समास ५, ओवी १५१ ), १२ सप्तसमासी ( समास ७, ओवी २११ ), १३ जुनाट पुरुष व त्याची कन्या ( ओवी ५७ ), १४ षड्रिपु-निरूपण ( श्लोक ९६ ), १५ पंचीकरणयोग ( समास ५, श्लोक १०० ), १६ पांगुळ ( चौक ७ ), १७ सुविचारसंग्रह ऊर्फ मोत्यांचे दाणे, १८ आत्मसमाधान व धन्यता.

## १ पंचवीस प्रश्न व पंचीकरणादि अभंग

ह्या प्रकरणांत २५० वर अभंग आहेत. दासबोधानंतर त्यांतीलच

### १ अभंगांचें स्वरूप

मुख्य पण गहन विषय अधिक सुलभरीत्या शिष्यश्रोत्यांच्या मनावर बिंबवण्यासाठीं हे सांगितलेले दिसतात. दासबोधाची मांडणी ग्रांथिक आहे. हे अभंग लीलेनें मुखांतून निघालेले समर्थांचे सहजोद्गार आहेत. रोज रात्रीची आरती व भजन झाल्यावर श्रोत्यांना अभंग-ओवीरूपानें निरूपण ऐकविण्याचा समर्थांचा परिपाठ होता. अशाच प्रसंगानें हे अभंग समर्थांना स्फुरलेले दिसतात. हे आहेत अभंग पण समर्थ यांना ओवी म्हणतात. साडेतीनचरणी ओवी व अभंग एकच असतात. यांत दुसऱ्या व तिसऱ्या चरणांत यमक असतें, पहिला व चौथा मोकळे असतात. ‘सदा माझे डोळां । जडो तुझी मूर्ती ।। रखुमाईच्या पती । सोयरीया’ ह्या तुकोबांच्या अभंगाच्या चरणाची चाल व या सर्व अभंगांची चाल एकच आहे. हे अभंग सोपे, सफाईदार व प्रासादिक आहेत. देव कोण व त्याच्या प्राप्तीचीं साधनें कोणतीं हें जनांना सहज समजावें या हेतूनें हे अभंग सांगितले आहेत. यांत अभंगांचे चरण ३ पासून ३० पर्यंत आहेत. अभंगाच्या शेवटच्या चरणांत ‘रामदास’ या नांवाचा शिक्का आहे.

**ओवीचेनि मिसें देव आठवावा। हृदयीं धरावा सर्वकाळ १**
**सर्वकाळ मनीं स्वरूपाचा छंद। तेणें भवबंध तुटतील २**
**भक्ति भावें घडे सगुणा देवाची। संगती देहाची जंव आहे ४**
**आहे देह तंव सगुणीं भजावें। स्वस्वरूप व्हावें आपणचि ५**
**आपणचि देव आपणचि भक्त। संतसंगें मुक्त आपणचि ६**

*  *  *  *

**ओवीचेनि मिसें स्वरूपासि जावें। सत्वर पावावें समाधान १**
**समाधान नाहीं स्वरूपावांचोनी। म्हणोनियां मनीं तेंचि असो २**
**तेंचि असो रूप निर्गुण रामाचें। सुख विश्रामाचें समाधानीं ३**
**दुःख शोक नाहीं राम आठवितां। अमृत सेवितां मृत्यु नाहीं ६**
**नाहीं जन्ममृत्यु अभेदभक्तासी। रामीरामदासीं अनुभव ७**

या दोन अभंगांवरूनही या सर्व अभंगांची घडण कशी आहे तें कळेल व समर्थांची उपदेशपद्धति व अध्यात्मपरता वाचकांचे ध्यानीं येईल.

ह्या प्रकरणांत शिष्यानें प्रथम २५ प्रश्न केले आहेत व त्यांचीं उत्तरें गुरूनें आधीं एका अभंगांत व नंतर सविस्तर सर्व प्रकरणभर दिलेलीं आहेत. प्रश्न अशा प्रकारचे आहेत. जीव हा कवण व शिवाचें लक्षण काय; अनात्मा, आत्मा व परमात्मा कशाला म्हणतात; प्रपंचाचा संच व विसंच म्हणजे उभारणी व संहारणी कोण करितो; विद्या, अविद्या, मूळमाया, आद्यस्वरूप यांचीं स्वरूपें काय; शून्य व चैतन्य कोणतें; जाणता कोण; सगुण, निर्गुण व ब्रह्म यांच्या खुणा कोणत्या; अनन्य समाधान कसें प्राप्त होतें;—ह्या प्रश्नांच्या **उत्तरांत** सारें अध्यात्मशास्त्र आलें आहे. पण एखादा शास्त्रग्रंथ वाचणें व समजणें कठिण वाटतें, तसा प्रकार येथें नाहीं. हे अभंग समजायला सोपे व गुणगुणायला मधुर आहेत. संतांची हीच तर बहादुरी आहे कीं, बिकट वेदान्त त्यांनीं सोपा केला आहे व जीवांच्या आत्यंतिक कल्याणाच्या उदार हेतूनें तो मधुर करून सांगितला आहे. त्यांनीं स्वतः वेदान्त पचविला व जीवांच्या करुणेनें

त्यांना उमजेल व पचेल असाच त्या वेदान्ताचा मोदक बनवून त्यांच्या हातीं दिला. पंचवीस प्रश्नांचीं उत्तरें एखादा तर्ककर्कश वाचक क्रमानें पाहूं जाईल तर त्यास आयास पडतील, पण समर्थांच्या ओघवती वाणी-बरोबर श्रद्धा व प्रज्ञा यांनीं युक्त असा वाचक वाहवूं लागला तर तो आत्मसमाधानाच्या महासागरांत अचूक जाऊन मिळेल व सर्व प्रश्न या ज्ञानामृतांत विरघळून गेल्यानें तो आत्मानंदांत डोलूंच लागेल ! ह्या अभंगांत समर्थांनीं आत्मज्ञान, सत्संगाची महती, पंचीकरण, पंचप्रळय, अष्टदेह, अष्टसृष्टि, देवाचा शोध, सगुणनिर्गुणविवेक, निर्विकल्प ब्रह्माचें स्वरूप, श्रवणनिरूपणाची आवश्यकता, उपासना व ज्ञान, प्रचीतीचें ज्ञान, रामनामाची महती व अनुभव, वैराग्याचें स्वरूप, रामभक्ति, रामाची प्रार्थना, रामभक्ताची राहणी हे सर्व विषय प्रेमळपणानें मांडले आहेत. हे सारे अभंग वारंवार पहावे व त्या आरशांत आपलें स्वरूप ओळखून स्वात्मसुखांत अखंड रमावें. सर्व प्रकरणाचा येथें प्रपंच करूं गेल्यास ग्रंथ विस्तार पावेल म्हणून चारदोन गोष्टीच आपण समर्थांच्या संगतींत पाहूं.

आतां ह्या प्रकरणांतील मुख्य विषय 'देवाचा निश्चय' करणें हा आधीं घेऊन मग इतर महत्त्वाच्या विषयांचें समर्थसंगतींत विहंगावलोकन करूं.

### २ निर्गुण व सगुण एकरूप

श्रुतीनें ज्याला निराकार ब्रह्म म्हटलें आहे त्यालाच समर्थ राम म्हणतात. ब्रह्म 'आदि मध्य अंतीं सारिखेंचि' आहे. ब्रह्म नभासारिखें 'बाह्य अभ्यंतरीं कोंदाटलें' आहे 'परी तें पाहतां दिसेना' व 'साधूवीण येना अनुभवा.' मन स्वस्वरूपीं भरलें म्ह० उन्मन झालें कीं संसारदुःख विसरतें.

**तुम्ही आम्ही करूं देवाचा निश्चयो । जया नाहीं लयो तोचि देव ॥१॥**
**देव हा अमर नित्य निरंतर । व्यापूनी अंतर देव राहे ॥ २ ॥**

नेहमींचा प्रश्न : निर्गुणाच्या ठिकाणीं सगुण साकार कसें झालें ?

**निर्गुणस्वरूपीं मूळमाया जाली । तिच्या पोटीं आली गुणमाया ॥ १ ॥**
**गुणमायेपोटीं जाला सत्त्वगुण । सत्त्वीं रजोगुण उद्भवला ॥ २ ॥**
**उद्भवला रजोगुणीं तमोगुण । तमोगुणीं जाण व्योम जालें ॥ ३ ॥**
**व्योमापोटीं वायु वायूपोटीं तेज । तेजीं तें सहज आप जालें ॥ ४ ॥**
**आपापासूनीयां भूमंडळ होणें । शास्त्रींचीं वचनें दास म्हणे ॥ ५ ॥**

ह्या अभंगांत सृष्ट्युत्पत्तीची जी काहणी सांगितली आहे, तीच दासबोधांत सविस्तर सांगितली आहे. हिला आधारभूत उपनिषदाचें वचन आहे तें हें आहे : ' आत्मन आकाशः संभूतः । आकाशाद्वायुः । वायोरग्निः । अग्नेरापः । अद्भयः पृथिवी । पृथिव्या ओषधयः । ओषधीभ्योऽन्नं । अन्नाद्रेतः । रेतसः संततिः. ' आकाशापासून वायु इ० क्रमाने सृष्ट्युत्पत्ति सांगितली आहे. उलट क्रमानें तिचा लय होतो. ' जे जें जया व्याले । ते तेणे भक्षिले । अंतीं तें उरले । शून्य एक. ' आकाश शून्यांत व शून्य स्वरूपांत लीन होते. आदिअंतीं एक ब्रह्म सत्य आहे. मूळमाया नामरूपात्मक व ब्रह्म चित्स्वरूप. दोघांचा संबंध नाहीं. म्हणूनच ' माय कुमारी बाप ब्रह्मचारी ' असें कौतुकानें संत म्हणतात !

**भांबावसी काय मूळाकडे पाहीं । मूळीं तेथें कांहीं जालें नाहीं ॥**
**माया हे असार स्वरूप तें सार । पाहिला निर्धार रामदासीं ॥**

' शुद्ध सत्स्वरूप निर्विकल्प स्वयंभ ' आहे, यावेगळ्या सर्व कल्पना आहेत. तें ' चोजवेना एका सद्गुरूवांचोनी. '

**बहुकाळ गेले देवासी धुंडितां । देव पाहों जातां जवळीच ॥१॥**
**रात्रंदिवस देव सबाह्याभ्यंतरीं । जीवा क्षणभरी विसंबेना ॥ २ ॥**

तोच राम होय. सत्स्वरूप आणि राम भिन्न नाहींत.

**राम पूर्वपुण्यें जालिया सन्मुख । मग तो विन्मुख होऊं नेदी ॥६॥**

* * * *

**चहूंकडे देव नित्य निरंतर । व्यापुनि अंतर समागमें ॥ ३ ॥**
**समागम मज रामाचा जोडला । वियोग हा केला देशधडी ॥ ४ ॥**

* * * *

**जेथें जावें तेथें राम समागमीं । आतां कासया मी खंती करूं ॥१॥**
**सारिखाचि जनीं वनीं वनांतरीं । तो गिरिकंदरीं सारिखाचि ॥४॥**
**जेथें तेथें राम देखितां विश्राम । संसारींचा श्रम आठवेना ॥ ६ ॥**
**आठवेना जेथें आठव विसर । दास निरंतर जैसा तैसा ॥ ७ ॥**

* * * *

**विश्रांतीचें स्थळ स्वरूप केवळ । द्वैततळमळ जेथें नाहीं ॥ १ ॥**
**जेथें नाहीं काया नाहीं मोहमाया । रंका आणि राया सारिखेंचि ॥२॥**
**सारिखेंचि सदासर्वदा स्वरूप । तेंचि तुझें रूप जाण बापा ॥ ३ ॥**

* * * *

**कल्पनेचा प्रांत तो माझा एकांत । तेथें मी निवांत बैसईन ॥ १ ॥**
**मायिकाचा मळ जाय ततक्षणें । रामाचे दर्शनें दास म्हणे ॥ ५ ॥**

'कल्पनेचा देव कल्पनेची पूजा' ! शुद्धस्वरूपाच्या ठिकाणीं 'आडळेना देव आडळेना भक्त !' हें स्वानुभवानें पहावे. राम निराकार निर्गुण निर्विकल्प आहे. रामाचें निर्विकल्प रूप समर्थ एका अभंगांत स्पष्ट सांगतात —

**पाहतां दिसेना तेंचि बरें पाहें । तेथें रूप आहे राघवाचें ॥ १ ॥**
**राघवाचें रूप जाणावें अरूप । शुद्ध सत्स्वरूप निराकार ॥ २ ॥**
**निराकारराम देखतां विश्राम । दूरी ठाके श्रम संसारींचा ॥ ३ ॥**
**रामरूपीं नामरूप दोनी नाहीं । तेथें मना राहीं सर्वकाळ ॥ ६ ॥**
**सर्वकाळ रामदर्शन होतसे । निर्गुणीं विश्वासे मन माझें ॥ ७ ॥**
**मन माझें रामस्वरूपीं संचरे । तेणें देहीं भरे विदेहता ॥ ९ ॥**
**संतसंगें घडे निःसंगाचा संग । राघवीं संयोग रामदासा ॥१०॥**

समर्थांनीं ५।१० अभंगांत अनेक देवतांची प्रार्थनाही मोठ्या आर्तस्वरानें केली आहे.

**तुम्ही सर्व देवीं मिळोनी पावावें । मज वेगीं न्यावें परब्रह्मीं ॥ १ ॥**
**चाड नाहीं एका निर्गुणावांचुनी । माझे ध्यानीं मनीं निरंजन ॥ ३ ॥**
**निरंजन माझा मज भेटवावा । तेणें होय जीवा समाधान ॥ ४ ॥**

( २ ) भक्त व अभक्त यांचें वर्णन :—

अमृत सेविती त्यां अमरपण । स्वयें अमृतचि ते आपण ।
अमृतरूप त्यांचें वचन । मुमुक्षुजन निवताती ॥
ते अमृतचि मूर्तिमंत । त्याचे मुखींचें कथामृत ।
भवरोगिया आरोग्य करित । स्वप्रतीति स्वयें नांदती ॥
सुखस्वरूप स्वप्रकाश । पूर्णशांत चिदाकाश ।
आन नाहीं अवकाश । पूर्णत्वासी पार नसे ॥
भक्तमहाराज भूपती । निंदाद्वेषांतें न गणिती ।
परमामृतें तृप्त असती । मायाभ्रांति त्यां नसे ॥

* * * *

देखोनि भक्तां गुरगुरित । पाषांडवादें कळहो करित ।
सदा हरिभक्तां द्वेषित । उपहासित भक्तक्रिये ॥
शब्दज्ञानें भरला ताठा । चुकले भक्तीचा दारवंटा ।
भ्रमें चालले आव्हाटा । भरला फांटा बडबडित ॥
असो ते माया मोहिले । अभिमानातें आंदण दिधले ।
कामक्रोधीं ते गिळिले । पाशीं बांधिले तृष्णेचिया ॥ (प्र० ४)

( ३ ) स्वामी म्हणतात कीं ' घरोघरीं पुस्तकभार। शिकोनि ज्ञाते झाले फार. ' तसेच ' मठोमठीं तापसजन । महंति धरूनि अभिमान। वरि-वरि वेश संपादून । वृत्ति निमग्न विषयरसीं. ' असेच पोटार्थी विषयी लोक ' पुरीं पट्टणीं ' सर्वत्र दिसतात, पण स्वानंदसमाधान भोगणारे मुनि विरळ आहेत. ' मुनि म्हणजे मननशीळ । मन ज्याचें अचंचळ । निजध्यासीं निजनिर्मळ । स्वानंद प्रबळ भोगिती ॥' असे संत धन्य होत. (प्र० ८)

## १० ज्ञानीभक्तसंवाद

ज्ञानी व भक्त यांच्या संवादांत जयरामस्वामींनीं ज्ञान व भक्ति यांची एकरूपता दाखविली आहे. ' तेचि भक्ति तेंचि ज्ञान । एक विठ्ठलचि

जाण ' हा ज्ञानेश्वरांनीं सांगितलेला सिद्धांतच सर्व संतांनीं जनांस शिकविला आहे व त्याचाच मौजेचा विस्तार प्रस्तुत प्रकरणाच्या २३८ ओव्यांत केलेला आढळतो. ' ज्ञानी म्हणे ' व ' भक्त म्हणे ' याप्रमाणें एकामागें एक चर्चापर व ज्ञानभक्तिसमर्थनपर ओव्यांत ज्ञान्यांचें व भक्तांचें मत गमतीनें मांडले आहे. ' अखंड अद्वैत सदोदित । अच्युतानंत येकला ' असा देवच देवभक्तांचें द्वैत भासमात्र दाखवून आपणीं आपण क्रीडत आहे असें मंगलाचरणांतच म्हटलें आहे. सूर्य व किरण, जल व लहरी त्यासारखेंच देवाभक्तांचें ऐक्य आहे. देवाकडे ज्ञानाच्या अंगानें पाहणारा तो ज्ञानी व भक्तीच्या अंगानें पाहणारा तो भक्त; तत्त्वतः देव अंगांगीभावातीत आहे. गंगा व यमुना आपापल्या सामर्थ्यानें व गतीनें जात असतां शेवटीं प्रयागास एकवटतात व तेथून पुढें ' ऐक्यें चालती सहजपणें. ' ज्ञानी व भक्त यांच्या संवादाचा थोडासा भाग पाहूं :—

**ज्ञानी :** विश्वात्मा विश्वभरित आहे, ' दुसरें तेथें असेना. '

**भक्त :** अवघा देव आहे तर मग भजनउपाय कशाला? भावावांचून देव प्रगट होत नाहीं हें उघड आहे. काष्ठांतला अग्नि मंथनावांचून प्रकाशत नाहीं.

**ज्ञानी :** पण दुसरें असेल तर मंथनाची गरज !

**भक्त :** भगवंताला जीव भजतील तरच तरतील ना ?

**ज्ञानी :** तरणें बुडणें हें मिथ्या होय. नुस्ती कल्पना !

**भक्त :** मग पूजनादि साधनें कशाला सांगितलीं आहेत ?

**ज्ञानी :** आत्मा अखंडित आहे, एकदेशी नव्हे !

**भक्त :** जीव तर प्रत्यक्ष भवाच्या हिंवानें हिंवलेले दिसतात. भक्तिसाधन हवें.

**ज्ञानी :** देव सर्वत्र आहे तो साधनानें साधूं पाहणें हें आकाशाला गवसणी घालण्यासारखेंच व्यर्थ आहे.

**दुर्जनाचे संगें होय मनोभंग । सज्जनाचा योग सुख करी ॥**

दुष्ट संगतींत सारें दुःखच होतें पण 'अलभ्याचा लाभ संतसंगें' होतो. साधु आणि भक्त, व्युत्पन्न आणि विरक्त, तपोनिधि आणि शांत असा पुरुष अपूर्व होय ! असा असून जनांच्या मिळणीं मिळून जाणारा असेल तर त्याच्यासारखा जगदुद्धारक दुसरा कोण ?

**देहातीत संत जाणती अनंत । प्रकृतीचा प्रांत निजानंद ॥**

संतांजवळ प्रांजळ आत्मज्ञान व पूर्ण समाधान असतें. ' भेटी होय संतसंगें राघवाची । आणिक भवाची शांति होय. '

एका अभंगांत ' संतसंगें तुज काय प्राप्त जालें ? ' असा प्रश्न केला असून दुसऱ्यांत त्याचें उत्तर दिले आहे. संतसंगतींत मला तारक अशा राममंत्राचे रहस्य समजले, पंचीकरण समजले, अष्टदेहनिरसन झाले, पण मुख्य—

**ज्ञानें समाधान सगुणाचें ध्यान । निर्गुण अभिन्न आपणचि ॥**

हें अनुभवाला आलें. एकत्व जाणणे याचें नांव भक्ति, संगत्याग ही विरक्ति, व साधनाचें फळ गुरुदास्य हें सारें समजले.

**साधूवीण राम धांडोळितां श्रम । नव्हेचि विश्राम साधुविणें ॥**
**रोकडाचि मोक्ष साधूचे संगती । चुके अधोगती आत्मज्ञानें ॥**
**अनुग्रह घडे बहुतां सुकृतें । साक्षात्कार तेथें रोकडाचि ॥**

हरिदास कसा असावा यासंबंधीं या प्रकरणांत १०।५ अभंगांत

**४ हरिदास** समर्थांनीं चांगला खुलासा केला आहे.

**पांचां लक्षणीं पूरता । धन्य धन्य तोचि ज्ञाता ॥**
**विवेक-वैराग्य सोडिना । कर्ममर्यादा सांडिना ॥**
**बाह्य बोले शब्दज्ञान । अंतर्यामीं समाधान ॥**
**रामीं रामदास कवी । न्यायनीतीनें शिकवी ॥ ४ ॥**

विवेक, वैराग्य, आचार, शब्दज्ञान व समाधान ह्या पांच गोष्टी कोणत्याही ज्ञात्यापाशीं—विशेषतः हरिदासापाशीं—अवश्य असल्या पाहिजेत.

**जो कां भगवंताचा दास । तेणें असावें उदास ॥ १ ॥**
**काय देतिल तेंचि घ्यावें । कोणा कांहीं न मागावें ॥ २ ॥**
**सदा श्रवणमननें । आणि इंद्रियदमनें ॥ ४ ॥**
**नानापरी बोधुनि जीवा । आपुला परमार्थ साधावा ॥ ५ ॥**

कथाकीर्तनें करून द्रव्य घेणारे व तें देणारे दोघेही नरकाला जातात असा नाथतुकोबांचा कडक निर्बंध आहे; समर्थांनीं हरिदासांना थोडी सवलत दिली आहे. कीर्तनाचा पैका मागूं नये, निरपेक्ष प्रेमानें कीर्तन करावें, पण कोणीं कांहीं दिले तर संतोषाने घ्यावें. हरिदास सदाचारी व भक्त असावा. 'जाणावा तो नर देवचि साचार' या अभंगांत समर्थ सांगतात कीं (१) 'वाचे निरंतर राम राम' (२) 'सगुणीं सद्भाव नाहीं ज्ञानगर्व' (३) 'निंदका वंदका सगट सांभाळी' (४) 'पालटेना मन परस्त्रीकांचनीं' हे सदाचाराचे मुख्य नियम पाळणारा व गोड वाणीनें सर्वांस सुख व बोध देणारा पुरुष तोच खरा हरिदास होय. शेवटीं—

**लावीतसे देह रामभजनास । रामीं रामदास हरिभक्त ॥ ६ ॥**

हरिदासाला 'नको वोळखीचे जन । अंगीं वाजे अभिमान' असें वाटून एकान्त प्रिय वाटावा. रामभजन करीत आनंदानें व निश्चितपणें त्यानें रहावें. आणखी एका अभंगांत समर्थ सांगतात कीं—

**दुजीयासी सांगे कथा । आपण वर्ते त्याची पथा ॥ २ ॥**
**कीर्तनाचें न करी मोल । जैसे अमृताचे बोल ॥ ३ ॥**
**सन्मानितां नाहीं सुख । अपमानितां नाहीं दुःख ॥ ४ ॥**
**किंचित् दिलें दातयानें । तेंही घेत आनंदानें ॥ ५ ॥**

'ऐसा असे हरिदास'—त्याचे चरण वंदावे, त्याचें कीर्तन ऐकावें. समर्थ अशा हरिदासाला आश्वासन देतात—

**राघवाचें नाम राखशील जरी । तुज राखे तरी रामराण ॥ १ ॥**
**रामराणा माझे जीवीचें जीवन । आवडीनें खूण सांगतसें ॥ २ ॥**
**सुखमूर्ती राम सांडूं नको कदा । तुज तो आपदा लागों नेदी ॥ ४ ॥**
**लागों नेदी कष्ट आपुल्या दासासी । राम रामदासीं साहकारी ॥ ५ ॥**

**५ श्रवणनिरूपण**

श्रवणनिरूपण या साधनावर समर्थांचा फार कटाक्ष आहे—दासबोधांत आहे व येथेंही आहे. सत्संगतींत सच्छास्त्राचें श्रवण झाल्यानें मनावर परिणाम होतो. श्रवण—मनन—निदिध्यास ह्या साधनाशिवाय साक्षात्कार कोण पावला आहे ? 'निरूपण सार अद्वैत करावें'—अद्वैत श्रवण केलें पाहिजे, म्हणजे देहबुद्धीची अहंता झडत जाऊन शाश्वताची ओळख होते. निरूपणानें अनुताप होतो, मग वैराग्य, सत्संग, भक्ति, ज्ञान सर्व कांहीं साधतें. जाणपण सोडून श्रवणमनन केले पाहिजे. कुतर्क व कुशंका यांचा मार्ग सोडून निरूपण ऐकावें.

**सर्वकाळ सारासारविचारणा । वस्तूची चाळणा निरंतर ॥ २ ॥**
**निरूपणें ध्यास लागला अंतरीं । धारणाही धरी निर्गुणाची ॥ ३ ॥**
**निरूपणें होय अलभ्याचा लाभ । साधन सुलभ दास म्हणे ॥ ५ ॥**

* * *

**भक्ति ज्ञान घडे वैराग्य आतुडे । भावार्थ सांपडे निरूपणें ॥ २ ॥**

निरूपणानें शांति, क्षमा, दया, नैराश्यता याच काय पण उन्मनीही येऊन गळां पडतात. 'भ्रांतीचा संदेह तुटे एकसरां.'

**दाखवितां नये बोलिलें न जाये । त्याची कळे सोये निरूपणें ॥**
**मनासी न कळे मीपणा नाढळे । तें गुज निवळे निरूपणें ॥**

चंचळ मन निश्चळ होण्यासाठीं—'केलेंचि करावें पुन्हा निरूपण.' निरूपणानें, नित्यनूतनश्रवणमननानें, निदिध्यासानें समाधान होतें. 'प्रतिदिनीं अन्न खाणें लागे'—तैसें निरूपण केलेंचि करावें !

## ६ लोकोद्धार

समर्थांना पतितोद्धाराची मोठी आवड होती, त्यांचें ब्रीदच तें !

**पतित हे जन करावे पावन । तेथें अनमान करूं नये ॥ १ ॥**
**करूं नये गुणदोषउठाठेवी । विवेकें लावावी बुद्धि जनां ॥ २ ॥**
**बुद्धि सांगे जनां त्या नांव सज्जन । पतितपावन दास म्हणे ॥ ३ ॥**

कोणी म्हणेल 'लोक ऐकत नाहींत व आपले पापमार्ग सोडीत नाहींत याला काय करावें?' समर्थ म्हणतात कीं, 'महापापी लोक पूर्वींच आहेती,' पण त्यांना कांहीं धर्मनीति सांगून मार्गाला लावणें, त्यांच्या राहणींत पालट होईल व त्यांचे अपाय तुटतील असे उपाय सांगणें हें तर सज्जनाचें कामच आहे. 'अरे! तूं मूळचा भला आहेस, तूं पावनच आहेस, मूळाची सोय चुकल्यामुळें भरंगळला आहेस, रस्त्यावर ये' असें सांगून सज्जन पतितांना पावन करितात. पतिताला स्वस्वरूपाची ओळख करून देणे, ज्ञानानें त्याचे मीतूंपण सांडवणे, व त्याच्यांत पालट करणें हें काम सज्जना-वांचून कोण बरें करील? याच देहांत तत्काळ पतितांना सज्जन बनवणें हें साधु करितात. पहातां पहातां बद्धाचे सिद्ध होतात. नारदांच्या उपदेशानें वाल्हाकोळी होता तोच वाल्मीकि झाला ना? स्वतः तरून बुडल्याला हात देऊन तारणें हें पतितपावन रामाचे जे दास असतील तेच करूं शकतात, तेच धन्य होत.

**लोकांमाजी तरे आणि जनां तारी । धन्य तो संसारीं दास म्हणे ॥**

समर्थ स्वतःविषयीं सांगतात कीं, पतितपावन रामाच्या संगतीनें हें पावनाचें ब्रीद मला प्राप्त झालें आहे. याच क्षणीं मी मोक्ष देणार नाहीं तर रामाचा दासच नव्हे !

**कितीयेक जन ज्ञानें उद्धरिले । कृतकृत्य जाले तात्काळचि ॥**
**राघवाचा वर पावलों सत्वर । जनांचा उद्धार करावया ॥**
**हेळामात्रें मुक्त करीन हा जन । तरीच पावन राघवाचा ॥**

## २ बारा ओव्याशतकें

शंभर ओव्यांचें एक ओवीशतक अशीं बारा ओवीशतकें म्हणजे बाराशें धांवत्या ओव्यांचे समर्थांचे हें सुंदर प्रकरण आहे. प्रत्येक शतकांत एक एक विषय सांगितला असून बाराही शतकें एकमेकांशीं संलग्न आहेत. विषय दासबोधांतील असूनही ह्या शतकांची रचना सुबोध व मनोरम आहे. एकान्तांत बसून परमार्थबुद्धि ठसविण्याचा अभ्यास करणारांस ह्यांचा चांगला उपयोग होणार आहे. प्रत्येक चरणाचीं चार अक्षरें पुढील चरणांत आल्यामुळें मालायमक प्रत्येक शतकांत साधलें आहे. पहिल्या दोन शतकांत जन्मजरामरणादि संसारदु:खाचें केलेलें वर्णन वैराग्यउद्बोधक आहे. दासबोधाच्या तिसऱ्या दशकांत हा विषय आलेला आहे. करंट्याच्या संसाराचे चित्र येथें उभें केले असून भाषा अगदीं घराऊ आहे. तिसऱ्याचौथ्या शतकांत सत्संगतींत प्राप्त होणाऱ्या आत्मज्ञानाचा सुंदर बोध केला आहे. ‘संतांचे संगतीं काय प्राप्त होतें’ तें येथें सांगितलें आहे.

**आलया संसारीं स्वहित विचारीं । येकभावें धरीं संतसंग ॥**
**संतसंग धरी धन्य तो संसारीं । बोलिले श्रीहरी भागवतीं ॥**
**भागवतगीतासारनिरूपण । त्याचें विवरण संतसंगें ॥**
**संतसंगें ब्रह्मपद वोळखावें । विवेकें पावावें निरंजना ॥**
**संतसंगें साधीं असाध्य वस्तूसी । जेथें अहंतेसी ठाव नाहीं ॥**
**पापबुद्धि झडे संतांचे संगतीं । नाहीं अधोगती गर्भवास ॥**

साधूचीं लक्षणें कोणतीं ?

**सारिखाचि दिसे जनांचियेपरी । परी तो अंतरीं वेगळाचि ॥**
**वेगळाचि दिसे पूर्ण समाधानें । स्वस्वरूपीं मनें वस्ती केली ॥**
**तया नाहीं काम तया नाहीं क्रोध । तया नाहीं खेद स्वार्थबुद्धी ॥**
**बुद्धि निश्चयाची स्वरूपीं जयाची । कल्पना ठाईंची निर्विकल्प ॥**

**समाधान शांति क्षमा आणि दया। रंका आणि राया सारिखाचि ॥**
**सारिखाचि बोध जेथें नाहीं खेद । सर्वांसी अभेद सर्वकाळ ॥**
**सर्वकाळ गेला श्रवणमननें । सत्क्रिया भजनें हरिभक्ति ॥**
**हरिभक्ति करी जन तारावया । स्वधर्म विलया जाऊं नेदी ॥**
**निरंतर भाव सगुणभजन । येणें बहुजन उद्धरती ॥**
**उद्धरती जन करितां साधन । क्रियेचें बंधन आचरतां ॥**
**भक्तिभावें देवप्रतिष्ठापूजन । कथानिरूपण महोत्साव ॥**
**लागावया भावें सत्क्रिया भजन । करितो सज्जन मुक्तिदाता ॥**
**मुक्तिदाता साधु तोचि तो जाणावा । जेणें संपादावा लोकाचार ॥**
**लोकाचार करी तो जनां उद्धरी । ज्ञाता अनाचारी कामा नये ॥**
**क्रियाभ्रष्ट तेणें लौकिका सोडावें । आणि वसवावें ब्रह्मारण्य ॥**
**ब्रह्मारण्य सेवी तो साधु एकला । जनां नाहीं आला उपेगासी ॥**

* * *

**निंदूं नको शास्त्र निंदूं नको वेद । तरीच स्वानंद पावसील ॥**
**पावसील राम जीवांचा विश्राम । अहंतेचा भ्रम सांडितांचि ॥**

हा उतारा जरा मोठा आहे, पण लोकोद्धाराचे काम करणारा पुरुष कसा असावा याचें हें उत्कृष्ट वर्णन आहे. वेदशास्त्रांची, धर्मकर्मांची व साधुसज्जनांची टवाळी व निंदा करणारा व अनाचार आणि स्वेच्छाचार करणारा व प्रतिपादणारा क्रियाभ्रष्ट पुरुष, मग तो इतर कांहीं गुणांनीं युक्त असला तरी, समाजाचा उद्धार करण्यास अपात्र आहे असा समर्थांचा अभिप्राय स्पष्टच आहे. स्वस्वरूपीं समाधान, विकारांपासून मुक्तता, निश्चयाची बुद्धि, सर्वांसी अभेद, निःस्वार्थीपणा, दयाक्षमाशांत्यादि गुणांचें निधान, ' हरिभक्ति करी जन तारावया । स्वधर्म विलया जाऊं नेदी ' याविषयीं दक्षता, सगुणोपासना, सदाचार, कथाकीर्तनांचा व महोत्सवांचा प्रेमा इत्यादि गुण ज्याच्या ठायीं आहेत त्यानेच ' बहुजन उद्धरावयाचें ' कंकण बांधून पुढें यावें. लोकांच्या पुढाऱ्याच्या अंगीं हीं लक्षणें पाहिजेत.

बंधनांच्यापलीकडे जाणारा स्वेच्छाचारी क्रियानष्ट मनुष्य दुसऱ्यांचा उद्धार काय करील ? ' क्रियेचे बंधनांत ' राहील तरच त्याच्या उपदेशाच्या ' बंधनांत ' लोक राहतील ! लोकव्यवहारांतसुद्धां शिस्तीसाठीं मनुष्याला कांहीं कांहीं बंधनें पाळावीं लागतात, मग स्वधर्माचरणाचे वेळीं शास्त्रांनीं व साधुसज्जनांनीं घालून दिलेलीं बंधने मनुष्यानें कां पाळूं नयेत ? लोकशाहीचीं व समाजसत्तावाद्यांचीं राज्यशकटेंही बंधनावांचून चालूं शकत नाहींत हें आपण पाहतच आहोंत !

चौथ्या शतकांत आत्मज्ञानाचा उपदेश केला आहे व त्याबरोबरच भक्तिज्ञानविरक्तीचें स्वरूप दाखविलें आहे. ' ब्रह्म सनातन तूंचि बापा ' असा तत्त्वमसि महावाक्याचा बोध सद्गुरुमुखाने ऐकून ' शाश्वताची प्रीति विषयीं विरक्ति ' धरावी.

**स्वरूपीं आसक्ति याची नांव भक्ति । पाहतां विभक्ति जेथें नाहीं ॥**
**ज्ञान आणि भक्ति येकचि असती । वैराग्याची स्थिति बोलिजेल ॥**
**संगत्याग केला निःसंग राहिला । सर्वही येकला येकरूप ॥**
**नाहीं भक्तिभाव सगुणाच्या ठायीं । शब्दज्ञान काई बोलोनियां ? ॥**
**बोलोनियां मुखें तैसी क्रिया करी । धन्य तो संसारीं ब्रह्मज्ञानी ॥**
**ब्रह्मज्ञानी भला वर्तणुकेपासीं । कोरड्या शब्दांसी कोण पुसे ? ॥**
**कोण पुसे बापा ज्ञान हें शाब्दिक । क्रिया अलोलिक सत्य जाण ॥**
**सर्वभावें सदा सगुणीं भजावें । कोरडें त्यागावें शब्दज्ञान ॥**
**आचरावें कर्म ज्याचा जो स्वधर्म । आणि नित्यनेम साधनाचा ॥**
**भक्तिपंथें जातां होय सायुज्यता । निश्चयो तत्त्वता दास म्हणे ॥**

पांचव्या शतकांत नवविधाभक्ति सांगितली आहे. तेथील एक चरण—

**हरिकथा भक्ति श्रवणकीर्तन । येणें बहुजन उद्धरती ॥**

स्वतःच्या व सर्वसाधारण लोकांच्या उद्धारार्थ सगुणभक्ति व तत्सिद्ध्यर्थ नामसंकीर्तन या गोष्टी अवश्य आहेत असा इतर संतांप्रमाणेंच समर्थांचाही

दंडक आहे. ब्रह्मज्ञानाचे अधिकारी थोडेच असणार, बहुजनसमाजाला भक्तिमार्गच सुलभ वाटतो. मुख्य देव निरंजन ओळखल्यावांचून म्ह० ब्रह्मज्ञानावांचून सायुज्यता नाहीं–‘ सांडूनियां दृश्य आणि मनोभास । मग जगदीश वोळखावा–’ हा ज्ञानमार्ग सर्व मार्गांत श्रेष्ठ आहे असे ६ व्या शतकांत म्हटले आहे तरी ‘पाविजेना मुक्ति भक्तिवांचुनीयां’ हा सिद्धान्त आहेच. सातव्यांत ‘कर्ता कोण’ याचा शोध केला आहे. देव, माया, जीव, प्राण, अंतःकरण यांपैकीं कोणाकडेही सृष्टीचें कर्तेपण कसें जात नाहीं हें सविस्तर सांगितले असून ‘ दृश्य हें स्वभावें होत जातें ’ हा सिद्धान्त आणखी एकवार प्रस्थापित केला आहे. मीपणाची बुंथी बोधानें काढून टाकावी, भक्त होऊन उपासना करावी व ज्ञानबळानें जन उद्धरावे. आठव्या शतकांत सगुण राम व निर्गुण राम यांचा बोध केला असून रामनामावांचून उद्धाराचें दुसरे साधन नाहीं असें म्हटलें आहे. ‘ निर्गुणासी पावे सगुणाकरितां ’ म्हणून सगुण सोडूंच नये.

**स्वरूप रामाच मनीं आठवावें । नाम उच्चारावें रात्रंदिस ॥**
**सांडूं नये भक्ती स्वधर्म विरक्ती । ब्रह्मज्ञानप्राप्ती रामदासीं ॥**
**रामदास म्हणे रामउपासकां । भक्ती सांडूं नका राघवाची ॥**

नवव्या दशकांत ‘ सर्वब्रह्म ’वादाचें दासबोधांत केलें आहे तसेंच खंडण केलें आहे. समतावाद समर्थांना मान्य नव्हताच. १० व्यांत समाधानाचें व ११ व्यांत सविवेक वैराग्याचें रूप दर्शविलें आहे.

## ३ पूर्वारंभ

प्रश्नोत्तररूपानें येथें परमार्थचर्चा केली आहे–

**शिष्य :** ‘ म्यां संसार घेतला कोण्या गुणें । किंनिमित्त दुःख भोगणें ? ’

**गुरु :** विषयलोभामुळें देवाला विसरलास म्हणून जन्माला आलास !

**शिष्य :** आतां हा भवसागर कसा ओहटे ? ( आटेल )

**गुरु :** **जन्म तुटे संतसंगें । देव भेटे अंतरंगें ।**
**दृढभक्तिचेनि योगें । भवसिंधु आटे ॥ ५ ॥**

**शिष्य :** दृढभक्ति कैसी करूं ?

**गुरु :** श्रीगुरूला शरण जा व त्याचें वचन मान. गुरु अधिकार पाहून उपदेश करितात.

**ऐकें सद्गुरूची खूण । क्रियेसहित ब्रह्मज्ञान ।**
**आशारहित निरभिमान । तयासी मोक्ष मागावा ॥ ९ ॥**
**जेथें विश्वास आणि विरक्ति । नाहीं संसारीं आसक्ति ।**
**जया आवडे गुरुभक्ति । अंतरापासुनी ॥ १३ ॥**
**तेंचि अधिकाराच स्थळ । ज्ञान उपतिष्ठे प्रबळ ।**
**फिटे भ्रांतीचें पडळ । सद्गुरुबोधें ॥ १४ ॥**

**शिष्य :** बोध कशाला म्हणतात ?

**गुरु :** आपण आपल्याला पाहणें, स्वस्वरूप ओळखणें, शरीर चालविणारा अंतर्देव जाणणे हाच खरा बोध होय.

**शिष्य :** शरीरीं प्राण आहे. तोच देह चालवितो !

**गुरु :** अरे ! प्राण म्हणजे वायु. त्या वायूला देव म्हणणें योग्य नव्हे. आत्मा चालक म्हणतोस पण असें म्हणणे म्ह० निर्गुणाला गुण लावणें होय ! निर्गुणापासून चराचरसृष्टि झाली असें ज्ञाते पुरुष म्हणतात व माया मिथ्या सांगतात.

**शिष्य :** समाधान कशाला म्हणतात ?

**गुरु :** परमात्म्याशीं आपलें अभिन्नपण ज्यानें जाणले त्यालाच समाधान मिळतें.

**निरुपम तो निर्गुण । जाणपणाचे जे कां गुण ।**
**एवं सगुण कीं निर्गुण । सांगिजे आत्मा ॥ ३६ ॥**

**जें अनंत ब्रह्मांडांपैलीकडे । जें मनबुद्धीसी नातुडे ।**
**जेथें चपळपण मोडे । बापुड्या मनाचें ॥ ४१ ॥**
**चहूंकडे सारिखेंचि । येकजिनसी आपणचि ।**
**अमूप सीमा स्वरूपाची । करितांचि नये ॥ ४३ ॥**

मन त्याला पाहूं गेलें तर तें मनपणालाच मुकतें ! स्वरूपज्ञानानंतर समाधान होतें. तें बोलानें सांगतां येत नाहीं पण बोलानेंच प्राप्त होतें !

## ४ अंतर्भाव

**शिष्य :** स्वामीपदापासून मी च्युत झालों, इच्छाबंधनीं गुंतलों, संसारदुःखशोकानें चित्त ग्रासल्यामुळें आत्मसमाधान राहत नाहीं, याला काय करूं ?

**गुरु :** मागें बद्धक कर्में केलींस म्हणून देहबुद्धि दृढ झाली—

**मागें जें जें संचित केलें । तें तें पाहिजे भोगिलें ।**
**शूद्रें शेत जरी टाकिलें । तरी बाकी सुटेना ॥**

विषयांच्या मोळ्या खांद्यावर वाहायच्या सोडल्यावर त्याला काबाडी ( मजूर ) कोण म्हणेल ? धणीच तो. देहबुद्धि सोड, तूंच स्वामी आहेस. पण बापा, कांहीं तरी साधन केले पाहिजे. ‘ साधनेवीण ज्ञानवार्ता। बोलोंचि नये. ’ पाकनिष्पत्ति केल्याशिवाय भोजनाचें समाधान मिळायचे नाहीं. यत्नावांचून कांहींच मिळत नाहीं, मग यत्नावांचून ब्रह्मज्ञान कसें मिळेल ? ब्रह्मज्ञान कळल्यावरही साधन करावेंच लागतें. दसऱ्याचें सोनें खूप वांटलें पण हातासी काय आलें ? रायविनोद केला पण सुखासन कोठचें ?

**शिष्य :** साधन तरी कोणतें करूं ?

**गुरु :** ‘ प्राप्त झालें ब्रह्मज्ञान । अंगीं बाणलें पाहिजे पूर्ण ’ यासाठीं साधन केलेंच पाहिजे. ब्रह्मज्ञान पचण्यासाठीं क्रिया पाहिजे.

**तये क्रियेचें लक्षण । आधीं स्वधर्मरक्षण ।**
**पुढ अद्वैतश्रवण । केलें पाहिजे ॥**
**नित्यनेम दृढ चित्तीं । तेणें शुद्ध चित्तवृत्ती ।**
**होवोनियां भगवंतीं । मार्ग फुटे ॥**

अंतरस्थिति न मोडेल अशा युक्तीनें मन एकाग्र करून 'मानसपूजा-जपध्यान' करावें, प्रत्यहीं हरिकथानिरूपण ऐकावें व मारुतिसूर्याचें दर्शन घ्यावें. 'साधनेवीण ज्ञानप्राप्ति होणार नाहीं' हा सिद्धान्त. सिद्धांचा मुकुटमणि शंकर तेही जपध्यानपूजा करितात व अखंड रामनामस्मरण करितात, तेथें इतरांचा पाड काय? मी सिद्ध झालों अशा अहंतेनें कोणी साधन सोडील तर तो बुडेल. 'मन सुखावले जिकडे । अंग टाकिले तिकडे । साधनउपाव नावडे । अंतरापासोनी' असा पुरुष सिद्ध असला तरी बद्धच समजावा!

**शिष्य: अंतीं कोण अनुसंधान । कोठें ठेवावें हें मन ।**
**कैसें करावें साधन । अंतसमईं? ॥**

**गुरु:** अंतीं मति तेचि गति असें सगळे सांगतात, पण 'अंत कोणास आला । कोण मृत्यु पावला' याचा आधीं विचार केला पाहिजे. अंत आत्म्याला नाहीं, स्वस्वरूपाला नाहीं हे उघड आहे. देहाला मृत्यु घडतो असें वाटतें पण देह तर अचेतन जड आहे, तेव्हां या शवाला मृत्यु कसचा व जन्मही कसचा! मग मृत्यु आहे कोठे?

**शिष्य:** मग देह कसा पडतो? त्यास चालविता कोठे जातो?

**गुरु:** पंचप्राण हा देह चालवितो म्हणतात, पण प्राणाचा चालक कोण? स्वरूपसत्तेने सर्व चालते पण स्वरूपसत्ता म्हणजेच माया! पण माया म्हणजे तरी काय? मिथ्याच ती–तिला आदि ना अंत! अज्ञानाची भ्रांति ती माया. चौदेहाचा अंत तोच मायेचा शुद्ध प्रांत. चार देहांच्या अंतीं स्वरूपच आहे. त्या अनंताला जन्म नाहीं व मरण नाहीं व

'तोचि तूं अवघा' आहेस. ह्या देहातीताचा विवेक करावा म्हणजे जन्ममरण लय पावतें. 'तुटलें संशयाचें मूळ। फिटलें भ्रांतीचें पडळ। तयासी अंत हें केवळ। मूर्खपण ॥' स्वरूपाचा निश्चय करावा, देहाशीं आपला संबंधच नाहीं हें बाणावें व स्वरूपानंदीं असावें. 'या अद्वैतबोधें रंका राज्यपद!'

**शिष्य:** निरूपण ऐकतांना मन मावळतें, पण तेथून उठून गेल्यावर पुन्हा पहिल्यासारखेंच चंचळ होतें याला काय करावें? श्रवणकालीं होणारी तन्मयता सर्वकाळ टिकत नाहीं! अंतकाळ समीप येतो तेव्हां शांतपणें मरण येण्यास काय करावें? निरालंबी वृत्ति ठेवावी म्हणतां, पण ती राहत नाहीं.

**गुरु: निरालंबींचें साधन। देह असतां सावधान।**
**केलें पाहिजे समाधान। सत्संगें विवेकें ॥**

नित्यनेमानें शरीर वळवावें व मन ज्याचें त्यानें स्वाधीन ठेवावें याखेरीज दुसरा उपाय नाहीं. 'पूर्वी पडिला जो अभ्यास। तोचि अंतीं निजध्यास' म्हणून नित्यनेमाचा अभ्यास ठेवावा. नित्यनेम कोणता हें पूर्वीं सांगितलेंच आहे. नेमनिष्ठेनें जपध्यान, श्रवणमनन करावें, देवाकडे मन रमवावें. इंद्रियें दुबळीं झालीं तरी अंतर्जप सतत ठेवावा.

ह्या प्रकरणाला अंतर्भाव असें नांव देण्याचें कारण समर्थांनीं एका ओवींत सुचविलें आहे. अंतीं चळे अंतर्भाव म्ह० देहान्तसमयीं मनुष्याचा अंतर्भाव म्ह० चित्त स्थिर राहत नाहीं त्याचा उपाव येथें दीनदयाळ गुरुरायानें सांगितला आहे, आणि तो उपाव म्ह० दृढ नित्यनेम हा होय. जन्मभर ज्याचा अभ्यास असतो त्याचा अंतसमयीं निदिध्यास राहतो. एकाग्र मनानें रामाचें ध्यान करावें, नित्य भजनपूजन करावें, हरिकथा-निरूपण करावें. हें शरीरवैकल्यामुळें न घडे तरी अंतीं रामनाम अखंड जपावें, हा उपाय शंकरांनीं सांगितला आहे.

## ५ सगुणध्यान व निर्गुणध्यान

ज्ञानापेक्षां ध्यानाची थोरवी अधिक आहे. पहिलें साधन श्रवण, श्रवणानंतर मनन, मननापुढें ध्यान, ध्यानानें निदिध्यास व शेवटीं साक्षात्कार अशी ही पंचपदी पारमार्थिकांच्या अनुभवाची आहे! आयुष्य ही एक महानदी आहे, ही निरंतर वाहतच असते. हिचे कालवे, तलाव, विहिरी बांधून काढल्या तर त्याच पाण्यावर नाना पिकें, अंजीर, द्राक्षें, केळीं इत्यादि धान्यें व फळें उत्पन्न करितां येऊन त्या पाण्याचें सोनें करितां येतें! त्याप्रमाणें आयुष्याचें कर्म, ज्ञान, उपासना, विवेक, वैराग्य इ० साधनानीं सोने करितां येतें! गबाळपणानें व मूर्खपणानें आयुष्य व्यर्थ दवडल्यास तेथें कोणे काय करावें?

**इहलोक परलोक। उभयलोकीं सार्थक।**
**शुद्धज्ञान शुद्धविवेक। यासि म्हणावें॥**
**लोकीं संसार करावा। नाना यत्नें आटोपावा।**
**लोकांमध्यें मिरवावा। पुरुषार्थ आपुला॥**

इहलोक साधला, लोकांनीं भले म्हटलें, तसा परमार्थही साधावा. 'मुख्य देवास चुकले। त्यांस परमार्थ कैचा?' पुनर्जन्म चुकवला नाहीं तर जन्माला येऊन काय केले? 'देवाचे सृष्टींत राहावें। देवें निर्मिलें तें पाहावें। नानावैभव भोगावें। देवाकरितां॥ त्या देवास चुकावें। तेणें सर्वस्वास मुकावें!' धुकटी उदकाचें लवण करणें, पृथ्वी अंतरिक्षीं धरणें—हें काय मानवाचें करणें आहे? देवाचें सामर्थ्य पदोपदीं दिसतें पण देव चर्मचक्षूला दिसत नाहीं, तरी देव ठायीं पाडावा हें मनुष्यदेहाचें सार्थक आहे. देव सगुण आहे व निर्गुण आहे. उपासनाभक्तीनें सगुणदेवास आपलेसें करावें, मग निर्गुणासी अनन्य व्हावें व याप्रमाणें आपण तरावें व जनांस तारावें तरच नरदेहाची सफलता आहे.

मार्तंडकुलदीपक व चातुर्यनिधि अशा रामाचे ध्यान येथें समर्थांनीं वर्णिलें आहे. 'एकवचन एकबाण । एकपत्नी अभंग ठाण । अजिंक्य राक्षसां निर्वाण–। कर्ता समर्थ एकु ॥

**१ सगुणध्यान**

धार्मिक पुण्यपरायण । शांत लावण्य सुलक्षण '–अशा भक्तवत्सल रामाचें ध्यान उत्कृष्ट वर्णिले आहे. ध्यान सकलैश्वर्यसंपन्न आहे. रामजानकी-भरतशत्रुघ्नमारुति असें पंचायतन या ध्यानांत आहे. धूर्त तार्किक विचक्षण कार्यकर्ते असे रामवानर या ध्यानांत आहेत. राम सिंहासनावर बसले असून सभामंडपांत ऋषिमुनींचा, संतसज्जनांचा, वेदज्ञपुराणिकांचा, गायकवादकांचा मेळा असून रामाचा जयजयकार करण्यांत सर्व दंग आहेत. नाना साधनांचे नाना अधिकारी भक्त आहेत, नाना योगी ज्ञानी तापसी आहेत. असा हा रामरायाचा दरबार या ध्यानांत आहे. असें वाटतें कीं, सभोंवारचें जग विसरावें व या ध्यानसुखांत बुडून असावें.

**वदती वक्ते अनुभवाचे । मस्तक डोलती श्रोत्यांचे ।**
**तल्लीन सादर सर्वांगांचे । श्रोत्र केले ॥**

सर्वांचे 'अनुभव वेगळाले । परी सिद्धान्त एक.' रामनामघोषगजरानें आकाश दुमदुमून गेलें आहे. समर्थ प्रेमविव्हळ अंतःकरणानें सांगतात–

**रामाचेनि स्वामीपणें । मी ब्रह्मांड मानीं ठेंगणें ।**
**त्रैलोक्यही वाटे उणें । महिमा वर्णितां ॥ १०५ ॥**
**राम सर्वांगें सुंदर । राम करुणेचा सागर ।**
**दीन अनाथांचा उद्धार । श्रीराम कर्ता ॥ १०६ ॥**
**राम जीवींचा जिव्हाळा । राम मनींचा कोवळा ।**
**राम जाणे अंतर्कळा । निजदासांची ॥ ७ ॥**
**राक्षस केले देशधडी । देव सोडिले तेहेतीस कोडी ।**
**राज्यीं स्थापिले आवडी । शरणागत ॥ ८ ॥**

त्या रामाचें ध्यान चित्तांत, रूप डोळ्यांत व नाम मुखांत अशी भक्ति करावी.

**नामें स्वहित फावे । नामें निश्चयो दृढावे ।**
**नामस्मरणें शीघ्र पावे । देवाधिदेव ॥ १६ ॥**
**ऐसें हें रामनाम । परमगुह्य विश्रामधाम ।**
**मंथूनि काढिलें वर्म । शतकोटींचें ॥ १७ ॥**

सर्वच प्रकरण अत्यंत रसाळ आहे. सगुणध्यानच निर्गुणांत नेऊन सोडतें, दोन्ही एकमय होतात व भक्त देवाच्या प्रेमांत लीन होऊन राहतो.

**२ निर्गुणध्यान**

'जेथूनि निर्माण विद्या। तेथें विद्या ना अविद्या। ऐक्यरूपें तया आद्या। नमन माझें' ही आरंभाची ओवी. तो हा जाणिजे आत्माराम, सगुण निर्गुण पूर्णकाम. त्या सद्गुरुरामाच्या कृपास्फुरणाने ही वाचा बोलत आहे. 'बोलत असतां न बोलणें। हे खूण जयासी बाणे' तोच येथींचा वक्ता व श्रोता होय! समर्थांनीं ह्या अतीव सुंदर प्रकरणांत सगुणाचे साज निर्गुणाच्या अंगावर चढविले आहेत! हा प्रकार केवळ अपूर्व आहे! याला तोड कोठें सांपडली नाहीं. दोन तीन मनोहर स्थळें दाखवितों. येथें पदापासून रूपकास आरंभ केला आहे. पदापासून निवृत्तिगंगा निघाली. तेथे अद्वैतबोधें ज्ञानी स्नान करितात. 'अनंत-जन्माचा मळ । क्रिया पालटे तात्काळ । ऐसें पवित्र गंगाजळ। कर्णद्वारें सेविती.' प्रपंचसंगाचें स्नेह (तेल) लागून वासनावस्त्र मलिन झाले होतें तें धुऊन निघाले. अहंतेचे डाग पुसून गेले. जे अविरक्त होते त्यांना महामोहाची हुडहुडी भरली. भाविक गंगेच्या ओघांत पडले ते वाहत उगमास गेले, रामपदीं प्रवेशले. 'गंगोदक कर्णीं भरलें। ते सुखें उचंबळले। पुन्हा उपेगा आले। भाविकांसी!' बुद्धिरूप ताम्रपर्णीच्या ओघाबरोबर जे स्वरूपसागरीं मिळाले 'तयां संगमीं मुक्ता फळें। मुक्तपणें होती'-(ताम्रपर्णी नदी ही तामीळ देशांतून वाहत असून पूर्वसमुद्राला मिळाली आहे. सागरसंगमीं तिच्यांत असंख्य मोत्यें सांपडत व तिकडील राजे क्रोडो रुपयांचा मोत्यांचा व्यापार परदेशाशीं करीत असत. हा इतिहास समर्थांना माहीत होता असें

ह्या मुक्तमोत्यांच्या रूपकावरून दिसतें). देहबुद्धीचें शिंपलें हें जेव्हां ज्ञानदृष्टीनें विकासलें तेव्हां त्यांत उदक पडून तें मोतीं झालें व कठिणपणाला आलें. मुक्तमोतीं बहुमोल खरें पण 'मुक्तपण अंगीं जडलें। तेव्हांचि वेगळें पडलें। अभिन्नत्व बिघडलें। वेगळेपणें.' परशुरामाचें कोदंड रामानें तोडिलें. कोदंड म्ह० 'ज्ञातेपणाचें बंड' कीं ज्यांत प्रचंड ज्ञानशक्ति सांठवली होती— तें रामानें लीलेने तोडिलें! कुबुद्धिरूप ताटिकेचें शिर तोडून ऋषीश्वर सुखी केले. राम 'सगुण निर्गुण नकळे' पण तो 'शुद्ध भावार्थें आकळे' एवढें मात्र खरें आहे! रामहृदयावर अखंड साजिरी मुक्तमाळा आहे व ही नित्यमुक्तांची माळा त्याला आवडते, कां कीं 'तया मुक्तांच्या निजवृत्ती। किरणांसारिख्या फांकती। ऐक्यरूपें मिळोनि जाती। निजपदकीं.' आनंदाचें ओतिलें कीं तें स्वरूप सुखावलें असें रामाचें मनोहर वदन, शरणागतां आश्वासन देणारें तें मधुर हास्य, ती भ्रुकुटीची समता, ती दृष्टीची प्रसन्नता—

**चक्षूचें देखणें सरे। ज्ञानदृष्टी पाहोनि विरे।**
**देखणेंपणेंविण उरे। सर्वांग देखणा ॥ १५२ ॥**

रामाचें विलेपन व आरती—

**मनोमृगातें मारुनी। काढिली कस्तुरी-उन्मनी।**
**हेतुरूपें विलेपनीं। ऐक्यता जाली ॥ १६२ ॥**
**सकळ भक्त मिळाले। हरिहरब्रह्मादि आले।**
**ऐक्यरूपें राम जाले। रामेंसहित ॥ १७१ ॥**
**चार देहांची कुरवंडी। दास ओवाळूनि सांडी।**
**श्रोते वक्ते आवडी। ओवाळिले ॥ १७५ ॥**

## ६ आत्माराम

'आत्माराम' हा समर्थांच्या सर्व अध्यात्मप्रकरणांत अत्यंत सरस असून त्यांना स्वतःला आवडत असे. माझें स्वरूप माझ्या 'दासबोध' व 'आत्माराम' ह्या ग्रंथांत तुम्हांस स्वच्छ दिसेल असें अंतसमयीं त्यांनीं स्वतःच

म्हटले आहे. नाथांच्या ‘स्वात्मसुख’ व ‘आनंदलहरी’ ह्या छोट्या प्रकरणांसारखेंच हें प्रकरण स्वरूपानंदानें रसभरित झालें आहे. हें पूर्णबोधाचे दिव्य रसायन आहे.

येथें मंगलाचरणाची भूमिकाच बहारीची आहे. मायागौरीपासून झाला असा ज्यावर लटका आळ आला, पण वस्तुतः जो झालाच नाहीं त्या अरूपाला रूप कैचें ? त्याला निर्गुण निराकार म्हणणें हेही मायेंत येतें. ‘ जें शब्दासी आकळेना । शब्देंवीण जें कळेना । ’ हेंही म्हणणें जेथें खपत नाहीं, ऐसे ‘ सर्वत्र सदा संचलें । तर्का न वचे अनुमानलें ’ त्या गणेशरूपी आत्मस्वरूपाला भावबळें मी नमस्कार करितों. हें स्वरूप जयेचेनि प्राप्त झालें ‘ त्या माया वाग्देवीला ’ वंदन करून सद्गुरुस्वामीला मी शरण आहें. ‘ तया निजपदाकडे । आनंदें वृत्ति वावडे । पद लाधलियां जडे । तद्रूप होवोनी.’ स्वामीकृपेचा लोट पूर्ण होतां हा ‘ ‘उचंबळला । अनुभवउद्गार. ’

**माझे सद्गुरुकृपेचें बळ । मजमाजीं सांठवलें तुंबळ ।**
**तेणें बळें स्वानंदजळ । हेलावूं लागे ॥**

आतां विश्रांतीचा निजविश्राम, मायेहून निराळा, असा श्रीराम—

**जेथें भांबावला तर्क । जेथें पांगुळला विवेक ।**
**तेथें शब्दाचें कौतुक । केविं घडे ? ॥**
**ऐसा सर्वात्मा श्रीराम । सगुण निर्गुण पूर्णकाम ।**
**उपमाचि नाहीं, निरूपम । रूप जयाचें ॥**

**गुरु :** शिष्या ! तुझें समाधान अधिक होईल असें गुह्य ज्ञान तुला मी आज तूं न विचारितांही सांगतों. तुझी चिंता मला आहे. दासबोधांत ( एकवीस समासांत ) मीपणाचा ठाव पुसून टाकला पण अद्याप तुझ्यांत पालट झालेला दिसत नाहीं !

**चातकपक्षी वरचेवरी। चचू पसरोनी थेंबुटा धरी।**
**जीवन सकळ अव्हेरी। भूमंडळींचें॥**
**तैसा शब्दवर्षाव होतां। असों न द्यावी व्यग्रता।**
**श्रवणपुटीं सामावितां। मनन करावें॥**

शब्द ऐकून शब्दातीत गर्भ चित्तीं धरावा. 'अरे तूं कोण कोणाचा। कोठून आलास कैचा' याचा विचार कर व येथें 'चुकोनि आलासि, जाईं। जेथीलचा तेथे.' वेगळेपणानें तूं व्यर्थ दुःख भोगतोस तें सोडून दे. तुला सकळ आत्मवैभव मी देईन, अढळपदीं बसवीन, पण 'मज काय देशी' तें सांग पाहूं. जें कांहीं नासून जाईल, जें अशाश्वत असेल, तुजसमागमें न येईल तें सारे मला दे. नाशवंत तेवढें सारे दे. (मलाही तें काय करायचें आहे म्हणा, पण तुला त्यापासून सोडविण्यासाठीं हें मी मागत आहें.) भिक्षा सुटून अमरपद मिळाल्यास त्यांत तुझें काय जातें?

**शिष्य :** दिधलें!

**गुरु :** मग तर तुझें निजपद तुला मिळालें! आतां जें दिलें तें आपलें मानूं नकोस!

**शिष्य :** नाशवंत कोणतें व तें कसें टाकावें?

**गुरु :**

**अग्निसंगें लोहो पिटे। पिटतां तयाचा मळ तुटे।**
**मग परिसेंसी झगटतां पालटे। लोखंडपण तयाचें॥**
**तयाचा मळ जळेना। अभ्यंतरही कळेना।**
**तरी तें सहसा पालटेना। मृत्तिकारूपें॥**

अग्निसंगें लोखंड ठोकले असतां त्याचा मळ तुटतो व परिसाच्या स्पर्शानें त्याचें लोहपण जाऊन सुवर्ण होतें!

**नाशवंत तितुका मळ। तुवां त्यजावा अमंगळ।**
**तो गेलियां तूंचि सकळ। आहेसि बापा॥**

नाशवंत माया आहे. 'अहं ऐसें जें स्फुरण । तेंचि मायेचें लक्षण.' त्या मायेपासून त्रिगुण व गुणांपासून पंचभूतें व त्यांपासून झालेली अखिल दृश्यादृश्य सृष्टि ही सारी माया आहे.

**येक माया दों ठाईं वांटली । प्रकृति आणि पुरुष जाली ।**
**जैसी दो दिवसांची बोली । एकचि 'परवां' ॥**

ज्ञान, कर्म, ध्यान यांच्या त्रिपुटी मायेंतल्या, योग्यांचें समाधान हीही मायाच ! सच्चिदानंद, आनंदाचा कंद, शाब्दिक निजबोध, 'जीव शिव आणि ईश्वर । शिवरूप विश्वंभर' अवघी माया ! माया देहाला चालविते, शब्दाला बोलविते, द्रष्ट्याला दाखविते. माया स्वरूपसत्तेनें चालते असें म्हटलें जातें तेथील सत्ता हीही मायारूपच होय !

**शिष्य :** माया सकळ म्हणतां आणि जालीच नाहीं हे सांगतां !

**गुरु :** जें जें मनाला गोचर झालें व दृष्टीला भासले तें तें सकल दृश्यभास मायारूपच आहे. तें तूं टाकून दिलेस, तूं याहून वेगळा आहेस! माया जाली वा न जाली हे बोलणे मायिकच जाण. अरे ! माया काय लहान आहे ? मायेनेच माया दिसे व मायेनेच माया निरसे !

**माया भवसिंधूचें तारूं । माया पावती पैलपारू ।**
**मायेवीण उद्धारू । प्राणियांसि नाहीं ! ॥**

मायेकरितां देव व भक्त, विरक्त व जीवन्मुक्त; मायेकरितां वेदश्रुति व व्युत्पत्ति; 'माया परमार्थाचें अंजन । मायेकरितां जोडे निधान.' प्रपंच हीही माया व प्रपंचांतून सोडविणारीही मायाच ! 'मायाचि गोवीबंधन । तोडी तेही माया.'

**माया योगियांची माउली । जेथील तथें नेऊन घाली ।**
**कृपाळूपणें नाथिली । आपण होय ! ॥**

सकळ स्वरूप मायेचें, त्यांत तुझेंही रूप—'हें इतुकेंही आपुलें । मानूंचि नको.' संग तितुका नाशिवंत, निःसंग शब्दही खोटा— 'म्हणोनि संगानिःसंगातीत । होवोनि राहें.'

**शिष्य :** संगातीताची खूण सांगा.

**गुरु :** **संग तितुका नाशवंत । सोडून राहावें निवांत ।**
**येकपणाचा ( ही ) अंत । जालियां समाधान ॥**

एकपणांतही त्रिपुटी असते म्हणून एकपणाचाही ध्यास कामा नये! 'तो आत्मा मीं आहें' हा हेतूही टाकून दे. 'उन्मनी अवस्थेचा प्रांत। तें स्वरूप तूझें.' पण हा अनुभवही नाशवंत आहे तो टाकून दे! 'ग्रंथमात्र जितुका बोलिला। आत्मा त्याहून वेगळा राहिला! 'स्वरूप निर्मळ निघोट। स्वरूप शेवटाचा शेवट' असें त्याबद्दल बोललें जातें. जें बहु दूर आहे व जें जवळ अंतरीं आहे—अथवा हेंही बोलतां येत नाहीं. तेथें सकळही आटे, तें सकळांहून मोठें. 'तें सकळांमध्यें, निराळें। परी अलिप्तपणे.'

**जें हाले ना चाले । जें बोले ना डोले ।**
**अवघें आपणचि संचलें । येकलें येकटचि तें ॥**
**जें चळे ना ढळे । अग्नीमध्यें न जळे ।**
**जें जळीं परी निराळें । उदकीं बुडेना ॥**

जें चोरूं जातां चोरवेना, ज्यास कोणी नेईना, जें कल्पान्तीं वेंचेना,—त्याविषयीं शब्दांनीं काय बोलावें? देहबुद्धि टाकावी हेही मायेची उठाठेव येथें कोणी करावी? 'अहं ब्रह्मास्मि ही( ही ) गाथा। आली देहबुद्धीच्या माथां.' सारीपाट खेळतांना सोंगट्या मागून आणतात व खेळ मांडतांना त्या आपापसांत वांटून घेतात. नस्ता अभिमान घेऊन आपली सारी मेली कीं दुःखी होतात व विरुद्धपक्षाची ईर्ष्येनें मारतात, कोणी रडी खातात व क्रोधानें एकमेकांचे जीवही घेतात! 'तैशा कन्या पुत्र नारी। वांटून घेतल्या सारी। अभिमान वाहती शिरीं। देहपांग प्रपंचाचा!' खेळ संपतांच पट उधळून टाकतात, पुन्हा दुसऱ्या दिवशीं नवा खेळ. पुन्हा तेंच! असाच अनंत ब्रह्मांडांचा खेळ माया खेळून राहिली आहे. तिला

चिकटूं नये व सोडतों म्हणून बुजगावूंही नये! चक्रव्यूहासारखें आंत जाणें बाहेर येणें चाललेंच आहे. म्हणून मायेची गुंतागुत सावधपणें उगवावी व आपले निःसंग स्वरूप ओळखून स्वानंदलहरींशीं खेळावें. (सारी-पाटाच्या व चक्रव्यूहाच्या दृष्टान्ताने येथें मायेचें स्वरूप उत्कृष्ट वर्णिलें आहे.)

हें आत्मज्ञान पचवायला साधन केलेंच पाहिजे. तें पूर्वींच सांगितलें आहे. भक्तिज्ञानवैराग्य वाढविणारे तेवढेच ग्रंथ पाहावेत. अध्यात्मनिरूपण ऐकावें, त्याचें मनन करावें व निदिध्यासानें समाधान पावावें. ' नित्यनेम श्रवणमनन ' त्याऐसें नाहीं साधन. नाशवंत वोळखून टाकावें, त्याचा संग सोडावा व बोलाऐसी क्रिया आचरून आत्मसमाधान पावावें. शून्यांत बुडून जाऊं नये, एक परब्रह्म आहे त्याशीं अभिन्नता धरावी, आत्म्याहून वेगळेपणानें न राहतां त्याशीं समरस व्हावें.

**शिष्य :** जाणतेही आत्मनिरूपण ऐकून पुन्हा धातुपाषाणमृत्तिकेच्या मूर्ति पूजतात, निर्गुण ओळखून पुन्हा सगुणभजन करितात. तें काय म्हणून ?

**गुरु :** वासनात्मक सूक्ष्मदेहाचा नाश होईपर्यंत साधन हें केलेंच पाहिजे.

**हेंचि जाण भक्तीचें फळ। जेणें तुटे संसारमूळ।**
**निःसंग आणि निर्मळ। आत्मा स्वयें॥**
**प्राप्त जालें अद्वैतज्ञान। अभिन्नपणें जें विज्ञान।**
**तेंचि जाण आत्मनिवेदन। जें मी तूं नाहीं॥**

हें झाल्यावरही सगुणाचें उतराई होण्यासाठीं दास्यभक्ति करावी हें उचित आहे.

**पूर्वीं दास्यत्व होतें केलें। त्याचें स्वामित्व प्राप्त झालें।**
**आणि तयाचें महत्त्व रक्षिलें। तरी थोर उपकार कीं॥**

शिष्यानें कृतकृत्य होऊन गुरूचें स्तवन केलें तेव्हां तो म्हणाला —

**बहुतां जन्मांच्या शेवटीं। जाली स्वरूपेंसीं भेटी।**
**येका भावार्थासाठीं। परब्रह्म जोडलें॥**
**संदेह हेंचि बंधन। निःशेष तुटला तेंचि ज्ञान।**
**निःसंदेहीं समाधान। आपैसें होय॥**

गुरुशिष्य हे 'निःसंदेहस्वरूपमिळणीं। दोघे येकचि जाहले.'

## ७ चतुर्थमान

मान म्ह० प्रमाण, समास. ह्या चार मानांत राम (सगुण), ब्रह्म निर्गुण, यांचा विचार सांगितला असून पुढें सुंदर बोध केला आहे. दासबोधांतला अंतरात्मा किंवा सर्वांतरात्मा तोच येथें राम आहे.

**देखवी ऐकवीतो तो चाखवी दाखवी सदा।**
**बोलवी चालवीतो तो देहपुरासि वर्तवी॥**

'देखवी ऐकवी एक नारायण। तयाचें भजन चुकों नका॥ मानसाची देव चालवी अहंता' इ० प्रकारें तुकोबांनीं ज्याचें स्वरूप वर्णिलें आहे तोच समर्थांचा 'राम' होय. सर्व उपासनांचें अंतिम एकच आहे. सर्व देहांत तोच आहे. किडामुंगीपासून सर्व सिद्ध मुनि व हरिहरादि देव यांचा चालक तोच. निंद्यवंद्य, साधुभोंदू, श्रीमंतकरंटा सर्व देहांत तोच एक खेळून राहिला आहे. याहून केवलब्रह्म पलीकडे आहे. त्रिगुण, पंचभूतें, स्थूलसूक्ष्मादि देह, उत्पत्ति व संहार, जड व चंचळ, जाणणें व नेणणे यावेगळें तें निःशब्दब्रह्म. तें अंतरात्म्यापलीकडे आहे. तें 'अद्वैत—दुसरें नाहीं'—एकमेव एकजिनसी परब्रह्म आहे. पुढील दोन मानांत समर्थ ठणठणीत उपदेश करितात: कामक्रोधादि जिंकावेत, अहंता व वारीना मारून जयवंत व्हावें. वैराग्यानें वासना निर्बीज करावी.

**वासना वास पाहे रे राहे रे अंतरीं सदा।**
**वैराग्यें तोंड ठेंचावें चेंपावें मत वाउगें॥**

वाउगें मत म्ह० पाखांड. धारणा धरावी. आळस दूर दवडून साक्षेपाचा यत्न करावा.

### कीर्तनकारांस उत्कृष्ट उपदेश

**अभ्यास वाढवावा रे इहलोकपरत्रिचा ।**
**जाणते नेणते राजी राखावे बहुतांपरी ॥**
**सर्वांसी मृदु बोलावें चालावें सर्वमान्यसें ।**
**प्रत्ययेंवीण जो ज्ञानी तो ज्ञानी आत्मघातकी ॥**
**अर्थपुष्ट बरें गाणें नाचणें समजोनियां ।**
**उगेंचि भुंकणें खोटें गधडे भुंकती जसें ॥**
**प्रेमप्रबंधही नाहीं ज्ञानध्यान असेचिना ।**
**कळाही पुरती नाहीं तें गाणें श्रम वाढवी ॥**
**लक्ष्मीवंतापुढें तोरा करंटे दाखवीतसे ।**
**रणशूरापुढें लंडी उदंड बडबडीतसे ॥**
**शुचिस्मंतापुढें भ्रष्ट श्लाघ्यता न पवे कदा ।**
**पण्डितापुढें तो हुंबा काय बोलेल बाष्कळु ॥**

बोलणें प्रत्ययाचें असलें पाहिजे, अनुमानाचें बोलणें कामा नये! ‘ खऱ्या नाण्यापुढें खोटें कोठेचि नचले जनीं. ’ जाणते खऱ्याखोट्याची पारख करितात. जें ज्ञान लोकांना सांगायचें तें स्वतःला उत्कृष्ट समजलें उमजलें पाहिजे; त्याचा प्रत्यय पाहिजे.

**मापटें मोजितें दाणे तैसें सीकोन गातसे ।**
**अंत्यजें वाहती द्रव्यें अर्थसमंध नाडळे ॥**
**इरसाल वाहती आंबे भोक्तव्य न घडे कदा ।**
**समजल्यावीण तें ओझें पोटासाठींच वाहती ॥**

‘ घोडें काय थोडें वागवितें वोझें । भावेंवीण वांझें पाठान्तर ’ असें तुकोबांनींही म्हटलें आहे. मापटें दाणे मोजून दुसऱ्याच्या पदरांत घालतें

पण त्याला स्वतःला त्याचा काय लाभ? महार खजिन्याचीं पोतीं सरकारांत नेऊन घालतात पण त्यांना त्यांतलें काय मिळतें? बैलघोड्यांच्या पाठीवरून हपूसचे आंबे नेले तरी त्या पशूंना त्यांचा स्वाद कोठें मिळतो? तसें उत्तम कीर्तनव्याख्यान केलें किंवा मनोहर गायन केलें तर श्रोते डोलतील पण हा जर अर्थरूप झाला नाहीं तर त्याला त्याचा काय उपयोग? केवळ पोट भरेल, पण ज्ञानाचें सुखसमाधान थोडेंच मिळणार आहे? म्हणून गीतवाद्य, तानमान, हस्तन्यास, पदन्यास, नेत्रन्यास ही बाह्य सामग्री असली तरी अभ्यासानें भरपूर ज्ञान आधीं मिळविलें पाहिजे व ज्ञानाशीं तन्मय झालें पाहिजे.

**अर्थी अर्थ मनें व्हावें जाणावें बहुतांपरी ।**
**सौख्य ऊदंड तें होतें राजी लोकांसि राखतां ॥**
**अर्थ सर्वत्र शोधावा रोधावा आपुला मनु ।**
**लोक सर्वत्र बोधावा यथातथ्य प्रचीतिनें ॥**
**न्याय अन्याय जाणावा बाणावा अंतरीं सदा ।**
**सत्य नेमस्त बोलावें अच्चूक न चुके कदा ॥**

प्रत्ययानें बोलायचें पण प्रत्यय कशाचा घ्यायचा? 'मायातीत निरंजनाचा!' परब्रह्माचा प्रत्यय आधीं घेतला पाहिजे, मग लोकांस सांगणें शोभतें. कीर्तनकार, वक्ते, उपदेशक, गुरु, लोकसंग्रहकर्ते यांस पूर्ण स्वात्मबोध पाहिजे.

**सत्य तें जाणिजे ब्रह्म मिथ्या मायिक दृश्य तें ।**
**दृश्यभास मुळीं नाहीं मायातीत निरंजनु ॥**

तें दिसत नाहीं व हरपत नाहीं, तें येत नाहीं व जात नाहीं, त्याला संचविसंच ( जोडमोड ) कांहीं नाहीं, तें जनीं वनीं विजनीं संचलें आहे, तें सन्मुख आहे पण विन्मुख कधींच नसतें, त्यांत सृष्टि आहे व तें सृष्टींत आहे—तें ब्रह्म आधीं अनुभवावें आणि मग बोलावें !

## ८ पंचमान

पहिल्या समासांत सर्व देवता, दशावतार, पंचमहाभूतें व तीर्थें यांना नमन आहे. पुढें देवता वायुरूप आहेत असें सांगून अंतरात्म्याचें विवरण केलें आहे. नंतर गुरुशिष्यलक्षणें, सारासारविचार व ज्ञानमाहात्म्य हे विषय शेवटच्या ३ मानांत सांगितले आहेत. दासबोधांत हे विषय आलेच आहेत. '**दक्ष**' विरुद्ध '**बावळा**' हे शब्द लक्ष्यांत ठेवण्यासारखे आहेत.

**संपती संतती विद्या शक्ति सामर्थ्य जातसे ।**
**दक्ष ते जाणती आधीं बावळीं भुललीं मदें ॥**

ह्या व्यवहारांत 'पाहतां रंक ते राजे राजे रंक पुनःपुन्हा' होतात जातात म्हणून येथें 'लाभ तो येक जाणावा परमात्मा परमेश्वरु.' तो देव 'आपुला कीजे' यासाठीं सद्गुरूला शरण जावें. सद्गुरु प्रत्ययज्ञानी असावा व शिष्य विश्वासी असावा. लोकांत —

**सात्त्विकें भाविकें भोळीं त्यां नामस्मरणीं रती ।**
**विवेकी जाणते घेती सारासारविचारणा ॥**
**तिर्थें व्रतें तपें दानें भाविकां सुख होतसे ।**
**विवेकी जाणते घेती सारासारविचारणा ॥**

भाविकांची श्रद्धा प्रतिमापूजा, पुराणें, माहात्म्यें, चमत्कार, नवस, उपोषणें, योगधारणा इत्यादिकांवर असते, पण विवेकी व जाणते पुरुष सारासारविचार मुख्य समजतात. ज्ञान ही मुख्य तारकशक्ति आहे. ज्ञानानें जन्ममरणापासून जीवाची सुटका होते.

**ज्ञानेंचि चालती कर्में ज्ञानमार्गें उपासना ।**
**ज्ञानेंचि पाविजे मुख्या निर्गुणा परमेश्वरा ॥**
**सर्वारंभ तो तो ज्ञानें ज्ञानें त्रैलोक्य चालतें ।**
**परंतु मुख्य तो ज्ञानी परत्र पाववी जना ॥**

**जेथुनी सर्वही जालें पुन्हा तेथेंचि आटलें ।**
**येक तो आडळे देवो नित्य शाश्वत संचला ॥**
**हें ज्ञान रामकृपेनें धन्य रामउपासना ।**
**रामदास्य घडे ज्याला ते सर्वत्र रामदास हो ॥**

## ९ मानपंचक

ह्या मानपंचकांतील पांचही मान उत्कृष्ट आहेत. पहिल्यांत रामाचे व रामराज्याचें सुरस वर्णन आहे, दुसऱ्यांत समानता ( समतावाद ) याचें मर्म सांगितलें आहे, तिसऱ्यांत कर्मज्ञानाचा विचार केला आहे, चौथ्यांत राम व शिव यांची एकरूपता व स्वतःच्या कृतकृत्यतेचें गौरव हे विषय आहेत व पांचव्यांत लोकोद्धाराचें रहस्य सांगितलें आहे. हें मानपंचक रामभक्तांना प्रिय होणारें आहे. रामराज्यवर्णन ‘उपासनावर्णनां’ त घेतलें आहे. ‘धर्मसंस्थापनेसाठीं कर्मकांड उपासना’ हीं दोनी पाहिजेत. कर्मकांडांत सारासारविचार पाहिला पाहिजे.

**जनीं जनार्दन आहे परंतु सज्जनीं वसे ।**

रायाचें सामर्थ्य लहानथोर लष्करी अधिकारी व सैनिक यांमध्यें त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें विभागलें जातें, त्याप्रमाणें परमात्म्याचें तेज सज्जन व सामान्य जन यांमध्यें विभागले जातें, त्यामध्यें समानता वसत नाहीं. स्वामी म्ह० राजा किंवा प्रेसिडेंट सिंहासनावर म्ह० मुख्यस्थानीं बसतो व सेवक आपापल्या अधिकारानुरूप खालीं बसतात अगर उभे राहतात. स्वामी-सेवकांना ‘येकचि करितां नये.’ वैद्य रोग्याला औषध देतो, तारक बुडत्याला तारतो, ज्ञानी अज्ञान्याला ज्ञान देतो, सभाग्य संपत्ति भोगतो व अभागी त्याची ताबेदारी करितो, सद्गुरु कृपेनें शिष्याला मोक्ष देतो. तात्पर्य व्यवहारांत उंचनीचभेद असतोच.

**जो वंद्य सर्वही लोकां तयासी वंदितां बरें ।**
**निंद्य तें वंदितां खोटें समान करिती मुढें ॥**

हायकोर्टांत गेल्यावर जज्जास Your Honour म्हणणें योग्य पण त्याच्या पट्टेवाल्याचा वरील शब्दांनीं सत्कार केल्यास लोक मूर्खांत काढतील! देव–दैत्य, संत–असंत, साव–चोर, अमृत–विष समसमान मानतां येत नाहींत! राम व कृष्ण यांच्या नांवाचा जयजयकार कोट्यवधि लोक करितात, पण रावण व कर्ण यांचीं नांवें कोणी तरी जपतो काय? तात्पर्य—

**भेदाभेदक्रिया देहीं लागली हे सुटेचिना।**
**जेथील विषयो तेथें विपरीत करितां नये॥**

न्याय–अन्याय कोणी समान मानील काय? 'मुखेंचि सेवितां अन्नें। अपानीं घालितां नये.' सर्पविंचु यांतही नारायण आहे परंतु 'समान वर्ततां नये.'

**समान देखणें आत्मा समान करणें दया।**
**वंद्य निंद्य विचारावें हे मुख्य जाणती कळा॥**
**यातिभ्रष्ट क्रियाभ्रष्ट सर्वभ्रष्ट अनर्गळु।**
**पाहतां पातकी दोषी तो संग नर्क भोगवी॥**
**कुसंग पातकें लाभे सत्संगें पुण्यसंग्रहो।**
**जाणता पाहिजे ज्ञाता तो रक्षी धर्मस्थापना॥**

'सर्व ब्रह्म' म्हणून व्यवहारांत समतावाद आणूं पाहणाऱ्यांचा समर्थांनीं येथें खरपूस समाचार घेतला आहे. देहानें क्रिया करावयाची असते. विचारणा देहातीत असते; शब्द बोलण्यांत आहे, विचार शब्दापलीकडे आहे. कर्म ज्ञान उपासना यांतही सारासारविचारणा पाहिजे. तारतम्याने वागलें पाहिजे.

**आधीं तें करावें कर्म कर्ममार्गें उपासना।**
**उपासकां सांपडे ज्ञान ज्ञानें मोक्षचि पावणें॥**

विध्युक्त कर्मानें वागून उपासनारूप फळ हातीं येतें, उपासक सत्संगांत देवाचा शोध घेतो, देवाचा छंद लागला कीं अपाप वैराग्य येतें, 'वैराग्यें

त्यागितां सर्व देव आपला येकला,' हें ज्ञान होतें. देवाचें ध्यान लागलें, कीं आपण आपणास विसरतों—

**अभेद्भक्ति ते ऐसी आत्मनिवेद्नी स्थिती ॥**

आतां ह्या अभेदभक्तीच्या बळावर लोकसंग्रह कसा करावा तें सांगतात. त्रैलोक्य दुःखानें गांजलें आहे. कोणी आपलें दुःख दुसऱ्याला सांगायला गेला तर त्याच्यापाशीं चौपट दुःख असतें त्याची काहणीच याला ऐकावी लागते ! 'दुःख जाणे पराव्याचें । ऐसा तो विरळा गुणी'— पण दुसऱ्याचें दुःख प्रेमानें ऐकलें तर त्याला समाधान वाटतें व त्याचा आपला स्नेह जमतो ! सर्व प्रकारीं दुसऱ्याला साह्य करण्याची तयारी ठेवावी—

**दुःख वांटून तें घ्यावें काढावें ऐसियापरी ।**
**देहदुःखें रोगव्याधी औषधें परते करी ॥**
**सद्बुद्धि सांगणें लोकां जेणें ते सुख पावती ।**
**प्रसंग राखणें आधी सोसावे बहुतांपरी ॥**
**न्याय अन्याय सोसावा सोशितांही विटों नये ।**
**न्यून पैशुन्य झांकावें तेणें तें पस्तावा पडे ॥**
**सांगणें नीतिन्यायाचें मानावें बहुतांपरी ।**
**क्षमून हितकर्ता जो तोचि गंभीर जाणता ॥**
**मत्सरू नेद्खे दृष्टी न पडे कातऱ्यामधें ।**
**नीतिन्यायें मिळों जाणे तोचि तो लोकसंग्रही ॥**
**मनेंचि पारखी लोकां परंतु नोबले ( न बोले ) कदा ।**
**जाणते मिळती तेथें नेणते वास पाहती ॥**
**प्रबोध जाणिजे ऐसा आधीं प्रपंच शोधणें ।**
**अत्र मानतां लोकां परत्र सहजीं घडे ॥**
**मनुष्यें राखतां राजी दैवतें बहु माणसें ।**
**तोचि तो अंश देवाचा मिळाला जगदंतरें ॥**
**प्रबोध लागतां लोकीं नेमस्त सुटका घडे ।**
**पावनु तोचि तो एकू बद्धलोकांसि सोडवी ॥**

## १० जनस्वभाव गोसावी

ह्या प्रकरणांत यथार्थ ज्ञान व जिव्हाळ्याची भक्ति यांनीं स्वहित साधायचें सोडून साधुसंतांच्या व आपापल्या गुरूच्या चमत्कारांच्या वाटेल तशा गप्पा झोंकून देणाऱ्या अर्धवट लोकांचा समर्थांनीं चांगला समाचार घेतला आहे. हें प्रकरण सावधगिरीनें पाहिलें पाहिजे. येथें चमत्कारांवर समर्थांचा कटाक्ष नाहीं, तर साधूंचे व आपल्या गुरूचे खरे गुण न घेतां व परमार्थाचा लाभ करून स्वहित न जोडतां नुसत्या चमत्कारांच्या भरमसाट गप्पा मारण्यांत पटाईत असे लोक कोणाला गोसावी म्ह० साधु समजतात तें सांगितलें आहे. साधूंचे चमत्कार खरे आहेत कां खोटे आहेत, साधूंना चमत्कार करितां येतात कीं नाहीं, समर्थांचा चमत्कारांवर विश्वास होता कीं नाहीं हे प्रश्न येथें विचारांत घ्यावयाचे नसून अज्ञानी किंवा मतलबी लोक कोणाला साधु मानतात एवढेंच ह्या प्रकरणांत समर्थांना सांगावयाचें आहे. आनंदमूर्तीचे गुरु रघुनाथस्वामी यांची पाषाणाची समाधि डोलल्याचें समर्थांनीं स्वतः पाहून वर्णिलें आहे हें आपण अन्यत्र पाहणार आहों. समर्थांचा संचार भरतखंडभर असल्यामुळें त्यांच्या पाहण्यांत अनेक साधुसंत, योगी, भक्त आले होते. त्यांचे कांहीं चमत्कार त्यांच्या नजरेस पडलेच असले पाहिजेत. त्यांनीं स्वतः केलेले चमत्कार त्यांच्या शिष्यप्रशिष्यांनीं वर्णिले आहेतच. सर्व संतांच्या चरित्रांत चमत्कार घडलेले अगर वर्णिलेले आहेत.

'एक म्हणती आमुचा गुरु। तयाचा अगाध विचारु। तेथें अवघा एकंकारु। भेद नाहीं.' एक गुरु विष्टेचा अंगीकार करितो, एक अखंड ओक वर्पितो, एक गुरवाडींत लोळतो, एक 'वोक नरक आणि मूत। निःशंक घटघटा पीतो.' ह्याप्रमाणें वोंगळपणाची स्थिति हेंच महंतीचें लक्षण मानणारे कित्येक मूर्ख आहेत. चेडे चाटके करणारे, आग्यावेताळाला प्रसन्न करून घेणारे, स्मशानीं वास करणारे, गारुड्याचे सर्प पळविणारे,

दृष्टिबंधन व सभामोहन करणारे, नपुंसकाला पुरुषत्व देणारे, सर्पविंचु उतरणारे, गुप्त प्रगट होणारे इत्यादि लोकांना गुरु अगर महंत मानणारे जनांत आहेत! मातीच्या लवंगा केल्या; वांझेचें वांझपण फेडलें; दंपत्यांत बिघाड व ऐक्य केलें; मातीची साखर, ढेंकळाचा गूळ, धोत्र्याच्या बोंडांचीं वाळकें केलीं; मनुष्याचे पशु केले; पाषाणनंदीला डाळ चारली इ० प्रकारीं आपापल्या गुरूंची महती गाणारे लोक जनांत आहेत! 'थोडें अन्न पुरवावें। बहुत जनांसी' ही गोष्ट येशूख्रिस्ताच्या चरित्रांत मानली जाते. 'लोकांदेखतां फुलें करिती। मद्यमांसाचीं' ही गोष्ट मोरया गोसाव्यांच्या चरित्रांत आहे! 'मेले प्राणी उठविले' ही गोष्ट तुकोबांच्या चरित्रांत प्रसिद्ध आहे! आमचा गुरु 'अचेतन चालवितो। मोठा ज्ञानी' व 'रेड्याकरवीं वेद म्हणवितो' या गोष्टी ज्ञानेश्वरांच्या चरित्रांत सुप्रसिद्ध आहेत. 'व्याघ्रावरी निःशंक। हातीं सर्पाचा चाबुक। वांचले होते सहस्र एक। सामर्थ्यबळें ॥' ही कथा तर चांगदेवांची आहे. वाळवंटांत पुरलेला पोर जिवंत बाहेर काढल्याविषयीं केसरीनाथांची गोष्ट आहे.

**ऐसें वर्ततें लोकीं। येणें सार्थक नव्हे कीं।**
**अध्यात्मविद्या विवेकीं। जाणिजे ते ॥**
**पदार्थज्ञानाचा बडिवार। त्याहूनि थोर ईश्वर।**

हें ह्या ओव्यांत सांगण्याचा समर्थांचा हेतु स्पष्ट दिसतो. वरील उदाहरणांत कांहीं विक्षिप्तपणें वागणारे, कांहीं सामान्य चेटकें करणारे, व कांहीं योगसामर्थ्यानें चमत्कार करणारे अशा बऱ्यावाइटांची खिचडी केलेली आढळते! त्याज्य गोष्टी त्याज्य म्हणून सोडल्या तरी सिद्धांचे व योग्यांचे सारेच चमत्कार खोटे म्हणून कोणालाही म्हणतां येणार नाहींत. मोरया गोसावी, ज्ञानेश्वर, चांगदेव इ० संतांच्या चमत्कारांवर हा समर्थांचा हल्ला आहे असे कित्येक समजतात, पण हा त्यांजवर हल्ला नसून त्यांची खरी

थोरवी कशांत आहे हें न ओळखतां नुस्त्या चमत्कारांतच त्यांची थोरवी मानणाऱ्या मूढ जनांवर आहे !

## ११ पंचसमासी

आत्मज्ञानाच्या दृढीकरणार्थ ही पंचसमासी सांगितली आहे. राम, सद्गुरु व आत्माराम यांच्या ऐक्यभावांत स्फुरलेलें मंगलाचरण नित्यपाठांत ठेवण्यासारखें मनोहर आहे व पहिल्या दोन ओव्या तर सांप्रदायिकांच्या नित्यपाठांत असतातही.

**गणेश शारदा सद्गुरु । संत सज्जन कुळेश्वरु ।**
**माझा सर्वही रघुवीरु । सद्गुरुरूपें ॥**
**माझें आराध्यदैवत । परमगुह्य गुह्यातीत ।**
**गुह्यपणाचीही मात । न चले जेथें ॥**
**जो वेदांचा अंतर्भाव । सायुज्यमुक्तीचा ठाव ।**
**जेथें भावनेचा अभाव । भावेंसहित ॥**
**जें साराचेंहि निजसार । जें आनंदाचें भांडार ।**
**जें मोक्षाचें बिढार । जन्मभूमी ॥**
**जें निर्विकल्प तरूचें फळ । अनुभवें पिकलें रसाळ ।**
**तया रसाचे गळाळ । घेती स्वानुभवी ॥**
**ऐसिया जी सद्गुरुरामा । अगाध तुमचा महिमा ।**
**ऐक्यरूपा अंतर्यामा । मूळपुरुषा ॥**
**जें महावस्तूचें साधन । अद्वैतबोधाचें अंजन ।**
**जेणें पावती समाधान । महायोगी ॥**
**जेथें दुःखाचा दुष्काळ । आणि आनंदसुखाचा सुकाळ ।**
**जें निर्मळ आणि निश्चळ । तेंचि तें अवघें ॥**

उपासनाप्रेमानें थबथबलेले हें रसाळ वक्तृत्व किती मधुर आहे ! संसाराचें ममत्व व देहबुद्धीची संगति यांमुळें भगवंताकडे चित्त एकाएकीं

लागत नाहीं; अनंतजन्मींच्या वासनांचा काट काढून टाकण्यास दीर्घ परिश्रम केले पाहिजेत. जाणत्याच्या संगतीनें आत्मज्ञान झालें तरी तें स्थिर होण्यासाठीं साधनें केलींच पाहिजेत.

**साधनेंवीण ब्रह्मज्ञान । तेणें उडे समाधान ।**
**अंगीं जडे देहाभिमान । वाचाळपणें ॥**
**मी सिद्ध ऐसें कल्पुनी । नित्यनेम न धरी मनीं ।**
**तत्पर अशनशयनीं । आत्महत्यारा ॥**
**जो सिद्धांचाही सिद्ध । ज्ञानवैराग्यप्रसिद्ध ।**
**सामर्थ्यसिंधु अगाध । कैलासराणा ॥**
**तो सिद्धचि करी साधन । सर्वकाळ रामचिंतन ।**
**ध्यानधारणा अनुष्ठान । चुकों नेदी ॥**

हें समर्थांचें वारंवार सांगणें आहे. समर्थांसारख्या प्राप्त पुरुषांसही साधकांची करुणा येऊन त्यांना ते सावधगिरीची सूचना देत असतात. 'म्हणोनि जाणते पुरुषीं । सांडूं नये साधनांसी । नाडूं नये आपणासी । सिद्धपणें सर्वथा.' साधनें कोणतीं म्हणाल तर तीं दासबोधाच्या ४ थ्या दशकांत नवविधाभक्तिनिरूपणांत सविस्तर सांगितलीं आहेत. येथेंही तीं संक्षेपानें सांगितलीं आहेत. श्रवणमननकीर्तन यावर समर्थांचा भर आहे. 'शृंगारश्रवणीं अनर्थ । नेमस्त आहे–' (नेमस्त म्ह० निश्चित) म्हणून तो विषय टाळावा.

**सगुण सर्वोत्तमाचें ध्यान । करावें गुणानुवादकीर्तन ।**
**हरिकथानिरूपण । करीत जावें ॥**
**नाना कथा चमत्कार । नवरसिक अपार ।**
**तें त्यजूनियां सार । अद्वैत घ्यावें ॥**

जीवपरमात्म्याची अभिन्नता चित्तीं ठसावेल अशा मोहरेवर साधनें करीत असावें. उपासनाप्रेम रक्षून ज्ञानसाधन करावें. लोभ्याचें मन धनावर व कामुकाचें कामिनीवर असतें —

**तैसा ज्ञाता समाधानी । प्रारब्धयोगें वर्ते जनीं ।**
**परी अनुसंधान मनीं । वेगळेंचि असे ॥**

आश्रमधर्म चालवीत असतां स्वयें आत्माराम व्हावें. 'वृत्ति मूळाकडे पाहे। तरी रामचि दिसताहे.' स्तब्ध राहिला तरी राम, मार्गी चालतांना समागमें राम, 'मागें पुढें प्रगटे। रामचि अवघा.' सन्मुख राम, पाठीमागें राम, स्मरणांत राम, विस्मरणांत राम, अंतरीं राम, बाहेर राम, स्वप्नीं राम, दशदिशा रामच भरला आहे. अनुसंधान ठेवल्यानें हें साध्य होतें. भक्तिमार्ग अखंड चालवावा.

**भक्तीविण जें ज्ञान । तेंचि सोलींव अज्ञान ।**
**तेणें कांहीं समाधान । होणार नाहीं ॥**

'भक्तीवीण ज्ञान जोडे । हें कल्पांतीं न घडे' हा समर्थांचा सिद्धान्त आहे. सद्गुरूस शरण जातां सर्व सफल होतें. 'ऐसी खूण सकळांस। सांगोनि गेला रामदास। सत्संगें जगदीश। नेमस्त भेटे.'

## १२ सप्तसमासी

हे सात समास मूळचे स्फुट समास असून ते दासबोधाची पूर्णता झाल्यानंतर एकत्रित केले असावेत. ह्यांत दासबोधाचा व त्यांतील विषयांचा चारदोन ठिकाणीं स्पष्ट उल्लेख आलेला आहे. हें प्रकरण शंकरराव देव यांनीं प्रथमच प्रकाशित केलें आहे, बाकीचीं प्रकरणें पूर्वींच प्रसिद्ध झालीं होतीं.

शिष्यानें प्रश्न केला, ब्रह्म स्वयंप्रकाश आहे असें म्हणतात तर तो 'प्रकाश कैसा आहे?' शिष्य विचक्षण व गुरूही विचक्षण. दोन्ही भूमिका समर्थांनींच घेतल्या आहेत. कोणी ब्रह्म स्वयंज्योति आहे म्हणतात, कोणी कोटिसूर्यसमप्रभ आहे असें म्हणतात, कोणी देखणी दाखवितात. मुख्य प्रकाश सूर्याचा, दुसरा चंद्राचा, तिसरा कांहींसा नक्षत्रांचा. एक प्रकाश अग्नीचा, एक दीपदीपिका चंद्रज्योतींचा, एक क्षणभंगुर विद्युतांचा,

कोणी मोंबत्या ( मेणबत्त्या ) व चुड्या उजळतात, कोणी कांकडे व आकाशदीप लावतात. याशिवाय रत्नें, पाच, मणि, हिरे यांचा प्रकाश आहेच. असे उदंड प्रकाश आहेत, पण ' यांत ब्रह्माचा प्रकाश कैसा आहे ?'

ब्रह्म जें कां सनातन—तेथें प्रकाश नाहीं. मग कोणाचा प्रकाश ? ' बहुगुणी अंतरात्मा । अवघा त्याचा प्रकाशमहिमा. ' बाहेरचा प्रकाश पदार्थांचा व अंतर्प्रकाश अंतरात्म्याचा. उजेड हा पदार्थप्रकाश व अंतरींचा ज्ञानप्रकाश. ' अंधार अज्ञान उजेड ज्ञान. ' आत्मप्रकाशानें ज्ञानी समाधान पावतात. अंतरीं होत ज्ञानस्फूर्ती । तेथें दिसत नाहीं ज्योती । परंतु यास जगज्योती । म्हणिजेतें. ' आंतल्या प्रकाशानें बाहेरचे पदार्थप्रकाश दिसतात. आत्माच नेत्रद्वारें पाहतो. ज्ञानेंद्रियानें, अंतर्ज्योतीनें सर्व कांहीं प्रकाशमय होतें. दृष्टीला शब्दस्पर्शादि विषय दिसत नाहींत, पण आत्मा इंद्रियद्वारे सर्व पाहतो. ' दृष्टीनें ढोबळ पाहावें । ज्ञानें सूक्ष्म वोळखावें. '

**बाह्य प्रकाश अंधार नासी । अंतर्प्रकाश अज्ञान नासी ।**
**विवेक पाहतां दोहींसी । महदंतर ॥**

दुसऱ्या समासाच्या पहिल्या ओवींत पुरुष ( पुरि शेते इति पुरुषः ) याची व्याख्या केली आहे—

**पांचाचे पंचवीस अंश । करून परस्परानुप्रवेश ।**
**देहपुरामध्यें पुरुष । साक्षत्वें वर्ते ॥**

जाणतें तत्त्व मन व चपळ तत्त्व तो पवन—' येवं मन आणि पवन । देह चालविती.' मनपवन नाहीं तर देहास सजीवता नाहीं, हे दोन वेगळे होतांच देह पडतो. म्हातारपणीं मनपवनाचा जोर कमी होतो. इंद्रियभेद, विषयभेद पण आत्मा अभेद. मूळ संकल्पांतून अष्टधा प्रकृति व तिचीं कार्यें निर्माण झालीं. जाणत्या तत्त्वानें सर्व कांहीं चालतें. जाणत्या कळेपाशीं सामर्थ्य असतें.

**प्रश्न :** खालींवर सर्व बाजूंनीं अंतराळ असून मध्येंच हा भूगोळ कशाच्या आधारावर राहिला आहे? कशाचें टेंकण लावलें आहे? कोणाच्या सामर्थ्यावर हा भूगोळ अधांतरीं राहिला आहे?

**उत्तर :** आकाशांत पाण्यानें भरलेले मेघ कसे राहतात? अंतरिक्षीं जळ राहतें तसेंच हें भूगोळ! हें सारें परमेश्वराचें सामर्थ्य आहे. प्राचीनकाळीं ऋषीश्वर संकल्पमात्रेंकरून सृष्टीचा उत्पत्तिसंहार करीत— ‘मा तो मुख्य परमेश्वर। काय येक न करी?’ रामावतारीं उदकावर पाषाण तरले.

**नृसिंहअवतार कैसा जाला। शुष्क काष्ठीं प्रगटला।**
**कासयाचा कोठून आला। कोण जाणे!॥**

खुजा वामन त्रैलोक्याहून थोर झाला! कृष्णानें गोवर्धन उचलिला! वसिष्ठादि ऋषींच्या सामर्थ्याच्या अशाच गोष्टी प्रसिद्ध आहेत.

**आतांही उदंड होतें। कल्पिल्यासारिखें घडतें।**
**काळ साहे (साह्य) होत जातें। इच्छेसारिखें॥**
**रंकाचे होती राजे। सामर्थ्य भूमंडळीं गाजे।**
**अद्भुत कीर्ती उदंड माजे। देखतदेखतां॥**
**ऐसें काम समर्थाचें। सामर्थ्य देणें जगदीशाचें।**
**आतां सामर्थ्य मुख्याचें। काय म्हणोनि वर्णावें?॥**

येथें शिवरायांनीं संस्थापिलेल्या राज्यवैभवाचें स्पष्टच वर्णन आहे. हें मुख्य परमेश्वराचें सामर्थ्य आहे, ही देवाची कृति आहे असा भाव आहे.

**बंद्** म्ह० शिस्तीचे नियम, निर्बंध, कायदे, बंधन.

**बंद् राखेना नृपति। तेणें देशाची होते फजीती।**
**उदंड लोक कैसे जिती। कोण्या प्रकारें?॥**

बंद आहे तों घर, नाहीं तर बाजार! स्मरणाचा बंद ढळला कीं माणसांतून उठला. मुंजीबंधन नाहीं केलें तर ब्राह्मणांतून उठला.

शरीराचा बंद सुटला कीं विष्ठामूत्रांची परवड. परमार्थसाधनालाही साधनाचा बंद पाहिजेच.

**बंधनेवीण जो प्राणी । त्याच्या संसाराची घाणी ।**
**त्याचे घरीं घेतां पाणी । प्रशस्त न वाटे ॥**

पवित्रपणाचा कंटाळा तरी तो वोंगळ! मोकळेपणा म्हणजेच जर मुक्ति तर अंत्यज मोकळेच आहेत. 'श्वानें घरोघरीं फिरती । त्यांसी मुक्ति कैंची?'

**शास्त्राधार अवघा सोडिला । म्हणिजे प्राणी पाखांडी जाला ।**
**मग कोण गती तयाला । कळतचि आहे ॥**

भले शास्त्राच्या बंदांत राहतात. 'साधन करितचि गेले । भक्तिपंथें.' निर्बंध अनर्गळ वागणें म्हणजे मोकळेपण किंवा मुक्ति नव्हे. केल्या कर्माचें फळ भोगावें लागतें.

**कैसी आली पापकळी । पतिव्रतेसी हासे भोकळी ।**
**भल्या मनुष्याची टवाळी । नष्ट लोक करिती ॥**
**जो कर्मापासून चेवला । तोचि हांसे सुशीळाला ।**
**कित्येक लोक भरंगळला । अधर्माकडे ॥**
**बरें जाणत्यानें ऐसें न करावें । समजोन सन्मार्गी भरावें ।**
**सारासारविचारें तरावें । समाधान ॥**

ह्या विषयाकडे सुशिक्षितांचें लक्ष जाईल तर समाजरक्षण होईल. 'बंद' नसणें म्हणजेच मोकळेपण किंवा स्वातंत्र्य असें आज कित्येकांस वाटत आहे!

पंचभूतें व त्रिगुण मिळून अष्टधा प्रकृति. सारें दृश्य ही जगदीश्वराची माया. 'माय बाप बंधु बहिणी । कन्या पुत्र आणि राणी । त्यांची माया अंतःकरणीं । जीवास आहे.' शेतवाडे मळे.घरें, धनधान्य, अळंकारभूषणें ही सारी जीवाची माया. माया अनादि आहे पण अनादि व अनंत अशा

ब्रह्मास जाणून घ्यावें. त्यासाठीं अनेक पंथ निघाले आहेत. त्यांत स्मार्त व वैष्णव हे अनादिसिद्ध आहेत. 'स्मार्त म्हणिजे शिवभक्त । भागवत म्हणिजे विष्णुभक्त.' शिव व विष्णु यांच्या स्वरूपाचा विचार करावा. मुळीं संकल्प उठला, त्याला हरिसंकल्प म्हणतात, पण त्या हरीला ओळखलें म्हणजे हरिहर एकच आहेत. व्यवहारांत भेद उदंड आहेत ते 'सूक्ष्म सांडून गलबला केला' म्हणून झाले आहेत. मूळीं दृष्टि घालावी व अनुभव घ्यावा.

**ऐकोनीच विश्वास धरणें । हे मूर्खपणाचीं लक्षणें ।**
**समजोनि प्रत्ययो पाहणें । उत्तमोत्तम ॥**

तत्त्वविवंचना केली म्हणजे शाश्वत निर्गुणब्रह्म उरतें. तेथें सकळ भेदाभेद मावळतात.

पिंडींचा आत्मा (जीव) निघून जातो, मग ब्रह्मांडींचा आत्मा राहतो—हा प्रश्न. एकान्तांत विवरण करावें म्हणजे सारे प्रश्न उलगडतात म्हणून येथें एकान्ताचें महत्त्व वानिलें आहे. मनुष्यसंगांत मनुष्य कितीही सावध राहिला तरी अकस्मात् मनोभंग होऊन रंगाचा विरंग होतो, स्नेह लयास जातो, विकल्प उठतात, चांगलें केले असेल तें सारें क्षणांत नष्ट होतें! म्हणून निर्विकार ब्रह्माचा विचार करावा, 'एकान्तीं परमार्थ उघडी । विवेकाचा.' एकान्तींचें सुख अपार आहे.

**उपाधीस कंटाळती । राजे राज्यें टाकोनि जाती ।**
**मग ते सावकास भोगिती । येकांतसुख ॥**

सकळ उपाधीचा न्यास याचें नांव संन्यास. विवेकानें न्यास करावा.

**उपाधीमध्येंचि असावें । परी विवेकें निघोनि जावें ।**
**मनापासून नसावें । उपाधीमध्यें ॥ १८ ॥**
**मनोगत अवघें परब्रह्मीं । शरीर वर्ते मायाभ्रमीं ।**
**तयास संसारऊर्मी । बाधूं न सकती ॥ १९ ॥**

'ठेवणें अवघें वांचलें' म्ह० मुख्य धनसंचयाचें रक्षण झालें व किरकोळ जिनसा गेल्या तर कांहींच गेलें नाहीं असेंच समजावें. परमार्थ साधला म्हणजे सर्व कांहीं मिळालें. गोशृंगावर मोहरी ठेवली इतक्या पळांत जरी मन निश्चळ झालें तरी तो योगेश्वरच म्हणावा. तमाचा नाश ज्ञानप्रकाशानेंच होणार. तत्त्वानें तत्त्व निरसून जर मीपण जवळ ठेवलें तर तें एका प्रसिद्ध गोष्टींत म्हटल्याप्रमाणें होतें !

**सांगाती तितुका मोजिला । आपणास चुकतचि गेला ।**
**ताळा पडेनासा जाला । येतन्निमित्त ॥ ३३ ॥**
**मीपणाचा जाईल चाळा । तेव्हां अवघा पडेल ताळा ।**
**संग सोडूनि निराळा । संगातीत ॥ ३४ ॥**

निराकारीं साकार कसें झाले ? एवढें सचराचर कासयाचें उभारलें ? हा प्रश्न. ह्या प्रश्नास दासबोधांत सविस्तर उत्तर दिलेंच आहे. 'मूळसंकल्पीं अवघें झाले' हें याचें संक्षेपांत उत्तर आहे. जाणीव व वायु मिळोन मूळसंकल्प किंवा मूळमाया. ह्या समासांत जाणिवेचें महत्त्व वर्णिलें आहे. हें जाणीवतत्त्व मूळमायेपासून तों सर्व सृष्टिरचनेमध्यें–लहानथोर प्राण्यांमध्यें कसें संचलें आहे हें येथें सांगितलें आहे. जाणिवेचें सामर्थ्य सर्व देवतांत व ऋषिमुनींत व्यक्त होतें, तथापि सर्व जीवांचे सर्व व्यवहार जाणिवेनेंच होत असतात. जाणीव पुरुष व वायु प्रकृति. प्राण्यांच्या वासना वायुरूप असतात. चार खाणी, चार वाणी, चौऱ्यायशी लक्ष जीवयोनि हा सर्व जाणीव व वायु यांचा खेळ आहे. निर्गुण ब्रह्म त्यापलीकडे आहे.

नदीचे उदक वाहत असतांना जर त्यास बंद घालून तळीं कालवे तयार केले तर नानाजिनसी पीक येऊन सुवर्ण प्राप्त होतें. 'नाना उंच आम्रफळें । आंजीर ऊस द्राक्ष केळें । नाना पिकें यत्नें जळें । निर्माण जालीं.' त्याप्रमाणें विवेकाचा बंद घालून सुविचारफळें निर्माण केलीं तर आयुष्याचें सोनें होतें, निर्गुणपद प्राप्त होतें.

**गयाळपणें मूर्खपणें । संसारांत दिसे उणें ।**
**विवेकी जनें याकारणें । आपुलें स्वहित करावें ॥ ७ ॥**
**येहलोक आणि परलोक । उभयलोकीं सार्थक ।**
**शुद्ध ज्ञान शुद्ध विवेक । यासी म्हणावें ॥ ८ ॥**
**इहलोक म्हणजे संसार करावा । नानायेत्नें आटोपावा ।**
**लोकांमध्यें मिरवावा । पुरुषार्थ आपुला ॥ ९ ॥**

लोकांत भले म्हणवून घ्यावें, प्रतिष्ठेनें संसार करावा, असाच परलोक साधावा. 'मुख्य देवास चुकले । त्यां परलोक कैंचा?' पिंडब्रह्मांडाचा शोध घ्यावा, पंचीकरण पहावें. हरिहरब्रह्मांचा निर्माणकर्ता शोधावा, मूळास जाऊन भिडावें म्हणजे बरें.

**देवाचे सृष्टींत राहावें । देवें निर्मिलें तें पहावें ।**
**नाना वैभव भोगावें । देवाकरितां ॥ २४ ॥**
**त्या देवास चुकावें । म्हणजे सर्वस्वें मुकावें ।**

## १३ जुनाट पुरुष व त्याची कन्या

हें एक गमतीचें प्रकरण आहे. 'पवनाचेनि तारूं । लंघीत जाय सागरु । श्रवणें तैसा विश्वंभरु । पाविजेत आहे.' चंचळ मनें श्रवण करूं नये. निर्गुणब्रह्मीं मूळमाया झाली. अनंत ब्रह्मांडांची उभारणी व संहारणी करणें हा तिचा खेळ आहे, पण सृष्टिचालकत्वाचें श्रेय देतात पुरुषाला. तोच जुनाट पुरुष. हरिहरादि त्याचे अंश. पंचभूतें त्याच्याच सत्तेनें वर्ततात 'तरी जयाचा एकांत । मोडलाच नाहीं.' माया मूळींच नाहीं, पण ब्रह्मापासून झाली म्हणून तिला मूळपुरुषाची 'कन्या' म्हणतात, व त्याच्या सत्तेनें ती सारे खेळ खेळते म्हणून तिला 'भार्या'ही म्हणतात! पुरुष आणि प्रकृति, ब्रह्म आणि माया, शिव आणि शक्ति हे जगाचे मायबाप होत. एवढेंच कीं पुरुष सत्य आहे व माया मिथ्या आहे, या दोघांची कधीं गांठच पडत नाहीं! समर्थांनीं दासबोधांत तिला कोठे मूळपुरुषाची भार्या

म्हटलें आहे : ‘ जे महापुरुषाची भार्या। अतिसंलग्न अवस्था तुर्या ’ ( द० १–३–४ ) व कोठें त्याची कन्याही म्हटलें आहे : ‘ तयापासून प्रमदा। इच्छाकुमारी शारदा ’ ( द० ७–१–७ ). गीतेनें ब्रह्माला ‘ पुराणपुरुष ’ म्हटलें आहे व नाथांनीं कौतुकानें ‘ जुनाट जोगडा काळाचा काकडा ’ म्हटलें आहे. संत परमार्थही विनोदानें सांगतात. समर्थांनीं ह्या प्रकरणांत ‘ जुनाट पुरुष ’ व त्याची ‘ लडिवाळ कन्या माया ’ यांचें मौजेनें वर्णन करीत अध्यात्मतत्त्व विशद केलें आहे —

**आपण येकला सर्व काळ। कन्या खेळे नाना खेळ।**
**येक येकुलती लडिवाळ। नाना छंद करी ॥ २६ ॥**

**अनंत ब्रह्मांडें उतरंडी। खेळ मांडिला परवडी।**
**काळ करी फोडाफोडी। पुत्र तयाचा ॥ २८ ॥**

बहिणीनें ब्रह्मांडांच्या उतरंडी रचाव्यात व भाऊ ( काळ ) यानें त्या मोडाव्यात ! पण त्या मातृविहीन कन्येवर बापाचें प्रेम फार !

**ऐसी परम सुलक्षण। राहोंचि नेणे पितयाविण।**
**पिता तियेचा निर्गुण। माता तरी असेचिना ॥ ३० ॥**

**क्षणां येकां उठोनि पाहे। तंव तो खेळ मोडिला आहे।**
**मग ते सवेंचि लवलाहें। खेळ मांडी मागुता ॥ ३१ ॥**

**ऐसी निरंजनीं येकट। करी खेळाची खटपट।**
**खेळ खेळतां वीट। मानूंचि नेणे ॥ ३२ ॥**

**बहुत लोभाची आवडी। घातली इच्छेची बेडी।**
**पेशा भरूनियां उतरंडी। संपूर्ण केल्या ॥ ३६ ॥**

**प्राणी जावों नेदी बाहेरी। जीवऊन मागुतें मारी।**
**चुकों नेदी येरझारी। वासनासूत्रें ॥ ३७ ॥**

**संतान वाढे लक्षवरी। तरी ते ठायींची कुमारी।**
**नांव ठेवितां उदरीं। पिता ( जीवरूपें ) आला ॥ ४१ ॥**

**वायो फुंकोन केला वन्ही । पोटीं लाविलें पाणी ।**
**आपापासून धरणी । कळों आली ॥ ४४ ॥**
**ऐसी खेळास विगुंतली । तेणें पिता विसरली ।**
**तेचि पाउलीं मुरडली । मागुती मागें ॥ ४५ ॥**

मागें मुरडून पाहूं लागली तों बाप दिसेना ! मग घाबरली.

**वेधु पितयाचा लागला । मग खेळ मोडोनि गेला ।**
**उतरंडी फोडूनि पळाला । काळपुत्र ॥ ४८ ॥**
**पिता पाहतां खेळ मोडे । खेळ पाहतां पिता दडे ।**
**पाहती जाली दोहींकडे । उभी राहोन ॥ ४९ ॥**
**मग ते लोभें झळंबली । पित्याकडेचि चालली ।**
**खेळ विसरोन गेली । जन्मस्थाना ॥ ५० ॥**
**आपणास विसरोनि पाहे । तंव तो पिता पुढें आहे ।**
**ऐसें देखोन लवलाहें । भेटती जाली ॥ ५१ ॥**
**पिता तापसी जैसा वन्ही । तया निःसंगाचे मिळणीं ।**
**कन्या नासली तत्क्षणीं । पितयादेखतां ॥ ५२ ॥**
**ऐसा नावेकवरी । पिता तिचा विलाप करी ।**
**पाहे तंव अभ्यंतरीं । कन्या उभी ! ॥ ५४ ॥**
**मग तयेसी भेटला । उभयतां आनंद जाला ।**
**मागुता खेळ मांडिला । तये कुमारीनें ॥ ५५ ॥**

ब्रह्माकडे पाहतां सृष्टि नाहीं व सृष्टीकडे पाहतां ब्रह्माचें विस्मरण ! 'प्रकटे तंव तंव न दिसे। लपे तंव तंव आभासे' असा दोघांच्या लपंडावीचा खेळ चालला आहे, म्हणजे ब्रह्म लपून जगदाभास दावतें व प्रगटून जगाचा ग्रास करितें असेंच चांगदेवपांसष्टींत ज्ञानेश्वरांनीं म्हटलें आहे.

## १४ षड्रिपुनिरूपण

प्रपंचांत काय किंवा परमार्थांत काय महाविघ्नकर्ते हे सहा रिपु आहेत. काम, क्रोध, मद, मत्सर, दंभ व प्रपंच ह्या षड्रिपूंचें अनुष्टुप् वृत्तांत

समर्थांनीं वर्णन केलें असून 'षड्रिपू जिंकिले जेणें तोचि ज्ञानी महाभला। दीक्षेनें उद्धरी लोकां वैरागी तो उदासिनु' अशी फलश्रुति शेवटीं सांगितली आहे. हे सहा रिपु 'भल्यांसी लाविती वेढा परत्रमार्ग रोधिला' असे प्रबळ आहेत. **कामवेड** ज्याला जडलें ते रूपहानी, द्रव्यहानी, शक्तिहानी, यातिहानी, कुलहानी, सर्व हानी सोसून लोकलाज सांडतात व 'सभाग्य करंटे' होतात. 'पतंगापरि भस्मती!' यास्तव—

**विधीनें विषयो घ्यावा अविधी नसतां बरें।**
**आश्रमीं न्यायनीतीनें प्रपंच करणें सुखें॥**

**कोपा**मुळें मनुष्य आधीं 'आपशुद्धि' गमावून वेडे वेडे चार करितो. क्रोधी माणसाची मूर्ति, मारामारी, धबाधबी, दिवाणांत फिर्यादी, दंड पावणें यांचें हुबेहुब वर्णन केलेलें आहे.

**कंठ ललाटिंच्या शीरा फुगल्या घाम चालिला।**
**थर्थरा कांपतो रागें रूपें भूतचि जाहला॥**
**क्रोधानें करंटे केले क्रोध चांडाळ जाणिजे।**
**भल्यानें कोप सांडावा शांतीनें असतां बरें॥**

देहाचा मद, शक्तीचा मद, द्रव्याचा मद, असा **मद** बहुविध आहे. मदानें मनुष्य सर्वांना तुच्छ करितो, पराचें सत्यही मानीत नाहीं, शास्त्र-नीतिसदाचार सोडून ताठरपणानें सर्वांशीं वागतो पण 'बहुरत्ना वसुंधरा' हें याला कळत नाहीं. हा आपणापरता जगांत शाहणा कोणीच नाहीं असें मानतो व स्वहितास मुकतो. आतां **मत्सर**—'मत्सरें सत्य मानेना सत्याचें लटकें करी.' मत्सरी मनुष्य धीट, तोंडाळ, लौंद, लाताड, उद्धट होतो. आपण खोटा असून खऱ्याला खोटा ठरवूं पाहतो. आपण नीच कुळींचा असून कुळवंताला हांसतो, आपण भ्याड पण धारिष्टवंताची टवाळी करितो, आपण वोंगळ व निर्मळाला छळतो, आपण नास्तिक पण हरिभक्तांची कुचाळी करितो! 'भक्ति ना ज्ञान ना कांहीं अत्र परत्र

नसे' हें फळ मत्सरी माणसाला मिळतें. **दंभ** हा जाणत्यानेणत्याला आंधळा करितो. 'दंभ तें कुतरें किती' हें ज्ञानी जाणतो व 'मासाचा कोथळा' अशा देहाचा बडेजाव करणें हें परममूर्खत्व आहे हें माहीत असल्यामुळें तो दंभाचा वारा लागूं देत नाहीं. आतां सहावा रिपु **प्रपंच**—बाळत्वीं 'छंद मायेचा.' जरा मोठा झाला कीं 'जीवेंभावें वोढे खेळांसाठीं मुलांकडे.' कांहींसा शाहणा झाला कीं मन लागे नोवरीकडे—'नोवरी आवडे जीवीं नटावेंसें मनीं उठे.' उदंड जाहलीं पोरें कीं खर्चासाठीं धांवे धनाकडे. देवाचें स्मरणच नाहीं !

**कष्टला शेवटीं मेला गेला प्रापंच हातिंचा ।**
**घातला मागुती जन्मा ऐसा वैरी प्रपंच हा ॥**
**घर गांव ठाव माझा वाडे शेतमळे गुर ।**
**पुत्र कन्या वधू माझी सर्व सांडोनि चालला ॥**

प्रपंचापायीं अपार कष्ट सोसून शेवटीं फळ कांहीं नाहीं, म्हणून 'आधीं सर्व जाणावें काय येतें समागमें.' म्हणून ज्ञानवैराग्यभक्तीनें संपन्न व्हावें, जन्माचें सार्थक करावें.

## १५ पंचीकरणयोग

यांत प्रथम मूळमायेचें स्वरूप दाखविलें असून पुढें पंचीकरण संक्षेपानें सांगितलें आहे. हा सर्व विषय दासबोधांत येऊन गेला आहे. त्यांतील पांच चार सुंदर श्लोक तेवढे सांगतों.

**पोटानें गांजिले प्राणी मृत्यूनें मारिले सदा ।**
**नेणती देव तो कैसा सिणती बहुधापरी ॥**
**ज्ञानेंचि चालते सृष्टी ज्ञान हें देव बोलिजे ।**
**धुंडितां धुंडितां देवो सत्संगें सांपडे जनीं ॥**
**कर्म तो पिपीलिकामार्ग ज्ञानमार्ग विहंगमु ।**
**ज्ञानऊपासनेमध्यें भेद तो पाहतां नसे ॥**

**तें ज्ञान कोणतें कैसें अभ्यासें पाविजे जनीं ।**
**श्रवणभक्तिच्या योगें मुक्ती सायोज्य पाविजे ॥**
**मुक्तीनें मोकळें केलें भक्तीनें भेद नासिला ।**
**अभेद्भक्तिच्या योगें आत्मनिवेदनी क्रिया ॥**

'देव सांडूनि देवाल्यें पूजतां, गृह पाहून गृहस्वामीस विसरतां,' तर असें न करितां आधीं देवास पहा म्हणजे मुक्ति सहज साधेल.

समर्थांनीं एका स्फुटांत देहदेवालयांतला देव पहा, देवालयालाच देव मानून फसूं नका असें सांगितले आहे.

**देह–देवालयामध्यें पाहणें देव तो बरा ।**
**देव सांडूनि देवाल्यें वर्णिती सर्वही कवी ! ॥**

शाहणे लोकही देहाकडे पाहतात, पण अंतरात्म्याकडे पाहत नाहींत ! देवालयें कोट्यवधि आहेत, सर्वांत नांदणारा देव मात्र एक आहे ! 'भेद देवालयामध्यें अभेद देव पाहतां.'

**जड ते सर्व देवाल्यें देव तो चंचळू असे ।**
**निश्चळू निर्विकारू तो–मुख्य देव निरंजनु ॥**

## १६ पांगुळ

'धर्म जागो निवृत्तीचा' असें एक ज्ञानेश्वरांचें सुप्रसिद्ध पद आहे त्याच नमुन्यावर 'राघवाचा धर्म जागो' हा समर्थांचा पांगुळ आहे. पांगुळ म्ह० पंगु, पाय मोडलेला, पांगळा. हा पांगुळ मोठा मजेदार पण खोल अर्थाचा आहे. शरयूतीरीं अयोध्यानामक एक धर्मनगरी आहे तेथें रामराव राज्य करितो. त्याचा धर्म उत्तम होय, तो धर्म सर्वत्र जागो, त्याचा जयजयकार होवो. त्याचा धर्म कोणता ? अज्ञान निरसून विज्ञानीं लक्ष लागणें हा त्याचा धर्म होय. आतां अज्ञान कोणतें व विज्ञान कोणतें ? ज्ञान, अज्ञान, विपरीतज्ञान व विज्ञान या चारही पदांचा अर्थ दासबोधांत (द० २०, स० १) पहावा. "ज्ञान म्हणिजे जाणणें । अज्ञान म्हणिजे

नेणणें । विपरीत ज्ञान म्हणिजे देखणें । येकाचें एक ॥ २३ ॥ ज्ञान आणि अज्ञान । वृत्तिरूपें हे समान । निवृत्तिरूपें विज्ञान । जालें पाहिजे ॥ २८ ॥" पंचभूतात्मक सृष्टीचें दिसणें हें विपरीत ज्ञान. अज्ञान व ज्ञान या दोनी वृत्ति आहेत व वृत्तिरूपानें समान आहेत, पण या वृत्ति मावळून ( म्ह० मी देह आहें हें अज्ञान व मी ब्रह्म आहें हें ज्ञान हे दोनही विकार जाऊन ) निर्विकार निवृत्तिरूप ब्रह्मस्वरूपाशीं समरस होऊन गेलें पाहिजे, यालाच विज्ञान म्हणतात. ‘ जेथें मुरे जाणपण । विज्ञान तें ’ ( द० ७।४।५० ). ‘ मीतूंपण बुडाले । विवेकें वेगळेपण गेलें ’ याप्रमाणें ज्ञान विज्ञानरूपीं मुरणें हाच मोक्ष होय. ज्ञान ही तुर्या तर विज्ञान ही उन्मनी. असो. विज्ञानीं लक्ष लागणें हा राघवाचा धर्म होय व या धर्मी प्राणिमात्र जागोत—असा या पांगुळाच्या ध्रुवपदाचा अर्थ आहे. यापुढील कडवीं सोपीं आहेत. समर्थ म्हणतात कीं, मीपणाचे पाय मोडले म्हणून मी पांगळा झालों आहें, भक्तिरूप भिंतीवर बसून प्रेमाचें फडकें पसरून दान मागत आहें, पण तें दान दृश्यांतलें नको आहे तर ‘ पूर्णमदः पूर्णमिदं ’ अशा पूर्णतेचें निष्कामतेचें दान पाहिजे आहे ! असें दान देणारा माझ्या रामरायावांचून कोण आहे ? देणें ना घेणें, दाता ना याचक असें दान रामानें घातलें असून ‘ सहजीं सहज संपूर्णता ’ झाली आहे ! हा पांगुळ अत्यंत बहारीचा आहे.

**भरत गा खंडामाजी । शरयूतीर बा ! गांव ।**
**धर्माचें नगर तेथें । राज्य करी रामराव ॥**

**पांगुळा पाय देतो । देव जानकीचा नाथ ।**
**जाईन मी तया ठाया । देवा उत्तम तो ठाव ॥ १ ॥**

**राघवाचा धर्म जागो । सर्व अधर्म भागो ।**
**अज्ञान निरसोनीयां । विज्ञानीं लक्ष लागो ॥ ध्रु० ॥**

मीपणाचे मोडले पाय । म्हणउनि पांगुळ जालों ।
तूंपणाची कीर्ती देई । ऐकोनीयां शरण आलों ।
मीतूंपण निरसीं माझें । भजनभिंतीवरि बैसलों ।
प्रेमफडकें पसरोनियां । कृपादान मागों आलों ॥ राघवाचा ॥ २ ॥

जनीं एक तूंचि दाता । म्हणुनी आलों मागावया ।
मागणें निरसे जेणें । ऐसें दे गा रामराया ।
नवविधा दुभतें देई । भाव हलगा[2] बैसावया ।
ज्ञानकाठी देई करीं । वैराग्यबोलें[3] पांघराया ॥ राघ० ॥ ३ ॥

दासीहातीं[4] देवविसी । तें मी नेघें सर्वथा ।
द्वैतदान नेघें जाण । दोन वेळे आणीतां ।
अपूर्णता देऊं नको । पूर्ण करीं निःकामता ।
ओंपणाऐसें[5] दान देई । तूं तरि इच्छेचा दाता ॥ राघ० ॥ ४ ॥

तुझे कृपेचा कांबळा देई । मज पांगुळाकारणें ।
मायामोहो हींवेंवात[6] । तें हें निवारे जेणें ।
निःकामताभाकर देई । कामक्षुधा हारे जेणें ।
बोधाचें ताक पाजीं । शब्द खुंटे धालेपणें ॥ राघ० ॥ ५ ॥

रामदास पांगुळासी । रामें दिधलीयां दान ।
घेणेंचि निरसलें । कैंची मागण्याची खूण ।
देणें घेणें निरसोनीयां । पूर्ण केलें परिपूर्ण ।
दाता ना याचक तेथें । सहजीं सहज संपूर्ण ॥ राघ० ॥ ६ ॥

---

१ आशा नाम मनुष्याणां काचिदाश्चर्यशृंखला । यया बद्धाः प्रधावन्ति मुक्तास्तिष्ठन्ति पंगुवत् ॥ २ हलका, झोपाळा. ३ वोल, फाटकें रगटें. ४ दासी म्ह० माया. मायेंतलें कांहीं एक नको. ५ तुझ्या विमलस्वरूपाचें दान दे. ६ थंडीवारा.

## १७ सुविचारसंग्रह ऊर्फ मोत्यांचे दाणे

(१) आमुची वोळि देवाची वाचीना त्या कळेचिना ।
रामउपासना माझी त्रैलोक्यव्यापिनी पहा ॥
सोडिले देव बंदीचे पापी राक्षस मारिले ।
प्रताप पाहतां मोठा ज्ञानी सर्वत्र जाणती ॥

(२) अध्यात्मीं तो गुरु व्हावा वीतरागी विचक्षणु ॥

(३) नृपति सांडिती राज्यें धुंडिती परमेश्वरा ।
ते वंद्य जाहले शास्त्रीं ज्ञानदेहीं विदेहता ॥

(४) संसार देखिला जेहीं तेहीं अध्यात्म साधणें ।
अध्यात्म पाहिल्यावीण चुकेना यमयातना ॥

(५) संसारीं दोनि साधावीं इहलोक परत्रही ।

(६) मर्यादा न्यायनीतीची अन्याय न घडे कदा ।
सन्मार्ग योग देवाचा धन्य संसार होतसे ॥

(७) देहदेवालयामध्यें पाहणें देव तो बरा ।
देव सांडूनि देवाल्यें वर्णिती सर्वही जनीं ॥

(८) बुद्धीनें शोधिला देवो भावें तत्काळ पावला ।
विभक्तीनें नव्हे भक्ती जाणती भक्त जाणते ॥

(९) प्रचीतिनेंचि सूटका । प्रबोध सांपडे निका ।
प्रपंच होतसे फिका । निःशब्द गूज हें शिका ॥

(१०) सामान्य देव केले ते अंतरात्मा विशेष तो ।
परंतु शेवटीं जातो धन्य देव निरंजनु ॥

(११) निर्विकल्प परब्रह्मीं कल्पना पाहतां नसे ।
कळेना आकळेना तें अनिर्वाच्य म्हणोनियां ॥

(१२) उत्तमु प्रत्ययज्ञानी मध्यमू शास्त्रनिश्चयी ।
अधमू लोकधाटीचा पाखांडी अधमाधमु ॥

(१३) जाणणें नीतिन्यायाचें सत्य नेमस्त बोलणें ।
यत्नाचा साक्षपी प्राणी तो येक भाग्य मेळवी ॥

(१४) बाळकें श्वापदें पक्षी लोधती वेधती जनीं।
चित्त निश्चित्त होताहे ते धन्य जाणती कळा॥

(१५) माझें तुझें तुझें माझें ऐसी हे मैत्रिकी जनीं।
माझें तुझें तुझें तूझें ऐसें हें न घडे कदा॥
आशेची मैत्रिकी खोटी दुराशा विटंबी पुढें।
परोपकारणी मैत्री ते मैत्री न विटे कदा॥
विकल्पें चालते मैत्री ते मैत्री आत्मघातकी।
विकल्पेंवीण जें सख्य तें सख्य सुख दाखवी॥

(१६) ग्रंथ नाहीं कथा नाहीं नाहीं ज्ञानउपासना।
निश्चयो येकही नाहीं तो प्राणी म्हैसमंगळु॥

(१७) इतिश्री पुढें पंचभूतांसि होते
इतिश्री त्रिगूणासि होऊनि जाते।
इतिश्री समस्तांसि होणार आहे
इतिश्री नव्हे तेंचि शोधोनि पाहें॥

(१८) अनेक शास्त्रीं पाहतां पडेना
आयुष्य थोडें पाहणें घडेना।
विश्वास येके वचनीं धरावा
संसार हा दुस्तर नीरसावा॥

(१९) लोकांमध्यें तरे आणि जनां तारी।
धन्य तो संसारी दास म्हणे॥

(२०) रामभक्तीवीण अनु नाहीं सार।
साराचेंही सार रामनाम॥

(२१) रात्रंदिवस द्रव्यदारेचें चिंतन।
तैसें लावीं मन राघवासी॥
राघवासी मन लावितां आनंद।
तेणें तुटे खेद संसारींचा॥

(२२) जाणावा तो ज्ञानी पूर्णसमाधानी। निःसंदेह मनीं सर्वकाळ ॥

(२३) सर्वत्र लोक शोधावे बोधावे भक्तिच्या गुणें।
पुण्यमार्ग प्रतिष्ठावा लावावी धर्मवासना ॥

(२४) ब्रह्मादिकां मानस आवरेना
नाना उपायीं मरतां मरेना।
तें निर्गुणीं पांगुळतां मरावें
निरूपणें मानस आवरावें ॥

(२५) मन हें विवेकें विशाळ करावें। मग आठवावें परब्रह्म ॥

(२६) कांचनाचें ध्यान परस्त्रीचिंतन। जन्मासी कारण हींच दोन्ही॥

(२७) उपासना कर्म हें आधीं पाळावें। मग सांभाळावें ब्रह्मज्ञान॥

(२८) ज्ञानेविण देव कैंचा ठायीं पडे। अज्ञानें बापुडे गुंडाळले ॥

(२९) प्रचीतीचा देव प्रचीतीचा भाव। करावा उपाव सप्रचीत ॥

(३०) ज्ञानाचें लक्षण क्रियासंरक्षण। वरी विशेषेण रामनाम ॥

(३१) प्रत्ययाचें ज्ञान तेंचि तें प्रमाण। येर अप्रमाण सर्व कांहीं ॥

(३२) राम कैसा आहे हें आधीं पहावें। मग सुखेनैव दास्य करूं॥

(३३) गुरुवीण प्राणी त्या होय जाचणी।
सत्य माझी वाणी, मिथ्या नव्हे ॥

(३४) प्रपंचीं असोनी परमार्थ करावा। बरा विवरावा निरंजन ॥
संसार करावा सुखें यथासांग। परी संतसंग मनीं धरा ॥

(३५) करूनीयां पंचीकरण-विवरण। पहा मी-तूंपण कोठें आहे? ॥

(३६) रावणासारिखी कोणाची संपत्ती।
तोहि गेला अंतीं एकलाचि ॥

(३७) स्त्रियांचें हो जिणें पराधीन जालें ।
पुरुषें विकिलें आपणासी ॥ १ ॥
आपणां विकिलें या पोटाकारणें । पराधीन जिणें सहजचि ॥२॥
सहजचि जालें सर्व पराधीन । सत्यचि वचन दास म्हणे ॥ ३ ॥

(३८) दुःखमूळ जन्म नर आणि नारी ।
पाहतां संवसारीं सुख नाहीं ॥ २ ॥
सुख नोहे कदा शाश्वतावांचोनी ।
जाणतील ज्ञानी दास म्हणे ॥ ३ ॥

(३९) माझें सर्व जावें देवानें रहावें । देवासी पहावें भक्तपणें ॥

(४०) देहीं आरोग्य चालतें । भाग्य नाहीं त्यापरतें ॥

## दासबोधांतील सारभूत वचनें

(१) भल्यानें परमार्थीं भरावें । शरीरसार्थक करावें ।
पूर्वजांस उद्धरावें । हरिभक्ति करूनी ॥

(२) सन्मार्ग दाखवी जना । जो लावी हरिभजना ।
ज्ञान शिकवी अज्ञाना । तो सत्त्वगुण ॥

(३) दृढ निश्चयो धरावा । संसार सुखाचा करावा ।
विश्वजन उद्धरावा । संसर्गमात्रें ॥

(४) सांडून राम आनंदघन । ज्याचे मनीं विषयचिंतन ।
त्यासी कैंचें समाधान । लोलंगतासी ॥

(५) ऐसें श्रवण सगुणाचें । अध्यात्मनिरूपण निर्गुणाचें ।
विभक्ति सांडून भक्तीचें । मूळ शोधावें ॥

(६) ब्राह्मण्य रक्षावें आदरें । उपासनेचीं भजनद्वारें ।
गुरुपरंपरा निर्धारें । चळोंच नेदावी ॥

(७) बाळपणीं तारुण्यकाळीं । कठिणकाळीं वृद्धापकाळीं ।
सर्वकाळीं अंतकाळीं । नामस्मरण करावें ॥

(८) सद्गुरुकृपेविण कांहीं । भवतरणोपाय नाहीं ।
याकारणें लवलाहीं । सद्गुरुपाय सेवावे ॥

(९) तस्मात् विचार करावा। देव कोण तो ओळखावा।
आपला आपण शोध घ्यावा। अंतर्यामीं॥

(१०) ऐक ज्ञानाचें लक्षण। ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान।
पाहावें आपणासि आपण। या नांव ज्ञान॥

(११) हातीं द्रव्याची जपमाळ। कांताध्यान सर्वकाळ।
सत्संगाचा दुष्काळ। या नांव बद्ध॥

(१२) उपदेशिलें आत्मज्ञान। तुटलें संसारबंधन।
दृढतेकारणें करी साधन। या नांव साधक॥

(१३) म्हणोनि संदेहरहित ज्ञान। निश्चयाचें समाधान।
तेंचि सिद्धाचें लक्षण। निश्चयेंसी॥

(१४) गुप्त तेंचि प्रगटवावें। असाध्य तेंचि साधावें।
कानडेंचि अभ्यासावें। सावकाश॥

(१५) तत्त्वांचें गाठोडें शरीर। याचा पाहावा विचार।
येक आत्मा निरंतर। आपण नाहीं॥

(१६) जागे होतां स्वप्न सरे। विवेक पाहतां दृश्य वोसरे।
स्वस्वरूपानुसंधानें तरे। प्राणिमात्र॥

(१७) म्हणोन वादवेवाद। सांडून कीजे संवाद।
तेणें होय ब्रह्मानंद। स्वानुभवें॥

(१८) कर्ता राम मी नव्हें आपण। ऐसें सगुण निवेदन।
निर्गुणीं तें अनन्य। निर्गुणचि होइजे॥
मी कर्ता ऐसें म्हणसी। तेणें तूं कष्टी होसी।
राम कर्ता म्हणतां पावसी। यशकीर्तिप्रताप॥

(१९) देहास लागली उपासना। आपण विवेकें उरेना।
ऐसी हे स्थिति सज्जना—। अंतरींची॥

(२०) दृष्टीस दिसे मनास भासे। तितुकें काळांतरीं नासे।
म्हणोनि दृश्यातीत असे। परब्रह्म तें॥

(२१) संसारत्याग न करितां। प्रपंचउपाधी न सांडितां।
जनामध्यें सार्थकता। विचारेंचि होय॥

(२२) येचि जन्मीं येचि काळें । संसारीं होईजे निराळें ।
मोक्ष पाविजे निश्चळें । स्वरूपाकारें ॥

(२३) आहे तितुकें नाहीं जालें । नाहीं नाहींपणें निमालें ।
आहे नाहीं जाऊन उरलें । नसोन कांहीं ॥

(२४) माया ब्रह्म वोळखावें । तयासी अध्यात्म म्हणावें ॥

(२५) म्हणोनि बोलतां चालतां । निचेष्टित पडिलें नसतां ।
मुक्ति लाभे सायुज्यता । सद्गुरुबोधें ॥

(२६) मीपण–जाणोनि त्यागावें । ब्रह्म–होऊनि अनुभवावें ।
समाधान तें पावावें । निःसंगपणें ॥

(२७) श्रवणअभ्यासें । पाविजे ब्रह्म ॥

(२८) साधन सोडितां होय । मुक्तपणें बद्ध ॥

(२९) अरे जें जालेंचि नाहीं । तयाची वार्ता पुससी काई ? ॥

(३०) प्रज्ञेविण अर्थ न कळे । विश्वासेंविण वस्तु नाकळे ।
प्रज्ञाविश्वासें गळे । देहाभिमान ॥

(३१) सकळ धर्मांमध्यें धर्म । स्वरूपीं राहणें हा स्वधर्म ॥

(३२) वस्तु आपणचि होणें । ऐसें वस्तूचें पाहणें ॥

(३३) धर्मस्थापनेचे नर । ते ईश्वराचे अवतार ।
मागां जाले आतां आहेत पुढें होणार । देणें ईश्वराचें ॥

(३४) भ्रमरूप विश्व स्वभावें । तेथें काय म्हणोन सांगावें ।
निर्गुण ब्रह्मावेगळें आघवें । भ्रमरूप ॥

(३५) सांडील सगुण भजनासी । तो ज्ञाता परी अपेशी ॥

(३६) म्हणोन निःकाम भजन । वरी विशेष ब्रह्मज्ञान ।
तयास तुळतां त्रिभुवन । उणें वाटे ॥

(३७) जो चंचळासी ध्याईल । तो सहजचि चळेल ।
जो निश्चळासी भजेल । तो निश्चळचि ॥

(३८) प्रकृतीसारिखें चालावें । परी अंतरीं शाश्वत वोळखावें ।
सत्य होऊन वर्तावें । लोकांऐसें ॥

( ३९ ) मुख्य हरिकथानिरूपण । दुसरें तें राजकारण ।
तिसरें तें सावधपण । सर्व विषईं ॥

( ४० ) सबळ विषय त्यागणें । शुद्ध कार्याकारण घेणें ॥

( ४१ ) लटक्याचा कर्ता कोण । हें पुसणेंचि अप्रमाण ।
म्हणोनि हेंचि प्रमाण । जे स्वभावेंचि जालें ॥

( ४२ ) ध्यानीं गुंतलें मन । कैंचें आठवेल जन ।
निःशंक निर्लज्ज कीर्तन । करितां रंग माजे ॥

( ४३ ) देव अंतरात्मा सगुण । सगुणें पाविजे निर्गुण ।
निर्गुणज्ञानें विज्ञान । होत असे ॥

( ४४ ) सत्याचा जो साभिमान । तो जाणावा निरभिमान ॥

( ४५ ) कर्म उपासना आणि ज्ञान । त्रिकांड वेद हें प्रमाण ।
ज्ञानाचें होतें विज्ञान । परब्रह्मीं ॥

( ४६ ) नारायण असे विश्वीं । त्याची पूजा करीत जावी ।
याकारणें तोषवावी । कोणी तरी काया ॥

( ४७ ) संन्यासी म्हणिजे षड्न्यासी । विचारवंत सर्व संन्यासी ॥

( ४८ ) देहें जैसें केलें तैसें होतें । यत्न केल्या कार्य साधतें ॥

( ४९ ) आधीं राखावा आचार । मग पाहावा विचार ।
आचारविचारें पैलपार । पाविजेतो ॥

( ५० ) येक जिकडे पाहावें तिकडे अपार । कोणेकडे नाहीं पार ।
येकजिनसी स्वतंत्र । दुसरें नाहीं ॥

## १८ आत्मसमाधान व धन्यता

( १ ) तुळजाभवानीच्या स्तोत्रांत समर्थांच्या आत्मसमाधानाचे उद्गार निघाले आहेत. आपली कुळदेवता तुळजापूरची देवी भवानी हिला श्रेष्ठांनीं नवस केला होता तो फेडण्याकारितां समर्थ प्रतापगडीं गेले, तेथें त्यांनीं देवीची पूजा बांधली. श्रेष्ठांचे व समर्थांचेही बाळपणचे मनोरथ पूर्ण झाले होते. जांबसारख्या खेड्यांतून १२ व्या वर्षी उपासनाप्रेमानें पळून

गेलेला मुलगा मोठ्या नांवालौकिकास चढावा व जगदुद्धारक व्हावा असाच श्रेष्ठांचा नवस होता. तो पूर्ण झाल्याबद्दल समर्थांनीं येथें आनंदोद्गार काढले आहेत.

**पुत्रचि घेतला त्याचा जोगी करुनि सोडला ।**
**ख्यानती दाविली मोठी न्यायनीति चुकेचिना ॥ ३ ॥**

**तुझा नवाजिलों आहें महंत म्हणती जनीं ।**
**तुझेंचि सर्वही देणें सर्वही तुजपासुनी ॥ ५ ॥**

**संसारीं मोकळें केलें आनंदीं ठाव दीधला ।**
**तोडिली सर्वही चिंता तूं माया सत्य जाहलें ॥ ६ ॥**

**सदानंदीं उदो जाला सुखसंतोष फावला ।**
**पराधीनता गेली सत्ता ऊदंड चालली ॥ ८ ॥**

बाळ असतांनाच तुला शरण आलों त्याचा तूं जोगी करून सोडलास, त्याची ख्याति ( कीर्ती ) वाढविलीस! हें सर्व तुझेंच देणे आहे. संसारांतून सोडवून परमानंदीं ठाव दिलास, तूं आई ( माया ) खरी आहेस. सदानंदीं उदय झाला, सुखसमाधान मिळाले, पराधीनता जाऊन माझेंच सामर्थ्य सर्वत्र प्रगट झाले, रामाला वरदायिनी होणारी तूं रामदासालाही वर देती झालीस.

**तुझेंचि तुज म्यां दिल्हें म्यां हें कोठोनि आणिलें ।**
**संकटें वारिलीं नाना रक्षिलें बहुतांपरी ॥ १५ ॥**

( २ ) माझ्यासाठीं कांहींच मागायचें राहिलें नाहीं. मला तूं पूर्णकाम केले आहेस. पण माझा लाडका शिवबा याच्या हातून दुष्टसंहार होऊन त्याचें राजैश्वर्य वाढलेले मला डोळ्यांनीं पोटभर पाहूं दे—

**येकची मागणें आतां द्यावें तें मजकारणें ।**
**तुझा तूं वाढवीं राजा सीघ्र आम्हांचिदेखतां ॥ १७ ॥**

दुष्ट संहारिले मागें ऐसें ऊदंड ऐकतों ।
परंतु रोकडें कांहीं मूळसामर्थ्य दाखवीं ॥ १८ ॥

देवांचीं राहिलीं सत्त्वें तूं सत्त्व पाहसी किती ।
भक्तांसी वाढवीं वेगीं इच्छा पूर्ण परोपरी ॥ १९ ॥

कास या रघुनाथाची धरितां सुख पावलों ।
इतर कष्टती प्राणी थोर संसारसांकडीं ॥ १ ॥

सांकडीं तोडिलीं माझीं राघवें करुणालयें ।
महत्कीर्ति श्रीरामाची फावला महदाश्रयो ॥ २ ॥

सेवकू मानवीयांचे कष्टती बहुतांपरी ।
सेविला देव देवांचा तेणें मी धन्य जाहलों ॥ ३ ॥

रामसेवकांत श्रेष्ठ जो मारुती—'त्याचा मी म्हणती जनीं'—त्याचा मी सेवक किंवा अवतार आहें असे लोक म्हणतात! शिववाल्मीकींना तारणारे रामनाम 'मजअंतरीं' आहे. रामभजनामुळे 'आपुलीं वाटती सर्वे धन्य तूं गा रघूत्तमा!'

(३) ओवीरूप अभंगांत (प्र० ८) समर्थ म्हणतात —

**आम्हां नाहीं चाड ते कोणीएकाची । दृढ राघवाची कास धरूं १**
**कास धरूं जेणें पावनचि केलें । तेणें माझें जालें समाधान २**

* * *

**राघवाचीं पदें मानसीं धरीन । विश्व उद्धरीन हेळामात्रें ४**
**हेळामात्रें मुक्त करीन या जना । तरीच पावना राघवाचा ५**
**राघवाचा दास मी जालों पावन । पतित तो कोण उरों सके? ६**

रामाची कास धरिल्यामुळे मी पावन झालों व पूर्ण समाधान पावलों, आतां लीळामात्रेंकरून विश्वाचा उद्धार करीन. आतां माझ्यासमोर पतित कोण राहील? 'जो कोणी पुसेना त्यासी उणे!' जो आमच्याकडे येणार

नाहीं तो पतित राहील! 'कितीएक जन ज्ञानें उद्धरिले' आहेत. शरणागताचा उद्धार तत्काळ करणार नाहीं तर राघवाचा दासच नव्हें.

**राघवाचा वर पावलों सत्वर। जनाचा उद्धार करावया!॥**

( ४ ) जुन्या दासबोधाच्या १६ व्या समासांत समर्थांनीं आत्मतृप्तीचे उद्गार काढले आहेत ते चित्त द्रवविणारे आहेत. 'रामासि इतुकें मागावें। जे आपण रामचि व्हावें। कां रामासी दास करावें। आपणाऐसें'—आपण तरी राम व्हावें अगर आपले दासपण रामाला देऊन आपण त्याचे स्वामी व्हावें. 'तुवां स्वामी होऊनि बैसावें। आणि आम्हांसभोंवते भोंवावें,' तूं स्वामी होऊन निश्चळ बसावेस आणि आम्हांला भवचक्रांत फिरवून उलट आम्हांसच दोषी, पतित, जन्ममृत्युवान्, मर्त्य म्हणावेस, 'रागेजोन बाहतां न यावें। हे काय बरें?—हे काय स्वामीपणास शोभते? तूं राज्य सोडून उदास झालास, तर आम्हीही तुझेच दास सर्वसंग सोडून मोकळे झालों आहोत. तू बापाला (दशरथाला) जें उत्तर दिलेस तेच आमचेही तुला उत्तर आहे!

**तुवां पाषाण तारिले। तरी आम्हीही जडजीव उद्धरिले।**
**तुवां देव मुक्त केले। बंधनापासुनी॥ ५॥**

**तरी आम्हीही भाविकांसी। सोडवूनियां मोक्षपदासी।**
**पावविले—तयांसी। मागुता जन्म नाहीं!॥ ६॥**

**तुवां जरामरण केलें दूरी। तें मुळींच नाहीं आमुचे घरीं।**
**तूं राजा अक्रा सहस्रवरी। तरी आम्हांसि संख्या नाहीं॥ ७॥**

**तुवां पुरी नेली वैकुंठा। आम्ही वैकुंठाच्या बारा वाटा।**
**करूनि मांडिला चोहटा। तया वैकुंठाचा॥ ८॥**

**ऐसें बोलती रामदास। निधडे सर्वस्वें उदास।**
**वैभव वाटे जयास। कसपट जैसें॥ ९॥**

हें धिटाईचें, लडिवाळपणाचे भाषण ऐकून रामानें मंदहास्य केलें व 'धांवोनियां हृदयीं धरिले । आपुलिया निजदासा.' कर्तबगारीनें लोकमान्य झालेल्या पुत्राचे कौतुक कोणा पित्यास वाटणार नाहीं? राम भक्ताचा 'भावार्थ देखोनि भुलला.' तात्पर्य—

**रामें आपणासारिखें केलें । दास दासपणेंसी मुकले ।**
**रामासि मिळोनि येकचि जाले । एकपणाहीवेगळे ॥ १३ ॥**

स्वामीसेवकपणाच्या या आनंदानें राम व दास दोघेही उचंबळले. 'जीव घेणें जीव देणें' हें देवाभक्तांनाच साजतें. 'आपण स्वयें रामचि होणे' यासाठींच नवविधाभक्ति करायची असते.

( ५ ) तडवळे मठांतील संग्रहांतून पुढील पद्य मिळालेलें आहे. त्यांत २० श्लोक आहेत. 'परिच्छिन्नसे येक तोही न बोले' म्हणजे सारे संशयात्मक ज्ञानांत व ज्ञानसाधनांत गुंतलेले असून निश्चयात्मक निःसंदेह ज्ञान कोणीच बोलत नाहीं असें दाखवून, शेवटीं समर्थांनीं आपण निःसंदेह व कृतकृत्य कसे झालों तें सांगितले आहे. पहिला श्लोक —

**जनीं पाहिले संत वीरक्त ज्ञानी । परी राहिले सर्वदा वृत्तिध्यानीं ।**
**लयामाजि लक्ष्यींच गुंतोनि गेले । परिच्छिन्नसें येक तोही न बोले ॥**

लयलक्ष्यांत व वृत्तिध्यानांत गुंतलेले हे—यांना निःसंदेह ज्ञान ठाऊक नाहीं! कित्येक सिद्धिसामर्थ्यावरच प्रसिद्धी पावले—असे मागें झाले—आतां आहेत. किती योगांत व सोहमस्मीच्या जपांतच मग्न! संस्कृत प्राकृत ग्रंथ व त्यांतील मतांतरें—' बहूतीं बहू निश्चयो स्थापियेले' पण निःसंदेहता नाहीं. गीताभारत व वेदशास्त्र यांत पारंगत—पण यथार्थ अर्थ किंवा मर्म चुकलेले! शाक्तमार्गी, मुक्तिमार्गी, कोलमार्गी, जटाभार वाढवून तीर्थोतीर्थीं हिंडणारे, नेत्रपातीं दपटून चमक दाखविणारे, दृश्य मिथ्या म्हणून त्याच मिथ्यावर ब्रह्मसत्ता स्थापणारे, पिंडज्ञानी, तत्त्वज्ञानी, विरक्त, कीर्तनमग्न इ० इ०

असा धुंडितां नाडळे येक तोही ।
जनीं आमुच्या सुकृता पार नाहीं ॥
समर्थें कृपाळूपणें मुक्त केलें ।
परिच्छिन्नसें चित्त होवोनि गेलें ॥ १६ ॥

आमच्या बहुत जन्मांच्या पुण्यसारांशानें हा जन्म लाधला—

तया सुकृताच्या गुणें मोक्षरासी
समर्था प्रभू ! तूं आम्हां जोडलासी ।

त्यामुळें मनाचा निवाडा झाला, निःसंदेहता मिळाली.

पदीं लागतां शून्य जन्मांतरें तें
अखंडीत वस्तूचि मी तत्कृपेतें ।
असे सप्रचीती प्रचीतीस आलें
मना उन्मनी कोण बोलेल बोलें ॥ १९ ॥

बरें उन्मनी धूम्रन्यायें विराली
नसे दृश्य जे वस्तु तद्रूप जाली ।
पुढें ऊरला देह तो राघवाचा
गुरूच्या पदीं अर्पिला हो त्रिवाचा ॥ २० ॥

## ९. मनोबोध ऊर्फ मनाचे श्लोक



### १ श्लोकांची लोकप्रियता

श्रीसमर्थकृत 'मनाचे श्लोक' महाराष्ट्रांत आबालवृद्धांना चांगले माहीत आहेत. त्यांतले चारदोनही श्लोक ज्याला पाठ येत नाहींत किंवा दहापांच चरण ज्याच्या मुखांत नाहींत असा मनुष्य विरळाच सांपडेल. आपल्या मनाशीं बोलायला व मनाशीं बोलतांना मनोवाचातीत अशा 'राघवाचा पंथ' शोधायला ह्या श्लोकांनीं लोकांना शिकविले आहे. हे श्लोक २०५ आहेत. ह्यांचा प्रवाह अस्खलित आहे. म्हणायला गोड, पाठ करायला सोपे, ऐकायला मधुर, मननाला सुखशांतिदायक असे हे श्लोक लोकप्रिय झाले यांत कांहीं नवल नाहीं. हे म्हटले तर सोपे आहेत, म्हटलें तर कठिण आहेत! अर्थरूप होऊन पाहतां श्रुतिस्मृतिपुराणांचें सार त्यांत सांठविलें आहे असें आढळून येतें. मराठी भाषेंतले हें एक उपनिषद् आहे. मनाला श्लोकांत, अभंगांत, ओवींत अनेकांनीं बोध केला आहे, पण समर्थांच्या ह्या श्लोकांत साधेपणा, सहजपणा, ओज व प्रसाद भरला आहे. उपासनेची ज्ञानाशीं मिठी पडल्याचा जो अनिर्वाच्य स्वसुखानुभव यांत व्यक्त झाला आहे त्यामुळें ह्या श्लोकांना अवीटपणा आला आहे. अनुभवाची वाणी प्रासादिक व अवीट असते, पुनःपुन्हा मनाशीं गुणगुणावीशी वाटते व म्हणून जनता तीवर भाळते. रामदासी बाण्याचे लोक भिक्षेला बाहेर

पडतात तेव्हां रस्त्यावरच प्रत्येक घरापाशीं क्षणभर उभे राहून मनाचा एखाद दुसरा श्लोक ते म्हणतात व येईल ती भिक्षा झोळींत घेऊन 'जयजय रघुवीर समर्थ' ह्या मंत्राचा घोष करीत पुढें सरकतात. तो रामदासी बाण्याचा फकीरी वेष, व खड्या सुरांत गंभीरवाणीनें म्हटलेला तो श्लोक ऐकून वृद्धतरुण नरनारी हातांतलीं कामें टाकून चटकन् अंगणांत येतात व समाधान पावतात.

समर्थांनीं येथें मनाच्या निमित्तानें जनांस बोध केला आहे व तो मनाच्यापलीकडे राहून केला आहे! मनास बोध केला आहे याचा अर्थच मनाहून आपण वेगळे आहोंत असा आहे. मन उपदेश्य आहे म्हणजेच उपदेष्टा मनापासून निराळा आहे, तो मनाचे व्यापार पाहणारा द्रष्टा आहे. ही अध्यात्माची बैठक गांठून मनाचे श्लोक पाहिले म्हणजे त्यांचें स्वारस्य चांगलें लक्षांत येतें. पाकळ्या अनेक असल्या तरी फूल एक, तरंग अनेक उठत असले तरी सरोवर एक, त्याप्रमाणें मनाच्या वृत्ति अनेक असल्या तरी मन एकच आहे.

## २ श्लोकरचनेचा प्रसंग

समर्थांनीं मनाचे श्लोक कोणत्या प्रसंगीं रचले यासंबंधाची आख्यायिका माझ्या ऐकण्यांत आहे ती अशी —चांफळास समर्थांनीं श्रीरामनवमीचा उत्सव सुरू केला. यास कांहीं वर्षें होऊन गेलीं. प्रथम समर्थांचे शिष्य उत्सवासाठीं भिक्षा मागून आणीत व त्यावर उत्सवाचे दहा दिवस निभून जात. पुढें शिवाजीमहाराजांकडून शिधासामग्री येऊं लागली, यात्राही पुष्कळ जमूं लागली व यामुळें उत्सवाचा उत्साह व व्याप वाढत चालला. एक साल शिवाजीमहाराजांकडून शिधासामग्री वेळेवर आली नाहीं. दिवस थोडे म्हणजे पंधराच उरले, तेव्हां यंदाचा उत्सव कसा पार पडेल याची शिष्यांस चिंता पडली व त्यांच्यांत चर्चा सुरू झाली. १४ दिवस राहिले, १३ राहिले. तेव्हां सायंकाळीं बरेच शिष्य

समर्थांभोंवतीं गोळा झाले व ‘महाराजांस समर्थांनीं पत्र लिहावें व शिधासामग्री मागवावी’ अशी त्यांनीं त्यांस विनंति केली. यावर समर्थांनीं शांतपणें हंसून उत्तर केलें, “राम समर्थ आहेत, त्यांचा उत्सव ते पार पाडून घेतील. माझ्या रामाच्या उत्सवासाठीं कोणा शिष्याकडे कांहीं मागायला नको. भिक्षेवर उत्सव होईल.” तरी या उत्तरानें शिष्यांचें समाधान झाले नाहीं. त्यांनीं चिंतातुर होऊन आपसांत मसलती चालविल्या. रोज यात्रा येणार; त्यांच्या फराळाची, जेवण्याखाण्याची आगाऊ तजवीज झाली पाहिजे. याची काळजी समर्थांना नव्हती, सारी काळजी शिष्यांना ! पाडव्याला दहा दिवस राहिले, संध्याकाळ झाली, रात्र पडली. समर्थ निश्चिंत व शिष्य चिंतातुर ! मध्यरात्रीच्या सुमारास समर्थांनीं कल्याणस्वामीस कागदलेखणी व दौत घेऊन खोलींत बोलावले व मुखाने ‘गणाधीश जो ईश’ येथपासून श्लोक तोंडाने बोलण्यास सुरुवात केली. समर्थांनीं श्लोक म्हणावा व तो कल्याणस्वामींनीं टिपून घ्यावा. याप्रमाणे एका प्रहरांत हे श्लोक सांगण्याचें व लिहिण्याचें काम संपलें ! कल्याणस्वामींस कांहीं आज्ञा करून समर्थ वनांत गेले ते पाडव्याचे दिवशीं सूर्योदयानंतर प्रगट झाले. समर्थ गेल्यावर दुसरेच दिवशीं कल्याणस्वामींनीं १०।१५ शिष्य बोलावून घेतले, त्यांजकडून मनाच्या श्लोकांच्या तितक्या प्रती करविल्या, त्यांना आसपासच्या खेड्यांतून पाठविले व आज्ञा केली कीं, “प्रत्येक घरापुढें उभें राहून एक श्लोक म्हणावा, ‘जयजय रघुवीर समर्थ’ ही गर्जना करावी, व तितक्या वेळांत येईल ती भिक्षा झोळींत घ्यावी व दुसरें घर पहावें.” समर्थांची वाणी, समर्थ-शिष्यांच्या मुखांतून प्रगट होत असलेली, लोकांनीं अत्यंत आवडीने ऐकली. गाड्यांच्या गाड्या भरून सामान सज्जनगडावर आले आणि उत्सव थाटाने पार पडला ! समर्थांची जिवंत वाणी जिवंत माणसास वेड लावील यांत नवल काय—ती निजलेल्यांनाही जागे करणारी आहे !

## ३ मनाचें स्वरूप

प्राणिमात्रांचे सर्व व्यापार मनःस्फूर्तीने होतात. मनुष्याला मनोजयामुळे श्रेष्ठत्व आहे. मानव म्ह० मन असलेला, मनन करणारा प्राणी, मनुष्य. इतर प्राण्यांत मन असतें पण तें मनुष्याइतकें विकासक्षम नसतें. सद्गति किंवा अधोगति देण्याला एक मनच समर्थ आहे. सुखदुःखाला कारण मन होय. मन म्हणजेच संसार. बंध आणि मोक्ष मनामुळेंच.

**मनःकल्पित संसार जाण। मनें कल्पिलें जन्ममरण।**
**संसारचक्रीं आवर्तन। मनास्तव जाण पुनःपुनः॥ ( नाथ )**

म्हणून मनाचा निग्रह हेंच सर्वोत्तम ज्ञान होय. "ज्ञानेंद्रियेंच केवळ नव्हत तर त्या इंद्रियांच्या देवताही मनाच्या आधीन असतात, मन मात्र दुसऱ्या कोणाच्याही तंत्राने चालत नाहीं. मनोरूप देव सर्व देवांत अत्यंत बलिष्ठ आहे. अशा पराक्रमी मनाला जो कोणी लगाम घालील तो देवांचाही देव होय" (श्रीभागवत ११–२३). एखादा पराक्रमी शिकंदर सारें जग जिंकील, पण मनाला जिंकणे अत्यंत कठिण आहे, व म्हणूनच बाहु-बळानें जग जिंकणाऱ्या महावीरांपेक्षांही मनोनिग्रही साधूंचा साऱ्या जगांत अधिक मान असतो. त्रिभुवनविजयी मनावर खोगीर घालून त्याला कह्यांत वागविणारे संतच खरे वीर होत. मनोजय दुर्घट आहे पण मनोजयाचें फळही अफाट आहे. वाऱ्याची मोट बांधवेल पण या चंचल, खोड्यांत पाडणाऱ्या व प्रतापी मनाचा निग्रह होणें दुर्घट आहे असें धनुर्धर पार्थानें मनाचें जें वर्णन केले तें खरेंच आहे; तथापि अशाही मनाला 'अभ्यास व वैराग्य' ह्या दोन साधनांनीं कह्यांत ठेवतां येतें असें योगेश्वर कृष्णाचें त्याला धीराचें उत्तर आहे!

वैराग्य म्ह० मनाला विषयांपासून सोडवणें व अभ्यास म्ह० त्याला स्वस्वरूपानुसंधानाच्या खुंट्याला घट्ट बांधून टाकणें. गीतेंत भगवंतांनीं व

योगशास्त्रांत पतंजलमुनींनीं वैराग्य व अभ्यास या दोन साधनांनीं मन जिंकण्यास सांगितले आहे.

मन ही काय चीज आहे? मन, बुद्धि, चित्त व अहंकार हीं कार्यपरत्वें कल्पनेला दिलेलीं चार नांवें आहेत. याला चित्तचतुष्टय म्हणतात. एका वृत्तीच्याच या चार कला आहेत. वृत्ति संकल्पविकल्प करिते तेव्हां तिला **मन** म्हणतात, एकाच संकल्पाचें चिंतन करिते तेव्हां तिला **चित्त** म्हणतात, निश्चयारूढ झाली कीं तिला **बुद्धि** हें अभिधान मिळतें व संकल्पाचा अभिनिवेश घेते तेव्हां तिलाच **अहंकार** हें नांव मिळते! माया, अविद्या, प्रकृति, अज्ञान, शून्य, महत्तत्त्व, संसार, कल्पना, मन, अहंकार, जीव हीं जगज्योतीला प्रगट करणाऱ्या किंवा झांकणाऱ्या कल्पनेचीं ऊर्फ मनाचीं नांवें आहेत! आपले निजात्मरूप (जुनें ठेवणे) आपले आपल्यापाशीं सहजसिद्ध असून त्याची प्रतीति झाली नाहीं तोंवर त्याला आवरण झालेल्या कल्पनेच्या ऊर्फ मनाच्या निरसनार्थ यत्न करणे हाच परमार्थ. पण असें हे मन आहे तरी कोठें?

**हें मन कैसें केवढें। पाहों म्हणों तरी न सांपडे।**
**येऱ्हवीं राहाटावया थोडें। त्रैलोक्य यया॥ ४१॥**
**तें विवेकातें भुलवी। संतोषासी चाड लावी।**
**बैसिजे तरी हिंडवी। दाही दिशा॥ ४१५॥ (ज्ञाने०, अ० ६)**

मन हें प्रकृतीचें मूळ, काम, अहंकार, इच्छा, आशा, भय, द्वेष इ० विकारांना बळ देणारे, इंद्रियांना विषयांच्या खाईंत लोटून देणारें, बुद्धीचें दार झांकून टाकणारें, सर्व भ्रमांचें कोठार आहे, असें ज्ञानोबारायांनीं मनाचें वर्णन केलें आहे (ज्ञाने०, अ० १३, ओवी ११०–११५). मन हें वायुतत्त्वाचें असून रजोमय आहे व एकीकडे बुद्धि व एकीकडे इंद्रियें या दोघांच्या संधींत तें आहे असें त्यांनीं तेथेंच म्हटलें आहे! इंद्रियांच्या-पलीकडे मन, मनाच्यापलीकडे बुद्धि व बुद्धीच्यापलीकडे परमात्मवस्तु

आहे असें श्रुतिमाउली सांगते म्ह० मनोबुद्धींचा पडदा दूर सारतां आला कीं परमात्मवस्तु सिद्धच आहे. मनोरूप कल्पनेचा पट फाटला कीं निर्विकल्प वस्तु आपली आहे, आपणच ती आहोंत. म्हणूनच 'मय्येव मना आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय' असें देव सांगतात. मनाच्यापलीकडे 'उन्मन.' 'उन्मनीच्या सुखाआंत। पांडुरंग भेटी देत' असें जनाबाईनें म्हटलें आहे. मन हें केवढें बलाढ्य, चंचल व दुर्दमनीय आहे! मनाचा पट दूर करितां येतो काय? जरूर येतो, तो पट दूर सारूनच संत निजरूपाला पावले आहेत. मन जिंकायचें कसें? 'जेंवि हिरेनि हिरा चिरिजे। तेंवि मनेंचि मन धरिजे' (नाथभागवत, अ० २३–६८५). मनानेंच मन जिंकायचें आहे. हिरा अत्यंत कठिण म्हणून तो चिरायला तत्सम हिराच लागतो, त्याप्रमाणे मनाला मनानेंच जिंकले पाहिजे. अंतर्मन व बहिर्मन असे कोणी मनाचे दोन भेद कल्पितात. एकाद्या फुरफुरणाऱ्या घोड्यासारखें मन वाटेल तिकडे बेफाम धांवत सुटतें, पण त्याला चुचकारून, गोड बोलून, वळवावें तिकडे तें वळतेंहि! हें वेडे मन ज्याचें चिंतन करितें तद्रूप होतें! त्याला नाटक दाखविलें कीं तें नाटकाचाच छंद घेऊन उठतें, बरे त्याला कीर्तनांत रंगविलें तरी त्याची ना नाहीं—तें कीर्तनाचाही छंद घेतें. जें देखतें तेथेंच हें बिलगतें हा मनाचा धर्म लक्ष्यांत घेऊन त्याला विषयाची गोडी न चाखवितां आत्मसुखानंद दाखविला तर तेंच मन विषयांचा कंटाळा करून आत्मारामीं रंगते! ज्ञानेश्वरमहा-राजांनीं हा मनाचा एक गुण उत्तम प्रकारे वर्णिला आहे. मन चंचल खरें—

**परी वैराग्याचेनि आधारें। जन्ही लाविले अभ्यासाचिये मोहरे।**
**तरी केतुलेनि एके अवसरें। स्थिरावेल॥**
**कां जे यया मनाचें एक निकें। जे देखिलें गोडीचिया ठाया सोके।**
**म्हणोनि अनुभवसुखचि कवतिकें। दावीत जाइजे॥**

वैराग्याचा आधार घेऊन हें अभ्यासाच्या मार्गाला लावलें तर कांहीं काळानें म्ह० अभ्यास पचनीं पडेल तेव्हां हें स्थिर होईल, मनच उन्मन होईल.

**या मनाची एक उत्तम गती । जरी स्वयें लागलें परमार्थी ।**
**तरी दासी करी चारी मुक्ती । दे बांधोनि हातीं परब्रह्म ॥** (नाथभागवत)

जें मन संसारचक्रांत पाडायला कारण होतें तेंच मन तेथून सोडवायलाही कारण होतें! बंधाला कारण मन व मोक्षालाही कारण मनच, यास्तव मनाला प्रसन्न करून घ्यावें. तुकोबाराय सांगतात —

**मन करा रे प्रसन्न । सर्व सिद्धींचें कारण ।**
**मोक्ष अथवा बंधन । सुखसमाधान इच्छा ते ॥ १ ॥**

हें ज्याचें त्यानेच दृढाभ्यासपूर्वक केलें पाहिजे.

**मन दिसतें मा धरावें । ज्याचें त्यानें आवरावें ।**
**आवरून विवेकें भरावें । अर्थांतरीं ॥** ( दास० १८-१० )

मनाला कसें आवरावें व रामरूपीं भरावें हें शिकविण्यासाठीं मनाच्या श्लोकांची प्रवृत्ति झाली आहे. हे मनाचे श्लोक वाचावेत, त्यांचे निरूपण ऐकावें, मननानें अर्थांतरीं भरावें, सगुणनिर्गुणरूप रामरूपाच्या ठायीं समरसून जावें व मुक्तीचा सुखसोहळा भोगावा अशी श्रीसमर्थांची या श्लोकांच्या रूपानें सर्व जीवांस शिकवण आहे. समर्थ अन्यत्र म्हणतात —

**ब्रह्मादिकां मानस आवरेना । नाना उपायीं मरतां मरेना ।**
**तें निर्गुणीं पांगुळतां मरावें । निरूपणें मानस आवरावें ॥ ४ ॥**
**जनीं मनावांचुनि सूख नाहीं । मनेंचि लाभे गुज सर्व कांहीं ।**
**परंतु तें स्वाधिन हो! करावें । निरूपणें मानस आवरावें ॥ ५ ॥**

पुण्याचे कै. वामनराव तळवलकर यांनीं ‘ रामदास रामदासी ’ ह्या मासिकांत ‘ मनाचे श्लोक उर्फ ‘ Auto-suggestions ’ ह्या विषयावर ४।५ लेख लिहून प्रसिद्ध केले होते. पाश्चात्य मानसशास्त्रवेत्ते मनाविषयीं काय

लिहितात व उपनिषदांत काय म्हटलें आहे या दृष्टीनें मनाच्या श्लोकांचा वामनरावांनीं विचार केला आहे. त्याचा निष्कर्ष एवढाच आहे कीं, मन हें एक नसून दोन आहेत! मानसशास्त्रज्ञ प्राण्याला अनेक मनें आहेत असें मानतात व मनुष्याला २।३ मने आहेत असें प्रतिपादितात! अर्वाचीन शास्त्रज्ञांनीं Conscious and Subconscious जागृत अगर जागरितांतरित अगर स्वप्नस्थ अशी मनाची प्रक्रिया वर्णिली आहे. एक जागृत-स्थितींत प्रत्ययास येतें व दुसरें स्वप्नस्थितींत प्रत्ययास येतें. उपनिषदांत यालाच बहिष्प्रज्ञ मन व अंतःप्रज्ञ मन असें म्हटलें आहे. पहिले स्थूल-भुक् आहे व दुसरें तैजस आहे. कोठे कोठें त्यालाच अशुद्ध मन व शुद्ध मन किंवा स्थूल मन व सूक्ष्म मन असें म्हटलें आहे. अंतःप्रज्ञ किंवा चित्रगुप्ती मन असें आहे कीं, त्यावर कोणत्याही गोष्टीची एकदा नोंद झाली कीं ती वज्रलेप झाली. लोकभाषेंत ह्या दोन मनांलाच Subjective mind and Objective mind असें म्हणतात. मनाच्या श्लोकांत अंतःप्रज्ञ मनालाच उपदेश केला आहे. तथापि दोनही प्रकारचीं मने समर्थांना अभिप्रेत होतीं असें तळवलकरांचे म्हणणे आहे. ह्या सर्व प्रतिपादनांतील दोन वाक्यें मला मौजेचीं वाटलीं तेवढींच येथें देतों. ते म्हणतात: “आत्मा आणि शरीर यांचें ऐक्य किंवा तादात्म्य मानणें हें बंधन व तें मानण्याचे सोडून देणें आणि देहबंधनांतून आत्म्याला सोडविणें अगर स्वतंत्र मानणे हाच मोक्ष. या बंधमोक्षाची किल्ली मनाजवळ आहे, जणूं काय आत्म्याला या देहरूपी तुरुंगांत अडकविलें असून त्या तुरुंगावरचा अधिकारी मन आहे, तेव्हां आत्म्याची तुरुंगांतून सुटका करून घ्यावयाची असेल तर या अधिकाऱ्याची विनवणी केली पाहिजे किंवा या अधिकाऱ्याजवळ सुटकेचा वारंटहुकूम आणून दिला पाहिजे!” मनाच्या श्लोकांची प्रवृत्ति होण्याचें हें कारण आहे.

# ४ मनोबोधांतील विषयव्यवस्था

### ५ सगुणनिर्गुणातीत शुद्धस्वरूप



### ६ उपसंहार



## ५ श्लोकांची मीमांसा

(१) मनाचे श्लोक एकंदर २०५ आहेत. त्यांत पहिला श्लोक मंगलाचरणरूप असून शेवटचा श्लोक उपसंहाराचा आहे. गणेशशारदांना वंदन करून राघवाचा म्ह० अनंताचा पंथ शोधण्याचा हेतु उपक्रमांत दर्शवून सर्व ग्रंथभर राघवाचा पंथ दाखविला आहे व उपसंहारांत ह्या ग्रंथाच्या श्रवणमननानें मंदाधिकारीही साधनायोग्य होऊन ज्ञानवैराग्यसाधन-संपन्न होतील व विश्वासतां मुक्तिपदही पावतील अशी फलश्रुति सांगितली आहे. मधल्या २०३ श्लोकांत अनंत व त्याचा पंथ म्हणजे साध्य व साधन यांचा विचार सांगितला आहे. श्लोक २ ते २७ भूमिका तयार करण्यासाठीं विवेकवैराग्याचे उद्बोधन करण्यांत खर्च झाले आहेत; पुढें राघवाचा पंथ सगुणोपासनेच्या द्वारें कसा आक्रमावा हें श्लोक २८ ते १३५ पर्यंत सांगितले आहे; त्यापुढें निर्गुणबोधाचें दिग्दर्शन श्लोक १३६ ते १७४ पर्यंत केलें आहे; व शेवटीं सगुणनिर्गुणातीत अशा शुद्धस्वरूपाचे वर्णन १७५ ते २०२ पर्यंत केले असून त्यापुढील दोन श्लोकांत आत्म-सिद्धीनंतरही साधन केलें पाहिजे असें म्हटलें आहे. दाशरथि राम हें राघवाचें सगुण रूप, निर्गुण ब्रह्म हें त्याचें निर्गुणरूप, व शुद्ध केवलब्रह्म हेंही त्याचेंच स्वरूप म्हणून सर्व ग्रंथभर राघवाच्या स्वरूपाचे व त्याला पावावयाच्या पंथाचे दिग्दर्शन केलें आहे. पंथ म्हटले कीं वाटेंत कांहीं

खांचखळगे असायचेच, त्यांच्या निवारणार्थ जागोजाग साधकांना इषारे दिले आहेत. उत्तम वैद्य नुसतें औषध देत नाहीं, औषधाबरोबर पथ्यही सांगतो. त्याप्रमाणें श्रीसमर्थांसारख्या भववैद्यानें ह्या ग्रंथांत औषध देऊन पथ्यही सांगितलें आहे.

( २ ) श्लोकांचें आणखी थोडेंसें स्पष्टीकरण करितों. "मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें" असा प्रथमच बोध केला आहे. निंद्य काय वंद्य काय याचा संतांनीं निर्णय केलेला आहे, तो ध्यानीं धरावा व सदाचारानें चालावें. दुष्ट वासना, पापबुद्धि, अनीति, विषयसंगति, कामक्रोधादि विकार हें 'निंद्य' म्हणून सोडावें व श्रेष्ठ धारिष्ट, नम्र व मधुर वाणी, धर्माचरण, चंदनासारखा देह परकार्यार्थ झिजविण्याची बुद्धि, निःस्वार्थबुद्धि व मुख्यतः रामभक्ति हें 'वंद्य' म्हणून स्वीकारावें, याप्रमाणें सदाचार व हरिभक्ति यांचा प्रास्ताविक उपदेश केला आहे (२–१०). पुढील १७ श्लोकांत विवेकवैराग्याची महती वानिली आहे. प्रत्येकाला निरंतर सुख पाहिजे असतें, पण जगांत सर्वसुखी असा कोणी नाहीं; पूर्वसंचितानुसार सर्वांस आपापल्या वांट्याचें सुखदुःख भोगावें लागतें, देहबुद्धीच्या पोटांत सुखदुःखशोकचिंता यांविषयींच्या कल्पना उद्भवतात म्हणून विवेकानें देहाचें ममत्व सोडावें व विदेहीपणाने मुक्तिसुख भोगावें; मृत्युलोकची राहटी ध्यानांत आणून वैराग्याची जोड विवेकाला द्यावी; जन्ममृत्यु सर्वांच्याचमागे लागले आहेत, म्हणून कोणाबद्दल शोक करूं नये, कसलीही चिंता करूं नये, जेव्हां जें प्राप्त होईल तें समाधानानें भोगून सारावें व जन्ममरणाच्या यातनांतून सुटण्यासाठीं रामाला भजावें व निर्भय व्हावें हा ह्या १७ श्लोकांचा ( ११-२८ ) तात्पर्यार्थ आहे.

( ३ ) येथून पुढें सगुणभक्तीनें रामाला कसें भजावें हें सांगतात. रामाचें पद निर्भय आहे, तूं रामाला शरण जा, तो परमसमर्थ आहे, कोदंडपाणी रामाला काळही भितो, भक्तरक्षणाचें रामाचें ब्रीद असून काळसत्तेला न

जुमानतां त्यानें सारी अयोध्या वैकुंठास नेली, त्या समर्थाच्या सेवकाकडे वक्रदृष्टीने पाहणारा विश्वांत कोणी नाहीं, रावणाच्या बंदींतून त्याने देवांना सोडविलें, अहल्याशिळा उद्धरिली, बिभीषणहनुमंतांला चिरंजीवपद दिले, भक्तांचा योगक्षेम वाहण्याची त्याची प्रतिज्ञा आहे, भावासरसा तो भक्तांना संकटीं तारतो, तात्पर्य 'नुपेक्षी कदा राम दासाभिमानी,' म्हणून तूं परमसमर्थ व भक्तवत्सल रामाला शरण जा ( २९-३७ ). मना! रामाचे एकेक चरित्र पहा कीं थक्क होऊन जाशील. वेदशास्त्रपुराणें ज्याला वानतात त्याला आपलें चांचल्य देऊन त्याच्या पदीं निश्चळ हो, सर्व-सुखागर अशा त्या दीननाथाच्या स्वरूपीं रमून रहा, रामावांचून गोष्टी बोलूं नकोस, ऐकूं नकोस, राम नाहीं तेथें जाऊं नकोस, एक क्षण रामावांचून व्यर्थ दवडूं नकोस ( ३८–४६ ). रामाला भजतात ते त्या सर्वोत्तमाचे दास त्रैलोक्यांत धन्य होतात. त्यांची राहणी किती सोज्वळ, त्यांची सुखावस्था किती रमणीय, त्यांची निर्भयता केवढी! रामभक्त मनीं व लोचनीं (आंतबाहेर) रामालाच पाहतात, त्यांचें ज्ञान अगाध व भक्ति सोज्वळ असते, ते सगुणाचा प्रेमतंतु तोडीत नाहींत, साधनमार्ग सोडीत नाहींत, देवकार्यात कायावाचामनाने झिजतात, अखंड रामनामघोष करितात, स्वधर्माने चालतात, बोलण्यासारखें वागतात, त्यांचें ज्ञान स्वच्छ असून ते सगुणाला भजतात, निःसंशय व निर्विकार असतात, मदमत्सर स्वार्थादिकांचा विटाळ त्यांच्या मनाला होत नाहीं, प्राणिमात्राशीं मधुर वाणीने बोलतात, एकांतांत आत्मचिंतन करितात व लोकांतांत उगमाच्या गोष्टी सांगून लोकांना रामाचें वेड लावतात, नानामतांच्या व कल्पनांच्या जाळ्यांत न सांपडतां ते आपली निष्ठा स्थिर ठेवतात, रामभक्तिसुखाशिवाय त्यांना कसलीच इच्छा नसते, ते दयाशीळ व शांत असतात—हे सर्वोत्तमाच्या दासांचे गुण आपल्या अंगीं असावेत असें तुला वाटतें ना? मग त्यांना हे गुण रामाच्या उपासनेनें मिळालेले असतात, म्हणून मना! तूं रामाला

भज ( ४७-५६ ). रामनामानें धन्य होऊन जा. उदासीनता ( निःसंगता ) हें सर्वांचें सार आहे, म्हणून अंतरीं मोकळा होऊन कर्मज्ञानउपासना-मार्गानें जा व विषयनिवृत्त होऊन निष्कामबुद्धीनें रामभजन कर. रामासाठींच रामाला भज. अनेक कल्पना व तर्क यांच्या नादीं लागलास तर कल्पकोटी वर्षांत तुला राम भेटणार नाहीं. रामापाशीं सर्व कांहीं आहे. रामाला कल्पतरु म्हणूं का कामधेनु म्हणूं का चिंतामणि म्हणूं, म्हणूं तरी काय? त्याच्या सेवेनें सर्वसत्ता हातीं येते. तर्क आणि वादविवाद यांच्या दंभांत सांपडूं नकोस. अनेक पंडित त्यामुळें बुडाले आहेत. निजध्यासाचा खंड पडतो, शोकसंतापानें शांति मोडते, स्वानंदाची बैठक ढळते, चित्त चंचल होऊन निश्चय डळमळूं लागतो. असे हे वादाचे तोटे ध्यानांत धरून तूं त्या मार्गाकडे ढुंकूनसुद्धां पाहूं नकोस. घरची कामधेनु टाकून दुसऱ्याच्या घरीं ताक मागायला जावेंच कां ? पढतमूर्खांना राम सोडून वाद हवा असतो ! चित्तक्षोभ घेऊन बिचारे शेवटीं दीनवाणे होतात. मना ! भक्तीवांचून जिणे व्यर्थ आहे. आदरानें रामप्रीति धर व घोर संसारांतून मोकळा हो ( ५७–६६ ). रामभक्तीचा पहिला पाढा सांगतों. 'प्रभाते मनीं राम चिंतीत जावा !' घनश्याम, लावण्यरूप, धीरगंभीर, पूर्णप्रतापी, अशा रामाचें ध्यान कर. कोदंडधारी व सुखानंदकारी रामाचें चरित्र चित्त शुद्ध करून मनांत आण. मद व आळस सोडून रामाचें नित्यनेमाने प्रभातीं चिंतन करीत जा. रामनामाचा छंद लागला कीं आपदांची बाधा होत नाहीं, महादोष जाऊन सद्गति मिळते, पुण्यसंस्कार वाढतात, मुखानें नामोच्चार करावयाला कष्ट पडत नाहींत, गांठीचा पैसा खर्चत नाहीं, व्रतदानउद्यापनाला द्रव्य व शरीरकष्ट व पैका लागतो तसें नामस्मरणाचें नाहीं, कर्मधर्मयोगयाग कांहींच हातून घडत नाहीं मग फुकाचें नाम घ्यायला काय जातें ? सांगायचें इतकेंच कीं, सर्वसाधनांचें सार असें हें रामनाम आहे तें घ्यायला तर लाग ( ६७–७७ ). रामाची आवड

उत्पन्न झाली कीं इतर क्षुद्र काम अपाप झडतात, सर्वांभूतीं रामच दिसूं लागतो, द्वैत मावळतें. ज्याला रामविश्वास नाहीं त्याला संसारबाधा सोसावी लागते. कैवल्यदाता दयाघन राम. त्याला प्रेमानें भजून देहसंसारचिंता सोड. महातापसी व योगी शंकर ज्याला अंतरीं जपतात त्या दुस्तरभवाब्धिपारद अशा रामालाभजून पोटापाण्याची चिंता सोडून दे (७८-८०). रामभजनाचा सर्वोत्कृष्ट उपाय म्हणजे अखंड नामस्मरण. नामाची साम्यता कोणालाही येणार नाहीं. शंकरांनीं हालाहल विषावर उतारा म्हणून रामनाम घेतलें. ज्ञानवैराग्यसामर्थ्यवंत असे शंकरही उमेसह रामनाम परमप्रीतीनें जपत आहेत, मग सामान्यांनीं नामामृत पिण्यास कांकूं कां करावें ? मुखांत राम तरच चित्तांत विश्राम आहे. अंतकाळीं रामावांचून सोडविणारा कोण आहे बरें ? रामनामाचा सदानंद सेवून रहा, मुखीं राम त्याला कामाची पीडा होत नाहीं, याला उदाहरण मारुतीचें. रामाचें नाम फार चांगलें व 'अती साजिरें स्वल्प सोपें फुकाचें' आहे. तें सर्वकाळ घ्यावें. 'हरीचिंतनें अन्न जेवीत जावें,' अन्न ब्रह्मरूप होईल. वेदशास्त्रपुराणांनीं हरिनामाची योग्यता व माधुरी वर्णिली आहे. नामघोष होतो तेथून सर्व दोष दूर जातात व तेथें साक्षात् हरि उभा असतो. अन्नदाता व सर्व संभाळणारा देव आहे, त्याचें नाम कां बरे घेऊं नये ? अजामीळ, कुंटिणी, प्रल्हाद इ० अनेक भक्त नामसंकीर्तनाने तरले आहेत. नामानें जडशिळा तरल्या मग काय सचेतन मानव तरणार नाहींत ? असंख्य मानव नामानेंच तरले आहेत. काशींत मरण आलें म्हणजे प्राण्याच्या अंतकालीं शंकर स्वतः रामनाममंत्र कानांत सांगून त्यांना उद्धरतात. तात्पर्य 'सगूणीं अती आदरेंसी भजावें' व भजनाचें उत्कृष्ट साधन म्हणजे नामस्मरणच होय (८१-१०२). नामामृत घ्यायला सांगितलें पण थोडें पथ्य हें सांभाळलेंच पाहिजे. परद्रव्य व परस्त्री यांचा विटाळ मानावा, व अहंकाराला तोंड वर करायला जागा राहूं नये

म्हणून क्रियेवीण वाचाळता करूं नये, व वादविवादाच्या डंभांत पडूं नये, व वाद तुटण्यासारखा असेल तेथेंच संवाद करावा. स्नानसंध्यादि नित्यकर्म निष्ठापूर्वक करून मनाला आवरावें. कामक्रोधादि चांडाळांचा संग करूं नये. सत्संगतीनें भक्तिभावार्थ लागतो व क्रिया पालटते, म्हणून सत्संगतींत संवादसुखाची देवघेव करावी. वादानें अहंकाराचा उठाव होऊन नाना विकारांचें काहूर उठतें, वाद करितां करितां जन्म गेला तरी वाद संपत नाहीं, वादाहंकारानें मोठमोठे पंडित ब्रह्मराक्षसाच्या योनीला गेल्याच्या कथा आपण ऐकतों, म्हणून मना ! तूं क्रिया कर, वाचाळता सोडून दे, बोलण्यासारखें चाल व क्रियापालटे भक्तिपंथाने जा ( १०३–११५ ). राम भक्तांची उपेक्षा करीत नाहीं. अंबरीष, उपमन्यु, ध्रुव, गजेंद्र, अजामीळ यांच्या उदाहरणांवरून देव हांकेसरसी उडी घालून भक्ताला संकटांतून तारतो असें स्पष्ट होतें. देवानें दशावतारही भक्तांसाठीं घेतले हें सर्व नीट ध्यानांत ठेवून, बा ! मना, परमप्रतापी, भक्तवत्सल, दासाभिमानी रामाला भज; यांतच तुझें परमकल्याण आहे. रामभक्ति सत्संगतींत वाढीस लागते म्हणून सत्संग कर. माझ्या एकवचनी, एकबाणी, एकपत्नी रामासारखा सेवेयोग्य असा दुसरा कोण आहे ? रामभक्तही तसेच पुण्यदर्शन आहेत, नष्ट संदेह मोडून त्यांचे संगतींत निःसंदेहता येते म्हणून सत्संगीं रामाला भज ( ११६–१३५ ).

( ४ ) येथवर सगुणोपासनेचा मार्ग सांगितला, आतां निर्गुणाची ओळख करून देतात. सगुण तेंच निर्गुण, राम तोच ब्रह्म. भवभयांतून सुटावें यासाठींच सगुणाला भजायला सांगितलें व निर्गुणाच्या बोधानेंही तसेंच निर्भयत्व प्राप्त होतें. निर्गुण ब्रह्म संत ( शाश्वत ), अनंत ( अपार ) व भयातीत आहे. तेथें द्वैत नाहीं व म्हणून भयही नाहीं. तें सर्वांचें जुने ठेवणें आहे पण अहंकार ( मीपणा ) आड येतो म्हणून जीव अज्ञानानें भितात. मीपण सोडलें कीं निर्गुणपद

सहजसिद्ध आहे. तें निजधन, स्वस्वरूप, स्वयमेव असून जीवाला 'गुप्त वित्त' मोठें गूढ वाटतें व विनाकारण तो स्वतःला जन्मदरिद्री समजतो! देहच मी असें मानतों तोंवरच हें बंधन राहतें, पण मी देह नसून देहातीत आत्माराम आहें असें ओळखलें कीं हा मुक्तच आहे! हा स्वस्वरूप ओळखीत नाहीं म्हणून 'गुप्त धन'—नाहींतर हें स्वस्वरूप 'पुढें पाहतां सर्वेही कोंदलेंसे,' पण याची यावर श्रद्धा (भाव) बसत नाहीं त्याला काय करावें? देह त्रिगुणाचा गुंताडा आहे त्यांत हा गुंतून पडतो म्हणून 'जयाचें तया चूकलें, प्राप्त नाहीं.' देहातीत व गुणातीत मी आत्मा आहें हें ओळख. ही ओळख पटवायलाच गुरु लागतात. 'गुरू-अंजनेवीण तें आकळेना.' जगीं सत्य काय आहे, संत अनंत व निर्गुण निजरूप कसें आहे, तें शोधून पहा. देह व विषय यांवरची बुद्धि उडवून विवेकानें स्वस्वरूपीं लाव. उगमापर्यंत अंतर्मुखतेने शोध करीत जा, नाशवंत दृश्याहून—नामरूपाहून तें वेगळें आहे, तें पहा, तें एकजिनसी ब्रह्म आहे याचा विचार कर. ब्रह्मादिदेव मागाहून झाले त्यांच्या-पूर्वीचें अतिजुनाट ब्रह्म—तदाकार होऊन पहा. तें ज्ञानचक्षूला दिसतें, चर्मचक्षूला दिसत नाहीं. त्याला पहायला गेलें असतां पाहतेपण हरपून जातें. तें निर्गुण अनंतरूप शोधून पहा. तूं आपली विवेकशक्ति खर्च कर, पण तुला वर्म सांगतों. संतसद्गुरुसमागमावांचून तें यथार्थ आकळायचें नाहीं, म्हणून त्यांचा कृपाप्रसाद जोड. अनंत शास्त्रें पाहिलींस तरी 'समाधान तें सज्जनाचेनि योगें' हें विसरूं नकोस. संतसंगतींत पंची-करण, तत्त्वविचार, महावाक्यबोध हें सर्व पाहून खुणेला पाव. तुझें तुझ्यापाशींच आहे पण सत्संगाशिवाय त्याच्या प्राप्तीचा आनंद मिळत नाहीं. मीपण आहे तोंवर तें दिसत नाहीं व त्याच्याशीं समरसता झाल्यावर वेगळें राहतां येत नाहीं! ब्रह्मज्ञानाला मीपण हाच महान् प्रत्यवाय आहे. वेदशास्त्रांनाही त्याचा यथार्थ स्वरूपबोध होणें दुर्घट, मग जाणीवेला—

अहंतेला जागाच कोठे आहे ? ‘ मीं तें जाणलें ’ असें हा म्हणत आहे तोंवर यानें तें जाणलेंच नाहीं. जाणतेपणाचा अभिमान हीच तर ज्ञानान्नभोजनांतली माशी आहे, ही कांहींएक पचूं देत नाहीं. अहंकार निःशेष झडेल तरच निर्गुणपदप्राप्ति ! देहबुद्धि सोडून आत्मबुद्धि कर. हरिचिंतनानें मुक्त होशील. ‘ सदा संगती सज्जनाची धरावी ’ म्हणजे अहंकार मावळून निजपद सांपडतें. हा निर्गुण ब्रह्माचा विचार झाला. हेंच निर्गुण ब्रह्म भक्तकार्यार्थ सगुण होऊन अवतरतें हें मात्र विसरूं नकोस हो ( १३६–१७४ ).

( ५ ) आतां सगुण व निर्गुण ही भाषाही जेथें खुंटते त्या विमलब्रह्माची ( शुद्धस्वरूपाची ) ओळख ! तो मुख्य देव, तो थोरला देव, हरिहरब्रह्मादिकांचा जनक, मूळमायेच्यापलीकडचें गुलदस्तांतलें ब्रह्म ( त्याला काय नांव द्यावें ? त्याचें स्वरूप कोणी काय कसें वर्णावें ? ) फुटेना, तुटेना, चळेना ढळेना—‘ मीपणासी कळेना ! ’ गुरूवीण तें आकळत नाहीं, पण जगांत भोंदूपणाच फार ! सर्वगुणसंपन्न म्हणजे गुणातीत झालेला व ‘ मुखें बोलिल्यासारिखें चालताहे ’ असा भक्त, ज्ञानी, विवेकी, विरागी सद्गुरु भेटल्याने ह्या शुद्धस्वरूपाची ओळख—नव्हे प्राप्ति होते. असो. ‘ लपावें अती आदरें रामरूपीं, ’ कां कीं ते गुप्त आहे. तेथवर कालाचा हात पोंचत नाहीं, अर्थात् तेथें जन्ममरणाचें भय नाहीं. तें स्थान निर्भय आहे. असा हा ‘ सदा सर्वदा राम सन्निध आहे. ’ त्याची अखंड भेट आहेच. सर्वसंग सोडून निःसंगपणें तन्मय व्हावें. त्याचें ‘ दुजेवीण ध्यान ’ करावें. त्या निर्विकल्पाला कल्पावें. हा देवराणा तुर्येच्याहीपलीकडे आहे. आकाशाही त्याच्या मानानें स्थूळ—इतका तो सूक्ष्म आहे. आकाशाचा दृष्टांतही अपुरा आहे. तेथें व्याप्यव्यापक हा—कसलाच भेद नाहीं. त्याला व्यापकही म्हणतां येत नाहीं. हेंही बोलणें तेथें खुपतें—असे तें रामस्वरूप ! त्याच्या भेटींत द्वैत उरत नाहीं. झाली, रामाची भेट झाली. आतां आनंदीआनंद ! ( १७५–२०१ )

हें रामरहस्य प्राप्त झालें तरी निश्चय ठाम होण्याला सत्संगांत श्रवण केलें पाहिजे. सत्संगांत राम अनायासें जोडतो व द्वैत जाऊन मोक्षलाभ होतो ( २०२–२०४ ).

## ६ मनोबोधांतील सुभाषितें

मनोबोधांतील कित्येक श्लोक, श्लोकार्ध किंवा श्लोकपाद सुभाषितरूप झाले असून त्यांपैकीं कांहीं तर आबालवृद्धांच्या तोंडीं आहेत. काव्य-प्रकाशांतील दोषदर्शनाच्या दृष्टीनें ऱ्हस्वदीर्घ, कानामात्रा यांचे कांहीं बारीकसारीक दोष त्यांत सांपडतील, पण श्लोकांची ओजस्विता व सत्यार्थदर्शन इतकें ठसठशीत आहे कीं दोषांची आठवणही होत नाहीं. समर्थांच्या वाणीचा अस्खलित प्रवाहच वाचकांचीं मनें आपल्याबरोबर खेंचून घेतो. थोडीं साधीं उदाहरणें पहावींत.

**( १ ) मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें ।**

**( २ ) घडीनें घडी सार्थकाची करावी ।**
**सदा संगती सज्जनाची धरावी ॥**

**( ३ ) समर्थाचिया सेवका वक्र पाहे ।**
**असा सर्व भूमंडळीं कोण आहे ?॥**

**( ४ ) देहे त्यागितां कीर्ति मागें उरावी ।**

**( ५ ) देहेदुःख तें सूख मानीत जावें ।**

**( ६ ) जनीं सर्वसूखी असा कोण आहे ?।**

**( ७ ) महाथोर ते मृत्युपंथेंचि गेले ।**
**कितीयेक ते जन्मले आणि मेले ॥**

**( ८ ) मरे येक त्याचा दुजा शोक वाहे ।**
**अकस्मात तोही पुढें जात आहे ॥**

**( ९ ) अकस्मात होणार होवोनि जातें ।**

**( १० ) नुपेक्षी कदा देव भक्ताभिमानी ।**

**( ११ ) घरीं कामधेनू पुढें ताके माग ।**

( १२ ) प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ।
( १३ ) विठोनें शिरीं वाहिला देवराणा ।
( १४ ) मुखीं राम त्या काम बाधूं शकेना ।
( १५ ) यथासांग रे कर्म तेंही घडेना ।
घडे कर्म तें पुण्य गांठी पडेना ॥
( १६ ) क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे ।
( १७ ) तुटे वाद संवाद तो हीतकारी ।
( १८ ) जनीं सांगतां ऐकतां जन्म गेला ।
परी वादवेवाद तैसाचि ठेला ! ॥
( १९ ) फुकाचें मुखीं बोलतां काय वेंचे ? ।
दिसेंदीस अभ्यंतरीं गर्व सांचे ॥
( २० ) जिवा श्रेष्ठ ते स्पष्ट सांगोनि गेले ।
परी जीव अज्ञान तैसेचि ठेले ! ॥
( २१ ) जिवा ऊगमीं जन्म नाहीं स्वभावें ।
( २२ ) समाधान तें सज्जनाचेनि योगें ।
( २३ ) अती वीषयी सर्वदा दैन्यवाणा ।
( २४ ) देहेबुद्धि ते आत्मबुद्धी करावी ।
सदा संगती सज्जनाची धरावी ॥

## ७ कांहीं निवडक श्लोक

मनोबोधांत सगुणरामाचे व त्याच्या कथांचे जे उल्लेख आले आहेत त्यांचा पूर्वी उपासनाप्रसंगानें विचार केला आहे ( पृ० १७०–१७२ ). येथें मनोबोधांतील, त्याशिवाय बाकीच्या श्लोकांतून कांहीं निवडक श्लोक पुढें देत आहों :—

गणाधीश जो ईश सर्वां गुणांचा ।
मुळारंभ आरंभ तो निर्गुणाचा ।
नमूं शारदा मूळ चत्वार वाचा ।
गमूं पंथ आनंत या राघवाचा ॥ १ ॥

मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें ।
तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावें ।
जनीं निंद्य तें सर्व सोडूनि द्यावें ।
जनीं वंद्य तें सर्व भावें करावें ॥ २ ॥

प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ।
पुढें वैखरी राम आधीं वदावा ।
सदाचार हा थोर सोडूं नये तो ।
जनीं तोचि तो मानवीं धन्य होतो ॥ ३ ॥

मना वासना दुष्ट कामा नये रे ।
मना सर्वथा पापबुद्धी नको रे ।
मना सर्वथा नीति सोडूं नको हो ।
मना अंतरीं सारवीचार राहो ॥ ४ ॥

नको रे मना क्रोध हा खेदकारी ।
नको रे मना काम नानाविकारी ।
नको रे मना सर्वथा अंगिकारूं ।
नको रे मना मत्सरू दंभभारू ॥ ६ ॥

मना श्रेष्ठ धारिष्ट जीवीं धरावें ।
मना बोलणें नीच सोशीत जावें ।
स्वयें सर्वदा नम्र वाचे वदावें ।
मना सर्व लोकांसि रे नीववावें ॥ ७ ॥

जनीं सर्वसूखी असा कोण आहे ।
विचारें मना तूंचि शोधूनि पाहें ।
मना त्वांचि रे पूर्वसंचीत केलें ।
तयासारिखें भोगणें प्राप्त जालें ॥ ११ ॥

सदासर्वदा देव सन्नीध आहे ।
कृपाळूपणें अल्प धारिष्ट पाहे ।
सुखानंदआनंदकैवल्यदानी ।
नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥ २६ ॥

सदा देवकार्जीं झिजे देह ज्याचा ।
सदा रामनामें वदे नित्य वाचा ।
स्वधर्मेंचि चाले सदा उत्तमाचा ।
जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ ४८ ॥

क्रमी वेळ जो तत्त्वचिंतानुवादें ।
न लिंपे कदा दंभवादें विवादें ।
करी सूखसंवाद जो ऊगमाचा ।
जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ ५२ ॥

अती मूढ त्या दृढ बुद्धी असेना ।
अती काम त्या राम चित्तीं वसेना ।
अती लोभ त्या क्षोभ होईल जाणा ।
अती वीषईं सर्वदा दैन्यवाणा ॥ ६४ ॥

हरीकीर्तनें प्रीति रामीं धरावी ।
देहेबुद्धि नीरूपणीं वीसरावी ।
परद्रव्य आणीक कांता परावी ।
यदर्थीं मना सांडि जीवीं करावी ॥ १०३ ॥

विवेकें क्रिया आपुली पालटावी ।
अती आदरें शुद्ध क्रीया धरावी ।
जनीं बोलण्यासारिखें चाल बापा ।
मना कल्पना सोडिं संसारतापा ॥ १०५ ॥

फुकाचें मुखीं बोलतां काय वेंचे ।
दिसेंदिस अभ्यंतरीं गर्व सांचे ।
क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे ।
विचारें तुझा तूंचि शोधून पाहें ॥ ११४ ॥

नसे गर्व आंगीं सदा वीतरागी ।
क्षमाशांति भोगी दयादक्ष योगी ।
नसे लोभ ना क्षोभ ना दैन्यवाणा ।
इहीं लक्षणीं जाणिजे योगिराणा ॥ १३४ ॥

जिवा श्रेष्ठ ते स्पष्ट सांगोनि गेले ।
परी जीव अज्ञान तैसेचि ठेले ।
देहेबुद्धिचें कर्म खोटें टळेना ।
जुनें ठेवणें मीपणें आकळेना ॥ १३७ ॥

म्हणे दास सायास त्याचे करावे ।
जनीं जाणता पाय त्याचे धरावे ।
गुरूअंजनेवीण तें आकळेना ।
जुनें ठेवणें मीपणें तें कळेना ॥ १४१ ॥

निराकार आधार ब्रह्मादिकांचा ।
जया सांगतां सीणली वेदवाचा ।
विवेकें तदाकार होऊनि राहें ।
मना संत आनंत शोधूनि पाहें ॥ १४८ ॥

मनें कल्पिला वीषयो सोडवावा ।
मनें देव निर्गूण तो वोळखावा ।
मनें कल्पितां कल्पना ते सरावी ।
सदा संगती सज्जनाची धरावी ॥ १६४ ॥

नसे अंत आनंत संतां पुसावा ।
अहंकारविस्तार हा नीरसावा ।
गुणेंवीण निर्गूण तो आठवावा ।
देहेबुद्धिचा आठवो नाठवावा ॥ १६९ ॥

तिन्ही लोक जेथूनि निर्माण जाले ।
तया देवरायासि कोणी न बोले ।
जगीं थोरला देव तो चोरलासे ।
गुरूवीण तो सर्वथाही न दीसे ॥ १७९ ॥

लपावें अतीआदरें रामरूपीं ।
भयातीत निश्चिंत ये स्वस्वरूपीं ।
कदा तो जनीं पाहतांही दिसेना ।
सदा ऐक्य तो भिन्नभावें वसेना ॥ १८५ ॥

वसे हृदयीं देव तो जाण ऐसा।
नभाचेपरी व्यापकू जाण तैसा।
सदा संचला येत ना जात कांहीं।
तयावीण कोठें रिता ठाव नाहीं ॥ १९५ ॥



# १० रामदासी पंचायतन

**जैसीं जवळिकेचीं सरोवरें । उचंबळलियां कालवती परस्परें ।**
**मग तरंगांसी धवळारें । तरंगचि होती ॥ १२० ॥**
**तैसी येरयेरांचिये मिळणीं । पडत आनंदकल्लोळांची वेणी ।**
**तेथ बोध बोधाचीं लेणीं । बोधेंचि मिरवी ॥** ( ज्ञाने०, अ० १० )
**मिळतां प्रचीतीचे संत । एकांतापरिस एकांत ॥** ( रामदास )

१ पंचायतनाची कल्पना. २ पंचायतनकल्पनेचा विस्तार. ३ महाराष्ट्रीय संतांचीं पंचायतनें. ४ रामदासपंचायतन. ५ रामदासपंचायतनाचें वैशिष्टय. ६ सत्पुरुषांच्या भेटी. ७ संतांचा परस्पर प्रेमभाव. ८ **जयरामस्वामी.** ९ अपरोक्षानुभव. १० ज्ञानी–भक्त–संवाद. ११ **रंगनाथस्वामी.** १२ एक मोठी गुरुपरंपरा. १३ रंगनाथांची पितृपरंपरा. १४ रंगनाथ स्वामींचीं पदें, पंचकें, अष्टकें, वगैरे १५ रंगनाथ स्वामींची स्फुट कविता. १६ **केशवस्वामी.** १७ केशवस्वामींचीं पदें. १८ कृतकृत्यता. १९ गुरुभक्ति. २० एक सुंदर रूपक. २१ अनासक्तता. २२ लोकस्थिति. २३ लोकोद्धाराचें स्वरूप. २४ देव, भक्त व नाम. २५ दागिन्यांचीं नांवें वगैरे. २६ **आनंदमूर्ति व त्यांची असीम गुरुभक्ति.**

## १ पंचायतनाची कल्पना

आद्य श्रीशंकराचार्यांनीं धर्मसंस्थापनेचें जें प्रचंड कार्य केलें त्यांत त्यांनीं दोन मुख्य गोष्टी केल्या. एक तर त्यांनीं वेदविरोधी मतांचा गलबला मोडून काढला व दुसरी महत्त्वाची गोष्ट केली ती ही कीं, वैदिक उपासना-पंथांचें ऐक्य केलें व ते पंथ एकमुखी करून वैदिकधर्माचें सामर्थ्य वाढविलें. शत्रूंचा पाडाव करणें व मित्रांना एकमुखी करणें हें कोणतीही चळवळ यशस्वी करणाऱ्या कार्यकर्त्याला करावें लागतें. मोडणें आणि घडणें याचें नांव घडामोड; शत्रु मोडायचे आणि मित्र जोडायचे हीं दोन्ही कार्यें जो उत्तम रीतीनें करितो तोच खरा कार्यकर्ता होय. बुद्धिबळाच्या जोडीला संघटनाचातुर्य लागतें, म्हणजे लोकांचीं मनें हातीं घेण्याची युक्ति लागते.

आचार्यांच्या अंगीं हे गुण होते. त्यांनीं बौद्धजैनादि अवैदिक मतांचें खंडण केलें. बुद्धीला व्यर्थ शीण देणाऱ्या शून्यवादी बौद्धांचा व 'स्यात् वा न वा' अशा संशयवादी जैनांचा पाडाव केला व चतुःसूत्रीच्या मजबूत पायावर अद्वैतज्ञानाचा व आत्मसमाधानाचा सनातन मार्ग जगास दाखवून दिला. ज्ञानमार्गाची सिद्धि करितांना देहाला क्लेश देणाऱ्या मीमांसकांचाही त्यांना समाचार घ्यावा लागला. उपनिषदांनीं विशद केलेली ब्रह्मविद्या हें वैदिकधर्माचें मुख्य बल व सौंदर्य आहे, पण ब्रह्मविद्येचा अधिकार सर्वांस सारखा नसतो; त्यांना व्यक्ताचीच उपासना पाहिजे असते; म्हणून ब्रह्मविद्येशीं मिळवून घेऊन गीता-भागवतांनीं सगुणभक्तीचा पुरस्कार केला. निर्गुणाचा पूर्ण बोध व सगुणाची भक्ति यांचें ऐक्य करून दाखविल्यापासून ज्ञान व भक्ति यांच्यांत विरोध राहिला नाहीं व हा सर्वसामान्य जीवांचा धर्म झाला. हाच धर्म हिंदुस्थानांतील सर्व साधुसंतांनीं स्वतः अनुभवून जनतेस शिकविला. पण वेदकालीन देवता व नंतरच्या देवता या इतक्या पुष्कळ झाल्या कीं, त्यांच्या उपासकांत नेणतेपणानें विरोध माजले व बजबजपुरी माजली. हें जाणून आचार्यांनीं पांच मुख्य देवतांचें पंचायतन कायम केलें. त्यांनीं पाहिले कीं, गणेश, सूर्य, शिव, विष्णु व देवी या देवतांचे उपासक आपल्या वैदिक धर्मांत पुष्कळच आहेत व ह्या पांचही देवता वैदिक आहेत; म्हणून त्यांनीं भजकांतील भेदभाव नष्ट व्हावा व प्रत्येकाला आपल्या उपास्याची पूजाअर्चा मनोभावें करितां यावी म्हणून पंचायतनपूजा प्रत्येक घरीं असावी असा दंडक घातला. वैष्णवांच्या घरीं विष्णुपंचायतन असतें व शैवांच्या घरीं शिवपंचायतन असतें. आपल्या उपास्याला मध्यभागीं ठेवून बाकीचीं चारही प्रतीकें चार बाजूला ठेवायचीं व सर्वांचीच पूजा करायची असा तेव्हांपासून प्रघात पडला, व देवताभजकांत वितुष्ट पडण्याचें कारण उरलें नाहीं. एकान्तिक भक्त आपल्या एका उपास्यावांचून चित्त दुसऱ्या कोठें ठेवीत नाहींत ही गोष्ट खरी व

योग्यही आहे. कर्नाटकांत शैववैष्णवांचे तीव्र मतभेद होते व अजूनही आहेत; पण हा दुराग्रहाचा परिणाम आहे. उपास्यांची अनेकता असली तरी सर्व देवता मूळांत एकच आहेत, हें भक्तांनीं केलेलीं स्तोत्रें पाहिलीं असतां समजून येतें. 'एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति' हें जसें खरें आहे तसें जाणता भक्त 'अनेकीं सदा एक देवासि पाहे' हेंही खरें आहे. एकांत अनेक व अनेकांत एक असें हें देवस्वरूप आहे. असो. पंचायतनपूजेची समन्वयात्मक कल्पना आचार्यांनीं लोकप्रिय केली यांत त्यांच्या बुद्धीची व्यापकता व संघटनात्मक चातुर्यही दिसून येतें. आचार्यांना पंचायतनाची कल्पना पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश ह्या सृष्टींतल्या पंचायतनावरून ( पंचतत्त्वांवरून ) सुचली असावी असें मला वाटतें !

## २ पंचायतनकल्पनेचा विस्तार

पंचायतनकल्पना आचार्यांच्या वेळेपासून प्रसार पावली. रामोपासकांनीं राम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न व मारुति हें आपलें पंचायतन ठरविलें. कृष्णोपासकांचें राम ( बलराम ) व कृष्ण आणि गरुड, अर्जुन व उद्धव हें पंचायतन आहे. द्वारकेच्या मुख्य कृष्णमंदिराच्या आवारांत बलरामाचेंही मंदिर आहे. अर्जुनाच्या मिषानें गीता व उद्धवाच्या निमित्तानें भागवत (एकादश) वैष्णवांस मिळालें आहे. गरुड हें विष्णूचें वाहन तर प्रसिद्धच आहे. सर्व भागवतपंथांत गीताभागवत हे मुख्य ग्रंथ व उद्धवार्जुन हे भक्तोत्तम मानतात. एक समाधानाची गोष्ट ही कीं, वैदिकधर्मीयांत कितीही भिन्नभिन्न उपास्यें, वेगवेगळे पंथ, संत व ग्रंथ झाले असले तरी सर्वांची एकरूपता सर्वमान्य असल्यामुळें हिंदुसमाज वास्तविक अफूट राहिला व धर्मदृष्टीनें तरी त्याचें एकराष्ट्रीयत्व अभंग राहिलें आहे.

## ३ महाराष्ट्रीय संतांचीं पंचायतनें

पंचायतनकल्पना पुढें संतांत व पंथांत प्रथा पावली. महाराष्ट्रीय संतमंडळांत तीन पंचायतनें प्रसिद्ध आहेतः एक ज्ञानेश्वरपंचायतन, दुसरें

एकनाथपंचायतन व तिसरें रामदासपंचायतन. एका संप्रदायाच्या, एका उपासनेच्या, एका मेळाच्या, प्रेमभावानें एकरूप झालेल्या, लोकोद्धाराचें एकच कार्य करणाऱ्या पांचांच्या संघास पंचायतन म्हणतात व त्यांपैकीं जो अधिक मान्य, अधिक लोकप्रिय व अधिक कार्यकर्ता असेल त्याच्या नांवानें तें पंचायतन प्रसिद्धि पावतें. निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई व चांगदेव हें ज्ञानेश्वरपंचायतन; एकाजनार्दन, रामाजनार्दन, जनीजनार्दन, विठा रेणुकानंदन व दासोपंत हें एकनाथपंचायतन व रामदास, जयरामस्वामी, रंगनाथस्वामी, केशवस्वामी व आनंदमूर्ति हें रामदासपंचायतन. पंचायतनांत सर्व एकाच गुरूचे शिष्य असतात असें नाहीं. त्यांत कांहीं ब्रह्मचारी आहेत व कांहीं गृहस्थ आहेत. पहिल्या पंचायतनांत सारे कृष्णभक्त म्हणजे विठ्ठलभक्त आहेत, दुसऱ्यांत बहुतेक दत्तभक्त आहेत व तिसऱ्यांत कांहीं कृष्णभक्त व कांहीं रामभक्त आहेत. पण हे सारे गुरुभक्त, आत्मानुभवी संत आहेत. ज्ञानेश्वरमंडळांत नामदेव, चोखामेळा व जनाबाई हे तीन धरिले म्हणजे यालाच अरुंधतीसह सप्तर्षिमंडळ म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं! एकनाथ-पंचायतनांत तुकाराम, निळोबाराय व बहिणाबाई हे तीन धरले म्हणजे हें दुसरें सप्तर्षिमंडळ तयार होतें. रामीरामदास (श्रेष्ठ), दिनकर गोसावी व वेणाबाई या तिघांसह तिसरें सप्तर्षिमंडळ तयार होतें! महाराष्ट्रांतील बहुतेक लोकप्रिय संतकवि या चोवीसांत येतात. पण तुकोबांची प्रभावळ स्वतंत्रपणें प्रथम प्रकरणांतच सांगितली आहे. तुकोबाराय व त्यांचे चौदा टाळकरी व शिष्य हे पहिल्या दोन पंचायतनांशीं पूर्ण मिळून आहेत.

## ४ अवतारकाल

**१ रामदासस्वामी म्ह० समर्थ :—**

**जन्म :**—शके १५३० कीलक, चैत्र शुद्ध ९, मध्यान्ह.

**समाधि :**—शके १६०३ दुर्मुख, माघ वद्य ९

**२ जयरामस्वामी वडगांवकरः—**

**जन्मः**—शके १५२१ श्रावण वद्य ८

**समाधिः**—शके १५९४ परिधावी, भाद्रपद वद्य ११

**३ रंगनाथस्वामीः—**

**जन्मः**—शके १५३४ मार्गशीर्ष शुद्ध १० रविवार.

**समाधिः**—शके १६०६ रक्ताक्षी, मार्गशीर्ष वद्य १०

**४ केशवस्वामी भागानगर ( हैद्राबाद ) करः—**[१]

**समाधिः**—शके १६०४ दुंदुभी, पौष शुद्ध १३ गुरुवार.

**५ आनंदमूर्ति ब्रह्मनाळकरः—**

**जन्मः**—शके १५५०

**समाधिः**—शके १६१८ धाता, कार्तिक शुद्ध १४

## ५ रामदासपंचायतनाचें वैशिष्ट्य

ज्ञानेश्वर व नाथ पंचायतनांहून या रामदासपंचायतनाचें कांहीं बाबतींत वैशिष्ट्य आहे. ह्या पंचायतनांतील सत्पुरुषही स्वतः विरक्त, निःसंग व पूर्ण स्वरूपानुभवी होते यांत शंकाच नाहीं पण ते व्यवहाराला अधिक धरून वागणारे होते. त्यांचे नेते रामदासस्वामी यांचा त्यांनाही उपदेश व्यवहाराला अनुसरून वागण्याचा होता. वेषाचा वा सांपत्तिक स्थितीचा लोकांच्या मनावर कांहीं परिणाम होऊन संप्रदाय वाढविण्यास मदत होते ही गोष्ट खोटी नाहीं. समर्थ तारुण्यांत तीर्थयात्रामिषानें हिंदुस्थानभर हिंडले. 'पायांत पादुका, हातीं माळ, गळां मेखळा, मस्तकीं जटाभार, त्यावर टोप, कांखेस कुबडी, अंगावर हुरमुजी रंगाचीं वस्त्रें व पाठीशीं गलोल असा वेष धारण करून समर्थ हिंडत असत' असें हनुमानस्वामींनीं त्यांचें वर्णन केलें आहे. नाथांचा वेष सामान्य गृहस्थाश्रमी

---

१ शके १६२० मध्यें गभगीता लिहिणारे केशवस्वामी वेगळे होत. त्यांचे गुरु कोणी मारकीनाथ होते.

माणसाचाच असे. त्यांत कोणतेंही वैशिष्ट्य नव्हतें. तुकोबांचा अवतार तरी काय ? कीर्तनरंगांत ते आले कीं 'कथे नागवाचि नाचे'–ढुंगचें जागेवर आहे कीं सुटलें याची त्यांना शुद्धच नसे ! शिवरायांनीं तुकोबांस बोलावणें पाठविलें तेव्हां तुकोबांनीं दिलेल्या उत्तरांत पुढील चरण आहेत :–

**वस्त्रावीण काया जालीसे मळिण । अन्नरहित हीण फळाहारी ॥**
**रोडके हातपाय दिसे अवकळा । काय तो सोहळा दर्शनाचा ॥**
**मागावें तें अन्न तरी भिक्षा थोर । वस्त्रांसी हे थार चिंध्या बिदी ॥**
**निद्रेसी आसन उत्तम पाषाण । वरी आवरण आकाशाचें ॥**
**न हों किविलवाणे नाहीं आम्ही दीन । सर्वदा शरण पांडुरंगीं ॥**
**निराशेचा गांव दिधला आम्हांसी । प्रवृत्तिभागासी सांडियेलें ॥**

तुकोबा व समर्थ दोघेही विरक्त यांत शंकाच नाहीं. दोघांच्याही वेष-भूषेचा परिणाम लोकांच्या मनावर वेगवेगळ्या प्रकारचा पण पूज्यबुद्धीचाच होत असे. 'अंतस्त्यागी बहिःसंगी लोके विहर राघव' असा वसिष्ठांनीं रामरायास जो बोध केला आहे त्याचाच संस्कार समर्थादि रामभक्तांच्या मनावर झालेला दिसतो. तुकोबांनीं अंतस्त्याग व बहिस्त्यागही केला होता, यामुळें त्यांचें वैराग्य ठसठसीत दिसे. 'सोनें रुपें आम्हां मृत्तिकेसमान,' 'तुका म्हणे धन । आम्हां गोमांसासमान' अशी तुकोबांची कडकडीत वैराग्याची स्थिति असे. 'कथा करूनियां द्रव्य देती घेती । तेही दोघे जाती नरकामध्यें' असा कडक निर्बंध कीर्तन करणाऱ्या हरिदासांवर नाथांनीं व तुकोबांनीं घातला आहे, व त्याप्रमाणें त्यांचें व त्यांच्या अनुया-यांचें वागणें असे. व्यवसायी कीर्तनकारांना समर्थांनीं थोडी सवलत दिली आहे. 'कीर्तनाच्याबाबत ठराव करूं नये, तर जें कांहीं मिळेल त्यांत संतुष्ट असावें.' कीर्तनाचें मोल करूं नये व तें कधीं होत नाहीं हें सर्वांनाच मान्य आहे. वारकरी पंथांतील बहुतेक संत संसारांत असून व आपापलीं कामें करून कीर्तनव्यवसाय केवळ परमार्थसाधनासाठीं करीत.

त्यांतही कांहीं पोटभरू लोक असतील व आहेत पण संत स्वतः निर्लोभ असत. समर्थपंचायतनांतील बहुतेक संतांनीं मठ-मठिका स्थापन करून आपल्या हयातींतच त्यांना जमिनी वगैरेचीं उत्पन्नें लावून घेतलेलीं दिसतात. समर्थांशिवाय त्यांच्याच पंचायतनांतल्या इतर चौघांनीं राजकराणांत कांहीं भाग घेतला होता असें दिसत नाहीं. त्यांची कविता पारमार्थिक व उपदेशपर आहे.

## ६ सत्पुरुषांच्या भेटी

समर्थांच्या समकालीन सत्पुरुषांच्या गांठीभेटी नित्यशः होत. तुकोबाराय, मोरया गोसावी, वामनस्वामी, आनंदमूर्तींचे गुरु रघुनाथस्वामी, यांचे त्यांचे एकांत झाल्याचीं वर्णनें आहेत. जयरामस्वामी, रंगनाथस्वामी, आनंदमूर्ति व केशवस्वामी हे तर समर्थांच्या पंचायतनांतले संत त्यांचे जिवलग मित्र होते व या पांचांचें परस्परांकडे उत्सवादि प्रसंगानें वारंवार जाणें येणे असे. समर्थांस प्रथम जयरामस्वामी येऊन भेटले, नंतर रंगनाथस्वामी त्यांचे भेटीस आले. ते एकमेकांस आवडीच्या चिजा पाठवीत व त्यांचा पत्रव्यवहार असे. पाटगांवचे मौनीबोवा हेही समर्थांच्या मित्रमंडळापैकीं एक असत. मौनीबोवा ईश्वरचिंतनांत सदा मग्न असत, कांहीं बोलत नसत. कऱ्हाडास निरंजनस्वामी म्हणून एक गणेशभक्त असत. त्यांना समर्थांनीं रामाचें ध्यान दिलें पण राम म्हणतां गणपति त्यांचेपुढें येत. तेव्हां समर्थांनीं त्यांस सांगितलें कीं, ‘ गणपतीची तुजवर कृपा आहे, तेच तुजवर प्रत्यक्ष अनुग्रह करितील. ’ यावरून निरंजनस्वामी कऱ्हाडास कृष्णातीरीं गणेशतीर्थ आहे तेथें अनुष्ठानास राहिले व कृतार्थ झाले. पूर्णानंदांचे शिष्य शिवरामस्वामी ( नाथांचे पणतू ) मोगलाईत कल्याणी येथें राहत. तेथें त्यांचा मठ असून त्यांचा प्रचंड कवितासंग्रह आहे. त्यांनीं समर्थांस आपले मठीं नेलें व आपले ग्रंथ दाखविले. त्यांत पंचीकरण होतें. तें पाहून समर्थ म्हणाले :

' शिवराम ! पंचीकरणें पांचचार प्रकारचीं असून बालबोध पंचीकरण करावें असा आमचा संकल्प होता. पण तुमचें पंचीकरण पाहून आमचा बहुत संतोष जाहला. अतःपर आम्ही पंचीकरण करीत नाहीं ! तुम्ही केलें तेंच आमचें आहे ! ' समर्थप्रताप ग्रंथाच्या १६ व्या व १७ व्या प्रकरणांत समर्थ-समकालीन संत समर्थभेटीस आल्याचें वर्णन आलें आहे तें मूळांतच पाहावें. त्यांत समर्थपूर्वकालीन संतांचींही नांवें आहेत.

## ७ संतांचा परस्पर प्रेमभाव

रामदास पंचायतनांतील पांचही जणांचें परस्परांवर अकृत्रिम प्रेम होतें. ' माझिया जातीचें मज भेटो कोणी ' अशी तुकोबांनीं कासाविशी केली आहे, व ' आवडे ज्या हरी अंतरापासोनी ' तो माझ्या जातीचा असा तुकोबांचा अभिप्राय पुढील चरणांत व्यक्त झाला आहे. सर्वच संत या अर्थानें एका जातीचे असतात. लौकिकदृष्ट्या समर्थपंचायतन एकाच म्ह० ब्राम्हणजातीचें होतें; तिघे ऋग्वेदी व दोघे यजुर्वेदी देशस्थ ब्राम्हण होते. पण स्नेहसौख्याला देहाची जात कांहीं उपयोगीं पडत नाहीं, व आडही येत नाहीं. मनामनाची मिळणी जेथें होते तेथेंच स्नेह संभवतो, व तो कोणत्याही जातीच्या स्त्रीपुरुषांत दिसतो. स्वार्थावर उभारलेले स्नेह टिकत नाहींत, एका मताच्या लोकांचे स्नेह जमतात पण त्यांच्यांत मतभेद उत्पन्न झाले कीं दीर्घकालचे मित्रच एकमेकांचे शत्रु होतात, हा आपला नित्याचा अनुभव आहे ! निर्निमित्त प्रेमाचा विषय एक हरि आहे, म्हणून हरीच्या ठिकाणीं निःस्वार्थ प्रेमानें जे मिनले आहेत त्यांचाच स्नेह चिरकालीन व शुद्ध असतो. ' मच्चित्ताः मद्गतप्राणाः —तुष्यन्ति च रमन्तिच. ' त्यांच्यांत हरिप्रेमाचीच देवघेव चालते व लोकोद्धाराच्या कामीं ते एकरूप असतात; कोणाचाच स्वार्थ नसतो. असो. जयरामस्वामींकडे कृष्णाष्टमीचा उत्सव असे; समर्थ व रंगनाथस्वामी यांजकडे रामनवमीचा उत्सव असे व आनंदमूर्तींकडे गुरुपुण्यतिथीचा उत्सव असे. या उत्सवास ते प्रायः एकमेकांकडे जात, व

आठ पंधरा दिवस राहत. त्यांची पंगत, संगत व एकान्त घडत. ते परमार्थाचे अनुभव एकमेकांचे एकमेकांस सांगत. संतांत देवाधर्माच्या व स्वानुभवाच्याच गोष्टी निघायच्या. त्या वेळचा आनंद अनुपम असतो. 'मिळतां प्रचीतीचे संत। एकांतापरिस एकांत' असें समर्थांनीं म्हटलें आहे. हा खरा एकान्त म्ह० तेथें एकत्वाचाही अंत होऊन सोलींव प्रेमसुखच उरतें! तेथें भक्तिप्रेमांत अवघे तल्लीन होतात. समर्थांना चौघेही वडीलपणें गुरुस्थानीं मानीत. केशवस्वामी भागानगराहून यांना मिळायला येत. केशवस्वामींकडे हे बाकीचे चौघेही एकादवेळ जात. यांत रंगनाथांचें गायन व वाणी मधुर असल्यामुळें त्यांजवरच अधिक वेळ कीर्तन करण्याचा प्रसंग येई. जयरामस्वामी वयानें वडील. समर्थांचा रुबाब मोठा. आनंदमूर्ति सर्वांत लहान. त्यांच्या अपार गुरुभक्तीचें कौतुक होई. स्वार्थ, स्पर्धा, असूया, मत्सर हे लौकिकविद्वानांत प्रायः दिसणारे मनोविकार या संतांच्या वाऱ्यालाही उभे राहत नसत! एकमेकांनीं एकमेकांना आत्माधिक मानावें व दुसऱ्याच्या गुणगौरवांत प्रेमानें मिळून जावें. 'परगुणपरमाणून् पर्वतीकृत्य नित्यं। निजहृदि विकसन्तः सन्ति सन्तः कियन्तः' हें सुभाषित असल्या संतांच्या मेळांतच कोणा कवीला स्फुरलें असावें! समर्थांनीं एकदां केशवस्वामींस भेटीस येण्याविषयीं पत्र लिहिलें, त्यांत प्रथमच पुढील श्लोक लिहिला—

**पदातीत वाक्यार्थ शोधीं समाधीं। क्षमातीत जो निर्विकल्पावबोधीं।**
**तया ऊगमीं जन्म नाहीं जिवासी। मिळे संगमीं दास त्या केशवासी॥**

'रामदास चतुरक्षरि मत्र जप वारंवार। दुस्तरतर भवसागरतारक सच्चित्सुखसार' ह्या पदांत **रंगनाथस्वामींनीं** राम आणि दास हीं पदें दोन असलीं तरी साखर व गोडी यांप्रमाणें तीं अभिन्न आहेत, हा राजाधिराज या जगदुद्धाराला अवतरला आहे, हा साधकाला विश्रामस्थान असून संतसभेचें मंडण आहे, हा मुनिमानसहंस आहे, इ० प्रकारें

समर्थांचें गुणगौरव केले आहे. रंगनाथांनीं एका पदांत 'श्रीरामदासें पूर्ण दया केली। दिल्ही अद्वैतमूर्ती ध्याना' असें म्हटलें आहे. एका पदाचें शेवटचें कडवें असें आहे :—

**भावें शरण रिघावें। स्वहित करावें।**
**उद्धरोनि तारावें। जन्ममरण वारावें।**
**रंगनाथप्रभु रामदासपदिं अनन्यरूप मुरावें॥**

**केशवस्वामींचें** पुढील पद प्रसिद्ध आहे :—

**रामदास माउली अनाथाची। रामदास०॥ ध्रु०॥**
**सच्चित्सुखघन वरद प्रतापी। शांतीची साउली॥ अ०॥ १॥**
**अनन्य जे नर शरण रिघाले। तयांलागीं पावली॥ अ०॥ २॥**
**केशविं केशव निजसुख भोगी। आठवितांचि धांवली॥ अ०॥३॥**

आनंदमूर्तींनीं समर्थांवर पुढील श्लोक रचिला आहे :—

**समर्थ हें नामचि साच वानूं। समर्थ हें नाम दुजा न मानूं॥**
**समर्थकृपेनें जडजीव तरती। समर्थ हें नाम सद्यःप्रतीति॥**

रामदासस्वामींना 'समर्थ' ही पदवी तत्कालीन लोकांनींच दिली होती. त्यांच्या 'समर्थपणाची सद्यःप्रतीति' आनंदमूर्तींसारख्या संगतींतल्या सज्जनांना कसकशी आली होती हें आज आपण यथार्थ कसें जाणावें?

एकदां कृष्णाप्पांच्या पुण्यतिथीला सारी मंडळी वडगांवास जमली होती, फक्त रंगनाथस्वामी आले नव्हते. रात्रीं मुख्य पंक्तीला रंगोबा आले नाहींत तेव्हां 'माझा रंगोबा' आल्याशिवाय आपण जेवणार नाहीं असा आग्रह समर्थांनीं धरिला. सर्व वाट पहात बसले! रंगोबा फार दूर होते तरी यायला निघाले होते. वाटेंत चोरांनीं त्यांना अडविलें होतें. रंगोबांचा घोडा, त्यांचा पोषाख, त्यांची भीकबाळी व आंगठ्या सर्व थाट सरदारी होता! ही चांगली शिकार सांपडली असें चोरांस वाटलें. रंगोबांच्या संगतीनें चोरांचे साव झाले. रंगोबांबरोबर चोरही वडगांवास उत्सवास आले. रंगो-

बांची तांतडी म्हणून घोड्यास श्रम फार झाले, त्यामुळें घोडा मरून पडला. समर्थांचे आज्ञेवरून जयरामस्वामींनीं घोडा उठविला. संतमंडळीचें भोजन आनंदांत झालें. एकमेकांनीं एकमेकांच्या स्तुतिपर श्लोक भोजनांत म्हटले. जयरामस्वामी म्हणाले —

**श्रीगुरु समर्थ परलीला । काय एक न करी पर लीला ॥**

आनंदमूर्ति म्हणाले —

**अश्व हा उठ म्हणे उठताहे । धन्य कीर्ति पाहतां बहुता हे ॥**

जयरामस्वामी म्हणाले —

**रामरूप जणुं रामचि अवतरला । रामदास म्हणतां पर तरला ॥**
**निर्जिवा करितसे सजीवा । धन्य कीर्ति स्मरतां जिव शीवा ॥**

समर्थांनींही त्यांची स्तुति केली. प्रत्येकानें एकेक चरण म्हणत पुढील श्लोक पूर्ण केला ! रामदासांचा पहिला चरण आहे :—

**मुक्तासि कांहीं तनुभाव नाहीं । असोनि देही परि तो विदेही ।**
**प्रारब्धकर्मास्तव देहि झाले । वायूसवें पादप जेविं डोले ॥**

यात्रेकरू ह्या ब्रह्ममूर्तींचा हास्यविनोद व आनंद पाहून तन्मय होत व स्वर्गसुख येथेंच भोगीत. ह्या संतांचीं परमार्थपर भाषणें, आलिंगनें व वंदनें, आनंदाश्रु, अष्टभावरोमांचादि सर्व कांहीं सुखमय होतें. ब्रह्मसुख यापुढें फिकें वाटे. या जातीचा कांहीं अनुभव श्रीगुलाबराव महाराजांच्या संगतींत आम्हांला मिळाला म्हणून याची सत्यता पटते !

केशवस्वामींना एकदां समर्थभेटीची इच्छा झाली, तेव्हां त्यांनीं तीन ओव्यांचें समर्थांस एक पत्र लिहिलें व समर्थांनीं त्यांस एका श्लोकांत उत्तर पाठविलें तें असें :—

**पत्र :—तूं स्वादामृताची चखोटी । तूंचि चवी तुझ्या पोटीं ।**
**तें निरसोनियां दिजे भेटी । स्वानंददृष्टि-अवलोकनें ॥**
**श्रीरामदासा परम सखया । स्वानंदपान्हा गुरुवर्या ।**
**केशवें विज्ञप्ती ल्याहावया । हेंचि कारण ॥**

**उत्तर :—पदातीत वाक्यार्थ शोधीं समाधीं ।**
**स्वरूपींच जो निर्विकल्पावबोधीं ॥**
**जये ऊगमीं जन्म नाहीं जिवासी ।**
**मिळे दास त्या संगमीं केशवासी ॥**

'स्वानंदामृताचें निरंतर पान करणारे तुम्ही स्वतःच स्वादरूप आहांत; पण हें जरा बाजूला ठेवून प्रत्यक्ष सगुणरूपानें भेटा व कृपादृष्टीनें मजकडे पहा !'

'तुम्ही मला सच्चिदानंदपदानें संबोधितां, तर या पदाचा अर्थ समाधींत शोधा म्हणजे जेथें जिवाला जन्म नाहीं अशा निर्विकल्प स्वरूपीं तुम्ही व मी एकरूपच आहों असें तुम्हांसच समजून येईल !'

## ८ जयरामस्वामी

महाराष्ट्रीय संतांच्या उदार शिकवणींचा परिणाम महाराष्ट्रांतील विविध पंथांच्या लोकांवर कसा झाला याचें एक उत्कृष्ट उदाहरण जयरामस्वामींचे आजेगुरु शांतेश्वरमहाराज यांचेंच होय. **शांतेश्वर ऊर्फ शांतलिंगाप्पा** हे मूळचे जंगम, लिंगायत. लिंगायत हे कट्टर शैव असतात. यांच्यांत व वैष्णवांत प्रायः तीव्र विरोध असतो. पण हे शांतलिंगाप्पा शिव व विष्णु या उभय देवतांना सारखेच मानीत व यामुळें ते शैवांत व वैष्णवांत सारखेच प्रिय असत. यांचा मठ शिखरशिंगणापूर येथें असे. सातारा जिल्ह्यांत माण तालुक्यांत शिंगणापूर नांवाचें एक खेडें आहे. त्याच्या लगतच्या उंच डोंगरावर एक महादेवाचें प्राचीन मंदिर आहे. त्याला शिखरशिंगणापूर म्हणतात. हें पुष्कळ मराठ्यांचें कुलदैवत आहे. मराठे लोक लग्न झाल्यावर वधूवरांना तेथें पायां पडायला नेतात. तेथें महाशिवरात्रीला फार मोठी यात्रा भरते. तेथें शांतलिंगाप्पा हे राहत असत. हे लिंगायत खरे, पण ज्ञानेश्वरनामदेवनाथादि संतांनीं जी भागवत-धर्माची महाराष्ट्राला शिकवण दिली तीबरहुकूम यांचें आचरण असे.

हे नाथांचेच समकालीन होत. यांचे गुरु नीलकंठ होते. शांतलिंगाप्पा स्वामींचा 'कर्णहस्तकी' नांवाचा एक जंगममतप्रतिपादक ग्रंथ आहे, त्यांत प्रणव, पंचतत्त्वोक्ति, शिवतनु, त्रिगुण, भावत्रय इत्यादि विषय पंचीकरणाच्या पद्धतीनें वर्णिले आहेत. त्याची शेवटची ओंवी 'चनबसवेश्वरोक्ति। वरी मी बोलिलों अनुभूति। प्रीति पात्रो विद्यापारंगति। म्हणे शांत नीलकंठ॥' हे शांतेश्वरमहाराज शांत असत. हे त्रिकाळ शिवपूजा करीत. येतील त्यांना शिवाची अगर विष्णूची भक्ति करण्यास व सन्मार्गानें चालण्यास हे सांगत. मताचा आग्रहीपणा त्यांच्या मनाला शिवलाच नाहीं. मठांत लिंगायतांचें स्वयंपाकपाणी एका बाजूला व ब्राह्मणादिकांचें स्वयंपाकपाणी दुसऱ्या बाजूला असे. ज्यानें त्यानें आपल्या धर्माप्रमाणें चालावें व सर्व मतांच्या लोकांशीं भगवद्भावानें वागावें असे ते सांगत. हजारों लोक त्यांना शरण येत व ते सर्वांना भक्तिमार्ग सांगून सत्पथाला लावीत. असा हा सत्पुरुष अजातशत्रु होता. त्याच्या हजारों शिष्यांत त्याचा आवडता शिष्य **कृष्णाप्पा** नांवाचा ब्राह्मण होता. त्याचें नांव कृष्णा होतें व गुरुजी त्याला कृष्णाअप्पा-कृष्णाप्पा म्हणत. हा काश्यपगोत्री देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. हा उरूणचा कुळकर्णी. यावर शांतलिंगाप्पांची पूर्ण कृपा होती. यांनीं पंढरीस गोपाळपुरीं, सप्तशृंगावर व नंतर जोगाईच्या आंब्यास तपाचरण केलें होतें. कृष्णाप्पाचे आईबाप लहानपणींच वारले होते व गुरूंनीं त्याचें पुत्रवत् परिपालन केलें. कृष्णाप्पास बरोबर घेऊन शांतेश्वरमहाराजांनीं काशीयात्रा केली. प्रयाग, काशी, गया येथील सर्व विधि यथोचित करून गुरुशिष्य अयोध्येस गेले. तेथें कांहीं दिवस राहून ते मथुरेस गेले. मथुरा, गोकुळ, वृंदावन, गोवर्धन हीं कृष्णचरित्रानें पावन झालेलीं क्षेत्रें पाहून ते परत वडगांवास आले. शांतलिंगाप्पा पूर्ण शैव होते, तरी कृष्णाप्पांच्या मनाचा ओघ पाहून त्यांनीं त्यांस कृष्णाची उपासना दिली व भक्तिमार्गानें लोकोद्धार करावा अशी आज्ञा केली व त्याप्रमाणें त्यांनीं वडगांव येथें

मठाची स्थापना शके १५०४ मध्यें केली. कृष्णाप्पांनीं कृष्णभक्तिप्रसाराचें उत्कृष्ट काम करून शके १५४५ माघ शुद्ध १५ या दिवशीं जिवंत समाधि घेतली. ‘एक लंगोटी, अंगावर एक छाटी, खालीं बसावयास पांढरें घोंगडें, पाणी पिण्याचा तुंबा, याशिवाय कांहींएक संग्रह नाहीं, सर्वकाळ आत्मसुखांत निमग्न असावें,’ असें कृष्णाप्पाचें वर्णन जयरामस्वामींच्या बखरकारानें केलें आहे. कृष्णाप्पाचे शिष्य जयरामस्वामी—नीलकंठ—शांतलिंगाप्पा—कृष्णाप्पा--जयराम अशी ही परंपरा आहे. श्रीशांत—श्रीकृष्ण—श्रीजयराम.

नगर जिल्ह्यांत कात्राबाद मांडवगण येथें भिकाजीपंत देशपांडे व त्यांची स्त्री कृष्णाबाई हीं उभयतां गृहस्थाश्रमांत राहून सदाचारानें वागत. दानधर्म व्रतनेम करीत. हे एकविचारें वागत असतां त्यांचे पोटीं **जयरामस्वामीं**चा जन्म झाला. उपनांव कसरे, गोत्र वसिष्ठ. ‘गौरवर्ण, सुहास्यवदन, डोळे मोठे व पाणीदार असें हें सुंदर बालक इतरांनीं पहावें तर त्यांची दृष्टि त्या मुलापासून न निघावी.’ जयरामाचा बाप वयाचे ५ वे वर्षी व आई मुंज झाल्यावर १० वे वर्षी वारली! थोडेंफार संस्कृत शिकून हे मराठी ओंवीबद्ध ग्रंथ पाहूं लागले. एखाद्या झाडाखालीं एकांतस्थळीं तासन् तास चिंतन करीत बसावें. वैराग्य झालें. घरदार चीजवस्त दान करून घराबाहेर पडले. पंचवटी, जोगाईचें आंबें येथें कांहीं काळ राहून अध्ययन व अनुष्ठान केलें. १४ वे वर्षी पंढरीस आले. तेथील भक्तिभाव लुटून निस्सीम उपासक बनले. वयाचे सोळावे वर्षी वडगांवीं जाऊन कृष्णाप्पांचें दर्शन घेतलें. सहवासानें श्रद्धा उत्पन्न होऊन अनुग्रह घेतला. कृष्णाप्पांनीं लोकोद्धाराचा उपदेश केला व कृष्णोपासना वाढविण्यास सांगितलें. ‘लोकांत वागावें आणि समाधि तर मोडूं नये’ हें त्यांच्या उपदेशाचें सार होतें. जयरामस्वामींनीं गोकुळाष्टमीचा उत्सव पंधरा दिवस सुरू केला. कथाकीर्तनें, गोपाळकाला, दहींहंडी, ललित सर्व श्रद्धापूर्वक चालू झालें. त्यांना ५।७ वर्षें गुरुसेवा घडली.

जयरामस्वामींनीं अपरोक्षानुभव हा ग्रंथ सांगितला, त्याचें त्यांच्या शिष्यानें शके १५९१ आश्विन कृष्ण ८ स गुरुवारीं लेखन केलें. ती प्रत मठांत आहे. जयरामस्वामींचे आणखी कांहीं ग्रंथ मठांत आहेत. त्यांनीं शके १५७० मध्यें सीतास्वयंवर व शके १५७६ मध्यें रुक्मिणीहरण हे ग्रंथ लिहिले व याशिवाय त्यांनीं भागवताच्या दशमस्कंधावर विस्तृत टीका लिहिली आहे. जयरामस्वामींच्या चरित्राची बखर शके १७५४ मध्यें प्रसिद्ध झाली आहे.

## ९ अपरोक्षानुभव

मराठी भाषेंत कित्येक संस्कृत ग्रंथांवर टीकारूप ग्रंथ झाले आहेत. त्यांतील चांगल्यांपैकीं जयरामस्वामींची अपरोक्षानुभवावरील टीका होय. मराठी टीकाकार भाषांतरकार नाहींत; परंपरेच्या साधुसत्पुरुषांपाशीं त्यांचें अध्ययन चांगलें झालेलें असतें व ते स्वतः अनुभवी असतात. तीर्थयात्रामिषानें ते सर्वत्र फिरून आलेले असतात व ठायींठायीं अनेक संत, योगी, सिद्ध, यांच्या गांठीभेटी होऊन ते मुरलेले असतात. त्यांच्यापाशीं परंपरेचें ज्ञान असतें व स्वतः ते ब्रह्मरस चाखलेले असतात. यामुळें प्रसाद हा गुण त्यांच्या वाणींत सहजच प्रगट होतो. प्रस्तुत टीकाग्रंथांत जयरामस्वामींचे उपरोक्त गुण उत्कटत्वानें दिसतात. ग्रंथाच्या उपसंहारांत कवीनें शास्त्रविचारव्युत्पत्ति जाणणारे पंडित व ब्रह्मनिष्ठ सद्गुरुभक्त यांच्यांतला भेद सांगितला आहे. विद्वानांच्या ठायीं 'युक्तिअभिमान वाढलेला' दिसेल व 'भ्रांतिविक्षेप' दिसतील; पण त्या ज्ञानानें 'न पविजे गा समाधान। अज्ञानआवरण फिटेना. —

**आम्ही ज्ञाते परमश्रेष्ठ। हें जगीं होये प्रगट।**
**सभेमाजी युक्ति हट। धरूनि उद्भट वाद करिती॥**
**वरिवरी नम्रता दावणें। अंतरीं द्वेषाचें ठाणें।**
**पाहती एक एकाचें उणें। प्रतिष्ठेकारणें जल्पती॥**

**नाहीं भगवंतीं अनन्य । न धरी वैराग्य–आंगवण ।**
**न लगे स्वरूपीं अनुसंधान । समाधान केविं घडे ? ॥**
**अंतरीं समाधान नसे । वक्तृत्वें झाले पिसे ।**
**वचनीं व्युत्पत्ति दिसे । जनमानें ऐसे भुलले ॥ ’**

असले कोरडे विद्वान् तेव्हांही होते. आतां पुष्कळच आहेत; कारण, आतांच्या विद्वानांत गुरुपरंपरा, उपासनाप्रेम व स्वानुभव हे दुर्मिळ झाले आहेत; कारण, यावरील त्यांची श्रद्धाच उडालेली आहे ! जाऊं द्या तो विषय. जयरामस्वामी निस्सीम गुरुभक्त व सत्संगांत मुरलेले होते. त्यांच्या अंतरांत गुरुभक्ति अलोट होती. त्यांचें हृदय भूतकरुणेनें व्यापलेलें असल्यामुळें त्यांच्या वाणींत मधुररस आहे. त्यांची मराठी भाषा अगदीं सुलभ व सहज समजणारी जाहे. तिच्यांत पांडित्याचा प्रकर्ष नाहीं; पण अनुभवाचा रंग आहे. प्रस्तुत ग्रंथ श्रीशंकराचार्यांच्या ‘अपरोक्षानुभूति’ ह्या लोकप्रिय ग्रंथावरील टीका आहे. मूळ ग्रंथांत १४४ संस्कृत श्लोक आहेत, त्यांत गीतेंतील श्लोक वगैरे कांहीं प्रमाणाला घेतलेले २३ श्लोक धरून एकंदर १६७ श्लोकांवर ही टीका आहे. टीकेंत विषयानुरोधानें १२ प्रकरणें पाडून त्यांवर स्वामींनीं १७८० ओव्यांचें हें भाष्य केलें आहे. साधनचतुष्टय, विचाराचा विषय, आत्मानात्मविवेक, ज्ञानाचें स्वरूप व ज्ञानाचा उपदेश, द्वैतमिथ्यात्व, जगाची ब्रह्मरूपता व प्रपंचाचें मिथ्यात्व, ब्रह्माची सर्वात्मकता व देहात्मकतेचा निषेध, निदिध्यासाचीं पंधरा अंगें, ब्राह्मी वृत्तीचें गौरव व वृत्तिज्ञानाचें साधन इ० पारमार्थिकाला उपयुक्त असे विषय सामान्य जीवाला आकलन होईल इतक्या सुलभतेनें स्वामींनीं गोड वाणीनें मराठी वाचकांना शिकविले आहेत. प्रस्तुन ग्रंथ मला आवडला व तो समग्र वाचून माझ्या मनांत जयरामस्वामींविषयीं आदरबुद्धि उत्पन्न झाली. ग्रंथांत अवश्य तेवढा विस्तार आहे पण पाल्हाळ नाहीं :– ‘ फार

पसरू सांडोनी । टीका आहे प्रमितवचनीं । अनुभव बाणे त्वरेंकरूनी । तैसी रहणी दाविली ॥' आहे. स्वामी म्हणतात, 'येथें नाहीं हा उधार । अनुभवें उदार हा ग्रंथु ॥' हें खरें आहे. भाविक गुरुभक्तांना येथें 'रोकडा साक्षात्कार' मिळेल, हे 'प्रचीतीचे बोल' आहेत, ते प्रचीतीनें घ्यावेत असें स्वामींनीं अनेकवार म्हटलें आहे.

**रोकडी अनुभवप्रतीति । म्हणोनि नाम अपरोक्षानुभूति ।**
**शंकराचार्य कृपामूर्ति । बोले प्रीती परियेसा ॥**

हा माझा ग्रंथ गुरुकृपेचें फळ आहे :—

**बाप सद्गुरु स्वानंदघन । कृपाळू बोलला कृपेन ।**
**ग्रंथीं दिधलें वरदान । स्वानंद पूर्ण वर्षला ॥**

**माउली कृपें बाळकातें । स्तनीं लावी कुरवाळी हातें ।**
**रोकडेंचि पावे तृप्तीतें । करी क्रीडे सुखमय ॥**

**तैसेंचि मज श्रीकृष्णें । तुरवूनियां मीपणें ।**
**स्वानंदसुखें सुखी करणें । क्रीडानिरूपण टीकामिसें ॥**

श्रीकृष्णस्वामींच्या कृपाकटाक्षबळानें मला 'स्वानंदसोहळे सहज' भोगायला मिळाले असून 'संतसंगें खेळेमेळे स्वानंदसाम्राज्यसुखवैभव माझ्या घरचें' झालें आहे. 'निर्भय नांदें सावकाश । जीवन आम्हांस तुझे पाय.' अनेक थोर लोकांप्रमाणें मीही 'सोडूनि योगाचा अभिमान । सांडूनि योग्यता शहाणपण ॥' सद्गुरूला शरण आलों व परमसुख पावलों- 'स्वानंदस्वराज्यसमाधान अक्षय' पावलों.

( १ ) पुढील **रूपक** पाहण्यासारखें आहे :—

**मेघश्याम सद्गुरु श्रीकृष्ण । वर्षे स्वानंदजीवन ।**
**बुद्धिधरणी निवोन । त्रयतापउष्ण पैं गेलें ॥**

**शिष्यसुक्षेत्रीं जीवन वोळे । सोहंबीज विरूढलें ।**
**निजात्मफळा आलें । पीक पिकलें सुखाचें ॥ (प्रक० २)**

( २ ) **भक्त** व **अभक्त** यांचें वर्णन :–

**अमृत सेविती त्यां अमरपण । स्वयें अमृतचि ते आपण ।**
**अमृतरूप त्यांचें वचन । मुमुक्षुजन निवताती ॥**
**ते अमृतचि मूर्तिमंत । त्याचे मुखींचें कथामृत ।**
**भवरोगिया आरोग्य करित । स्वप्रतीति स्वयें नांदती ॥**
**सुखस्वरूप स्वप्रकाश । पूर्णशांत चिदाकाश ।**
**आन नाहीं अवकाश । पूर्णत्वासी पार नसे ॥**
**भक्तमहाराज भूपती । निंदाद्वेषांतें न गणिती ।**
**परमामृतें तृप्त असती । मायाभ्रांति त्यां नसे ॥**

* * * *

**देखोनि भक्तां गुरगुरित । पाषांडवादें कळहो करित ।**
**सदा हरिभक्तां द्वेषित । उपहासित भक्तक्रिये ॥**
**शब्दज्ञानें भरला ताठा । चुकले भक्तीचा दारवंटा ।**
**भ्रमें चालले आव्हाटा । भरला फांटा बडबडित ॥**
**असो ते माया मोहिले । अभिमानातें आंदण दिधले ।**
**कामक्रोधीं ते गिळिले । पाशीं बांधिले तृष्णेचिया ॥ (प्र० ४)**

( ३ ) स्वामी म्हणतात कीं ' घरोघरीं पुस्तकभार। शिकोनि ज्ञाते झाले फार. ' तसेच ' मठोमठीं तापसजन । महंति धरूनि अभिमान। वरिवरि वेश संपादून । वृत्ति निमग्न विषयरसीं. ' असेच पोटार्थी विषयी लोक ' पुरीं पट्टणीं ' सर्वत्र दिसतात, पण स्वानंदसमाधान भोगणारे मुनि विरळ आहेत. ' मुनि म्हणजे मननशीळ । मन ज्याचें अचंचळ । निजध्यासीं निजनिर्मळ । स्वानंद प्रबळ भोगिती ।।' असे संत धन्य होत. (प्र० ८)

## १० ज्ञानीभक्तसंवाद

ज्ञानी व भक्त यांच्या संवादांत जयरामस्वामींनीं ज्ञान व भक्ति यांची एकरूपता दाखविली आहे. ' तेचि भक्ति तेंचि ज्ञान । एक विठ्ठलचि

जाण ' हा ज्ञानेश्वरांनीं सांगितलेला सिद्धांतच सर्व संतांनीं जनांस शिकविला आहे व त्याचाच मौजेचा विस्तार प्रस्तुत प्रकरणाच्या २३८ ओव्यांत केलेला आढळतो. ' ज्ञानी म्हणे ' व ' भक्त म्हणे ' याप्रमाणें एकामागें एक चर्चापर व ज्ञानभक्तिसमर्थनपर ओव्यांत ज्ञान्यांचें व भक्तांचें मत गमतीनें मांडलें आहे. ' अखंड अद्वैत सदोदित । अच्युतानंत येकला ' असा देवच देवभक्तांचें द्वैत भासमात्र दाखवून आपणीं आपण क्रीडत आहे असें मंगलाचरणांतच म्हटलें आहे. सूर्य व किरण, जल व लहरी त्यासारखेंच देवाभक्तांचें ऐक्य आहे. देवाकडे ज्ञानाच्या अंगानें पाहणारा तो ज्ञानी व भक्तीच्या अंगानें पाहणारा तो भक्त; तत्त्वतः देव अंगांगीभावातीत आहे. गंगा व यमुना आपापल्या सामर्थ्यानें व गतीनें जात असतां शेवटीं प्रयागास एकवटतात व तेथून पुढें ' ऐक्यें चालती सहजपणें. ' ज्ञानी व भक्त यांच्या संवादाचा थोडासा भाग पाहूं :—

**ज्ञानी :** विश्वात्मा विश्वभरित आहे, ' दुसरें तेथें असेना. '

**भक्त :** अवघा देव आहे तर मग भजनउपाय कशाला? भावावांचून देव प्रगट होत नाहीं हें उघड आहे. काष्ठांतला अग्नि मंथनावांचून प्रकाशत नाहीं.

**ज्ञानी :** पण दुसरें असेल तर मंथनाची गरज !

**भक्त :** भगवंताला जीव भजतील तरच तरतील ना ?

**ज्ञानी :** तरणें बुडणें हें मिथ्या होय. नुस्ती कल्पना !

**भक्त :** मग पूजनादि साधनें कशाला सांगितलीं आहेत ?

**ज्ञानी :** आत्मा अखंडित आहे, एकदेशी नव्हे !

**भक्त :** जीव तर प्रत्यक्ष भवाच्या हिंवानें हिंवलेले दिसतात. भक्तिसाधन हवें.

**ज्ञानी :** देव सर्वत्र आहे तो साधनानें साधूं पाहणें हें आकाशाला गवसणी घालण्यासारखेंच व्यर्थ आहे.

**भक्त :** मग जीवांच्यामागें संसार कां लागला आहे ? सारे मुक्तच होते !

**ज्ञानी :** सोनें अलंकारांत तसा जनीं जनार्दन आहे. बंध, मोक्ष ही कल्पना होय.

**भक्त :** मग सुखदु:खभोग कसा होतो ?

**ज्ञानी :** तरंग उठतात व मरतात पण जळीं जळपणेंच असतात. घटमठ होतात जातात पण मृत्तिका सातत्यानें अढळ असते. तसाच परमात्मा.

**भक्त :** परमात्मा सर्वगत आहे पण भक्तांच्या ठायींच सांपडतो.

**ज्ञानी :** ही भक्तांची भावना आहे. देव एकदेशी नाहीं.

**भक्त :** सर्वच परमात्मा आहे तर मग भक्तिज्ञानवैराग्याची अटाटी कशाला ?

**ज्ञानी :** सूर्याला अंधानें नाहीं पाहिलें तर दोष कोणाचा ? परमात्मा अंतर्बाह्य भरला आहे त्याला जाणण्याचा शीणच कसला ?

**भक्त** म्हणे शब्दज्ञानें । परमात्मा केविं पावणें ? ।

**ज्ञानी** म्हणे अंधापाशीं । असलिया अमृत चौपासीं ।
हाका मारी म्हणे उपवासी । तेवीं हृयस्थासी नेणणें ! ॥

**भक्त :** देहगेहांचा त्याग केल्यावांचून सुटका कशी होईल ?

**ज्ञानी :** सांडणें मांडणें मिथ्या होय. प्रपंच परमात्मा अभिन्न तेथें कोणें काय जावें सांडून ?

**भक्त :** मग जाणते कडीकपाटीं जाऊन अखंड ध्यानीं कां बसतात ?

**ज्ञानी :** ब्रह्म सर्वत्र संचलें आहे. रानावनांत अधिक कांहीं नाहीं. ध्येय ध्याता एकच !

**भक्त :** मग हरिहर सदा ध्यानस्थ राहून भक्ति कां करितात ?

**ज्ञानी :** ते ध्येय-ध्यातेपण नुरवितां अखंड तदाकार असतात.

**भक्त :** ब्रह्मवेत्ते जगांत कसे वागतात ?

**ज्ञानी :** ते अद्वयस्थिती असती । भोग्यविषय भोक्तेपणें न देखती । अकर्मे कर्म अभेदें भक्ति करिती । परि स्फुरेना स्फूर्ति अहंकर्तृत्वें ॥

**भक्त :** तुमच्या निर्गुणांत भक्तिगोडी नाहीं ! भक्ताचीं सांकडीं देव स्वयें वारितो !

**ज्ञानी :** हा त्याचा भाव फळतो. देव अद्वय अखंड आहे. भावच देव होतो !

**भक्त :** भक्तीवांचून बंध तुटत नाहींत.

**ज्ञानी :** बंधनच लटिकें तेथें मुक्तपण कैचे ? अभेदभक्तीची खूण पटली कीं 'शिवो भूत्वा शिवं यजेत्' याचें रहस्य तुला कळेल.

* * * *

**ज्ञानी-भक्तांसी जाण । ऐक्य झालें आलिंगन ।**
**वंदिती येक येकाचे चरण । हर्षें त्रिभुवन कोंदलें ॥ १९२ ॥**
**विसरोनि मीतूंपण । झाले स्वानंदीं निमग्न ।**
**निःशेष मावळला अभिमान । निवाले पूर्ण निजसुखें ॥ १९३ ॥**

तात्पर्य 'ज्ञानहीन भक्त तो आंधळा । भक्तिहीन ज्ञानी तो पांगळा' म्हणून ज्ञानभक्ति किंवा अभेदभक्ति हीच परमश्रेष्ठ होय. चंदन काष्ठ आहे पण त्याला परिमळ नाहीं तर त्याला मोल काय ? रत्न म्हणतात पण दीप्ति नाहीं तर ती खरोखर गारगोटीच–त्याप्रमाणें भक्तिहीन ज्ञान व्यर्थ होय ! त्याप्रमाणेंच नपूंसकाचें पुरुषत्व तशी ज्ञानहीन भक्ति होय ! स्वकर्माला भक्तीनें शुद्धता येते व ज्ञानानें पूर्णता येते. भक्ताला ज्ञान पाहिजे व ज्ञान्याला भक्ति पाहिजे, म्हणजे 'भक्तिज्ञान अभिन्न' असावींत. ज्ञानानें

विचार व भक्तीनें आचार शुद्ध होतो. श्रीगुरूला शरण जावें म्हणजे हें समजतें.

> **दों हातीं येक टाळी। दों पायीं येक चाली।**
> **दों वोठीं येक बोली। प्राप्ती संचली ज्ञानभक्तीनें ॥२१५॥**
> **ऐसें हें गा अभेद्‌भजन। भज्य भजत्या नाहीं भिन्नपण।**
> **ते ब्रह्मविद् आनंदघन। दुजें जाण नसे तयां ॥ २२१ ॥**

सारांश 'भजनीं निष्ठा तेंचि ज्ञान। ज्ञाननिष्ठा तेंचि भजन' हें या प्रकरणाचें सार आहे.

## ११ रंगनाथस्वामी

रंगनाथांच्या पूर्वजांचें उपनांव खडके. हे माध्यंदिन शाखेचे वासिष्ठगोत्री यजुर्वेदी ब्राह्मण. मोगलाईतील चौसाळे महालांत खडकी नांवाचें एक गांव आहे तेथले हे मूळचे राहणारे. राघोपंत खडके हे पंढरपूरजवळ नाझरे येथें राहण्यास गेले. राघोपंतांनीं विजापूर दरबारांतून नाझरे गांवची देशपांडेपणाची वृत्ति संपादन केली. यांनीं शिपाईगिरी केली होती. यांना अश्वविद्येची चांगली माहिती होती; यामुळें यांस घोडके म्हणूं लागले. यांच्या घराण्यांत यांच्यानंतर ३।४ पिढ्यांतील पुरुषांनीं दरबारचीं व शिपाईगिरीचीं कामे केलीं. यांच्या घराण्यांतले रंगनाथस्वामी व रामविजयपांडवप्रतापादि लोकप्रिय ग्रंथांचे कर्ते श्रीधरस्वामी हे थोर पुरुष महाराष्ट्रांत गाजले रंगनाथस्वामींचे श्रीधर हे पुतणे होत. रंगनाथस्वामी ब्रह्मचारीच राहिले यांची शिष्यपरंपरेची गादी सातारा जिल्ह्यांत निगडी येथें आहे श्रीधरस्वामींचा वंश नाझरें येथें आहे. रंगनाथस्वामी निगडीकर श्रीधरस्वामी नाझरेकर या नांवानें हे महाराष्ट्रांत प्रसिद्धी पावले राघोपंत—चंद्राजीपंत—दत्तोपंत—रंगोपंत—रंगोपंताचे नातू रंगनाथस्वामी पणतू श्रीधरस्वामी. यांचा वंशवेल कारणापुरता :—




आत्यास्वामींपासूनचे सातवे पुरुष अनंत गणेश निगडीकर यांनीं रंगनाथस्वामींचीं पदें छापलीं आहेत त्यांत थोडीं विठ्ठल व त्यांचे पुत्र काशीराज यांचींही आहेत. 'उठिं उठिं बा पुरुषोत्तमा। भक्ताकामकल्पद्रुमा' ही संतांची लोकप्रिय भूपाळी 'श्रीरंगानुजतनुज' यांची म्ह० काशीराज यांची आहे.

रंगनाथांच्या वडिलांचें नांव बोपाजी व आईचें नांव बयाबाई. या दांपत्यास तीन पुत्र झाले. यादव (श० १५३१), रंगनाथ (श० १५३४) व विठ्ठल (श० १५३८). रंगनाथांचा जन्मकाल रविवार मार्गशीर्ष शु० १० शके १५३४ हा होय. रंगनाथांस मर्दानी खेळांचा नाद असून घोड्यावर रपेट करण्याची मनस्वी हौस असे. रामदासांप्रमाणें विवाह न करण्याचा निश्चय करून तरुणपणींच हे बदरीनारायणाच्या यात्रेस गेले व तिकडे हिमालयांत योगसाधन करून परत आले. हे स्वरूपानें सुंदर असून यांची मुद्रा रुबाबदार असे. वाटेंत टेहरीच्या राजानें यांचा उपदेश घेतला व यांस घोडा, हत्यारें व मंदील वगैरे वस्त्रें दिलीं. हे परत दक्षिणेंत अशा थाटासह आले व पंढरीस कांहीं दिवस राहून नाझरें येथें गेले. बोपाजीपंत रंगनाथांसह कऱ्हाडास गेले व तेथें त्यांनीं संन्यासदीक्षा घेतली. बोपाजीपंत कल्याणमठीं गेले व तेथें त्यांनीं पूर्णानंदस्वामींचा अनुग्रह घेतला. गुरूंनीं त्यांचें नांव निजानंद ठेवलें. बोपाजीपंतांचा म्ह० निजानंदांचा उपदेश त्यांच्या तीन्ही पुत्रांनीं घेतला. रंगनाथांच्या पदांत 'सहज पूर्ण निजानंद' अशी त्रयी दिलेली असते.

## सहजानंद

हे रंगनाथस्वामी निगडीकर यांचे परात्परगुरु नाथांचे समकालीन होते. हे थोर अधिकारी पुरुष होते व यांची शिष्यशाखा दूरवर विस्तारली होती. या सहजानंदांनीं योगवासिष्ठावर ग्रंथ लिहिला असून त्याचें फक्त १० वेंच प्रकरण सासवड येथील सोपानमठांत गोविंदराव चांदोरकरांस उपलब्ध झालें होतें. ग्रंथारंभीं 'चिदचिद्भेदातीत ज्ञानमूर्ति परमसुखद' अशा सद्गुरु ब्रह्मानंदांस नमन आहे. मराठींत योगवासिष्ठावर हरिदास, शिवरामस्वामी, व्यंकट, रंगनाथ, माधव इ० कवींनीं ग्रंथ लिहिलेले उपलब्ध आहेत. सहजानंदांचा योगवासिष्ठ अपुराच आहे.

**इतुकियावरी टीकाकर्ता। कर जोडूनि प्रार्थी संतां।**
**श्रीरामवसिष्ठसंवादु निरुता। येथूनि जाला संपूर्ण॥**

दहाव्या प्रकरणाची ओवीसंख्या २७० आहे, सर्व ग्रंथ सांपडल्यास २–२॥ हजार ओव्यांचा भरेल. यांच्या ओव्यांचा नमुना :—

**जेथ सुखदुःखासी अधिवासु। तेथ कैंचा परमसुखाचा लवलेशु।**
**सुखदुःखविलक्षण जो उल्हासू। तेंचि बोलिजे परमसुख॥**
**सोडी आत्मयातें दृश्यभ्रांती। द्रष्ट्रत्वाची होय उपशांती।**
**द्रष्टोपशमनीं मोक्षप्राप्ती। तेचि मुक्ती बोलिजे॥**

ग्रंथसमाप्तिकाल :—**पंधराशतें आगळीं चतुर्दशें। इतुकीं शालिवाहन-**
**शकासी वर्षें। नंदन संवत्सर असे। येणें समयीं॥**

शके १५१४ नंदन संवत्सर आश्विन कृष्ण अष्टमीसह नवमी; सोमसुताचा वासर म्ह० बुधवार. सहजानंदांचे आणखी ज्ञानदीपिका व अमृतानुभवटीका हे ग्रंथ असल्याचें समजतें. पूर्णानंदांनीं शिवपार्वतीपरिणय नामक ओवीबद्ध ग्रंथ लिहिला आहे.

## १२ एक मोठी गुरुपरंपरा

आनंदसंप्रदायाची एक मोठी गुरुपरंपरा सोळाव्या शतकांत मराठी वाङ्मयाचें मोठें कार्य करिती झाली. ह्या परंपरेच्या पांच पिढ्यांत मराठींत

ल्हानमोठे ग्रंथ प्रसविणारे ४।५ नामांकित सिद्ध पुरुष झाले. ह्या परंपरेंतल्या पुरुषांनीं गोदातीर व कृष्णातीर हे दोन प्रदेशच काय पण सारा हिंदुस्थान आपल्या चरणधूलीनें पवित्र करून सर्वत्र परमार्थबुद्धीचे लोट उत्पन्न केले. रंगनाथस्वामी निगडीकर, श्रीधरस्वामी नाझरेकर व शिवरामस्वामी कल्याणीकर हे महापुरुष ह्या परंपरेंतलेच होत. ही परंपरा अशी आहे :—

विष्णु-विधि-अत्रि-दत्त येथपासून आलेली ही परंपरा आहे.



## १३ रंगनाथांची पितृपरंपरा

वरील परंपरेंत निजानंदांपासून पुढें गुरुपरंपरा व पितृपरंपरा एकच झाल्या आहेत. त्या कशा तें सांगतों. रंगनाथांचा पांचवा पूर्वज राघोपंत खडके. बोपाजीपंतांनीं कल्याणमठाचे पूर्णानंदस्वामी यांचा अनुग्रह घेतला व गुरूनीं त्यांचें नांव निजानंद ठेवलें. हे बोपाजी ऊर्फ निजानंद हेच रंगनाथस्वामींचे जनक व गुरु होत. बोपाजीपंतांस तीन पुत्र झाले, त्यांतील मधले रंगनाथ होत.




योगीराजाचा पुत्र दत्तात्रय, त्याचा पुत्र रामचंद्र, त्याचा विष्णु, विष्णूचा पुत्र गणेश व गणेशाचा अनंत. अनंत गणेश निगडीकर या पुरुषानें रंगनाथस्वामींचा 'पदसंग्रह' शके १८२४ मध्यें स्वतंत्र छापला व त्याच्याच साह्यानें विनायकराव भावे यांनीं रंगनाथस्वामींचा कवितासंग्रह शके १८२७ मध्यें प्रसिद्ध केला. रंगनाथस्वामींच्या काव्यांचा व पदांचा

विचार पुढें करूं. पदसंग्रहांत रंगनाथस्वामी, त्यांचे बंधु विठ्ठल ऊर्फ श्रीरंगानुज, व त्यांचा पुतण्या काशीराज या तिघांचीं पदें घेतलीं आहेत. रंगनाथ विशेष प्रसिद्धीस आले. यादवरावांनीं रुक्मिणीस्वयंवर लिहिलें आहे. विठ्ठलांनीं नारदचरित्र लिहिलें आहे.

## १४ रंगनाथस्वामींचीं पदें, पंचकें, अष्टकें वगैरे

रंगनाथांचीं पदें, स्फुट श्लोक, अष्टकें वगैरे फार बहारीचीं आहेत. 'निजरंगीं रंगलेल्या रंगनाथां'चे हे सहजोद्गार अत्यंत प्रासादिक असून लोकप्रियही आहेत. पामर जीवांचा त्यांना कळवळा वाटे. ते सांगतात :—

**भक्तिविना ज्ञान व्यर्थ ज्ञानविना कर्म व्यर्थ ।**
**निरहंकृतिवीण व्यर्थ वर्णाश्रमधर्म रे ॥**
**भूतदयेवीण सकळ कळा त्याहि शून्य रे ।**
**शांतिक्षमेवीण व्यर्थ दानपुण्य रे ॥**
**संतसमागमेंवीण व्यर्थ सर्व संग रे ।**
**निजानंदेंवीण व्यर्थ बाह्य रंग रे ॥**

'भुलले मंदमती' या पदांत एक अध्यात्मरंग सोडून विद्वान् लोक नानामतें धरून मत्त झाल्याचें ते सांगतात. कोणी अंतःकरणाला ब्रह्म मानतात, कोणी मनाला ब्रह्म मानतात, कोणी आपल्या बुद्धीलाच ब्रह्म मानतात, कोणी अनुहतध्वनीला ब्रह्म मानतात. 'एक नेत्रीं बोटीं रोखुनि पाहती ब्रह्म म्हणती ज्योतिर्मय लक्षिलें.' कोणी शंखचक्रयुक्त, कोणी निर्गुण निराकार, असें आपापल्या मतें बोलतात. 'निजानंद निष्प्रपंच' आहे—तेथें सच्चिदानंदपदही सोसत नाहीं. तें स्वात्मपद सद्गुरुकृपेनें ओळखून घेऊन निजानंदीं रंगून रहावें. आत्मकळेवांचून इतर कळा विकळा होत.

**भुलला रे भुलला रे प्राणी भुलला या आभासा रे ॥ ध्रु० ॥**
**वेद्परायण शास्त्र सुभाषित उत्तम पंडित झाला रे ।**
**योगकला सकला अनुलक्षुनि वायु समग्रहि प्याला रे ।**
**भूतभविष्य गमे समयीं यमनियमहि वश्य तयाला रे ।**
**आचरला तप सर्वहि उत्तर दक्षिण मानस केलें रे ।**
**योगक्रियाविधि तो विधिपूर्वक मंत्राराधन झालें रे ।...**
**आत्मकळा न कळे भ्रमला नर व्यर्थ पराक्रम गेला रे ॥ १ ॥**

सर्व कांहीं साधनें केलीं, हीं साधनें व्यर्थ नाहींत, पण साधनांतच रमून साध्य विसरला तर व्यर्थ जोजारच तो. तात्पर्य 'आत्मकळा न कळे भ्रमला नर व्यर्थ पराक्रम गेला रे!' आधीं 'निजरंगीं मन लावीं। मग तूं रामरसायन सेवीं.' निजरंगीं आधीं रंगून मग साधनें कर. आधीं अनुभव घे, मग आवडतील तीं साधनें खुशाल करीत बैस!

कांहीं पदांची मौज पाहूं. 'तो मज आवडतो आवडतो.' कोण तो? 'जनीं जनार्दन पाहे। विकल्पलेश न साहे। देहाभिमान न वाहे। स्वरूपीं निश्चळ राहे'—तो मज आवडतो आवडतो! दुसऱ्या एका पदांत हे सांगतात कीं 'मज तो मानेना मानेना'—

**परपीडक परदोषदर्शनीं तत्पर ब्राह्मणद्रोही ।**
**निर्दय हृदय पदोपदिं संशय वचनीं निश्चय नाहीं ॥**

याच्या उलट 'विहिताचरणें सद्गुरुस्मरणें प्रियतम होय अजाला' म्ह० देवाला जो आवडला व 'सर्वभूतिं भगवंत विलोकुनि भूतदयार्णव जाला'— 'तो मज बहु माने बहु माने'— तो मला मान्य आहे. 'तरोनि तारक व्हावें रे। तरीच जन्मा यावें रे.' आपण तरावें व जनांला तारावें हेंच जन्माला आल्याचें फळ आहे. 'जो हें विषयीं वय वैरी। तो आपुला आपण वैरी' हें रंगनाथांनीं अनेकवार जीवांच्या कळवळ्यानें सांगितलें आहे. 'मृगमद

नाभिसि असतां नेणुनि। भ्रमतां भ्रमतां मेले रे' तसे हे विषयी पामर जीव परमात्मा जवळ हृदयस्थ असून त्यास न जाणल्यानें 'जीतचि मेले रे' असें त्यांनीं म्हटलें आहे. ढोंगी पुरुषांचें वर्णन करितांना रंगनाथांनीं 'बोलणें फोल झालें। डोलणें वायां गेलें' असें एका पदाचें पालुपद रचिलें आहे तें आगरकर-टिळकांच्या एका वादप्रसंगामुळें नवीनांच्या परिचयाचें झालें आहे!

**श्रवणीं दावी अष्टहि भाव। म्हणे 'मृगजळवत् हें वाव!'।**
**कवडी वेंचितांही जीव। जाऊं पाहे तळमळुनी॥ १ ॥**
**चित्तीं विषयांचा अभिलाष। नाहीं विश्रांतीचा लेश।**
**मुखें म्हणे 'निर्विशेष। परब्रह्म संचलें!'॥ २॥**
**शब्दें ब्रह्म कोण जालें?। अन्न म्हणतां कोण धालें?।**
**शिकविलें तैसें बोले। शुकपक्षी पैं जैसा॥ ४॥**
**शिकला विद्या कळा छंद। नाहीं अंतरीं निर्द्वंद्व।**
**सहज पूर्ण निजानंद। सर्वरंगीं न पाहे॥ ५॥**

मुखें बोललेलें ज्ञान आचरणांत उमटलें नाहीं तोंवर 'बोलणें फोल'च आहे! वर्णाश्रमधर्मानें चाल, रामाला भज, नीतिपंथ सोडूं नकोस, 'स्वधर्मसंस्थापने'च्या थोर कार्याला साह्य कर, नामचिंतनानें स्वतः तरून इतरांस तार असा रंगनाथांचा सर्वसामान्य उपदेश आहे. 'इहपरलोकीं मान्य वनिता' अशा सतीचें चित्र एका पदांत त्यांनीं काढलें आहे. ज्ञानदेव, एकनाथ, रामदास, निरंजनस्वामी, शिवरामस्वामी इ० सत्पुरुषांचें त्यांनीं एकेका पदांत गुणवर्णन केलें असून मीराबाई, महामुद्गल, भानुदास यांचेही उल्लेख केले आहेत. तुकारामबुवा सदेह वैकुंठास कसे गेले याचाही खुलासा त्यांनीं एका पदांत केला आहे. सज्जन व दुर्जन यांचे 'सहज स्वभाव' जाणून व 'हिंगें घाणी कैसी टाकावी?' 'गुळें गोडी कैसी सोडावी?' असा विचार करून दुर्जनासही

' बोल ठेवूं नये '—स्तुतिनिंदा कोणाचीही न करितां सत्संग धरावा ' तरीच निजानंदप्राप्ती सर्वरंगीं ' होईल असा त्यांचा उपदेश आहे. भक्तांत्तर या कवीचीं दोन बहारीचीं पदें आहेत. ' भगवंत भक्त उभयतां समसाम्य ऐक्यस्वरूपीं '—देव व भक्त एक आहेत. ' देवभक्त सिंधू सरिता दोनामीं एकचि पाहीं. ' समुद्रोदक मेघरूपानें अधिक सुसेव्य आहे. देव भक्तमुखानें आपलें मनोगत सांगतात तें अधिक सुस्पष्ट आहे.

दुसरें पद ' ते धन्य जगदुद्धारी ' हें होय. ' भक्तांसी भगवद्भजनें भवसागर मृगजलवत रे, ' भक्तांना भवसागर हा मृगजलाप्रमाणें मिथ्या आहे. मृगजल जसें नसून भासतें, त्याप्रमाणें भवसागर ही कांहीं चीज नसून अज्ञ जीवांची केवळ कल्पना आहे. संतांचा अनुभव ' चिद्विलास जग नग हेमीं ' असाच आहे, म्ह० सुवर्णाचे जसे अलंकार तसें जग हें चैतन्याचा विलास आहे, जग व चैतन्य या दोन वस्तु नसून एकच वस्तु आहे ! हेंच रंगनाथस्वामी आणखी दोन सुंदर पदांत सांगतात—

**मुळींच ते ( माया ) नाहीं ते नाहीं । अनादिसिद्ध मि पाहीं ॥ध्रु०॥**
**माया साच असावी । तरि म्यां विवेकें उगवावी ॥ १ ॥**
**भवरोगीच असावें । तरि म्यां नामरसायन घ्यावें ॥ २ ॥**
**निजरंगीं रंगेला । आपुले उगमीं संगम जाला ॥ ३ ॥**

माया मुळांतच नाहीं, मी अनाद्यनंत चैतन्यस्वरूप आहें ! माया खरी असती तर विवेकानें तिचा निरास करणें अवश्य झालें असतें. भव नाहीं व मी भवरोगीही नाहीं. मी तसा असतों तर मला नामरसायन घेण्याची जरूरी असती. मी नामसुखासाठीं नाम घेईन व घेतों. पण तें भवाचें औषध म्हणून नव्हे ! रंगनाथ हा निजरंगीं रंगला असून आपल्या उगमीं पावला आहे. उगम म्ह० मूलस्वरूप. याचा अर्थ दासबोधांत पहावा.

**अवघा तूंचि हरी तूंचि हरी। तूं जीवन मी लहरी॥ १॥**
**निजरंगा तूं पाहीं। अवघा तूंचि ‘मी तूं’ नाहीं §॥ ४॥**

रंगनाथस्वामींचीं अष्टकें आणि पंचकें ५० वर असून शिवाय कित्येक स्फुट श्लोकही आहेत. यांत विविध छंदांतले श्लोक असून ते फार सरस व प्रसादयुक्त आहेत. बहुतेक अष्टक-पंचकांतल्या प्रथम श्लोकाचा चतुर्थचरण हा पुनरावृत्त होत असल्यामुळें तोच त्याचें ध्रुवपद असतो.

**‘विश्वंभरावांचुनि कोण तारी?’** या ध्रुवपदाचे पुढील दोन श्लोक पहा—

**दारा प्रजा मित्र सकाम वर्ते। कोणी हितालागुनि न प्रवर्ते।**
**कां झांकिसी लोचन दुर्निवारीं। विश्वंभरावांचुनि कोण तारी?॥३॥**
**दिग्मंडळीं चाळक विश्वकर्ता। पाळी सृजी आणि निदानकर्ता।**
**त्या नेणतां काळ विशाळ मारी। विश्वंभरावांचुनि कोण तारी?॥४॥**

**‘त्यातें मना! सांडुनि दूर जाईं’** या ध्रुवचरणाचे पुढील श्लोक पहा—

**ज्ञानाभिमानें विदुषा न मानी। जो नायके राघवकीर्ति कानीं।**
**निंदा मुखीं चंचळ चित्त पाहीं। त्यातें मना सांडुनि दूर जाईं॥१॥**
**अभक्ष्य भक्षी गुणदोष लक्षी। नसे दया काम मनीं अपेक्षी।**
**मनोरथी वादक जो प्रवाहीं। त्यातें मना सांडुनि दूर जाईं॥ २॥**
**अत्यंत कोपी निजदोष लोपी। जो दुष्टकर्मैं अवलां निरूपी।**
**वाचाबळें भाविक लोक गोवी। त्यातें मना सांडुनि दूर जाईं ॥३॥**

---

§ इंग्रजी पारमार्थिक मनोभावनेचा कवि जॉर्ज हर्बेट (इ० स० १६००–१६५०) यानें अगदीं हेच उद्गार एका सुंदर कवितेंत काढले आहेत—

Lord! Thou art mine, and I am thine
If mine I am; and thine much more
Than I or ought or can be mine.

*   *   *

O, be mine still, still make me Thine
Or rather make no Thine and mine.

मालिनीवृत्तांतले पुढील श्लोक बहारीचे आहेत—

> सकलहि वश झाल्या या कला आणि विद्या
> परमचतुर झाला शीकला गद्यपद्या।
> सदय हृदय नाहीं, कोण मी हें कळेना,
> तरि मग तितुकेंही ज्ञान तें कां जळेना ॥ १ ॥
>
> अपर धनद झाला पाहतां या भुलोकीं
> धनकनकललामें तें न भोगीहि शोखीं ।
> द्विज विबुध न मित्रां दानयज्ञीं मिळेना
> तरि मग तितुकेंही द्रव्य तें कां जळेना ॥ २ ॥
>
> गृह सुत धन दारा देहद्वारां अमूपें
> विषयपर सुखें जीं नश्वरें दुःखरूपें ।
> निजसुख निजरंगें जोंवरी आकळेना
> तरि मग तितुकेंही सौख्य तें कां जळेना ॥ ५ ॥

येथें खरें ज्ञान, खरें धन व खरें सौख्य यांचें स्वरूप फार उत्तम प्रकारें सांगितलें आहे. सकल विद्या व कला यांत निपुण झाला, गद्यपद्य शिकला पण आत्मज्ञान झालें नाहीं व हृदयांत सदयता म्ह० दुसऱ्या जीवांविषयीं कोमल भावना उत्पन्न झाल्या नाहींत तर तें त्याचें ज्ञान तुच्छ होय ! कुबेरासारखी संपत्ति जवळ असली पण तिचा भोग घेत नाहीं किंवा द्विज, प्राज्ञ व मित्र यांच्या उपयोगीं पडत नाहीं तर त्याची ती श्रीमंती काय जाळायची आहे ? तसेंच प्रपंचांतलीं विषयपर सुखें भोगण्यांत आयुष्य वेंचतो पण स्वात्मसुखाचा भोग नाहीं तर तीं नश्वर सुखें भोगीत राहण्यांत अर्थ काय ? पुढील दोन श्लोकांतही अशाच उदार गोष्टी सांगितल्या आहेत. दुसऱ्यांला शब्दज्ञानार्थ बोधण्यांत चतुर, सर्व ग्रंथ शोधपूर्वक पाहिलेले, पण अधर्मीं चित्तवृत्ति रमली आहे तर त्याचें तें चतुर बोलणें व्यर्थ होय. सर्व विध्युक्त कर्में केलीं पण हरिप्राप्तीचें वर्म

चुकला तर त्याचा तो कर्मठपणा फोल होय. ह्या पंचकांत ज्ञान, द्रव्य, सौख्य, कर्म व बोलणें यांचें ध्येय काय पाहिजे तें मोठ्या सहृदयपणानें सांगितलें आहे.

कामदावृत्तांतले कृष्णभक्तिपर चार सुंदर श्लोक—

**पूर्ण ब्रह्म तूं इंदिरावरा। श्रीकृष्णाजी श्यामसुंदरा।**
**धन्य ते तुझें ध्यान वर्णिती। नित्य मुक्त ते जे अकर्णिती ॥ १ ॥**
**विश्वहृद्य तूं तेथ र्‍यां तुझें। हृद्य वर्णिजे नवल हें बुझे।**
**वेडि आवडी धांव घेतसे। आदिअंत ह्या पाहतां नसे ॥ २ ॥**
**किरिटकुंडलीं फांकली प्रभा। सुरतरूतळीं देहुडा उभा।**
**अधरिं धरुनियां वेणुवादनें। मोहिलीं तुवां व्रजवधूमनें ॥ ३ ॥**
**यापरी तुझें ध्यान श्रीहरी। वर्णितां तुझी मूर्ति अंतरीं।**
**रंगली निजानंदवैभवें। सोडिना कदा तनुमनूजिवें ॥ ४ ॥**

एका पंचकांत 'सत्कर्म राहे तरि दोष नाहीं' म्ह० आचारधर्म कांहीं अवस्थेंत हातून न घडले तरी त्यानें दोष उत्पन्न होत नाहीं असें म्हटलें आहे. 'तापत्रयें कुंठित देह झाला। किंवा समाधिस्वसुखेंची ठेला॥ वार्धक्यकाळीं विगतेंद्रियें हीं। सत्कर्म राहे तरि दोष नाहीं.' चित्तशुद्धी-साठीं कर्माचरण सांगितलें आहे. चित्तशुद्धि होऊन स्वात्मसुखांत जीव रंगला व देहभावातीत होऊन चिंतनकीर्तनसुखांत तन्मय झाला यामुळें किंवा देहवैकल्यामुळें सत्कर्म राहिलें तर त्यांत कांहीं दोष नाहीं. याला दोन मार्मिक दृष्टान्त दिले आहेत. 'पक्कें फळें पादप तो धरीना। कीं बाळ सर्पादिक आवरीना—' फळ पक्क झाल्यावर अपाप गळून पडतें त्याप्रमाणें कर्म अपाप सुटलें पाहिजे. कोणी बुद्धिपुरःसर कर्माचा त्याग करील तर त्यांत हानी आहे हें दुसऱ्या एका पंचकांत सांगितलें आहे. 'सत्कर्म सांडी तरि भंडिमा हे.' कामक्रोधादि विकार चित्ताला सोडीत नाहींत, नैराश्यता नाहीं, इंद्रियगोल बाह्य विषयांकडे धांव घेत आहेत, दयाक्षमाशांत्यादि देहीं वसत नाहींत, नैष्कर्माचें तत्त्व कळलें नाहीं,

तात्पर्य हा अंतर्मुख झाला नाहीं तोंपर्यंत याला सत्कर्म म्ह० विहितकर्म सोडतांच येत नाहीं. सामान्य जन व साधु सारखे नाहींत. नक्षत्र व सूर्य, वनचर व सिंह, वनतरु व कल्पवृक्ष यांच्यांत सारखेपण कोठून असणार? जन मोहममता यांनीं व्याप्त असतात व साधु जनीं जनार्दन पाहतात. काक व हंस समान मानतां येत नाहींत. 'वर्तोनि देहीं परि तो विदेही;' स्त्रीपुत्रधनादिकांच्या परिवारांत असून साधु असंग असतो. तो भागा आलेलीं कर्मे करितो पण कर्तृत्व आपल्याकडे घेत नाहीं. साम्यवादाच्या लोक गप्पा मारीत असतात पण तो त्यांच्या रहाणींत प्रत्यक्ष दिसत नाहीं. प्रार्थनापर अष्टकें नित्याच्या स्तोत्रांप्रमाणेंच आहेत. 'दयाळा हरी मी करूं काय याला?', 'वद कसें करणें रघुनंदना', 'रामा कसें तारिसि हें कळेना.' इ०

## १५ रंगनाथांची स्फुटकविता

रंगनाथांचीं कांहीं स्फुट प्रकरणें प्रसिद्ध आहेत :—

१ गुरुगीता (ओवीसंख्या १२२)
२ रामजन्म (श्लोक २०६)
३ गजेंद्रमोक्ष (सवाया २४)
४ निजानंदसाधनें (ओवी ४८)
५ सुदामचरित्र (ओवी १३६)
६ शुक-रंभा-संवाद (ओवी ८४)
७ पंचीकरण (ओवी ३५)
८ मिथ्यामायास्वरूप (ओवी १७)
९ एकाखडी (ओवी २१)
१० बद्धमोक्षविवरण (ओवी २५)
११ भानुदासचरित्र
१२ गरुडसत्यभामागर्वहरण (ओवी १००)

ह्या सर्व प्रकरणांतील विषय, त्यांची मांडणी व त्यांची भाषासरणी यांत डोळ्यांत भरण्यासारखे विशेष कांहीं नाहींत, तथापि त्यांची ओझरती तरी ओळख वाचकांस करून देणें अगत्याचें आहे. गुरुगीतेंत तिचा रचनाकाल विकारी संवत्सर हा दिला आहे, हा अर्थात् शके १५८१ होय. ग्रंथ 'नीरातीरीं' समाप्त झाला. आपला आनंदसंप्रदाय असून आपण माध्यंदिनशाखेचे यजुर्वेदी ब्राह्मण आहों असें कवीनें स्वतः सांगितलें आहे. सहजानंद, पूर्णानंद व निजानंद ही आपली गुरुपरंपरेची त्रयीही रंगनाथस्वामींनीं जागोजाग सांगितली आहे :—

'**सहजपूर्ण निजानंद । रंगला जो साधुवृंदें**',
'**सहजीं सहज पूर्णरंग । निजानंद जो निःसंग.**' इ० इ० असो.

रंगनाथ निगडीस रहात. ऐश्वर्यांत रहात. लंगोटबंद शिष्यसमुदाय, 'मनोहर' नांवाचा उमदा घोडा व 'भागाम्मा', 'चन्द्रम्मा' या शिष्यिणी. एक बाई वेडी होऊन यांच्यामागें लागली, बेहोष झाली. मंचकावर वाट पाहत बसली. हे येऊन पलंगावर बसले. यांना पाहतांच तिचें विषयभूत पळालें. शिष्या जाली. रंगनाथांची कांती सतेज होती. वाणींतही तेज आहे.

गुरुगीता मूळ स्कंदपुराणांत शंकरपार्वतीसंवादरूपानें वर्णिली असून समर्थादि अनेक संतकवींनीं तिचा सादर उल्लेख केला आहे. रंगनाथांनीं तिचें सरळ मराठी भाषांतर केलें आहे. 'हे न म्हणावी प्राकृतवाणी । केवळ स्वात्मसुखाची खाणी' आहे. कवि म्हणतो 'नाहीं व्याकरणीं अभिनिवेश । नाहीं संस्कृतीं प्रवेश' पण हें म्हणणें विनयाचें आहे. हें प्रकरण कवीनें तारुण्यांत लिहिलें असावें. ह्यांत अर्थात् गुरुमहिमा गायिला आहे. 'आवडीची जाती वेडी । वाचे आलें तें बडबडी' याप्रमाणें गुरुभक्तीनें हें

लिहिलें आहे. 'रामजन्माचे श्लोक' अधिक स्वतंत्रपणें लिहिले असून बरेच सरस आहेत. थोडा नमुना —

**गुरुगणेशसरस्वति मस्तकीं। सहित साधुसमूह समस्त कीं।**
**नमुनि जोडुनियां द्वयहस्तकीं। कथिन रामकथा हृदयस्थ कीं॥**

\+ \+ \+ \+

**शृंगि म्हणे 'मज चाळविलें गगनींहुनि येउनियां वनितांनीं**
**लाघव लावुनि संगित गाउनि रूपहि दावुनि लागति कानीं!।**
**'चाल सवेग' खुणाविति! बोलति मानस मोहिति पूर्ण निदानीं**
**लग्नमिसें भ्रम मोहपिसें न सुटेचि असें सुचिलें सकलांनीं॥**

'सवाई' छंदांतला 'गजेंद्रमोक्ष' सरळ व गोड आहे. 'सुदामचरित्र' कनिष्ठ प्रतीचें आहे, सुदामाच्या दारिद्र्याचें व शरीराचे केलेलें वर्णन हीन व जुगुप्सोत्पादक आहे. हें व इतर कांहीं सामान्य प्रतीचीं आख्यानें रंगनाथांनीं आपल्या पूर्ववयांत रचिलीं असावीं. मराठी भाषेंत सुदामकथा अनेकांनीं गायिली आहे पण साकीवृत्तांत गायिलेल्या मोरोपंतांच्या सुदामकथेची सर दुसऱ्या कोणत्याही कवीच्या सदर कथेस येत नाहीं. ती पंतांच्या सुसंस्कृत मनाची साक्ष देणारी आहे. 'पंचीकरणां'त नेहमींची देहचतुष्टयाची मांडणी दिली आहे. 'शुकरंभासंवादां'त वैराग्यमेरु शुक व 'कलाकौशल्य गीत नृत्य' यांत प्रवीण अशी नटवी रंभा यांचा संवाद आहे. वैराग्यानें येथें शृंगारावर मात केली आहे. पाषाणाला पाणी घाळून अंकुर येतील अशी अपेक्षा करणाऱ्या मूढाप्रमाणे रंभेचे शुकाला मोहनी घालण्याचे सारे श्रम वायां गेले. असो. 'मी एक भक्त। मी एक मुक्त' असा माझा ठायीं जो स्फुंद होता तो संतसंगतींत विराला व अवघी सृष्टि चिन्मय झाली असें गरुड व सत्यभामा यांचा गर्व मारुतिरायानें हरण केला अशा कथाप्रसंगानें कवीनें म्हटलें आहे.

## १६ केशवस्वामी

**जिताचि सुटलों पाहीं । उपाधि उरली नाहीं ।**
**निश्चल आपुल्या ठायीं । केशव कांहींबाहीं ॥**

केशवस्वामींविषयीं कांहीं विशेष माहिती मिळत नाहीं. हे भागानगर (दक्षिण हैद्राबाद) येथें राहत असून तेथें मुसानदीच्या तीरीं यांची उघडी समाधि आहे. तेथें वृंदावन, पूजाअर्चा, वगैरेंची कांहींच व्यवस्था नाहीं. तेथून जवळच एक जुनाट घर आहे तेथें हे राहत असत असें जवळपासचे लोक सांगतात. यांनीं काशीराजमहाराजांचा उपदेश घेतला होता. हे गृहस्थाश्रमी असून मुलाबाळांचा परिवार यांस बराच होता. तानाशा नांवाच्या एका श्रीमान् जमीनदाराचे हे कारभारी होते. यांच्या शिष्यांपैकीं शिवराम, संतराज व गुंडा यांनीं कांहीं कविता लिहिली आहे. केशवस्वामी संसारांत असून विरक्त, निस्पृह व मोठे अंतर्निष्ठ असे भगवद्भक्त होते. यांनीं 'एकादशीचरित्र' म्हणून एक ओवीबद्ध ग्रंथ लिहिला आहे पण यांची प्रसिद्धि यांच्या अत्यंत प्रेमळ व सरस पदांवरून आहे. केशवस्वामींच्या दोन आख्यायिका आमच्या ऐकण्यांत आहेत त्या येथें नमूद करून ठेवतों. (१) एकदां सर्व समर्थपंचायतनांतील पांचही संत कृष्णातीरीं आले असतां कृष्णेस महापूर आल्याचें त्यांस आढळून आलें. आपापल्या सिद्धिसामर्थ्यानें प्रत्येकानें परतीरीं जावें असा संकेत ठरला. समर्थांनीं मारुतिस्तवन केलें तेव्हां मारुतिरायानें त्यांस परतीरीं अलग नेऊन ठेवलें. रंगोबा, जयराम, आनंदमूर्ति हेही आपापल्या उपास्य देवतेच्या आधारानें व योगबलानें परतीरीं गेले. केशवस्वामींनीं असें कांहीं न करितां सरळ सांगडवाल्यास हाक मारली व त्यास एक आणा देऊन ते परतीरास गेले. इतर मंडळी विनोदानें हंसली. तेव्हां केशवस्वामींनीं उत्तर केलें, 'क्षुल्लक' कामासाठीं आपल्या देवतेस असा त्रास देणें मला योग्य वाटत नाहीं. प्रपंचाचीं लहानमोठीं सर्वच दुःखें व संकटें आपल्या कर्माचा विपाक असल्यामुळें आपणच

सोसावीत, देवावर त्यांचा भार घालूं नये. बरें, तुम्ही योगशक्ति खर्चून नदीपार आलां असलांत तर त्या योगशक्तीची किंमत मी एक आण्यापेक्षां अधिक समजत नाहीं! भक्ताचें मुख्य लक्षण स्वात्मानुभव व निष्कामभक्ति होय. केशवस्वामींच्या म्हणण्यास सर्वांनीं पुष्टि दिली, व आनंद केला. (२) हैद्राबादेस मी गेलों असतांना यांची एक गमतीची गोष्ट ऐकावयास मिळाली. एकदां समर्थ केशवस्वामींच्या भेटीस भागानगरास आले. त्यांची ती पहिलीच भेट होती. परस्परांस ते कीर्तिरूपानें श्रुत होते. समर्थांच्या बरोबर शेंपन्नास शिष्य होते. केशवस्वामींचाही शिष्यसंप्रदाय बराच होता. ते 'अंतस्त्यागी व बहिःसंगी' होते. उभयतां गाढालिंगनपूर्वक एकमेकांस भेटले. केशवस्वामी समर्थांस विनोदानें म्हणाले, 'अरे! साधु झालास आणि रांडेला भिऊन पळालास! मायेला—संसाराला भ्यालास यांत काय मिळवलेंस!' संसारांत राहून असंग राहतां आलें पाहिजे हा त्यांचा भाव होता.

केशवस्वामींनीं शके १६०८ मध्यें समाधि घेतली. कोणी हा शक १६०४ देतात.

## १७ केशवस्वामींचीं पदें

केशवस्वामींचीं पांचसहाशें पदें छापलीं आहेत पण त्यांच्या पदांचीं आणखी कांहीं बाडें हैद्राबादेस एका गृहस्थाजवळ आहेत. त्यांचीं ३० पदें हिंदी भाषेत रचलेलीं आहेत. त्यांचीं बरींच पदें त्यांच्या वेळेपासूनच महाराष्ट्रांत लोकप्रिय होऊन राहिलीं आहेत. उदाहरणार्थ—

**(१) आतां भय नाहीं भय नाहीं। स्वरूपीं जडलों पाहीं ॥ ध्रु० ॥**
**(२) जालें रे सुख जालें रे। अद्वयवैभव आलें रे ॥ ध्रु० ॥**
**(३) धांव विभो करुणाकर माधव। देव दयानिधे देवकिनंदन॥ध्रु०॥**
**(४) घडि घडि घडि चरण तुझे आठवती रामा ॥ ध्रु० ॥**
**(५) मन हें पिसाळलें पिसाळलें। हरिपदिं लंपट झालें ॥ ध्रु० ॥**

(६) तोंवरि निजसुख नाहीं रे । ऐसें कळलें पाहीं रे ॥ ध्रु० ॥
संतसमागम जोडेना । संशयमंडप मोडेना ॥ १ ॥
गुणमय रजनी नासेना । बोधतमारि प्रकाशेना ॥ २ ॥
केशवस्वामी भेटेना । सबाह्यांतरीं दाटेना ॥ ३ ॥

(७) आजि देखियला देखियला । आनंदपुतळा पांडुरंग वो ॥ ध्रु०॥
भक्तिभीमातिरीं शांतिपंढरपुरीं प्रेमविटेवरी विठ्ठल उभा ॥ १ ॥

(८) केला राम धणी राम धणी । अघटित ज्याची करणी ॥ ध्रु० ॥
रामीं रतली वाणी। आतां सुखासि नाहीं वाणी ॥ केला० ॥१॥

(९) संतसमागम कराचिना । शांति दया मनिं धराचि ना ।
चिन्मय राघव वराचिना । झडकरि कां हो! तराचिना ॥ १ ॥
संतसमागम काशी रे । क्षणभरि वस्तिसि जाशी रे ।
नासति पातकराशी रे । पावसि परमपदासी रे ॥ २ ॥
गुरुचरणीं मन ठेवुनियां । भजनरसायन सेवुनियां ।
चिन्मय लेणें लेवुनियां । राहें तन्मय होवुनियां ॥ ३ ॥

केशवस्वामींची वाणी अगदीं सरळ, सुबोध व प्रासादिक आहे. यांचा शिष्यसंप्रदाय रंगारी लोकांत विशेष होता. त्यांचें एक पद—

आम्ही रंगारे रंगारे । रामनामीं रंगलों बा रे ॥ ध्रु० ॥
रामरंगें रंगा आलों । आम्ही रंगारे पैं जालों ॥ १ ॥
म्हणे केशव मी रंगारा । रंगविला जन सारा ॥ २ ॥

केशवस्वामींचीं कांहीं गुरुकिल्लीचीं पदें आहेत त्यांतलें एक येथें देतों—

व्याघ्राचे वाडां एक मिस्किन गाय ते ढवळ्या बैलाची माय रे ।
दांताविणें तिणें वाघासि गिळिलें तिचा पाडा तिस खाय रे ॥
सूर्याचे गांवीं गडद पडलें आंधळ्यानें लाविल्या वाती रे ।
काजळ डोळां धुउनि सांडितां नुरेचि दिवस राती रे ॥
मायेचा गोहो गाभण जाला तो बायलेस आपण व्याला रे ।
गुरुकृपे केशवीं नवलावो पाहतां चांदण्यानें डोहो गिळिला रे ॥

## १८ कृतकृत्यता

परमार्थ हा सुखासनाचा मार्ग आहे, तो स्वयमेव सुखरूप आहे. मी मोठा वेदान्ती आहें, परमार्थी आहें, भक्त आहें, असें स्वतःला म्हणवीत असून जर तो रडका, कुंथ्या व दुःखी असेल तर त्यापाशीं परमार्थाचा लवलेश नाहीं असें खुशाल समजावें! साधूंच्या बाह्य लक्षणांत भेद असेल, पण साधु हा अंतर्यामीं सुखरूप—आनंदरूपच असला पाहिजे व असतोही. 'रसो वै सः' म्ह० परमात्मा रसरूप—आनंदरूप आहे व मनुष्य जसजसा त्याच्या जवळ जातो तसतसा तोही सुखरूपच होतो. निरुपाधिक आनंद हें परमार्थ पचल्याचें मुख्य लक्षण आहे. केशवस्वामी हे खरे अंतर्निष्ठ साधु असल्यामुळें सुखरूप होते. पोट भरल्यावर जसे ढेंकर येतात, तसे देवाची भेट झाल्यावर स्वानंदाचे उद्गार सहज बाहेर येतात. खोटे ढेंकर व खरे ढेंकर यांतलें तारतम्य जगाला कळतें! केशवस्वामींचे स्वानंदोद्गार खऱ्या आत्मतृप्तीचे आहेत.

**म्हणवुनि सुख झालें सुख झालें ॥ ध्रु० ॥**
**विवेक जागा केला। म्हणवुनि सुख झालें सुख झालें ॥ १ ॥**

ह्या सुंदर पदांत आणखी काय काय झालें तें सांगतात. 'संशय अवघा गेला,' 'हृदयीं धरिलें रामा,' 'आनंदडोहीं पडलों । स्वयं-प्रकाशें घडलों । अनुभवतरुवरि चढलों—' म्हणवुनि सुख झालें—सुख झालें! दुसऱ्या एका पदांत—'मजला हरि कळला हरि कळला' कशावरून म्हणतां?—'उपाधि अवघा गळला!' तिसऱ्या एका पदांत—'जेवितां तृप्ति झाली। सुखसमाधि लागली!' प्रेमाच्या ताटांत प्रीतीची शाक, वैराग्याचा भात, ज्ञानाची पोळी, विज्ञानाची खीर, दयेची साखर, निष्ठेचा गुळ, मुक्तीच्या कोशिंबिरी,—असा परमान्नभोजनाचा थाट आहे! या जेवण्यानें—

**आनंद थोर पाहीं स्वस्वरूपीं लाधला।**
**गुरुकृपें केशवराज संसारा आंचवला ॥ ५ ॥**

हा आनंद--हें माझें निजधन मला सत्संगांत मिळालें---

**संतचरणीं ठेवितां मन वो । स्वानंदाचें लाधलें धन वो !॥**
**आत्मलाभें कोंदलें जन वो । आतां मज न दिसे न्यून वो ! ॥**

आणखी कांहीं सुंदर पदें देतों---

**अमृताची वृष्टि कैसी झाली मजवरी ।**
**चिन्मयसागर राम ल्यालों अंगभरी ॥ ध्रु० ॥**
**सोनियाचा दिवस आजि उगवला माय ।**
**निजभाग्यें देखियले कान्हयाचे पाय ॥ १ ॥**

* * *

**स्वर्गसुख प्राप्त झालें चित्त बहु धालें ।**
**भेटला भगवंत साम्राज्य हाता आलें ॥**
**सर्वकाळ क्रीडा करी नित्य पदावरी ।**
**केशव म्हणे तळीं वरी एक झाला हरी ॥**

* * *

**साफल्य जन्म जालें । नाम वाचेसि आलें ।**
**स्वरूप लक्षितांचि । भवदुःख हें गेलें ॥ ध्रु० ॥**
**सद्गुरुनाथ देवा । तुझी पावली सेवा ।**
**माझाचि मजमाजी । मज लाधला ठेवा ॥ १ ॥**
**देहींच देहभावो । जाला निःशेष वावो ।**
**स्वसुख भोगितांचि । नाहीं मीपणा ठावो ॥ २ ॥**
**मुळींच द्वैत नाहीं । ऐसें बिंबलें पाहीं ।**
**केशवीं प्राप्ति जाली । पूर्ण तुझिया पायीं ॥ ३ ॥**

* * *

**माझें स्वरूप सुखरूप आहे । मजमाजि रिघोनि पाहें ॥ १ ॥**
**मी अखिल सुखाचा सिंधु । परिपूर्ण परमानंदु ॥ २ ॥**
**म्हणे केशव माझ्या ठायीं । मी-तूं-पणाचा बुद्बुद नाहीं ॥ ३ ॥**

* * *

**काळ देहासी आला खावों । आम्ही आनंदें नाचों गावों ॥ १ ॥**
**काळें गिळिला आमुचा देहो । आम्ही काळचि बुडविला पाहो ॥ २॥**
**म्हणे केशव आमुच्या ठायीं । देहासकट काळचि नाहीं ॥ ३ ॥**

देह व देहाच्यामागें लागलेला काळ हे दोन्ही आमच्या स्वरूपीं नाहींत. म्हणून आमच्या ठायीं निरंतर 'सुखसिंधुच्या उसळती लाटा' हा थाट आहे ! आम्ही सुखी होऊन सुख (आत्मसुख) सेवीत आहों त्याची 'लालुची जात नाहीं.' मुळीं बंधनच नाहीं तर मोक्ष कुठचा ? दोन्ही कल्पना आहेत. कनकाची कांति, दीपाची दीप्ति, कापराचा परिमळ घ्यावा त्याप्रमाणें आम्ही प्रपंचांतून आत्मरस तेवढा घेतों; म्हणून आम्ही संसारांत असूनही स्वसुखानें अखंड तृप्त आहोंत.

**जेथें जावें तेथें देव सांगातें । ऐसें केलें येणें श्रीगुरुनाथें ॥ १ ॥**
**देवासि सांडुनि जावें मी दुरी । तंव देव रिघाला मजभीतरी ॥२॥**
**गुरुकृपें केशवीं घेतली पाठी । आपुला करूनि ठेला संवसाटी ॥३॥**

## १९ गुरुभक्ति

केशवस्वामींचा गुरुभक्तीवर मुख्य भर आहे. 'गुरुच्या एक्या बोलें । मीपण माझें गेलें ॥' हा त्यांचा अनुभव होता. गुरुसंगतींत 'श्रवणें मननें अद्वयभजनें हरिली माया रे ।'

**निश्चल झालें मन माझें । केलि दया गुरुराजें ॥ ध्रु० ॥**
**विचारदीपक लावुनियां । राम हिरा करिं घेउनियां ॥ निश्चल० ॥**

श्रीगुरूनें 'स्वराज्य देऊन' सिद्ध आसनीं बसविलें व 'जेथें जावें तेथें देव सांगातें' असें केलें. आत्मानंदाची निरंतर लूट मिळत असल्यामुळें 'वादक व वाद यांचा आतां उबग आला' आहे. 'सद्गुरूचे पायीं आम्हां नित्य दिवाळी' झाली आहे.

**त्यागीं भोगीं देव सांपडला पूर्ण ।**
**सफल झाला ज्ञानयोग ॥**
**बाहिर अंतरिं सर्व निरंतरीं ।**
**देवचि दाटला पाहीं गे बाई ॥**

केशवस्वामींचीं दोन गुरुविषयक बहारीचीं पदें पुढें देतों—

(१) **तो मज आठवतो गुरुराजा। प्राणविसांवा माझा ॥ तो० ॥ध्रु०॥**
**श्रवणीं पाजुनियां अमृत। मस्तकीं ठेवुनि हस्त ॥ तो० ॥ १ ॥**
**विवेकसिंधूचीं चिद्रत्नें। लेवविलीं मज यत्नें ॥ तो० ॥ २ ॥**
**अखंड देउनियां स्मरणासी। द्वैतभयातें नाशी ॥ तो० ॥ ३ ॥**
**अक्षयप्राप्तीचा सुखदाता। केशव म्हणे आतां ॥ तो० ॥ ४ ॥**

(२) **आनंद केला बा गुरुराया। हरली सकलहि माया ॥ ध्रु० ॥**
**माया ममता मी मुळिं नेणें। सर्वहि सद्गुरु जाणे ॥ १ ॥**
**त्रिपुटी ग्रासुनियां सुख देशी। प्राणविसांवा होसी ॥ २ ॥**
**केशवस्वामीच्या दातारा। स्वरूपीं दिधला थारा ॥ ३ ॥**

एका मौजेच्या पदांत वीररसाच्या भाषेंत कवीनें गुरुवर्णन केलें आहे. सायुज्यतुरंगावर चढून प्रेमाची झील दिलेला बोधाचा भाला घेऊन भक्तीची कट्यार व नामाची फिरंग घेऊन स्वानंदानें ब्रह्मांड गर्जवीत, काळाचा जबडा फोडीत व भवबंधबेड्या खडाखड तोडीत—

**आला रे आला गुरुराज महाराज माझा आला ॥ ध्रु० ॥**

गुरुकृपेनें आतां—

**जीव शिव दोन्ही भाव निजपदीं जाले वाव।**
**मीपणावेगळा देव सहजचि निःसंदेह ॥**
**जाणणें नसे नेणणें नसे, असणें नसणें नसे।**
**केशव म्हणे पूर्ण एक जाणणें मात्र असे ॥**

**संतसमागम काशी रे। क्षणभरि वस्तिसि जाशी रे।**
**नासति पातकराशी रे। पावसि परमपदासी रे ॥ ध्रु० ॥**
**गुरुचरणीं मन ठेवुनियां। भजनरसायन सेवुनियां।**
**चिन्मय लेणें लेवुनियां। राहें तन्मय होवुनियां ॥ १ ॥**
**गुरुचरणींचा वासी रे। समाधि त्याची दासी रे।**
**पदोपदीं त्या काशी रे। बोले केशव जोशी रे ॥ २ ॥**

केशवस्वामींची गुरुभक्ति अवर्णनीय होती. एका पदांत ते म्हणतात —

**गुरुभक्त नांदति जिये देशीं हो ।**
**तो मी देश ध्याईन अहर्निशीं हो ॥ २ ॥**

**गुरुभक्तीचा कुळधर्म ज्याचे घरीं हो ।**
**त्याच्या मूर्ती पूजिन मी अंतरीं हो ॥ ३ ॥**

**गुरुवेगळें दैवत ज्यासी नाहीं हो ।**
**म्हणे केशव लोळण त्याचे पाईं हो ॥ ४ ॥**

खरे संत भेटणें दुर्लभ आहे पण ते पूर्वपुण्यानें भेटलेच तर कृतार्थ होण्यास उशीर काय? केशवस्वामी एका अभंगांत म्हणतात —

**मंत्र यंत्र दीक्षा सांगती लयलक्ष ।**
**परी राम तो प्रत्यक्ष न करी कोण्ही ॥**
**सर्वकर्मी राम भेटविती मातें ।**
**जीवेंभावें त्यांतें वोवाळीन ॥**

राम भेटविणारे संतसद्गुरु केशवस्वामींस भेटले. ते दुसऱ्या कांहीं अभंगांत म्हणतात —

**संतसंग भला श्रीराम देखिला । आनंदु पिकला त्रिभुवनीं ॥ १ ॥**
**सुखाचा सुकाळु डोळियासी जाला। श्रीराम देखिला आजि माये॥ध्रु०॥**
**देखिला श्रीराम संशयो तुटला । पांगही फिटला संसाराचा ॥ २ ॥**
**संसाराचें बिरडें क्षणांत फेडिलें । महावाक्यबोलें श्रीगुरूच्या ॥ ३ ॥**
**केशव म्हणे आम्हा अनुभवप्रचीती । जागृतीं सुषुप्तीं राम दिसे ॥५॥**
**सद्गुरूचें नाम ते माझी विश्रांती । म्हणें अहोरात्रीं राम राम ॥ १ ॥**
**रामनाम वाचे अखंड उच्चारा । करा त्या हाकारा सद्गुरूसी ॥ २ ॥**
**श्रीरामा सद्गुरु तूं माझा बापुला । तुझेनि आपुला विश्वजनु ॥ ३ ॥**
**केशव म्हणे माझे पुरवीं मनोरथ । भेटी दिल्ही त्वरित याचि देहीं ॥७॥**

## २० एक सुंदर रूपक

**श्रवणाचें चाडें हें धरिलें । गुरुमुखें निजबीज पेरिलें ॥ ध्रु० ॥**
**निजधैर्य–नांगर धरुनी । भेद्–खुंट काढिले खाणुनी ।**
**भक्तिज्ञानवैराग्य तिफणी । अतिशुद्ध केली मेदिनी ॥ १ ॥ श्रव० ॥**
**स्वानंदाचा वर्षला निजघन । परिपूर्ण पिकलें चैतन्य ।**
**तेथें सत्त्व सोकारा राखण । कर्मपक्षी हाकितो आपण ॥ २ ॥ श्रव० ॥**
**निजबोधें पिकलें शेत वो । स्वानंदाच्या घुमऱ्या येत वो ।**
**कैवल्याची राशी हे होत हो । गुरुकृपें केशव घेत हो ॥ ३ ॥ श्रव० ॥**

शेतीच्या भाषेंत हें एक सुंदर रूपक केलें आहे. चाडें, बीज पेरणें, नांगर धरणें, खुंट खाणून काढणें, तिफणी, जमीन शुद्ध करणें, पक्षी हांकणें, सोकारा, राखण, शेत पिकणें, घुमऱ्या येणें, धान्याची राशी ही सारी भाषा शेतीची माहिती असलेल्या मनुष्याच्या चांगली ओळखीची आहे !

---

१ ज्ञानेश्वरींत ( अ० ६–४९२ ) पुढील ओवी आहे —

**ज्ञानदेव म्हणे मी चाडें । सद्गुरूंनीं केलें कोडें ।**
**माथां हात ठेविला तें फुडें । बीजचि वाइलें ॥**

चाडें म्ह० बीं पेरण्याकरितां पाथरीवर जें लांकडी पात्र असतें तें. ज्ञानराज येथें म्हणतात कीं, श्रीगुरूंनीं कौतुकानें ( कोडें ) माझी चाड्याच्या जागीं योजना करून माझ्या मस्तकीं आपला पद्महस्त ठेविला म्ह० आत्मज्ञानाचें बीजच चाड्यांत घातलें ( वाइलें ). केशवस्वामींनीं वरील पदांत ह्याचेंच पूर्णरूपक केलें आहे.

२ **तिफणी**–तीन दांत्यांची जणूं फणीच. हिनेंच बीज पेरलें जातें.

३ **सोकारा**–रक्षण करणारा, पांखरें उडवणारा, राखणारा.

४ **घुमऱ्या**–घुमरी म्ह० दाण्यांनीं कणसें भरून येणें, उत्कर्ष, भरभर. पीक आलिया घुमरी । ते शेतीं कोण नांगर धरी । गजांतलक्ष्मी आलिया घरीं । भीक दारोदारीं कोण मागे ॥

( एक० भाग०, ११२–५९४ )

## २१ अनासक्तता

केशवस्वामीसारख्या आत्मनिष्ठ सत्पुरुषाला भवबाधा कोठची असणार? प्रपंचांत असून असंगपणें राहणारे महात्मे मुक्तीचा सुखसोहळा कसे भोगतात हें आपण नाथांच्या चरित्रांत पाहिलेंच आहे. प्रपंच वेगळेपणानें त्यांना प्रतीतच होत नाहीं. केशवस्वामी म्हणतात –

**प्रपंच अवघा सुखरूप। सुखरूप ( म्हणजे ) आत्मस्वरूप ॥**
**स्वरूपीं रमतां भव नाहीं। केशवि अनुभव हा पाहीं ॥**

भोगांत त्याग व त्यागांत भोग अशी त्यांची स्थिति असते.

**सर्वहि भोग भोगुनि चांग। भोगींच त्यासी त्याग रे।**
**त्याग-भोगासी अलिप्त आपण। ऐसा तयांचा योग रे ॥**
**देहकर्मे करिती परि न लिंपती। अतर्क्य तयांची स्थिती रे।....**

संत उपाधींत असून अलिप्त असतात, अभेदभावाचें वैभव भोगीत असतात –

**कोणा भीत नाहीं भीत नाहीं। भेदचि गिळिला पाहीं ॥ ध्रु० ॥**
**उघड समाधी भोगी। कैसा निर्भय मोठा योगी ॥ कोणा० ॥ १ ॥**

केशवस्वामी सांगतात –

**जितुकें भासे तितुकें ब्रह्म। हेंचि परमार्थाचें वर्म ॥**
**केशव म्हणे प्रपंच पूर्ण। भासे आत्माचि संपूर्ण ॥**

## २२ लोकस्थिति

'तंववरि सुख नाहीं सुख नाहीं'–कोठवरी? सत्संगीं श्रवण नाहीं, हरीचें स्मरण करीत नाहीं, देहबुद्धि घेऊन नाचत आहे, असन्मानानें तळमळतो व भलेभले म्हणतां खुलतो, अंतरीं मीपणाची वळवळ व विषयलालसेची खळबळ आहे, तात्पर्य देवाला अगदीं विसरला आहे– 'तंववरि सुख नाहीं सुख नाहीं!' दुसऱ्या एका पदांत–

**त्याला सुख कैंचें सुख कैंचें ? । विषयीं मन हें ज्याचें ॥ ध्रु० ॥**
**पोटासाठीं वय हें दवडी । न धरी सत्संगीं आवडी ॥ त्याला० ॥१॥**
**मूषका टपत जैसा बोका । निशिदिनिं चिंतित तैसा पैका ॥ २ ॥**

असे केवळ विषयासक्त जे असतील 'त्यांचें तोंड नका पाहूं । त्यांचे जवळी नका राहूं,' कारण त्यांचे संगतीं केवळ बायका व पैका यांच्याच गोष्टी ऐकायला यायच्या !

**मायेनें कैसें भुरळ घातलें । कांहीं हित नेणती आपुलें ॥ ध्रु० ॥**
**धनवंतापुढें पैं धांवती । पोटालागीं नीचांसि वंदिती ।**
**परी आत्मसुटका नेणती । वायांचि भवसागरीं बुडती ॥ १ ॥**

प्रपंचांत येऊन काय साधिलें? विषयीं वय फुकट वेंचिलें—असा अनुताप तुम्हांला नाहीं कां होत? 'नाहीं आपआपणा वोळखिलें' मग नरदेहाला येऊन उपयोग काय?

'निर्मळ होउनि वागे। एकपणेविण जागे' हें जन्माला येऊन न साधलें तर मनुष्यदेह व्यर्थच गमावला नाहीं काय?

'देव तयाप्रति दूरी ठेला'—दांभिक, दुराचारी व अहंकारी लोकांपासून देव फार दूर आहे. हे टिळे, माळा, टोपी व वैष्णवशैवांचा दीक्षावेष घेऊन भजनाचा उत्कर्ष वाढवितात पण श्रद्धापूर्वक 'सर्वभूतीं भजन नाहीं', 'देव तयाप्रति दूरी ठेला !' देवपूजेचा बडिवार, नामसंकीर्तन, गीत, नृत्य, हास्य—सर्व कांहीं आहे पण 'भक्तीविण हरि दूरी ठेला.' बाह्य संकीर्तन पण मनीं द्वेषाद्वेष त्याला देव दूर आहे. देव सर्वांतर्यामी, व्यापक, मनोबुद्धिचालक खरा, पण भेदभाव पहाणाराला देवाचा अनुभव यावयाचा नाहीं. निर्मळ व सप्रेम हृदयांत देव प्रगट आहे.

**देहबुद्धीचें पडळ फेडा । देहींच देव पाहें उघडा ॥ १ ॥**
**देव पहा तुम्ही देव पहा । देव पाहोनि उगे रहा ॥ २ ॥**

## २३ लोकोद्धाराचें स्वरूप

**मनुष्य जन्मा तरिच यावें रे ॥**
**आपण तरावें जग उद्धरावें । धन्य धन्य ऐसें म्हणवावें रे ॥ध्रु०॥**
**सर्वभूतीं भावें अनन्य भजावें । गोपाळाचे स्वरूपीं रमावें ।**
**कामासी गाळावें क्रोधा नातळावें । देहींच विदेही सुख घ्यावें रे ॥१॥**
**जाणिवेसी बोळवावें व्यापकासी आठवावें । आनंदें ब्रह्मांड भरावें ।**
**नाना मतांतरीं भरीं न भरावें । निजाचें घर ओळखावें रे ॥ २ ॥**

केशवस्वामी सांगतात कीं, मी आपल्या मनाला असा उपदेश करीत होतों; भाग्यानें मला उपरति झाली, संतसद्गुरूला शरण गेलों व आतां ‘तरलों तरलों त्याच्या नांवें रे’ म्हणून लोकांना माझा हाच उपदेश आहे कीं,

**जागा रे तुम्हि जागा रे । निजात्मभुवनीं वागा रे ॥ ध्रु० ॥**
**साधुसि हृद्गत सांगा रे । निर्मळ चिद्घन मागा रे ॥ जागा० ॥**

योगी, ज्ञानी, भक्त हे एका अर्थाचेच शब्द आहेत. **‘निजबोधानें अखंड समाधि’ भोगणें व तें सुख जनांस देऊन लोकोद्धार करणें** हें केशवस्वामींच्या उपदेशाचें सार आहे. परमार्थांतील साधनांनीं हेंच साधावयाचें आहे. वेदशास्त्रीं निपुण, पुराणीं संपन्न, शब्दज्ञानानें ज्ञाते, छंदबंध जाणते, आगमीं व नाटकीं कुशल, संगीतीं निष्णात असे असले तरी आत्मबोधाचा विचार वेगळाच आहे ! जपतपानुष्ठानें हींही साधनें आहेत. पूर्ण निजबोधावांचून कृतार्थता नाहीं व तो संतसद्गुरुकृपेनेंच होतो म्हणून सत्संग धरा व आपण तरून इतरांस तारा. संसारांत वर्ततात, आत्मस्वरूपानें जगाकडे पाहतात, जनांचा उद्धार लीलेनें करितात असे संत लोकांनाही आत्मरूप वाटतात. **‘प्रेमरसें जन भरिजे रे’** असें एक गोड तत्त्व केशवस्वामींनीं सांगितलें आहे. हरिप्रेम—आत्मप्रेम—या उदात्त प्रेमानें संत भरून लोकांसाठीं उरतात.

**तारावा जन तारावा । शोकभयनिधी वारावा ॥**
**संशयगिरिवर उडवावा । कामसमुच्चय बुडवावा ॥**

जगाला निःसंदेह आत्मज्ञान देऊन संत तारतात, वासनाजालांतून सोडवितात. दुःखशोकभयापासून जनांना सोडविण्याचें कार्य एक संतच करूं शकतात. केशवस्वामी सांगतात कीं, आधीं संतगुरुमुखानें 'आपणा वोळखावें' व 'हरिभक्तीचें सुख वाढवावें । स्वयें तरोनि आणिकां तारावें.' आपुल्यापुरतें आपण कृतार्थ होऊन संत बसत नाहींत, तर आपण जेवून लोकांना आत्मरसाचें भोजन घालतात.

**रामनामाची गुढी उभारावी । शांति क्षमा दया वाढवावी ।**
**भक्ति विरक्ति जगीं रूढवावी । स्वानुभवाची पोथी घालावी ॥**

व याप्रमाणें 'सर्वांभूतीं सद्भावें भजावें.'

**हरिभजन करा हरिभजन करा । सर्वांभूतीं भगवद्भाव धरा ॥**

केशवस्वामींनीं एके ठिकाणीं एक सुंदर कल्पना व्यक्त केली आहे. 'भक्ताच्या पोटीं देव जन्मला' व नंतर 'देवाचिये पोटीं जग जालें उदंड,' अर्थात् आधीं भक्त, मग देव आणि मग जग. देवानें हें विश्व निर्माण केलें आहे, अर्थात् तो विश्वाचा बाप आहे व भक्त देवाचा निर्माणकर्ता आहे म्हणून भक्त देवाचा बाप झाला! भक्त–देव–जग असा क्रम, याप्रमाणें 'जग होय नातोंड हरिभक्ताचें !' मुलापेक्षां नातवंडावर अधिक प्रेम असतें, या न्यायानें भक्त देवापेक्षांही जगावर अधिक प्रेम करितात ! ही एक प्रेमाची भाषा आहे. तत्त्वतः देव, भक्त व जग सारे एकरूप आहेत. विश्व नारायणस्वरूप असल्यामुळें उच्चनीचभाव वृथा आहेत. लोकोद्धार किंवा परोपकार हा वस्तुतः आपलाच उद्धार आहे.

**वंद्यावंद्य आतां म्हणावें कोण रे ।**
**विश्व व्यापिलें पूर्ण नारायणें रे ॥**
**कवण देव तेथें कवण भक्त रे ।**
**एक भगवंत नांदे सदोदित रे ॥**

## २४ देव, भक्त व नाम

अद्वयानंदवैभवाचा किंवा ज्ञानोत्तर भक्तीचा जो कित्ता ज्ञानेश्वरमहाराजांनीं जगास घालून दिला तोच सर्व संतांनीं गिरवला आहे, यामुळें सर्वांचे अनुभव व उद्गार एकाच प्रकारचे आहेत. रचनाकौशल्यांत, मांडणींत थोडासा भेद असतो, पण नवीन असें कांहीं नसतें. अनुभव ज्याला त्याला नवीन असला तरी त्याची जाति भिन्न नाहीं. केशवस्वामींच्या पदांत राम, कृष्ण, शिव, भवानी, परब्रह्म सर्व समानप्रेमानें गायिले आहेत. त्यांच्या उद्गारांत अद्वैतभाव आहे, सगुणप्रेम आहे, नाम व संत यांविषयीं प्रेमादर आहे. भक्तीचा मार्ग त्यांनीं लोकांस दाखविला आहे, ती भक्तीही अभेदभावाची आहे. नाममहिमा गातांना अजामेळ, गणिका, गजेंद्र, वाल्मीकि, अंबऋषी हींच उदाहरणें दिलीं आहेत. नामाने कोट्यवधि तरले आहेत म्हणून ‘ म्हणा श्रीरामजयराम । भवसागरतारक नाम. ’

**केशव म्हणे नामचि ध्यावें । नामें चिन्मय रामचि व्हावें ॥**
**हरिनाम गर्जती हरिरंगीं नाचती । हरिप्रेमें डुल्लती पावती सुख ॥**

रामनामीं अखंड रत राहून भक्त कळिकाळाचें तोंड ठेंचतात. ते विश्रांतिधाम पावतात.

**नाम साधुचें जीवन रे । तुटे नामेंचि बंधन रे ॥ १ ॥**
**नामें सुखासि सुख जालें । नामें मीपण निमालें ॥ २ ॥**
**नामें शाश्वतपद जोडे । नाम न म्हणती जन वेडे ॥ ३ ॥**
**म्हणे केशव हरिनाम । घेतां हरिरूपीं विश्राम ॥ ४ ॥**

ज्याचें नांव ध्यायचें त्याच्या रूपाला ओळखले पाहिजे.

**देवा देवा म्हणोन मारिसी हाका । परि तो देव तुज नाहीं ठाउका ॥१॥**
**ज्या देवालागीं धांवसी दुरी । तो देव आहे तुजभीतरीं ॥ २ ॥**
**सबराभरित देव सर्वत्र असे । तो कां तुजलागीं न दिसे ॥ ३ ॥**
**सद्गुरुकृपें केशवीं पाहीं । अह्लेंबाहलें देवो देहीं विदेहीं ॥ ४ ॥**

**भक्ति अभेदयोगें केली । त्यांची देहबुद्धि गेली ॥ ३ ॥**
**भक्ति केशवीं हाता आली । भेटी भगवंताची जाली ॥ ४ ॥**

**भक्तिवांचुनि जें कां ज्ञान । शुद्ध सोलिव तें अज्ञान ॥ १ ॥**
**भक्तिपासुनि भुक्तिमुक्ति । भक्तिपाशीं वोळगे शांति ॥ २ ॥**
**भक्तिपाशीं सर्वहि सिद्धी । भक्तिपाशीं सहजसमाधी ॥ ३ ॥**
**म्हणे केशव भक्ति साधा । मग नाहीं भवदुःखबाधा ॥ ४ ॥**

नामाची गोडी संतसंगांत मिळते व तेथेंच देवाची पुरी ओळख होते.

**संत चित्सुखसागर साचे । पाय त्रैलोक्यतारक त्यांचे ॥**
**संतसंगचि श्रीरंग दावी । चित्त केशवपाईंच लावी ॥**

**काळ संतसंगें कंठूं । प्रेम भगवंताचें लुटूं ॥ १ ॥**
**राम स्वानंदघनरस सेवूं । चित्त रामपदांबुजिं लावूं ॥ २ ॥**
**राम सर्वत्र समदृष्टि पाहों । म्हणे केशव रामचि आहों ॥ ३ ॥**

देवाचें प्रेम हें तर संतांचें मुख्य भांडवल.

**तुझी मूर्ती हृदया आली रे ।**
**सम्यक् गति मजला जाली रे ॥**
**जालें रे सुख जालें रे ।**
**अद्वयवैभव आलें रे ॥**
**केशवस्वामी कळलासी ।**
**वळलासी अति फळलासी ॥**

'तैसा परमात्मा परमात्मा'—कैसा? आकाशवत् व्यापक, कुंभ जळांत बुडवितां त्याच्या आंत बाहेर उदक तसा दृश्यादृश्याच्या आंत बाहेर भरलेला—

**अवघा हरि एक हरि एक । नाहीं दुसरें देख ॥ ध्रु० ॥**
**कनकचि नगासि आलें । तैसें स्वरुपीं जग हें जालें ॥ १ ॥**
**उदकीं तरंग होती । तैसी ब्रह्मीं जग-उत्पत्ती ॥ २ ॥**

हे नेहमींचेच दृष्टान्त आहेत. द्राष्टांताचा अनुभव घेणारे ते संत. जगाच्या व्यवहारदृष्टीनें संत वेडेच असतात. केशवस्वामी एका गमतीच्या पदांत म्हणतात —

**वेडियांच्या गांवा गेलों । आम्ही वेडे होउनि आलों ॥ ध्रु० ॥**
**आतां बोलूं नका कांहीं । आम्हां माणुसपण नाहीं ॥ १ ॥**
**कर्मवसन टाकुनि साचें । जगीं उघडे होउनि नाचे ॥ २ ॥**
**केशव म्हणे जवळी याल । तरि तुम्हीच वेडे व्हाल ॥ ३ ॥**

'भ्रांतिपडदा फेडा माझा राम मजला दावा हो' हें एक बहारीचें पद आहे. यांत भक्ताची विरहावस्था वर्णन केलेली आहे. नाटककादंबऱ्यांतून किंवा काव्यांतून पतिवियोगानंतर जी प्रियकरणीची स्थिति होते तीच हुबेहूब त्याच शब्दकल्पना घेऊन येथें वर्णिली आहे. त्यांत शृंगाररसाची प्रतीति होते. येथें भक्तिरस मूर्त आहे. म्हणजे पतीसतींची व देवाभक्तांची मनोरचना अगदीं एक प्रकारची असते, दोन्ही टोंकें एकत्र मिळतात असें स्पष्ट दिसतें !

**चंदन पोळी, शशि बहु जाळी, दारुण विरहानळ वो ।**
**हरिविण दिशा दिसती उदास, भेटवा गोपाळ वो ! ॥ १ ॥**

**सुमनहार जेविं विखार वेगीं परते काढा वो ।**
**हरिविण रस तो सकळ विरस तो शोभा कैंची जडा वो ॥ २ ॥**

**करमुद्रिका वसनें देखा भूषण करुं मी काय वो ।**
**काढा पैंजण वाजति रुणझुण त्याविण मज न साहे वो ॥ ३ ॥**

**अशन शयन भोजनपान झालें विषप्राय वो ।**
**न घाला वारा होत उबारा हरिविण प्राण जाय वो ॥ ४ ॥**

**हरिविण कळा सकळा विकळा विरस हा शेजार वो ।**
**गुरुसीं शरण रिघतां केशवीं झाला साक्षात्कार वो ॥ ५ ॥**

सर्व रस मूळांत एकरूप आहेत किंवा भक्तीच्या भाषेंत बोलायचें म्हणजे हरि हा सर्वरसात्मक आहे अथवा भक्तिरस हा सर्व रसराज आहे! केशवस्वामी सांगतात—'रामरसामृत घेइं सदा.'

ज्ञानेश्वरांचें ह्याच अर्थाचें 'घनु वाजे घुणघुणा' हें पद लोकप्रिय आहे. त्यांतील पुढील चरण पहा—

**चांद वो चांदणें । चापे वो चंदनु ।**
**देवकीनंदने–। विण नावडे वो ॥ २ ॥**
**चंदनाची चोळी । माझें सर्व अंग पोळी ।**
**कान्हो वनमाळी । वेगीं भेटवा कां ॥ ३ ॥**
**सुमनाची सेज । सीतळ वो निकी ।**
**वो ती आगीसारिखी । वेगीं विझवा कां ॥ ४ ॥**

## २५ दागिन्यांचीं नांवें वगैरे

केशवस्वामींच्या एका पदांत सहज स्त्रीच्या अंगावरील अलंकारांचीं नांवें आलीं आहेत त्यावरून शिवाजीमहाराजांच्या काळीं (शके १५५० ते १६०० सुमार) महाराष्ट्रीय स्त्रिया अगर कन्यका कोणते दागिने वापरीत याची अटकळ बांधतां येते. ही यादी म्हणजे पूर्ण आहे असें नव्हे. केशवस्वामी येथें देवीच्या रूपाचें वर्णन करीत आहेत. 'तिचें वदनकमल पहा डोळां' असा या पदाचा आरंभ आहे. फरा (पिंपळपान), 'स्नेहफूल लाविलें पूर्णभांगीं' म्ह० भांगांतलें फूल, §राखडी, जडित मूद, श्रवणींचें (कानांतलें) तानवडें, कपाळींचा बिजवरा, मुक्तमोतीं म्हणजे नाकांतल्या नथींतलें मोतीं, मोहनमाळ, सरी, मंगळसूत्र, दोन्ही हातांतलीं कंकणें (बांगड्या), कानांतली बाळी. दुसऱ्या एका पदांत 'चुनडीचोळी,

---

§केकत, केवडा व राखडी. हे दागिने मस्तकावर मध्यभागीं एकापुढें एक घालीत. केवडा पिंपळाच्या पानाच्या आकृतीचा पुढें, त्याच्यामागे लांबोडा आम्रपानाकृति केकत व त्याचेमागें वर्तुलाकृति राखडी. १०–२० वर्षांपूर्वी हे दागिने घालीत. आतां हे जाऊन फक्त गुलाबाचें फूल राहिलें आहे!

तन्मयाची वेणी फणी काजळकुंकु' यांचा उल्लेख आहे. हीं अर्थात् 'सौभाग्या'चीं लेणीं आहेत. 'कुंकवाची' उठाठेव करणाऱ्यांनीं याचा विचार करावा ! तुकोबांच्या अभंगांत कुंकु सौभाग्यवतीच लावीत असा स्पष्ट उल्लेख आहे.

'कांडण' यावर एक सुंदर रूपकात्मक अभंग आहे—

**सखिये ! साजणी ! ये बैसों कांडणीं ।**
**कृष्ण चक्रपाणी गाऊं गीतीं ॥ १ ॥**
**देह हें उखळ मन हें मुसळ ।**
**जीवभाव तांदूळ सडूं आतां ॥ २ ॥**
**ज्ञानाज्ञान कोंडा सडूनियां काढूं ।**
**अखंड निवडूं कृष्णरूप ॥ ३ ॥**
**कृष्णसंगें कांडूं संसार सकळ ।**
**कृष्णचि निखळ गीतीं गाऊं ॥ ४ ॥**

केशवस्वामींचे ५५० श्लोक प्रसिद्ध असून तेही वेदान्त, भक्ति इत्यादि विषयांवरच आहेत.

## २६ आनंदमूर्ति व त्यांची असीम गुरुभक्ति

रामदासपंचायतनांतले वयानें सगळ्यांत धाकटे आनंदमूर्ति ब्रह्मनाळकर हे होत. यांचें कवित्व म्हणण्यासारखें नाहीं पण यांनीं इतर चौघांप्रमाणेंच धर्मकार्य मोठे केलें आहे. हे आश्वलायन शाखेचे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. यांचे पूर्वज मूळचे भेडजगांवचे जोशी. यांनीं आगळगांवीं येऊन वस्ती केली व १८ गांवची जोशीपणाची वृत्ति मिळविली. यांचें गोत्र वासिष्ठ व उपनाम साबडे. आनंदमूर्तींचें पहिलें लौकिकनांव अनंतभट हें होतें. यांचा जन्म शके १५५० हा असावा असें अनुमानण्यास आधार आहे. यांचें लग्न बाळपणींच झालें असून वयाच्या १७ व्या वर्षीच त्यांना पितृपद प्राप्त झालें होतें. यांचे गुरु रघुनाथस्वामी हे नाशीकचे राहणारे.

आनंदमूर्तींची गुरुपरंपरा § श्रीशंकराचार्यांपासून दिलेली आढळते —

श्रीआद्यशंकराचार्य
|
( वरील परंपरेंत )
वासुदेवानंद सरस्वति
|
वैकुंठानंद सरस्वति
|
कृष्णानंद सरस्वति
|
रंगनाथ
|
काशीराज
|
रघुनाथ
|
आनंदमूर्ति

आनंदमूर्तींच्या चरित्रकारानें रंगनाथांविषयीं पुढील ओवी दिलेली आहे. 'तच्छात्र श्रीरंगनाथ। गौतमीतटीं जगविख्यात। नाशिकासन्निध चाघरें येथ। वास्तव्य केलें स्वइच्छें.' गौतमी म्ह० गोदावरी. रंगनाथांची शिष्यपरंपरा मोठी होती. हे नाशीककडील रंगनाथ कोण? दुसऱ्या खंडांत रंगनाथ मोगरेकर यांची माहिती दिलेली पहावी. (पृ. ५८८-५९८) त्यांनीं आपल्या चित्सदानंदलहरींत आपली गुरुपरंपरा दिली आहे ती वरील परंपरेशीं अगदीं जुळते. दोन्ही परंपरा पाहतां वरील रंगनाथ मोगरेकर हेच आनंदमूर्तींचे परमेष्ठीगुरु होत हें स्पष्ट ठरतें. रंगनाथांना कृष्णानंदांचा व कदाचित् वैकुंठानंदांचाही साक्षात् परिचय असल्यामुळें त्यांविषयीं त्यांनीं अधिक माहिती दिली आहे.

---

§ परंपरेचा श्लोक—

**वासुदेवाख्य वैकुंठ कृष्णानंद सरस्वती।**
**रंगनाथ काशिराजाय रघुनाथाय नमोनमः॥**

रंगनाथांची माहिती आपण पाहूं. वासुदेवानंद सरस्वती ( यांनाच कोणी सिद्धानंद म्हणत ) यांनीं कांहीं वर्षें कुरुक्षेत्रीं वस्ती केली होती, पण त्यांनीं देह ठेवला गंगासागरसंगमीं. त्यांनीं ' ब्रह्मग्रामोत्तरतीरीं ' परमानंदादिकांस ब्रह्मबोध केला. ' तयाचा शिष्य वैकुंठानंदु. ' त्यांनीं कित्येक वर्षें ' आनंदवनीं ' म्ह० काशीक्षेत्रीं वास केला, व उतारवयांत बदरिकाश्रमींच ते देह ठेवावयास गेले. केदारीं अलकनंदेच्या तीरीं त्यांनीं देह ठेवला. त्यांनीं अनेक शिष्य प्रबोधिले ते ' ब्रह्मानंदसुखें निवाले.' त्यांचे शिष्य कृष्णानंद. रंगनाथांनीं ' ग्रंथाच्या आदिमध्यावसानीं ' साक्षात् परब्रह्ममूर्ति जे कृष्णानंद त्यांचें स्तवन केलें आहे. कृष्णानंदांचा उपदेश रंगनाथांना गोदातीरीं झाला : " धारा नामें महानगरी। गोदावरीच्या दक्षिणतीरीं। षोडशक्रोशाभीतरीं। वर्ते पुरी अतिविशाळ ॥ तद्देशदुर्ग-पश्चिमतीरीं। महाविशाळ गुह्यगिरिदरीं। तेथ अति कृपाकटाक्षें करीं। पद्मकरु शिरीं ठेवियेला ॥ " त्यांच्या कृपेनें, रंगनाथ म्हणतात कीं, देहविदेहीं ब्रह्मसुखभोग मला मिळाला. असो. आनंदमूर्तींची व ही रंगनाथ मोगरेकर यांची गुरुपरंपरा एकच असल्यामुळे हे रंगनाथच आनंदमूर्तींचे परमगुरु होत हें उघड झालें. समर्थपंचायतनांतले व आनंदमूर्तींचे समकालीन रंगनाथस्वामी हे अर्थात् या रंगनाथ मोगरेकरांहून भिन्न होत. ते निजानंदांचे शिष्य व हे कृष्णानंदांचे शिष्य. दोघांनींही योगवासिष्ठावर ग्रंथलेखन केलें असल्यामुळें पुढें नक्कलकारांनीं सळमेसळ केली व दोघे रंगनाथ एकच समजले जाऊं लागले. पण ती चूक आहे. रंगनाथ मोगरेकर हे नाशीक प्रांतींचे व रंगनाथ निगडीकर वाईप्रांतींचे; पहिले गोदातीरवासी व दुसरे कृष्णातीरवासी. दोघांमध्यें शेंपाऊणशें वर्षांचें अंतर आहे. आनंदमूर्तींचे गुरु रघुनाथ, परमगुरु काशीराज व परमेष्टी-गुरु रंगनाथ मोगरेकर हे नाशीकक्षेत्रीं राहिलेले दिसतात. रंगनाथांनीं नाशीकचें वर्णन केलेलें आपण पाहिलेंच आहे. रघुनाथस्वामींची व नंतर

आनंदमूर्तींची गांठभेट समर्थांस झाली होती. दोघेही गुरुशिष्य समर्थसंगतींत कांहीं काळ राहिले होते. गंगेची कावड रामेश्वरास व रामेश्वरची कावड गंगेस नेऊन घालण्याचा क्रम रघुनाथस्वामींनीं अनेक वर्षे चालविला होता. हे समर्थांप्रमाणें हिंडफिरे साधु होते. असे निस्पृह व निःसंग रघुनाथस्वामी होते. आनंदमूर्ति १७ व्या वर्षी त्यांना शरण गेले. हें त्यांच्या पित्यास न आवडून त्यांनीं त्यांना घराबाहेर काढले. गुरुसेवेसाठीं त्यांनीं पित्याचा व घरादाराचाही त्याग केला. हें कौतुकावह आहेच, पण गुरूनेंही शिष्यासाठीं गांवोगांव भिक्षा मागून त्याचें व त्याच्या बायकामुलांचें परिपालन केलें हें अधिक कौतुकावह आहे. आनंदमूर्तींच्या गुरुभक्तिप्रेमरसाचें व त्यांच्या ‘ सबाष्पसकंप पुलकांकित ’ प्रेमलतेचें वर्णन ‘ समर्थप्रतापा ’नें ( समास १७–९ ) केलें आहे.

आनंदमूर्ति वेदान्त जाणणारे होते. त्यांचे वडील तर पट्टीचे वैदिक होते. आनंदमूर्तींच्या भाग्यानें त्यांना वयाच्या १७ व्या वर्षींच सद्गुरु रघुनाथस्वामी यांचें दर्शन झालें व ‘ दर्शनादेव साधवः ’ या तत्त्वाप्रमाणें त्यांचें गुरुदर्शनानेंच समाधान झालें. पुढें जशी संगति घडत गेली तसतसे ते त्यांच्या पायीं रंगून गेले. आनंदमूर्तींच्या चरित्रकारानें लिहिले आहे —

**तत्त्वोपदेश झालियावरी । आत्मस्थिती कळाकुसरी ।**
**निरूपणाची भरोभरी ( बहार ) । अनिर्वाच्य बोलती ॥**

**प्रत्यहीं एकांतामाजीं जाण । योगवासिष्ठसारविवेचन ।**
**पंचरत्नगीतासह व्याख्यान । निरूपण चालविलें ॥**

योगवासिष्ठसार व पंचरत्नगीता हे ग्रंथ रघुनाथस्वामींचे आजेगुरु रंगनाथ मोगरेकर यांचेच होत हें आपण दुसऱ्या खंडांत पाहिलेंच आहे. रंगनाथ मोगरेकरांच्या संप्रदायांतले आनंदमूर्ति होत याचें हेंही एक प्रमाण मिळालें.

रघुनाथस्वामी हे आजन्म ब्रम्हचारी होते. ते विश्वामित्रगोत्री माध्यंदिन होते. नाशिकनजीक वाघरें गांवीं राहात असलेल्या काशीराजमहाराजांचा त्यांनीं अनुग्रह घेतला होता. ते ‘ शाब्दे परेच निष्णात’ होते. ते स्वानुभवी सत्पुरुष होते. त्यांनीं आनंदमूर्तींसही आपणासारिखेंच केलें. वयाच्या १७ व्या वर्षींच आनंदमूर्ति हे बायको सखूबाई व तान्हें बालक यांसह घराबाहेर पडले व रघुनाथस्वामींस अनन्य शरण गेले. रघुनाथस्वामींनीं चार वर्षें भिक्षा मागून शिष्याचें पालन केलें व त्याला ब्रह्मज्ञानोपदेशही केला ! आनंदमूर्ति हे स्वतःसिद्ध सत्पुरुष झाल्यावर त्यांचा शिष्यसमूहही वाढत गेला. शके १५८५ पासून त्यांच्या मठाला जमिनी मिळूं लागल्या. मठाचा व्याप वाढला. नित्य अन्नसंतर्पणें व कथाकीर्तनें चालू झालीं. १५९४ मध्यें विजापूर दरबाराकडून इनामें मिळालीं. मठाजवळ शेंदीडशें गाई झाल्या. जयरामस्वामी, रंगनाथस्वामी, केशवस्वामी, समर्थ इ० सत्पुरुषांची येजा सुरू झाली व महाराष्ट्राच्या सत्पुरुषमालिकेंत आनंदमूर्तींची गणना झाली. त्यांचे अनेक चमत्कार प्रसिद्ध आहेत. शके १५८९ मध्यें रघुनाथस्वामी समाधिस्थ झाले. त्यांचें सांगलीजवळ ब्रह्मनाळ येथें वृंदावन बांधण्यांत आले. आनंदमूर्ति कीर्तनाला समोर उभे राहिले म्हणजे समाधानानें वृंदावन डोलत असे ! हा चमत्कार समक्ष पाहिल्याचें परशुरामपंत प्रतिनिधि यांनीं व समर्थ रामदासस्वामींनींही लिहिलें आहे ! शके १६१८ मध्यें आनंदमूर्तींनीं समाधि घेतली. त्यांनीं सांगलीस देह ठेवला तरी ब्रह्मनाळास त्यांची समाधि गुरूंच्या समाधीशेजारींच बांधण्यांत आली. सातारच्या छत्रपतींकडून तीन गांव मठास इनाम मिळाले व आज ब्रह्मनाळच्या संस्थानचें उत्पन्न १६ हजारांवर आहे. मठांतली उपासना रामाची आहे, तेथें दरसाल रामनवमीचा उत्सव थाटांत होतो. तेथें रघुनाथस्वामींच्या पुण्यतिथीचा उत्सव भाद्रपदाचे पहिले चार दिवस होतो व आनंदमूर्तींचा उत्सव कार्तिक शुद्ध १४।१५ ला होतो.

शके १५९१ मध्यें रघुनाथस्वामींच्या पुण्यतिथ्युत्सवास समर्थ ब्रह्मनाळास आले होते. त्या वेळीं त्यांनीं वृंदावनाचा डोल समक्ष पाहिला. पुढें त्यांनीं आनंदमूर्तीस एक सहा श्लोकांचें पत्र लिहिलें त्यांत या चमत्काराचा असंदिग्ध उल्लेख केला आहे. त्या पत्रावरून समर्थांचें आनंदमूर्तींवरील प्रेम व्यक्त होतें. समर्थ २० वर्षांनीं वडील असतांना त्यांनीं त्यांस नमन केलें आहे: 'सदयहृदयभावें तूज आनंदमूर्ती। नमन निजस्नेहाळा चिद्रुपा सत्यकीर्ती.' समर्थांनीं 'अभिनव सुखराशी तूं सखा गोद्विजांसी' असेंही म्हटलें आहे. 'माझ्या मस्तकीं पदछाया करून मला अभय दे' अशीही त्यांनीं विनम्रभावें प्रार्थना केली आहे. वृंदावन डोलल्याचा उल्लेख —

**तटनिकट समाधी वास वृंदावनींचा।**
**तवसुख बहु डोले सत्य हे सत्य वाचा॥**

रामांनीं शिळा तारल्या त्याचें नवल नाहीं पण तुझ्या प्रतापानें —

**अभिनव जगिं तूझी कीर्ति आनंदमूर्ती।**
**अचळ दगड प्रेमें डोलती थोर ख्याती॥**

समर्थांसारख्या थोर पुरुषानें हा समाधि डोलण्याचा चमत्कार वर्णिला आहे! हनुमंतस्वामींनीं आपल्या बखरींत समाधि डोलल्याची गोष्ट पुढीलप्रमाणें दिली असून तींत प्रस्तुत डोलासंबंधानें समर्थांचे दोन सुंदर श्लोक दिले आहेत. स्वामी म्हणतात —"ब्रह्मक्षेत्रीं (ब्रह्मनाळ) आनंदमूर्तींचे गुरु श्रीरघुनाथस्वामी यांच्या समाधीच्या वृंदावनाचें समर्थांनीं दर्शन घेतलें व वृंदावनास प्रदक्षिणा घालून त्यास समर्थांनीं साष्टांग नमस्कार घातला ते वेळीं तें पाषाणाचें वृंदावन डोलूं लागलें. हें पाहून समर्थांनीं आनंदमूर्तीस पोटाशीं धरून "बाबा! गुरुसेवेची सीमा केलीस, तूं गुरुसेवा करणारा श्रीएकनाथमहाराजांप्रमाणेंच असून याशिवाय तुजला

दुसरी योग्य साक्ष ( उपमा ) मिळावयाची नाहीं " असें बोलले व त्यांनीं पुढील दोन श्लोक केले —

**अतिकठिण शिळा ती डोलवी वृक्ष जैसा**
**जननिजठरकोशीं जन्मला कोण ऐसा !।**
**गुरुभजनप्रतापें ख्याति झाली दिगंतीं**
**अनुदिन स्मर चित्ता स्वामि आनंदमूर्ती ॥**

**अचेतना जो बहु डोलवीतो**
**सचेतना काय न बोलवी तो ।**
**जो चिद्घनानंद आनंदमूर्ती**
**तदाकार राहोचि आनंदवृत्ती ॥**

आनंदमूर्तींचें गौरव समर्थ आणखी एका गोड श्लोकानें करितात —

**तव पदमहिमेचा पार अपार वाटे**
**अगणित गुणधामा वर्णितां कंठ दाटे ।**
**नवल निजतपाचें थोर सामर्थ्य गाढें**
**शरण तुजसि येतां तारिलीं मंदमूढें ॥**

आनंदमूर्तींचें गुणगौरव त्यांच्या शिष्यशाखेंत अनेकांनीं केलें आहे पण त्यांपैकीं औंधचे श्रीमंत परशुराम त्र्यंबक प्रतिनिधि यांनीं केलेल्या गोड स्तोत्राचा येथें उल्लेख करितों. समाधि डोलल्याचा उल्लेख त्यांनींही 'आनंदें बहु डोलती अचल जे पाषाण ते स्थावर' याप्रमाणें केला आहे. 'हस्तासि ठेवी शिरीं' या शब्दांनीं, या परंपरेच्या देवीउपासकानें आनंदमूर्तींनीं आपल्यावर अनुग्रह केल्याचेंही लिहिलें आहे. ते म्हणतात :

**ब्रह्मानंदरसेंचि मूर्ति बरवी जीची दिसे ओतिली**
**यालागीं बघतांचि नेत्रकमळें सृष्टीहि आनंदली ।**
**भक्तांची भवभीति सर्व हरली अद्वैतता लाधली**
**ऐसी सद्गुरुमाउली निरखिली आनंदमूर्ती भली ॥**

**आनंदें नटली भवासि विटली आशेंतुनी सूटली**
**मोहभ्रांतिरती समूळ तुटली संदेहता फीटली ।**
**तद्बोधें मन इंद्रियेंहि सुटलीं मुक्ती तरी लूटली**
**ऐसी सद्गुरुमाउली निरखिली आनंदमूर्ती भली ॥**

स्वराज्यसंरक्षणवर्धनाच्या कामांत गुंगलेल्या वीर मुत्सद्द्यांस संतांच्या उपदेशापासून कसें सुखसमाधान मिळत असे हें यावरून स्पष्ट दिसतें. सर्वच साधुसंत चालू राजकारणाविषयीं उदासीन असतात असें नाहीं. शके १५८३ सालीं शिवराय व इंग्रज यांचा जो झगडा झाला तो सलोख्यानें मिटावा अशी आनंदमूर्तींची इच्छा त्यांच्या एका पत्रांतील 'शिवाजी नदीगडास व ताम्रमुखांचा सल्ला नाहीं परंतु होईल' या एका वाक्यावरून दिसते. दिलेलखानासारख्या उर्मट अंमलदारास त्यांनीं आपल्या सौजन्यानें पायांशीं लोळण घ्यायला लावले !

आनंदमूर्तींचे गुरु रघुनाथस्वामी यांची शंकरावर एक आरती आहे, तसेंच काशीराज यांची एक रामावर आरती आहे. आनंदमूर्तींची कविता म्हणण्यासारखी नाहीं. सहा भूपाळ्या व सात वारांचीं पदें वगैरे आहेत पण तीं त्यांच्या सांप्रदायिकांतच प्रसिद्ध आहेत. 'येईं येईं वो श्रीरंगे माझे अंतररंगे' हें पद रघुनाथस्वामींचें आहे. 'करुणामृत' नांवाचा एक ४७ चरणी अभंग आहे त्यांत श्रीराम म्ह० रघुनाथस्वामी यांच्या कृपेनें आपण तरलों असें आनंदमूर्तींनीं सांगितलें आहे.

**सद्गुरु श्रीराम जे दिनीं भेटला । श्रम पैं तुटला संसारींचा ॥**
**अनादि संवसार नाहीं ऐसा केला । ब्रह्मानंदें ठेला ब्रह्मानंदीं ॥**
**देहाचा अभिमान शरीरीं पैं होता । जाणिवेचा ताठा लोकमान्य ॥**
**भिक्षुक हा देह चावट चोखट । विद्यावयें उन्मत्त सप्तदशीं ॥**
**सप्तदशवर्षी अंगीकार केला । आनंद तारिला पादपद्मीं ॥**
**गांवरस होता गंगा बरी आली । तैसी झाली परी अनधिकारी ॥**

**चिरगुट पैं होतें निशाणीं लाविलें । संरक्षण पडलें राजयासी ॥**
**तैसें मज केलें विषयलंपटा । संतांच्या चोहटां बैसवीलें ॥**
**गुणातीत सुखमय मज केलें । संबोधितां गेलें मायाजाळ ॥**

ह्या अभंगांत आनंदमूर्तींनीं आत्मचरित्राचें शोधन केलें आहे. ‘ वडिलीं दवडिलें अनावडी ’—बापानें १७ व्या वर्षी घरांतून काढलें, ‘ गृहिणी गृहांत पराङ्मुख ’—बायकोशीं नीट पटलें नाहीं, अशा स्थितींत सद्गुरूची गांठ पडली व त्यांनीं मजवर कृपा करून ‘ संसाराचा वारा ’ मज लागूं दिला नाहीं, मायाजाळ तोडून मला ब्रह्मसुखीं स्थिर केलें, आतां घरीं ‘ अन्नसत्र चालू असून याचक तृप्त होतात ! ’ तारुण्यांतील ‘ ताठा, ’ ‘ चावट चोखट ’ असा भिक्षुकी स्वभाव—हें गुरुकृपेनें पार गेलें व मी धन्य झालों. आनंदमूर्तींच्या स्वभावाचा मोकळेपणा व मनाचा थोरपणा मोहक आहे.

संतांची खूण दाखविणारे त्यांचें एक पद व एक अभंग देऊन पुरें करितों—

**पद**

**ते जाणावे निजसंत । वृत्ति ज्यांची निवांत ।**
**अखंड स्वरूपीं एकांत । नेणती द्वैताची मात ॥**
**भाग्य ज्यांचें वैराग्य । शांति शोभे सर्वांग ।**
**अंतर बाहेर निःसंग । जिंकियेले षड्वर्ग ॥**
**संग ज्यांचा सुखकारी । दर्शनमात्रें अघहारी ।**
**अगाध वर्णितां थोरी । सरी न पावेचि दुसरी ॥**
**ज्यांचे वंदितां पाय । भवभय निरसूनि जाय ।**
**अवघा आनंद होय । दावित निजपद सोय ॥**

### अभंग

**भावें सेवा हो सद्गुरु । भवसिंधूचें तारूं ॥ ध्रु० ॥**
**करुनी भक्तीची सांगडी । पावा पैलथडी ॥ १ ॥**
**जपतप अवघाचि हा शीण । गुरूविण नाहीं भजन ॥ २ ॥**
**जोंवरि नाहीं रे गुरुमुख । तोंवरि कैंचें सुख ॥ ३ ॥**
**सहज आनंदा गुरुकृपा । तरिच मार्ग सोपा ॥ ४ ॥**

कांहीं वर्षांपूर्वी ' चित्रमय जगत् ' मासिकांत ब्रह्मनाळ येथील एका गृहस्थांचा आनंदमूर्तीसंबंधानें एक लेख प्रसिद्ध झाला आहे त्यांत रघुनाथस्वामींच्या समाधीचा डोल आपण स्वतः पाहिल्याचें त्यांनीं लिहिलें आहे.



# ११ समर्थांचें राजकारण व राजकारणशास्त्र

१ राजकारणशास्त्र; २ समर्थांचें राजकारण; ३ पूर्वावलोकन; ४ महाराष्ट्रधर्म; ५ शहाजी व शिवाजी; ६ शिवगौरव; ७ राजधर्म व क्षात्रधर्म; ८ राजनीतीचा एक धडा; ९ शठंप्रति शाठ्यम् !; १० देणें ईश्वराचें; ११ समर्थांस शिवाजीमहाराजांचें पत्र; १२ संभाजीच्या निमित्तानें महाराष्ट्रास संदेश; १३ सांगणें पुरे, करणें हवें; १४ कार्यकर्त्यांची वागणूक; १५ लोकसंग्रह; १६ एकंकार-भ्रष्टाकार करूं नये; १७ कार्यकर्त्यांस उपदेश– राजकारणाची उपाधि, फड सांभाळावा, चातुर्य, निस्पृह महंत, निस्पृह व विरक्त व शेवटीं कार्यकर्त्यांच्या वतीनें रामप्रार्थना.

## १ राजकारणशास्त्र

इतर अनेक शास्त्रांप्रमाणें राजकारण हें एक शास्त्र आहे. ह्या शास्त्राचे अनेक सिद्धान्त प्रसंगानें महाभारतादि ग्रंथांत येऊन गेले आहेत. शिवाजी-महाराजांच्या चळवळीच्या काळांत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांना राजकारण प्रत्यक्ष करावें लागलें, तेव्हां ह्या शास्त्राकडे लोकांचें लक्ष साहजिकच वेधले गेलें. मल्हार रामराव चिटणीस व रामचंद्रपंत अमात्य यांचे राजनीतीवरचे प्रबंध शिवकालीन राजकारणावर आधारलेले आहेत. समर्थांनीं राजकारण-शास्त्रावर स्वतंत्र ग्रंथ लिहिला नाहीं, तथापि त्यांनीं ह्या शास्त्रांतील अनेक सिद्धान्त स्पष्टपणें व निर्भीडपणें सांगितले आहेत. त्या सर्वांचा संकलित विचार प्रस्तुत प्रकरणांत करावयाचा आहे. कोणी राजकारणशास्त्रावर स्वतंत्र ग्रंथ लिहील तर त्यास महाराष्ट्रीय राजकारणाचीं स्वतंत्र सूत्रें समर्थांच्या ग्रंथांत सांपडतील. अशीं सूत्रें थोडींथोडकीं नाहींत तर पुष्कळ आहेत. दासबोध हा अध्यात्मग्रंथ आहे व अध्यात्माला धरून बरेंचसें राजकारण असलें तरी कांहीं स्वतंत्र सिद्धान्त स्वतंत्र शास्त्रांतच शोभणारे आहेत. 'शठंप्रति शाठ्यम्' हा सिद्धान्त अध्यात्मशास्त्रांत शोभण्यासारखा नाहीं, पण व्यावहारिक राजकारणांत त्याचेंही कधीं कधीं अगत्य पडतें;

'एकंकार-भ्रष्टाकार करूं नये' हा विचार समाजशास्त्रांत करावयाजोगा आहे. त्याचाही समर्थांनीं ऊहापोह केला आहे. म्हणजे दासबोधादि ग्रंथांत समर्थांनीं पूर्वपरंपरेला धरून अध्यात्म अधिक स्पष्ट शास्त्रशुद्ध रीतीनें मांडलें आहे, तरी त्यांनीं व्यवहार, राजकारण व समाजशास्त्र ह्यांविषयींही आपले विचार निःसंदिग्धपणें सांगितले आहेत आणि त्यांचे विचार अचूक आहेत. याला प्रमाण हेंच आहे कीं, त्यांनीं ३०-४० वर्षांच्या काळांत राष्ट्रकार्य यशस्वी रीतीनें करून दाखविले ! कार्यकर्ते कसे असावेत, त्यांनीं कोणतें राष्ट्रकार्य कसें करावें हें त्यांनीं सांगितलें आहे. कार्याची मुख्य मदार कर्त्यांवर; म्हणून त्यांनीं कार्यकर्त्यांस परोपरीनें चेतना दिली आहे. कार्यकर्ते, महंत, राजकारणी, पुढारी, हे जवळजवळ एकच आहेत व भिन्न असले तरी सर्वांसच हा त्यांचा बोध उपकारक आहे. गेल्या शंभर वर्षांतलें राजकारण कसें व कां घसरत चाललें आहे व समर्थांनी जो मार्ग दाखविला त्या मार्गापासून तें कोठे तोकडें पडत आहे याचा विचार मी वाचकांवरच सोंपवितों !

## २ समर्थांचें राजकारण

'राजकारण' हा शब्द सध्यां आपण वापरतों त्यापेक्षां अधिक व्यापक अर्थानें समर्थांनीं योजला आहे. राजा आणि प्रजा यांचे संबंध, लोकसमाजाची स्थिति सुधारण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या चळवळी, लोकांचे पुढारी व त्यांच्या कर्तव्यांचें नियमन, चातुर्वर्ण्यव्यवस्था व तिच्या रक्षणाचे उपाय, लोक राजी राखून कार्यभाग करणें म्ह० लोकसंग्रह ह्या सर्व गोष्टींचा समावेश समर्थांच्या '**राजकारणा**'त होतो. कुटुंबाच्या हिताचे सर्व विचार जसे 'प्रपंचांत' तसे राष्ट्रहिताचे सर्व विचार 'राजकारणांत' अंतर्भूत होतात. व्यक्तीचा प्रपंच, समुदायाचें राजकारण. प्रपंचांत एका व्यक्तीच्या व कुटुंबाच्या हितसंबंधाचे विचार येतात. राजकारणांत अनेक व्यक्तींच्या किंवा समुदायाच्या हितसंबंधाचे विचार येतात. व्यापक

प्रपंच म्हणजे राजकारण. समर्थांनीं स्वतःचा प्रपंच वाढवून राष्ट्राचा प्रपंच केला. व्यक्तीचा प्रपंच किंवा राष्ट्राचें राजकारण या दोहींलाही न्यायनीतीची जरूरी आहे, परमार्थाचा पाठिंबा अवश्य आहे, किंबहुना परमार्थासाठीं प्रपंच व राजकारण या दोहींकडे लक्ष दिलें पाहिजे. **'मुख्य हरिकथानिरूपण। दुसरें तें राजकारण', 'प्रपंचीं जाणे राजकारण। परमार्थी साकल्यविवरण', 'सामर्थ्य आहे चळवळीचें। जो जो करील तयाचें। परंतु आधीं भगवंताचें। अधिष्ठान पाहिजे'** इ० प्रकारें धर्ममूलक राजकारणाचा समर्थांनीं पुरस्कार केला आहे. धर्मासाठीं प्रपंच व धर्मासाठींच राजकारण म्हणून 'धर्मस्थापनेची कीर्ति। सांभाळिली पाहिजे', 'महाराष्ट्रधर्म राहिला कांहीं। तुम्हांकरितां', 'मराठा तितुका मेळवावा। आपला महाराष्ट्रधर्म वाढवावा' असा उपदेश समर्थांनीं तत्कालीन कार्यकर्त्यांस केला आहे.

> **देव ब्राह्मण आचारविचार। कितेक जनांसी आधार।**
> **सदा घडे परोपकार। देणें ईश्वराचें॥**
> **देवाचा कैपक्ष घेणें। ब्राह्मणांची चिंता वाहणें।**
> **बहुत जनांसी पाळणें। देणें ईश्वराचें॥** (द. १८, स. ६)

देव-धर्म-गोब्राह्मणासाठीं राजकारण—असा समर्थांचा दंडक होता.

अलीकडे ज्याला Politics म्हणतात, त्यापेक्षां समर्थांचें राजकारण अधिक व्यापक दृष्टीचें आहे. अलीकडच्या राजकारणाचा धर्माशीं कांहीं संबंध दिसत नाहीं ! धर्म आणि राजकारण यांची पाश्चात्य राष्ट्रांत तर फारकतच झाली आहे. तसा प्रकार आपलेकडे पूर्वी नव्हता.

समर्थांच्या राजकारणाचें ध्येय 'रामराज्य' होतें. रामराज्य हें सुराज्य व स्वराज्य ह्या दोन्ही दृष्टींनीं उत्कृष्ट होतें व त्याचाच कित्ता त्यांनीं लोकांपुढें ठेवला. रामराज्याचीं सुखें दैन्यदारिद्र्यउद्वेगानें पीडिलेल्या लोकांस पुन्हा प्राप्त व्हावींत अशा मोहरेवर त्यांनीं राजकारण केलें. रामरायाच्या वेळीं प्रजा सुखसंपन्न

होती. ( पृ० १६०-१ पहा. ) रामासारखा लोकपालक व धर्मरक्षक राजा त्यांना शिवरायांत आढळला. त्याच्या उत्कर्षाची त्यांनीं काळजी वाहिली, त्याला प्रोत्साहन व ज्ञानबल दिलें, आपली संघटनात्मक बुद्धिशक्ति त्याच्या विजयार्थ वेंचिली, देवीपाशीं त्याचे यश चिंतिलें ( पृ० १९० ). जणुं कांहीं शिवाजीच्या कार्ययशासाठींच त्यांचा अवतार होता. तुळजापूरची भवानी ही शिवरायाची व समर्थांची कुलस्वामिनी. दोघेही एकाच देवीचे उपासक. दोघांनीं राष्ट्रांत शक्तियुक्तींचा संचार करविला, त्यांत आत्मचैतन्य ओतलें, पडलेले राष्ट्र उभें केले ( पृ० १९१-२ ), राष्ट्रांत त्यांनीं जिवंतपणा आणला, स्वराज्याची उभारणी केली, व धर्माचा उत्कर्ष केला. उभयतांनीं केलेल्या कामगिरीचें स्वरूप समर्थांच्या वाङ्मयांत स्पष्ट दिसतें. समर्थांनीं प्रत्यक्ष कोणतें राजकारण केलें हें आज सांगणें कठिण आहे. त्याबद्दलचा निःसंदेह पुरावा आज उपलब्ध नाहीं; पण त्यांनीं राजकारण केलेंच नाहीं असें म्हणणेंही दुराग्रहाचें आहे. फौज कशी उभारावी; लष्कराच्या हालचाली कशा कराव्या; मंत्रिमंडळांत कोणाला कोणत्या अधिकारावर नेमावें किंवा कोणाला काढावें; शेतीशास्त्र, अर्थशास्त्र किंवा व्यापार कोणत्या धोरणावर चालवावे; किल्ले नवे कोठें बांधावेत व कोणते दुरुस्त करावेत, असल्या व्यावहारिक राजकारणांत समर्थ पडले असतील असें वाटत नाहीं; तथापि त्यांनीं राजास राजधर्म, क्षत्रियांस क्षात्रधर्म व अंमलदार लोकांस सेवाधर्म उत्कृष्ट सांगितले असून त्यांत या धर्मांचीं सूक्ष्म तत्त्वें सांगितलीं आहेत. कार्यकर्त्यास महाराष्ट्राचें वैभव वाढविण्याविषयीं स्फूर्तिदायक उपदेश केला आहे. राजकारणतंत्र त्यांस चांगलें ठाऊक होतें यांत शंका नाहीं, किंबहुना राजकारणतंत्राचे श्रेष्ठ प्रणेते म्हणून त्यांची कीर्ति चिरकाल राहील. राजकारणशास्त्र त्यांच्यासारखें ओजस्वी वाणीनें कोणीच सांगितलें नाहीं. प्रपंचाचा व राष्ट्रप्रपंचाचा म्ह० राजकारणाचा विचार त्यांनीं पूर्णपणें केला आहे. अध्यात्म व राजकारण, परमार्थ व प्रपंच, पारलौकिक

विचार व इहलोकींचे व्यवहार यांची उत्कृष्ट सांगड समर्थांसारखी कोणाही तत्ववेत्यानें घातलेली जगाच्या इतिहासांत सांपडणार नाहीं. समर्थांच्या अवताराचें वैशिष्ट्य हेंच आहे. हरिभजन, राजकारण, सर्वांविषयीं सावधपण व अत्यंत साक्षेप ही समर्थांची चतुःसूत्री आहे ( द. ११, स. ५ ). श्रीरामाच्या उपासनेच्या बळानें एवढें अलौकिक यश त्यांस लाधलें. समर्थ आणि शिवाजी ही गुरुशिष्यांची जोडी अलौकिक व अपूर्व आहे. दोघेही स्वतंत्र व स्वयंभू होते. दोघांनीं धर्मस्थापनेचें सहकार्य केले. आधीं थोडें मागें पाहूं.

## ३ पूर्वावलोकन

अलीकडच्या लोकशाहीच्या कल्पना तेव्हां रूढ झाल्या नव्हत्या. क्षत्रिय व ब्राह्मण वीर व मुत्सद्दी ह्यांच्या साह्यानें राज्य करणारा क्षात्रकुलावतंस राजा लोकहितार्थ झटणारा असला म्हणजे पुरे होत असे. राजकारण बाजारबुणग्यांचें नाहीं, विशेष अधिकारसंपन्न व राजतंत्र जाणणाऱ्या जाणत्यांचें आहे व त्यांच्यांतून विशेष कार्यकर्त्यांचें प्रधानमंडळ नेमून त्यांच्या सल्ल्यानें राजानें राज्यकारभार चालवायचा, अशी पूर्वापार पद्धत असे. त्याप्रमाणें शिवरायानें अष्टप्रधानांची नेमणूक केली होती. गबाळ राजा व खबरदार राजा ह्यांच्यांतला फरक समर्थांनीं एके ठिकाणीं सांगितला असून ( पृ. १९३ ) पोरे व गुरे म्ह० प्रजा, गुराखी म्ह० कारभारी व माय म्ह० राजा अशा रूपकानें राजतंत्राचें स्वरूप त्यांनीं दर्शविलें आहे. परधर्मीय परराज्यामुळें हिंदु समाजाची दैन्यावस्था झाली होती. 'अस्मानी सुलतानी'चें वर्णन मागें ( पृ. २०६-८ ) समर्थांच्या वाणीनेंच केलें आहे. त्या दैन्याचा दोष लोकांकडेच पुष्कळसा येतो; म्हणून अंतर्मुखतेनें आपले दोष पाहून ते आधीं सुधारावेत. भावार्थाचा दुष्काळ पडला असून ब्राह्मण-क्षत्रिय आचारविचारशून्य झाले आहेत, ब्राह्मण आपली थोरवी विसरून हीनदीन झाल्यामुळें व क्षत्रिय परकीयांच्या

सेवेंत धन्यता मानून रहात असल्यामुळें सारा समाज भयंकर दैन्य भोगीत आहे. अशा वेळीं महाराष्ट्रानें पुढें होऊन साऱ्या हिंदुस्थानची दु:स्थिति घालविली पाहिजे, असें समर्थांनीं मोठ्या कळकळीनें सांगून लोकांस धीर दिला व आपापसांतले कलह, पक्षभेद व वितंडवाद विसरून अभेद-भक्तीच्या बळानें एकवटून व न्यायनीतीच्या वर्तणुकीनें देवाला आपला कैवारी करून आपला उद्धार आपणच केला पाहिजे असें अत्यंत जिव्हाळ्यानें सांगितलें आहे. तो सारा प्रकार आपण पूर्वीं पाहिलाच आहे ( पृ० २०६ ते २२१ ).

सारें जग, सारीं राष्ट्रें व सारे समाज परस्परांशीं प्रेमानें व सलोख्यानें वागतील तर कोणास नको आहे ? विश्वाचें एक कुटुंब व्हावें, पण हें उच्चतम ध्येय झालें नाहीं ( केव्हां तरी होईल काय ? ) तोंवर व्यापक महापुरुषालाही लोकमर्यादा पत्करूनच वर्तावें लागतें. सर्व हिंदुस्थान एक व्हावा, निदान महाराष्ट्राचा घटक तरी एकजीव व संयुक्त व्हावा, अशा धोरणानेंच वागावें लागतें. एका घटकाचें पूर्णत्व इतर घटकांच्या कल्याणालाही कारण होतें. यासाठींच 'हें विश्वचि माझें घर' ह्या उच्च पदवीवरून जरा खालीं येऊन 'मराठा तेवढा मेळवावा', 'महाराष्ट्र राज्य करावें जिकडे तिकडे' असा समर्थांस उपदेश करावा लागला.

शिसोदे यांच्या वंशांत शिवनामा जन्मास आला आहे तरी त्यास उपासना सांगून धर्मस्थापना करवावी असा रामरायाचा आदेश समर्थांस शिवाजीच्या जन्मापूर्वींच झाला होता. समर्थ व शिवराय दोघेही भगवंताच्या प्रेरणेनें आपल्या धर्मस्थापनेच्या महत्कार्यास सिद्ध झाले होते. भोंसले यांचें घराणें अस्सल क्षत्रिय असून उदेपूरच्या राजघराण्यांतील होतें. या घराण्यानें दक्षिणेंत आल्यावरही आपलें क्षात्रकर्म करण्याचें ब्रीद चालविलें होतें व परिस्थित्यनुरूप वागून आपला स्वतंत्र बाणा व आपलें तेज त्यानें राखलें. ह्या घराण्याचा थोडा इतिहास देऊन, मालोजीराजे व शहाजीराजे,

शहाजीराजे आणि समर्थ यासंबंधीचें वर्णन पूर्वी (पृ० २३३ ते २४२) केलेंच आहे. समर्थ व शहाजीराजे याच्या गांठीभेटी समर्थांच्या अनुष्ठान-कालींच नाशीक-पंचवटीस झाल्या होत्या व समर्थांचें बालशिवाजीकडे पहिल्यापासून लक्ष होतें. शिवाजीची पहिली भेट, समर्थांचें त्यांस पहिलें पत्र व समर्थांचा शिवरायांवर अनुग्रह या गोष्टी आपण पूर्वी पाहिल्याच आहेत (पृ० २७४-२८६). हा संपूर्ण कथाभाग वाचकांनीं चांगला ध्यानीं आणावा म्हणजे गुरुशिष्यांच्या पुढील कार्याचें स्वरूप त्यांना नीट समजेल.

## ४ महाराष्ट्र धर्म

नाथ-तुकोबांच्या काळीं स्वधर्मरक्षणार्थ कोणी जातिवंत क्षत्रिय पुढें आला नव्हता, तो समर्थांच्या वेळीं शिवाजीमहाराजांच्या रूपानें उदित झाला. तथापि सर्वकाळीं सर्व कवींना, संतांना व समाजहितेच्छु पुरुषांना स्वधर्मसंस्थापना झाल्याशिवाय राष्ट्रावरील आपत्ति दूर होणार नाहींत, असेंच वाटत होतें. स्वधर्मस्थापनेचें कार्य म्हणजे वर्णाश्रमधर्माचें परिपालन व देवद्विजगोसंरक्षण हें होय. शिवरायाचें बाळकडू तेंच होतें. जिजाबाई, शहाजी व दादाजी यांनीं त्याचे बालहृदयांत या बीजाची पेरणी केली होती व पुढें समर्थांनींही त्यास 'देवधर्मगोब्राह्मण' यांचें संरक्षण करण्याची स्फूर्ति दिली. यासच महाराष्ट्रधर्म म्हणत. हिंदुस्थानभर प्रचलित असलेल्या हिंदुधर्माहून महाराष्ट्रधर्म कांहीं वेगळा नव्हता. महाराष्ट्र-धर्म हा शब्द समर्थांच्याही पूर्वी गुरुचरित्रग्रंथांत आला होता. हा शब्द 'श० १६४९ मध्यें रामदासांनीं प्रथम बनविला' असें रा० भट म्हणतात, पण तें चुकीचें आहे; शके १३७० च्या सुमारास महिकावतीच्या बखरीं-तील वर्णनावरून त्या काळच्या क्षत्रियांची उठावणी करण्याचा प्रयत्न झाला होता असें दिसतें पण तेव्हां कोणी शिवाजी जन्मास आला नव्हता! बखरींत स्पष्ट म्हटलें आहे, "देशामध्यें बहुत यवन जाले. क्षत्रियांनीं राज्यअभिमान सोडला. शस्त्रें सोडलीं. कृषि धरिली. बहुत आचारहीन झाले.

गोत्र, कुळगुरु, कुलस्वामीण सांगतां विसरूं लागले. जाणोन देवीनें धर्म माराष्ट्र (महाराष्ट्र) रक्षायाकारणें नायकोरावास स्वप्न दिले. हा जाति-मेळावा करावा. श्रीदेवी आद्यशक्ति जगदंबिका महाराष्ट्रधर्मरक्षिका तुम्हांस प्रसन्न असो." यारून त्या वेळीं स्वधर्मासाठीं स्वराज्य पाहिजे ही कल्पना होती, पण तिला यश आलें नाहीं. क्षत्रिय मराठे भराभर यवनांच्या नौकरींत शिरले. त्यानंतर १५० वर्षांनीं शिवराज जन्मास आले व धर्माला काळ अनुकूळ झाला. ब्राह्मण व क्षत्रिय, संतकवि व मुत्सद्दी, सर्वांच्या मनांत ईश्वरानें प्रेरणा केली. सप्तप्रकरणात्मक शिवचरित्रांत शिवाजीमहाराजांचा मनोभाव असा सांगितला आहे. "वडिलांनीं मेळविलें तें खाऊन राहणें योग्य नाहीं. आपण हिंदु, दक्षिण देश म्लेच्छांनीं ग्रासिला. देव, ब्राह्मण, क्षेत्रे, गाई यांस बहुत पीडा झाली. धर्म अगदीं बुडाला. तेव्हां धर्मरक्षणार्थ प्राणही वेंचून धर्म रक्षावा." शिवरायाच्या अवताराचें हें प्रयोजन इतर अनेक बखरींवरून व शेंकडों कागदपत्रांवरूनही अगदीं स्पष्ट आहे. यास सत्पुरुषांनीं प्रोत्साहन दिलें. वर्णाश्रमात्मक वैदिक ऊर्फ हिंदुधर्म याची संस्थापना करण्याचा सर्वांनीं त्या वेळीं प्रचंड उद्योग केला. महिकावतीच्या बखरींत केशवाचार्यांनीं 'वेदशास्त्राचार श्रेष्ठ तसाच देशाचार व कुळाचार सर्व धर्माचा जीव मूळ माराष्ट्र (महाराष्ट्रधर्म),' असें म्हटले आहे. ह्या महाराष्ट्रधर्माच्या जागृतीसाठीं ज्ञानेश्वरनाथतुकोबादि सर्व संतांनीं जें कार्य केलें तेंच समर्थांनीं व शिवाजीसंभाजीराजारामांनीं पुढें चालविलें.

## ५ शहाजी व शिवाजी

समर्थ व शिवराय यांच्या काळीं स्वधर्म व स्वराज्य यांचा पूर्ण समन्वय होता व तो राजाराममहाराजांच्या कारकीर्दीअखेर चांगला टिकला. समर्थ व शिवराय या दोघांचाही प्रधान हेतु धर्मस्थापनेचा होता. स्वधर्म-रक्षण, परधर्मीयांकडून होणारा स्वकीयांचा धर्मछल बंद पाडणें याचा धर्मस्थापनेंत अंतर्भाव होतो. स्वराज्य हिंदूंना धर्मासाठीं पाहिजे असतें.

धर्मरक्षण आधीं व स्वराज्य तत्साधन म्हणून नंतर. 'आम्ही धर्मासाठीं फकीरी घेतली आहे' असें शिवाजीमहाराजांच्या तोंडचें एक वाक्य बखरींत आहे. दक्षिण यवनमय झाली असतां चार मुसलमान पातशाहांशीं सतत झगडून मोठ्या ऐश्वर्यप्रतापानें विजयानगरच्या हिंदु साम्राज्यानें स्वधर्मरक्षण केलें होतें, तेंच हिंदुधर्मरक्षणाचें वारें तें साम्राज्य मोडल्यावर कृष्णागोदा-तीरच्या महाराष्ट्रांत वाहूं लागलें. तुंगभद्रेकडून हें लोण कृष्णागोदाप्रांतीं आलें असेंही म्हणण्यास हरकत नाहीं. शिवपूर्वकालीन महाराष्ट्रांत जे अनेक राजकारणी कर्ते पुरुष झाले त्यांत शहाजीराजे अग्रेसर होत. प्रौढप्रताप, धडाडी, स्वराज्यसंस्थापनेचें धोरण व धर्मप्रेम हे गुण त्यांच्यापासून शिवाजीमहाराजांच्या अंगीं उतरले व जें बीजांत होतें तेंच फळरूपास आलें. शिवाजीमहाराजांस स्वराज्यस्थापनेचें जें यश मिळालें त्याचा बराच भाग शहाजीमहाराज, जिजाबाई आणि दादाजी कोंडदेव यांच्या वांट्याला जातो. गागाभट्टांनीं शहाजीराजे यांजबद्दल 'क्षत्रधर्मस्य नवावतार:' असें म्हटले आहे तें यथार्थ आहे. यवनाच्या राज्यकारभारांत जन्म गेल्यामुळें स्वराज्यस्थापना आपल्या हातून झाली नाहीं ती बालशिवाजीच्या हातून व्हावी अशी शहाजीराजे यांची पोटस्थ भावना होती व त्यांचें ह्या महत्कार्यास आंतून प्रोत्साहन व साह्यही होतें असें तत्कालीन कागदपत्रां-वरून स्पष्ट दिसतें. बालशिवाजीच्या रक्षणार्थ त्यांनीं दादाजी कोंडदेव, शंकराजी निळकंठ, रघुनाथपंत कोरडे, हणमंते इ० आपल्या विश्वासाचीं व कर्तबगारीचीं माणसें ठेवलीं होतीं त्यांचेंही मन:पूर्वक साह्य शिवराजास झालें. पुणेंसुपें प्रांतांची जहागीर व बारा मावळें हा सह्याद्रीलगतचा प्रांतही त्यांच्या कार्यास साह्यकर्ता झाला. सर्व कर्तबगारीच्या माणसांनीं बालशिवाजीस संपूर्ण साह्य केलें. शिवरायाच्या वयाच्या १२ व्या वर्षींच 'प्रतिपच्चंद्ररेखेववर्धिष्णुर्विश्ववंदिता' अशी शिवरायाची मुद्रा चालू झाली व ८।१० वर्षांत शिवरायांनीं यवन राज्याचें बरेंच आक्रमण करून आसपासचा

सर्व प्रदेश आक्रमून धरिला, शके १५७० मध्यें अष्टप्रधानांकित राज्यव्यवस्थेचा पाया घातला व छत्रपति पदवीही धारण केली. येथून पुढें मराठी राज्याचा विस्तार होत गेला.

## ६ शिवगौरव

या सुमारास (श. १५७०) समर्थांनीं शिवाजीमहाराजांस वांई येथें जें पहिलें पत्र पाठविलें तें अत्यंत महत्त्वाचें आहे. त्या पत्रांतल्या पहिल्याच ओवींत 'निश्चयाचा महामेरु। बहुतजनांसी आधारु। अखंडस्थितीचा निर्धारु। श्रीमंत योगी' याप्रमाणे शिवरायाचें त्यांनीं गौरव केले आहे व 'यशवंत, सामर्थ्यवंत, वरदवंत, पुण्यवंत, नीतिवंत, जाणता राजा' अशीं यथार्थ विशेषणें त्यास लाविलीं आहेत. आचारशीळ, विचारशीळ, दानशीळ, धर्मशीळ—'धीर उदार गंभीर। शूर क्रियेसी तत्पर। सावधपणें नृपवर। तुच्छ केले' अशा २१ वर्षांच्या बालशिवाजीविषयीं समर्थांच्या मनांत अद्भुत प्रेम उत्पन्न झाले असलें तर त्यांत नवल नाहीं. धर्मरक्षणासाठीं जसा क्षात्रगुणांचा पुतळा त्यांना पाहिजे होता तसा त्यांना बालशिवाजींत आढळला. समर्थांनीं सारा हिंदुस्थान पाहिला होता, पण असा पुण्यात्मा पुण्यश्लोक त्यांना अन्यत्र कोठे आढळला नव्हता.

**तीर्थक्षेत्रें मोडिलीं। ब्राह्मणस्थानें भ्रष्ट जालीं।**
**सकळ पृथ्वी आंदोळली। धर्म गेला॥**
**देवधर्म गोब्राह्मण§। करावया संरक्षण।**
**हृद्यस्थ जाला नारायण। प्रेरणा केली॥**
**या भूमंडळाचे ठायीं। धर्म रक्षी ऐसा नाहीं।**
**महाराष्ट्रधर्म राहिला कांहीं। तुम्हांकरितां॥**
**कित्येक दुष्ट संहारिले। कित्येकांस धाक सुटले।**
**कित्येकांस आश्रय झाले। शिवकल्याणराजा॥**

§ शिवरायाच्या शके १५९७ च्या एका आज्ञापत्राचे शेवटीं 'श्रीची आण व आपले पूर्वजांची व गाईब्राह्मणांची आण' वाहिली आहे.

शेंकडों पौर्वात्य व पाश्चात्य इतिहासकारांनीं शिवरायाचें गुणगौरव केलें आहे पण समर्थांसारख्या वीतरागी महापुरुषानें केलेल्या या गौरवांत जो जिव्हाळा आहे तो अन्यत्र कोठें सांपडणार आहे? देवधर्मगोब्राह्मणांचें संरक्षण करणें हीच हिंदुधर्माची म्हणजे महाराष्ट्रधर्माची परमसेवा आहे, हाच तुमचा क्षात्रधर्म आहे, व ह्या धर्मरक्षणाची नारायणानें तुम्हांस प्रेरणा केली आहे, अर्थात् तुम्ही देवाचे निरोपी आहांत व तोच तुम्हांस पूर्ण यश देणारा समर्थ आहे अशी समर्थांची धीराची व उपदेशाची वाणी ऐकून शिवाजीमहाराजांस किती धन्यता वाटली असेल! आपल्या कार्यास संतमहंतांचें पाठबळ असावें अशी त्यांची पहिलीच बुद्धि होती, व त्याप्रमाणें त्यांनीं त्यापूर्वीं व नंतर अनेक संतांच्या भेटी घेतल्या असून त्यांचे आशीर्वाद मिळविलेही, पण समर्थांच्या चरणीं त्यांची पूर्ण निष्ठा जडली. वरील पत्राच्या शेवटच्या ओंवींत समर्थांनीं शिवरायाच्या मंडळीस व पर्यायानें सर्व कार्यकर्त्या लोकांस बोध केला आहे—

**सर्वत्र मंडळी धर्ममूर्ती। सांगणें काय तुम्हांप्रती।**
**धर्मस्थापनेची कीर्ती। सांभाळिली पाहिजे॥**

'सावधपण' प्रकरणांत 'देहदुःखें कदरों नये। उदंडचि करावे उपाये', 'विचारणा करावी अरिमित्रांची', 'शोधिलेचि शोधावें। राजकारण' इ० सांगून म्हटलें आहे—इशारतीचें बोलतां नये। बोलायाचें लिहों नये। लिहावयाचें सांगों नये। जबाबीनें॥

## ७ राजधर्म व क्षात्रधर्म

समर्थांनीं प्रसंगानें शिवाजीमहाराज, त्यांचे वीरमुत्सद्दी व इतर सेवक-जन यांस हे धर्म निस्पृहपणानें सांगितले आहेत. 'श्रोतीं मानेल तरी घ्यावे। अथवा दाटूनि सांडावे' मग सांगतां कशाला? 'प्रपंचाकारणें स्वभावें। बोलिलों मी.' तुमचा प्रपंच तुम्ही सावधपणानें व दीर्घप्रयत्नानें चांगला करावा म्हणून मी हें सांगत आहें! 'रायांनीं करावे राजधर्म। क्षत्रीं करावे

क्षात्रधर्म । ब्राह्मणीं करावे स्वधर्म । नानाप्रकारे ' यांत समाजाचें कल्याण आहे व यानेंच राष्ट्रप्रपंच सांवरणार आहे. कोणी धनी व कोणी सेवक असणारच तेव्हां ' एका मनोगतें स्वामी सेवक । असतां बरे.'

( १ ) **राजधर्म**—राजाला मनुष्यांची पारख चांगली पाहिजे. ' आधीं मनुष्य वोळखावें, ' त्याच्या योग्यतेप्रमाणें त्याला काम द्यावें, निकामी म्ह० कुचर जवळ ठेवूं नये. कार्यकर्ता असून कांहींसा हेकाड असला तरी त्याचें पाठराखेपण करावें, पण त्याला सोडूं नये ! ' मनुष्य राजी राखणें । हींच भाग्याचीं लक्षणें ' आहेत तथापि ' अमर्याद फितवेखोर । यांचा करावा संहार '—फितूर मनुष्याची दयामाया करूं नये व न्यायनीति सोडूं नये. समयीं धीर सोडील तो खोटा ! ' समयीं कंटाळों नये । करावे अत्यंत उपाय ' बंध नेटके बांधावे. ' ताव न होतां फिके । कारभार होती '—पूर्णतया अंमलबजावणी करितां न आली तर कारभारांत बावळटपणा राहतो !

> **धुरेनें युद्धास जाणें । ऐसी नव्हेत कीं राजकारणें ।**
> **धुराच करोनि सोडणें । कित्येक लोक ॥**

सर्व प्रसंगीं आपणच पुढें होऊं नये, तर आपल्यासारखे कित्येक पुढारी करून सोडावे. अनेक मुंड जवळ ठेवावेत पण त्यांना वेगवेगळें ठेवावें, एकवट होऊं देऊं नये !

> **मोहरा पेटला अभिमाना । मग तो जिवास पाहेना ।**
> **मोहरे मेळवूनि नाना । वरी चपेटे करी ॥**
> **देखोनि व्याघ्राचा चपेटा । मेंढरें पळती बारा वाटा ।**
> **मस्त जो तो रेडा मोठा । काय करावा ? ॥**

सेनानायक वाघासारखा असावा, बेअकली रेडा नसावा ! तुरंग, शस्त्र आणि स्वार यांची परीक्षा जपून करावी. हा ' प्रपंचाचा विवेक ' संक्षेपानें सुचविला आहे.

(२) **क्षात्रधर्म**—निर्भयता असेल त्यानेंच लष्करांत शिरावें. ‘ जयास जिवाचें वाटे भये। त्यानें क्षात्रधर्म करूं नये। कांहींतरी करूनि उपाये। पोट भरावें ! ’ भ्याड पळून आला तर त्याला नरकांत जावें लागेल व वांचून आला तर लोकांत फजीती होईल. अस्सल जातिवंत क्षत्रियांला सांगायला नकोच—

**मारितां मारितां मरावें। तेणें गतीस पावावें।**
**फिरोन येतां भोगावें। महद्भाग्य॥**

हें गीतेचेंच तत्त्वज्ञान आहे. कार्याची महती जाणून तोफेच्या गोळ्या-सारखें शत्रुसैन्यांत शिरावें व लांडगेतोड करावी—‘ जेणें रणशूरांचीं अंतःकरणें। चकित होती. ’

**जैसा भांड्याचा गलोला। निभर्यभारामध्यें पडिला।**
**तैसा क्षत्री रिचवला। परसैन्यामध्यें॥**

भांड्याचा गलोला म्ह० तोफेचा गोळा.

**ऐसे अवघेच उठतां। परदळाची कोण चिंता।**
**हरणें लोळवी चित्ता। देखत जैसा॥**
**मर्दें तकवा सोडूं नये। म्हणजे प्राप्त होतो जय।**
**कार्यप्रसंग समय। ओळखावा॥**
**देवमात्र उच्छेदिला। जित्यापरीस मृत्यु भला।**
**आपुला स्वधर्म बुडविला। ऐसें समजावें।**
**मराठा तितुका मेळवावा। आपुला महाराष्ट्रधर्म वाढवावा।**
**येविषयीं न करितां तकवा। पूर्वज हांसती॥**
**मरणहाक तों चुकेना। देह वांचवितां वांचेना।**
**विवेकी होऊनि समजांना। काय करावें ?॥**
**देवद्रोही तितुके कुत्ते। मारूनि घालावे परते।**
**देवदास पावती फत्ते। यदर्थीं संशय नाहीं॥**

**देव मस्तकीं धरावा। अवघा हलकल्लोळ करावा।**
**मुलुख बडवावा कां बुडवावा। "धर्मसंस्थापनेसाठीं"॥**
**विवेक विचार सावधपणें। दीर्घ प्रयत्न केलाचि करणें।**
**तुळजावराचेनि गुणें। रामें रावण मारिला॥**

समर्थांच्या ओजस्वी व पुरुषार्थाचें वारें अंगांत संचरविणाऱ्या या वाणीची बरोबरी अलीकडच्या जहाल देशभक्ताग्रणींनाही करितां येणार नाहीं. 'मराठा तितुका मेळवावा। आपुला महाराष्ट्रधर्म वाढवावा' हा संघटनेचा महामंत्र समर्थांनीं महाराष्ट्रास दिला. देवद्रोही म्ह० देवाचीं मंदिरें व मूर्ति यांचा विध्वंस करणारे. आपला पक्ष देवदासांचा आहे, आपणांस यश मिळालेंच पाहिजे, विवेकविचारें व सावधपणें वागलें पाहिजे, प्रयत्न केलाचि करणें म्ह० कार्यसिद्धी होईतों सतत यत्न केले पाहिजेत. देव आपल्या शिरावर आहे ही दृढ श्रद्धा ठेवून हलकल्होळ करून सारा समाज उठवावा म्ह० वीरश्रीनें भरावा. पूर्वी सत्त्वगुण वाढवावा, रजोतमोगुणांचें निर्मूलन करावें म्हणून दासबोधांत सांगितले आहे त्याच्याशीं हें विरुद्ध नाहीं. ही हुल्लड केवळ 'धर्मस्थापनेसाठींच' करावयाची आहे. धर्मस्थापनेसाठीं अवश्य करावी लागणारी हिंसा ही अहिंसाच आहे असें आपले तत्त्वज्ञान आहे.

## ८ राजनीतीचा एक धडा

राजकारणनिरूपण दासबोधांत (द० ११, स० ५ मध्यें) केलें आहे—राजकारणाचा मुख्य उपाय 'अनन्य राहे समुदाव। इतर जनांस उपजे भाव'–आपल्या संप्रदायांतील लोक एकनिष्ठ राहून बाहेरील लोकांचा सद्भाव वाढेल असें पुढाऱ्यांचें वर्तन पाहिजे.

'दुसऱ्याचें अंतर जाणावें, संकेतें लोक वेधावे' म्ह० लोकांचीं मनें आकर्षावींत, 'उपाधीस विस्तारावें' पण 'उपाधींत न सांपडावें.' उपाधीचा कंटाळा मानूं नये, तऱ्हे भरूं नये, अवघड कार्यही 'दीर्घप्रेत्नें' करून दाखवावें.

**दोष देखोनि झांकावे। अवगुण अखंड न बोलावे। ...**
**दुःख दुसऱ्याचें जाणावें। ऐकून तरी वांटून घ्यावें।**
**बरें वाईट सोसावें। समुदायाचें ॥ १४ ॥**

**करणें असेल अपाय। तरी बोलोन दाखवूं नये।**
**परस्परेंचि प्रत्ययो। प्रचीतीस आणावा ॥ १७ ॥**

बहुतांचें बहुत सोसावें, त्याशिवाय लोकसंग्रह होणार नाहीं, तरी पण आपले महत्त्व गमावून बसूं नये. 'राजकारण बहुत करावें। परंतु कळोंच नेदावें.' कोणालाही तोडूं नये, विरोध झाला तरी पुन्हा मिळवून घ्यावें.

**हिरवटासी दूरी धराव। कचरटासी न बोलावें।**

हिरवट म्ह० चटकन् वर्दळीवर येणारे तामसी लोक. कचरट म्ह० क्षुद्र पामर. राजकारण शांतपणाने करावें, सावधानतेने करावें.

**वृक्षीं रूढासी उचलावें। युद्धयकर्त्यास ढकलावें।**
**कारबाराचें सांगावें। आंग कैसें ? ॥ २३ ॥**

जे धैर्यानें वर चढत असतील त्यांना टेका देऊन चढवावें पण जे कलह किंवा विरोध करितील त्यांना खालीं पाडावें! इतकें करून आपण त्यांत सांपडूं नये. निरभिलाष असावें. एकाला पाठीशीं घालावें व एकाशीं शत्रुत्व करावें असें न करावें.

## ९ शठंप्रति शाठ्यम्!

दासबोधांत संपूर्ण राजकारणाचा समास म्हणजे १९ व्या दशकाचा ९ वा समास! हा समास कोणत्या प्रसंगीं कोणास उद्देशून सांगितला आहे हें नीटसें ध्यानांत येत नाहीं. दिवाकरभटासारख्या कार्यकर्त्या महंतास हा सांगितला आहे, का शिवरायास अगर त्याच्या मुत्सद्दी लोकांस सांगितला आहे हें समजण्यास मार्ग नाहीं. समुदाय अगर संघटना करणाऱ्या धार्मिक महंतास किंवा व्यावहारिक राजकारण करणाऱ्या पुढाऱ्यास त्यांत अगदीं गुलदस्तांतलें राजकारण सांगितलें आहे. 'शठंप्रति शाठ्यम्'

हें येथलें सूत्र आहे! समर्थांसारख्या सत्त्वधीर साधुपुरुषासही असा आडरस्ता दाखवावा लागला, यावरून प्रसंगही तसाच दुर्धर असला पाहिजे हें उघड आहे!

'ज्ञानी आणि उदास' आणि 'समुदायाचा हव्यसा' ज्याला आहे त्यानें अखंड एकान्त सेवावा. एकान्तांत अनेक तजविजा म्ह० अनेक युक्त्या व उपाय सुचतात, अनेक गूढ प्रश्नांचा उलगडा होतो, प्राणिमात्रांची 'स्थितिगति' म्ह० चालू परिस्थिति व पुढील होणारी गति यांचा बारीक विचार करितां येतो. चाळणा न केली तर हिशेब करून बाकी पूज्य न करणाऱ्या दिवाळखोराप्रमाणें याच्या अकलेचें दिवाळें निघतें! कोणी उद्योगाने नवीन मिराशी मिळवतात व कोणी असलेल्या गमावतात! दुसऱ्याचें मनोगत आधींच कळले म्हणजे त्याला कृत्रिम किंवा कपट करायला सवडच रहात नाहीं. कोठेंही नित्य वस्ती करून राहूं नये. कां कीं 'अखंड राहतां सलगी होते। अतिपरिचयें अवज्ञा घडते', याकरितां परिभ्रमण करावें व एकान्तांत पुष्कळ काळ घालवावा. आळसानें आळस वाढतो व समुदाय वाढविण्याचा मनांतला हेतु राहून जातो. शिष्य अगर अनुयायी यांना उपासनेचीं उदंड कामें लावून द्यावीं व त्यांतच ते मग्न राहिले म्हणजे त्यांना कृत्रिमे करायला सवडच राहणार नाहीं. 'चोर भांडारी करावा। घसरतांच सांभाळावा' व त्याच्या मनांतले मूर्खपणाचे विचार हळूहळू काढून टाकावेत. या गोष्टी कांहीं नवीन सांगतों असें नाहीं; 'राजकारणें मंडळ वेष्टी। चहूंकडे'—कोणाला कष्टी न करितां युक्तीनें सर्वांना राजकारणांत गुंतवून ठेवावें. 'नष्टासी नष्ट योजावे। वाचाळासी वाचाळ आणावे,' पण आपणाविषयीं कोणाच्याही मनांत विकल्प उठूं देऊं नयेत. 'कांटीनें कांटी झाडावी। झाडावी ते कळों नेदावी,' पण कलहाचा प्रसंगच ठेवूं नये. न कळूं देतां काम करावें, म्हणजे तें यशस्वी होतें. परस्पर आवड उत्पन्न व्हावी, सहवासानें ती दृढ करावी

व मग हळूच आपल्या मंडळांत घ्यावें! काम केलें म्हणजे होतें, ढिलेपणा करूं नये.

**जो दुसऱ्यावरी विश्वासला। त्याचा कार्यभाग बुडाला।**
**जो आपणचि कष्टत गेला। तोचि भला॥ १६॥**

'अवघ्यांस अवघें कळलें' मग तें राजकारण कसलें?

**मुख्य सूत्र हातीं घ्यावें। करणें तें लोकांकरवीं करवावें।**
**कितेक खलक उगवावे। राजकारणामध्यें॥ १८॥**

अनेक धूर्त राजकारणांत गुंतवून घ्यावेत, लोकांकडून करणें तें करवावें, पण मुख्य सूत्र आपल्या हातींच ठेवावें. बोलके पुढारी असतील त्यांच्याशींच दोन हात करावेत, त्यांच्या अनुयायांशीं वाद करूं नये. दुर्जनांच्या योगानें राजकारण अडून पडेल असें करूं नये. कुटाळांचे म्होरके असतील त्यांचें रगडून पीठ करावें, पण त्यांना नंतर मिळवून घ्यावें, सोडूं नये.

**खळदुर्जनांसी भ्यालें। राजकारण नाहीं राखिलें।**
**तेणें अवघें प्रगट जालें। बरें वाईट॥ २१॥**

**समुदाय पाहिजे मोठा। तरी तणावा असाव्या बळकटा।**

ज्याला समुदाय (संघ) मोठा करावयाचा आहे त्याची आक्रमणशक्ति (तणावा) दांडगी पाहिजे. दुर्जन ओळखावे पण प्रगट करूं नयेत.

**दुर्जन प्राणी समजावे। परी ते प्रगट न करावे।**
**सज्जनांपरीस आळवावे। महत्त्व देऊनी॥ २३॥**

राजा हा लोकांचा कैवारी (कैपक्षी) व परमार्थी असा असावा कीं, त्याच्या प्रतापानें मोहित होऊन त्याच्या लोकांच्या अंगीं युद्धाचें स्फुरण चढावें—

**गनीमाच्या देखतां फौजा। रणशूरांच्याफुर्फुरती भुजा।**
**ऐसा पाहिजे कीं राजा। कैपक्षी परमार्थी॥ २५॥**

**तयास देखतां दुर्जन धाके । बैसवी प्रचीतीचे तडाखे ।**
**बंडपाखांडाचे वाखे । सहजचि होती ॥ २६ ॥**

राजाच्या प्रतापाच्या तडाख्यांचा शत्रूंना अनुभव यावा, त्याच्या नांवाचा दुष्टांना दरारा बसावा व बंडपाखांडें ( राजकीय व धार्मिक बंडखोऱ्या ) पार मोडून टाकावींत !

**हीं धूर्तपणाचीं कामें । राजकारण करावें नेमें ।**
**ढिलेपणाच्या संभ्रमें । जाऊं नये ॥ २७ ॥**
**हुंब्यास हुंबा लावून द्यावा । टोणप्यास टोणपा आणावा ।**
**लौंदापुढें उभा करावा । दुसरा लौंद ॥ २९ ॥**
**धटासी आणावा धट । उद्धटासी पाहिजे उद्धट ।**
**खटनटासी खटनट । अगत्य करी ॥ ३० ॥**
**जैशास तैसा जेव्हां भेटे । तेव्हां मजालसी थाटे ।**
**इतुकें होतें परी धणी कोठें । दृष्टीस न पडे ॥ ३१ ॥**

धणी कोठें दृष्टीस पडत नाहीं. पण ' ठाई ठाई त्याच्या गोष्टी ' लोक बोलत आहेत व तो वाग्विलासानें सकळांना आपला वेध लावीत आहे !

## १० देणें ईश्वराचें

अफझुलखानासारखें धेंड उलथून पाडून यशस्वी झाल्यावर शिवाजी-महाराज समर्थांचे दर्शनास आले त्या वेळीं त्यांची प्रत्यक्ष स्तुति न करितां समर्थांनीं त्यांचें गुणगौरव केलें, सावधानतेचा बोध केला व त्यांच्या गुणांबद्दल हें ' देणें ईश्वराचें ' आहे असें समजून ' अहंकाराचा वारा ' लागूं देऊं नका असा गर्भित इषारा दिला. तो सर्व भाग मोठा रम्य आहे. त्या प्रसंगींचा पुढील समास आहे ( दास०, द० १८, स० ६ )—

---

१ रडका, ठोंब्या. २ लबाड. ३ धटिंगण. ४ सभा, राजकारण, कार्यभाग. ' ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ' ह्याचा असाच व्यावहारिक अर्थ टिळकांनींही केला आहे.

नानावस्त्रें नाना भूषणें। येणें शरीर शृंगारणें।
विवेकें विचारें राजकारणें। अंतर शृंगारिजे ॥ १ ॥
तुंड[२] हेकाड[३] कठोरवचनी। अखंड तोले[४] साभिमानी।
न्यायनीति अंतःकरणीं[१]। घेणार नाहीं ॥ ३ ॥
ऐसे लौंद[५] बेइमानी। कदापि सत्य नाहीं वचनीं।
(ते) पापी अपस्मार[६] जनीं। राक्षस जाणावे ॥ ५ ॥
(असो) समयासारिखा समय येना। नेम सहसा चालेना।
नेम धरितां राजकारणा। अंतर[७] पडे ॥ ६ ॥
अति सर्वत्र वर्जावें। प्रसंग पाहोन चालावें।
हठनिग्रहीं न पडावें। विवेकी पुरुषें ॥ ७ ॥
बरें ईश्वर आहे साभिमानी। विशेष तुळजाभवानी।
परंतु विचार पाहोनी। कार्य करणें ॥ ९ ॥
अखंडचि सावधाना। बहुत काय करावी सूचना।
परंतु कांहीं येक अनुमाना। आणिलें पाहिजे ॥ १० ॥
समर्थापासीं बहुत जन। राहिला पाहिजे साभिमान[८]।
निश्चळ करूनियां मन। लोक असती ॥ ११ ॥
म्लेंच्छ दुर्जन उदंड। बहुतां दिवसांचें माजलें बंड।
याकारणें अखंड। सावधान असावें ॥ १२ ॥
सकळकर्ता तो ईश्वरु। तेणें केला अंगिकारु।
तया पुरुषाचा विचारु। विरळा जाणे ॥ १३ ॥
न्यायनीतिविवेकविचार। नाना प्रसंग प्रकार।
परीक्षणें परांतर। देणें ईश्वराचें ॥ १४ ॥
महायत्न सावधपणें। समयीं धारिष्ट धरणें।
अद्भुतचि कार्य करणें। देणें ईश्वराचें ॥ १५ ॥
यशकीर्ति प्रतापमहिमा। उत्तम गुणांसी नाहीं सीमा[९]।
नाहीं दुसरी उपमा। देणें ईश्वराचें ॥ १६ ॥

---

१ अंतःकरण. २ तोंडाळ. ३ हेकट. ४ वृथाडौली. ५ लबाड. ६ पीडादायक. ७ व्यत्यय. ८ आपलेपणा. ९ अद्वितीय आहांत हा भाव.

देवब्राह्मण आचारविचार । कितेक जनांसी आधार ।
सदा घडे परोपकार । देणें ईश्वराचें ॥ १७ ॥
इहलोक परलोक पाहणें । अखंड सावधपणें राहणें ।
बहुतजनांचें साहणें । देणें ईश्वराचें ॥ १८ ॥
देवाचा कैपेक्ष[1] घेणें । ब्राह्मणांची चिंता वाहणें ।
बहुत जनांसी पाळणें । देणें ईश्वराचें ॥ १९ ॥
धर्मस्थापनेचे नर । ते ईश्वराचे अवतार ।
जाले, आहेत, पुढें होणार । देणें ईश्वराचें ॥ २० ॥
उत्तम[2] गुणांचा ग्राहक । तर्क तीक्ष्ण विवेक ।
धर्मवासना पुण्यश्लोक । देणें ईश्वराचें ॥ २१ ॥
सकळ गुणांमध्यें सार । तजविजा विवेकविचार ।
जेणें पाविजे पैलपार । अरत्रपरत्रींचा ॥ २२ ॥

## ११ समर्थास शिवाजीमहाराजांचें पत्र

श्री

श्रीरघुपती.

श्रीमारुती.

श्रीसद्गुरुवर्य श्रीसकलतीर्थरूप[3] श्रीकैवल्यधाम[4]

श्रीमहाराज श्रीस्वामी

स्वामीचे सेवेसीं,

चरणरज शिवाजी राजे यांनीं चरणावरी मस्तक ठेऊन विज्ञापना जे मजवर **कृपा करुनु सनाथ[5] केलें** आज्ञा केली कीं "तुमचा मुख्य धर्म

१ कैवार, बाजू. २ गुणग्राहकता, तीक्ष्ण तर्कबुद्धि अथवा युक्ति, विवेक, धर्मवासना व सत्कीर्ति हे सर्व गुण तुमच्या ठिकाणीं आहेत, पण ही ईश्वराची देणगी आहे असें मानून अहंकाराच्या भरीं भरूं नका. ३ सर्व तीर्थें ज्यांच्या चरणाजवळ आहेत असे. ४ मोक्षाचें आगर. ५ अनुग्रह केला.

राज्यसाधन करून धर्मस्थापना देव--ब्राह्मणाची सेवा प्रजेची पीडा दूर करून पाळण रक्षण करावें हें व्रत संपादून त्यांत परमार्थ करावा तुम्ही जें मनीं धराल तें श्री सिद्धीस पाववील" **त्याजवरून जो जो उद्योग केला** व दुष्ट तुरुक लोकांचा नाश करावा विपुल द्रव्य करुनु राज्यपरंपरा अक्षई चालेल ऐशीं स्थळें दु[१]र्घट करावीं **ऐसें जें जें मनीं धरिलें तें तें स्वामींनीं आशीर्वादप्रतापें मनोरथ पूर्ण केले याउपरि** राज्य सर्व संपादिलें तें चरणीं अर्पण करुनु सर्वकाळ सेवा घडावी ऐसा विचार मनीं आणिला तेव्हां आज्ञा जाहली कीं, तुम्हांस पूर्वीं धर्म सांगितले तेच करावेत तीच सेवा होय ऐसें आज्ञापिलें यावरून निकटवास घडुनु वारंवार दर्शन घडावें श्रीची स्थापना कोठें तरी होउनु सांप्रदाय शिष्य व भक्ती दिगंत विस्तीर्ण घडावी ऐसी प्रार्थना केली तेही आ[२]सेमंतात गिरि-गव्हरीं वास करुनु **चाफळीं श्रीची** स्थापना करुनु सांप्रदाय शिष्य दिगंत विस्तीर्णता घडली त्यास चाफळीं श्रीची पूजा मोहो[४]छाव ब्राह्मण-भोजन अतिथि इमारत सर्व यथासांग घडावें जेथें जेथें श्रीची मूर्तिस्थापना जहाली तेथें उछा[५]वें पूजा घडावी यास राज्य संपादिलें यांतील ग्रामभूमी कोठें काय नेमावी ते आज्ञा व्हावी तेव्हां आज्ञा जाहली कीं विशेष उपाधीचें कारण काय तथापि तुमचे मनीं श्रीची सेवा घडावी हा निश्चय जाहला त्यास यथाअवकाश जेथें जें नेमावेंसें वाटेल तें नेमावें व पुढें जसा सांप्रदायाचा व राज्याचा व वंशाचा विस्तार होईल तैसें करीत जावें या प्रकारें आज्ञा जाहली यावरुनु देशांतरीं सांप्रदाय व श्रीच्या स्थापना जाहल्या त्यास ग्रामभूमीचीं पत्रें करून पाठविलीं श्रीसंनिध चाफळीं एकशेंएकवीस गांव सर्वमान्य व **एकशे एकवीस गांवीं अकरा बिघे-प्रमाणें भूमि व अकरा स्थळीं [६]श्रीची स्थापना जाहाली** तेथें

---

१ अजिंक्य. २ सभोंवतालच्या गिरिगव्हरांत. ३ श्रीराममूर्तींची. ४ महोत्सव (मुख्य उत्सव नऊ दिवसांचा श्रीरामनवमीचा.) ५ उत्सव. ६ म्ह० श्रीमारुतीची.

नैवेद्यपूजेस भूमि अकरा बिघेप्रमाणें नेमिले आहेती ऐसा संकल्प केला आहे तो सिद्धीस जाण्याविषयीं विनंति केली तेव्हां संकल्प केला तो परंपरेनें सेवटास पाहावा ऐसी आज्ञा जाहली त्याजवरून सांप्रत गाऊं[1] व भूमि नेमिले तपशील :—

[ येथें तेहतीस गांवें, ४१९ बिघे जमीन, एक कुरण व १२१ खंडी धान्य यांचा सविस्तर तपशील आहे. ]

येकूण दरोबस्त सर्वमान्य गांऊ तेहेतीस व जमीन बिघे गाऊगना चारशे येकोणीस व कुरण येक व गल्ला खंडी **एकशेंएकवीस श्रीचे उछाहाबद्दल संकल्पांतील सांप्रत नेमिले व उछाहाचे दिवसास व नक्की ऐवज व धान्य समयाचे समयास प्रविष्ट करीन** अक्षई उछाहादि चालविण्याविषयीं आज्ञा असावी राज्याभिषेक **कालयुक्ताक्षी** नाम संवत्सरे आश्विन शुद्ध १० दशमी बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

## १२ संभाजीच्या निमित्तानें महाराष्ट्रास संदेश

शिवाजीराजे निजधामास गेल्यावर संभाजीराजे यांनीं जीं अनन्वित कृत्यें केलीं तीं ऐकून समर्थांनीं पुढील पत्र संभाजींस पाठविलें ( शके १६०३ ) त्यांत संभाजीची निंदा न करितां शिवरायाचा उत्कृष्ट कित्ता गिरविण्यास व ' त्याहून विशेष ' करण्यास त्यास प्रोत्साहन दिले आहे. या उपदेशाचा उपयोग झाला नाहीं. पत्र अत्यंत मुत्सद्दीपणाचें पण

---

१ गांव. २ शिवाजीमहाराजांना राज्याभिषेक १५९६ ज्येष्ठ शुद्ध १३ रोज शनिवारीं रायगडावर झाला व त्यानंतर पांच वर्षांनंतरचें शके १६०० आश्विन शुद्ध १० रोज रविवार या दिवशींचें वरील पत्र आहे. ह्या पत्राची इंग्रजी तारीख १५ ऑक्टोबर, इ० स० १६७८ ही आहे. खरे यांची जंत्री पहा.

सरळ व ओजस्वी असून संभाजीच्या मिषानें समर्थांनीं महाराष्ट्रीयांस निरंतर प्रोत्साहन मिळावें असाच त्यांत सुंदर बोध केला आहे.

अखंड सावधान असावें। दुश्चित्त कदापि नसावें।
तजविजा करीत बसावें। एकांतस्थळीं॥ १ ॥
कांहीं उग्र स्थिती सांडावी। कांहीं सौम्यता धरावी।
चिंता लागावी परावी[1]। अंतर्यामीं॥ २ ॥
मागील अपराध क्षमावे। कारबारी हातीं धरावे।
सुखी करून सोडावे। कामाकडे॥ ३ ॥
पाणवठीं तुंब निघेना। तरी मग पाणी चालेना।
तैसें सज्जनांच्या मना। कळलें पाहिजे॥ ४ ॥
जनांचा प्रवाह चालिला। म्हणजे कार्यभाग आटोपला[3]।
जन ठायीं ठायीं तुंबला। म्हणजे खोटें॥ ५ ॥
श्रेष्ठीं जें जें मेळविलें। त्यासाठीं भांडत बैसलें।
मग जाणावें फावलें। गलिमांसी॥ ६ ॥
ऐसें सहसा करूं नये। दोघे भांडतां तिसऱ्यास जाये।
धीर धरोन महत्कार्य। समजोन करावें॥ ७ ॥
राजी राखतां जग। मग कार्यभागाची लगबग।
ऐसें जाणोनियां सांग। समाधान राखावें॥ ८ ॥
सकळ लोक एक करावे। गलीमें निवटून काढावे।
ऐसें करितां कीर्ति धांवे। दिगंतरीं॥ ९ ॥
आधीं गाजवावे तडाखे। मग भूमंडळ धाके।
ऐसें न होतां धके। राज्यास होती॥ १० ॥

---

१ दुसऱ्याची. २ तुंबलेल्या पाण्याचा पाट जर फोडला नाहीं तर प्रवाह चालू रहात नाहीं, म्हणून सर्व लोकांना राजी राखून त्यांना आपापल्या कार्याचे मार्ग खुले कारवेत. ३ कार्यभाग सफल झाला. ४ दोघांचें भांडण तिसऱ्याचा लाभ. ५ स्वधर्मद्रोही.

समय प्रसंग वोळखावा । राग निपटून काढावा ।
आला तरी कळों नेदावा । जनांमध्यें ॥ ११ ॥

राज्यामध्यें सकळ लोक । सलगी देऊनि करावे सेवक ।
लोकांचे मनामध्यें धाक । उपजोंच नये ॥ १२ ॥

बहुत लोक मिळवावे । एकविचारें भरावे ।
कष्ट करोन घसरावें । म्लेंछांवरी ॥ १३ ॥

आहे तितुकें जतन करावें । पुढें आणिक मिळवावें ।
महाराष्ट्रराज्य करावें । जिकडेतिकडे ॥ १४ ॥

लोकीं हिंमत धरावी । शर्तीची तलवार करावी ।
चढती वाढती पदवी । पावाल येणें ॥ १५ ॥

शिवराजास आठवावें । जीवित्व तृणवत् मानावें ।
इहपरलोकीं रहावें । कीर्तिरूपें ॥ १६ ॥

शिवराजाचें आठवावें रूप । शिवराजाचा आठवावा प्रताप ।
शिवराजाचा आठवावा साक्षेप । भूमंडळीं ॥ १७ ॥

शिवराजाचें कैसें बोलणें । शिवराजाचें कैसें चालणें ।
शिवराजाची सलगी देणें । कैसें असे ॥ १८ ॥

सकळ सुखांचा त्याग । करूनि साधिजे तो योग ।
राज्यसाधनांची लगबग । कैसी असे ॥ १९ ॥

त्याहून करावें विशेष । तरीच म्हणावे पुरुष ।
याउपरी आतां विशेष । काय लिहावें ? ॥ २० ॥

सावधान असणें म्ह० दुश्चित्त नसणें. रडकेपणा, करंटेपणा, गबाळे-पणा समर्थांना बिलकूल खपत नसे. प्रसंगानें उग्रता किंवा सौम्यता धरावी. भारतांत ‘ न श्रेयः सततं तेजो न नित्यं श्रेयसी क्षमा । काले काले तु संप्राप्ते मृदुस्तीक्ष्णोऽथवा भवेत् । ’ अशी राजनीति सांगितली आहे. सत्य, अहिंसा, क्षमा हे व्यवहारातीत साधूचे गुण खरे, पण व्यवहारांत

तारतम्य पाहिजे. 'राजी राखावें जग' हें कारभाराचें मुख्य सूत्र आहे. 'सकळ लोक एक करावे' म्ह० मुख्य कार्यावर लोकांची दृष्टी खिळून टाकावी, म्हणजे मत, स्वभाव, हित यांचे भेद दबले जातात. शत्रूला तडाखे देऊनच धाकांत ठेवावें, असें न केले तर राज्यसाधन घडत नाहीं. पोंच ओळखली तर गबाळ्या नवऱ्याला बायकोही आवरत नाहीं! ओव्या १३ व १४ ह्या तर अनुपम आहेत. महाराष्ट्र राज्य सर्वत्र पसरावें. ह्या सर्व गुणांचा कित्ता शिवराज होत म्हणून त्यांचें चरित्रगुण आठवावे व त्याप्रमाणें वागावें. असा सुंदर कित्ता गिरवावा, 'आड–कित्ते' बहुत आहेत त्यांना शिवों नये!

## १३ सांगणें पुरे, करणें हवें!

जुन्या दासबोधाच्या १७ व्या समासांत समर्थ सांगतात —

**आपण करून दाखवावें। तरीच दुसऱ्यास सांगावें।**
**ठाकेना तरी भलेसें रहावें। आपुले ठायीं ॥ १ ॥**
**झांकावें आपणासी। आणि सिकवावें पुढिल्यांसी।**
**ऐसा हा सकळ सृष्टीसी। दंडकचि आहे ॥ २ ॥**
**म्हणोनी आपण क्रिया करावी। मग पुढिलांसी नलगे सांगावी।**
**तुझी क्रिया देखोनि जीवीं। तेही तैसी करितील ॥ ३ ॥**
**जें दुसऱ्यांस सांगावें। तें तुवां स्वयेंचि करावें।**
**ऐसें केलिया स्वभावें। समाधान सकळिकां ॥ ४ ॥**
**अरे! पुढिल्यांचें तुज काय। तूं तों समाधानी होय।**
**तुझें समाधान जालियां उपाय। जनांसी करणेंचि नलगे ॥ ५ ॥**

आधीं क्रिया करावी आणि मग करवावी. 'क्रियेवीण ब्रह्मज्ञान। तेंचि श्वानाचें वमन.' आपण स्वतः बोलल्याप्रमाणें वागून मग लोकांस उपदेश करावा, वागणें होत नसेल तर गप्प बसावें. आपल्या दोषांवर पांघरूण घालावें आणि दुसऱ्यांस उपदेश करीत सुटावें अशा करंट्यां-

नींच जग भरलें आहे! म्हणून आपण स्वतः आचरावें मग दुसऱ्यांला सांगण्याचें कारणच पडत नाहीं! जग पाहून सुधारतें, ऐकून सुधारत नाहीं. जें दुसऱ्यांना सांगावें ते स्वतःच आचरून दाखवावें यांत सर्वांचेंच समाधान आहे, दुसऱ्यांचे राहू दे पण तुझें तरी समाधान राहील. स्वतः समाधानी झाल्यावर दुसऱ्यांच्या सुधारणेची आटाटी करायलाच नको. तुझें समाधान पाहूनच लोक समाधानाच्या मार्गाला लागतील.

दासबोधांत ( द० १२, स० ६ ) म्हटलें आहे—

**क्रियेवीण शब्दज्ञान। तेंचि श्वानाचें वमन।**
**भले तेथें अवलोकन। कदापि न करिती॥**
**बोलण्यासारिखें चालणें। स्वयें करून बोलणें।**
**तयाचीं वचनें प्रमाणें। मानिती जनीं॥**

मनोबोधांतही 'क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे' असें सांगितलेंच आहे. क्रिया मात्र शास्त्रशुद्ध असावी, सत्क्रिया असावी, नीतिन्यायाची असावी. अशुद्ध अगर आचरटपणाने बोलावें व त्याप्रमाणें वागावें असा अर्थ नाहीं!

## १४ कार्यकर्त्यांची वागणूक

**बोलावें न्यायनीतीनें मर्यादा राखणें जनीं।**
**आचार राखणें आधीं स्नानसंध्या पवित्रता॥**
**सर्वत्र लोक शोधावे बोधावे भक्तिच्या गुणें।**
**फार एकांत सेवावा अभ्यास नित्यनूतनू॥**
**अत्यंत साक्षपी व्हावें न व्हावें आळशी कदा।**
**पुण्यमार्ग प्रतिष्ठावा लावावी धर्मवासना॥**

यत्न तो देव म्हणून सदा कार्यांत मग्न असावें. यत्नाला यश आलेंच पाहिजे. यत्न यशस्वी होत नसेल तर आपलें कोठेंतरी चुकतें आहे असें समजावें. 'अचूक यत्न करवेना। म्हणोनि केलें तें सजेना!' आळसानें

कार्य नासतें. 'निद्रा, आलस्य व प्रमाद' हीं तमोगुणांचीं लक्षणें आहेत. 'आळसे करंट्याच्या खुणा। प्रगट होती.' क्षणही रिकामा जाऊं न देणें हें भाग्याचें पहिलें लक्षण आहे. 'भाग्यासी काय उणे रे । यत्नावांचूनि राहिलें', 'यत्नाचा लोक भाग्याचा' असें समर्थांनीं अनेकवार सांगितलें आहे. एकान्तीं बहुत विचार करावा, चाळणा करावी, दीर्घदर्शीपणानें पाऊल पुढें टाकावें. पहिला यत्न आचारयुक्त शुद्धविचार. निष्फळ बोलूं नये, लोकांचें मनोगत राखावें, लोक तोडूं नयेत. बहुतांचें बहुत ऐकावें व नीतिन्यायानें वर्तावें. 'केल्यानें होत आहे रे। आधीं केलेंचि पाहिजे.' आधीं करावें मग सांगावें. सांप्रत —

**करंटे मिळाले सर्व जो तो बुद्धीच सांगतो ।**
**सांगावें तें आपणाला आपणु करितां बरें ॥**

क्रियावंताच्या बोलण्याची छाप पडते. नाहींतर भांडणें, वादविवाद, मारामारी, शिवीगाळ यांतच बोलघेवड्यांची कर्तबगारी संपुष्टांत येते! 'हिंडतां शाहणें होतें' म्हणून देशभर संचार करावा, भिक्षामिषे लहान-थोर परीक्षावे, गुणी जाणावे व जवळ करावे व निकामी बाजूला ठेवावे. हेकाडपणा करूं नये, प्रसंगानुसार वर्तावें. वेषावर मदार नसावी, विवेकावर असावी. विवेकानें कार्यकर्ते धुंडून काढावे, त्यांची मैत्रिकी जोडावी, हटातटांत पडूं नये, कार्यकर्ता लोकांना वेध लावतो, तो सर्वांना हवा-हवासा वाटतो.

कार्यकर्त्याला उदंड सोसावें लागतें. महंती फुकाची नाहीं. महंती सुळावरील पोळी आहे. 'उदंड दुःख लोकांचें ऐकतां ऊर फाटतो' पण मौज अशी आहे कीं, जो लोकांच्या हितार्थ निरपेक्षपणें झटतो त्यालाच लोकांनीं केलेला निंदाछळ अधिक सोसावा लागतो! लोक अन्यायानें त्यावर उगाच संतापतात. 'वळितां दुःख मानिती। अन्यायें घात इच्छिती!' जग हें असें आहे. पण जगाची सेवा ही जनार्दनाची

सेवा आहे अशा परमार्थबुद्धीने काम करणारा असेल तोच सर्व आघातांना पुरून उरेल. यासाठीं कार्यकर्ता निस्पृह व निरिच्छ असावा. त्याची चित्तशांति अखंड असावी.

**न्याय अन्याय सोसावा सोसितांही विटों नये ।**
**न्यून पैशून्य झांकावें तेणें तें प्रस्तावा घडे ॥**
**नीतिन्यायें मिळों जाणे तोचि तो लोकसंग्रही ॥**
**धरावें अंतरें लोकां वाह्यात्कारें धरेंतिना ॥**
**कर्म उपासना राखे राखे वैराग्य आदरें ।**
**तोचि तो अंश देवाचा मिळाला जगदंतरीं ॥**

दासबोधांतही समर्थ सांगतात —

**उदंड धिःकारून बोलती । तरी चळों नेदावी शांती ।**
**दुर्जनांसी मिळोन जाती । धन्य ते साधु ॥ १६ ॥**
**उत्तम गुणीं शृंगारला । ज्ञानवैराग्यें शोभला ।**
**तोचि येक जाणावा भला । भूमंडळीं ॥ १७ ॥**
**आपुल्या पुरुषार्थवैभवें । बहुतां सुखी करावें ।**
**परंतु कष्टी करावें । हे राक्षसी क्रिया ॥ २७ ॥**
**जेणें बहुतांस घडे भक्ति । ते हे रोकडी प्रबोधशक्ति ।**
**बहुतांचें मनोगत हातीं । घेतलें पाहिजे ॥ ३७ ॥**

आधीं उपासनेनें व निष्ठावंत भक्तीनें देव आपुलासा करावा म्हणजे कार्यांत यश येतें व लोकांवर उपदेशाचा परिणाम होतो.

**म्हणोन सांगाती असावें । मानतमानत शिकवावें ।**
**हळुहळु शेवटा न्यावें । विवेकानें ॥ ३२ ॥**

कोणासी कांहीं न मागावें आणि भगवद्भजन वाढवावें; ब्राह्मणमंडळ्या मेळवाव्या, भक्तमंडळ्या मानाव्या व संतमंडळ्या शोधाव्या; मळमळित अवघेंच टाकून उत्कट भव्य घ्यावें; निस्पृहपणें व अलिप्तपणें आपणास

राखावें; सज्जनांस निववावें व दुर्जनांस राखावें; समुदाय साधनाभ्यासाला लावावा; कोठेंही लालचींत न पडतां जनांस आपला वेध लावावा; भक्ति, ज्ञान, अनुष्ठान, चातुर्य सर्व कांहीं उत्कट असावें; विवेकांत सांपडत नाहीं असें कांहींच नाहीं म्हणून एकान्तीं विवेक करावा; आत्मारामाला ओळखून सर्व कार्य करावें. एकान्तीं अखंड तजविजा चाळणा करावी म्हणजे राजकारण सुचतें; नानाचर्चा व शंकासमाधानें शास्त्राधारें करावींत म्हणजे सुविचारांचा हमरस्ता पडून जातो, देशोदेशींचे लोक येतात व 'जाणती परी आढळेना। काय करितो तें कळेना' म्ह० याच्या जाणतेपणाचा प्रकार (पल्ला) कोठवर आहे व हा काय करितो हें कोणास कळून येत नाहीं; फड म्ह० भेद पडले असतील ते मोडून हा ऐक्य करितो, समजूत काढतो, परांतर राखून सर्व कांहीं करितो; आपण करितो व करवितो, विवरतो व विवरवितो (द० १२, स० १०).

**ब्राह्मणमंडळ्या मेळवाव्या। भक्तमंडळ्या मानाव्या।**
**संतमंडळ्या शोधाव्या। भूमंडळीं ॥ १४ ॥**
**उत्कट भव्य तेंचि घ्यावें। मळमळित अवघेंचि टाकावें।**
**निस्पृहपणें विख्यात व्हावें। भूमंडळीं ॥ १५ ॥** (द० १९, स० ६)

कष्टाला कंटाळूं नये. 'शाहणे उदंड कष्टती.' असें वागल्यानें आपण सुखी व लोक सुखी होतात. आपण तरावें आणि जन तारावें; आपण ज्ञानानें तृप्त व्हावें व तें ज्ञान निरिच्छपणें लोकांस देऊन लोक ज्ञानी व जाणते करावे. मनोगत हातीं घ्यावें, बहुतांचें सोसावें, कार्यकर्ता आचार-संपन्न असावा. 'शरीर परोपकारीं लावावें। बहुताच्या कार्यास यावें.'

## १५ लोकसंग्रह

समर्थांचा लोकसंग्रहावर मोठा भर आहे आणि तो योग्यही आहे. भगवंतांनीं गीतेच्या ३ र्‍या अध्यायांत ७ व्या श्लोकांत लोकसंग्रहाचें तत्त्व सांगितलें आहे व त्याचें उत्कृष्ट विवरण ज्ञानेश्वरांनीं केलें आहे. तें आधीं

पहावें आणि मग समर्थांचा लोकसंग्रहाचा उपदेश ऐकावा. 'यद्यदाचरति श्रेष्ठः', 'सक्ताः कर्मण्य विद्वांसो', 'न बुद्धिभेदं जनयेत्' ह्या श्लोकांत भगवंतांनीं जो लोकसंग्रहाचा सुंदर सिद्धान्त सांगितला आहे त्याच्या अनुरोधानें ज्ञानेश्वर व रामदास यांनीं या सिद्धान्ताचे प्रतिपादन केलें आहे. 'जनीं जनार्दन' असल्यामुळें जनार्दनबुद्धीनें जनांची सेवा करणें हें सामान्य जीवांनाही आत्मशुद्धीचे उत्कृष्ट साधन आहे, पण लोकसंग्रह हा त्यांच्या कक्षेपलीकडे आहे. सिद्ध, महंत, कृतकृत्य झालेल्या थोर पुरुषांनाच लोकसंग्रह करितां येतो. श्रेष्ठ पुरुष वागतात त्यांचें पाहून सामान्य जन तसेंच वागतात. ज्ञानेश्वरांना स्वतःसाठीं पंढरीची वारी करण्याची आवश्यकता नसूनही त्यांनीं खांद्यावर पताका घेऊन इतर जनांबरोबर गातनाचत व भजन करीत पंढरीस जाणे किंवा तीव्र अनुष्ठानाने साक्षात्कार झाल्यावरही समर्थांनीं स्नानसंध्यादि नित्यनेमाचें ( लोकांना मार्ग लागावा म्हणून ) आचरण करणें यालाच लोकसंग्रह म्हणतात —

**देखें प्राप्तार्थ जाहले । जे निष्कामता पावले ।**
**तयांही कर्तव्य असे उरलें । लोकांलागीं ॥ १५५ ॥**

**मार्गी अंधासरिसा । पुढें देखणाही चाले जैसा ।**
**अज्ञाना प्रकटावा धर्म तैसा । आचरोनी ॥ १५६ ॥**

**एथ वडिल जें जें करिती । तया नाम धर्म ठेविती ।**
**तेंचि येथ अनुष्ठिती । सामान्य सकळ ॥ १६८ ॥**

"आम्ही पूर्णकाम झालों आणि आत्मस्थितीनें राहिलों तर लोकांना मार्ग कोण दाखवील ? ही लोकस्थिति मोडून जाईल, म्हणून सर्वज्ञ समर्थ अशा पुरुषानें मार्ग सोडून वागूं नये. फलाशेनें सकाम पुरुष कर्में करितात तशींच नैराश्यपद पावलेल्या महंतानेंही तीं केलीं पाहिजेत, कां तर 'हे सकळ लोकसंस्था । रक्षणीय सर्वथा । म्हणऊनियां'. तात्पर्य,

"मार्गाधारें वर्तावें। विश्व हें मोहरे लावावें। अलौकिक मोहावें। लोकांप्रति" असें भगवंताचें हृदय ज्ञानेश्वरमहाराजांनीं स्पष्ट करून सांगितलें आहे.

सामान्यांचें वागणें त्यांच्या चित्तशुद्धीसाठीं त्यांना अवश्यच असतें, पण चित्तशुद्धि झाल्यावरही कृतार्थ पुरुषांचें लोकांना मार्ग दाखविण्यासाठीं जें वागणें त्याला लोकसंग्रह म्हणतात. नावेंतून स्वतः पैलपार गेल्यावर नाव मागून येणाऱ्या लोकांसाठीं ठेवावी लागते. 'आपण पार गेलों आतां नांव द्यका बुडवून' असें शाहणे म्हणत नाहींत. ज्या साधनांचा आपण अवलंब केला तीं साधनें—साध्य प्राप्त झाल्यावरही—आचरीत राहणें हें इतरांना मार्ग दाखविण्यासाठीं सिद्धाला अवश्य असतें.

लोकवशीकरणाचा मंत्र समर्थांनीं कार्यकर्त्यांना दिला आहे. 'जीव जीवांत घालावा', 'जगदीश आहे जगदंतरीं', 'सकळ लोक राजी राखावे', 'जग तिकडे जगन्नायक', 'जनीं जनार्दन वोळला', 'जगदंतरीं सख्य करावें'—हा तो मंत्र होय. समर्थांच्याच वाणीनें आपण तो मंत्र ऐकूं—

(१) **जीव जीवांत घालावा। आत्मा आत्म्यांत मिसळावा।**
**राहराहों शोध घ्यावा। परातराचा ॥ ४ ॥**
**दुसऱ्याचे जीवींचें कळेना। परांतर तें जाणवेना।**
**वश्य होती लोक नाना। कोण्या प्रकारें ? ॥ ८ ॥**
**जगदीश आहे जगदंतरीं। चेटकें करावीं कोणावरी ? ॥**
**जो कोणी विवेकें विवरी। तोचि श्रेष्ठ ॥ ९ ॥**
**श्रेष्ठकार्यें करी श्रेष्ठ। कृत्रिम करी तो कनिष्ठ।**
**कर्मानुसार प्राणी नष्ट। अथवा भले ॥ १० ॥**
**जो जगदंतरीं मिळाला। तो जगदंतरचि जाला।**
**अरत्रीं परत्रीं तयाला। काय उणें ? ॥ १५ ॥**
**वोळखीनें वोळखी साधावी। बुद्धीनें बुद्धि बोधावी।**
**नीतिन्यायें वाट रोधावी। पाखांडाची ॥ ३० ॥**

वेष धरावा बावळा । अंतरीं असाव्या नाना कळा ।
सगट लोकांचा जिव्हाळा । मोडूं नये ॥ ३१ ॥
निस्पृह आणि नित्यनूतनं । प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान ।
प्रगट जाणता सज्जन । दुर्लभ जगीं ॥ ३२ ॥
नाना जिन्नस पाठांतरें । निवती सकळांचीं अंतरें ।
चंचळपणें तदनंतरें । सकळां ठाईं ॥ ३३ ॥
येके ठाईं बैसोन राहिला । तरी मग व्यापचि बुडाला ।
सावधपणें ज्याला त्याला । भेटि द्यावी ॥ ३४ ॥
भेटभेटीं उरी राखणें । हे चातुर्याचीं लक्षणें ।
मनुष्यमात्र उत्तम गुणें । समाधान पावे ॥ ३५ ॥ (द० १५, स० १)

(२) कोण कोण राजी राखिले । कोण कोण मनीं भंगिले ।
क्षणक्षणा परीक्षिले । पाहिजे लोक ॥ ६ ॥
थोडें बोलोन समाधान करणें । रागेजोन तरी मन धरणें ।
मनुष्य वेधींच लावणें । कोणी एक ॥ १४ ॥
जिकडे जग तिकडे जगन्नायक । कळला पाहिजे विवेक ।
रात्रंदिवस विवेकी लोक । सांभाळीत जाती ॥ १० ॥
जो जो लोक दृष्टीस पडला । तो तो नष्ट ऐसा कळला ।
अवघे नष्ट येकला भला । कशावरुनी ? ॥ १३ ॥
वोस मुलखीं काय पहावें ? । लोकांवेगळें कोठें राहावें ? ।
तऱ्हे खोटी, सांडतें घ्यावें । कांहीं येक ॥ १४ ॥
तस्मात् लौकिकीं वर्ततां नये । तयास महंती कामा नये ।
परत्रसाधनाचा उपाय । श्रवण करून असावें ! ॥ १५ ॥
अभ्यासें प्रगट व्हावें । नाहीं तरी झांकोन असावें ।
प्रगट होऊन नासावें । हें बरें नव्हे ! ॥ (द० १९, स० ७)

---

१ नित्यपरिभ्रमण करून लोक वश करणारा. २ सर्वांचीं अंतःकरणें सहज वेधतील असें पाठपाठान्तर अपार असून मग ठिकठिकाणीं परिभ्रमण करावें. ३ वारंवार भेटून त्यानें इतरांची पुन्हा भेटण्याची इच्छा कायम राखावी.

आशाबद्ध व क्रियानष्ट असा पुरुष लोकांना मार्ग दाखविण्यास योग्य नाहीं. स्वतः पोहतां येत नसेल तर निदान दुसऱ्यांस बुडविण्याचें तरी पाप करूं नये ! धकाधकीचीं कामें तीक्ष्ण बुद्धीच्या मनुष्यानेंच अंगावर घ्यावींत, भोळ्या व धांदरट मनुष्याचीं तीं नव्हत. उपाधि झेपेल त्यानेंच वाढवावी. सुरळीत चालवितां आला तर व्याप, नाहींतर संताप !

(३) **फडसमजाविसी करणें । गद्यपद्य सांगणें ।**
**परांतरासी राखणें । सर्वकाळ ॥ १२ ॥** (द० १९, स० १०)

(४) **दुर्जनासी राखों जाणे । सज्जनासी निवऊं जाणे ।**
**सकळांचे मनींचें जाणे । ज्याचे त्यापरी ॥ ३९ ॥**

**संगतीनें मनुष्य पालटे । उत्तम गुण तत्काळ उठे ।**
**अखंड अभ्यासीं लगटे । समुदाव ॥ ४० ॥**

**जेथें तेथें नित्य नवा । जनांसी वाटे हा असावा ।**
**परंतु लालचीचा गोवा । पडोंचि नेदी ॥ ४१ ॥**

**उत्कट भक्ति उत्कट ज्ञान । उत्कट चातुर्य उत्कट भजन ।**
**उत्कट योग अनुष्ठान । ठाईं ठाईं ॥** (द० १९, स० ६)

उत्कटपणा पाहिजे, मिळमिळितपणा नसावा.

(५) **जगदंतर निवळत गेलें । जगदंतरीं सख्य जालें ।**
**मग जाणावे वोळले । विश्वजन ॥ १९ ॥**

**जनीं जनार्दन वोळला । तरी काय उणें तयाला ? ।**
**राजी राखावें सकळांला । कठिण आहे ! ॥ २० ॥**

**पेरिलें तें उगवतें । उसणें द्यावें घ्यावें लागतें ।**
**वर्म काढितां भंगतें । परांतर ॥ २१ ॥**

**हें अवघें आपणापासीं । येथें बोल नाहीं जनांसी ।**
**सिकवावें आपल्या मनासी । क्षणक्षणां ॥ २३ ॥**

खळदुर्जनांशीं प्रसंग पडला व सहनशीलता ढळली असें वाटूं लागलेंच तर स्थळत्याग करावा. 'लोक नानापरीक्षा जाणती । परी अंतर-परीक्षा नेणती' म्हणून करंटे होतात! लोकांचें अंतरंग ओळखून चित्त वेधतां आलें पाहिजे. 'विद्या उदंड शिकला । प्रसंगमान चुकतचि गेला' मग त्या विद्येला कोण पुसणार? (द० १२, स० २)

(६) **कर्म उपासना राखे राखे वैराग्य आदरें ।**
**ज्ञान तें प्रत्ययें राखे नित्यानित्यविचारणा ॥**
**प्रबोध लागतां लोकीं नेमस्त सुटका घडे ।**
**पावनु तोचि तो येकु बद्ध लोकांसि सोडवी ॥१४॥** (मानपंचक)

(७) जन वळले, कीं देव वळला व जन खवळले, कीं देव खवळला असें समजावें. 'अरे का रे अहो कां हो' हा तर न्यायच आहे! 'समजावे उमजावे जाणावे मनिंचे मनीं.'

**स्तवावें बहुतां लोकां मानावें बहुतांपरी ।**
**विध्युक्त विश्व वंदावें निंदा हे आत्मघातकी ॥**
**शिकले शब्द ते थोडे जिव्हाळा पाहिजे बरा ।**
**मुळींच नेणतें व्हावें जाणत्यांनेणत्यांमधें ॥**
**महत्त्व वेगळें आहे महत्त्व जाणती कळा ।**
**नेणत्याला मिळों जाणे पुढें सांगे हळू हळू ॥**
**फिरणें बहुतां ठायीं संसार हा बहुचकु ।**
**बहुतांसी बोलणें लागे गांवोगांवीं घरोघरीं ॥**
**वर्ततां येत नाहीं रे वर्तणें न कळे जनीं ।**
**सकळां राखणें राजी हे मुख्य भक्ति जाणिजे ॥**

(८) **अभ्यासें होत आहे रे अभ्यास करणें सदा ।**
**उदंड बोलणें लागे यथातथ्य हळुहळु ॥**
**जीवांत जीव घालावा चालावा भक्तिमार्ग हा ।**
**दुसऱ्यांस कळेसें करणें विवरणें जाणती मनीं ॥**

सर्वही पेरणें विद्या लोकांमध्यें हळुहळु ।
नेणते जाणते करणें कथानीरूपणें सदा ॥
कंटाळा दूरि टाकावा मनामधें त्रासों नये ।
सांगतां सांगतां हांसे हांसे खेळे अहर्निशी ॥

लोकांना हांसत खेळत शिकवावें, रंजीस आणूं नये.

झिंजी हे सर्व लोकांची चुकतां झिडकूं नये ।
मनापासून वोढावे ज्यासी त्यासो क्षणक्षणा ॥
मैत्रिकी सर्व लोकांसी मनापासून जाहली ।
वेध हा लागला मोठा लोक भाटचि जाहले ॥
कथानीरूपणें चर्चा थोरथोरांस मानली ।
कळेना लोक येताती कोठकोठोन चालले ॥
सर्वांसी राखणें राजी सर्वकाळ मृदूत्तरें ।
येकचि जीव सर्वांचा कट्टबंध कळेचिना ॥
सर्वांसी सुख होताहे ज्याचे त्याचेपरी सदा ।
राजकी भोंवते येती तेही त्यासीच मीळती ॥
भक्तीचा जिव्हाळा मोठा खोटा मार्ग असेचिना ।
रामदास म्हणे माझा राम त्रैलोक्यनायकु ॥

(९) भला भला विचक्षणु । प्रवीण योग्य तीक्षणु ।
खुणावितां खुणावला । मनें खुणेसि पावला ॥ १ ॥
मनें प्रसंग वीवरी । तनें प्रसंग जो करी ।
तनें मनें चुकेचिना । तया उगीच येचिना ॥ २ ॥
तनास भेटलीं तनें । मनास चूकलीं मनें ।
चुकी चुकी बहू चुकी । परस्परें चुकामुकी ॥ १ ॥
मद्यास भेटलें मढें । करील काय बापुडें ? ।
मनें मनाचिया खुणा । बुझेल लोभ त्या दुणा ॥ २ ॥

---

१ गर्दी, दाटी. २ लोक चुकले तर त्यांना झिडकारूं नये. ३ स्तुतिपाठक. ४ मेळावा, जूट. ५ सरकारचे लोक, गुप्त हेर. ६ चतुर, निष्णात.

उगेंचि वेंचलें वये.। मनासि भेटतां नये ।
मनें मनास राखणें । सुखें सुखास चाखणें ॥ ३ ॥
न सांगतांच जाणणें । खुणेसि खूण बाणणें ।
प्रसंगमान पूरतें । कदापि तें नव्हे रितें ॥ ४ ॥

## १६ एकंकार-भ्रष्टाकार करूं नये

लोकांना राजी राखावें, लोकांच्या मनोगतें चालावें, जनांचें अंतर वेधावें, जगदंतरीं जगदीश वोळखावा इ० प्रकारचा उपदेश समर्थांनीं जरी जागोजाग केला आहे तरी व्यवहारांत त्यांनीं एकंकार न करितां वर्णाश्रमधर्मानुरोधानें व युक्तायुक्ततेच्या तारतम्यानें वागावें असेंच सांगितलें आहे. कित्येक धर्मसंप्रदाय आणि देशभक्तिसंप्रदाय ‘ एकंकार ’ करणें म्हणजेच सर्वांचें ऐक्य घडवून आणणें असें समजून एकंकाराला उत्तेजन देत असतात, पण समर्थांना हा वर्णाश्रमधर्माची घडी मोडणारा **एकंकारपंथ नको** होता. त्यांनीं एकंकारावर करडे अभिप्राय दिले आहेत व म्हणून ‘ एकंकारगजावरी पंचानन ’ अशा प्रकारची त्यांची स्तुतिही करण्यांत येत असते.

अलीकडे माजलेला समाजसत्तावाद व ऐक्याच्या नांवाखर सबगोलंकार करणारा देशभक्तांचा मिथ्या ऐक्यवाद हे दोन्ही इतर संतांप्रमाणेंच समर्थांना बिलकूल मान्य नव्हते. वर्णाश्रमधर्म व जातिभेद हे हिंदुधर्माचीं अंगें आहेत हें नाकारणें आंधळेपणाचें आहे. जातिभेद मान्य आहे, अन्य जातिद्वेष व स्वजातीचा अहंकारातिशय हे नसले म्हणजे झालें अशी आपली समाजनीति आहे. सर्वब्रह्मवाद्यांवर समर्थांनीं याच दृष्टीनें जागोजाग कोरडे ओढले आहेत. ‘ अति सर्वत्र वर्जावें, जातिभेद उठवून समाजांत बखेडे माजवूं नयेत व स्वजातीचा अतिरिक्त अभिमान वाहूं नये ’ अशी त्यांची शिकवण आहे. साम्यता चित्तांत असावी. सृष्टि भेदमय

---

१ मनाला भेटतां येत नाहीं, फुकट एवढे वाढलांत.

आहे, तिच्यांत अनुस्यूत असणारा आत्मा एक आहे. अभेद आहे तेथें तो पहावा, व्यवहारांत खिचडी करूं नये.

**( १ ) रायापासून रंकवरी । अवघ्या मनुष्यांचिया हारी ।**
**सकट समान सरी । कैसी करावी ? ॥ ८ ॥**
**देव दानव मानवें । नीच योनी हीन जीव ।**
**पापी सुकृती अभिप्राव । उदंड आहे ॥ ९ ॥**
**'एकांशें'[1] जग चाले । परी सामर्थ्य वेगळालें ।**
**येकासंगें[2] मुक्त केलें । येकासंगें रौरव[3] ॥ १० ॥**
**साकर माती पृथ्वी होय । परी ते माती खातां नये ।**
**गरळ आप नव्हे काय ? । परी तें खोटें ॥ ११ ॥**
**पापपुण्य स्वर्ग नरक । अवघेचि मानिले येक ।**
**विवेक आणि अविवेक । काय ( येक ) मानावे ? ॥ २७ ॥**

( द० १७, स० १० )

( २ ) वेडा विवेक व अविवेक सारें एकच समजतो ! ईश्वरानें नाना भेद केले आहेत, भेदांमुळें सृष्टि चालली आहे, पण आंधळे परीक्षक मिळाले तर खरी परीक्षा ( सारासारविवेक ) कसची होते ? करंट्याला उत्तम वस्तूची परीक्षा कशी व्हावी ? स्वतः जो दीक्षाहीन आहे त्यापासून दुसऱ्याला दीक्षा ( संप्रदायपरंपरेचें ज्ञान ) कशी मिळावी ? आधीं शुद्ध आचार पाळावे, त्यानें चित्त शुद्ध झाल्यावर विचार पहावा ( आचारशुद्ध पुरुषाला शुद्ध विचार स्फुरतात ), आचार व विचार दोन्ही असतील तरच परतीर गांठतां येतें. जें नेमकास ( नित्यनेमाच्या आचारमार्गानें चालणाऱ्यास ) कळणें कठिण तें ( ज्ञान ) बाष्कळास ( आचाररहित स्वच्छंदी मनुष्यास ) कसें कळावें ? डोळस अडखळतात तेथें आंधळे काय कामाचे ? पुण्यपाप, स्वर्गनरक, विधिनिषेध, विवेकअविवेक एक कसे मानावे ?

---

१ सात्त्विक, राजस व तामस, किंवा जाणते नेणते व मिश्र. २ संतसंगें. ३ नरक.

**पापपुण्य स्वर्गनरक । विवेक आणि अविवेक ।**
**सर्वब्रह्मीं काय येक । सांपडलें नाहीं ? ॥ २० ॥**

**सार आणि असार । अवघा जाला एकंकार ।**
**तेथें बळावला अविचार । विचार कैंचा? ॥ २३ ॥**

**भेद ईश्वर करून गेला । त्याचे बाचेन न वचे मोडिला ।**
**मुखामध्यें घास घातला । तो अपानीं घालावा ! ॥ २७ ॥**

**ज्या इंद्रियांस जो भोग । तो तो करी यथासांग ।**
**ईश्वराचें केलें जग । मोडितां उरेना ॥ २८ ॥ (द० १७, स० ४)**

सर्व ब्रह्म म्हणून एकंकार करणाऱ्या अविवेकी लोकांच्या मतास काय म्हणावें? सर्वब्रह्मवाद्यांना पुण्यपाप, स्वर्गनरक, सारअसार, विवेक-अविवेक, पतनपावन, निश्चयसंशय सारें ब्रह्मरूपच ! सर्वसंगपरित्याग आणि स्वेच्छाचाराचा विषयभोग, वंद्य आणि निंद्य, दोन्ही एकच मानल्यावर मग काय उरलें ? भेद ईश्वरानेंच केला आहे तो याच्या बापाला मोडतां येणार नाहीं. तोंडांत घालायचा घास अपानांत घातला तर काय चालेल ? ज्या इंद्रियास जो भोग उचित तोच त्यास दिला पाहिजे. देवाचे नियम मोडतां येत नाहींत. वेडेंवांकडें जाणावें, चालीवरून आंधळे ओळखावें, तसें बाष्कळ बोलणें वमनासारखें त्यागावें.

**पुण्यात्मा आणि पापात्मा । दोहींकडे अंतरात्मा ।**
**साधु भोंदु सीमा[1] । सांडूंच नये ॥ १२ ॥**

**मनुष्य आणि गधडे । राजहंस आणि कोंबडें ।**
**राजे आणि माकड । येक कैसीं ? ॥ १३ ॥**

**अंतर एक तों खरें । परी सांगातें घेऊं न येती महारें ।**
**पंडित आणि चाटपोरें[2] । येक कैसीं ? ॥ १४ ॥**

**शूरांहून मानिलें लंडी[3] । तरी युद्धप्रसंगीं नरकाडी ।**
**श्रीमंत सांडून बरांडी[4] । सेवितां कैसें ? ॥ १७ ॥**

---

१ मर्यादा, भेद. २ भित्रे. ३ फजीता. ४ भिकारी.

**भागीरथीचें जळ आप । मोरीसंवदणी तेंही आप ।**
**कुश्चिळ उदक अल्प । सेववेना ॥ १५ ॥**
**तैसें निंद्य सोडून द्यावें । वंद्य तें हृदयीं धरावें ।**
**सत्कीर्तीनें भरावें । भूमंडळ ॥ १६ ॥** (द० १३, स० १०)

आधीं आचारशुद्ध असावें, मग विचारशुद्ध. हाच विचार समर्थांनीं अनेक स्थळीं स्पष्ट सांगितला असून एकंकाराचें बंड मोडावयाचा उपदेश केला आहे. अलीकडचे बंगाली सत्पुरुष रामकृष्ण परमहंस यांना जातिभेदाबद्दल प्रश्न केला असतां ते म्हणाले, "ज्ञान झाल्यावर जातिभेद राहत नाहीं, अपाप नाहींसा होतो. परंतु ज्यांना ज्ञान झालें नाहीं त्यांना जातिभेद (संस्कारशुद्धीसाठीं) आवश्यक आहे. फोड बरा झाला, कीं खपली अपाप गळून खालीं पडते, पण मध्येंच मुद्दाम काढूं लागल्यास रक्त निघतें !"

(४) **ईश्वरें नाना भेद केले । भेदें सकल सृष्टी चाले ।**
**आंधळे परीक्षवंत मिळाले । तेथें परीक्षा कैंची ? ॥ २० ॥**
**उत्तमवस्तूची परीक्षा । कैसी घडे नतद्रक्षा ।**
**दीक्षाहीनापाशीं दीक्षा । येईल कैंची ? ॥ २३ ॥**
**आधीं राखावा आचार । मग पहावा विचार ।**
**आचारविचारें पैलपार । पाविजेतो ॥ २५ ॥**
**जें नेमकास न कळे । तें बाष्कळास केविं कळे ? ।**
**डोळस ठकती आंधळे । कोण्या कामाचे ? ॥ २६ ॥**
**विसर आणि आठवण । नेमस्त आणि बाष्कळपण ।**
**प्रचीत आणि अनुमान । येक कैंचे ? ॥ ३५ ॥**
**न्याय आणि अन्याय । होय आणि न होय ।**
**विवेकेंवीण काय । उमजों जाणे ? ॥ ३६ ॥**
**कार्यकर्ता आणि निकामी । शूर आणि कुकर्मी ।**
**धर्मी आणि अधर्मी । कळला पाहिजे ॥ ३७ ॥**

**धनाढ्य आणि दिवाळखोर । साव आणि तस्कर ।**
**खरें खोटें हा विचार । कळला पाहिजे ॥ ३८ ॥**

**वरिष्ठ आणि कनिष्ठ । भ्रष्ट आणि अंतरनिष्ठ ।**
**सारासारविचार स्पष्ट । कळला पाहिजे ॥ ३९ ॥**

जनीं जनार्दन म्हणून सर्वांच्या अंतरास संतोष द्यावा, पण सरसकट सर्वांचीच पूजा करूं म्हटलें तर मूर्खत्व अंगीं लागतें. गाढवाची पूजा केली तर ती त्याला कशी कळावी ? पूज्य विभूतींचीच पूजा करावी व इतरांस संतोषवावें, कोणाचें अंतर दुखवूं नये म्हणजे बरें. (द० १८, स० ४)

(५) **सकट विचार तो अविचार । कित्येक म्हणती एकंकार ।**
**एकंकार भ्रष्टाकार । करूं नये ॥ ३० ॥**

**कृत्रिम अवघें सांडावें । कांहीं येक शुद्ध घ्यावें ।**
**जाणजाणों निवडावें । अंतर्यामीं ॥ ३१ ॥** (द० २०, स० ७)

कांहीं तरी भरमसाट विचार तो अविचारच होय. कित्येक एकंकार प्रतिपादितात पण एकंकार म्हणजे भ्रष्टाचारच होय, तो करूं नये. सर्व खोटें टाकून खरें–निश्चळपरब्रह्म–सारासारविचारानें घ्यावें.

समानतेची किंवा समतावादाची योग्य मर्यादा ‘मानपंचक’ नांवाच्या प्रकरणांत उत्तम प्रकारें सांगितली आहे (पृ० ४६१–३). त्यांतील सिद्धान्त असा आहे —

(६) **भेदाभेदक्रिया देहीं लागली हे सुटेचिना ।**
**जेथील विषयो तेथें विपरीत करितां नये ॥**

**समान देखणें आत्मा समान करणें दया ।**
**वंद्य निंद्य विचारावें हे मुख्य जाणती कळा ॥**

तात्पर्य–**जगीं भेद कामा नये । वर्णसंकर करूं नये ।**
**आपला धर्म उडवूं नये । अभिमान खोटा ॥ ७६ ॥** (द० १४–१)

## १७ कार्यकर्त्यांस उपदेश

**१ राजकारणाची उपाधि**—'सृष्टीमध्यें बहुत लोक। परिभ्रमणें कळे कौतुक;' परिभ्रमणांतच वेधकशक्ति अंगीं असलेला एखादा गाजी आढळतो. असे गाजी ठायीं ठायीं शोधून कामाला लावावे. कोठें महंत-लक्षण आहे असें वाटतें पण तें वरपंग असतें! 'मोठीं राजकारणें चुकती। राजकारणीं वेढा लाविती'—राजकारणी डाव अंगावर घेतात व फजीत पावतात. त्यांच्या चुकीमुळें 'अवघे फडचि नासती। लोकांचीं मनें भंगती' व आपण चुकतों हेंही त्यांस कळत नाहीं. एखादा मनुष्य शिळा ( उत्साहशून्य ) असतो, त्याच्या बावळटपणामुळें विकल्पांचीं जाळीं उत्पन्न होतात, चित्तक्षोभ होतो, दूरदृष्टीनें अकलेचा बंद त्याला घालतां येत नाहीं. असलीं माणसें राजकारणास उपयोगी नाहींत. ज्याला उपाधी आवरत नाहीं त्यानें उपाधींत पडूंच नये. खरा महंत कसा असतो?—

**आपणास उपाधी मुळींच नाहीं। ऋणानुबंध मिळालीं सर्वही।**
**आल्यागेल्याची क्षिती नाहीं। ऐसें जालें पाहिजे॥ १४॥**

**कांहीं गल्बला कांहीं निवळ। ऐसा कंठीत जावा काळ।**
**जेणेंकरितां विश्रांतीवेळ। आपणासी फावे॥१५॥** (द० १९, स० ८)

**२ फड संभाळावा**—ह्या प्रपंचांत सर्वच काळ अनुकूल असतो असें नाहीं 'कांहीं सजे कांहीं न सजे। ऐसें आहे!' सर्वकाळ ऐकावें, शिकावें; 'ऐकिल्यावीण कळलें। शिकविल्याविण शहाणपण आलें। ऐसें देखिलें ना ऐकिलें। भूमंडळीं' म्हणून सर्वकाळ शिकावें, अभ्यास करावा, चाळणा करावी, जाणत्यांची संगति धरावी, शांतपणा व सहनशीलता धरावी. हें न कळल्यामुळें फड किंवा सभा संभाळतां येत नाहींत.

**बहुत जाणते मिळाले । येकापुढें येक बोले ।**
**लोकांचे आशय राहिले । कोण जाणे ॥**
**माझें होय तुझें नव्हे[2] । ऐसी अखंड जयास सवे ।**
**न्यायनीती सांडूनें धांवे । अन्यायाकडे ॥**
**आपणाहून देव थोर । ऐसा जयास कळला विचार ।**
**सकळ कांहीं जगदंतर । तेहीं राखावें ॥ ११ ॥**
**सभेमध्यें कळहो जाला । शब्द येतो जाणत्याला ।**
**अंतर राखों नाहीं सिकला । कैसा योगी ? ॥ १२ ॥**
**अखंड आपणा सांभाळिती । क्षुल्लकपण येऊं नेदिती ।**
**थोर लोकांस क्षमाशांती । अगत्य करणें ॥ १३ ॥**
**उपाय पर्याय दीर्घ प्रेत्न । विवेकबळें नाना येत्न ।**
**करील तयाचें महिमान । तोचि जाणे ॥ १४ ॥**
**न्याय पर्याय उपाय । मूर्खास हें कळे काय ? ।**
**मूर्खाकरितां चिवडा होय । मज्यालसीचा ॥ १५ ॥**

समर्थांनीं हें अलीकडच्या सभाचळवळींचें वर्णन केलें आहे असें वाटतें ! खरा महंत किंवा राजकारणी पुरुष कसा असतो ?—

**तो मनोगतांचीं अंगें जाणे । मान प्रसंगसमयो जाणे ।**
**संतप्तांलागीं निवऊं जाणें । नानाप्रकारें ॥ १८ ॥**
**बहुतजनांसी चालवी । नाना मंडळें हालवी ।**
**ऐसी हे 'समर्थ' पद्वी । विवेकें होते ॥ १९ ॥**
**विवेक एकांतीं करावा । जगदीश धारणेनें धरावा ।**
**लोक आपुला आणि परावा । म्हणोंचि नये ॥** (द० १८,स० १०)

१ सभेंत पुष्कळ बोलके मिळाले, कीं एकामागें एक आपापलीं मतें बोलत सुटतात, पण श्रोत्यांचें शंकासमाधान न होतां मनोगत तसेंच राहून जातें. पण याचा विचार करितो कोण ? २ माझें मत खरें व तुझें खोटें. ३ संवय. ४ दुराग्रहानें कांहींबाहीं बडबडत सुटतो. ५ दोष. ६ युक्त, शाहणा. ७ विवेकानें व दीर्घ प्रयत्नांनीं ज्याला सभा संभाळतां येते तोच पुरुष श्रेष्ठ होय. ८ सभा उधळते, फजीतवाडा होतो.

**३ चातुर्य**—चातुर्यावीण सारी विद्या, सर्व चळवळी व्यर्थ होत. फार बडबडे मिळाले, कीं शाहण्यानें मौन धरावें. 'बहुतांसी जाजू घेऊं नका,' बहुतांच्या मताचा ओघ एका प्रकारचा असतां तेथें विरुद्ध बोलून तंटे करूं नयेत. आपलें म्हणणें खरें असलें तरी फड मोडायला व लोकांचें समाधान बिघडवायला शाहण्यानें आपण कारण होऊं नये!

**नेणतेपण सोडूं नये। जाणपणें फुगों नये।**
**नाना जनांचें हृदय। मृदु शब्दें उकलावें॥** (द० १९, स० १०)
**त्यागी वोळखीचे जन। सर्वकाळ नित्यनूतन।**
**लोक शोधून पाहती मन। परी इच्छा दिसेना॥ ४॥**
**पुढें कोणाकडे पाहेना। पुढें कोणासी बोलेना।**
**पुढें येकेस्थळीं राहेना। उठोन जातो!॥ ५॥**
**जातें स्थळ तें सांगेना। सांगितलें तरी तेथें जायेना।**
**आपुली स्थिति अनुमाना। येवोंच नेदी॥ ६॥**
**अखंड एकांत सेवावा। अभ्यास करितचि जावा॥**
**काळ सार्थकचि करावा। जनांसहित॥ १०॥**
**उत्तम गुण तितुके घ्यावे। घेऊन जनांसी सिकवावे।**
**उदंड समुदाय करावे। परी गुप्तरूपें॥ ११॥**
**अखंड कामाची लगबग। उपासनेस लावावें जग।**
**लोक समजोन मग। आज्ञा इच्छिती॥ १२॥**
**लोक बहुत शोधावे। त्यांचे अधिकार जाणावे।**
**जाणजाणोनी धरावे। जवळी दुरी॥ १३॥**
**अधिकार पाहोन कार्य सांगणें। साक्षेप पाहोन विश्वास धरणें।**
**आपला मगज राखणें। कांहीं तरी॥ १४॥**
**हें प्रचीतीचें बोलिलें। आधीं केलें मग सांगितलें।**
**मानेल तरी पाहिजे घेतलें। कोणी येकें॥ १५॥**
**महंतें महंत करावे। युक्तिबुद्धीनें भरावे।**
**जाणते करून विखरावे। नाना देशीं॥१७॥** (द० ११, स० १०)

**४ निस्पृह महंत**—राजकारणांत महंतानें निस्पृहपणें व्याप वाढवून सकल लोक एकमुखी करावेत हें सांगतांना महाराष्ट्रानेंच कां पुढाकार घेतला पाहिजे व समर्थांनीं स्वतः आपलें कार्य कसें केलें हें १५ व्या दशकाच्या दुसऱ्या समासांत फार बहारीनें सांगितलें आहे. हा भाग आपण पूर्वी पाहिलाच आहे (पृ० २१५ ते २१७). याविषयीं ११ व्या दशकाचा ६ वा व १० वा हे दोन समासही फार उत्तम आहेत ते पहावेत. समर्थ शिकवितात—

**हरिकथानिरूपण। नेमस्तपणें राजकारण।**
**वर्तायाचें लक्षण। तेंही असावें॥ ४॥**
**पुसों जाणे सांगों जाणे। अर्थांतर करूं जाणे।**
**सकळिकांचें राखों जाणे। समाधान॥ ५॥**
**दीर्घ सूचना आधीं कळे। सावधपणें तर्क प्रबळे।**
**जाणजाणोंचि निवळे। यथायोग्य॥ ६॥**
**जो एकांतास तत्पर। आधीं करी पाठांतर।**
**अथवा शोधी अर्थांतर। ग्रंथगर्भीचें॥ ९॥**
**आधींच सिकोन जो सिकवी। तोचि पावे श्रेष्ठ पदवी।**
**गुंतल्या लोकांस उगवी। विवेकबळें॥ १०॥**
**सांकडीमध्यें वर्तों जाणे। उपाधीमध्यें मिळों जाणे।**
**अलिप्तपणें राखों जाणे। आपणासी॥ १३॥**
**ऐसा पुरुष धारणेचा। तोचि आधार बहुतांचा।**
**दास म्हणे रघुनाथाचा। गुण घ्यावा॥ १९** (द० ११, स० ६)

* * *

**महंतें ऐसें असावें। सर्वसार शोधून घ्यावें।**
**पाहों जातां न सांपडावें। एकाएकीं॥**

**५ निस्पृह व विरक्त**—महंतास उत्तम शिकवण दिलेले तीन समास विचारपूर्वक पाहण्यासारखे आहेत (द० २, स० ९; द० १४, स० १ व द० १८, स० ३) त्यांचा विस्तार कोठवर करावा? ते मूळांतच पहावेत.

विरक्तें धर्मस्थापना करावी । विरक्तें नीति अवलंबावी ।
विरक्तें क्षमा सांभाळावी । अत्यादरेंसी ॥
विरक्तें अभ्यास करावा । विरक्तें साक्षेप धरावा ।
विरक्तें वक्तृत्वें उभारावा । मोडला परमार्थ ॥
हरिकीर्तनें करावीं । निरूपणें माजवावीं ।
भक्तिमार्गें लाजवावीं । निंदक दुर्जनें ॥
स्नानसंध्या जपध्यान । तीर्थयात्रा भगवद्भजन ।
नित्यनेम पवित्रपण । अंतर शुद्ध असावें ॥
दृढ निश्चयो धरावा । संसार सुखाचा करावा ।
विश्वजन उद्धरावा । संसर्गमात्रें ॥ (द० २, स० ९)

६ **कार्यकर्त्यांच्या वतीनें रामप्रार्थना**—रामाचे जे दास असतील त्यांचे कल्याण व्हावें, त्यांना सौख्य व्हावें, त्यांचे उद्वेग दूर व्हावेत, त्यांचे शत्रु नष्ट व्हावेत व नंतर त्यांना सुखसोहळे प्राप्त व्हावेत, त्यांचें संकट ( कोडें ) निरसावें, त्यांच्यांत कलह नसावेत, त्यांची बुद्धि कपटकर्मांत रमूं नये, त्यांना मृत्युचिंता नसावी, त्यांना बहुगोष्टींचें वक्तृत्व असावें, ते विजयी व्हावेत, त्यांना आपदा नसाव्यात, अशा श्रीमान् लोकहितकर्त्या कार्यकर्त्यांना रामानें तारावें अशी त्यांच्या वतीनें समर्थांनीं या श्लोकांत रामरायाची प्रार्थना केली आहे !

रघुनाथदासा कल्याण व्हावें । अतिसौख्य व्हावें आनंदवावें ।
उद्वेग नासो वर शत्रु नासो । नानाविळासें मग तो विळासो ॥ १ ॥
कोडें नसो रे कळहो नसो रे । कापट्य कर्मीं सहसा नसो रे ।
निर्वाणचिंता निरसीं अनंता । शरणागता दे बहु धातमाता ॥ २ ॥
अजयो न हो रे जयवंत हो रे । आपदा नको रे बहुभाग्य हो रे ।
श्रीमंतकारी जनहीतकारी । परऊपकारी हरिदास तारी ॥ ३ ॥

## १२ महाराष्ट्रमहोदय

[ श्रीसमर्थ व शिवाजीमहाराज यांच्या काळीं महाराष्ट्रांत संत, कवि, वीर व मुत्सद्दी निर्माण होऊन महाराष्ट्राचा सर्वांगांनीं महोदय झाला तो रम्य इतिहास प्रस्तुत स्तोत्रांत गायिला आहे. हें स्तोत्र महाराष्ट्रीय तरुणांच्या पाठांत असलें पाहिजे. श्रीदासनवमीच्या उत्सवाच्या निमित्तानें मी १९२० सालीं गोंवें प्रांतीं गेलों तेव्हां हें मला स्फुरलें. मी याच्या ६०० प्रती गोव्यांत वांटल्या व पुण्याच्या नूतन मराठी विद्यालयानें याच्या हजार प्रती विद्यार्थ्यांस वांटल्या. केसरीकार म्हणतात: "ह्या स्तोत्रांत शिवकालीन महाराष्ट्राचें उज्ज्वल स्वरूप व्यक्त झाल्यानें प्रत्येक राष्ट्राभिमानी स्त्रीपुरुषानें हें मुखोद्गत करावें. रा. पांगारकरांची वाणीच स्फूर्तिदायक आहे. स्तोत्र हृदयंगम आहे."]

**महाराष्ट्र माझा असे हा पवित्र ।**
**हरिप्रीतिला सर्वथा पूर्णपात्र ॥**
**असा पुण्यभूभाग अन्यत्र नाहीं ।**
**मला नावडे यापुढें स्वर्ग कांहीं ॥ १ ॥**

**इथें चंद्रभागातटीं देव राहे ।**
**इथें पुण्यगोदावरीनीर वाहे ॥**
**त्रिलोकीं पहा ! ज्ञानदेवीसमान ।**
**नसे ग्रंथ सर्वांगसंपूर्ण जाण ॥ २ ॥**

**महाराष्ट्र माझा त्रिलोकीं प्रसिद्ध ।**
**इथें नांदती सत्कवी संत सिद्ध ॥**
**इथें शत्रुनिर्दाळणीं शूर वीर ।**
**इथें नांदती मानवांमाजि हीर ॥ ३ ॥**

इथें कार्यकर्ते इथें विश्वधर्ते ।
इथें शोकहर्ते इथें लोकभर्ते ॥
इहामुत्र सर्वां भवीं कर्णधार ।
इथें नांद्ले, नांद्ती, नांद्णार ! ॥ ४ ॥

इथें गाजला मर्द राजा शिवाजी ।
तुकाराम भक्ताग्रणी वीर बाजी ॥
इथें रामदास प्रभू तो समर्थ ।
अशा ना मिळे कोणता हो पुमर्थ ? ॥ ५ ॥

* * *

जनीं गाजतां या कलीचा प्रताप ।
बहू भोगिती संत गो विप्र ताप ॥
मनीं पापभीती सुरीती सुटोनी ।
सदाचार सन्मार्ग जातो खुटोनी ॥ ६ ॥

नसे स्नानसंध्या नसे नामनिष्ठा ।
न वैराग्य न ज्ञाननिष्ठा बलिष्ठा ॥
नसे भूतमात्रीं दयाधर्म कांहीं ।
मनें भ्रष्टती दुष्ट दुर्वासनांहीं ॥ ७ ॥

स्वधर्म स्वयें सांडिती वर्णजाती ।
तदा पुण्यसौख्यें लया सर्व जाती ॥
पहा ! पातकें दैन्य दारिद्य तेथें ।
उभीं ठाकती सोडिती धर्म जेथें ॥ ८ ॥

असा काळ येतां स्वयें विश्वनाथ ।
जनीं जन्म घेतो सवें येति संत ॥
अधर्मासि मोडूनि धर्मासि दावी ।
मुखें काय त्यां गोष्ट ती हो ! वदावी ॥ ९ ॥

जगीं धर्म नांदे सुखें विश्व कोंदे ।
सुखें चालती सर्व व्यापारधंदे ॥

घडी बैसते नीट वर्णाश्रमांची ।
यथापूर्व चाली रुळे सज्जनांची ॥ १० ॥

* * *

रितें तें भरे जें भरे तें रिचे कीं ।
असा खेळ खेळे विधी मृत्युलोकीं ॥
कधीं खोल जाये भरेही यशानें ।
चढे ऊतरे चक्रनेमिक्रमानें ॥ ११ ॥

पहा ! न्याय हा थोर सर्वांहि ठायीं ।
कुटुंबांस राष्ट्रांसही हाच पाहीं ॥
मना ! जाणुनी हें रघूत्तंसपायीं ।
बुडी देउनी स्वस्थ तेथेंचि राहीं ॥ १२ ॥

* * *

असो आज गाईन या सुप्रसंगीं ।
कथा प्रेमळा सोज्वळा अंतरंगीं ॥
महाराष्ट्र सद्भाग्यसंपन्न झाला ।
स्मरूं आदरें पूर्वजांच्या यशाला ॥ १३ ॥

* * *

पराधीनता सर्व राष्ट्रास आली ।
तिच्याकारणें लोकसत्ता बुडाली ॥
अती जाहली हीनदीन प्रजा ही ।
न वाली कुणी राहिला तीस पाहीं ॥ १४ ॥

निशा दाटली घोर अंधार झाला ।
विवेक स्वधर्मासवें पार गेला ॥
अशा त्या महाघोर आपत्तिकाळीं ।
हरिस्फूर्ति उत्पन्न झाली निराळीं ॥ १५ ॥

हरिप्रेरणेनें हरीचे निरोपी ।
जनां वाट दावावया शुद्ध सोपी ॥

१ आकाशतत्त्वांत

स्वधर्मी स्वकर्मी तयां जागवाया ।
सती संत झेपावले याचि ठाया ॥ १६ ॥

हरिप्रेमगोडी जना चाखवाया ।
स्वधर्मक्रिया सज्जना दाखवाया ॥
जना बोधवाया धरा उद्धराया ।
कवी संत झेपावले याचि ठाया ॥ १७ ॥

स्वदेशस्वधर्मस्वभाषादिकांसी ।
जिहीं दुर्जनीं मांडिलें वैर त्यांसीं ॥
स्वबाहुप्रतापें रणीं लोळवाया ।
महावीर झेपावले याचि ठाया ॥ १८ ॥

स्वराष्ट्रोदयाआड जें विघ्न आलें ।
रिपूंनीं रणीं वा गृहीं डाव केले ॥
स्वबुद्धिप्रतापें तयां तोड द्याया ।
सुमंत्र्यग्रणी पातले याचि ठाया ॥ १९ ॥

अहा ! धन्य तो काळ गावें तयासी ।
स्मरूं आदरें संतवीरोत्तमांसी ॥
कृती दिव्य त्यांची स्मरूं प्रेमभावें ।
गुणध्यान होतां स्वयें उद्धरावें ॥ २० ॥

* * *

जनीं रूढली दत्तभक्ति प्रसिद्ध ।
पहा गाणगापूरवाडींत सिद्ध ॥
तसे मोरयारंगनाथादि संत ।
बहू गाजले जागजागीं महंत ॥ २१ ॥

महाभक्त नाथ प्रतिष्ठानवासी ।
उदेला जगीं ज्ञानविज्ञानराशी ॥
घरीं चाकरी त्या करी कृष्णनाथ ।
तयें फार विस्तारिला भक्तिपंथ ॥ २२ ॥

तुकाराम सद्भक्त सर्वांसि ठावा ।
विरागी क्षमावंत सप्रेम गावा ॥
दयाशील दामाजि निंबाजिबावा ।
असा प्रेमळीं भक्तवृंद स्मरावा ॥ २३ ॥
कथा भारती गोड मुक्तेश्वरानें ।
तशा कृष्णलीलाहि त्या वामनानें ॥
बहूंनीं बहु ग्रंथ निर्माण केले ।
जनोद्धारकार्यास ते सिद्ध झाले ॥ २४ ॥

* * *

कुळस्वामिनी भोंसल्यांची भवानी ।
जना पावली धांवली ती निदानीं ॥
शहाजी न सामान्य योद्धा, न काचा ।
भलाईत हा जन्म गेला तयाचा ॥ २५ ॥
शहाजीस भार्या मिळाली जिजाई ।
तिच्या पूर्वपुण्यासि यत्ता न कांहीं ॥
सती निश्चयी धूर्त मानी सुशीला ।
तिच्या जन्मले श्रीशिवाजी कुशीला ॥ २६ ॥
तया थोर दादाजिही कारभारी ।
भला जाहला पूर्णता साहकारी ॥
दिलें शिक्षण क्षात्रधर्मानुसारी ।
पुराणीं शिवाच्या मनीं प्रीति भारी ॥ २७ ॥
कथा रामजीची कथा कृष्णजीची ।
कथा शक्तिभक्तिप्रदा मारुतीची ॥
कथा लक्ष्मणावीरबीभीषणांची ।
कथा स्फूर्तिदा भीष्मकर्णार्जुनांची ॥ २८ ॥
कथा ऐकतां पूर्ण तल्लीन झाला ।
शिवानें मनीं निश्चयो थोर केला ॥
स्वकर्तव्यनिष्ठाहि चित्तीं उदेली ।
महाराष्ट्रभूकामना तृप्त झाली ॥ २९ ॥

शिवाची विभूतीच राजा शिवाजी ।
महाभाग त्या जाहलें विश्व राजी ॥
भले भावडे गावळे मावळे ते ।
तयां वेधिलें लाविलें क्षात्रपंथें ॥ ३० ॥

बळी मावळे वीर तानाजि बाजी ।
येसाजी प्रभूवीर मूरारि बाजी ॥
फिरंगोजि नेताजी आनाजि गाजी ।
शिवाजीहि सप्रेम ज्यांतें नवाजी ॥ ३१ ॥

रणीं पिंगळे पेशवे वीर गाढा ।
जयें लोटिले शत्रु काळाग्निदाढा ॥
पिता-पुत्र नीराजि-प्रल्हाद गाजी ।
निळो-रामचंद्रांसि सारेहि राजी ॥ ३२ ॥

रघूनाथ हण्मंत विख्यात वीर ।
महाधोरणी कारभारी सुधीर ॥
जयें अर्पिली राष्ट्रकार्यांत सारी ।
स्वबुद्धी, शिवाजीस जो मान्य भारी ॥ ३३ ॥

तया मुख्य मंत्रीहि बाळाजि औजी ।
बहिर्जीहि वार्ताहरांमाजि मौजी ॥
शिवें गुंफिली थोर हे रत्नमाळा ।
बहू होय आनंद त्या लोकपाळा ॥ ३४ ॥

गुणश्रेष्ठ सत्पात्र हे प्रेमसूत्रें ।
शिवें वोढिले जोडिले पुण्यगात्रें ।
हिरे कोंदणामाजि हे बैसवूनी ॥
शिवें रुष्ट संतुष्ट केली भवानी ॥ ३५ ॥

बहू रत्नशाळा बहू पांचशाळा ।
बहू मौक्तिकांच्याहि शाळा विशाळा ॥
बहू जोडिती भूप—ऐसीं न रत्नें ।
तिथें—जोडिलीं जीं शिवें थोर यत्नें ॥ ३६ ॥

महावीर तानाजि त्याचा दरारा ।
अरी संगरीं कांपती त्या थरारा ॥
बडा रावणीवीर तो चंडदेही ।
उदेभान ज्याला रणीं भान नाहीं ॥ ३७ ॥
रणीं झुंजतां मल्लयुद्धासि आला ।
तयांचा तिथें घोर संग्राम झाला ॥
गडा देउनी सिंह कामासि आला ।
म्हणोनि शिवा शोकसंतप्त झाला ॥ ३८ ॥
पहा अफ्ज़ुला त्या फजूलास त्यानें ।
स्वहस्तें रणीं मारिलें नीकरानें ॥
वधाया धरी शत्रु कापट्यभाव ।
शठा ठोकितां नाहिं दोषासि ठाव ॥ ३९ ॥
असंभाव्य सामर्थ्य याचें कळेना ।
शिवाजी कुणा शत्रुला आकळेना ॥
किती मोडिले झोडिले चूर्ण केले ।
गळाले पळाले पुढारां न ठेले ॥ ४० ॥
समस्तांस मस्तांस हा काळ वाटे ।
मराठ्यांसवें झुंझतां धाक सूटे ॥
न काळाहि आटोपती बा मराठे ।
रणीं शूर झुंजार हे वीर लाठे ॥ ४१ ॥
जुमानी न विघ्ना हठें थोरल्याही ।
शिवें घातली पालथी पातशाही ॥
यशस्वी मनस्वी प्रभावंत झाला ।
महाराष्ट्रभाग्योदयीं सूर्य आला ॥ ४२ ॥

* * *

तया जेधवां होय राज्याभिषेक ।
निवाले सुखें हर्षले सर्व लोक ॥
चिरंजीव झाला खरा कर्मयोगी ।
जनांच्या मनीं नित्य साम्राज्य भोगी ॥ ४३ ॥

प्रजा स्वप्रजाशा तयें लोकपाळें ।
पहा पाळिल्या त्या कृपाळें नृपाळें ॥
समस्तांसि सन्मानुनी प्रेमभावें ।
शिवें लोक आकर्षिले सुस्वभावें ॥ ४४ ॥

स्वधर्मी विधर्मी स्वजाती विजाती ।
न हा भेद कांहीं शिवाच्या सुचित्तीं ॥
किती म्लेंच्छही पातले आश्रयार्थी ।
किती गोतही घातले ते अनर्थी ॥ ४५ ॥

झिजे लोककाजीं शिवा त्यास राजी ।
गुणोत्कर्ष देखोनि त्यातें नवाजी ॥
करी राष्ट्रहानी विरोधें न मानी ।
असो पुत्रही शत्रु मानी निदानीं ॥ ४६ ॥

शिवाच्या तळ्यामाजि हो वाघ गाय ।
जळ प्राशिती वानुं औदार्य काय ? ॥
तया लोभ तो सद्गुणांचाचि फार ।
मनीं द्वेषही दुर्गुणांचा अपार ॥ ४७ ॥

तया गाय पूज्या जशी माय साची ।
तशी ब्राह्मणीं थोर निष्ठा शिवाची ॥
सतीसंतअभ्यागतीं प्रेम भारी ।
भला धर्मनिष्ठ प्रभू सद्विचारी ॥ ४८ ॥

परस्त्री जया नित्य मातेसमान ।
भवानीसमा ज्यासि माताहि जाण ॥
तया मातृभक्ता न आघात पंथीं ॥
सदाचारकीर्तीहि फांके दिगंतीं ॥ ४९ ॥

शिवाजीस भार्या नऊ पुत्र दोन ।
गृहासक्ति नाहीं गृही तो असोन ॥
कधीं द्रव्यदारेंत गुंफे न कोठें ।
कसें धग्धगी श्रेष्ठ वैराग्य मोठें ॥ ५० ॥

भवानी जिजाई गुरू रामदास ।
तयांच्या नमी नित्य भावे पदांस ॥
त्रिमूर्तिप्रसादें यशा पावला हो ।
स्मरूं त्या शिवाच्या सदा पावला हो ॥ ५१ ॥
असा धर्मशाली महात्मा उदार ।
सदाचारस्वाचारसंपन्न थोर ॥
शिवासारखा भूप झाला न कोठें ।
स्वदेशी विदेशी पहा ग्रंथ मोठे ॥ ५२ ॥

*          *          *

स्वसौख्याभिलाषी न राजा शिवाजी ।
झिजे चंदनासारिखा लोककाजीं ॥
कलीमाजिं राजर्षि ऐसा न झाला ।
दिलें राज्यही सद्गुरूमाउलीला ॥ ५३ ॥
गुरूही पहा पूर्णभाग्योदयानें ।
भले लाभले त्या भवानीदयेनें ॥
तृणासारिखे ज्यासि त्रैलोक्यवित्त ।
विराला स्वरूपींच ठेवूनि चित्त ॥ ५४ ॥
"स्वकष्टार्जित प्राज्य राज्यास भोगीं ।
अकर्तात्मभावें अहंतेसि त्यागीं ॥
प्रजापालनीं दक्ष राहोनि सेवीं"
असें सांगुनी मस्तकीं हस्त ठेवी ॥ ५५ ॥
वसिष्ठें जसें बोधिल रामचंद्रा ।
शिवाजीस तैसें तुम्हीही मुनींद्रा ! ॥
स्वधर्मासि संरक्षिलें लोकनाथा ।
नमस्कार साष्टांग भावें समर्था ॥ ५६ ॥
परब्रह्म जें रामरूपासि आलें ।
तिथें आपुलें चित्त तें अर्पियेलें ॥
सखा ब्रह्मचारी हनूमंत केला ।
नमस्कार साष्टांग स्वामी तुम्हांला ॥ ५७ ॥

परब्रह्म तें जाणुनी जाणवीलें ।
महावाक्य संशोधुनी शोधवीलें ॥
स्वधर्मासि रक्षूनि संरक्षवीला ।
नमस्कार साष्टांग स्वामी तुम्हांला ॥ ५८ ॥

समस्तांसि द्याया सुखानें सुबोध ।
सुधानाम साजेलसा दासबोध ॥
प्रपंची विरागी रमे जेथ ऐसा ।
महद्‌ग्रंथ निर्मीयला रामदासा ॥ ५९ ॥

नमो ब्रह्मतेजा नमो क्षात्रतेजा ।
नमो रामदासा शिवाजी सुतेजा ॥
नमो सद्गुरो गा नमो शिष्यवर्या ।
सदा धांव गा पाव गा राष्ट्रकार्या ॥ ६० ॥



# १३ जयजयकार

१ समर्थांचें अंतःकरण (एक गद्य पत्र). २ शिवराज्याभिषेकोत्सव. ३ आनंदवनभुवन. ४ शिवरायाची अवतारसमाप्ति. ५ समर्थांचें प्रयाण. ६ समर्थचरित्राचा कालक्रम. ७ समर्थांची लग्नकुंडली. ८ जयजयकार.

## १ समर्थांचें अंतःकरण (एक गद्य पत्र)

शके १५९६ आनंद संवत्सर ह्या वर्षीच्या चातुर्मासांत समर्थ हेळवाकच्या घळींत होते. हें स्थान सातारा जिल्ह्यांत पाटणच्या पलीकडे कुंभारली घाटाच्या तोंडाशीं कोयनेच्या कांठीं असलेल्या हेळगांव गांवापासून उंच टेकडावर एका दरींत आहे.

राज्याभिषेकसमारंभ नुक्ताच रायगडावर झाला होता. त्यानंतर सुमारें एक महिन्यांतच समर्थ त्या घळींत जाऊन राहिले. स्थान रम्य व अत्यंत थंड, समर्थांचें वय या वेळीं ६६ वर्षांचें होतें. अशा उतारवयांत अशा निर्जन वनांत व थंड प्रदेशांत समर्थ म्हणूनच राहूं शकले. तेथें चातुर्मास राहिल्यामुळें शेवटीं 'शीतलाई बहुत जाली' म्हणून तेथून निघतांना जीं 'कित्येक कार्यें सिद्ध होणें राहिलीं होतीं' तीं सर्व आपले उपाध्ये पुराणिक व दिवाकरभटांचे व्याही रघुनाथभट नवहस्त पंडितराय यांजवर सोंपवून समर्थ घोड्यावर स्वार होऊन उष्ण देशाशीं चाफळास आले. 'चाफळास नवसाची समाराधना श्रींचे द्वारीं' केली, व 'शूद्रांचें भोजन सिंगणवाडीस करून दुसरे दिवशीं पंडितरायास स्वहस्ताक्षरें' पत्र लिहिलें तें पुढें दिलें आहे. यांतील '**मज रघुनाथजीवेगले कोण्ही जिवलग नाहीं,** आपण जाला समाचार रघुनाथजीस विदित केला' हे शब्द कोणाही प्रेमळास समर्थांच्या कोमल रामभक्तीचें स्मरण करवून तन्मय करितील यांत संशय नाहीं. 'तुमचें जें कांहीं आहे तें सकल माझेंचि आहे तुम्ही आमचेचि

आहां तुम्ही आम्ही सकल देवाचे आहों शरीरभेदावरी न जाणें अंतरस्थिति पाहिल्याउपरी कळों येईल ' ह्या वाक्यांत समर्थांच्या आत्मनिवेदनी भक्तीचें म्हणजे अभेदभक्तीचें रहस्य प्रकट झाले आहे, या लोकसंग्रहकारी महात्म्याचें हृदय त्यांत स्पष्ट दिसत आहे.

श्रीरामसमर्थ

उत्तमगुणालंकृत रघुनाथभक्तिपरायेण परोपकार राज्यमान्य राजेश्री रघुनाथभट गोसावी यांसी स्नेहपूर्वक सूचना. तुमचा निरोप घेऊन हेलवाकीहून स्वार[1] जालों ते सुखरूप चाफळास पावलों[2]. संकल्पाची समाराद[3]-नाही जाली. पुढें शरीराचा उपचारहि हळूहळू [4]होतो. तुमचें मन मजवरि बहुत आहे तें तुमचे आवडीच्या गुणें कल्याण होईल ऐसें नेमस्तें[5] चिन्ह दिसतें. आपण ते [6]कर्कश सीतलाईमधें बहुतचि श्रम पावलों, तो माझा सकळ श्रम घेउनु मज निरोप दिधला तो उपकार देव जाणे. येविसीं चीत चमत्कारलें ते पत्रीं किती म्हणौनु लेहावें ? माझें अरिष्ट तुम्ही घेऊन मज उष्ण देशासी पाठविले हा उपकार श्रीरघुनाथजीस जाला. **मज[7] रघुनाथजीवेगलें कोण्ही जिवलग नाहीं**; आपण जाला समाचार रघुनाथजीस विदित केला. याउपरी माझे ठायीं तुम्ही आहां. रघुनाथ-कृपेचा प्रत्यये तुम्हांस आलियावरी प्रचीतीसीं कळों येईल. बहुत काये

---

१ अश्वारूढ झालों. २ रघुनाथभट घळीपासून १॥ कोसावर असलेल्या हेळवाकी-पर्यंत समर्थास पोंचवावयास आले होते असे दिसतें. हेळवाकपासून पाटण ६॥ कोस व तेथून चाफळ ३॥ कोस म्हणजे घळीपासून चाफळ ११।१२ कोस. समर्थ १२ कोस घोड्यावर बसून आले. ३ कोणत्या संकल्पाची समाराधना ? ज्येष्ठांत शिवराज्याभिषेकसमारंभ झाला या आनंदप्रसंगाबद्दल समर्थांनीं चाफळास अन्नसंतर्पण केलें. ४ होत आहे, चालू आहे. ५ निश्चित. ६ अत्यंत थंड हवेंत राहिल्यानें. ७ समर्थांचा रामपायीं जिव्हाळा केवढा होता तें या भावनेवरून स्पष्ट आहे. जें जें होईल तें तें रामास निवेदन करायचें हें सख्यभक्तीचें लक्षण होय.

लेहावें ? वेदमूर्ती दिवाकरभटे गोसावी तेथें आलियावरी तुम्ही माझा समाचार घेयासी ये प्रांतीस आले पाहिजे. स्नेह बहुत असों दीजे हा पत्रार्थ. हें इतुकें म्या आवडीच्या कळवेळ्याने लिहिले आहे. मने मन साक्ष असेल, परंतु तुम्हास उपचारसा वाटोन रंजीस होलें तरी न होणें. जैसा दिवाकरभट तैसे तुम्ही हा इत्यर्थ आहे. बरे कळलें पाहिजे. तुमचा आमचा येकांत प्रसंग जालियावरी मग ऐसें लिहितां न ये, म्हणौनि ये संधीमधें प्रसंग फावला--पुढें फावेना म्हणौनि लाबे करूने लिहिले. वरकड इतर भाव मनामधे असेल तरी रघुनाथ साक्ष असे. तुम्ही रंजीस न होणें आणि जें आहे तें लिहिलें यामधें मिथ्यास्तुति नाहीं. तुम्ही सर्वज्ञ आहां. तुमचे जें कांहीं आहे तें सकल माझें आहे. म्यां मज माझ्या मनास येईल तैसें लिहिले येथें तुमचें काये गेले, कांहीं चिंता न कीजे. तुम्ही आमचेचि आहां, तुम्ही आम्ही सकल देवाचे आहों. शरीरभेदावरी न जाणें. अंतरस्थिती पाहिल्याउपरी कलों येईल !

## २ शिवराज्याभिषेकोत्सव ( § शके १५९६ )

भोसले हे अस्सल क्षत्रिय होते याविषयीं भरपूर पुरावा पुढें आला आहे. मराठ्यांतच जे कोणी संशयखोर होते त्यांच्या समाधानासाठीं गागाभट्टांनीं कांहीं खटपट केली. शहाजीराजे एका पत्रांत 'आपण रजपूत लोक' असें म्हणतात व त्या वेळच्या इंग्रजी पत्रांतही 'मोठा रजपूत शिवाजी पन्हाळा घेतला' ( १६५९ ) असे उल्लेख आहेत. साधुसंतांच्या पुण्याईचें,

१ हे समर्थाचे शिष्य महाबळेश्वरीं राहत. राजद्वारीं जाण्यायेण्याचें काम यांजकडे असे. २ असा कळवळा होता म्हणूनच सहस्रावधि लोक वेधले गेले. ३ रंजीस व्हाल, कष्टी व्हाल. ४ रघुनाथभट अद्याप समर्थाचे शिष्य झाले नव्हते; पण त्यांच्या मनीं समर्थाविषयीं भक्ति उत्पन्न झाली होती, अशा मधल्या काळांत. 'एकांत-प्रसंग' अद्याप आला नव्हता, समर्थाची 'अंतरस्थिति' अजून कळली नव्हती. ५ लांब करून ? विस्तारपूर्वक ? § ता० ६ जून, १६७४

समर्थांच्या कामगिरीचें, शिवाजीराजे यांच्या सुपुण्य पराक्रमाचें व सर्व महाराष्ट्र समाजाच्या सद्भावनेचें दिव्य फळ म्हणजे शिवरायाच्या राज्याभिषेकाचा रायगडावर झालेला महोत्सव होय. राज्याभिषेकोत्सव शनिवार शके १५९६ च्या ज्येष्ठ शुद्ध १३ स झाला त्याचीं उत्साहभरित वर्णने बखरींतून केलेलीं आढळतात. राज्याभिषेकोत्सवप्रसंगीं 'निदान २० हजार ब्राह्मण व शिवाजीचे सर्व अंमलदार हजर होते' असें सुरतकर इंग्रजांनीं त्या वेळीं लिहून ठेवलें आहे ! पण त्यांना समुदायाचा नीट अंदाज झाला नाहीं. शिवराज्याभिषेकोत्सव हा महाराष्ट्राच्या भाग्याचा व पराक्रमाचा उत्कर्ष होय. पूर्वीचे कित्येक दिवस नानाप्रकारचे धार्मिक विधि करण्यांत गेले. ब्राह्मणसमुदाय स्त्रीपुरुषांसकट ५० हजारांवर होता. याशिवाय पाहुणे, आप्त, कारभारी व अंमलदार, परराज्यांचे वकील, व्यापारी, प्रवासी, फौजेंतले प्रमुख लोक मिळून ५० हजार तरी सहज होते. एक लक्ष माणसांस पंचपक्वान्नाचें सुग्रास भोजन महिनाभर देण्याची व्यवस्था अगदीं चोख ठेवली होती. देवतांची पूजा झाली. 'रामवरदायिनी माता' प्रतापगडची भवानी ही शिवबाची कुलस्वामिनी. तिची पूजा करून तिला दीडमण वजनाची सुवर्णाची छत्री अर्पण करण्यांत आली. प्रायश्चित्त-विधि झाले. शिवबाची मुंज झाली. सप्तधातु व सप्तधान्यें यांची तुला करून एक लक्ष होन ब्राह्मणांस दक्षिणा वांटण्यांत आली. शिवबांनीं शुक्रवारीं गंगास्नान व उपोषण केलें. गोब्राह्मणप्रतिपालक, चातुर्वर्ण्यरक्षक, शत्रुसंहारक, प्रजापालक, मातृभक्त, गुरुभक्त, संतचरणासक्त अशा महापराक्रमी हिंदुराजाचा राज्याभिषेकोत्सव अत्यंत उल्हासांत झाला. कित्येक शतकांत असा सोन्याचा दिवस एखादाच येतो. शिवरायाचा हा राज्याभिषेकोत्सव म्हणजे सर्व कार्यकर्त्या वीरमुत्सद्दयांच्या पराक्रमाचा गौरव होय. शनिवारीं पहांटेपासून सारा गड आनंदोल्हासानें नाचत होता. मुख्य दालन उत्तम प्रकारें श्रृंगारलें होतें. स्वस्तिकें व शुभ वृक्ष व पशुपक्षी

यांचीं भिंतींवर चित्रे काढलीं होतीं. सिंहासन ३२ मण सोन्याचें करविलें होतें. तें रत्नजडित होतें. नवरत्नें सिंहासनास जडाव केलीं होतीं. छत्रही जडावाचें मोतिलग झालरीचें करून मस्तकावर धरिलें होतें. मुख्य दरवाजाजवळ उदककुंभ ठेवले असून गोपुराजवळ दोन हत्ती व सजविलेले अश्व ठेवले होते. हत्ती व घोडे बिकट वाटेनें गडावर कसे नेले असतील याचें इंग्रज प्रेक्षकांस नवल वाटलें ! शिवाजीमहाराज सिंहासनारूढ होतांच त्यांजवर सुवर्णपुष्पांची व रत्नांची वृष्टि झाली. नंतर १६ ब्राह्मण सुवासिनींनीं पंचारती ओंवाळली, ब्राह्मणांचे वेदघोष सुरू झाले, त्यांनीं आशीर्वाद दिले. गागाभट्टांनीं भरजरीचा राजमुकुट स्वहस्तें शिवरायाच्या मस्तकावर ठेवला व 'शिवछत्रपतीकी जय' असा घोष केला. जयजयकाराच्या नादांनीं सारा गड दुमदुमून गेला. शिवरायांनीं २४ हजार होनांची दक्षिणा ब्राह्मणांस वांटली. सात हजार होन गागाभट्टांस दिले. षोडश महादानें केलीं. अष्टप्रधानांस प्रत्येकीं लक्ष लक्ष होन व हत्ती, घोडे व वस्त्रालंकार दिले. युवराज संभाजी, राजपुरोहित गागाभट्ट व मुख्य प्रधान मोरोपंत पिंगळे हे तिघे सिंहासनाच्या किंचित् खालच्या जागीं बसले होते. बाकीचे सात प्रधान सिंहासनाच्या दोन बाजूंस उभे होते. दरबारी मंडळी व पाहुणे आपापल्या योग्यतेप्रमाणें उभे होते. हा सर्व समारंभ सकाळीं ८ वाजतां पूर्ण झाला. नंतर स्वारीची मोठी मिरवणूक हत्तीवरून निघाली. पायदळ, अश्वदळ, तोफखाना, नाना वाद्यें यांची गर्दी होती. आपल्या पराक्रमी व धर्मशील पुत्राचा तो भाग्योत्कर्ष पाहून राजमाता जिजाबाई यांना किती आनंद झाला असेल याची कल्पनाच करावी. जिजाबाईनीं परम समाधानानें १२ च दिवसांनीं देह ठेवला. त्यांचा अंत्यविधीही मोठ्या समारंभानें झाला. राज्याभिषेकाचा एकंदर खर्च १ कोटी ४२ लक्ष होन झाला. महिन्याभरानें शिवाजीमहाराज समर्थांच्या भेटीस गेले व तेथें महिनाभर राहिले. शिवरायाची कीर्ति सर्व हिंदुस्थानभर

झाली. आसामांतल्या हिंदूंनाही त्याचा अभिमान वाटत असल्याचे उल्लेख आहेत. भूखन कवीने शिवबावन्नींत आपल्या वीररसप्रचुर वाणीनें शिवरायाचा गौरव केलेला प्रसिद्ध आहे.

## ३ आनंदवनभुवन

**आतांही उदंड होतें। कल्पिल्यासारिखें घडतें।**
**काळ साहे होत जातें। इच्छेसारिखें॥**
**रंकाचे होती राजे। सामर्थ्य भूमंडळीं गाजे।**
**अद्भुतकीर्ती उदंड माजे। देखत देखतां॥**

—सप्तसमासी

यांत शिवरायाच्या राज्याभिषेकानंतर महाराष्ट्र सुखसंपन्न झाला, त्याचें गोड वर्णन आहे. हें महाराष्ट्राचें राष्ट्रगीत आहे, महाराष्ट्रमहोदयाचें महत्कार्य घडवून आणणाऱ्या महापुरुषाच्या मुखांतूनच तें निघालें आहे. दु:स्थिति संपून सुखाचे दिवस आल्यानंतरचा पूर्ण संतोष त्यांत व्यक्त होत आहे. 'आनंदवनभुवन' हें नांव समर्थांनीं शिवरायाच्या महाराष्ट्राला दिलें आहे. या समर्थांच्या राष्ट्रगीताच्या तोलाचेंच एक राष्ट्रीय प्रार्थनेचें गीत सुमारें शंभर वर्षांपूर्वीं महाराष्ट्रांत निर्माण झाले होतें आणि तें एकनाथांचें आदिमायेवरील पद्य होय ( खंड २ रा, पृ० ४३५ ते ४३९ पहा ). नाथांचें गीत ज्या भावनांचा उदय दर्शवितें त्याच भावनांचा उत्कर्ष समर्थांचें 'आनंदवनभुवन' या प्रकरणांत झालेला आहे. पहिल्या बीजाचें हें फळ आहे. दोन्ही गीतें वीर्यवती वाणीने महापुरुषांनीं लोकोद्धारार्थ गायिलीं आहेत. हीं महाराष्ट्राचीं राष्ट्रगीतें आहेत. आपण प्रस्तुत आनंदवनभुवनांत प्रवेश करूं.

शिवरायाच्या अमलाखालीं आलेल्या महाराष्ट्राच्या सीमेबाहेरच्या लोकांस उद्देशून समर्थ प्रथमच सांगतात कीं, 'एकवार आमच्या आनंदवनभुवनांत

येऊन तर पहा. जन्मापासून मरेपर्यंत संसारदुःखें सर्वांच्यामागें लागलींच आहेत, प्रपंचाचे कष्ट ज्याचे त्यालाच माहीत असतात; पण आपल्या सर्व अडचणी दूर सारून एकवार आनंदवनभुवनांत येऊन तर पहा ! येथें कसा आनंद दुमदुमून राहिला आहे ! प्रेमाने या अगर उदासीनपणानें या, पण एकदां या. संसारकष्ट भोगून त्रासले असाल तर ' आम्हांस येथेंच पुन्हा जन्मास घाल ' असें तुम्हीच देवाला विनवाल ! अहो ! या आनंदवनभुवनांत काय काय मौजा आहेत पहा ! रामरायाचा वेध लागून लोकांचें चित्त रामरूपीं लीन झालें आहे, रामराज्याचा सुखानुभव आज लोक घेत आहेत ! येथें लोकांस बहुत अपाय आजवर होत होते पण ' उपाय धाडिले देवें ' म्हणून आज सारा आनंद येथें पिकून राहिला आहे. ( पंचवटीच्या तपोवनांत तीस वर्षांमागें शके १५४६ मध्यें ) मी स्वप्नांत जें जें पाहिले तें तें आज ( शके १५९६ ) तसेच घडत आहे. मागचें सुखस्वप्न आज खरें झाले आहे ! मी हिंडत हिंडत ( पुणें साताऱ्याकडे ) गेलों तों स्वप्न खरे होणार अशी मनाला साक्ष पटली. किती चळवळी ( कल्लोळ ) सुरू झाल्या, समाधान वाटून या चळवळी यशस्वी होवोत अशी मी विघ्ननाशक देवाची प्रार्थना केली. स्वधर्माआड जीं जीं विघ्नें येत होतीं तीं तीं सारीं दूर पळालीं ( उठिलीं ), ' लाटिलीं कुटिलीं देवें दापिलीं कापिलीं बहु '—सर्व विघ्नांचा रामरायानें निःपात केला. विघ्नें एकदोन नव्हतीं, तर विघ्नांच्या फौजा उठल्या होत्या, पण बलभीमानें त्यांचा पार धुव्वा उडवून दिला—' घर्डिलीं चिर्डिलीं रागें रडविलीं बडविलीं बळें. ' प्रथम हाक बोंब फार झाली, पुढें खत्तल मांडिलें—संहारास प्रारंभ झाला. देवाचे लोक खवळले, मुख्य देवच ( शिवाजीच्या रूपानें ) उठला, काय होत आहे हें न कळून लोक प्रथम आश्चर्यचकित झाले ! स्वर्गंगाच कैलासाहून लोटली व रामगंगा प्रगट झाली व अनंतानंत तीर्थें उत्पन्न झालीं ( रामप्रेरणा अनेकांस होऊन ते मूर्तिमंत तीर्थरूप झाले,

तीर्थतुल्य पुण्यशील आत्मे प्रगट झाले ). त्रैलोक्यभर देवाच्या फौजा सुटल्या, पटापट परतंत्रतेचे बंद सुटून लोक सुखस्वरूप झाले. फार मोठी मोहीम सुरू झाली. अनेक देव प्रगट झाले, देवांची गर्दी उसळली, देवदासांची फत्ते झाली. ज्यानें मागें रासभें ( गाढवें ) राखिलीं तो विघ्नहर्ता गणेश, गण घेऊन लोकसाह्यार्थ आला ( पृ० १४६ पहा ). अनेक सुस्वर वाद्यें वाजूं लागलीं, नाना ध्वनींचे कल्लोळ उठले; छबिने, ढाला चालूं लागल्या. विजयादशमीच्या सुमुहूर्तानें मराठ्यांच्या सर्व फौजा सशस्त्र बाहेर पडतात तेव्हां शत्रूंवर अनेक अनर्थ कोसळतात. कल्पांतासारखा समय प्राप्त झाला. म्लेंच्छ-दैत्य बुडविण्यासाठीं देवांनीं महाराष्ट्रीय लोकांचा कैवार घेतला.

**बुडाले सर्वही पापी हिंदुस्थान बळावलें ।**
**अभक्तांचा क्षयो जाला आनंदवनभूवनीं ॥ २८ ॥**

'पूर्वी जे मारिले होते तेचि आतां बळावले' म्ह० पूर्वी रामावतारी जे राक्षस मारले होते तेच आतां नव्या रूपानें प्रगट झाले आहेत. मागें 'त्रैलोक्य गांजिलें होतें' तेव्हां देवांचा कैपक्ष (कैवार) घेऊन रामानें दैत्यांचा संहार केला. तेव्हां रामानें मारुतीस जनसाह्यार्थ धाडले होतें, आतां त्याच्या पुच्छाप्रमाणें महाराष्ट्र राज्य—महाराष्ट्राचें वैभव पसरत चाललें आहे! 'जेथून वाढला धर्मू रमाधर्म समागमें'—येथून धर्मस्थापनेचें कार्य सुरू झालें व त्याबरोबर लक्ष्मीही लोकांत नांदूं लागली. पारलौकिक व ऐहिक संपत्ति (अभ्युदय व निःश्रेयस्) दोहींचा उत्कर्ष झाला. लोकांत सुखसंतोष वाढला आहे.

---

१ सुरतकर इंग्रजांनीं स्पष्ट लिहिलें आहे: 'औरंगझेब बादशाहाचें धर्मवेड वाढत चाललें आहे...देवळें पाडून मशिदी बांधण्याचा त्यानें धोशा लावला आहे.'

**बुडाला औरंग्या पापी म्लेंच्छसंहार[1] जाहला ।**
**मोडलीं मांडलीं क्षेत्रें आनंदवनभूवनीं ॥ ३३ ॥**
**बुडाले भेदवाही ते नष्ट चांडाळ पातकी ।**

चंद्रराव मोऱ्यासारखे घरभेदे फितुरी लोकही नाहींसे झाले आहेत.

**गळाले पळाले मेले झाले देशधडी पुढें ।**
**निर्मळ जाहली पृथ्वी आनंदवनभूवनीं ॥ ३५ ॥**

मोडलेलीं देवमंदिरे पुन्हा उभारलीं गेलीं. त्यांचा जीर्णोद्धार झाला. धर्मकर्में निर्वेध सुरू झालीं. पृथ्वी म्हणजे भरतभूमी आतां पावन झाली.

**उदंड जाहलें पाणी स्नानसंध्या करावया ।**
**जपतप अनुष्ठानें आनंदवनभूवनीं ॥ ३६ ॥**

आतां जपतपादि पुण्यकर्में, पुरश्चरणें, स्नानसंध्या इ० धर्मकार्यें निर्वेधपणें करण्यास मोकळीक झाली. 'लिहिला प्रत्ययो आला'—भगवंतांनीं गीतेंत मी धर्मस्थापनेसाठीं युगायुगाचे ठायीं अवतार घेऊन दुष्टांचा विनाश व साधूंचें परित्राण करितों असें जें सांगितलें त्याचा प्रत्यक्ष अनुभव आला. भवानीनें मनोरथ पूर्ण केले.

**रामवरदायिनी माता गर्द घेऊनि ऊठिली ।**
**मर्दिले पूर्विंचे पापी आनंदवनभूवनीं ॥ ४१ ॥**
**प्रत्यक्ष चालिली राया मूळमाया समागमें ।**
**नष्ट चांडाळ ते खाया आनंदवनभूवनीं ॥ ४२ ॥**
**भक्तांसी रक्षिलें मागें आतांही रक्षिते पहा ।**
**भक्तांसी दीधलें सर्वै आनंदवनभूवनीं ॥ ४३ ॥**

---

१ बागलाणांत (नाशिक) नुक्ताच मोरोपंत पिंगळे यांनीं मोगलांचा साल्हेर-मुल्हेरीच्या डोंगराळ प्रदेशांत उघड मैदानावर भीमपराक्रम गाजवून दोन वर्षांत पुरा धुव्वा उडवून २७ किल्ले घेतले व सारा प्रदेश मराठी राज्यास जोडला होता–तो रोमहर्षक इतिहास पाहिला म्हणजे समर्थांच्या ह्या वचनाची सत्यता पटते. समर्थांचें चालू राजकारणाकडे पूर्ण लक्ष होतें असेंही यावरून स्पष्ट दिसतें.

रामवरदायिनी भवानीमाताच गर्द घेऊन उठली आहे तेथें काय कमी आहे ? ही मूळ माता जगदंबा प्रत्यक्ष रायासमागमें ( शिवरायाबरोबर ) चालली आहे, त्याच्या देहांत ती नांदत आहे, त्याच्याद्वारे ती नष्टचांडाळसंहाराचें व भक्तरक्षणाचें कार्य प्रत्यक्ष करीत आहे. तिनें आपल्या भक्तांना सर्व कांहीं दिलें आहे. आतां महाराष्ट्रांत 'आरोग्य जाहली काया वैभवें सांडिली सिमा' हा अनुभव येत आहे. देव, भक्त, व जीव सर्व एक झाले आहेत. वेदशास्त्राध्ययन, पुराणें, धर्मचर्चा, जुन्या कवितेचा जीर्णोद्धार व नूतनकवित्व, संगीतवादनकला, सर्वांचा आनंदवनांत उत्कर्ष होत असून सर्व कला व विद्या ऊर्जितावस्थेस येत आहेत. याप्रमाणें 'रामराज्य भूमंडळीं' पुन्हा झालें आहे.

जसा रामावतारीं स्वधर्माआड आलेल्या विघ्नांचा निःपात मारुतिरायांनीं केला त्याप्रमाणेंच आतांही त्यांनींच तो केला आहे हें म्हणण्यांत कर्तृत्वाचा अहंकार मानवांनीं बाळगूं नये असेंही या प्रकरणाचें रहस्य आहे. धर्मसंस्थापनेचें जें महत्कार्य साधुसंतांनीं व वीर मुत्सद्यांनीं केलें त्या कार्याचा म्हणजे महाराष्ट्राचा गौरव समर्थांनीं येथें हर्षनिर्भर होऊन केला आहे. शिवकालीन स्वधर्म व स्वराज्य यांच्या उत्कर्षाचा गौरव याहून अधिक ओजस्वी वाणीनें कोणी केला आहे ? व तो उत्कर्ष घडवून आणण्यांत ज्यांनीं जीवाचें रान केलें त्या महात्म्यानेंच तो गौरव केला आहे. यामुळें ह्या समर्थांच्या राष्ट्रगीताला अत्यंत महत्त्व आले आहे.

## ४ शिवरायाची अवतारसमाप्ति

समर्थ व शिवराय या उभय गुरुशिष्यांनीं धर्मरक्षणाचें महत्कार्य सुमारें ३० वर्षें एकजुटीनें केलें. पुढें भगवत्संकल्पानुसार ही जोडी फुटायची वेळ आली. शिवाजीमहाराजांचा थोरला मुलगा संभाजी राजे हा अत्यंत निग्रही, शूर, कर्तबगार व बापासारखाच धर्मप्रेमी होता; पण तारुण्याच्या

अल्लडपणामुळें व कांहींशा लहरी स्वभावामुळें त्याच्या हातून कांहीं आगळिकी घडल्या व त्यामुळें शिवरायास वर्ष दोन वर्षे मोठा मनस्ताप झाला. आपण महत्परिश्रमानें स्थापन केलेलें स्वराज्य हा पुढें कसें चालवील याची त्यांस काळजी उत्पन्न झाली. बापलेकांत वितुष्ट आलें, याचा फायदा करून घेण्यास शत्रु टपून बसलेच होते. दिल्लीपति औरंगजेबाचा एक मातबर सरदार दिल्लीरखान यानें मसलत करून संभाजीस फोडून आपल्या बाजूस वळवून घेतलें. शिवाजीमहाराजांनीं संभाजीस थोडेंसें नजरकैदेंत ठेवल्यासारखें केलें होतें. तेथून तो आपली स्त्री येसूबाई इला बरोबर घेऊन करकंब येथें दिल्लीरखानास जाऊन मिळाला. दोघांनीं विजापूरचें राज्य बुडविण्याचा मनसुबा केला. प्रथम त्यांनीं शिवाजीचें जडजवाहीर व मराठ्यांचे कांहीं कबिले ज्या किल्ल्यावर होते तो साताऱ्यानजीकचा भूपाळगड सर केला व तेथून ते विजापुरावर चाल करून गेले. विजापूरकरांनीं शिवाजीची मदत मागितली व शिवरायाच्या फौजेनें दिल्लीरखानास पळवून लावलें. दिल्लीरखानाने संभाजीस दिल्लीपतीचा बडा मनसबदार करण्याचा घाट घातला, पण दिल्लीपतीला संभाजी कदाचित् बापाच्या अंतःस्थ कारवाईनें आपणास फसविण्यासाठीं असा बहाणा करीत असेल असा संशय आला. औरंगजेब मोठा संशयखोर होता. शिवरायाची मंडळी संभाजीस परत आणण्याची खटपट करीतच होती व 'तुम्ही परत या म्हणजे महाराज तुम्हांस सर्व अपराधांची क्षमा करितील,' असें त्यास समजावीत होती. दिल्लीरखान करडा मुसलमान व संभाजी कट्टर हिंदु. दोघांचें पटणेंच शक्य नव्हतें. दिल्लीरखानानें लोकांची छळणूक चालविली. त्यानें अथणीची पेठ लुटून हिंदूंस पकडलें व त्यांची विक्री करण्याचें जाहीर केलें. संभाजी राजे यांनीं त्यास विरोध केला. दोघांत साहजिक वितुष्ट आलें. दिल्लीरखान आपणास कैद करून दिल्लीस पाठवील अशी भीति वाटून संभाजीराजे यांनीं युक्तीनें आपली सुटका करून घेतली व ते पन्हाळ्यास

आपल्या मंडळींत पुन्हा येऊन मिळाले. ह्या खेळखंडोब्यांत एक वर्ष गेलें. मुलगा परत आल्याचा शिवरायास संतोष वाटला. पन्हाळ्यावर बापलेक महिनाभर राहिले. दोघांनीं सर्व संपत्तीची व गड कारखाने वगैरेंची मोजदाद केली, तथापि एकदां ढांसळलेला संभाजीवरचा विश्वास पुन्हा शिवरायांस वाटला नाहीं. राज्याचें पुढें काय होणार या विवंचनेंत असतां ते सज्जनगडावर समर्थांच्या दर्शनास आले ( शके १६०१ पौष ). तेथें गुरुशिष्य महिनाभर होते. समर्थांनीं शिवरायास परमार्थ-विवेक पुष्कळ सांगितला. शिवराय परधामास लवकरच जाणार, असें समर्थ म्हणाले व त्याप्रमाणें शके १६०२ रौद्र संवत्सरीं चैत्री पौर्णिमेच्या दिवशीं रविवारीं शिवाजी राजे निजधामास गेले. शेवटीं शेवटीं त्यांच्या मनास उद्विग्नता आली. ४० हजार होनांची पुण्याची जहागीर होती. त्यावर एक कोटी होनांचें राज्य त्यांनीं संपादन केलें. पण तें रक्षून वाढवील असा पुत्र नाहीं याचा त्या पराक्रमी पुरुषास खेद वाटला. संभाजीला शिवरायाला आवरतां आलें नाहीं किंवा समर्थांच्या पश्चात् त्यांच्या प्रमुख शिष्यांत कलह सुरू झाले, याचा दोष त्या महापुरुषांकडे नाहीं. सृष्टीच्या स्वभावांतली ही एक मौज आहे !

शिवाजी राजे गेले तेव्हां राष्ट्र सारे उघडें पडले, सर्वांचा आधार गेला, हें मोठ्या हृदयद्रावक शब्दांनीं समर्थ-शिष्य उद्धव गोसावी यांनीं वर्णिलें आहे —

**गेला भोक्ता गडांचा गज हयपतिचा आणि त्या भूपतीचा ।**
**शूरांचा सज्जनांचा ऋषिजनमुनिचा आणि त्या देवतांचा ॥**
**भक्तांचा पंडितांचा चतुर सुमतिचा साबड्या भाविकांचा ।**
**नाना विद्याकवींचा कुशल जगतिचा बोलक्या नेमकांचा ॥ १ ॥**

शिवाजीमहाराजांच्या तालमींत वाढलेले राजकार्यधुरंधर व शूर वीर असे निळो सोनदेवांचे पुत्र विख्यात् रामचंद्र नीळकंठ अमात्य यांनीं आपल्या ‘राजनीति’ ग्रंथाच्या पहिल्याच प्रकरणांत शिवरायाच्या कारकीर्दीचें वर्णन

केलें आहे, तें वाचकांनीं अवश्य पहावें. सर्वच ग्रंथ महत्त्वाचा आहे. रामचंद्र नीळकंठ म्हणतात —

"श्रीमन्महाराज छत्रपति शककर्ते स्वामी पंधरा वर्षांचें वय असतां त्या दिवसापासोन मोठ्या साहसें व प्रतापें हें (महाराष्ट्र) राज्य निर्माण केलें. ज्या ज्या उपायें जो जो शत्रु आकळावा त्या त्या उपायें तो तो शत्रु पादाक्रांत करून सालेरीअहिवंतापासून चंचीकावेरीतीरापर्यंत निष्कंटक राज्य शतावधि किल्ले तसेंच जलदुर्ग, कितीएक विशाल स्थळें, चाळीस हजार पागा व साठ हजार शिलेदार, दोन लक्ष पदाति, कोट्यवधि खजिना तसेंच उत्तम जवाहीर-सकळ वस्तुजाल संपादिलें. सिंहासनारूढ होऊन छत्र धरून छत्रपति म्हणविलें. शाण्णव कुळीचे मराठे यांचा उद्धार केला. धर्मोद्धार करून देवब्राह्मण संस्थानीं स्थापून यजनयाजनादि षट्कर्में वर्णविभागें चालविलीं. तस्करादि अन्यायी यांचें नांव राज्यांत नाहींसें केले. देशदुर्गादि सैन्यादि बंद नवेच निर्माण करून एकरूप अव्याहत शासन चालविलें. केवळ नूतन सृष्टिच निर्माण केली. औरंगजेबासारिखा महान् शत्रु परितापसागरीं निमग्न करून दिगंत विख्यात कीर्ति संपादिली—**तें हें राज्य.**"

## ५ समर्थांचें प्रयाण

सामान्य जीव जन्माला आले कीं जनांला रडवितात व गेले कीं हंसवितात; पण थोर पुरुषांचें याच्या उलट असतें, असे कोणीसें म्हटले आहे; पण महात्मे जन्मतः जगाला हंसवितात व जातांना जग रडलें तरी स्वतः हंसतात. जन्म आणि मरण दोन्ही प्रसंग त्यांना सारखेच असतात. त्यांचा जन्म परमानंद भोगून जगाला तो देण्यासाठीं असतो. समर्थांनीं तपोबलानें देव आपलासा केला व जगाला शुद्ध परमार्थाचें परमसुख दिलें. आज्ञेप्रमाणें मी परमार्थ केला, आतां देहाचा कंटाळा आला असें त्यांनीं म्हटलें आहे. देहातीत जें हित तें ज्यानें साधलें त्याचा देह उभा असला

काय किंवा पडला काय दोहींचाही सुखदुःखभाव नाहीं. देहाचा संबंध सुटल्यावर त्याचें सोयरसुतक नाहीं. सद्गुरुबोधानें निःसंदेहता प्राप्त झाल्यावर 'आतां होणार तें होईना का। आणि जाणार तें जाईना का' याविषयीं संत निरपेक्ष असतात. जन्मभर किंवा अनेक जन्म त्यांनीं एवढी मोठी कमाई केलेली असते कीं, त्यांची जन्ममरणपरंपरा खंडित होऊन जाते. समर्थांनीं आपल्या जन्माचें सार्थक करून देह परोपकारीं लावला याबद्दल त्यांना केवढें 'आत्मसमाधान व धन्यता' वाटत होती हें आपण पूर्वीं (पृ० ४८८ ते ४९३) पाहिलेच आहे. 'विश्व उद्धरीन हेळामात्रें' एवढा प्रचंड आत्मविश्वास त्यांना वाटत होता व त्यांनीं लक्षावधि पतित पावन केले व पुढेंही पावन करण्यासाठीं ग्रंथरूपानें ते अमरच राहिले आहेत. समर्थ गेले नाहींत, आहेत. त्यांनीं मृत्यूच्या समासांत (दास० द० ३ स० ९) म्हटलें आहे कीं, मृत्यु हा धनाढ्य, बलाढ्य, गुणाढ्य, संग्रामशूर, चक्रवर्ती, राजकारणी, पंडित, गरीबश्रीमंत, पुण्यवंत व पापी, कवि, जाणते, तार्किक, बुद्धीचे चालक व बहुतांचे पालक, सर्वांच्यामागें लागला आहे. पण 'असो ऐसे सकळही गेले। परंतु येकचि राहिले। जे स्वरूपाकार जाले। आत्मज्ञानी.' ज्ञानी भक्तांना मायानदी आहेच कोठे? त्यांना 'एलीच थडी सरलें मायाजळ' (ज्ञानेश्वरी). असो. विस्तार कशाला? मरणाला मारून उरणारे जे विरळ महात्मे मनुष्यलोकीं अवतरतात त्यांतच समर्थांची गणना आहे. समर्थांचें कडकडित ब्रह्मचर्य, तीव्र वैराग्य, निस्सीम रामभक्ति, लोकोद्धाराची कळकळ, संघटनाचातुर्य, व्यवहार-दक्षता, निरिच्छपणाचें राजकारण, ओजस्वी कवित्व इ० गुणांची छाप महाराष्ट्रावर कायमची पडलेली आहे.

समर्थांच्या अवतारसमाप्तीचा काळ शके १६०३, माघ वद्य ९, हा होय. यासंबंधीं एक पत्र चाफळच्या दप्तरांतून प्रसिद्ध झालें आहे, तें महत्त्वाचें आहे. दुर्मति संवत्सरीं पुष्य वदि नवमीस म्ह० शके १६०३

च्या पौष वद्य ९ स 'आपला संपूर्ण प्रसंग सन्निधचि आहे' असें म्हणून समर्थांनीं संभाजी राजे यांस कांहीं बोध केला. तो असा —

" वर्षें पांचपर्यंत अति कठिण आहे. दैवि प्रार्थना सावधानतेनें रक्षिलें पाहिजे ॥ "

" पूर्वीं राजश्रीस ( शिवरायास ) राजधर्म व क्षात्रधर्म व अखंड सावधान ऐसीं पत्रें पाठविलीं होतीं, तीं पत्रें प्रसंगानुसार वाचून व मनासि आणून वर्तणूक होईल, तरी त्या वचनाचा अभिमान श्रीदेवासि आहे ॥ "

× × × × ×

" श्रीचे पेठेचें पत्र दृश्य करावें. कार्यकर्तें नीति वंदावी. श्रीकार्यासी अतितत्पर ऐशा पुरुषाच्या योगें धर्मवृद्धि आहे, धर्मवृद्धीनें राज्यवृद्धि आहे ॥ "

**इतुकें बोलिलों स्वभावें । यांत मानेल तितुकें घ्यावें ।**
**श्रोतीं उदास न व्हावें । बहु बोलिलों म्हणोनि ॥**
**औदार्यें धर्ममूर्ति । काय लिहिणें तयाप्रति ।**
**धर्मस्थापनेची कीर्ति । सांभाळली पाहिजे ॥ २ ॥**

" त्याउपरी मासा येका माघ वद्य अष्टमीस दोप्रहरां निद्रा करून उठले. ते समईं वचनें दोनि प्रत्येकी येकादशाक्षरे ॥

( १ ) देवद्रोही यांचा नाशचि आहे ॥

( २ ) समुद्रतीरस्थांचा नाश आहे ॥

याउपरी दुसरे दिवशीं नवमी दोनप्रहरां दर्शनासी बहुत लोक आले त्यांसी स्वमुखें आज्ञा दिल्ही ते लोक द्वारापासी उभेचि आहेत. संन्नीध कोणासही येऊं दिल्हें नाहीं. तेचि समईं पलंगावरून उतरोन पादुकावरी उत्तराभिमुख बैसले. श्रीचें स्मरण मोठ्यानें केलें ॥ श्रीरामदासस्वामी अवतार संपूर्ण केला ॥ श्री ॥ "

भीमस्वामींनीं श्रीसमर्थांच्या निर्याणप्रसंगावर ५० ओव्यांचें एक यथादृष्ट प्रकरण लिहिलें आहे. त्यांत पुढील ओव्या आहेत.

**राजा शिवछत्रपती । समर्थासी अतिप्रीती ।**
**सज्जनगडीं तेहीं वस्ती । करविली ॥ १ ॥**

त्यांनीं बहुत दिवस सेवा केली. संभाजीराजे समर्थदर्शनास गडावर आले तेव्हां समारंभ थोर केला. शके १६०३ च्या वैशाखांत 'आमचा येथें दहा मासच राहणें आहे,' असें समर्थ म्हणाले व माघ वद्य ९ हा आपल्या प्रयाणाचा दिवसही सांगितला.

**याउपरी बाहेर येणें । न घडे बहुत बोलणें ।**
**श्रीचें कार्य श्रीस्मरणें । करीत जावें ॥ १५ ॥**
**आपणामागें भगवंतासी । भजत जावें निश्चयासी ।**
**हेंचि मागणें शिष्यांसी । आणीक नाहीं ॥ १९ ॥**
**ऐसें सांगितलें सर्वांला । वस्त्रें दीधलीं सकलांला ।**
**मग आपण हो केला । वस्त्रत्याग ॥ २० ॥**
**अन्नपाणी दोन्ही नाहीं । अखंड समाधिस्थ पाहीं ।**

* * * *

**माघवद्य नवमी । दिवसा दोन प्रहर नेमी ।**
**शनवारीं परधामी । योग केला ॥ ३९ ॥**
**पलंगाखालीं उतरले । पादुका पाइं लेइले ।**
**उत्तर दिसेकडे केलें । मुख बरवें ॥ ४० ॥**

* * * *

**कोण्ही विचार पुसिला कांहीं । "पूर्वीच सांगितलें पाहीं ।**
**सांगावया आतां कांहीं । उरेचिना ॥ ४४ ॥**
**माझी काया आणि वाणी । गेली म्हणाल अंतःकर्णीं ।**
**परि मी आहें जगजीवनी । निरंतर ॥ ४५ ॥**
**आत्माराम दासबोध । माझें स्वरूप स्वतःसिद्ध ।**
**असतां न करावा हो खेद । भक्तजनीं ॥ ४६ ॥**

मग तीन वेळ रामस्मरण केले. 'रामनामें कोंदाटलें जिकडे तिकडे !' याप्रमाणें अवतार पूर्ण झाला. पंधरा दिवसांनीं देशोदेशीं भक्तजन जाते जाले !

उद्धवमठांतील एका बाडांत पुढील श्लोक आहे —

**माघ वद्य नवमी शनिवारीं । स्वामी पूर्ण दिवसाचि दुपारीं ।**
**राम भीमरूप होउनि ठेले । भक्तजेन भजना सुचवीले ॥**

## ६ समर्थचरित्राचा कालक्रम

शके १५२७ मार्गशीर्ष शुद्ध १३ श्रेष्ठांचा जन्म (१५२७–१५९९).

शके १५३० चैत्र शुद्ध ९ कीलक संवत्सरीं मध्यान्हीं जांब येथें श्रीरामजन्मोत्सवप्रसंगीं नारायणाचा ( समर्थांचा ) जन्म. त्याच वर्षी पुणें प्रांतीं देहूस तुकोबांचा जन्म.

शके १५३७ समर्थांचे वडील सूर्याजीपंत (श० १४९०–१५३७) निजधामास गेले.

शके १५३८ श्रावण शुद्ध ९ स मध्यरात्रीं रामरायाचा अनुग्रह.

शके १५४२ लग्नमंडपांतून पलायन, नाशीक पंचवटीस आगमन.

शके १५४२ माघ ते १५५४ फाल्गुन–टाकळीस पुरश्चरण: तीन गायत्री पुरश्चरणें व तेरा कोटी रामनामाचा जप. प्रत्यहीं दुपारीं ग्रंथाध्ययन. १५४४ मध्यें 'रामदासेन लिखितं वाल्मीकिरामायणम्'; याशिवाय भारत, भागवत, योगवासिष्ठ, उपनिषदें, शंकराचार्यांचे लेख, भगवद्गीता, गुरुगीता, अवधूतगीता इ० गीतांचें अध्ययन, मराठी संतकवींचे ग्रंथ–ज्ञानेश्वर, एकनाथ, दासोपंत, मुकुंदराज, कृष्णदास मुद्गल, रंगनाथ मोगरेकर, रमावल्लभदास, तुकाराम, त्र्यंबकराय इ० इ०

शके १५४५ उद्धव दशपुत्रे यांची गोष्ट ( पृ० ८३–८४ )

शके १५४९ वैशाख शुद्ध २ गुरुवार शिवनेरीस शिवजन्म ( ता. १० एप्रिल, १६२७ )

शके १५५१–५२ महाराष्ट्रांतील भयंकर दुष्काळ.

शके १५५३ नाशीक पंचवटीस शहाजीराजे व समर्थ यांच्या गांठीभेटीचा पूर्ण संभव.

शके १५५९ शहाजीस पुणेंसुपेंप्रांताची जहागीर. शिवरायाची पुण्यास वस्ती.

शके १५५४–१५६६ भरतखंडांतील आसेतुहिमाचल सर्व तीर्थक्षेत्रांच्या यात्रा. मातृदर्शन घेऊन कृष्णातीरीं गमन.

शके १५६६ महाबळेश्वर, वाई (दोन्ही ठिकाणीं मारुतिस्थापना करून) जरंडा, माहुली पाहिल्यावर मसूर येथें आगमन. मसूर परगणा शहाजीराजे यांच्या जहागिरीचा होता. ६६।६७ दिवाकर भट, कल्याण व बंधु दत्तात्रेय, आक्का, वेणु इ० प्रमुख शिष्यसमुदायाची जोड.

शके १५६६ ते १५७६ अकरा मारुतींची स्थापना. अकरा मठ व शिष्यांची तेथें योजना.

शके १५६६–१५७१ जयरामस्वामी, रंगनाथस्वामी, तुकोबाराय, रघुनाथस्वामी, आनंदमूर्ति, चिंचवडचे धरणीधर गोसावी, इ० संतमहंतांच्या गांठीभेटी.

शके १५७० चाफळ येथें श्रीराममंदिराची उभारणी याच सुमारास. एकवीससमासी दासबोध व दोकांडी रामायण यांची रचना.

शके १५७१ वैशाख शुद्ध ९ गुरुवार सिंगणवाडीचे बागेंत शिवरायास अनुग्रह. आषाढी एकादशीस पंढरीची यात्रा. तेथें तुकोबारायादि भक्तांच्या भेटी. फाल्गुनांत तुकोबांचें प्रयाण.

शके १५७०–७२ मोगलांशीं घनघोर युद्धें. मोरोपंत पिंगळ्यांचे पराक्रम.

शके १५७७ शिवरायानें राज्याच्या सनदा समर्थांच्या झोळींत टाकल्या व त्यांनीं त्या परत केल्या. मातोश्रीच्या अंत्यसमयीं जांबेस गमन. तेथून पुन्हा रामेश्वराच्या यात्रेस. तंजावरीं व्यंकोजीस अनुग्रह. वेणाबाईची मिरजेस स्थापना.

शके १५८० हुरड्याची गोष्ट ( पृ. २८९ पहा ). चाफळसंस्थानास शिवरायाकडून २०० होनांची वार्षिक नेमणूक.

शके १५८१ अफझुलखानवधप्रसंगीं शिवरायास पत्र (दास० १८-६) दासबोधग्रंथरचना द० ६ स० ४ पर्यंत तरी. बहुधा सप्तदशकी पूर्ण.

शके १५८३ प्रतापगड येथे देवीची स्थापना.

शके १५८८ शिवबाची आग्र्याहून सुटका. ब्रह्मनाळास रघुनाथ-स्वामींचे वृंदावन डोलल्याचा समर्थांस प्रत्यय.

शके १५९५ शिवरायाची कर्नाटकची स्वारी. वैराग्याचा संचार.

शके १५९६ ज्येष्ठ शुद्ध १३ शनिवार. शिवराज्याभिषेकोत्सव. नंतर शिवराय सज्जनगडीं समर्थदर्शनास येऊन १॥ महिना राहिले.

शके १६०० समर्थ प्रतापगडीं गेले. नवस फेडला. चाफळसंस्थानच्या उत्सवास शिवरायांनीं १२१ गांवची सनद दिली.

शके १६०२ चैत्र शुद्ध १५ शिवरायाची अवतारसमाप्ति.

शके १६०३ संभाजीस उपदेशपर पत्र. संभाजी गडावर आले.

शके १६०३ माघ वद्य ९ शनिवारीं दुपारीं समर्थांचें निजधामास गमन.

शके १५६६–१६०३ समर्थांचा संचार सर्वत्रच असे. ते एके ठिकाणीं फारकरून राहत नसत. तथापि सामान्यतः शहापूर ( १५६६–१५६९ ); चाफळ व परळी ( शके १५७०–७६ ); शिवथरच्या घळींत

( १५७७–८६ ), हेळवाकच्या घळींत ( १५८७–९४ ) व सज्जनगडीं ( १५९५–१६०३ ) याप्रमाणें त्यांची वस्ती असे.

## ७ समर्थांची लग्नकुंडली

[ श्रीसमर्थांची जन्मलग्नकुंडली व भावचलितकुंडली चांगल्या नामांकित २–३ ज्योतिष्यांकडून तयार करवून घेतल्या आहेत. लग्नांतच चंद्र असल्याकारणानें राशीकुंडली लग्नकुंडलीहून वेगळी नाहीं. समर्थांच्या चरित्रांतील गोष्टींशीं भावचलितकुंडली कशी मिळती आहे हें पाहणें मोठे बोधप्रद आहे. समर्थांचा जन्मकाळ सोमवार चैत्र शुद्ध ९ शके १५३० सूर्योदयात् गतघटि १५ पळें ७ हा आहे. जन्मभूमि जांब, तपोभूमि टाकळी व कर्मभूमि कृष्णातीर अगर भरतखंड. ]

जन्मलग्न कुंडली




भावचलित कुंडली



## ८ जयजयकार

[ समर्थांवर त्यांच्या शिष्यप्रशिष्यांनीं व इतरांनीं वाहिलेलीं कांहीं स्तुतिसुमनें पुढें दिलीं आहेत. ह्या सुमनांचा सुगंध सर्वभर दरवळून राहिला आहे. समर्थांकडे आत्मज्ञानी, योगी, भक्त, धर्मरक्षक, अवतारी ह्या दृष्टीनें त्यांच्या सांप्रदायिकांनींही पाहिले आहे. अर्वाचीन देशभक्तांची दृष्टि त्यांत नाहीं ! ]

**कल्याण :—**

(१) ज्यासी दीनबंधु नाम हें साजे । ज्यासी देहींच देवपण गाजे ।
ज्ञानवैराग्यसंपन्न राजे । ज्याच्या दर्शनें चिन्मये पुण्य माजे ॥ १ ॥
गे बाइये आवडी तयाची मज मोठी । चित्तीं अखंड पडली मिठी ।
साधुजनाची बहु उंच कोटी । कृपादृष्टी तारिल्या भक्त कोटी ॥ध्रु०॥
ज्याचा परमार्थवृक्ष अंकुरला । शाखा पल्लवीं विस्तारला ।
नवविधा प्रकारें मुहुरला । शुद्ध निष्काम भजनें फळा आला गे बाइये ॥ २ ॥
ज्याची अपार धारणाधृति । ज्याची वेदांत काव्यसंमती ।
ज्याची अगम्य न गमे गती । ज्याचीं चरित्रें सर्वत्र गीतीं गाती गे बाइये ॥ ३ ॥
सर्व तीर्थांचें तीर्थ ते साधु । सर्व देवांचे देव ते साधु ।
अग्रपूजेसि वंद्य ते साधु । स्वस्वरूपाचे मायबाप साधु गे ॥ ४ ॥
ज्यासी मुळींच मीपण नाहीं । ज्यासी समान देखणें देहीं ।
जेहीं आपणास सेविले ठाईं । सर्व कल्याण त्याचिये पाईं गे बाइये॥५॥

(२) अलभ्याचा हा लाभ जाहला । विश्वजनासी उपेगा आला ।
कीर्तिरूपेंचि विस्तारला । दाही दिशा भरोनि पुरवला ॥ १ ॥
गे बाइये स्वामी तो आठवे मनीं । नित्य बोलतां चालतां जनीं ।
स्वप्नसुषुप्ति जागृति मौनीं । खंड नाहींच अखंड ध्यानीं ॥ ध्रु० ॥

भक्तिप्रेमाचें तारूं उतटलें । ज्ञानवैराग्यतीरीं लागलें ।
संतसज्जनीं सांठवीलें । हीनदीनांसि तेहिं उद्धरिलें ॥ २ ॥

ज्याच्या गुणांसी नाहीं गणना । ज्याच्या कीर्तीसी नाहीं तुळणा ।
जो स्वयंभ श्रीगुरुराणा । ब्रह्मादिकांसि बुद्धि कळेना ॥ ३ ॥

धर्मस्थापना स्थापियेली । न्यायनीतीनें भक्ति वाढविली ।
संतमंडळी ते निवाली । बहु दास ज्याचे भूमंडळीं ॥ ४ ॥

जन्मजन्मांतरीं पुण्यकोटी । बहु संचित होतें गांठीं ।
योगीरायाची जाली ज्यास भेटी । त्यास कल्याण होय सृष्टी ॥ ५ ॥

( ३ ) वेदांतसंमतीचा काव्यसिंधु भरला ।
श्रुतिशास्त्रग्रंथगीतासाक्षसंगम केला ।
महानुभाव संतजनीं अनुभव चाखिला ।
अज्ञान जडजीवां मार्ग सुगम जाला ॥ १ ॥

जयदेवा दासबोधा ग्रंथराजा प्रसिद्धा ।
आरती वोवाळीन विमलज्ञान बाळबोधा ॥ ध्रु० ॥

नवविधा भक्तिपंथें रामरूप अनुभवी ।
चातुर्यनिधी मोठा मायाचक्र उगवी ।
हरिहरहृदयींचें गुह्य प्रगट दावी ।
बद्धचि सिद्ध जाले असंख्यात मानवी ॥ २ ॥

वीसहि दशकींचा अनुभव जो पाहे ।
नित्यनेमें विवरितां स्वयें ब्रह्मचि होये ।
अपार पुण्य गांठी तरी श्रवण लाहे ।
कल्याण लेखकाचें भावगर्भ हृदय ॥ ३ ॥

( ४ ) पतितपावन । पावन योगी स्वामी माझा ॥
व्यापिलें हें भूमंडळ । कवित्वकळा तुंबळ ।
विवरतां केवळ । मोक्ष लाभे ॥ २ ॥
नरनारी तटस्थ । अर्थ पाहती समर्थ ।
यमपुरी ठेली व्यर्थ । कलियुगीं ॥ ३ ॥

कीर्ति ऐकतां पापी । जाले अनुतापी ।
दर्शनें पुण्यस्वरूपी । सिद्ध जाले ॥ ४ ॥
वेदगर्भा प्रगटविलें । बहुतां कळेसें केलें ।
पाषांडातें भ्रष्टविलें । नीतिन्यायें ॥ ५ ॥
ज्ञान वैराग्य भजन । स्वधर्मसंरक्षण ।
म्हणोनि अवतारी जाण । योगमूर्ती ॥ ७ ॥
दासा कल्याण केलें । निजधाम दाखविलें ।
श्रुतिशास्त्रां ठक पडिलें । मौन्यरूपें ॥ ९ ॥

( ५ ) एका पदांत पुढील कडवें आहे—

अध्यात्मखाणी ग्रंथवाणी वदोनि गेली
न कळे महिमा न गणे सीमा काय बोलिली ।
भक्तमंडळी भूमंडळीं कोणें मोजिली
उत्तम मूर्ति अपार कीर्ती विश्वीं दुमदुमली ॥

( २ ) गिरिधर एका ४० श्लोकांच्या सुंदर संस्कृत स्तोत्रांत म्हणतात—

ब्रह्मेति भावनाभाव्यं लोकानंदं जगद्गुरुम् ।
प्रणम्य चरितं वक्ष्ये कृष्णातीरनिवासिनः ॥ १८ ॥
कांतारांतरमाश्रित्य मोक्षश्रीमाभिकांक्षयन् ।
जहौ सिद्धिमयान् प्राणानणिमादीन् स्वयंप्रभुः ॥ १९ ॥
देवसंस्थापनार्थं च प्रासादं निर्ममे पुनः ।
नवम्यां च रथोत्साहं ब्रह्मानंदं चकार सः ॥ २१ ॥
निस्पृहान् सत्पटन् लोकान् कृत्वा रामस्य सेवकान् ।
सत्तामात्रः स्वयं श्रीमानासीद्बोधस्वरूपधृक् ॥ २२ ॥
चतुर्वेदरहस्यज्ञं ब्रह्मविद्याविशारदम् ।
आत्मसिद्धिप्रदातारं वंदे गुरुवरं परम् ॥ ३१ ॥
एकांतमशनं दिव्यमनेकाद्भुतदर्शनम् ।
सर्वदेशांतरे दृष्टमेकस्मिन्समये जनैः ॥ ३५ ॥

सज्जनाद्रि महारम्ये सच्चिद्घनसुरालये ।
जगद्गुरुमहं वंदे पूर्णज्ञाननिधिं परम् ॥ ३७ ॥

( ३ ) **उद्धवगोसावी,** टाकळी व इंदूरबोधनमठाचे अधिपति म्हणतात —

योगी सर्वस्वें मोकळा । पाहतां त्याची अकळ कळा ।
पाहतां दुनियाहूनि निराळा । सर्वस्वेंसी ॥
धन्य धन्य महापुरुष । तेचि ईश्वराचे अंश ।
शुकासारिखे उदास । म्हणती त्यांसी ॥
शिवरामाला तारिलें । जन्मापासुनि मुक्त केलें ।
भक्तलोक मुक्त केले । रामराजें ॥

( ४ ) एक श्लोक —

निस्सीमभक्ती रघुराजपाई । वैराग्यबोधें विचरे सदाही ।
त्या रामदासें ध्वज लावियेला । श्रीरामनामें जन उद्धरीला ॥

( ५ ) अनंत कवि —

निर्माणस्थळ गौतमी परि महाकृष्णातिरीं जो वसे ।
कांतासंग नसे प्रपंचहि नसे आशा दुराशा नसे ॥
ज्याला उत्तम रामदास म्हणती त्रैलोक्य वंदीतसे ।
ऐसा सद्गुरु हा अनंत कविचा बद्धांस तारीतसे ॥ १ ॥

वस्त्रें हुर्मुजि भर्जरी पटकुलें माथां चिराही असे ।
काया सुंदर गौरवर्ण विलसे भाळीं अवाळू असे ॥
स्वामींचा कवितासमुद्र अवघा कल्याण लीहीतसे ।
ऐसा सद्गुरु हा अनंत कविचा बद्धांस तारीतसे ॥ २ ॥

जेणें सात्त्विकराजसादिहि तिन्ही आत्मस्थिती आटले ।
वेदांतांबुधिचे प्रभाव अवघे जेणें निराकर्णिले ॥
विज्ञानें भवसिंधुपार तरला जिंकोनि साही धुरा ।
ऐसा सद्गुरु रामदास विलसे जो निस्पृहांचा तुरा ॥ ४ ॥

ज्याची गाढ उपासना जरि असे जाणे अयोध्यापती ।
नेणे त्याहुनि अन्य दैवत असे ऐशी जयाची स्थिती ॥
ज्याचा गुप्त विचारही परि असे नारी नरां लेंकुरां ।
ऐसा सद्गुरु रामदास विलसे जो निस्पृहांचा तुरा ॥ ५ ॥
सह्याद्रीगिरिचा विभाग विलसे मंदारशृंगापरी ।
नामें सज्जन जो नृपें वसविला श्रीऊर्वशीचे तिरीं ॥
साकेताधिपती कपी भगवती हे देव ज्याचे शिरीं ।
तेथें जागृत रामदास विलसे जो या जना उद्धरी ॥ ६ ॥

( ६ ) रघुनाथपंडित —

वैराग्यभाग्य भरलें असतां अनन्या ।
आल्या जयाप्रति चतुर्विध मुक्तिकन्या ॥
चौथी तयांत वरिली उरल्या न पाहे ।
तो आमुचा गुरु समर्थ समर्थ आहे ॥ २ ॥
खेळावयास हनुमंत गडी जयाचा ।
जो या महीवरि वसंत जितेंद्रियांचा ॥
ज्याचीं पदें प्रणमिताति कवींद्र राजे ।
श्रीरामदास गुरु तो अमुचा विराजे ॥ ४ ॥
जो डोंगरीं गिरिदरीं फिरतां न भागे ।
ज्याची पवित्र घनकीर्ति जगीं विराजे ॥
जो तत्त्वबोध कविता करितां न मोजी ।
तो रामदास गुरुवर्य नमो नमो जी ॥ ५ ॥
शोभे शतद्वय समास समास भारी ।
जो दासबोध निजबोधसुखा उभारी ॥
त्या शेवटीं दशक जोडित जो विसावा ।
श्रीरामदास गुरु तो अमुचा विसावा ॥ ६ ॥
चिद्बोध शेज अरुवार नव्या फुलांची ।
सायुज्यमुक्ति असतां ललना जयाची ॥
तो रामदास अकलत्र असें गणावें ।
अज्ञान होत जन काय तयां म्हणावें ॥ ७ ॥

जो भर्जरी सरस पाटल वर्ण चेले ।
शोभे जयास लघुसें निटळीं अवाळें ॥
बोले समर्थ रघुवीर समर्थ ऐसें ।
तो मी स्तवीन निजसद्गुरु वाग्विलासें ॥ ९ ॥
जेणें प्रशिष्य निजशिष्य अनेक केले ।
देतां प्रसाद कफनी कफ नीट झाले ॥
लोकाभिराम गुरु बोलत रामकर्ता ।
साष्टांग वंदन करीन तया समर्था ॥ १० ॥
श्रीरामदासगुणवर्णनरूप पद्यें ।
वृत्तें वसंततिलका सुजनैकहृद्यें ।
संख्या करूनि दशकावरि एकतेनें ।
केली अपूर्व रघुनायक पंडितानें ॥ ११ ॥

( ७ ) रघुवीर —

आरती रामदासा । गोदातीरनिवासा ।
उत्तरे जन्म तूझा । मायाब्रह्म परमहंसा ॥ ध्रु० ॥
सावधानीं अर्थ केला । राहे विवाहाची कथा ।
पळोनि वनवासीं । एकांतीं विचरतां ।
आंजनेय मूळमूर्ती । भेटी होतां हनुमंता ।
श्रीराम भेटवीले । तुजलागीं समर्था ॥ १ ॥
अवतार मारुतीचा । कटीं कौपीन साजे ।
हुर्मूज दिव्य छाटी । ब्रह्मचर्य विराजे ।
पेरिलें शिष्यक्षेत्रीं । महावैराग्यबीज ।
संसार उडवीला । दिल्हें वेदांत सहज ॥ २ ॥
मूढांसि उपकार । दयासागरें केला ।
दासबोध ग्रंथवर्य । विस्तारें वाढवीला ।
तत्त्वार्थबोध पूर्ण । संशयो निरसीला ।
रघुवीर स्वामीराजा । त्यासी प्रत्ययो आला ॥ ३ ॥

(८) श्रीधरस्वामी बिडवाडकर —

धन्य दासबोध सार । सर्वत्रांसी नौक थोर ॥ १ ॥
शीड लागे सद्भक्तीचें । वलें रामनाम साचें ॥ २ ॥
ब्रह्मरूपाचें सुकाणूं । सांभाळितां नलगे शीणू ॥ ३ ॥
भवसागर पार करी । निष्ठा ठेवितां अंतरीं ॥ ४ ॥
तरीच रामदास बोळे । श्रीधर स्वानुभवें बोले ॥ ५ ॥

(९) कारंजाचे रोकडाराम —

कृष्णातिरीं गड असे परळीच नाम
तेथें निवास करिती अवतार भीम ।
तारी समस्त जग पूर्ण करोनि आशा
हा मस्तकू निजपदीं गुरु रामदासा ॥ १ ॥
खरें ज्ञानवैराग्य सामर्थ्य ज्याचें
रघूनायकावीण वक्तृत्व कैचें? ।
असे ग्रंथ हा दासबोधू बरासा
नमस्कार माझा तया रामदासा ॥ ३ ॥

समर्थांवरील आरतींत रोकडाराम म्हणतात —

आरती रामदासा । स्वयंबोधप्रकाशा ।
वैराग्यज्ञानभक्तिरूप । अरूप ठसा ॥ ध्रु० ॥
निर्गुण सगुणरूप । भावबळें प्रगटलें ।
अज्ञान जडजीव । रामनामें तारियेले ॥ १ ॥

(१०) हरिहरस्वामी आपल्या समर्थचरित्रांत म्हणतात —

सत्य करावया वचन ब्रह्मचारी । जाले अवतारी रामदास ॥
रामदासें दास रामा भेटवीले । मग उपदेशिले पूर्णज्ञानें ॥
दासबोध ग्रंथ केला पैं सुगम । वारिला तो भ्रम अज्ञानांचा ॥
निस्पृहांची चिंता समर्थें वारिली । कामधेनु दिली सिद्धी हातीं ॥

**ठायीं ठायीं ठायीं देवें बैसविलीं। भाविकें लाविलीं भक्तिमार्गा॥**
**पूर्ण अवतार कृष्णातीरीं वास। सज्जनगडास वसविलें॥**
**दीपें दीप पुढें लागले बहुत। अगणिता गणित कोण करी?।**

कामधेनु म्ह० भिक्षा.

( ११ ) **अनंतदास** समर्थांच्या आरतींत त्यांच्या रूपाचें वर्णन करितात —

**धन्य भूमंडळीं अगाध महिमान**
**वस्त्रें हुर्मुजी ज्याचीं शोभायमान।**
**काया सुंदर दिसे अति गौरवर्ण**
**मस्तकीं चिरा साजे सुहास्यवदन॥**

( १२ ) **आत्मारामबुवा** म्हणतात —

**स्वरूपीं समरसला म्हणोनि योगी।**
**रुचला स्वानंदु म्हणोन भोगी॥**
**हरिला जड भ्रम म्हणोन त्यागी।**
**निःसंगी निर्जी निजचि तो॥**
**कंहींच न लिंपे म्हणोन विरक्त।**
**स्वयें थोरावला येक महंत।**
**दाता तो वोपिता स्वात्मसुखातें।**
**त्या समर्थस्वामीतें नमोनमः॥**

( १३ ) **रामचंद्र दिनकर** —

**आरती रामदासा। सद्गुरु सर्वेशा।**
**कायावाचामनोभावें। वोवाळूं परेशा॥ १॥**
**रामदास मूर्तिमंत। रामचंद्रअवतार।**
**कलियुगीं अवतरोनी। केला भक्तांचा उद्धार॥ २॥**
**वैराग्य भक्ति ज्ञान। शांति क्षमा विरक्ती।**
**विवेक सालंकृत। क्षमा दया सर्व भूतीं॥ ३॥**

सच्चिदानंदघन । रामदास केवळ ।
दिनकरकृपायोगें । रामचंद्र निर्मळ ॥ ४ ॥

(१४) कविवर्य मोरोपंत—

द्विज सावधान ऐसें सर्वत्र विवाहमंगलीं म्हणती ।
तें एक रामदासें आयकिलें त्या सदा असो प्रणती ॥ १ ॥
सर्वत्र रामनवमी परमोत्सव परमधर्म चालविला ।
द्विजतर्पण संकीर्तनयोगें कलिकाल दूर घालविला ॥ २ ॥
निजवचनें वटशाखा तोडुनि जो शिष्य पावला पतन ।
तो कल्याणचि केला जीवनदानें करूनियां जतन ॥ ३ ॥
आत्यास्वामी बाणें उडतां खग बघुनि भूमिवरि पाडी ।
श्रीरामदास त्यातें जीवन देउनि नभःपथीं धाडी ॥ ४ ॥
शिवराजास ज्ञानद जो जैसा याज्ञवल्क्य जनकास
तरले भवार्णवीं बहु दृढतर त्याची धरूनि जन कास ॥ ५ ॥

(१५) बाळकृष्णबोवा चौंडे (विद्यमान)

आमुचा भाग्योदय जाहला, सद्गुरुराज मुखीं आला ॥ ध्रु० ॥
जो केवळ महारुद्र मारुती भूमीवर अवतरला, सद्गुरु० ॥ १ ॥
दासबोध सद्ग्रंथ भवाब्धीमाजि सेतु रचिला, सद्गुरु० ॥ २ ॥
कसी चपल मन वारु तया मनबोध लगामाला, सद्गुरु० ॥ ३ ॥
घोर असा कलिकाल धुरंधर दैत्य जेर केला, सद्गुरु० ॥ ४ ॥
धर्मलंड पाखंड तुडवुनी भूमिभार हरिला, सद्गुरु० ॥ ५ ॥
एकादश हनुमंत स्थापुनि संतराज बनला, सद्गुरु० ॥ ६ ॥
बालक रामदास-पद-किंकर हेंचि दान त्याला, सद्गुरु० ॥ ७ ॥



# ४ रामदासी कवी



## १ श्रेष्ठ ( समर्थांचे वडील बंधु )

श्रीसमर्थ रामदासस्वामी यांचे ज्येष्ठ बंधु **गंगाधर** हे सांप्रदायी लोकांत '**श्रेष्ठ**' या नांवानें व रामदासी वाङ्मयांत '**रामीरामदास**' या नांवानें प्रसिद्ध आहेत. यांच्या पूर्वजांचा वृत्तान्त समर्थचरित्रारंभीं ( पृ० ६७ ) दिलाच आहे. श्रेष्ठ-समर्थांचे वडील सूर्याजीपंत सूर्योपासक होते. त्यांनीं नित्य एकाग्रचित्तानें सूर्याचा १२००० जप बारा वर्षें केल्यावर सूर्यनारायणांनीं प्रसन्न होऊन 'तुम्हास दोन भगवद्भक्त पुत्र होतील' असा त्यांस वर दिला. "माझ्या अंशमात्रेंकरून जो पहिला पुत्र होईल तो प्रपंच आणि परमार्थ दोन्ही साधून रात्रंदिवस तुमच्या सेवेस सादर राहील, आणि दुसरा पुत्र मारुतिअंशानें होईल तो वैराग्यशीळ निपजून ' प्रबळ भक्ति-ज्ञानानें सकळ विश्वाचा उद्धार करील,' असें सूर्यनारायणांनीं सांगितलें. त्याप्रमाणें शके १५२७ विश्वावसु नाम संवत्सरीं मार्गशीर्ष वद्य त्रयोदशीस श्रेष्ठांचा जन्म जांबगांवीं झाला; व त्यांचें पाळण्यांतलें नांव गंगाधर ठेविलें. गंगाधरांचें, त्यांच्या विद्याचारसंपन्न पित्याच्या देखरेखीखालीं, तत्कालीन ब्राह्मणबटूस साजेल असें शिक्षण झाल्यावर, त्यांचें मौजीबंधन होऊन, लगेच पुढें वयाच्या सातव्या वर्षीं त्यांचा विवाहही झाला. त्यांस आंबडकर देशमुखांची कन्या दिली होती. श्रेष्ठ व समर्थ ह्या दोन्ही बंधूंस लहानपणींच श्रीरामाचा अनुग्रह झाला होता हें त्यांच्याच कवितें-तील एतद्विषयक उल्लेखावरून दिसून येतें. '**भक्तिरहस्य**' ग्रंथाच्या मंगलाचरणांत श्रेष्ठ म्हणतात —

**तो मद्गुरु जगद्गुरु समर्थ । भावेंचि भेटला श्रीरघुनाथ ।**
**मस्तकीं ठेऊनि पद्महस्त । स्वस्वरूप प्रकाशिलें ॥**

समर्थशिष्य **दिनकर** यांनीं आपल्या **स्वानुभवदिनकर** ग्रंथाच्या १६ व्या कलापांत श्रेष्ठ आणि समर्थ यांस श्रीरामदर्शन झाल्याचा विस्तृत वृत्तान्त वर्णिला आहे. दिनकर गोसावी सांगतात, "श्रेष्ठ-समर्थांचे वडील सूर्याजीपंत हे एके दिवशीं गोदास्नानास गेले असतां "दूतवेषानें" एक वानरगण त्यांच्या घरीं आला व सूर्याजीपंताचा धाकटा मुलगा नारायण यास गांवाबाहेर घेऊन गेला. नारायण त्या वेळीं ११ वर्षांचा होता. गांवाबाहेर गेल्यावर नारायणानें तेथें जें एक दृश्य पाहिलें त्याच्या योगानें तो थोडासा भयभीत झाला. एका पालखींत, मेघश्यामवर्णाचा एक क्षत्रिय पुरुष व एक स्त्री अशीं बसलीं असून दोन्ही भागीं सेवक उभे आहेत, असें तें दृश्य होतें. सेवकांनीं नारायणास त्या क्षत्रियासमोर नेऊन उभें केलें तेव्हां त्यानें रजपुती भाषेंत नारायणास विचारले, "तुझा पिता कोठें आहे?" नारायणानें धीटपणानें आपल्या वडिलांची सर्व हकीकत सांगितली. तेव्हां त्या मेघश्यामवर्ण पुरुषानें त्याला जवळ बोलावून त्याचें मस्तक कुरवाळलें आणि स्वहस्तानें त्याला एक पत्र दिलें. तें प्रभुमुद्रांकित पत्र हातीं पडतांच नारायणाची वृत्ति पालटली. तो थरथर कांपूं लागला, त्याची वाचा कुंठित झाली. क्षणांत हास्य, क्षणांत रुदन, क्षणांत नृत्य, अशी त्याची विचित्र अवस्था होऊन तो मूकवृत्तीनें टकमक पाहूं लागला. इतक्यांत तें क्षत्रिय दांपत्याचें पूर्वदृश्य नाहींसें होऊन त्या ठिकाणीं, ज्याच्या वामांकीं जानकी विराजमान झाली आहे असा घवघवीत श्यामसुंदर श्रीराम; सभोंवतीं लक्ष्मण, भरत आणि शत्रुघ्न आणि पुढें वीर हनुमान, असें रामपंचायतनाचें दृश्य नारायणास दिसूं लागलें. श्रीरामानें त्याच्या मस्तकावर आपला कृपाहस्त ठेवून त्याला महावाक्योपदेश केला. त्या वेळीं नारायणाची कशी स्थिति झाली? दिनकर सांगतात "ते समईं दिग्मंडळ दणाणिले। तेणें नारायणाचें सर्वांग थरारिलें। म्हणे काय ब्रह्मांड कोसळलें। मजवरी ये काळीं?॥ म्हणोनि थरथरा असे कांपत। तेणें दांतखिळी बैसों

पाहत। सभंवतें टकमकां अवलोकित। तंव धुधुकार देखिला ॥"
इतक्यांत शीतनिवारणार्थ विजेसारखें लखलखित असें हुरमुजी रंगाचें
एक दिव्य वस्त्र अकस्मात् त्याच्या अंगावर पडलें; आणि रामपंचायतन
अदृश्य झालें. नारायणाच्या उजव्या हातांत तें राममुद्रांकित पत्र
आणि डाव्या हातांत अर्धचंद्र बाण देऊन श्रीराम गुप्त झाले.
त्या स्थितींत, नारायणास जी समाधि लागली ती एक वर्ष कायम
होती. इकडे, सूर्याजीपंत आणि श्रेष्ठ घरीं येऊन पाहतात तों नारायण
नाहीं; कोणी एक दूत येऊन त्याला घेऊन गेला असें त्यांना समजलें.
मग ते मोठ्या काळजींत पडून गांवाबाहेर नारायणास शोधीत चालले
तों ब्रह्मारण्यांत नारायण समाधिस्थितींत पडलेला त्यांना आढळला.
त्यांनीं त्याला हांका मारून जागृत करण्याचा प्रयत्न केला, परंतु तो एक
शब्दही बोलेना. मग त्यांनीं त्याला उचलून घरीं आणले. तेथें तें हुरमुजी
रंगाचें वस्त्र, तें श्रीरामनामांकित पत्र व तो अर्धचंद्र बाण हीं त्यांच्या
दृष्टीस पडतांच तें पत्र त्यांनीं वाचून पाहिलें. पत्र वाचतांच सूर्याजीपंत
आणि श्रेष्ठ या दोघांसही समाधि लागली. पुढें सूर्याजीपंतांनीं लवकरच
देह ठेविला. "श्रेष्ठांनीं लेखणी खालीं ठेवून म्हणजे कुळकर्णीपणाची
आशा सोडून श्रीरामाची एकनिष्ठपणें सेवा चालविली." हा प्रकार
समर्थांच्या अकराव्या वर्षी म्हणजे शके १५५१ त घडला. या वेळीं श्रेष्ठांचें
वय तेरा किंवा चौदा वर्षांचें होतें. "समर्थांचें भविष्यकालीन चरित्रही
पत्ररूपानें श्रीरामाने ग्रामाधिपतिरूपांत वटवृक्षातळीं श्रेष्ठांस लिहून दिलें
होतें व तें हातीं घेऊन श्रेष्ठ तीन दिवस समाधिस्थितींत राहिले होते,"
असें गिरिधरस्वामींनीं 'समर्थप्रतापां' त लिहिलें आहे. यापुढचें म्हणजे
शके १५४२ नंतरचें श्रेष्ठांचें चरित्र उपलब्ध नाहीं. तथापि एकंदरींत
असें दिसतें कीं, एकनाथमहाराजांप्रमाणें त्यांनीं आपले आयुष्य प्रपंच
आणि परमार्थ या दोहींच्या साधनांत व्यतीत केलें असावें. त्यांचें सातव्या

वर्षींच लग्न झालें होतें हें पूर्वीं सांगितलेंच आहे. श्रेष्ठांचा थोडासा शिष्यसंप्रदायही होता. मुंजे व गोसावी या नांवांचे त्यांचे दोन शिष्य असल्याचा उल्लेख ग्रंथांतरीं आढळतो. जांब येथें श्रेष्ठांचा मठ आहे.

शके १५९९ फाल्गुन वद्य १३ सह १४ स श्रेष्ठांनीं दहिफळ येथें आपला अवतार संपविला. त्यांच्या पत्नीनें, पतीबरोबर परलोकगमन करावें असा निश्चय करून, अमावास्येच्या दिवशीं दीर्घ स्वरानें ' राम ' असा उच्चार करून देहाचें विसर्जन केलें. दहिफळ येथें गांवाच्या बाहेर अर्ध्या कोसावर खंदारे पाटलांच्या शेतांत त्यांचें वृंदावन असून त्याला मोगलाईतून ८० रु० वर्षासन आहे. पुजारी पूजा करीत असतात.

रामचंद्रबाबा व शामजीबावा असे श्रेष्ठांस दोन पुत्र होते. समर्थ रामदासस्वामींनीं समाधि घेतल्यावर, बऱ्याच वर्षांनीं त्यांच्या शिष्यांनीं समर्थांची परंपरा चालावी म्हणून श्रेष्ठांच्या या दोन्ही मुलांस सज्जनगडावर नेण्याचा विचार केला होता, परंतु दरम्यानच्या उपप्लवामुळें तो विचार तसाच राहिला. पुढें रामचंद्र व शामजी हे दोघेही मरण पावले. नंतर, समर्थशिष्यांनीं रामचंद्रबावांचे पुत्र गंगाधरस्वामी यांस शके १६३२ च्या श्रावण शुद्ध ५ स सज्जनगडीं आणलें.

समर्थांप्रमाणेंच श्रेष्ठही उत्कृष्ट ग्रंथकार होते. '**भक्तिरहस्य**' व '**सुगमोपाय**' हे त्यांचे दोन ओवीबद्ध ग्रंथ छापून प्रसिद्ध झाले आहेत. कवि या नात्यानें श्रेष्ठांचें 'रामीरामदास' हेंच नांव विशेष प्रसिद्ध आहे व त्यांनीं स्वतः 'रामीरामदास' असाच स्वनामोल्लेख आपल्या कवितेंत केला आहे. 'रामीरामदास' हें समर्थांचेंही एक नांव होतें. समर्थांचा दासबोध व श्रेष्ठांचें भक्तिरहस्य यांच्या रचनाशैलींतील भिन्नता अगदीं स्पष्ट आहे. श्रेष्ठकृत भक्तिरहस्याचीं प्रकरणें ७७ असून ओवीसंख्या ५८१९ आहे; व सुगमोपायाचीं प्रकरणें १० व ओवीसंख्या ११३९ आहे. फुटकळ कविता अगदींच थोडी आहे. मिळून श्रेष्ठांची उपलब्ध कविता साडेसात

हजारांच्या आंत आहे. भक्तिरहस्य ग्रंथ शके १५९० च्या विजयादशमीस पूर्ण झाला. सुगमोपायाचा रचनाकाल ग्रंथांत दिलेला नाहीं. 'रामीरामदास' या नांवावर जशी श्रेष्ठ आणि समर्थ या दोघांचीही कविता आढळते तद्वत् दास हें अभिधान समर्थांप्रमाणेच श्रेष्ठांनींही कांहीं ठिकाणीं धारण केलेलें आढळतें. यासंबंधानें एके ठिकाणीं ते म्हणतात —

**कदापि ऐसें म्हणती अभक्त जन ।**
**दास हें अनुचित विप्राभिधान ।**
**तरी हा आक्षेपचि अज्ञान ।**
**करी जयाचा तयासी ॥**

**अहो शूद्र सेवक जैसा तिहीं वर्णांस ।**
**तैसें मनुष्यदास्य अनुचित ब्राह्मणांस ।**
**तें दूषण योजील हरिभक्तांस ।**
**तो चतुर कीं मूर्ख ? ॥**

**विप्र दास व्हावया ईश्वराचे ।**
**संचित पाहिजे कीं जन्मोजन्मींचें ।**
**नारदादि म्हणविती जयाचे ।**
**दासाचे दास ॥**

श्रेष्ठांची भाषा शुद्ध असून त्यांच्या कवितेंत इतर रामदासी कवितेंत-त्याप्रमाणें शब्दांचीं अशुद्ध रूपें फारशीं आढळत नाहींत. त्याचप्रमाणें त्यांच्या कवितेंत संस्कृत शब्दांचा भरणा अधिक आहे. थोड्याशा अंतरानें समर्थांशीं समकालीन असलेले वामनपंडित यांचा जसा भगवन्नाम-माहात्म्यावर विशेष भर दिसतो तद्वत् श्रेष्ठांनींही सगुणोपासना आणि भगवन्नामस्मरण यांचें माहात्म्य आपल्या ग्रंथांत प्रामुख्यानें वर्णिलें आहे. भक्तिरहस्याच्या अकराव्या प्रकरणाच्या शेवटीं ते म्हणतात —

**या सकळाहि व्रतफळाचें फळ।**
**नामस्मरण रामाचें एक वेळ।**
**अहर्निशीं स्मरेल जो प्रेमळ।**
**तो स्वयेंचि श्रीराम॥**
**अशक्ता न टकती व्रतें तपें।**
**तरी नाम भगवंताचें सोपें।**
**सुखें स्मरावें स्वरूपें।**
**परमानंददायक॥**
**श्रीराम जयराम जयजयराम।**
**अखंड जो स्मरे सप्रेम।**
**तो स्वयंचि असे पुरुषोत्तम।**
**म्हणोनी राम न विसरावा॥**

नामस्मरणाचें माहात्म्य पुराणान्तरीं जें इतक्या कंठरवानें वर्णिलें आहे तें अशास्त्रीय असून तो केवळ अर्थवाद आहे असा आक्षेप शास्त्रीपंडितांनीं घेतला तरी स्वानुभवी संतांनीं त्याची उपेक्षाच केली आहे; कारण ज्ञानदेव, एकनाथ, श्रेष्ठ, समर्थ, वामन, इत्यादि नाममहिमा गाणारे संतकवि शास्त्रीपंडितांहून कांहीं कमी विद्वान् नव्हते. शिवाय नामदेव, जनी, चोखामेळा, तुकोबा, इत्यादि संत फारसे व्युत्पन्न नसतांही केवळ भक्तियुक्त नामस्मरणानेंच संतत्व व द्विजवंद्यत्व पावले ही गोष्ट अनुभवसिद्ध असल्यामुळें हरिनामद्वेष्ट्या कर्ममार्गी शास्त्रीपंडितांचा वरील आक्षेप आपाततःच फोल ठरतो.

श्रेष्ठांनीं आपले ग्रंथ लिहितांना भारत, भागवत, रामायण, गौतमस्मृति, अत्रिस्मृति, मन्वादि अष्टादश स्मृतिकारांच्या स्मृति, शारीरभाष्य, ब्रह्मपुराण, ब्रह्मांडपुराण, स्कंदपुराण, गरुडपुराण, नारदपुराण, गुरुगीता, इत्यादि संस्कृत ग्रंथांचा उपयोग केल्याचा उल्लेख त्यांनींच स्वतः सदर ग्रंथांत केला आहे. "श्रुति, स्मृति आणि पुराणें यांचा मथितार्थ काढून आपण तो श्रोत्यांस सादर केला आहे," असें त्यांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे. भर्तृहरीचीं

शतकेंही त्यांच्या वाचनांतून सुटलीं नव्हतीं असें भक्तिरहस्याच्या ५४ व्या प्रकरणांतील "शुष्क वैरकारी दुर्जन । द्वेषिती मृग मीन सज्जन । ढिवर लुब्धक दुष्टमन । विषयतृष्णेस्तव तऱ्हीं ॥" या ओवीवरून दिसतें. उपरिनिर्दिष्ट संस्कृत ग्रंथांशिवाय ज्ञानेश्वर, एकनाथ इत्यादि पूर्वकालीन साधुसंतांच्या ग्रंथांचा श्रेष्ठांना पूर्ण व्यासंग होता, इतकेंच नव्हे तर आपल्या कनिष्ठ बंधूचा दासबोधही त्यांच्या अवलोकनांत आला होता असें उभयतांच्या ग्रंथांतील कांहीं सदृश स्थलांवरून दिसतें.

श्रेष्ठांनीं भक्तियोगाचा महिमा पुढील ओव्यांत वर्णिला आहे —

**'कृतयुगीं तरले ध्यानें । त्रेतायुगीं यज्ञदानें ।**
**द्वापारीं तरले पूजनें । केवळ कीर्तनें कलियुगीं ॥ २६ ॥**
**कलौ कल्मषरूप मनें । निश्चयें न तरे अन्य साधनें ।**
**मुक्ति रामनामाभिधानें । आणि स्मरणें शिवाच्या ॥ २७ ॥**
**सांडुनी हरिहरभक्तीचा आश्रय । केवळ बोधलुब्ध निराश्रय ।**
**ते पावती क्लेशसमुदाय । तुषकंडणीं श्रम जैसा ॥ २८ ॥**
**म्हणौनि भक्ति साधनसंजीवनी । भक्ति वैराग्याची योनी ।**
**भक्ति ज्ञानाची जननी । विज्ञानेसहित ॥ २९ ॥**
**भगवद्भक्तीचिये द्वारीं । वोळंगती पुरुषार्थ चारी ।**
**कर जोडुनी निरंतरीं । तिष्ठत असती ॥ ३० ॥**
**भक्ति धर्माचें निजधाम । भक्ति अर्थाचा आराम ।**
**भक्तिचा ठाइं संपूर्ण काम । मोक्षदायिनी सुभक्ति ॥ ३१ ॥**
**भक्तिचे ठाइं भगवंताचें । षड्गुण ऐश्वर्य वर्ते साचें ।**
**संपूर्ण महिमान भक्तीचें । कवणा वर्णवेल ? ॥ ३२ ॥**
**भगवद्भक्तीची सत्ता थोर । विधिनिषेध केले किंकर ।**
**भक्तिप्रतापें मोडली धार । दंडा आणि दोषाची ॥ ३३ ॥**
**प्रायश्चित्तास कोण पुसे । हठयोगास ठावचि नसे ।**
**तीर्थादिकें अनायासें । भक्तिचां ठायीं वोळंगती ॥ ३४ ॥**

**तपें हरिहरेंवीण तापलीं । प्राप्तिकारणें अनुतापलीं ।**
**ईश्वरभक्त्या निवालीं । सार्थक जालें कीर्तनीं ॥ ३५ ॥**

**कृतादि युगींचे तापस प्राणी । करिती कलियुगाची सिराणी ।**
**येथें कीर्तनमात्रें चक्रपाणी । मोक्षदाता सुभक्तां ॥ ३६ ॥**

**कळि हा दोषांचा समुद्र । परि एक असे महाभद्र ।**
**कीर्तनमात्रें चंद्रमौळी रामचंद्र । महापापें हरूनि मोक्ष दे ॥३७॥**

**पूर्वयुगीं काळांतरें । ईश्वरप्राप्ति होय निर्धारें ।**
**कलौ येकेचि अहोरात्रें । सुप्रसन्न सुभक्तां ॥ ३८ ॥**

**म्हणोनि धन्य धन्य हें कलियुग । पावलें धन्य धन्य जग ।**
**भगवद्भक्त महाभाग । अनायासें तरताती ॥ ३९ ॥**

**कळी भरे भवसिंधु दुस्तरु । भगवंत अनाथकरुणाकरु ।**
**प्रेरिलें सुभक्ति महातारूं । विलंब न लउं वळगतां ॥ ४० ॥**

—भक्तिरहस्य, प्रकरण ६ वें

भक्तिरहस्य ग्रंथांत शैव आणि वैष्णव या दोघांच्याही व्रतकथा सांगितल्या असून हरिहरांचा पूर्ण अभेद मानिला आहे.

श्रेष्ठ सगुणोपासक असल्यामुळें त्या उपासनेला पोषक अशाच कथा पौराणिक ग्रंथांतून निवडून त्यांनीं भक्तिरहस्यांत दिल्या आहेत. समर्थांनीं श्रेष्ठांस पाठविलेलें एक पत्र प्रसिद्ध आहे त्यांत "**जयंत्या पर्वांचा हव्यास । अंतरीं आवडे विशेष । हरिकथानिरूपण**' असें श्रेष्ठांच्या उपासनेचें वर्णन समर्थांनीं केलें आहे व त्याची यथार्थता 'भक्तिरहस्य' ग्रंथ पाहिला असतां कोणाच्याही लक्षांत येईल. सदर ग्रंथांत हरिनाममाहात्म्य आणि व्रतोद्यापनें यांवरच श्रेष्ठांनीं विशेष भर दिलेला दिसतो. तथापि एकंदरींत, श्रेष्ठांची कविता लक्ष्यपूर्वक वाचतां असें दिसून येतें कीं, त्यांनीं बहुतेक संस्कृत प्राकृत पूर्वकवींचाच अनुवाद केला असून, समर्थांप्रमाणें स्वतःचें असें फारसें कांहीं सांगितलेलें नाहीं. भगवद्भक्तांच्या प्रेमळ कथा सांगतांना

मात्र श्रेष्ठ अगदीं रंगून जातात. महाभगवद्भक्त ध्रुव हा आपल्या पित्याच्या अंकावर बसला असतां,

"सापत्न माता म्हणे मच्छरें। तुवां अभाग्यवंतेचां कुमरें।
सिंहासन कैसें पाविजे, ईश्वरें। दिधलियावांचुनी ॥ ३९ ॥
जीव कष्टवावा साधनें। तनु दमावी पंचाग्निधूम्रपानें।
उग्र तपतां सिंहासनें। पावती भववैभव ॥ ४० ॥
जंव दिधलें नाहीं देवें। तंव हांव काय दुजयाचा दैवें।
छळवादें बोलिली परी ध्रुवें। ध्रुवबुध्या मानिलें ॥ ४१ ॥
आपुलिया जनकादेखतां। धिःकारूनि दवडी सापत्नमाता।
अति अनुतापली मनोदेवता। रुदन आलें स्फुंदनें ॥ ४२ ॥
बाळकाचें चित्त कोमल। पारिखें वाटलें जगज्जाळ।
एका भगवंतावांचूनि स्थळ। नाहीं आतां मजलागीं ॥ ४३ ॥
दीनवदना मम जननी। राजाज्ञेप्रमाण वर्जिते जनीं।
अतःपर परमेश्वरावांचूनि। कोण आहे मजलागीं ? ॥ ४४ ॥
कोमाइलें बाळकाचें वदन। जैसें पाडळीचें सुमन।
श्रीहरिवांचूनि सर्व जन। न दिसे दृष्टी तयाचे ॥ ४५ ॥
वसतच जनता जाली वोस। मनताविषयीं अति उदास।
लागला श्रीहरीचा निजध्यास। न पाहे वास आणिकाची ॥४६॥
"धांव धांव जगदीश्वरा। भक्तजनवज्रपंजरा।
अनाथ दीनाच्या आधारा। तूं सोयरा निर्वाणीं ॥ ४७ ॥

*　　*　　*

हरी तूं जीवाचें जीवन। जीव न जिये तुजवांचून।
तूं एक न वचसी सांडून। सर्व काळ सांगाती ॥ ४९ ॥
एर विश्व मिथ्यामय। जैसा यात्रेचा समुदाय।
स्वकार्यतत्पर कैंचें प्रिय। तुजवांचूनि आत्मया ॥ ५० ॥
तूं व्यापक सचराचरीं। वससी बाह्य अंतरीं।
विश्वविसांवया मुरारी। हरी तूं पात्र मजलागीं ॥ ५१ ॥

माया आधार तुटला । जीव तुजलागीं फुटला ।
आपुले उदरीं तूं मजला । अचळ स्थळ देईं देवा ॥ ५२ ॥"

ऐसा आइकोनियां धांवा । देव पावलासे ध्रुवा ।
काय जवळी होता जीवा–। माजील तो साक्षी ॥ ५३ ॥

भक्ता वाटला परदेश । तंव प्रगटला हृषीकेश ।
विश्वरूप स्वप्रकाश । अढळ स्वपद दिधलें ॥ ५४ ॥

'नाभी' म्हणतसे श्रीहरि । 'मज असतां शिरावरी ।
बहुत शिणलासी संसारीं' । म्हणोनि हृदयीं धरियेला ॥ ५५ ॥

तंव ते पातलीं विमानें । दशधा तुरें मंगळस्वनें ।
गगन कोंदलें सघनें । सुमनवृष्टि होतसे ॥ ५६ ॥

ध्रुवें नमिली सापत्नमाता । तूंच गुरु होसी तत्त्वता ।
तुवां तोडिली ममता । तुझेन हरि मज भेटला ॥ ५७ ॥

तूंहि बोलतीसी रसाळ । मिथ्या प्रपंच परि पाल्हाळ ।
तरि कां तुटतें मायाजाळ । कां भेटता भगवंत ? ॥ ५८ ॥

—भक्तिरहस्य, प्रकरण ५९ वें

येवढ्या उताऱ्यांवरून श्रेष्ठांच्या वर्णनशैलीची ओळख वाचकांस होईल. श्रेष्ठांची कविता अगदीं साधी आहे, तींत मुक्तेश्वरांची अलौकिक प्रतिभा नाहीं, किंवा श्रीधरांची उच्च प्रतीची रसभरितता नाहीं. परंतु ज्या एका विशिष्ट हेतूनें–सगुणोपासना व भक्तिमार्ग यांचा सामान्य जनतेंत प्रसार करावा या हेतूनें–त्यांनीं ग्रंथरचना केली तो हेतु सिद्धीस नेण्याइतकें रचना-कौशल्य त्यांच्या अंगीं खात्रीनें होतें व यामुळें त्यांचेही ग्रंथ मुमुक्षूंस परमार्थदर्शक झाले आहेत.

यवनसत्तेमुळें महाराष्ट्राची त्या वेळीं जी दुर्दशा झाली होती तिचें संतापयुक्त वर्णन समर्थांप्रमाणेंच श्रेष्ठांनींही केलें आहे. कलियुगवर्णनांत ते म्हणतात :—

**निरंतर आवर्षण । क्षुधाभयें पीडे जन ।**
**तस्करभयें कंपायमान । नीतिसंरक्षण तें कैंचें ? ॥**
**मछमांसाशनें जीविका । होईल सर्वां ब्राह्मणादिकां ।**
**असो सर्व धर्मलोपें लोकां । अल्पायुत्व अपमृत्यु ॥**
**म्लेंच्छ राज्य होईल प्रबळ । पीडा पावेल द्विजकुळ ।**
**ब्राह्मण करकर्षणभेणें विकळ । गिरिकंदरीं भ्रमती सकुटुंब॥**
**अत्र तीव्र शासन यावनी । अब्रह्मण्य जाली कित्येक अवनी ।**

खऱ्या धर्माचा लोप होऊन अधर्माकडे लोकांची प्रवृत्ति कशी होऊं लागली होती याचेंही विस्तृत वर्णन श्रेष्ठांनीं केलें आहे व तें वाचलें म्हणजे 'भक्तिरहस्य' व 'सुगमोपाय' हे दोन ग्रंथ त्यांनीं कोणत्या उद्देशानें लिहिले हेंही लक्षांत येतें. 'दासबोधा' नंतर 'भक्तिरहस्या'ची रचना झाली असावी असें दिसतें. धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केलेल्या 'श्रेष्ठांची कविता' या ग्रंथाच्या आरंभीं श्री. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं श्रेष्ठांच्या 'भक्तिरहस्य' ग्रंथांतील विषयांचें चांगलें विवेचन केलें आहे तें जिज्ञासूंनीं तेथें पहावें. 'सुगमोपायां'तही सगुणोपासना, भक्ति आणि नामस्मरण हींच तरणोपायाचीं साधनें श्रेष्ठांनीं सांगितलीं आहेत.

ब्रह्म हें निराकार आणि निर्गुण असल्यामुळें त्यानें प्रेमसुख घेतां येत नाहीं म्हणून सद्गुरूलाच ब्रह्मरूप मानावें, कारण—

**ब्रह्मीं कैंचा कृपाभर । न घडे दीनाचा अंगिकार ।**
**म्हणोनि ब्रह्म मूर्तिमंत योगेश्वर । श्रीसद्गुरु सुसेव्य ॥ ४८ ॥**
**ब्रह्म स्पर्शासि न पडे ठावें । सद्गुरूसि कवळूनि क्षेम द्यावें ।**
**ब्रह्म दृष्टीं न दिसे स्वभावें । डोळे भरूनि पहावें गुरूसी ॥ ४९ ॥**
**ब्रह्मीं वाचा निवर्तती । सद्गुरूशीं बोलावें प्रेमप्रीतीं ।**
**ब्रह्मीं करितां नये भक्ति । सद्गुरुमूर्ति पुजावी ॥ ५० ॥**
**ब्रह्म देवाची देवकळा । परंतु ब्रह्मीं नव्हता हा सोहळा ।**
**म्हणोनि ब्रह्म मूर्तिमंत स्वलीळा । सद्गुरुस्वामी ॥ ५१ ॥**

—सुगमोपाय, प्रकरण २ रें

समर्थांनीं जशीं आपल्या दासबोधांत गुरुशिष्यलक्षणे सांगितलीं आहेत तशींच, परंतु संक्षेपानें, श्रेष्ठांनींही सांगितलीं आहेत. पतित आणि स्त्री यांच्या वाऱ्यासही उपदेशकानें उभें राहूं नये असें श्रेष्ठांचें सांगणें आहे—

**प्रत्यक्ष पतित तों पाहोंचि नये। कामिनी चित्रींही नये नये।**
**तेथें एकांत करणें हें काये। अनुग्रह कीं ग्रहगती ?॥**

श्रेष्ठ म्हणतात, "ज्ञान होवो वा न होवो, किंबहुना व्यामोह झाला तरी हरकत नाहीं, परंतु सगुणाच्याच ठायीं माझा दुराग्रह आहे. मी असें कां म्हणतों हें सज्जनांनीं श्रवण करावें—

**जैसें पाळकाबाळकालागीं। सर्वस्वें जननीच जगीं।**
**तीवेगळें त्याचा आंगीं। कैसें सुख सक्रमे॥**
**तैसा मी केवळ अनाथ। मज सर्व भावें एक रघुनाथ।**
**माझा स्वार्थ आणि परमार्थ। अवघें रामा लागलें॥**
**हें माझें सत्यानृत। सहवासीं विश्वविदित।**
**तरि तयावेगळें मनोगत। कैसेनि पां निवेल ?॥**

श्रीरामाच्या ठायीं श्रेष्ठांची कशी अनन्यभक्ति होती हें या ओंव्यांवरून सुस्पष्ट होतें. अनन्य भक्ताशिवाय इतरांच्या तोंडून असे उद्गार निघणें शक्य नाहीं. 'भक्तिरहस्या'पेक्षांही 'सुगमोपाय' हा ग्रंथ अधिक सरस आहे. बुद्धि आणि भावना या दोघांसही या ग्रंथांत श्रेष्ठांनीं पूर्ण वाव दिला आहे.

समर्थांच्या कवितेप्रमाणेंच श्रेष्ठांच्या कवितेवरही एकनाथमहाराजांच्या शिकवणीची दाट छाया पडलेली दिसते.

श्रेष्ठांच्या अभंगांचा नमुना—

**रामासी देखिजे तेंचि पैं देखणें। येर अंध पाहणें डोळयांचें॥**
**रामासी परिसिजे परिसणें तेंचि। येर श्रवणाची बधिरता॥**
**रामासी सन्मुख तेंचि पैं नासिक। येर निर्नासिक उच्च तऱ्ही॥**

रामेसी बोलिजे तेचि पैं रसना । येर मुकेपणा बोलतांही ॥
रामालागीं झिजे तेचि त्वचा पुष्ट । येर कृश कुष्ट भवरोगी ॥
श्रीरामीं सार्थक तेचि पैं हस्तक । येर ते चाळक तऱ्ही थोटे ॥
चालणें तेंचि जें रामालागीं चाले । येर तें पांगळें मोक्षपंथीं ॥
संसारीं सूटिजे तेंचि पैं पुरुषत्व । येर नपुंसकत्व दाराधीन ॥
रामीं चित्तशुद्धि तोचि मळत्याग । येर तो संसर्ग नीच नवा ॥
रामासी चिंती जें तेंचि पैं चिंतन । येर ते वणवण श्वानप्राये ॥
रामीं बोध करी तेचि पैं सुबुद्धि । येर ते कुबुद्धि विषयेस्फूर्ति ॥
श्रवण करावें अंतरीं धरावें । आणि प्रवर्तावें निजकाजीं ॥
हा देह पुडती न पावात बा रे । म्हणोनि करा रे आत्महित ॥
रामीरामदास विनवी वेळोवेळां । काळ पळपळां ग्रासितसे ॥

'**नामस्मरण**' या नांवाचें श्रेष्ठांचें एक प्रकरण आहे त्याच्या २७ ओंव्या आहेत. श्रेष्ठांच्या एकंदर उपदेशाचें सार या २७ ओव्यांत येऊन गेलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. आत्मविश्वासामुळें या ओव्यांत एक प्रकारचा आवेश आलेला आहे. श्रेष्ठ म्हणतात —

कथे घालावें लोटांगण । भक्तां द्यावें आलिंगन ।
ज्यांच्या स्पर्शें जनार्दन । अभ्यंतरीं प्रवेशे ॥
नाम वाचे रंगीं नाचे । नयनीं प्रवाह प्रेमाचे ।
हर पदरज वंदी त्याचे । हर्षें नाचत कैलासीं ॥
टाळ मृदांग वैष्णवभार । करताळिका जैजैकार ।
करितां कीर्तनाचा गजर । रंगीं तिष्ठे श्रीरंग ॥
हरिकथेस करि उच्छेद । ऐसा कोण भाग्यमंद ।
तया रुसला गोविंद । निरंई पचित येमदूत ॥
करी भक्तांचा मानभंग । तेणें भंगिलें हरीचें लिंग ।
वैकुंठभुवन जें अभंग । तेणें तेंहि भंगिलें ॥
भक्तसंकटीं घाली उडी । द्वेषियांचें मूळ तोडी ।
गदाघातें मस्तक फोडी । आपले जोडी तयांचें ॥

मधुकैटभेंसी घेतली झोंबी । जीवें मारिला निरालंबीं ।
कुश छेदिलियाहि तनु अवलंबी । मग जीतचि पुरिला ॥
हिरण्याक्ष दांतीं तोडिला । हिरण्यकश्य नखीं फाडिला ।
रावण कुंभकर्ण विभांडिला । अतितीक्ष्ण शरधारीं ॥
सहस्रार्जुनाचीं कुठारवरि । केलीं करचरणाचीं कांडोरीं ।
तर्पण केलें त्याच्या रुधिरीं । कौंस परिवारें मारिला ॥
भक्तकैवारें दैत्य मारी । याची काये नवलपरी ।
लक्ष्मी शापिली सिंधुतीरीं । अश्विनौदेवांकारणें ॥
भक्तांस अनुमोदन देती । भक्तसंकटें निवारिती ।
त्यांचा साहाकारी श्रीपति । भुक्तिमुक्तीचा दाता ॥
रामीरामदास म्हणे प्रेमें । जे गर्जती हरीच्या नामें ।
त्यांचीं हरि हरी जन्मकर्में । पुरुषोत्तम तो स्वयें ॥

तात्पर्य, श्रीसमर्थांच्या वडील बंधूंस साजेल अशीच श्रेष्ठ ऊर्फ रामीरामदास यांची कविता आहे.

## २ दिनकर गोसावी रामदासी

श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या प्रमुख शिष्यांपैकीं 'दिनकर' हे एक होत. हे सुमारें २५० वर्षांपूर्वी होऊन गेले. यांचें मूळचें नांव 'बहिणंभट ऊर्फ बहिणाजी' असें होतें. पण पुढें समर्थांनीं त्यांना उपदेश देऊन त्यांचें नांव 'दिनकर' ठेविलें व तेंच पुढें संप्रदायांत रूढ झालें. दिनकरबुवांच्या शिष्यांनीं, त्या काळच्या अधिकाऱ्यांनीं व गांवकऱ्यांनीं बुवांस जीं दानपत्रें व सनदा करून दिल्या आहेत त्यांत त्यांचें नांव बहिणाजी वा। नरहरजी गोसावी असें लिहिलें आहे. ह्या सत्पुरुषाचा जन्ममृत्युकाल अद्याप नक्की समजला नाहीं. तथापि शके १५५० पासून १६२५ च्या दरम्यान हे विद्यमान होते, असें उपलब्ध असलेल्या पुराव्यावरून दिसतें. अहमदनगराजवळ पुराणप्रसिद्ध भृगुक्षेत्रीं--भिंगार येथें--पाठक उपनांवाच्या यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मणकुलांत दिनकरबुवांचा जन्म झाला. पाठकांकडे नगरभिंगारची व

आसपासच्या कांहीं गांवांची वृत्ति होती. हे पाठक हल्लीं 'मुळे' या आडनांवानें प्रसिद्ध आहेत. दिनकरबुवांचे पणजे जनार्दन पाठक व आजे कोनेर पाठक हे भगवद्भक्त असून चांगले विद्वान् होते. सूर्य, गणपति व देवी या देवतांचे ते उपासक होते. जनार्दन पाठकांना आपलें ऋण फेडावयास वेळ मिळावा म्हणून सूर्य तीन मुहूर्त खोळंबून राहिला होता असा उल्लेख एका ओंवींत आहे. दिनकरांचे वडील नरहरि पाठक हेही वेदशास्त्रसंपन्न व ब्रह्मनिष्ठ पुरुष होते. त्यांस श्रीगणपतीची उपासना होती. दिनकरांची आई द्वारकाबाई ही फार सुशील व पतिसेवापरायण होती. नरहर पाठकांच्या सान्निध्यांत दिनकरांनीं मराठी व संस्कृत भाषांचें अध्ययन केलें. त्यांस वेदान्ताचें व धर्मशास्त्राचें चांगलें ज्ञान होते, असें त्यांच्या ग्रंथांवरून दिसतें. रामदास, तुकाराम, वामन, इत्यादि तत्कालीन कवींची कविता त्यांच्या संग्रहीं असून ती त्यांनीं लक्षपूर्वक वाचली होती.

व्रतबंध व विवाह झाल्यावर दिनकरबुवा विरक्त होत चालले. त्यांचे भाऊबंद पुष्कळ असल्यामुळें त्यांस जाताशौच किंवा मृताशौच बहुधा नेहमीं असावयाचें; ह्या अडचणीमुळें त्यांच्या स्नानसंध्यादि नित्यकर्मास व्यत्यय येऊं लागला. त्यामुळें गांवांत राहणें सोडून कोठेंतरी गिरिकंदरीं जाऊन बसावें, असा त्यांनीं निश्चय केला व त्याप्रमाणें एके दिवशीं गुप्तपणे गांव सोडून भिंगारच्या पूर्वेस १३-१४ कोसांवर डोंगरांत वृद्धेश्वर (म्हातारदेव) नामक एक पुराणप्रसिद्ध स्वयंभू शिवलिंग आहे तेथें ते जाऊन राहिले. हें स्थळ अत्यंत रमणीय व शांत असून तपस्वी जनांस अनकूल अशी सृष्टिरचना व निसर्गसौंदर्य या ठिकाणीं आहे. दिनकरबुवांनीं येथील एका गुहेंत बारा वर्षे तपश्चर्या केली अशी आख्यायिका आहे. वृद्धेश्वरानजीक दक्षिणेच्या बाजूस डोंगरांत जी गुहा आहे तींतच दिनकरबुवा ध्यानस्थ बसत असत. कांहीं दिवस आसपासच्या गांवांतून मिळणाऱ्या भिक्षेवर, कांहीं दिवस कंदमूलफलांवर

निर्वाह करून बुवांनीं अनेक पुरश्चरणे केलीं व समाधियोगाचा अभ्यास केला. याप्रमाणें ते भगवत्प्राप्तीच्या साधनांत असतां श्रीसमर्थांनीं त्यांस स्वप्नांत दर्शन देऊन त्यांच्या मस्तकीं आपला वरदहस्त ठेविला. पुढें एक वर्षानें समर्थांनीं त्यांस प्रत्यक्ष उपदेश दिल्यावर त्यांच्या अनुष्ठानाची परिसमाप्ति झाली. समर्थांचा स्वप्नदृष्टान्त त्यांस शके १५७५ फाल्गुन पौर्णिमा या दिवशीं रात्रौ झाला व शके १५७६ त समर्थांचा प्रत्यक्ष अनुग्रह झाला. दिनकर गोसावी आपल्या 'स्वानुभवदिनकर' ग्रंथांत यासंबंधानें लिहितात—

**स्वप्नावस्थेमाजी चोखडें । जें देखिलें होतें श्रीगुरुरूपडें ।**
**तें न दिसेचि पाहतां पुढें । जागृतीसि येतां ॥**
**नाहीं जंव ज्ञानसिद्धि । न होतां प्रत्यक्ष गुरुवाक्यशुद्धि ।**
**जाली जरी पूर्ण समाधि । तऱ्ही अपक्वचि कीं ॥**

प्रत्यक्ष गुरुवाक्यश्रवण झाल्याशिवाय पूर्ण समाधीदेखील व्यर्थच आहे, अशा समजुतीनें श्रीसमर्थांच्या प्रत्यक्षदर्शनासाठीं दिनकरबुवा फार उत्सुक झाले होते. ध्यानस्थ होतांच स्वप्नांतील मूर्तीशीं तादात्म्य व्हावें व नेत्र उघडतांच वृद्धेश्वराचा देखावा डोळ्यांपुढें दिसावा, असा प्रकार बरेच दिवस चालल्यावर दिनकरबुवांनीं 'मग आर्तांचिया पडिभारें । जिज्ञासा करूनि मोहरें । अर्थाचियानुकारें । ज्ञानइच्छा धरूनि ॥ निश्चय केला निज मानसीं । मूर्ति जंव न देखे नयनासी । तंव न घेणें अन्नपानासी । आणि नाना उपभोग ॥' याप्रमाणें निश्चय करून ते समर्थांच्या दर्शनाची वाट पहात बसले. अशा स्थितींत एक वर्ष गेल्यावर असा चमत्कार झाला कीं, समर्थ एकदां जांब गांवाहून कृष्णातीराकडे आपल्या परिवारासह जात असतां वाटेंत वृद्धेश्वराचें दर्शन घेऊन, तेथून सहा कोसांवर भातवडी नामक गांवीं, श्रीनृसिंहमंदिरांत मुक्कामास राहिले. ती बातमी दिनकरांस समजतांच ते तत्काळ भातवडीस गेले व तेथें शके १५७६ फाल्गुन शुद्ध पौर्णिमा, रविवारीं सूर्योदयीं

श्रीनृसिंहमूर्तिसन्निध समर्थांनीं त्यांस उपदेश देऊन त्यांचें नांव दिनकर असें ठेविले. त्यांचें मूळचें नांव बहिणाजी होतें हें पूर्वी सांगितलेंच आहे. "बोधुनि बोध प्रबोधनमार्गें। ठेविति वामकरा शिरिं वेगें ॥ विप्रकुलोत्तम कर्म करावें। रामउपासन चित्तिं धरावें ॥' असें सांगून व दोन तसू उंचीची तांब्याची श्रीराममूर्ति दिनकरांस देऊन समर्थ कृष्णातीरीं गेले. इकडे दिनकरांनीं तीसगांवीं त्या मूर्तीची स्थापना केली व तेथेंच संप्रदायाचा मठ करून ते राहिले. ते पुनः कधींही भिंगारास गेले नाहींत. समर्थांनीं महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांत १४ महंतांची योजना करून जे १४ मठ स्थापन केले त्यांत तीसगांवचा हा दिनकरस्वामींचा मठही प्रसिद्ध आहे. इतर मठांप्रमाणें ह्या मठास जहागीर किंवा नक्त नेमणूक वगैरे कायमचें उत्पन्न नाहीं; याचें कारण दिनरकस्वामी हे पूर्ण निरिच्छ व वैराग्यसंपन्न असल्यामुळें त्यांनीं वैभवाची वा उत्पन्नाची अपेक्षा कधीं केली नाहीं. "ब्राह्मणाची मुख्य दीक्षा। मागितली पाहिजे भिक्षा। ॐ भवति या पक्षा। रक्षिले पाहिजे" या समर्थोक्तीस अनुसरून केवळ भिक्षान्नावर आपल्या कुटुंबाचा योगक्षेम चालवावा व रामनवमीचा उत्सव करावा हा दिनकरबुवांचा परिपाठ असे व हीच वहिवाट त्यांच्या घराण्यांत अद्याप चालू आहे. दिनकरबुवांस एक मुलगा होता, त्याचें नांव रामचंद्र. बुवांचे अनेक शिष्य होते, त्यांत हे रामचंद्रच मुख्य होत. हेही विद्वान् असून मोठे धर्मपरायण होते. वडिलांच्या पश्चात् संप्रदायाची कामगिरी यांनीं उत्तम प्रकारें बजावली. '**श्रीसीतारामसंवाद**' या नांवाचा यांचा एक मोठा ओंवीबद्ध ग्रंथही उपलब्ध आहे. या पितापुत्रांच्या समाधि तीसगांवाजवळ एका शेतांत आहेत. रामचंद्रांनंतर या घराण्यांत कोणी कवि झाला नाहीं.

दिनकरबुवांस तत्कालीन सरकारांतून व सरदार लोकांकडून इनाम जमिनी मिळाल्या, पण त्यांनीं त्यांचा स्वीकार केला नाहीं. दिनकरांच्या

कांहीं शिष्यांनीं आपलीं वतनें त्यांस अर्पण करून दानपत्रें करून दिलीं पण या वतनांचाही स्वीकार त्यांनीं केला नाहीं. त्यामुळें हीं सगळीं सनदापत्रें व दानपत्रें तशींच घरांत पडून राहिलीं.

दिनकरांच्या शिष्यमंडळींत कांहीं निस्पृह शिष्य होते व कांहीं प्रापंचिक होते. निस्पृहांत गणेश, जनार्दन, शिवराम, श्रीधर, व्यंकटेश, हरि, रघुवीर, त्र्यंबक, विठ्ठल, श्याम व दामोदर हे प्रमुख होत. प्रापंचिकांत दिनकरांचे उभयबंधु शामराव व त्र्यंबक हे मुख्य होत. त्याचप्रमाणें बहीण सई व कन्या द्वारका यांनींही त्यांचा उपदेश घेतला होता. बापाजी, व्यंकटेश, कान्होजी राजे, हिरो पाटील, बाय पाटील, रुद्रराम, बाळकृष्ण, जनार्दन हीं आणखी त्यांच्या प्राप्रंचिक शिष्यांचीं नांवें आढळतात.

दिनकर यांनीं '**स्वानुभवदिनकर**' या नांवाचा मोठा ओंवीबद्ध ग्रंथ व बरीचशी स्फुट कविता रचिली असून ती धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेनें दोन भागांत छापून प्रसिद्ध केली आहे. स्वानुभवदिनकराचे १६ कलाप असून ८१ किरणें आहेत व ओवीसंख्या ६७५० आहे. या ग्रंथांत वेदान्त व भक्तिमार्ग यांचें विवेचन फार उत्तम प्रकारें केलें आहे. भाषादृष्ट्याही ग्रंथ निर्दोष आहे. दिनकरांची कांहीं कविता हिंदी भाषेंत आहे. या सर्व कवितांचे मुख्य विषय भक्ति, ज्ञान, वैराग्य इत्यादि असून त्यांचें पर्यवसान श्रीरामोपासनेंत झालें आहे. दिनकरबुवा निस्सीम रामभक्त होते. त्यांस पुत्रप्राप्तीविषयीं व 'स्वानुभवदिनकर' ग्रंथाविषयीं श्रीरामचंद्रानें वरप्रदान दिल्याचा उल्लेख त्या ग्रंथांत आहे. दिनकरांस काव्यस्फूर्ति बालपणींच झाली असावी असें वाटतें. त्यांच्या धार्मिक, दयाळु आणि वैराग्यशील वृत्तीसंबंधानें त्यांच्या मातेनें काढलेले उद्गार त्यांनींच एका अभंगांत ग्रथित केले आहेत—

**जननी म्हणे बापा ऐकें दिनकरा । अज्ञान तूं खरा कळलें मज ॥**
**मज शिकविसी दानधर्म करीं । लोक घरोघरीं पाहें कैसे ॥**

**कैसें पाहें जन नांदे धनधान्यें । मिरवितो भूषणें परोपरी ॥**
**परोपरी कां रे छळिसी आम्हांसी । कायी या धर्मासी म्हणों तुझ्या ॥**
**तुझ्यासंगें आम्ही दिनकरा जाण । जालों हीन दीन माता म्हणे ॥**

समर्थांनीं आपणास उपदेश दिल्यावर आपली स्थिति कशी झाली व आपणास असंभाव्य सुख कसें प्राप्त झालें हें दिनकरांनीं पुढील अभंगांत सांगितलें आहे —

**सद्गुरूसारिखें जिवलग सोयरें । न दिसे दुसरें त्रिभुवनीं ॥**
**काय सांगों कैसें कृपेचें करणें । संसार धरणें निरसिलें ॥**
**माझें निज मज अनंता काळाचें । दिधलें तें साचें काय सांगों ॥**
**सांगों जातां वाचा शब्देंसीं निमाली । मनेंसीं विराली कल्पनाही ॥**
**असंभाव्य सुख ध्याता ध्यानेवीण । ध्येयचि संपूर्ण केलें मज ॥**
**केलें मजवीण मज निरंतर । म्हणे दिनकर रामदास ॥**

गुरूपदेशानंतर प्राप्त झालेल्या अनिर्वाच्य सुखाचा अनुभव सांगतांना बहुतेक संतांनीं अशाच प्रकारचे उद्गार काढले आहेत. ब्रह्माचें वर्णन करतांना श्रुतीला ज्याप्रमाणें 'नेति नेति' या शब्दांचा अवलंब करावा लागला त्याप्रमाणेंच गुरूपदेशजन्य ब्रह्मसुखाचा अनुभव 'सद्गुरूचें सुख सये सांगतां नये' अशा नकारात्मक शब्दांनींच बहुतेक संतांनीं वर्णन केला आहे. शर्करेची मधुरिमा जशी शब्दांनीं सांगतां येत नाहीं तसें हें ब्रह्मसुख वाचेनें वर्णितां येत नाहीं, कारण तें अनिर्वाच्य–शब्दातीत–आहे.

दिनकरांची एकंदर कविता अस्सल रामदासी थाटाची आहे; रामदासस्वामींच्याच शिकवणीचा अनुवाद दिनकरांनीं सर्वत्र केला आहे. शिवाय एकनाथादि पूर्वकालीन व तुकारामादि समकालीन संतांच्या कवितेचीही छाप त्यांच्या कवितेवर पडली असल्याचें स्पष्ट दिसतें. मात्र त्यांचा स्वतःचा अधिकार या कवितेंत प्रतीत झाल्याशिवाय रहात नाहीं.

दिनकरांची मुख्य शिकवण खालील ओव्यांत समाविष्ट झाली आहे.

श्रीराम जयराम जयजय राम । नित्य स्मरणाचा हाचि असावा नेम ।
त्यावांचूनि मिथ्या श्रम । वायांवीण करूं नये ॥
वैराग्य करावें विवेकयुक्त । प्रतिज्ञा म्हणवावें श्रीरामभक्त ।
पदार्थमात्रीं कदापि आसक्त । प्राणांतींही न व्हावें ॥
जितुकी गोष्टी मुखें बोलावी । तितुकी क्रिया करूनि दाखवावी ।
सत्क्रिया उत्तरोत्तर वाढवावी । धर्मशास्त्रें विचारेंशीं ॥
या लोकांचे ठायीं नाहीं एक निश्चय । म्हणोनि यांसी होती नाना अपाय ।
तऱ्ही आपुल्या स्वहिताचा उपाय । प्राणांतींही न देखती ॥
आपणासी लागला रोग क्षय । वैद्य दुसऱ्यासी करी औषधोपाय ।
आयुष्य भविष्यतेचा अन्वय । नाडीज्ञान निदानेंशीं ॥
पराव्यासि नाना उपदेश करिती । कर्तव्या न कर्तव्या स्थापिती ।
परी आपुला मूलान्वय न विचारिती । गर्हिसपणें मूर्खत्वें ॥
दीप घरच्यांसी करी सभोंता उजेड । परी अंधारीं व्यापिलें तें न देखे बूड ।
तेवीं आपुलें स्वहित न जाणोनि मूढ । आणिकां बोधिती नानापरी ॥
तऱ्ही कोण्ही एकीं ऐसें न करावें । संसारीं आलियातें सहज स्वभावें ।
अनन्यभावें स्वहित साधावें । शरण रिघोनी श्रीगुरूसी ॥
मनाचा स्वभाव चंचळ आहे । मन क्षणैकही निश्चळ न राहे ।
अवस्तुसी वस्तुत्वें पहात राहे । आणि वस्तुसी विसरे तत्काळ ॥
म्हणोनि हें चित्त जिंकिल्यावीण । जितुकें साधन तितुका शीण ।
अभिनिवेशासीच होय कारण । तेथें परमार्थ कैंचा ? ॥
केवढा या चित्ताचा चमत्कार । महातपस्वियांही तत्काळ करी असुर ।
आणि गृहस्थाश्रमीयां करूनि योगेश्वर । दैवी संपत्ति त्यां देतसे ॥
अहो न होतां चित्त हें आपवर्ग । त्रिभुवनविजयासी होती उपसर्ग ।
नहुष पावलीयाहीवरी स्वर्ग । चित्तें तत्काळ पाडिला ॥

**असो, करावयासी मनोजय। मुख्य पाहिजे सत्संगाची सोय।**
**सत्संगें संसारवासनात्यागाचा अन्वय। सहजचि साधे॥**
**संतीं संसार केला मोक्षरूप। संतकृपा शीतळ त्रिताप।**
**स्वानुभवें दिनकरा ऐसें पडप। सद्गुरूचिया अनुग्रहें॥**
**संत विवेकाचे आगर सदा। सारासारविचार नित्य धंदा।**
**दृष्टिमात्रें संसारदैन्य आपदा। भाविकांची निरसिती॥**

'वेष असावा बावळा०' ह्या समर्थांच्या प्रसिद्ध ओवीच्याच अर्थाची दिनकरांची पुढील ओवी पहा —

**कार्य करूनि अतिसावध। राजकारणीं असोनि विविध।**
**साबडेपणीं अतिसावध। वेष भाविक बावळा॥**

दासबोधांतील बहुतेक सर्व विषय स्वानुभवदिनकरांत आले आहेत. त्याच्या १६ कलापांत ( १ ) कथाप्रशंसा, ( २ ) संसारलक्षण, ( ३ ) वैराग्य, ( ४ ) विवेक, ( ५ ) कर्म, ( ६ ) उपासनानिश्चय, ( ७ ) उपासनारहस्य, ( ८ ) पंचधाभक्तिलक्षण, ( ९ ) हठयोगलक्षण, ( १० ) सप्तचक्रशोधन, ( ११ ) चतुर्विधज्ञान, ( १२ ) ब्रह्मांडदेहचतुष्टयनिरास, पिंडब्रह्मांडऐक्य, आणि मायाब्रह्मनिवाड, ( १३ ) मायाब्रह्मविवरण, ( १४ ) विज्ञानस्थिति, पंचभूत त्रिगुणलक्षण, ( १५ ) मनउन्मनस्थिति, मोक्षलक्षण, कूटविवरण, ( १६ ) ग्रंथस्तव, श्रीगुरुपरंपरा इतके मुख्य विषय असून प्रत्येक कलापाच्या एकेका किरणांत एकेक पोटविषय आला आहे. दासबोध वाचल्यावर हा 'स्वानुभवदिनकर' ग्रंथही साधकांनीं अवश्य वाचावा.

समर्थांप्रमाणेंच दिनकरांनींही तत्कालीन देशस्थितीचें अत्यंत निराशाजनक चित्र रेखाटले आहे; परंतु हें चित्र 'स्वानुभवदिनकर' ग्रंथ त्यांनीं ज्या वेळीं लिहिला त्या वेळच्या स्थितीचें नसून स्वराज्यस्थापनेच्या पूर्वींच्या स्थितीचें आहे व कलियुगवर्णनांत तें सहज येऊन गेलें आहे. एरवीं, दिनकरांनीं शके १६१६ त आपला ग्रंथ लिहिला, त्या वेळीं यवनांचा

उपद्रव पुष्कळच कमी झाला होता. तथापि एवढी गोष्ट खरी कीं, शिवाजी-महाराजांचें निर्याण होऊन त्या वेळीं चौदा वर्षें झालीं होतीं व त्यांच्या पश्चात् संभाजीच्या कारकीर्दींत व त्यांच्या पश्चात् राजारामाच्या कारकीर्दींत अहमदनगर येथें येऊन राहिलेल्या औरंगजेबाच्या लष्करानें महाराष्ट्रांत जो धुमाकूळ माजविला होता तो अगदींच उपेक्षणीय नव्हता आणि दिनकरांनीं काढलेले पुढील उद्गार कदाचित् याच धुमाकुळास अनुलक्षून असावेत. दिनकर म्हणतात ——

**बोलतां कलीचें महिमान । धर्म झाला कंपायमान ।**
**जे युगीं राजा यवन । तेथें अन्य वार्ता कायसी ? ॥**
**कुलस्त्रिया भ्रष्टविल्या यवनीं । ब्राह्मण जाले दासीगमनी ॥**

*  *  *  *

**तीर्थक्षेत्रें व्रतें उद्यापनें । सकळही उच्छेदिलीं यवनें ।**
**धर्मचर्चा पुराणश्रवणें । कथाकीर्तनें राहिलीं ॥**

त्या वेळच्या राजकीय धामधुमीच्या दिवसांत सामान्य लोकांनीं कसें वागावें हें दिनकरबुवांनीं समर्थांच्या आवडत्या 'प्रमाणिका' वृत्तांतील पुढील श्लोकांत सांगितलें आहे ——

**जयाकडे समर्थ राम । त्यासि काय धामधूम ॥**
**मुढासी हे परंपरा । त्यजूनि निश्चयो खरा ॥**
**सहाय राम तो कुळीं । करील काय रे हुली ॥**
**उगेचि कां भरीं भरा । त्यजूनि निश्चयो खरा ॥**
**करील राम तें खरें । अचूक तें विधीस रे ॥**
**उगाचि संशयो नरा । त्यजूनि निश्चयो खरा ॥**
**उठेल तें सुखें उठो । लुटेल तें सुखें लुटो ॥**
**नये दुरुक्ति अंतरा । त्यजूनि निश्चयो खरा ॥**
**जनीं वनीं निरंजनीं । नियंत राम रक्षणीं ॥**
**छळाल कां दिवाकरा । त्यजूनि निश्चयो खरा ॥**

या निश्चयपंचकांत वर्णिलेली ही धामधूम कोणती असावी बरे ? यांत लुटीचा उल्लेख आला आहे. यावरून तीसगांवच्या बाजूस कोणी तरी छापा घालून लूट करणार आहे अशी त्या वेळीं हूल उठली असावी व तिलाच अनुलक्षून दिनकरांनीं हें पंचक लोकांना धीर देण्यासाठीं लिहिलें असावें असें वाटतें. रामदासी संप्रदायाचें सामर्थ्य कशांत होतें हें या उद्गारांवरून लक्षांत येतें. "जनींवनीं निरंजनीं राम रक्षण करण्यास समर्थ आहे" असा ज्यांचा दृढ विश्वास होता त्या दिनकरबुवांसारख्या समर्थशिष्यांनीं 'छळाल का दिवाकरा?' असा बाणेदारपणाचा प्रश्न विचारावा हें अगदीं साहजिक आहे. शिवाय 'जो कोणी लुटणार असेल त्याला खुशाल लुटूं दे; त्याच्याविषयीं आमच्या मनांतदेखील दुरुक्ति येणार नाहीं' हे उद्गार खऱ्या साधुत्वाचे निदर्शक नव्हत असें कोण म्हणेल ? छलकाचा प्रतिकार करावयाचा तो राम करील; आम्हाला छलकाचा प्रतिकारच काय पण त्याच्याविषयीं दुरुक्ति करून त्याचा निषेध करण्याचेंही कारण नाहीं असें म्हणणाराचा आत्मविश्वास केवढा दांडगा असला पाहिजे बरें ? वरील निश्चयपंचकांत जी तेजस्विता आणि जें आत्मविश्वासाचें बळ व्यक्त झालें आहे तो केवळ उपासनामार्गाचा प्रभाव होय. मारुतिउपासनेसंबंधाने दिनकर म्हणतात —

**जितुके रामदासांचे शरणागत । जाले आणि होणार परंपरागत ।**
**तितुक्यांचा साहाकारी श्रीहनुमंत । सुखदुःखीं तो स्मरावा ॥**
**केलियां मारुतीचें निजस्मरण । तत्काळ होईजे सुखसंपन्न ।**
**दुःख संकट महाविघ्न । स्मरणमात्रें नाश पावे ॥**

विस्तारभयास्तव 'स्वानुभवदिनकरां'तले आणखी वेंचे येथें देतां येत नाहींत. सदर ग्रंथांत दिनकरांनीं स्वतःस 'दिनकर रामदास' म्हटलें आहे. "अहो सर्वीं असोनि सर्वातीत । एक रामदास सद्गुरु इत्थंभूत । म्हणोनि स्वानुभवदिनकरीं साद्यंत। दिनकर रामदास बोलिजे ॥"

दिनकरांचा मृत्युशक उपलब्ध नाहीं. शके १५६४ त त्यांनीं भिंगार येथें भागवत ग्रंथ लिहिल्याचा उल्लेख आढळतो. त्यांस शके १५७६ त समर्थांचा अनुग्रह झाला व शके १६१६ त त्यांनीं 'स्वानुभवदिनकरा'ची रचना केली हें पूर्वीं सांगितलेंच आहे. शके १६१२ ते शके १६१८ पर्यंत त्यांच्या नांवाचा उल्लेख कागदपत्रीं आढळतो; पुढें त्यांचे पुत्र रामचंद्र यांचेंच नांव सर्वत्र आढळतें, यावरून शके १६१८ च्या सुमारास ते समाधिस्थ झाले असावे असें वाटतें.

दिनकर हे खुद्द रामदासस्वामींचे एक प्रमुख शिष्य असतां पंढरपुरवर्णनपर व पांडुरंगस्तुतिपर पुष्कळ कविता त्यांनीं केली आहे; यावरून रामदासी संप्रदाय आणि वारकरी संप्रदाय यांचा मुळांत बिलकुल विरोध नव्हता हें स्पष्ट दिसतें. दिनकरांची स्फुट कविताही बरीच आहे व ती निरनिराळ्या अनेक वृत्तांत आहे. त्यांच्या श्लोकांची रचना जरा ओबडधोबडच आहे. पदें साधारण आहेत. अभंग मात्र चांगले आहेत. नमुन्यादाखल यांतलीं कांहीं पद्यें देतों —

### श्लोक

**परम विरह होतो राघवेंवीण प्राणा ।**
**नयनिं निज न लागे याविना कंठवेना ॥**
**निशिदिनिं सजना रे चित्त हें भ्रांत जालें ।**
**दिनकर प्रभु येना सर्वही व्यर्थ गेलें ॥**

**जननिपद पराचे अंगनेलागिं द्यावें ।**
**परधन निजस्वार्थें स्वप्निंही नातळावें ॥**
**घडिघडि रसनेनें रामपीयूष ध्यावें ।**
**दिनकरमन रामीं रामरूप स्वभावें ॥**

**क्षणभरि हरिनामीं हेत थारेच ना कीं ।**
**क्षणभरि हरिध्यानीं चित्त हें नातळे कीं ॥**

क्षणभरि हरिरंगीं बुद्धि निश्चीत नाहीं ।
दिनकर हिन जालें हीत न्हेचि कांहीं ॥
अनुर्वाच्य वाचेसि कैसें वदावें ।
असंभाव्य भाऊनि कैसें भजावें ॥
अरूपासि कैस्या स्वरूपें पहावें ।
नमो सद्गुरू काय कोणा म्हणावें ॥
मना कल्पना निर्विकल्पीं धरावी ।
मना भावना निर्जनाची करावी ॥
मना काम निष्कामतेमाजि न्यावें ।
सदा सर्वदा रामदासीं भजावें ॥
मना बोलतां चालतां राम ध्यावा ।
जळा सेवितां जेवितां तो स्मरावा ॥
जनीं जागतां नीजतां नाम घ्यावें ।
सदा सर्वदा रामदासीं भजावें ॥
घडीनें घडी सार्थकाची करावी ।
कदा चित्तवृत्ती प्रपंचीं नसावी ॥
अखंडीत हा जानकीकांत ध्यावा ।
वृथा फुंज या वैभवाचा त्यजावा ॥
जनीं सर्वभावें स्वभावेंचि रामीं ।
धरावी बरी वृत्ति हे पूर्णकामीं ॥
सदा काळ हा सार्थकाचा भरावा ।
वृथा फुंज या वैभवाचा त्यजावा ॥
धडाडीत पापें मुखें नाम घेतां ।
थडाडीत कांपे कळीकाळ चित्ता ॥
निमोलें जना नेघवे हें फुकाचें ।
अभाग्या जिवा रामचिद्रूप कैंचें ॥
जयांचेनि संगें समाधान भंगे ।
जयांचेनि संगें स्वहीतार्थ खंगे ॥

तयांचेनि संगें मना कोण नीवे ।
सुखें सांडुनी त्यां अरण्यांत जावें ॥
गडाडील रे कंठ जेव्हां कफानें ।
थरारीत कांपेल काया जरेनें ॥
तधीं ठाकती दूर सर्वत्र कोण्ही ।
न होतां असें तो स्मरें चापपाणी ॥
झडझडित झडाडां वायु झाडीत नेटें ।
कडकडित कडाडां मोडती वृक्षबेटें ॥
भरभरित भरारां ऊडती माळचक्रें ।
फडफडित फडाडां भेदिती कर्णनेत्रें ॥
थडथडित थडाडां फूटती अंगगात्रें ।
भडभडित भडाडां रक्त लोटे वगत्रें ॥
भरत सरसरारां मृत्तिका सैर नेत्रीं ।
नयनिं गृह न दीसे पातली कृष्णरात्री ॥

असे हे दिनकरांचे श्लोक सुमारें २००।३०० आहेत. पांच, आठ, दहा, असे श्लोक एकेका गुच्छांत आहेत. समर्थांच्या कवितेचा दिनकरांचा व्यासंग इतका जब्बर होता कीं, त्या कवितेचें अनुकरण त्यांना अगदीं हुबेहूब साधलें आहे.

## अभंग

१

गेली घटिका नये पुढें । कीजे स्वहित रोकडें ॥
नाहीं भर्वसा क्षणाचा । घात कठीण काळाचा ॥
रीघ शरण सद्गुरुपायीं । तेथें अभिनव स्वसुख पाहीं ॥
दिनकर म्हणे भावें । शिकविलें हें मानावें ॥

२

पडो हें आकाश पृथ्वी जावो तळा । परी तो जिव्हाळा न खंडे कीं॥
न खंडे अखंड चिंतन देवाचें । न चिंतितां वाचे चाले नाम ॥

चाले नाम नित्य अवस्थांवेगळें । न जाय खंडलें कोण्हा काळें ॥
काळातीत नाम काळाचे अंतरीं । मशकाभीतरीं नाम तेंचि ॥
नामें नामातीत दिनकर जाला । विश्वासतां बोला सद्गुरूच्या ॥

३

राम माझे मनीं राम माझे ध्यानीं । राम माझे वाणी अखंडित ॥
राम धनी मज राम धनी मज । राम धनी मज निरंतर ॥ ध्रु० ॥
राम घरीं दारीं हिंडतां व्यापारीं । राम क्षणभरी दुरी नव्हे ॥
राम जनीं वनीं अखंड श्रवणीं । संपूर्ण लोचनीं भरलासे ॥
राम पाहें येथें राम पाहें तेथें । उभा जेथें तेथें सर्वां ठायीं ॥
सर्वांतरीं राम निबिड निष्काम । दिनकर रामदास म्हणे ॥

४

भक्तिपेंठे भरला हाट । मिनले वैष्णवांचे थाट ॥
सवदा घेवों सोहंसिद्धि । वेंचवेंचूं देहबुद्धि ॥
सत्य भावाचें दुकान । संतीं मांडिलें संपूर्ण ॥
बरी फावलीसे वेळ । नरदेह पावन मूळ ॥
देत्यां घेत्यां पडली गांठी । वाट चालिली उफराटी ॥
येणें जाणें जेथिल तेथ । सर्व जालें इत्थंभूत ॥
अनुर्वाच्य सुख बाणे । अनुभवी तोचि जाणे ॥
दिनकर रामीरामदास । भक्तिपेंठे स्वप्रकाश ॥

५

माझें विश्रांतीचें वर्म । अखंड सद्गुरूचें नाम ॥
वेधु लागला निजाचा । फुंज शमला जाणिवेचा ॥
जनीं वनीं निरंजनीं । न दिसे दुजें त्रिभुवनीं ॥
ज्ञान ज्ञेय ज्ञातेपण । सरलें ध्येय ध्याता ध्यान ॥
शब्देंशीं क्षरलें मौन । अपूर्णेंसी परिपूर्ण ॥
दिनकर रामीरामदास । हेंही नुरोनियां निःशेष ॥

## पदें

### १

रामा रे मेघश्यामा रे। तनु मन वेधो तुझिया नामा रे ॥ ध्रु० ॥
देवदेवा रे देईं सेवा रे। शिव ध्यातो माझा कोण केवा रे ॥
दीननाथा रे रघुनाथा रे। सनाथ करीं धरितों चरणीं माथा रे ॥
महाराजा रे योगबीजा रे। दिनकर दीन मोक्षध्वजा रे ॥

### २

काय करावें त्रिजटे। कैसें जालें उफराटें।
राक्षसांचीं नाना संकटें। राघवेंवीण ॥ ध्रु० ॥
सूर्यें प्रभा वियोगिली। अंधकारें स्वगृहा नेली।
तैसी परी मज जाली। राघवेंवीण ॥
येउनियां राहो ग्रहणीं। शशिकला ग्रसिली वदनीं।
तैसी स्थिति मजला सजणी। राघवेंवीण ॥
संयोगीं वियोग पाहें। क्षण तोही मज न साहे।
आतां मी करूं वो काये। राघवेंवीण ॥
दिनकरवंशाभरणें-। विण माये ज्यावें कोणें।
प्रेताऐसें अमंगळवाणें। राघवेंवीण ॥

### ३

सार्थक संसारीं। रघुपतिनामें निर्धारीं।
सादर होउनि तन्मय जेथें अखंड त्रिपुरारि ॥ ध्रु० ॥
अश्वमेध कोटी। बहुविध साधनपरिपाटी।
असतां येणें जाणें न तुटे वाउगि आटाआटी ॥
नामाचा महिमा। नेणें चतुरानन ब्रह्मा।
तेथें बापुडें मानव किती जाणेल सुखधामा ॥
दिनकर म्हणे पाहें। सार्थक नरदेहीं आहे।
सारासार विचारितां नामें गति लाहे ॥

एकंदरींत, महाराष्ट्र वाङ्मयांत—विशेषतः रामदासी वाङ्मयांत—दिनकरांनीं चांगलीच भर घातली आहे. उद्धव किंवा कल्याण या समर्थांच्या दुसऱ्या

दोन प्रमुख शिष्यांप्रमाणें समर्थांचें फारसें सान्निध्य दिनकरांस लाभलें नसतांही समर्थांच्या ग्रंथांच्या अभ्यासानें आणि मननानें त्यांची शिकवण आत्मसात् करून व तींत स्वानुभवाची भर घालून त्यांनीं जी ग्रंथरचना केली आहे ती महाराष्ट्राच्या पारमार्थिक वाङ्मयांत चिरकाल टिकून राहण्याच्या योग्यतेची आहे यांत संशय नाहीं. रामदासी वाङ्मयांत दासबोधानंतर नांव घेण्यासारखा उत्कृष्ट ग्रंथ म्हणजे 'स्वानुभवदिनकर' हाच होय.

## दिनकरांची वंशावळ



## रामचंद्रकृत दिनकरांची आरती

ब्रह्मज्ञाना आगर सागर शांतीचा ।
कृपेचें माहेर उदधी करुणेचा ॥
शरणागत जनवत्सल मेरू सत्त्वाचा ।
विवेकाचा नायक दायक मुक्तीचा ॥ १ ॥

जयदेव जयदेव जयजय गुरुदेवा ।
जय दिनकरदेवा ।
निजभावें आरति तुज देसी निजठेवा ॥ ध्रु० ॥

नित्यानित्यविचारें निजसुख दाविसी ।
मी मम निरसुनि माझें आत्मत्व देसी ॥
जिवशिवभेदाभेदें स्वरूपीं नुरवीसी ।
स्वानुभवें निजैक्य परब्रह्मेंसी ॥ २ ॥

निजदासा दिव स्वामी दीनाचा ।
म्हणुनी दिनकरस्वामी आळविती वाचा ॥
देव भक्तां ऐक्य करिसी तूं साचा ।
दिनकरनंदन राम शरण त्रिवाचा ॥ ३ ॥

## ३ वेणाबाई

श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या शिष्यवर्गात ज्या थोड्याशा स्त्रिया होत्या त्यांपैकीं वेणाबाई हीच काय ती एकटी नांव घेण्यासारखी कवयित्री असून तिची बरीच कविता उपलब्ध आहे.

कोल्हापूर येथील देशपांडे आडनांवाच्या देशस्थ ब्राह्मण घराण्यांत शके १५४९च्या सुमारास वेणाबाईचा जन्म झाला होता. ती लहानपणापासून शांतस्वभावी व विरक्तवृत्तीची होती. त्या वेळच्या चालीप्रमाणें अगदीं अल्पवयांतच मिरज येथील एका गृहस्थाशीं तिचें लग्न झालें. परंतु लग्नानंतर लवकरच तिचा नवरा वारल्यामुळें ती दहा वर्षांची होण्यापूर्वींच

दुर्दैवानें तिला वैधव्य आलें. आपल्यावर केवढी भयंकर आपत्ति ओढवली आहे याची यथार्थ कल्पना त्या वयांत तिला कोठून होणार? पण पतीशिवाय आपल्याला सगळा जन्म घालवावा लागणार एवढा अंधुक विचार मात्र तिच्या मनांत आला व त्या भावी दुःखास तोंड देण्याची तयारी तिनें चालविली. सुदैवानें, वेणाबाईची सासू, त्या वेळच्या इतर सासवांप्रमाणें फारशी कजाग नव्हती. वेणाबाईला लिहितांवाचतां येत होतें व आपला फुरसतीचा वेळ ती पोथ्यापुस्तकें वाचण्यांत घालवीत असे. तिच्या कुलोपाध्यायानें तिला एकनाथी भागवत वाचावयास सांगितलें होतें; व त्याप्रमाणें त्या ग्रंथाचें पारायण ती नित्य मोठ्या भक्तिभावानें करीत असे.

श्रीसमर्थ रामदासस्वामी एके दिवशीं हिंडत हिंडत मिरजेस गेले असतां भिक्षेसाठीं वेणाबाईच्या घरीं गेले आणि त्यांनीं तुंबाभर दूध मागितलें. तेथें वेणाबाईची सासू होती ती म्हणाली, "दूध आहे पण तें मारुतीच्या नैवेद्यासाठीं ठेवलें आहे, म्हणून देतां येत नाहीं." सासूबाईनीं दूध नाहीं म्हटलें म्हणून वेणाबाईस वाईट वाटलें. समर्थांस पाहून त्यांच्याविषयीं तिच्या मनांत पूज्यबुद्धि उत्पन्न झाली होती. समर्थांस रिक्तहस्तानें परत पाठवूं नये म्हणून नैवेद्याच्या दुधांतलें थोडेंसें दूध त्यांस देण्याची आपल्या सासूस तिनें विनंति केली, परंतु तेवढ्या अवधींत समर्थ निघून गेले. तेव्हां वेणाबाईस फार वाईट वाटलें. पुढें कांहीं दिवसांनीं समर्थ वेणाबाईच्या घरीं पुनः भिक्षेस आले असतां, वेणाबाई घराच्या पुढील चौकांत तुलसीवृंदावनापाशीं एकनाथी भागवत वाचीत बसली होती, तिला त्यांनीं विचारलें, "मुली, हें कोणत्या ग्रंथाचें पारायण चाललें आहे?" वेणाबाईनें सांगितलें, "एकनाथी भागवताचें." ही एवढी लहान मुलगी एकनाथी भागवतासारखा गहन ग्रंथ वाचते, पण तिला त्यांत काय समजत असेल कोण जाणे, अशी शंका समर्थांस येऊन त्यांनीं तिला विचारलें, "भागवतांतील भागवतधर्म जाणून पारायण करितां किंवा उगीच पारायण करितां?"

वेणाबाई म्हणाली, "भक्तिभावानें पोथी वाचावी एवढेंच मला ठाऊक. त्यांत काय सांगितलें आहे आणि तें कसें आचरणांत आणावयाचें हें मला कोठून समजणार ?" इतकें बोलून वेणाबाईनें समर्थांस कांहीं प्रश्न विचारले व समर्थांनींही त्यांचीं उत्तरें दिलीं. वेणाबाईच्या मनावर समर्थांच्या भाषणाची चांगलीच छाप पडली. पुनः समर्थांचें दर्शन कधीं होईल असा तिला ध्यास लागून राहिला. भिक्षेच्या वेळीं समर्थांनीं उच्चारलेले 'जयजय रघुवीर समर्थ ' हे शब्द तिच्या कानांत सारखे घुमूं लागून तिची वृत्ति तदाकार होऊं लागली. हेच आपले गुरु आणि हेच आपणास परमार्थाचा योग्य मार्ग दाखवितील अशी तिची भावना होऊन पुनः समर्थांची भेट कधीं होईल अशी तिला उत्कंठा लागून राहिली.

कांहीं दिवसांनीं वेणाबाई मिरजेहून माहेरीं कोल्हापुरास गेली, तेव्हां तेथें समर्थ आपल्या शिष्यसमुदायासह येऊन राहिले होते व त्यांचीं कीर्तनें चालू होतीं. आईबापांस विचारून वेणाबाई नित्यनियमानें कीर्तनास जात असे. एके दिवशीं तिनें समर्थांच्या पायांवर डोकें ठेवून आपणास अनुग्रह द्यावा अशी विनंति केली. ती मान्य करून समर्थांनीं तिला राममंत्रोपदेश दिला. अशा रीतीनें वेणाबाई कृतार्थ झाली खरी, पण तिची ही पारमार्थिक वृत्ति तिच्या सासूसासऱ्यांस किंवा आईबापांस फारशी आवडली नाहीं. शिवाय छिद्रान्वेषी टवाळ लोकांचीही टकळी सुरू झाली. प्रत्येक गोष्ट दोषैकदृष्टीनें पाहण्याची बहुजनसमाजाची स्वाभाविक प्रवृत्ति असल्यामुळें ही देशपांड्यांची तरुण विधवा मुलगी ह्या ब्रह्मचारी बुवाच्या नादीं लागली आहे, असाच वेणाबाईच्या वर्तनाचा अर्थ सामान्य लोकांनीं केला व त्या प्रकारचीं त्यांचीं बोलणीं वेणाबाईच्या आईबापांच्या कानावर येऊं लागलीं. सुनेला यांनीं स्वैर सोडलें आहे असें म्हणून वेणाबाईच्या सासूसासऱ्यांसही लोक नांवें ठेवूं लागले. आईबाप व सासूसासरा यांनीं वेणाबाईस त्या मार्गापासून परावृत्त करण्याचा

पुष्कळ प्रयत्न केला, पण तिच्या वृत्तींत बदल झाला नाहीं. ती म्हणते —

**पद**

**रामनामेंविण मज कंठेना ॥ ध्रु० ॥**
**कोणी वंदिती कोणि निंदिती ।**
**वास मी त्यांची पाहीना ॥ १ ॥**
**हृदयीं धरिले सद्गुरुचरण ।**
**प्राणांतींहि विसंबेना ॥ २ ॥**
**वेणीचें निजधन रामचि जीवन ।**
**होणार तें कां सुखें होईना ॥ ३ ॥**

मिराबाई, बहिणाबाई, सखूबाई, वगैरे स्त्रियांचाही असाच छळ त्यांच्या आप्तेष्टांनीं व कुटाळ लोकांनीं केला; परंतु त्या छळास भिऊन त्या आपल्या उच्च ध्येयापासून च्युत झाल्या नाहींत; व म्हणूनच त्यांचीं नांवें सर्वतोमुखीं होऊन राहिलीं आहेत व त्यांचीं चरित्रें लिहिलीं जात आहेत. भगवद्भक्तीच्या भुतानें ज्याला एकदां झडपलें तो आप्तेष्टांच्या रागालोभाची आणि कुटाळांच्या टवाळकीची पर्वा करीत नाहीं. वेणाबाईनें लोकापवादाच्या भयानें किंवा वडील मंडळीच्या धाकानें भगवद्भक्तीचा त्याग केला नाहीं. प्रभुपदीं अनन्यभावानें शरण जाऊन, श्रीसमर्थांनीं दिलेल्या रामनाममंत्राचा जप करण्यांत, ग्रंथवाचनांत आणि कथाकीर्तनश्रवणांत ती आपला कालक्षेप करूं लागली. श्रीरामचरणकमलीं तिची वृत्ति कशी रंगून गेली होती हें तिच्या पुढील पद्यावरून लक्षांत येतें—

**तुझी तुझी तुझी पावना रामा ॥ ध्रु० ॥**
**भावें अभावें कुभावें, परि तुझी, पावना रामा ॥ १ ॥**
**सुष्ट हो दुष्ट हो नष्ट हो, परी तुझी पावना रामा ॥ २ ॥**
**हीन दीन अपराधी, वेणी म्हणे परि तुझी, पावना रामा ॥ ३ ॥**

"अखंड सहवास होऊन निरंतर श्रीचरणसेवा घडावी" अशी वेणाबाईनें समर्थांची प्रार्थना केली; परंतु अजून वेळ आली नाहीं असें सांगून व मनाचे श्लोक, अभंग, पदें, वगैरे निरंतर वाचण्यास व त्यांचें एकान्तांत मनन करण्यास सांगून समर्थ पर्यटणास गेले. श्रीसद्गुरुचरण अंतरले म्हणून वेणाबाईस फार दुःख झालें. तिची परमार्थोन्मुखता जों जों वाढत चालली तों तों जननिंदेलाही जोर येत चालला. स्वतः वेणाबाईनें या निंदेची पर्वा केली नाहीं, पण तिच्या आईबापांना तो लोकापवाद दुःसह वाटूं लागला. "यापेक्षां कारटी मरती तर बरें होतें," असें त्यांना वाटूं लागलें व शेवटीं त्यांनीं तिला विषप्रयोग केला असेंही म्हणतात! 'दासविश्रामधाम' ग्रंथांत अशी माहिती दिली आहे —वेणाबाई आपला हेका सोडीत नाहीं असें पाहून तिच्या आईबापांनीं तिला विषप्रयोग करण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें तुपांत विष कालवून तें तिला पाजलें. हें विष किती जलाल होतें हें आत्मारामबुवा सांगतात —

**कराडप्रांतींचें विष महादारुण। पोटीं प्रवेशतां मोहरीप्रमाण।**
**पाणी न मागतां जाय प्राण। ठाऊक असे बहुतेकां॥**

असलें हें जलाल विष वेणाबाईच्या पोटांत जातांच तिच्या अंगाचा भयंकर दाह होऊं लागला व म्हणून ती एका खोलींत जाऊन तळमळत पडली. तेव्हां तिच्या आईबापांनीं खोली बाहेरून बंद करून तिला कुलूप लावलें. वेणाबाईस सर्पदंश झाला आहे असें त्यांनीं लोकांस सांगितलें. इकडे वेणाबाईनें समर्थांचा धांवा सुरू केला तेव्हां समर्थ तत्काल त्या ठिकाणीं प्रगट झाले व त्यांनीं आपली छडी तिच्या अंगावरून फिरविली. त्याबरोबर वेणाबाईचें दुःख नाहींसें होऊन ती राम राम म्हणत उठून बसली व तिनें समर्थांचे पाय धरले. वेणाबाई मूळची गौरवर्ण होती ती अंगांत विष जिरल्यामुळें काळी झाली व तें पाहून समर्थ म्हणाले, "हें आतां ठीक झालें, कारण —

**फिरावें लागतें अरण्यांत । सोसावें लागतें उष्णशीत ।**
**नाजुकपणाचें हें नव्हे कृत्य । नीळ कवच घातलें श्रीरामें ॥**
**देहचतुष्टय निरसलें रोकडें । कां पाहसी फिरफिरों अंगाकडे ।**
**आपणेंचि वस्तु होऊनि धडफुडे । होय कीं नोहे संशयो कां ?॥**
**देशिकेंद्र वदती "तरलीस माय । स्वस्थ नांदावें फिटलें भय ।"**

समर्थांचें हें अभयवचन ऐकतांच वेणाबाई म्हणाली, "महाराज, आपला वियोग मला आतां सहन होणार नाहीं. यापुढें मी आपल्याच सहवासांत राहणार." समर्थ म्हणाले, "ठीक आहे." खोलींत कोणी तरी बोलत आहे हें वेणाबाईच्या आईबापांनीं ऐकलें. त्यांनीं कुलूप काढून खोलीचें दार उघडलें तों समर्थमूर्ति आंत बसलेली त्यांच्या दृष्टीस पडली. तोंच समर्थ खोलींतून बाहेर पडले आणि एकदम मार्गस्थ झाले. हा चमत्कार पाहतांच वेणाबाईच्या आईबापांस असें वाटले कीं, श्रीरामकृपेनेंच जिचा जीव वांचला ती आतां आपली नव्हे, रामाची आहे व म्हणून वेणाबाईला त्यांनीं समर्थांबरोबर जाण्यास परवानगी दिली.

इतकें झाल्यावर मग वेणाबाईनें माहेर सोडले व ती समर्थांच्या सान्निध्यांत जाऊन राहिली. समर्थांनीं आपल्या मठांतील निरनिराळीं कामें निरनिराळ्या शिष्यांकडे सोंपविलीं होती व त्यांपैकीं उपाहाराचें काम त्यांनीं वेणाबाईकडे दिलें होतें. पुढें वेणाबाई मिरज येथें मठस्थापना करून तेथें राहिली. "याप्रमाणें मिरज येथें राहून सांप्रदाय बहुत वाढविला. बीडकर मंडळी शिष्यसांप्रदायी झाली. तेथें मठ करणेंविसीं मंडळींनीं आग्रह केला, त्यावरून तेथेंही मठ केला. त्या मठीं गिरमाजी गोसावी ठेवून तेथेंही सांप्रदाय वाढविला. मिरज येथील मठीं शिष्यसांप्रदाय बहुत व खानाकडूनही मठाचा खर्च चालत होता. मठीं अधिकारी शिष्यीण बयाबाई असे. काळ समीप आला म्हणून देह स्वामीपासीं ठेवावा यास्तव श्रीसमर्थ सज्जनगडीं होते; दर्शनास गेली. शके १५९८ नळनाम संवत्सरे." ( बखर ).

श्रीसमर्थांच्या ज्या अनेक शिष्यिणी होत्या त्यांत वेणाबाईचा पारमार्थिक अधिकार विशेष होता. शिष्यिणींपैकीं फक्त वेणाबाईसच सभेमध्यें उभें राहून कीर्तन करण्याची श्रीसमर्थांची अनुज्ञा होती.

**"वेणाबाईवांचूनि कांहीं। इतरां कन्येसी सभेसी कीर्तनआज्ञा नाहीं।**
**येकासनीं बैसोनि कीर्तन करणें पाहीं। प्रसंगानुसारें मर्यादें।"**

समर्थ परळीच्या किल्ल्यावर असतांना वेणाबाई त्यांच्या भोजनाची व्यवस्था पहात असे. तिचा असा क्रम असे कीं, समर्थांचा स्वयंपाक करावा व त्यांचें ताट वाढून तें एका खोलींत ठेवावें. मग समर्थ तेथें येऊन एकान्तीं भोजन करीत. त्या प्रसंगीं तेथें कोणीही येऊं नये अशी त्यांची आज्ञा असे. एकदां वेणाबाई नित्याप्रमाणें तेथें ताट ठेवून स्वयंपाकघरांत आली. कांहीं वेळानें तिच्या लक्षांत आलें कीं, ताटांत एक जिन्नस वाढावयाचा राहिला. ही गोष्ट लक्षांत येतांच ती तो जिन्नस घेऊन लगबगीनें समर्थांस वाढावयास निघाली. ती खोलीचें दार किंचित् उघडते तोंच तिला समर्थ एका विशाल मारुतीसह भोजन करीत असलेले दिसले. तो प्रकार पाहतांच वेणाबाईला मूर्च्छा आली. आसपास शिष्यमंडळी होती ती लागलीच धांवली पण बाई शुद्धीवर आली नाहीं. खोलींत समर्थांचें भोजन होतच होतें, पण त्यांना ही गोष्ट सांगण्याचें कोणास धैर्य होईना. कारण त्यांची शिस्त तशीच कडक होती. कांहीं वेळानें ते बाहेर आले. पण त्यांचें लक्ष वेणाबाईकडे गेलें नाहीं. तेव्हां आकांनीं प्रार्थना केली कीं, "महाराज, वेणूस उठवावें." त्यावर समर्थ म्हणाले, "नैवेद्यसमयीं आंत येऊं नये; मग ही कां आली?" आका म्हणाल्या, "महाराज, आपण मायबाप, आपल्याकडे पोर आले तर तें काय दंडास पात्र होतें?" यावर समर्थ हांसले. त्यांनीं वेणाबाईच्या अंगावरून हात फिरविला व तिला सावध केलें.

वेणाबाईचें भक्तिबळ दांडगें असल्यामुळें त्या कधीं कधीं आपलें म्हणणें समर्थांस ऐकावयास लावीत. वासुदेवबाबा कन्हेरीकर म्हणून एक

चतुर व गुणग्राही पंडित होता. तो समर्थसंप्रदायांतला होता. या गृहस्थाला मोठा विद्यामद होता. त्यानें त्रयोदशाक्षरी मंत्र नवीन निर्माण करून आपला संप्रदाय वाढविला. याप्रमाणें तो परमार्थांत बिघडलेला पाहून त्याला समर्थांनीं —

**" म्हणितलें काय रे कापट पोटीं ।**
**जालासि वेगळा पडोनि परमठीं ।**
**भुललासी कुसंगें मानासाठीं ।**
**सत्य गुरुधर्मा अव्हेरुनी ॥**
**नाडोन आपणु दुजयासी बुडविणें ।**
**रे वंचका कां गुरुक्रमासि त्यजणें ।**
**विद्यदानें धरिसी अभिमान ॥**

* * * ॥ ८४ ॥

—दासविश्रामधाम ९०

इतकें बोलून समर्थांनीं वासुदेवबाबाचें स्वहस्तें पारिपत्य केलें. त्याला कृतकर्माचा फार पश्चात्ताप झाला. पण त्याच्यासंबंधीं समर्थांपुढें बोलण्याची कोणाची छाती होईना.

एकदां वेणाबाई समर्थांसह प्रातःकाळीं गंगेस स्नानास जात होती. त्या वेळीं मागें दिलेलें, " तुझी तुझी तुझी पावना रामा०" हें पद ती म्हणूं लागली. तें करुणस्वरांतलें पद ऐकून समर्थ प्रसन्न झाले. ते तिला म्हणाले, "ज्याची मनांत अपेक्षा असेल तें माग. तें मी तुला देईन." त्यावर वेणाबाई नमन करून म्हणाली, " आम्हांला सौख्याची काय वाण ? आपली कृपा असावी म्हणजे झालें." असें म्हणून तिनें वासुदेव गोसाव्याची गोष्ट काढली. ती म्हणाली, 'स्वामींच्या कृपेनें सर्वांनीं सारखेंच सुखी असावें. त्यांपैकीं जर एक दुःखी झाला तर मनाला रुखरुख लागून राहते. वासुदेव गोसावी आपला एकनिष्ठ शिष्य; पण दुर्दैवानें त्याच्या

हातून अन्याय घडला. परंतु त्याचा तरी उद्धार कोण करणार? तो आपणच केला पाहिजे. त्याला तीर्थप्रसाद देऊन आणि बोध करून त्याची शुद्धता आपण केली पाहिजे.' वेणाबाईची ही विनंति मान्य करून समर्थांनीं वासुदेव गोसाव्यावर कृपा केली.

वेणाबाईचा कंठ फार मधुर असून ती गाणीं चांगलीं म्हणे. दासविश्रामधामकर्ते आत्मारामबुवा म्हणतात —

**" धन्य वेणाई वेणुमोहित । वेणुविण गाय सप्रेम युक्त ।**
**वेणुधर हरी होय तटस्थ । वेणांकधरवाणी मोहळे ॥ "**

वेणाबाईच्या निर्याणाची कथा आत्मारामबुवाकृत ' दासविश्रामधामा'च्या १११ व्या सोपानांत दिली आहे ती अशी —

रामदासस्वामी सज्जनगडावर जाऊन राहिले तेव्हां त्यांनीं आपल्या बहुतेक शिष्यांस महंत करून ठिकठिकाणच्या मठांत पाठविले; परंतु वेणाबाईने मात्र समर्थचरण शेवटपर्यंत सोडले नाहींत. आपणास मोठेपणा मिळावा, आपला मानसन्मान व्हावा, आपली महती वाढावी, अशी इच्छा तिनें कधींच केली नाहीं. समर्थांच्या सन्निध राहून त्यांची अखंड सेवा करावी एवढाच तिचा हव्यास होता. तिनें एखाद्या मठांत महंतीण होऊन रहावें अशी समर्थांची इच्छा होती; पण आपण श्रीगुरुचरणाजवळच समाधि घेणार असें तिनें स्पष्ट सांगितलें. पुढें वेणाबाईला एकदां असें वाटलें कीं, आपण देहासकट वैकुंठास जाऊन तेथील वर्तमान घेऊन यावें व हा आपला विचार तिने समर्थांस कळविला. तो ऐकून तिचा मृत्युकाल जवळ आला आहे हें समर्थांनीं जाणलें व ते तिला म्हणाले, " बाई, वैकुंठीं जाण्याची इतकी घाई कशाला? तूं आपली पक्वान्नें कर. तुझ्या हातचें जेवण मला फार गोड लागतें. तूं एकदां स्वस्वरूपीं लीन झाल्यावर हें भोजनसौख्य आम्हास कोठून मिळणार?" हें समर्थांचें भाषण ऐकून वेणाबाईच्या डोळ्यांत प्रेमाश्रु येऊन ती म्हणाली,

" महाराज, क्षमा करा. आपल्यासारखें कैवल्यनिधान हातीं असतां मी वैकुंठाची इच्छा केली, हा खरोखर माझा अपराध आहे." हें ऐकून समर्थांनीं हास्य केले. तरीपण पुढें पुढें वेणाबाईची उदासीनता वाढत चालली व आपला देह तिला तृणवत् वाटूं लागला. पुढें एकादशीपर्व जवळ आलें, तेव्हां समर्थ तिला म्हणाले, " वेणाबाई, तूं आपला प्राकृत सीतास्वयंवर ग्रंथ एकान्तीं वाचीत असतेस, पण आम्हाला कांहीं तें काव्य तूं कधीं वाचून दाखवीत नाहींस. त्या ग्रंथावर तूं कीर्तन कर." ' आज्ञा प्रमाण ' असें म्हणून वेणाबाईने कीर्तनाची तयारी केली. कीर्तनास श्रोत्यांची दाटी होऊं लागली. नित्य नियमानें कीर्तन चालू असतां चैत्र वद्य १४ शके १६०० या दिवशीं समर्थांनीं, शिष्यांस आज्ञा केली कीं ' प्रेतदहनाचें सर्व साहित्य तयार ठेवा.' हें ऐकतांच लोकांस मोठें आश्चर्य वाटलें. इकडे वेणाबाईचें कीर्तन संपून आरती होतांच ती समर्थांपाशीं गेली आणि आपला वीणा त्यांच्या हातीं देऊन व त्यांच्या पायांवर डोकें ठेवून तिनें तेथेंच प्राण सोडला ! मग तिचे प्रेत स्वतः समर्थांनीं उचललें व शिष्यांकडून सर्व विधिविधान करवून प्रेताचें दहन केलें.

> **" गुरुराज वदती धन्य पुण्यखाणी ।**
> **कैवारी जियेचा कोदंडपाणी ।**
> **अन्य नरस्पर्श जन्मापासून ।**
> **न जाला जाली कृतार्थ ॥ "**

पुढें कृष्णातटीं बाईची उत्तरक्रिया समर्थांनीं करविली. मंडळी स्नानाला गेली त्या वेळीं आकांनीं फार आकांत केला. हें पाहून उद्धव गोसावी आकाला म्हणाले," आपण स्वामीची सेवा सतत करीत असून नश्वराविषयीं शोक करतां ? आश्चर्य आहे!" हें ऐकून आका म्हणाल्या, "तुम्ही सांगतां हें मला स्वामिकृपेनें कळतें, पण या नश्वर जगाचा चमत्कार पहा !

कांहीं केल्या चित्ताची व्यग्रता झाल्याशिवाय रहात नाहीं." असे म्हणून त्या वेणाबाईच्या एकेक गुण आठवून शोक करूं लागल्या.

सज्जनगडावर ज्या ठिकाणीं वेणाबाईच्या प्रेताचें दहन केलें तेथें तिची समाधि आहे. ही समाधि गडावर मंदिराच्या बाहेर वायव्येकडील ओवरींत आहे. तिच्या चिताभूमीवर चंपकवृक्ष उगवला होता. पूर्वी जेथें हा चंपक वृक्ष होता तेथें आतां तुळसीवृंदावन व पादुका आहेत. आत्माराम-बुवा लिहितात, "वेणाबाईचे जे गुरुबंधु तिच्या मृत्युसमयीं उपस्थित नव्हते त्यांना श्रीरामानें वेणाबाईच्या रूपानें दर्शन दिलें." असो. अशा रीतीनें या परम पुण्यशील स्त्रीनें आपली जीवितयात्रा पूर्ण केली.

मिरजेस वेणाबाईचे संस्थानांतील कागदपत्र पाहिले. मठाची जागा जमीन मुसलमान अधिकारी यांजकडून मिळाल्याचें स्पष्ट आहे. उर्दू कागदपत्र आहेत. 'श्रीवेणाबाई संस्थान, शके १६२०' असे दोन पट्टे आहेत. वेणाबाईची पालखी दरवर्षी नियमानें सज्जनगडावर जात असते. वेणाबाईला लहानपणापासूनच लिहितां वाचतां येत होतें व पुढें समर्थ-सान्निध्यांत तिचें संस्कृताचेंही थोडेंबहुत अध्ययन झालें. भारत, भागवत, रामायण, इत्यादि ग्रंथ तिला अवगत होते. पूर्वकालीं होऊन गेलेल्या साधुसंतांच्या ग्रंथांचेंही तिनें परिशीलन केलें होतें.

वेणाबाईचा 'सीतास्वयंवर' हा ओंवीबद्ध ग्रंथ छापून प्रसिद्ध झालेला आहे. याशिवाय दोन स्फुट प्रकरणें व कांहीं स्फुट अभंग आणि पदें इतकीच तिची कविता उपलब्ध आहे. वेणाबाईची कविता अगदीं साधी, घरगुती भाषेंत रचिलेली आहे. मुक्तेश्वरी उच्च दर्जाचें काव्य या कवितेंत नाहीं, पण स्त्रीस्वभावसहज मार्दव आणि सहृदयता या दोन गुणांच्या बाबतींत ही कविता दुसऱ्या कोणत्याही कवीच्या कवितेस हार जाणार नाहीं. वेणाबाईच्या सीतास्वयंवर ग्रंथांत देशस्थ ब्राह्मणाच्या तत्कालीन चालींरीतींचें, लग्नपद्धतीचें, पक्वान्नादिकांचें जें वर्णन आलें आहे तें

ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाचें आहे. रामायणांतील सीतास्वयंवर हें आख्यान आमच्या जुन्या मराठी कवींचें फार आवडतें आख्यान होय. या आख्यानावर विठ्ठल, नागेश, आनंदतनय, वामन, अनंत, इत्यादि कवींनीं सुंदर काव्यें रचिलीं आहेत. परंतु तीं बहुतेक श्लोकबद्ध आहेत. ओवीबद्ध सीतास्वयंवर फक्त वेणाबाई व जयरामस्वामी वडगांवकर यांनींच लिहिला आहे. पैकीं जयरामस्वामींचा सीतास्वयंवर अद्याप अप्रकाशित आहे. वेणाबाईकृत सीतास्वयंवराचे १४ समास असून ओवीसंख्या १५६८ आहे. म्हणजे एकनाथांच्या रुक्मिणीस्वयंवरापेक्षां हा ग्रंथ जरा लहान आहे. वेणाबाईचें काव्यकौशल्य आणि भाषासौष्ठव या ग्रंथांत उठावदार रीतीनें व्यक्त झालें आहे.

ग्रंथाच्या पहिल्याच समासांत विश्वामित्र ऋषि दशरथाकडे येऊन त्यांनीं आपल्या यज्ञाच्या रक्षणार्थ रामलक्ष्मणास पाठविण्याची विनंति केली, तेव्हां दशरथाची कशी केविलवाणी स्थिति झाली व त्यानें काय उत्तर दिलें हें वेणाबाई सांगते —

ओव्या

**विश्वामित्राचे उत्तरीं । रायासि भेदिलें जिव्हारीं ।**
**जैसें वज्राचिया धारीं । हृदय विदारे ॥**
**तनु कांपती थर्थरां । नेत्रीं लागल्या अश्रुधारा ।**
**कांहीं धरूनियां धीरा । राजा बोलता जाला ॥**
**म्हणे माग स्वर्गींचें बरवें । माग पातालींचें आघवें ।**
**देईन पुरुषार्थ वैभवें । दिशावलयांकित हे धरा ॥**
**श्रेष्ठ स्वामी मुनिराज । रामावेगळें माग मज ।**
**वज्र घेऊनि सुरराज । देईन तुजसांगातें ॥**
**यागरक्षणा पाहिजेती । देईन दिशांचे दिग्पती ।**
**नवग्रहही तुजप्रती । यागरक्षणा देतों ॥**
**आणीक देतों मुनिराज । सूर्य आमुचा वंशाज ।**
**वडील आणि तेजःपुंज । सर्वप्रकाशक तो नेई ॥**

पुढें वसिष्ठांच्या सांगण्यावरून राजा दशरथ श्रीरामास विश्वामित्रांबरोबर पाठविण्यास तयार झाला; तेव्हां राम कौसल्येचा निरोप घेण्यास गेला असतां त्यांचा जो संवाद झाला तो मनोरंजक आहे —

नमस्कारिली निज जननी । उभा राहिला चापपाणी ।
वदे " माते ये क्षणीं । आज्ञा दिल्ही पाहिजे ॥ "
मुख न्याहाळी सुंदरा । पंकजनयना मनोहरा ।
" प्राणाच्या प्राणा रघुवीरा । माझ्या कोठें जातोसी ? ॥ "
सुंदर बोले सुंदर वचन । " यागरक्षणालागून ।
सभे रायासी मागोन । कौशिकें आम्हां घेतलें ॥ "
जीवलोण जगजीवना । उतरी कौसल्या नंदना ।
म्हणे " माझ्या आनंदवर्धना । काय जालें त्या कौशिका ? ॥
रायासी मागावी संपत्ति । अमित्य सेना न्यावी होती ।
ऋषीचे भीडे भूपती । काय केलें ? ॥
वसिष्ठादिकींही सभेस । अनुमोदिलें ये गोष्टीस ।
काय केलें विचारास । तुज यागरक्षणा ॥
काय जाल्या त्यांच्या बुद्धी । कैंची मांडिली उपाधी ।
माझ्या सुंदरा गुणनिधी । कैसा धाडूं आश्रमा ? ॥
पाहतां रूपाचें बरवेपण । कोटी मदनांचें निंबलोण ।
मी वोवाळीन आपुले प्राण । दृष्टी घाली सुंदरा ॥ "

इतकें बोलून कौसल्येनें राजपुरोहित वसिष्ठ मुनि यांस बोलाविलें व ते येतांच त्यांचें यथोचित आदरातिथ्य करून ती त्यांस म्हणाली —

" कौशिकाचिया यागासी । काय उणें होतें द्यावयासी ।
संपत्ति सेना रायापाशीं । दुजी तुळणा नसे ॥
नव्याण्णौ सहस्राशेवटीं । पुत्रमुख पाहिलें दृष्टी ।
रायासी आठवेना कां गोष्टी । राम आश्रमा धाडितां ॥

आणि तुम्ही पुरोहितीं । विचार सांगावा बरव्या रीती ।
मुनी तोष पावे चित्तीं । आणि राम नेदावा ॥
राम नेदीं न घडीं आश्रमा । म्हणोनि पाचारिलें तुम्हा ।
नमस्कारी म्हणे क्षमा । हे गोष्टी करावी ॥
कौशिकाचें समाधान । बहुतां प्रकारें करून ।
सर्वस्व हें राज्यदान । त्याच्या पायीं करा हो ॥
रामावेगळें द्या सर्वांसी । ऋषी तोषवा मानसीं ।
बरव्या प्रकारें कौशिकासी । प्राण आम्ही समर्पू ॥ "

त्राटिकावधाचा प्रसंग —

पुढें लागलें घोर वन । शाळ ताळ निबिड बन ।
कौशिक म्हणे " हें वन । ताटिकेचें राघवा ॥
मरीच सुबाहु पुत्रेंसी । येथें आहे ते राक्षसी ।
मळकुशळ देशासी । वसों नेदी सर्वथा ॥
तरी ये समयीं महावीरा । ताटिका वधीं कोदंडधरा ।
चापपाणी सीतावरा । जयो पाव ये काळीं ॥
कांक्षा धरिसी स्त्रीवधाची । तरी हे पीडक त्रैलोक्याची ।
ईचिया वधांतीं धर्मांची । अभिवृद्धि वाढेल ॥
धर्मस्थापका रविकुळटिळका । ताटिका मारीं रघुनायका ।
मंगळ कीर्तीचा घोष निका । त्रिलोकीं ब्रीद गाजों दे ॥ "
महावीर सीतारमण । म्हणे " हे आज्ञा प्रमाण " ।
धनुष्य टणत्कारूनि बाण । चंद्राकार काढिला ॥
धनुष्यटणत्काराचा घोष । अद्भुत दाटला कर्कश ।
नादें उतटलें आकाश । ताटिका ऐकोनि धांविली ॥
अक्रा सहस्राची गजमाळा । कंठीं घातली अवलीळा ।
सिंह शार्दूल कर्णबिळा । कुंडलें वोविलीं ॥
ताडप्रमाण विशाळ । दंत दाढा ढिसाळ ।
शरीर अत्यंतचि स्थूळ । घोररूपी धांविली ॥

**धाविनली त्या अवसरा । हाक फोडिली महाघोरा ।**
**ऊर्ध्वबाहु निशाचरा । राम सौमित्र देखोनि ॥**
**तंव तो वीरबाहो सुलक्षण । अभंग तें वज्रठाण ।**
**चंद्रार्क सोडिला बाण । ताटिकाहृदय फोडिलें ॥**
**ताटिकेचा गेला प्राण । पाताळीं सुस्नात बाण ।**
**रामभातां सुलक्षण । हंसरूपें प्रवेशला ॥**

पुढें सीतेच्या स्वयंवरासाठीं श्रीराम व लक्ष्मण यांसह विश्वामित्र मिथिला नगरीस जात असतां वाटेंत, गौतमशापानें शिळा होऊन पडलेल्या अहल्येचा उद्धार श्रीरामानें केला; त्या वेळीं तिनें केलेली रामस्तुति —

**दीनबंधु पतितपावन । गौतम आश्रम पाहोन ।**
**शापशिळेसी रामचरण । अवचितांचि स्पर्शला ॥**
**तत्काळ उद्धार गोरटी । रामचरणीं घाली मिठी ।**
**म्हणे जय जय जी जगजेठी । बहुत दिवस कष्टलें ॥**
**स्त्रीदेहाचा समंधु । भोगीत होतें अपराधु ।**
**मजकारणें दीनबंधु । कोणेकडून आलासी ? ॥**
**चौखाणीवेगळा । देह धरिला होता सीळा ।**
**मजकारणें दीनदयाळा । अरण्य शोधीत आलासी ॥**
**अवघ्याहून नीच यातना । जेथें उपायेचि चालेना ।**
**संकटींहूनि पावना । मातें मुक्त केलें ॥**
**मज पाषाणाचें अंतर । जाणोनि केला उद्धार ।**
**सर्वज्ञ नामाचा बडिवार । प्रचीतीसि मज आला ॥**
**रविवंशाजा रघुनंदना । जन्मोजन्मीं उपासना ।**
**तुझेचि ध्यान भजना । पात्र करीं मज स्वामी ॥**

विश्वामित्राबरोबर रामही सीतास्वयंवरास आला आहे हें ऐकतांच जनकास मोठा आनंद झाला —

**राम ऐसें पडतां कानीं । जनक संतोषला मनीं ।**
**म्हणे “ माझीये नंदिनी- । लागीं तो पात्र होय ” ॥**

अतिसत्वरें घेतली पूजा। सामोरा आला जनक राजा।
सौमित्रेंसीं कौसल्यात्मजा। देखोनि विस्मय पावला॥
थोर पस्तावला मनीं। म्हणे "नसत्या साभिमानीं।
कैसा पडलों जाउनी। धनुष्यपण वेर्थ केला॥
त्रिभुवनसुंदर हें रूपडें। माझी कन्या त्याचेया पाडें।
परंतु पणासी न मोडें। सत्य प्रतिज्ञा माझी॥
असेल माझी क्रिया बरी। भक्ति वैराग्य तपें खरीं।
विदेह नाम सत्योत्तरीं। राम जावाई जोडेल॥

जनकानें आपल्या सेवकांकडून शिवधनुष्य स्वयंवरमंडपांत आणविलें व तें जमलेल्या राजे लोकांस दाखवून तो म्हणाला, "हें धनुष्य वांकवून त्याला जो बाण लावील त्याला माझी सीता माळ घालील." हें ऐकतांच, लंकापति रावणानें काय केलें ?

वचन होतां तें श्रवण। हरुषें उठिला रावण।
सभा लक्षून कुलक्षण। काय बोलता जाला॥
"मिथिळाहातीं घेईन पूजा। मी वरीन जनकात्मजा।
धनुष्य देखोनि माझ्या भुजा। स्फुरण करिती वीर हो॥
म्यां हिंदोळिला कैलास। समुद्र केला कासावीस।
वोढून काढीन आतां शेष। वराह उचलीन वीस भुजीं॥
तेथें कायेसें हें पिनाक। मज आणि याचा धाक।
इंद्रधनुष्याचा गमक। तृणतुच्छ म्यां केला॥"

अशी वल्गना करून रावणानें धनुष्यास हात घातला, परंतु—

त्रिंबकधनुष्य तें पवित्र। रावणकर अपवित्र।
स्पर्श करितां दशवगत्र। थरथरां कांपतु॥
जानकी ते रामकांता। आणि सर्वशक्ति ते तत्त्वता।
रावणा क्षोभली आदिमाता। शक्ति वोढून घेतली॥

धनुष्य उचलूं गेला लीळा । तंव तें आटोपेना बळा ।
कांपों लागला चळचळा । गुडगे मांड्या टेंकितु ॥
मेटें घालून सांवरी । तंव तें आदळलें उरीं ।
आडोंनी धरेवरी । किरविल जैसा पसरला ॥
ऊर दडपिला धनुष्यें । श्वास टाकाया संधी नसे ।
हातपाय झाडीतसे । फडफडां धरणीसी ॥
मुखीं रक्त लोंढे खोटी । फिरती नेत्र चक्रवाटी ।
धनुष्य बळें हृदय लाटी । व्यथा मोठी रावणा ॥
कांहीं उपाय न दिसे । प्राणसंकट मांडलेंसे ।
दांत खाऊनी बोलतुसे । "धांवा धांवा बळिये हो" ॥
रावण गर्वाचें वोडंबर । त्रिंबकधनुष्यें केला चूर ।
म्हणे "मेलों उठा वीर । काय अंत पाहतां?" ॥
रावणाची अवकळा । दुःख देखोनी भूपाळां ।
कित्येकां वाटली सुखवेळा । किती विस्मयो पावले ॥

या थोड्याशा वेच्यांवरून वेणाबाईच्या वर्णनशैलीची कांहींशी कल्पना वाचकांस होईल, परंतु समग्र ग्रंथ वाचल्याशिवाय त्याच्या यथार्थ स्वरूपाची कल्पना होणें शक्य नाहीं आणि म्हणून तो सर्वांनीं एक वेळ समग्र वाचावा अशी शिफारस करितों. "सीमंतपूजन, हळद, पत्रिका-पूजन, देवकप्रतिष्ठा, रुखवत, तेलवण, पायघड्या, कलशपूजा, गणेशपूजा, दागिन्यांचें वर्णन, मधुपर्क, लाज्याहोम, सुनमुख, उखाणे, हळदीउटणें, अक्षवाणें, भोजनपक्वान्नांचीं नांवें, साडेसमर्पण, वरात, लक्ष्मीपूजन वगैरे लहानमोठ्या सोहळ्यांचें वर्णन" फार बहारीचें आहे. ह्या वेणाबाईकृत सीतास्वयंवराविषयीं रा. शं. श्री. देव लिहितात—"सीतेचें स्वयंवर, वेणाबाईच्या पूर्वी व नंतर पुष्कळांनीं वर्णिलें आहे, पण वेणाबाईच्या ग्रंथाची योग्यता कांहीं निराळी आहे. स्वयंवरासारख्या प्रसंगाची आवड स्वभावतः स्त्रियांना असावयाची आणि म्हणून त्यांच्या लेखणींतून तो प्रसंग जसा

उतरेल तसा इतरांच्या उतरणार नाहीं. वेणाबाईच्या स्वयंवरांत प्रत्येक लहान-मोठ्या प्रसंगाचें जसें यथासांग वर्णन आहे तसें दुसऱ्या एखाद्या ग्रंथांत असल्याचें माझ्या पाहण्यांत नाहीं. या माझ्या म्हणण्याचा कोणीही विपरीत अर्थ करूं नये. श्रीएकनाथांचा रुक्मिणीस्वयंवर ग्रंथ वेणाबाईच्या सीतास्वयंवराशीं ताडून पाहिला म्हणजे माझ्या म्हणण्याची सत्यता वाचकांस सहज पटेल. रुक्मिणीस्वयंवर ग्रंथ सर्वोत्कृष्ट आहे हें काय कोणी कोणास सांगावयास पाहिजे? पण असें असूनही जें एकनाथांच्या ग्रंथांत नाहीं तें वेणाबाईच्या ग्रंथांत आहे व उलट पक्षीं जें सीतास्वयंवरांत नाहीं तें रुक्मिणीस्वयंवरांत आहे. रुक्मिणीस्वयंवराचा प्रसंग वेगळा आहे. तो सोडून दिला तरी प्रत्यक्ष लग्नसोहळा एकनाथांनीं त्रोटक वर्णिला आहे, तो वेणाबाईनीं साद्यंत वर्णिला आहे व एकनाथांनीं अथपासून इतिपर्यंत आपली अध्यात्मदृष्टि अढळ ठेवली आहे तर वेणाबाईनीं आपली भक्तिप्रेमाची दृष्टि कोठेंही ढळूं दिली नाहीं."

श्री. देव यांचें हें विवेचन मान्य होण्यासारखेंच आहे, पण प्रत्यक्ष लग्नसोहळ्याचें नाथांनीं केलेलें वर्णन त्रोटक आहे हें विधान तितकेंसें बरोबर नाहीं. दुसरी गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ती ही कीं, नाथ हे मोठे व्युत्पन्न असल्यामुळें त्यांची भाषा जशी प्रगल्भ, अध्यात्मपर आणि संपन्न आहे तशी वेणाबाईची नाहीं. मात्र स्त्रियांनाच ज्या गोष्टींचा अनुभव अधिक अशा गोष्टी विस्तारेंकरून सांगण्यांत वेणाबाईनें विशेष कौशल्य दाखविलें आहे हें खरें. उदाहरणार्थ, सीतेस रामाच्या स्वाधीन करतांना जनक आणि जनकपत्नी यांच्या मनाची स्थिति कशी झाली याचें वेणाबाईनें केलेलें वत्सलरसपूर्ण वर्णन पहा —

**करीं दुहिता मिथिळापति । जानकी निरवी भूपती ।**
**कन्यास्नेहाची थोर प्रीती । नेत्रोदक चालिलें ॥**

**कनकपुतळी धरूनि हातीं । राजा निरवी अयोध्यापती ।**
**ते समयीं गोत संपत्ति । सभेसहित गहिंवरे ॥**
**जानकीगुणें हृदय कृपण । राजा निरवितां उच्चारण ।**
**अष्टवर्षें केलें म्या पाळण । आतां तुम्ही करावें ॥**
**माझ्या प्राणाची प्राणकळा । सुखदायक सुशीळा ।**
**परमस्नेहें भूपाळा । ईचें पाळण करावें ॥**
**माझ्या प्राणाची आवडती । जीवनकळा हे सुमति ।**
**ईचें पाळण बरव्या रीती । वडिलीं केलें पाहिजे ॥**

श्रीसीतास्वयंवराशिवाय 'कौल' व 'रामगुहसंवाद' अशीं वेणाबाईचीं आणखी दोन स्फुट प्रकरणें आहेत. रावणाचा वध करून राम सीतेसह अयोध्येस येऊन भरतास भेटले. नंतर ते सिंहासनाधिष्ठित झाल्यावर प्रजा त्यांजपाशीं कौल मागावयास आली. तेव्हां प्रजेनें रामापाशीं कौल मागितला. प्रजा एकेक मागणें मागूं लागली व तें लिहून ठेवण्यास रामांनीं लक्ष्मणास सांगितलें.

**बहु कष्टलों पातलों जी स्वदेशा ।**
**प्रजा बोलती कौल दे राघवेशा ॥**
**भुमीनें कदा पीक सांडूं नये रे ।**
**वदे राम लक्ष्मणा हें लिही रे ॥**

अशा रीतीनें प्रजेनें रामापाशीं सर्व कांहीं मागितलें. पेवें, धन, धान्य, गाई, बैल, गाड्या, भाग्य, मनासारिखीं पुत्रकन्याकळत्रें, समृद्धि, सौख्य, सौंदर्य, तारुण्य, शक्ति, शुभ ग्रह, निर्विघ्नता, धर्मपरायणता, दया, चातुर्य, पुण्यवासना, अमरत्व, निष्कपटपणा, पवित्रपणा, इत्यादि ज्याला म्हणून जें कांहीं सुचलें तें त्यानें तेथल्या तेथें सर्वांच्या वतीनें मागून घेतलें. व शेवटीं पुनः कांहीं मागावयाचें झाल्यास, रामास भेटण्यास आडकाठी नसावी म्हणून—

**तुझ्या दर्शनीं आडकाठी नसो रे ।**

असेंही मागणें त्यांनीं मागून घेतलें.

वेणाबाईचें दुसरें श्लोकबद्ध प्रकरण 'रामगुहसंवाद' याचे ४४ श्लोक आहेत. जानकी व लक्ष्मण यांसह श्रीराम वनवासास निघून गंगातीरीं आले व आपणास गंगापार नेण्याची गुहकास त्यांनीं विनंति केली; तेव्हां आपण कोण, असा गुहानें त्यांना प्रश्न केला. त्याचें उत्तर राम देतात—

**" असों तापसी तीर्थवासी वनासी ।**
**तपा जातसों ऊतरीं गूणरासी ॥**
**तुझी तोयतारी त्वरें आणि तीरीं ।**
**परदेसियां पाववीं पैलपारीं ॥"**

रामाच्या या म्हणण्यावर गुहाचा मुळींच विश्वास बसला नाहीं; आणि कोणाचा बसला असता? त्यांच्या त्या रम्य, सुकुमार मूर्ति पाहून हे तापसी तीर्थवासी आहेत हें कोणास खरें वाटलें असतें? गुहानें आपला संशय स्पष्ट दर्शविलाच—

**नव्हां तापसी ना नव्हां तीर्थवासी ।**
**नव्हां या जनासारिखे क्षेत्रवासी ॥**
**चहूं आश्रमांवेगळीं भासतांहां ।**
**नये नेम कर्ती असे दीसतांहां ॥**

त्या त्रिवर्गाची शांत व गंभीर वृत्ति पाहून गुहाची त्यांच्यावर पूर्ण भक्ति बसली. गुहाची अकारण जडलेली भक्ति पाहून श्रीरामाच्यानें उडवाउडवीचें उत्तर देववेना. गुहाची निष्कपट निष्ठा पाहून रामांनीं त्यास आपली सर्व स्थिति, गति कळविली; तेव्हां गुहानें अत्यंत प्रेमभरानें—

**जुनें कांबळें जें मळगांदलेंसे ।**
**अती जीर्ण बैसावया घातलेंसे ॥**
**बरें आणिलें तोय त्या जान्हवीचें ।**
**प्रिती क्षाळिले पाय त्या राघवाचे ॥**

त्यानें रानफुलांनीं रामाची पूजा केली व वनफळांचा त्यांना नैवेद्य अर्पण केला. नंतर त्रिवर्गास गुहानें परतीरास नेऊन पोंचविलें. श्रीराम प्रसन्न होऊन त्यांनीं गुहास वर मागावयास सांगितलें तेव्हां त्यानें असा वर मागितला —

**पदपंकजीं ठाव दीनास द्यावा ।**
**सखा आपुला मित्र ऐसा म्हणावा ॥**
**पुन्हा मागुतें याचि पंथेंचि यावें ।**
**दिनानाथ सनाथ मातें करावें ॥**
**जयश्री सवें साजरी ते पहावे ।**
**असे आर्त माझें असें पूरवावें ॥**

वर आलेल्या श्लोकांवरून वेणाबाईची पद्यरचना कशी थेट रामदासी थाटाची आहे हें वाचकांच्या लक्षांत येईल. या रामदासी कवितेचें वैशिष्ट्य हें आहे कीं, तिला छंदःशास्त्राचें, व्याकरणाचें, ऱ्हस्वदीर्घाचें, कशाचेंही बंधन नसावयाचें! जेमतेम अर्थबोध झाला म्हणजे झालें. आतां वेणाबाईच्या स्फुट पद्यांपैकीं कांहीं पद्यें देऊन हें वेणाबाईप्रकरण पुरें करूं.

## पद

**धन्य होणें सफळ जिणें रामगुणें होतें ।**
**ध्यास पडे ज्यास त्यास सत्य कळों येतें ॥ ध्रु० ॥**
**काळवेळ हे सफळ हित करा कांहीं ।**
**सर्व काळ सुखवेळ राम भजा भाई ॥ १ ॥**
**काय जना कोण मना मानलें हें सार ।**
**रामवीण सर्व सीण दुःख अनिवार ॥ २ ॥**
**वळे पळे निमिष घडी जात लवलाहीं ।**
**आजि घडे तसें हेंचि उद्यांलागिं नाहीं ॥ ३ ॥**

सर्व सोडिं राम जोडिं भजनीं निःकाम ।
धन्य तुम्ही धन्य आम्ही गाउं रामनाम ॥ ४ ॥
हाहि लोक परलोक त्यासि सासुरवाडी ।
वेणी म्हणे भक्तजनां भजनें रामजोडी ॥ ५ ॥

## अभंग

आमुच्या वाटे नका जाऊं । नये ते वाटे तुम्हां लाऊं ॥ १ ॥
आम्ही पारिखे पारिखे । नहों लौकिकासारिखे ॥ २ ॥
अशी स्थिति जाली मोठी । पोटीं ब्रह्मांडांच्या कोटी ॥ ३ ॥
वेणीस्वामी आत्माराम । तेंचि आमुचें परंधाम ॥ ४ ॥

गुरु निःशब्दाचीं बीजें । आम्हां प्राप्त आत्मकाजें ॥ १ ॥
आम्ही अबोल अबोल । अबोलें बोलूं बोल ॥ २ ॥
आमुची माया वांज जाली । परब्रह्मीं लया गेली ॥ ३ ॥
शब्द आकाशीं निमाला । आत्माराम अवघा जाला ॥ ४ ॥
वेणीस्वामीचिया संगें । आम्ही राहों आत्मरंगें ॥ ५ ॥

गुरुवाक्य प्रेमनौका । मायासागर तरलों देखा ॥ १ ॥
आम्ही स्वामीचे अंकित । रामनामें मुद्रांकित ॥ २ ॥
अहं ब्रह्म उपदेशिलें । अहं गेलें ब्रह्म ठेलें ॥ ३ ॥
आली अनुभवाची खूण । खूण केली रामार्पण ॥ ४ ॥
वेणीस्वामी अवघा जाला । विज्ञानासी अंत आला ॥ ५ ॥

वरील तीनचार पद्यांवरूनदेखील वेणाबाईच्या पारमार्थिक अधिकाराची व अध्यात्मज्ञाननैपुण्याची थोडी तरी कल्पना वाचकांस होईल असें वाटतें. 'अहंब्रह्म उपदेशिलें । अहं गेलें ब्रह्म ठेलें' हा चरण मोठा बहारीचा आहे.

## ४ गिरिधर

समर्थशिष्या वेणाबाई हिची बयाबाई ऊर्फ बाइयाबाई या नांवाची एक शिष्यीण होती, तिचे शिष्य गिरिधर. बयाबाईनें वेणाबाईच्या पश्चात्

मिरज येथील तिच्या मठाचा कारभार कांहीं वर्षे पाहिला असल्याचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. या बयाबाईची थोडीशी कवितादेखील उपलब्ध आहे, पण वेणाबाईप्रमाणें कवयित्री म्हणून तिचा उल्लेख करण्याइतकी ती विपुल नाहीं. ही बयाबाई एकदां, नुसत्या सद्गुरुतीर्थावर राहिली होती असें सांगतात. बालपणींच तिला श्रीरामदर्शन झालें होतें व श्रीरामास ती दहींभाताचा नैवेद्य दाखवीत असतां राम तिच्या ताटांत जेवल्याची हकीकत गिरिधरांनीं आपल्या समर्थप्रताप ग्रंथाच्या ११ व्या समासांत सांगितली आहे. आपल्या वयाच्या ८४ व्या वर्षी बाई समाधिस्थ झाली. गिरिधर व त्यांचे बंधु त्रिंबक, यशवंत व भीम या चारी बंधूंनीं बयाबाईचा उपदेश घेतला होता. गिरिधरांचा जन्मशक उपलब्ध नाहीं, परंतु त्यांच्या समर्थप्रताप ग्रंथावरून, समर्थांचा प्रत्यक्ष सहवास त्यांना कांहीं काल घडला होता हें स्पष्ट दिसतें. श्रीसमर्थांच्या आज्ञेनें सज्जनगडावर त्यांनीं एकदां कीर्तन केल्याचा उल्लेख त्यांच्या एका कविता-प्रकरणांत आढळतो. श्रीसमर्थांच्या चरित्रांतील कांहीं प्रसंग आपण स्वतः पाहिले आहेत असें समर्थप्रतापाच्या पहिल्या समासांत त्यांनीं म्हटलें आहे, यावरून त्यांचा जन्म शके १५७५ च्या सुमारास झाला असावा असें मानण्यास हरकत नाहीं. गिरिधर हे मूळचे मिरज तासगांवा-कडचे राहणारे, परंतु पुढें गुर्वाज्ञेवरून ते बिडापासून सात आठ कोस असलेल्या ईट गांवीं जाऊन राहिले व तेथेंच त्यांचा मुख्य मठ आहे. स्वतः गिरिधरांनीं भिंतीवर काढलेली मारुतीची मूर्ति त्या ठिकाणीं अद्याप आहे. गिरिधरांस पुत्रसंतति नव्हती, एक कन्या मात्र होती. हल्लीं बीड येथें जे दोन मठ आहेत त्यांपैकीं एक त्यांच्या कन्येच्या वंशजांचा असून दुसरा त्यांचे बंधु भीम यांच्या वंशजांचा आहे. गिरिधर यांना गिरमाजी गोसावी या नांवानेंही तत्कालीन लोक ओळखीत असावेत असें हनुमंत-स्वामीकृत "रामदासस्वामीची बखर" या ग्रंथावरून दिसतें. गिरिधरांचा

सर्व काल श्रीगुरु व श्रीराम यांच्या भजनांत व ग्रंथरचनेंत गेला. श्रीसमर्थ-प्रतापासुद्धां त्यांचे एकंदर ४० ग्रंथ उपलब्ध आहेत. त्याशिवाय अभंग, पदें, वगैरे फुटकळ कविता बरीच आहे. त्यांच्या एकंदर कवितेची संख्या सुमारें २४००० होईल. त्यांच्या ४० ग्रंथांपैकीं 'संकेतरामायणा'चीं पहिलीं सहा कांडें वेणाबाईकृत असावींत असा रा. शं. श्री. देव यांचा तर्क आहे. आत्मारामबुवाकृत 'दासविश्रामधाम' या प्रचंड ग्रंथांत बहुतेक सर्व रामदास सांप्रदायी स्त्रीपुरुषांचीं नांवें सांपडतात, परंतु गिरिधरांचा त्यांत उल्लेख नाहीं !

## गिरिधरांनीं लिहिलेले ग्रंथ

| | | |
|---|---|---|
| १ | श्रीग्रंथभावार्थ (श्लोक) (दासबोधाचा सारांश), पद्यसंख्या २३० | |
| २ | ग्रंथान्वय (अभंग) यांत दासबोधाचे वीस दशक व दोनशे समास यांचीं नावें आहेत. | २४५ |
| ३ | श्रीदासबोध ग्रंथराजभावार्थ (श्लोक) | २७ |
| ४ | श्रीआत्मानुभव (ओव्या) | ६९७ |
| ५ | गुरुमार्ग (अभंग) | ७६ |
| ६ | शिष्यभावार्थ ( ,, ) | ५३ |
| ७ | श्रीगुरुआज्ञा ( ,, ) | ७८ |
| ८ | श्रीगुरुरूप ( ,, ) | १०५ |
| ९ | शिष्यशासन ( ,, ) | १८६ |
| १० | श्रीगुरुदीक्षा ( ,, ) | १७८ |
| ११ | श्रीस्वामीदर्शन ( ,, ) | १२९ |
| १२ | श्रीदेवदर्शन ( ,, ) | ११८ |
| १३ | श्रीरामरूप ( ,, ) | ५२ |
| १४ | श्रीसीतारूप ( ,, ) | ५४ |
| १५ | प्राणनाथ ( ,, ) | ५२ |
| १६ | योगीराज ( ,, ) | ५० |

| | | |
|---|---|---|
| १७ | दीक्षासंवाद ( ,, ) | १५४ |
| १८ | साधुसंवाद ( ,, ) | ४५ |
| १९ | श्रीगुरुदेवनमन ( ओवी ) | १२८ |
| २० | देवसंवाद ( श्लोक ) | ७१ |
| २१ | गुरुगीतार्थ ( अभंग ) | २३४ |
| २२ | गुरुवाक्यमाला ( श्लोक ) | १६१ |
| २३ | श्रीशिवरहस्य ( श्लोक ) | १०२ |
| २४ | लोकस्वभाव ( ओवी ) | २५ |
| २५ | श्रीकृष्णकथातरंग ( ,, ) | १७३ |
| २६ | हरिलीला ( श्लोक ) | ४५४ |
| २७ | नाना पंथ ( पदे ) कडवीं | ५० |
| २८ | हकिकत वाके ( कडवी ) | १४७ |
| २९ | काशीयात्राकथन ( अभंग ) | १०६ |
| ३० | काशीखंड ( ,, ) | ३९४८ |
| ३१ | श्रीसमर्थकरुणा ( श्लोक ) | १९० |
| ३२ | श्रीकरुणाराम ( श्लोक ) | १८२ |
| ३३ | श्रीकरुणारुद्र ( ,, ) | १२१ |
| ३४ | अब्दरामायण ( ,, ) | १८३ |
| ३५ | मंगलरामायण ( ,, ) | १६१९ |
| ३६ | छंदोरामायण ( ओव्या ) | १५५६ |
| ३७ | सुंदर रामायण ( ,, ) | ७४९ |
| ३८ | संकेत रामायण ( ,, ) | ६७४१ |
| ३९ | निवृत्तिराम ( ,, ) | २०१६ |
| ४० | श्रीसमर्थप्रताप ( ,, ) | १३३२ |
| ४१ | स्फुट कविता ( श्लोक, पदें वगैरे ) सुमारें | १५०० |

गिरिधरांची बहुतेक सर्व कविता, दिनकरबुवांच्या कवितेप्रमाणेंच, अगदीं थेट रामदासी पद्धतीची आहे. जेमतेम अर्थबोध झाला म्हणजे झालें, मग बाह्य थाटमाट कसाही असो, या भावनेनेंच श्रीसमर्थ सांप्रदायां-

तील बहुतेक सत्पुरुषांनीं ग्रंथरचना केलेली दिसते. त्यांचे ग्रंथ पद्यात्मक आहेत म्हणूनच केवळ त्यांना काव्यग्रंथ म्हणावयाचें, पण वस्तुतः तें पद्यरूप गद्यच आहे! तथापि त्यांच्या वाणींत जो एक प्रकारचा जिवंतपणा आहे त्याच्यायोगानें त्यांचे ग्रंथ फार परिणामकारक उतरले आहेत. गिरिधरांनीं आपल्या आयुष्यांत ग्रंथरचनेशिवाय दुसरा कांहीं उद्योग केलाच नसावा असें वाटतें. बीड येथील त्यांच्या मठांत शेंकडों जुन्या कर्त्यांचे ग्रंथ रा. देव यांस सांपडले. ते लिहितात, "आणखी एक अपूर्व वस्तु या मठांत मला पहावयास मिळाली. गिरिधरांना सर्व दासबोध मुखोद्गत होता; दोन अडीच बोटें रुंद व आठ बोटें लांब अशी एक उभी शिवलेली, मुठींत राहण्यासारखी त्यांची वही आहे. तींत क्रमशः एकाखालीं एक, दासबोधांतील ओव्यांच्या आरंभींचे दोन दोन तीन तीन शब्द लिहिलेले आहेत. ही वही गिरिधर नेहमीं हातांत ठेवीत असत, व चालतां बोलतां, धंदा करितां, तिच्याकडे पाहून सर्व दासबोधाचें, न जाणों प्रत्यहीं, एक पारायण करीत असत."

श्रीगुरुचरणसेवेंत आपलें बहुतेक सर्व आयुष्य वेंचून शके १६५१ वैशाख शुद्ध अष्टमी, शुक्रवार, या दिवशीं गिरिधरस्वामी समाधिस्थ झाले. बीडास गांवाबाहेर नदीच्या कांठी उंचवट्यावर गर्द झाडींत एक मोठें थोरलें आवार चौफेर मजबूत कोटवजा भिंती बांधून केलेलें असून त्यांत गिरिधर व त्यांच्यामागून झालेले मठपति यांच्या समाधि आहेत. त्या आवारांत एकंदर आठ समाधि-मंदिरें आहेत. स्थान रम्य व निवान्त आहे. गिरिधरांच्या मंदिरावर पुढील श्लोक कोरलेला आहे —

**॥ श्रीराम ॥**

**श्रीमत्सनृपशालिवाहन शके चंद्रेषु भूपोन्मिते ।**
**सौम्ये माधवशुक्लशुक्रदिवसेष्टम्यां प्रभाते विभुः ॥**
**श्रीरामानुचराग्रगो गिरिधरस्त्वासीत्समाधिस्थितो ।**
**यस्तस्यानुज भीमनिर्मितमिदं रम्यं तदीयं स्थलं ॥**

हल्लीं बीड येथें जे दोन मठ आहेत त्यांपैकीं एक गिरिधरांचे धाकटे बंधु भीम यांच्या वंशजांचा व दुसरा त्यांच्या कन्येच्या § वंशजांचा आहे. उभय मठांची परंपरा येणेंप्रमाणें —




गिरिधरांच्यापश्चात्, त्यांचे बंधु यशवंतबुवा यांनीं परंपरा चालविली. ते शके १६८० त समाधिस्थ झाले. त्यांच्यापश्चात् माणिक्य आणि

§ हिचें नांव साळूबाई असावें असें एका जुन्या कर्जरोख्यावरून वाटतें—श्री. देव

गोविंद अशा दोन शाखा निघाल्या. लौकिकांत गिरिधरस्वामींस गिरमाजी व भीमस्वामींस भिवाजी म्हणत.

आतां गिरिधरांच्या अवाढव्य ग्रंथनिर्मितीची थोडीशी चांचणी करूं. त्यांच्या ३९ ग्रंथांपैकीं श्रीग्रंथभावार्थ, ग्रंथान्वय व श्रीदासबोध ग्रंथराज-भावार्थ हे तीन ग्रंथ दासबोधविषयक आहेत. श्रीआत्मानुभव ग्रंथांत गिरिधर म्हणतात —

**येकांत वनीं उपवनीं । येकांत भुवनीं ब्रह्मभुवनीं ।**
**गुरुदेवसदनीं परमात्मसदनीं । अध्यात्मग्रंथ पाहावे ॥**
**नाना सुमनवाटिका आरामें । देव देवालयें येकांत धामें ।**
**श्रवणमननें पूर्ण कामें । अध्यात्मग्रंथ वाचावे ॥**
**नाना परोपकाराकारणें । सद्गुरुनाथें केलें धांवणें ।**
**वेदशास्त्रसंमत वचनें । अध्यात्मग्रंथ विवरावे ॥**

गुरुमार्ग, शिष्यभावार्थ, श्रीगुरुआज्ञा, श्रीगुरुरूप, शिष्यशासन व गुरुदीक्षा या ग्रंथांत गुरुशिष्यसंबंधाचें उपदेशात्मक विवेचन आहे. श्रीस्वामीदर्शन या प्रकरणांत श्रीसमर्थांच्या दिनचर्येचा उल्लेख असल्यामुळें तें प्रकरण सांप्रदायी लोकांस विशेष महत्त्वाचें आहे. समर्थांच्या सहवासांत गिरिधरांनीं कांहीं दिवस घालविल्यावर, एके दिवशीं समर्थांनीं त्यांस एकान्तांत बुद्धिवाद सांगून स्वस्थलीं जाण्याची आज्ञा केली. त्या वेळीं गिरिधरांस फार वाईट वाटलें. त्या प्रसंगाचें वर्णन —

**असुं आलें मग पल्लवें पुसिलें । आश्वासन दिल्हें काय देवें ॥**
**काय देवें दिल्हें आश्वासन ऐका । येके वेळे देखा यावें लागे ॥**
**यावें लागे येके वेळे सांभाळाया । आम्हावांचूनियां कोण आहे ? ॥**
**कोण आहे तूज आम्हावांचूनियां । कळला भाव वायां खंती काय ॥**
**खंती काय जाले प्रसंग आठवीं । अनन्य स्वभावीं देवभक्त ॥**
**देवभक्त येक कळला विवेक । ग्रंथाधारें लोक प्रबोधीसी ॥**

**प्रबोधीसी तेथें काय भिन्न आहे । अर्थ पूर्ण पाहें विचाराचा ॥**
**विचाराचा अर्थ नित्य बोलतोसी । खंती करितोसी नवल मोठें ॥**
**नवल मोठें वाटे भक्तीची आवडी । राहों द्यावी जोडी भक्तिप्रेमें ॥**
**भक्तीप्रेमें जोडी असोंहि विदेसीं । आहों तुजपासीं सर्व काळ ॥**
**सर्व काळ आहों वचन प्रमाण । प्रसंग जाणून भेटी आणूं ॥**
**भेटी आणूं कांहीं खंती न करावी । नौमी§ आठवावी रात्रिदिवस ॥**
**रात्रिदिवस ध्यान नौमीचें करावें । गिरिधर देवें आज्ञापिला ॥**

खरे म्हटलें तर गिरिधर हे समर्थांच्या शिष्यिणीच्या शिष्यिणीचे शिष्य, असें असतां त्यांच्याविषयीं समर्थांनीं इतका आपलेपणा दाखवावा आणि त्यांना भेटीचें आश्वासन द्यावें हें गिरिधरांच्या समर्थभक्तीचें व समर्थांच्या गिरिधरांवरील कृपेचेंच निदर्शक होय. वरील अभंगांत गिरिधरांनीं समर्थांस 'देव' या शब्दानें संबोधिलें आहे हेंही लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

श्रीदेवदर्शन या ग्रंथांत, प्रत्यक्ष भेटींत समर्थांनीं जो उपदेश केला त्याचा संग्रह गिरिधरस्वामींनीं केला आहे. श्रीरामरूप या ग्रंथांत श्रीरामाच्या सगुण व निर्गुण अशा दोन्ही स्वरूपांचें वर्णन आहे. सगुणाचा सारखा ध्यास घेतला म्हणजे सर्व सृष्टि कशी राममय होते ते गिरिधरांनीं या प्रकरणांत सांगितलें आहे. ते आपला अनुभव सांगतात —

**दृढ मनीं रामरूप हें धरिलें । दृश्य हें सारिलें कैसें पहा ॥**
**पाहा पाहा आतां कल्पनासंभ्रम । राम राम राम राम जाला ॥**
**राम जाला ब्रह्मगोळ हा सकळ । येकेक प्रांजळ बोलूं आतां ॥**
**बोलूं आतां लोक मला न दिसती । राम सीतापति सर्व जाले ॥**

श्रीसीतारूप या ग्रंथांत मायेच्या स्वरूपाचें वर्णन आहे. प्राणनाथ या ग्रंथांत वायुसुत जो मारुती त्याच्या विश्वव्यापक स्वरूपाचें वर्णन आहे. योगिराज या ग्रंथांत ब्रह्म आणि योगी एकच असें निरूपण करून

---

§ रामनवमी

" योगियांचा योगी स्वामी माझा " या शब्दांनीं श्रीसमर्थांचा उल्लेख केला आहे. दीक्षासंवाद या ग्रंथांत रामनाम, ब्रह्मज्ञान, विज्ञान, विवेक, वैराग्य, संतसंग, पर्यटन, ब्रह्मचर्य, रामोपासना, इत्यादि विषयांचें विवेचन आहे. साधुसंवाद या ग्रंथांत भिन्न सांप्रदायांच्या दोघां साधूंचा संवाद आहे. श्रीगुरुदेवनमन या गोड प्रकरणांत श्रीगुरुदेवाला नमन केलें आहे. देवसंवाद या ग्रंथांत इंद्र, ब्रह्मा, विष्णु, महेश हे सारे श्रीरामाचींच स्तुतिस्तोत्रें गातात असें वर्णिलें आहे. यांत इंद्रास अनुलक्षून कवि म्हणतात —

श्लोक

**वंदांतुनी देव समस्त रामें । सोडोनि द्यावे भुवनैकरामें ॥**
**ऐसा कृपाराम समर्थ माझा । इंद्रा अम्हां काय हिसाब तूझा ॥**

श्रीरामोपासकाला इंद्राचें वैभवदेखील तुच्छ वाटावें यांत आश्चर्य काय? गुरुगीतार्थ या प्रकरणांत संस्कृत गुरुगीतेचा साद्यंत अर्थ मराठी भाषेंत दिला आहे.

**"मुखोद्गत तुम्हा गुरुगीता आहे । अर्थ कैसा काय निरूपावा ॥"**

अशी विनंति श्रोत्याच्या तोंडीं गिरिधरांनीं घातली आहे; यावरून त्यांस संस्कृत गुरुगीता मुखोद्गत होती हें उघड दिसतें. गुरुवाक्यमाला या ग्रंथाच्या पहिल्या ८५ श्लोकांत आत्मज्ञान सांगितलें आहे व पुढें ५० श्लोकांत श्रीगुरूंनीं शिष्याला वरप्रदान केलें आहे. श्रीशिवरहस्य हें प्रकरण पद्मपुराण व लिंगपुराण यांच्या आधारानें लिहिलें आहे. यांत नामस्मरण हाच सर्वांत सुगमोपाय आहे असें सांगितलें आहे. लोकस्वभाव ग्रंथांत गिरिधर म्हणतात —

**जो जो प्राणी जन्मासि आला । तो तो देहाभिमानेंचि गेला ।**
**त्यांमध्यें कोणी विरळा । प्रबोध निवळा निवळला ॥**
**जो तो म्हणे आम्ही थोर । कोण पाहे सारासार ।**
**माझी वर्तणूक परपार । पाववी भवाच्या ॥**

**परपार हेंही नाहीं । मीच अवघा सर्व कांहीं ।**
**साधुसंत कैंचे काई । कोठून आले ॥**
**शूद्र निंदिती ब्राह्मणांस । ब्राह्मण निंदिती आणिकास ।**
**परस्परें यातीपातीस । थोरपणें उडविती ॥**

श्रीकृष्णकथातरंग व हरिलीला या प्रकरणांत गिरिधरांनीं श्रीकृष्णाच्या बाललीलेचें वर्णन केलें आहे. श्रीराम आणि श्रीकृष्ण यांच्या ऐक्यभावासंबंधानें हरिलीला ग्रंथांत गिरिधर म्हणतात—

**रघुविरभजनाची मुख्य आजन्म दीक्षा ।**
**यदुविरभजनाची रामरूपें अपेक्षा ॥**
**यदुपति रघुराजीं ऐक्यरूपें मिळाला ।**
**श्रवण करुत आतां संतश्रोते तयाला ॥**

'नाना पंथ' या प्रकरणांत निरनिराळ्या पंथांवर ५० कडवीं आहेत. 'हकिकत वाके' ( कडवीं १४७ ) यांत स्वात्मबोध, दिक्पाळ, नवग्रह, महर्षि, पंचीकरण, ब्रह्मगोळ, दैवी, पंथी, निवेदनी, आणि राजशासनी अशा १० सदरांखालीं श्रीसमर्थ रामदासस्वामींस दहा पत्रें लिहिलीं आहेत. काशीयात्राकथन या प्रकरणांत, गिरिधरांनीं शके १६३९ च्या सुमारास केलेल्या काशीयात्रेचें वर्णन आहे. रा. देव लिहितात, "वेणीस्वामी ( वेणाबाई ) व श्रीसमर्थ यांच्या पादुकांस नमन करून गिरिधरस्वामी निघाले, ते माहुली, पंढरी करून गोदावरीतीरास आले. गोदावरीच्या कांठीं कुठें मुक्काम केला त्या ठिकाणाचें नांव त्यांनीं दिलें नाहीं, पण काशीखंड ग्रंथ लिहिण्यास त्या ठिकाणीं सुरुवात करून यात्रा पुढें चालविली. मार्गांत पवित्र नद्या लागत तेथें स्नानार्थ मुक्काम करीत, तीर्थें लागत त्या त्या ठिकाणीं तीर्थविधि करीत; त्यांचीं माहात्म्यें श्रवण करीत. पयोष्णी, पूर्णा, नर्मदा, इत्यादि नद्यांचीं स्नानें होऊन, अनेक सुगम दुर्गम स्थलें ओलांडून, यात्रा चित्रकूटास पोंचली. तेथें भरतप्रेमाची

आठवण होऊन गिरिधर प्रेमभरित झाले. पयस्विनी, कालिंदी यांचीं स्नानें करून माघस्नानाला गिरिधरांनीं प्रयाग गांठलें. माघमासाचा पहिला पंधरावडा तेथेंच कंठून काशीखंडाचा पूर्वार्ध तेथेंच समाप्त केला. नंतर, समर्थांची पुण्यतिथि साजरी केल्यावर यात्रा पुढें चालली. गुहाचें शृंगवेर अवलोकन करून व गोमती, तमसा उल्लंघून यात्रा अयोध्येस पातली. अयोध्येचें दर्शन होतांच गिरिधर म्हणतात —

**........................ । पापें गेलीं भंगा क्षणमात्रें ॥**
**क्षणमात्रें पापें नसतां पदरीं । गेलीं हें उत्तरीं कोण बोले ? ॥**
**कोण बोले पापपुण्य सरयुतीरीं । जेथें नांदे हरि आत्माराम ॥**
**निरंतर वृत्ति नौमीं विश्रामली । रामआज्ञा जाली गयागमनें ॥**

गयेस जातांना गिरिधरांस पुनः शरयुदर्शन घडलें व त्यामुळें —

**........................ । ध्यान आठवलें अयोध्येचें ॥**
**अयोध्येचा राम विश्रामा विश्राम । तारक हें ब्रह्म स्वानंदाचें ॥**
**स्वानंदाचा घन श्रीराम बोळला । बरा काळ गेला सरयुतीरीं ॥**

गयेस यात्रा चैत्रांत पोंचली. तेथें पिंडदानादि सर्व विधि उरकून यात्रा ज्येष्ठांत काशीस येऊन दाखल झाली. गिरिधरांचा चातुर्मास मुक्काम तेथेंच होता. काशीसंबंधानें ते म्हणतात —

**वर्णवेना मुक्तपुरीचा स्वानंद । जेथें परमानंद शिव स्वयें ॥**
**शिव स्वयें काशीखंडीं श्रवणीं बैसे । वाणी वदवीतसे काशीखंडीं ॥**

गुरुकृपेनें यात्राहेतु सफल होऊन काशीखंड§ ग्रंथही काशीसच संपूर्ण झाला. काशीखंडाची अभंगसंख्या ३९४८ आहे. स्कंदपुराणांतर्गत संस्कृत काशीखंडाच्या आधारानें हा ग्रंथ लिहिला आहे.

---

§ मराठींत दुसरा एक काशीखंड ग्रंथ असून तो शिवदास गोमा कवीनें ओवीवृत्तांत लिहिला आहे.

श्रीसमर्थकरुणा या प्रकरणांत गिरिधरांनीं श्रीसमर्थांना परोपरीनें आळविलें आहे. श्रीकरुणाराम या प्रकरणांत श्रीरामाची करुणा भाकिली आहे. श्रीकरुणारुद्र या प्रकरणांत श्रीहनुमंताची करुणा भाकीत एकंदर हनुमंतचरित्र क्रमशः निवेदन केलें आहे. वरील सर्व स्तोत्रें फार प्रेमळ आहेत. अब्दरामायण या ग्रंथांत रामायणांतील कथा कालक्रमानुसार—तिथि, महिना वगैरे—दिली आहे. मंगलरामायणांतही रामचरित्रच गायिलें आहे. ग्रंथारंभीं गिरिधर म्हणतात —

**आधीं मंगल शारदा गणपती श्रीसद्गुरू गायिला ।**
**कृष्णातीरनिवास वास बहुसा ऊदाससा पाहिला ॥**
**ज्याची कीर्ति जगांत होउनि पुढें भेंदीत गेली चढे ।**
**कुर्यात् मंगल राघवं विजयते रामायणं मंगलम् ॥**

या ग्रंथाचे एकंदर श्लोक १६१९ असून त्या सर्वांच्या शेवटीं "कुर्यात मंगल राघवं विजयते रामायणं मंगलम्" हा एकच चरण आहे. वरील दोन्ही रामायणें 'रामदास रामदासी' मासिकांत प्रसिद्ध झालीं आहेत. श्लोकरचना फार विस्कळित आहे. अब्दरामायणांत वृत्तें मात्र नाना प्रकारचीं योजिलीं आहेत. श्लोकांचा नमुना पहा —

**श्रीरामायणसिंधुबिंदु वदनीं हेरंब तो बोलवी ।**
**कुळदेव्या वरदायनी गुरुकृपा प्रेमामृतें नीववी ॥**
**साधूसंत महंत सज्जन सभे बैसोनियां ऐकती ।**
**संख्या अब्द गुणानुवाद श्रवणीं वाल्मिकीनां संमती ॥**
**अग्निवेष वाल्मिकी मधें प्रवेश तो करी ।**
**महा चतूर तो मुनी कथार्णवासि वीवरी ॥**
**तयाचि आश्रयें मऱ्हाष्ट्रश्लोक पुण्यश्लोक हे ।**
**कवी विबुद्ध शुद्धबुद्ध ऐकताति लोक हे ॥**
**आत्माराम सुरारिशत्रु प्रगटे आनंदसंवत्सरीं ।**
**साकेतापुरिं चैत्र शुद्ध नवमी माध्यान्हकीं अवसरीं ॥**

ऋष्यश्रृंग प्रियंकरानुजसवें राजा शिशू देखतो ।
दिसेंदिस विशेष वृद्धि विमळा कौसल्या लावण्य तो ॥

विद्या चतुर्थ वरषाउपरी प्रभूला । येकादशाब्द वरुषीं व्रतबंध जाला ॥
तीर्थाटणें करित द्वादश वर्षमानीं । वैराग्ययोग विचरे प्रभु राजधानीं ॥
बाल्यत्वभानहि नसे रघुनाथजीतें । सर्वज्ञ राम त्रिगुणातित धर्मपंथें ॥
शस्त्रास्त्रमंत्रबिजशक्तिहि कौशिकानें।नाना बला अतिबला दिधल्या तयानें
मार्गीं वधूनि रघुनाथ सुकेतकन्या। यज्ञेश उद्धरि पथीं विधिकूळधन्या ॥
मारी सुबाहु मखरक्षक रक्षयातें । लंके मरीच यश सांगत रावणातें ॥

—अब्दरामायणारंभ

धुळें येथील ' रामदास रामदासी ' मासिकांत प्रसिद्ध झालेल्या 'मंगलरामायणा'च्या प्रस्तावनेंत श्री० शारदाबाई साठये यांनीं " गिरिधरांचीं सात रामायणें ज्ञात आहेत " असें म्हटले आहे. परंतु श्री. देव यांनीं गिरिधरांच्या ४० ग्रंथांची जी यादी दिली आहे तींत फक्त पांचच रामायणांचा उल्लेख आहे. मग उरलेलीं दोन रामायणें कोणतीं ?

गिरिधरांच्या मंगलरामायणाचीं पहिलीं सहा कांडें उपलब्ध आहेत, सातवें उत्तरकांड उपलब्ध नाहीं. परंतु गिरिधरांनीं तें लिहिलें होतें यांत मात्र शंका नाहीं. कारण युद्धकांडाच्या अखेरच्या श्लोकांत, आतां पुढें आपण उत्तरकांड सांगणार आहोंत असें त्यांनीं स्पष्ट म्हटलें आहे —

" जालें युद्ध इथूनि उत्तर पुढें बोले गिरी श्रीकृपे. "

मंगलरामायणाच्या उपलब्ध कांडांची श्लोकसंख्या १६१९ आहे, त्यांपैकीं ९१५ श्लोक एकट्या युद्धकांडाचे आहेत. त्या वेळची देशस्थिति लक्षांत घेतां जुन्या मराठी कवींनीं युद्धकांडावरच इतका भर कां दिला आहे हें समजणें कठीण नाहीं. कृष्णदास मुद्गल कवीनें पूर्वींच युद्धकांडावर मोठा ओवीबद्ध ग्रंथ लिहिला होता. त्यानंतर खुद्द समर्थांनींही युद्धकांड

लिहिलें. इतर कवींनीं लिहिलेल्या रामायणांत युद्धकांड आहेच. रामकथेवर महाराष्ट्रांत पुष्कळच ग्रंथरचना झाली आहे. साळ्या रसाळ, एकनाथ, कृष्णदास मुद्गल, अनंत, विठ्ठल, मुक्तेश्वर, रामदास, निरंजन माधव, वामन, नागेश, वेणाबाई, आनंदतनय, जयरामस्वामी, मोरोपंत, इत्यादि अनेक कवींनीं, समग्र रामायणावर, रामायणांच्या कांहीं कांडांवर व रामायणांतील सीतास्वयंवरासारख्या कांहीं प्रकरणांवर विपुल काव्यरचना केली आहे. गिरिधरांनीं सात रामायणें रचिलीं, निरंजन माधवानेंही अनेक रामायणें लिहिलीं व पंतांनीं तर १०८ रामायणें रचून सर्वांवर ताण केली ! असो.

गिरिधरांच्या मंगलरामायणावरून रामकथेची त्यांची आवड व त्यांचें कवित्व हीं जशीं व्यक्त होतात तसें त्यांचें भाषाप्रभुत्व व्यक्त होत नाहीं. प्रायः प्रत्येक श्लोकांत छंदोभंग, यतिभंग, ऱ्हस्वदीर्घांची ओढाताण, व्याकरणदोष इत्यादि दोष आढळतात. परंतु ज्या भूमिकेवरून त्यांनीं हा ग्रंथ लिहिला ती त्यांची भूमिका लक्षांत घेतां हे सर्व दोष क्षम्य मानावे लागतील. कारण ते स्वतःच सांगतात —

**“ नाहीं बंध प्रबंध छंद कविता जाली कथा साबडी ।**
**अर्थी चित्त नसे श्रीराम विलसे मानूनि घ्या आवडी ॥ ”**

आतां गिरिधरांच्या वर्णनशैलीचे कांहीं नमुने पाहूं.

## सीतास्वयंवराचा प्रसंग

**“ तों तें सैंवर मांडलें अतिभलें कोदंड तें आणिलें ।**
**दृष्टी भ्यासुर देखतां सकळिकां चिंतार्णवीं घातलें ॥**
**राजे सर्व अधोमुखी म्हणति कीं कैसें करावें पुढें ।**
**कुर्यात् मंगल राघवम् विजयते रामायणम् मंगलम् ॥**

* * * *

**एवं भूप समस्त येउनि सभे आधोमुखी बैसले ।**
**चिंतावर्त आवर्त त्रिबंकधनु धाकेंचि मंदावले ॥**

आले रावण दिङ्मुखीं द्विजमुखीं देखूनि चिंतार्णवीं ।
कुर्यात् मंगल राघवम्० ॥
सर्वां श्रेष्ठ मिथिलपुर भूपति श्रीराम पाहे म्हणे ।
ऐसें रत्न जरी वरी जनकजा हें भाग्य कोण्या गुणें ॥
देहातीत तपें अजन्म अचरें तें पुण्य वेंचो भलें ।
कुर्यात् मंगल राघवम्० ॥
तों तें मंदिर उंच त्यांत विजया घेऊनि ते जानकी ।
आली रामरुपासि पाहुन बहु व्याकूळ सज्ञान कीं ॥
कांहीं मौन सखीस काय म्हणते श्रीराम कंधि मला ।
कुर्यात् मंगल राघवम्० ॥
माझें चित्त श्रीरामरूप जाहालें रामें मला वेधिलें ।
राजे दीन समस्त हीन दिसती म्यां गे सखे शोधिले ॥
नाहीं रूप स्वरूप भूपसमुहीं या राघवासारिखें ।
कुर्यात् मंगल राघवम्० ॥
तों ते राजपुजा समस्त जाहाली वाणी कसी बोलली ।
जो कोणी धनु ओढी त्यासि आपुली कन्या असे अर्पिली ॥
ऐसें ऐकुनि रावणासि बहु तो आनंद जाला सुखें ।
कुर्यात् मंगल राघवम्० ॥
कैलासासह शिवशक्ति उचली तेथें किती हें धनु ।
हांसे रावण दिङ्मुखे मग म्हणे हा काय केला पणु ॥
ऐसा बोलुनि गर्व कांवि उचली तों तें उरीं आदळे ।
कुर्यात् मंगल राघवम्० ॥
अर्डाऊनि धरेवरी रगडिला तो चिर्डिला घरडिला ।
रामा ऊठि धनुष्य लोटिं वहिला हा खर्डिला नर्डिला ॥
अज्ञे वंदुनि राघवें उचलिलें तें वोढिलें शिवधनु ।
कुर्यात् मंगल राघवम्० ॥

गिरिधरकृत मंगलरामायणाची सर्व रचना या प्रकारची आहे व यावरून त्यांच्या इतर श्लोकबद्ध रामायणाच्या स्वरूपाची कल्पना होण्यासारखी असल्यामुळें, त्यांतील उतारे देऊन ग्रंथविस्तार करण्याची कांहीं आवश्यकता आहे असें वाटत नाहीं. रामदाससांप्रदायी कवींची ही कविता एकनाथ, मुक्तेश्वर, आनंदतनय, वामन, श्रीधर यांच्या कवितेप्रमाणें महाराष्ट्रांत लोकप्रिय न होण्याचें कारण, माझ्या मतें, त्यांच्या कवितेची रचना अगदींच ओबडधोबड आहे, हेंच होय. खुद्द समर्थांची, दासबोध, मनाचे श्लोक व करुणाष्टकें येवढीच कविता विशेष लोकप्रिय होऊन त्यांची युद्धकांडादि इतर कविता बहुजनसमाजांत फारशी प्रसिद्धि पावली नाहीं याचेंही हेंच कारण संभवतें. असो.

गिरिधरांनीं अनेक ग्रंथ लिहिले; त्या सर्वांत 'श्रीसमर्थप्रताप' हाच ग्रंथ विशेष महत्त्वाचा होय. तंजावर मठपति समर्थशिष्य भीमस्वामी रामदासी यांच्या त्रोटक रामदासचरित्राशिवाय रामदासचरित्रावर श्रीसमर्थप्रतापाइतका दुसरा जुना ग्रंथ उपलब्ध नाहीं. शिवाय गिरिधर यांस प्रत्यक्ष समर्थसहवास घडलेला असल्यामुळें त्यांनीं दिलेल्या माहितीची विश्वसनीयता शंकातीत आहे. हा ग्रंथ धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केला असून त्याच्या आरंभीं ८६ पृष्ठांची विस्तृत प्रस्तावना रा. देव यांनीं लिहिली आहे ती या बाबतींत अत्यंत वाचनीय आहे. समर्थप्रतापाच्या १६ व्या व १७ व्या समासांत श्रीमदाद्य शंकराचार्यांपासून मध्वनाथांपर्यंत जी सत्पुरुषांची नामावळी दिली आहे तींत गिरिधरांनीं रामविजयकर्त्या श्रीधरांचेंही नांव दिलें असून त्यांच्या रामविजय व हरिविजय या दोन्ही ग्रंथांचा उल्लेख केला आहे. रामविजय हा ग्रंथ श्रीधरांनीं शके १६२५ त पूर्ण केला व समर्थप्रतापकर्ते गिरिधर शके १६५१ त समाधिस्थ झाले. आणि त्यापूर्वींच समर्थप्रताप ग्रंथ त्यांनीं लिहिला होता. यावरून, श्रीधरांचे रामविजयादि ग्रंथ अवघ्या दहावीस

वर्षांतच महाराष्ट्रांत कसे प्रसार पावले हें दिसून येतें. श्रीधरांच्या 'हरिविजय' या ग्रंथाचा उल्लेख गिरिधरांनीं 'कृष्णविजय' या नांवानें केला आहे. तुकोबांचे पुत्र नारायण यांचाही उल्लेख गिरिधरांनीं केला आहे.

'निवृत्तिराम' हा ग्रंथ २०२६ ओव्यांचा असून त्याचे २२ समास आहेत. या ग्रंथांत गिरिधरांच्या नांवाचा स्पष्ट उल्लेख कोठेंही नसल्यामुळें याचा कर्ता कोण हें निश्चत सांगणें जरा कठिणच आहे. प्रत्येक समासाचे शेवटीं 'निवृत्तिवेणी' असें नांव आलें आहे व त्यावरून वेणाबाईच्या निवृत्ति नामक एखाद्या शिष्यानें हा ग्रंथ लिहिला असून, 'निवृत्तिवेणी' हें 'एकाजनार्दन' या नांवासारखें गुरुशिष्यबोधक जोडनांव असावें अशी शंका येणें साहजिक आहे, परंतु गिरिधरांनीं आपल्या 'समर्थप्रताप' ग्रंथांत बाईयाबाईची हकीकत देऊन शेवटीं,

> **"तेथें गिरिधर त्रिवर्गबंधूंसीं शरण आला।**
> **श्रीगुरुदेवें श्रीचरणसेवेसी लाविला।**
> **निवृत्तिराम निवृत्तिधाम ग्रंथ वदविला।**
> **आत्मानुभवें वाक्यार्थें॥"**

असें स्पष्ट सांगितले असल्यामुळें 'निवृत्तिरामा'चे कर्ते गिरिधरच होत असें मानणें भाग आहे. प्रश्न येवढाच आहे कीं, गिरिधरांनीं आपल्या इतर सर्व ग्रंथांत 'गिरी' किंवा 'वेणीगिरिधर' या नांवांनीं स्वतःचा निर्देश केलेला असतां या एकाच ग्रंथांत 'निवृत्तिवेणी' या नांवाचा उल्लेख करण्याचें कारण काय असावें?

'निवृत्तिरामा'च्या २२ व्या समासांत गिरिधर म्हणतात —

> **समर्थसंदेश कृष्णातीरीं। ग्रंथ संपला गोदातीरीं।**
> **विजयनाम संवत्सरीं। संतसज्जनीं अवलोकिला॥**

म्हणजे हा ग्रंथ बीड येथें शके १६३५ या वर्षीं पुरा झाला. समर्थ-कृपेनें हा ग्रंथ झाला म्हणून त्याच्या पहिल्याच समासांत समर्थांचें अल्प

पण सारभूत चरित्र देऊन ग्रंथाची पूर्वपीठिका सांगितली आहे. दुसऱ्या व तिसऱ्या समासांत जगदंबास्तवन व गुरुस्तवन करून ग्रंथनिर्मितीचा प्रसंग सांगितला आहे. गुरूच्या उपदेशानें व ग्रंथराज दासबोधादिकांच्या मननानें स्वतःला निवृत्ति कशी झाली हें गुरूपुढें कथन केल्यावर गुरूंनीं तो सर्व भाग ग्रंथरूपानें रचून ठेवण्याची आज्ञा केली;

**ऐसा शिष्यें स्वानुभव कथिला ।**
**मग गुरुदेवें शिष्य आज्ञापिला ।**
**निवृत्तिराम ग्रंथ करीं रे वहिला ।**
**नाना आख्यानीं स्वानंदें ॥**

**समर्थकृपेनें निवृत्ति झाली ।**
**समर्थदेवें आज्ञा केली ।**
**कैसी कैसी निवृत्ति बाणली ।**
**समर्थ मुखें बोलविती ॥**

यापुढें मुख्य ग्रंथास आरंभ होऊन एकेका समासांत एकेका निवृत्तिसाधनाचें विवेचन आणि उदाहरणादाखल पुढें एखादें आख्यान अशा क्रमानें ग्रंथ पूर्ण केला आहे.

ग्रंथाचा मुख्य विषय भक्ति हाच आहे. या संबंधानें रा. ओगले यांनीं ग्रंथाच्या प्रस्तावनेंत जें विवेचन केलें आहे त्याहून निराळें विवेचन करण्याचें कारण नसल्यामुळें, त्याचाच महत्त्वाचा भाग येथें उद्धृत करितों. "मन काय, अहंकार काय, निवृत्त होण्याचीं जीं साधनें आहेत त्यांत भक्तिमार्गाची योग्यता विशेष आहे. भगवंतांनींही त्याला राजविद्या, राजगुह्य हीं विशेषणें दिलीं आहेत. समर्थसंप्रदायांत तर त्याचें विशेषच महत्त्व आहे. **आदिपुरुष त्रैलोक्यनायक । त्याचा करावया स्वरूपविवेक । भक्तिमार्ग हा अलोलिक । समर्थे ग्रंथीं निरोपिला ॥** या भक्तीचे नऊ प्रकार प्रल्हादापासून आजतागाईत सुरू आहेत. सर्व

संतांनीं परोपरीनें त्यांचें वर्णन केलें आहे. कारण **भक्तीवीण तों विश्रांति। त्रैलोक्यींहि दिसेना** ( ८–१० ). इंद्रियें मूळ उत्पन्न झालीं तींच प्रवृत्तिपर, म्हणून मनुष्यांची स्वाभाविकपणेंच विषयांकडे प्रवृत्ति असते. हा इंद्रियांचा धर्म गृहीत धरून विषयांच्या मार्गानेंच त्यांना निवृत्त करावीं म्हणून भक्तिमार्गाचा उदय आहे. ही गोष्ट लक्षांत ठेवून शिष्य विनंति करितो कीं **प्रवृत्तिमार्गें निवृत्तिवर्म। सद्गुरुनाथें विवरावें ॥** ( ८–७१ ). इतर विषयांच्या ऐवजीं परमात्म्यालाच विषय करावयाचा, म्हणजे कानांनीं त्याचे गुणानुवाद ऐकावयाचे, तोंडानें त्याचें गुणवर्णन करावयाचें, मनानें स्मरण करावयाचें, हातांनीं त्याची पादसेवा करावयाची, इत्यादिपैकीं ज्याला जो प्रकार विशेष आवडीचा अथवा सोईचा वाटेल त्याप्रमाणें त्यानें तो उचलावा, म्हणून सद्गुरूंनीं नऊ प्रकारची भक्ति सांगितली. समर्थांनीं ग्रंथराजाच्या चौथ्या दशकांत तिची सविस्तर चर्चा केली, तिला अनुसरून गिरिधरांनीं मोठ्या सुरसपणें त्या नवविधा भक्तीचें आठव्या समासांत सोदाहरण वर्णन केलें आहे. समर्थसंप्रदाय आधींच भक्तीनें थबथबलेला, तशांत खुद्द भक्तीचाच विषय आणि त्यांतही रघुनाथाची कथा, असा योग जमल्यावर प्रेमळ गिरिधरांना प्रेमाचें भरतें येऊन श्रीरामाच्या सुकुमार मूर्तीचें त्यांनीं फारच गोड वर्णन करावें यांत आश्चर्य कसलें ?”

हें राममूर्तीचें गोड वर्णन वाचण्यासारखें आहे —

**“ कोटि कंदर्पजित घनःशाम। तडित्प्रभा श्रीसीताराम।**
**भवभवानीहृदयविश्राम। योगमायेजवळिके ॥**
**मुकुट किरीटि मस्तकीं साजे। केशर कस्तुरीतिलक विराजे।**
**सुरंग रत्नाक्षता झळकती तेजें। ऊर्ध्व पुड्रीं श्रीभाळीं ॥**
**चंपकतैलाभ्यंगीं कुरळ। कुटिलालक सुनीळ सरळ।**
**वीरगुंठी बांधिले निर्मळ। चांचर दिसती बाहेरी ॥**

सुमनें गुंफिलीं पिवळीं । अळिकुळगुंजारवें शोभलीं ।
किरीटि झळाळे कपोळीं । मुख निमासुरें बरवंट ॥
समता भृकुटी चापाकृति । कमळनयन कर्ण स्पर्शती ।
मकरकुंडलें कर्णी झळकती । गंडस्थळीं झळाळ ॥
त्रैलोक्य बीक नासिकीं आलें । कोटि चंद्र वदनीं निंबलोण केलें ।
अधर सुरंग मंदहास्य भलें । दंत हिरकणी झळकले ॥
कंबुकंठीं कंठमाळा । नाना रत्नीं फांकती किळा ।
कौस्तुभपदक हृदयकमळा । यज्ञोपवीत सुदक्षणे ॥
आजानुबाहो बाहूभूषणें । केयूरें कीर्तिमुखें शोभलीं गुणें ।
पोंवची मुद्रिका वीरकंकणें । आगोळिकें दाटलीं ॥
विशाळ वक्षस्थळ उदरीं त्रिवळी । ब्रह्मा जन्मला नाभिकमळीं ।
कटिसूत्र मेखळा कास कसिली । पीतांबरें रविकिरणें ॥
क्षुद्र घंटिका किंकिणी गजरें । जानुजंघ गुप्त दिव्यांबरें ।
वांकी तोडर अंदुनू पुरें । ब्रीदें पाईं विराजलीं ॥
सुनीळ घोंटीं मुखचंद्र मेळावा । बाळार्क टांचे अरुण तळवां ।
येकवीस चिन्हें सामुद्रिकीं यावा । ध्वजवज्र अंकुश पद्मरेखा ॥
सुगंध उटी सुमनगंध माळा । दूर्वादळ तनु वैजयंती गळां ।
भ्रमर गुंजारव करिती मेळा । धूसर आंगीं उधळलें ॥
उत्तरीवस्त्र बाहाळ कोदंडबाण हातीं । अवतंस तुरे कर्णी पुंजाळती ।
खचित पादुका पाईं झळकती । मंदिर तेजें डवरलें ॥
ऐसा देखिला स्वानंदघन । आदिपुरुष पुरातन ।
मनमोहन राजीवनयन । जानकीजीवन सर्वात्मा ॥

—समास ८ वा.

निवृत्तिराम हा ग्रंथ रचना व काव्य या दोन्ही दृष्टींनीं गिरिधरांच्या सर्व ग्रंथांत सरस आहे; व रसिक आणि भाविक लोकांनीं एकदांच नव्हे तर अनेक वेळां वाचावा अशा योग्यतेचा आहे. या एकाच ग्रंथावरून

गिरिधरांचें संस्कृतग्रंथावलोकन फार होतें हें लक्षांत आल्यावांचून रहात नाहीं. त्याचप्रमाणें वाराणसी, कार्तिकस्वामी, श्रीशैल्य मल्लिकार्जुन, इत्यादि अनेक तीर्थयात्रा गिरिधरांनीं केल्या असाव्या असेंही या ग्रंथांतील तद्विषयक उल्लेखांवरून दिसतें.

अहंममतानिवृत्तिलक्षण सांगतांना गिरिधरांनीं रावण हा पूर्वपक्ष कल्पिला असून राम हा सिद्धान्त कल्पिला आहे —

**अहंममता म्हणजे जाणा । मी माझें ऐसी भावना ।**
**मी कोण माझें काय मना । आणिलें पाहिजे ॥**
**मी जीव माझें वैभव । मी सुंदर माझें गौरव ।**
**धनसंपत्ति संतति हांव । ब्रह्मांडातें कवटाळी ॥**
**मी ज्ञाता माझी मान्यता । मी तपस्वी माझी उग्रता ।**
**मी सुशीळ माझी शुचिर्भूतता । लोकांसी नये ॥**
**मी विद्यावंत माझी प्रतिष्ठा । मी प्रतिसृष्टीचा स्त्रष्टा ।**
**म्या बहुतांची अप्रतिष्ठा । केली म्हणे अभिमानी ॥**
**विश्वामित्र गोत्र माझें । मज जाणिजे वशिष्टराजें ।**
**नाना अभिमानीं फुंजे । अहंममता दुर्बुद्धि ॥**
**सर्प वांकडेतिकडे चालती । बिळीं सरळचि प्रवेशती ।**
**तैसे अहंकार नानाविकार करिती । आत्मसदनीं येती सरळेचि ॥**
**किती दिवस अहंबुद्धि । घ्यावी आतां आत्मशुद्धि ।**
**रावण ज्ञाता दुसरा विधि । खंडें केलीं श्रुतीचीं ॥**
**म्हणे चंद्र मजवरी छत्र धरी । सूर्य माझे तिष्ठे द्वारीं ।**
**वरुण वायो अधिकारी । झाडी फेडी करावयाचे ॥**
**पुरंदर तो सुमनदामक । रजक माझा मुख्य पावक ।**
**शतक्रतु ज्याचेनि सम्यक । होमहवनें त्रिभुवनीं ॥**
**त्रिदश माझे बंदिशाळे । म्हणोन करी नाना चाळे ।**
**कुटिळ कपटी जनकबाळे । लंकेसी घेऊनि गेलासे ॥**

बरें रावणें स्वहित केलें। समर्थैसी वैर धरिलें।
मी माझें समूळ गेलें। सर्वही जालें रामार्पण॥
म्हणे भवसिंधु तरेल कोण। तेथें तरले पाषाण।
सुंदर माझें अशोकवन। शोक उत्पन्न तेथेंही॥
अक्षया माझा आयुष्मंत। त्यासी क्षय करी हनुमंत।
सुवेळा माझी हे निभ्रांत। तेथें ठाणें रामाचें॥
माझी अमरापुरी अजिंक। तेथें वेंघलें कपिकटक।
असुर माझे सुरवरत्रासक। त्यांसी त्रासक वानर हे॥
त्रिशिरा माझा त्रिभुवन जिंकी। त्यासी वानर ऋषभ जिंकी।
कुंभकर्ण माझा बळसागर कीं। अगस्ति राम आचमन हें॥
अतिकाया माझा चंड काया। त्यासी मारी सौमित्र बळिया॥
इंद्रजित माझा पराक्रमिया। त्यासिही मारी लक्ष्मण॥
अहि महि माझे मित्र बंधु। त्यांसी मारी प्रतापसिंधु।
म्हणे करीन लक्ष्मण वधु। तात्काळ उठवी द्रोणाचळ॥
मी होम करीन वाममार्गें। तों वानर भंगिती गगनमार्गें।
रणांगणीं माझीं दैत्यदुर्गें। समर्थें भंगें पाडिलीं॥
माझी गगन भरोनि शरसुटी। क्षणार्धें तोडी राम जेठी।
माझी शिरोत्पत्ति मोठी। श्रीराम फोडी कुपिका॥
जें जें मी माझें भाविलें। तितुकें पूर्वपक्षवारीं गेलें।
शास्त्रज्ञांसी कळों आलों। अहंममतानिरूपण॥
पूर्वपक्ष जाला रावणाचा। सिद्धांत राम उरला साचा।
मी माझें अहंममतेचा। राम जाला चहूंकडे॥
वाम सव्य मागें पुढें। रथ सारथी राम पुढें।
गगन भरूनि रामें रोकडें। स्वरूप दाविलें सर्वत्र॥
गगनसदृशं राम जाला। पूर्वपक्ष अवघा उडाला।
खं ब्रह्म राम देखता जाला। खंडें केलीं वेदाचीं॥
वेदशास्त्र मिथ्या नव्हे। पढतमूर्ख जरी आहे।
श्रीराम त्यास भेटताहे। ईश्वरी कृपा रावणा॥

**अहंममता निमोनि गेली । अंतरस्थिति राम जाली ।**
**मी जीव ऐसी शुद्धि उडाली । अहं आत्मा निर्धारें ॥**
**अहं आत्मा आत्माराम । अहं सोहं सारूनि नेम ।**
**राम-रावण-ऐक्यवर्म । संतसज्जन जाणती ॥**
**अहं रावण उभा केला । अर्थ परमार्थी आणिला ।**
**जय विजय रावण गेला । वैकुंठभुवना निश्चयें ॥**

—समास ७

या एकाच उताऱ्यावरून, स्थालिपुलाकन्यायानें, निवृत्तिराम या सुंदर ग्रंथाच्या एकंदर स्वरूपाची बरीचशी कल्पना होण्यासारखी असल्यामुळें, त्यांतील आणखी कांहीं वेंचे येथें देण्याचा मोह आतां आवरतों.

गिरिधरांच्या सर्व ग्रंथांत ‘ संकेतरामायण ’ हा ग्रंथ फार मोठा आहे. हें त्यांचें शेवटचें रामायण व तें त्यांनीं शके १६४४ त रचिलें. त्याची ओवीसंख्या ६७४१ असून, अध्यायांच्या जागीं सर्गांची योजना केली आहे व हे सर्ग १८८ आहेत. गिरिधरांच्या श्लोकबद्ध रामायणांपेक्षां ह्या ओवीबद्ध रामायणाची रचना अधिक चांगली आहे. बालकांडाच्या दुसऱ्या सर्गांत श्रीसमर्थांसंबंधानें कवीनें फारच जिव्हाळ्याचे उद्गार काढले आहेत. गिरिधरांस प्रत्यक्ष गुरूपदेश जरी बयाबाईकडून मिळाला तरी समर्थांनींही त्यांना उपदेश केला होता असें पुढील ओवीवरून स्पष्ट दिसतें —

× × × **ऐसें अचिंत्य तुम्हासी चिंतिलें ।**
**मद्भावनें आणखी एक गमलें ।**
**जेणें रूपें मजला उपदेशिलें ।**
**तेंचि आतां वर्णीन जी ॥**

आणि हें समर्थवर्णन गिरिधरांनीं येणेंप्रमाणें केलें आहे —

**लोकानंद तूं जगद्गुरू । आत्माराम तूं जगदीश्वरु ।**
**लीळावतारी पूर्णावतारु । कृष्णातीरीं गोचर देखिलें रूप ॥**

**तुम्ही वैराग्याचे मुकुटमणि । तापसांमाजी शूळपाणि ।**
**मोक्षश्रीसहित मोक्षपाणि । उदास सेविलीं तुम्ही गिरिकंदरें ॥**

**तुम्हासी मायेची भीड नाहीं । कोणी बोलों न शके कांहीं ।**
**मतांतरें नाशूनि पाहीं । विमळब्रह्म स्थापिलें ॥**

**तुमचें सर्वब्रह्मी लोकांवरी शासन । तुम्ही एकंकारगजावरी पंचानन ।**
**नानायुगधर्मावरी रघुनंदन । सत्ययुगीं अवतरलां तुम्ही ॥**

**सदा उदास गिरिकंदरीं वसतां । शुद्ध ब्रह्माचा निर्णयो करितां ।**
**ग्रंथ करूनि सचराचरीं अनंता । अतीतदीक्षा लाविली तुम्ही ॥**

* * * *

**कृतयुगीं अंतरात्मा पवन । त्रेतायुगीं पवननंदन ।**
**द्वापरीं म्हणती भीमसेन । श्रीरामदासस्वामी कलियुगीं ॥**

—संकेतरामायण, बालकांड, सर्ग २

ह्या संकेतरामायणांतील मुख्य कथाभाग जरी वाल्मीकिरामायणांतूनच घेतला आहे तरी पद्मपुराण, लिंगपुराण वगैरे ग्रंथांचाही आधार घेतल्याचें कवीनें सांगितलें आहे. ग्रंथारंभ असा केला आहे कीं, सनत्कुमारानें गणपतीला ब्रह्महत्यादोष कसा नाहींसा होईल असा प्रश्न केला असतां गणपतीनें त्याला ही हत्यामोचनकथा सांगितली; व तीच कवि महाराष्ट्र भाषेंत श्रोत्यांस सांगत आहे. मात्र ग्रंथाचें कर्तृत्व तो आपल्याकडे घेत नाहीं, तर—

**राम वक्ता राम श्रोता । रामकर्ता ग्रंथ लिहिता ।**
**रामरूपेंवीण सर्वथा । दुजें तत्त्वता नाडळे ॥**

भावार्थरामायणासारखा प्रचंड ग्रंथ वाचणें ज्यांना शक्य नसेल त्यांना गिरिधरांचें हें संकेतरामायण फार सोयीचें आहे. गिरिधरांनीं मूळ कथेचा फार विस्तार केलेला नाहीं किंवा अतिसंक्षेपही केलेला नाहीं. गिरिधरांच्या

इतर ग्रंथांप्रमाणें याही ग्रंथाची भाषा जरा गलबलीतच आहे, परंतु त्यांत प्रसन्नता असल्यामुळें ग्रंथ वाचतांना कंटाळा येत नाहीं.

श्रीराम आणि लक्ष्मण यांसह विश्वामित्र सीतास्वयंवरास आले आहेत हें ऐकतांच राजा जनक पूजासाहित्य घेऊन धांवत आला आणि—

**अभिवंदनें पूजा अर्चनें । परम प्रीतीचीं प्रीतिवचनें ।**
**रामीं तन्मय जालीं मनें । कोण कुमार हे कोणाचे ? ॥**

**राजा म्हणे जी मुनिसत्तम । मदनमूर्ति हे कोण उत्तम ।**
**अरे सूर्यवंशी हे रघोत्तम । रामलक्ष्मण दाशरथी ॥**

**ताटिकाकंदन यागरक्षण । राक्षसदमन साकेतगमन ।**
**अहल्योद्धरण पवित्रचरण । धनुर्यागा आणिले ॥**

**स्वामी मूळेंवीण आले हे सौख्यरासी । कोण माझ्या तपांच्या रासी ।**
**परि दुर्घट केलें म्यां पणासी । त्या प्रतिज्ञेसी रक्षिजे सर्वेश्वरें ॥**

**ऐकोनि विदेहाचीं उत्तरें । ऋषिजन देती प्रत्योत्तरें ।**
**म्हणे जें चिंतिलें तुम्ही मिथिळेश्वरें । तें सर्वही सिद्धी पावेल ॥**

**कौशिक म्हणे रे विदेहमूर्ति । पुराणें गाती तुझी कीर्ति ।**
**तरी हा राम आदिमूर्ति । मिथिळे चालोनि आलासे ॥**

**जानकीजीवन हा निर्धारें । हे माझीं सत्य उत्तरें ।**
**कीं तो वाल्मीक भविष्योत्तरें । आधींच वदोनि गेलासे ॥**

**जनक म्हणे जी कौशिकस्वामी । तुमचीं कृपापात्रें आम्ही ।**
**आत्माराम स्वानंदधामीं । तुमच्या कृपें विराजो ॥**

**अंतरसाक्षी भगवान । परस्परें ऐके संभाषण ।**
**जनक म्हणे जी जगजीवन । ऋषिमेळीं चालावें ॥**

—बाळकांड, सर्ग १२

आतां रावणगर्वपरिहार व श्रीरामकृत शिवधनुर्भंग यांच्या वर्णनाच्या सुरस ओव्या उतरून घेऊन हें गिरिधरप्रकरण संपवितों.

सीतास्वयंवरांत जमलेल्या राजेलोकांत शिवधनुष्यास बाण लावणारा कोणी दिसत नाहीं असें जेव्हां जनकाचे बंदीजन म्हणाले तेव्हां—

ऐकोनि बंदीजनांचें उत्तर। खवळला रावण लंकेश्वर।
उभा राहोनि दशकंधर। काय बोले सर्वांप्रती॥

अरे माझी पुरुषार्थशक्ति। ठाउकी आहे कैलासपती।
इंद्र जिंकोनि अमरावती। अमर बंधीं घातले॥

ऐसा पुरुषार्थी मी रावण। देवीं धरिलें दंतीं तृण।
त्रिपुरदहाचें कांबीट जीर्ण। काय उसीर निवटावया॥

आतांचि कौतुक पाहाल तुम्ही। विजइ रावण होईन मी।
जानकी जिंकोन जाईन मी। कैलासवासीदर्शना॥

ऐसें बोलोनि गर्वें उचलों गेला। बळें उचलोनि घेतां च्यापें चिर्डिला।
पाहा कैलास जेणें हलविला। तो हा उलंडला राजांगणीं॥

तंव त्या प्रचंड कोदंडें। चूर केलीं रावणबंडें।
रक्तें वाहाती दाहा तोंडें। हातपाय आदळितसे॥

सुरनरपन्नग भ्याले। वांचल्यां काय करील नकळे।
गर्वनिधीचा गर्व गळे। बहुधा प्राणांत रावणा॥

मिथिळनाथ साशंकितु। निर्वीर धरा जाली म्हणतु।
अमरबंध हा लंकानाथु। राजांगणीं लोळतसे॥

देखोनि कृपा आली विश्वामित्रा। म्हणे ऊठ वेगीं राजीवनेत्रा।
प्रसंगीं सोडवीं कुपात्रा। आम्हां सर्वत्रां उल्हासवीं॥

मग ऋषिवचनें रणकेसरी। उठिला राम तो झडकरी।
सुरांसि भासे साहकारी। नेणो मारी रावणा॥

सर्वीं केलें म्लानवदन। काय करी तो रघुनंदन।
च्याप वामांगुष्ठेंकरून। वेगीं हुंडारूनि घेतलें॥

**लघु लाघवें गुण चढविला। ठाण मांडूनि आकर्ण वोढिला।**
**ते समइं भूमिकंप जाला। कैलास डगमगिला तूं* जाणसी॥**
**नक्षत्रांचा जाला सडा। पाताळीं तो शेष वेडा।**
**सप्तसागरांचा वेढा। निर्घो पाहे ते काळीं॥**
**आजानुबाहो राजीवनयन। माझें* च्याप अखूड सान।**
**सीत पावेना आकर्ण। तेणें कडकडूनि मोडलें॥**

—बाळकांड

## ५ बाळकराम

वऱ्हाडांत कारंजा या नांवाचें एक लहान शहर आहे. तेथें दोन रामदासी मठ असून त्यांपैकीं एक मठ बाळकरामाच्या परंपरेंतला आहे. बाळकराम हे समर्थांचे शिष्य. ते यजुर्वेदी माध्यंदिन शाखेचे असून त्यांचें उपनाम कळवे होय. तुळजापुरची भवानी हें त्यांचें कुलदैवत. बल्लाळ—केशव—गणेशप्रसादतः पुत्र ( गणपतीच्या कृपेनें झालेला पुत्र. नांव दिलेलें नाहीं. )—बाळकराम अशी त्यांची पूर्वजपरंपरा दिसते. त्यांचे पूर्वज आरंभीं अष्टीस रहात होते. जांबेच्या पूर्वेस तीन चार कोसांवर अष्टी आहे. अष्टीहून बाळकरामांचे वडील शिंदखेडें येथें रहावयास गेले; व बाळकरामांचा जन्म तेथेंच झाला. शिंदखेड्यास उपद्रव झाल्यामुळें बाळकराम तें गांव सोडून पुसगांवीं रहावयास गेले. बाळकरामांचें रामठेगा असें टोपणनांव होतें असें दिसतें. ते एकेच ठिकाणीं फार दिवस राहिल्याचें दिसत नाहीं. कुऱ्हाडी नामक गांवीं ते कांहीं दिवस राहिले होते. तेथून त्र्यंबकेश्वरीं जावें असें त्यांच्या मनांत आलें होतें, पण तिकडे न जातां त्रिपुरापूर येथेंच त्यांनीं वस्ती केली. बाळकरामांचे पुत्र रोकडाराम हे कायमचे कारंजा येथें जाऊन राहिले. या मठाची गुरुशिष्यपरंपरा उपलब्ध झाली ती येणेंप्रमाणें —

---

* हें शंकर पार्वतीस सांगत आहेत.




बाळकरामाचा जन्ममृत्युकाल किंवा दुसरी कोणतीही माहिती उपलब्ध नाहीं. बाळकरामाचे पुत्र **रोकडाराम** हेही आपल्या पित्याप्रमाणेंच मोठे अधिकारी पुरुष होते.

दिनकर किंवा गिरिधर यांच्याप्रमाणें बाळकरामांनीं जरी एखादा मोठा स्वतंत्र ग्रंथ लिहिलेला नाहीं तरी त्यांची बरीचशी स्फुट कविता कारंजा येथील मठांत आहे. त्यांचीं पुढील प्रकरणें उपलब्ध आहेत— (१) हरिश्चंद्रआख्यान, श्लोकबद्ध, पद्यसंख्या ७२. (२) पार्वतीलक्ष्मीसंवाद, श्लोकबद्ध, पद्यसंख्या ३७. (३) चंद्रहास्यकथा, ओवीबद्ध अपूर्ण, (४) शंकरविवाह, ओव्या ८२. (५) गजगौरी व्रत ५०. (६) पार्वतीस्वयंवर.

श्लोक १००. (७) बीरडे द्रौपदीचे, श्लोक ३५. (८) सुदामचरित्र, श्लोक ५८. (९) प्रल्हादचरित्र, श्लोक १५५. (१०) वामनचरित्र, श्लोक सुमारें १००. (११) रेणुकामाहात्म्य, श्लोक ९४. (१२) चेंडुफळी, श्लोक ५५. (१३) कथाकल्पकेदार, श्लोक १०८. (१४) एकादशी, श्लोक ११२. (१५) गोपीचंदआख्यान, प्रसंग ६, पद्यें २१६. (१६) हनुमंतभेटी, पद्यसंख्या सुमारें ३००. (१७) अंगदशिष्टाई, पद्यसंख्या ३००. (१८) सवाया, १५१. (१९) श्रीसद्गुरूपदेश, श्लोक ५४. (२०) पदसंग्रह. (२१) स्फुट अभंग, श्लोक, आरत्या वगैरे. बाळकरामाची ही स्फुट कविता 'असंख्य' आहे असें रा. देव म्हणतात, यावरून गिरिधरांप्रमाणेंच बाळकरामांनींही आपलें बहुतेक आयुष्य काव्यरचनेंतच व्यतीत केलें हें उघड दिसतें. त्यांच्या कवितेंत समर्थांचा उल्लेख सर्वत्र आहे. बाळकरामाची ही बहुतेक कविता अगदीं साधी व सुलभ आहे. चंद्रहास्यकथा या प्रकरणाच्या आरंभीं बाळकराम म्हणतात —

**श्रीवरदमूर्ति सद्गुरु । तुझा वेदासी न कळे पारु ।**
**तो तूं आम्हासी साचारु । करुणाकरु गुरुराया ॥**
**तुझा अभय मज कारणें । हेंही अघटित बोलणें ।**
**तूंचि असतां पूर्णपणें । अभये होणें कोणासी ॥**
**ऐसें म्हणता अहंता । बाधिजेल गुरुनाथा ।**
**तुझिया चरणीं ठेविला माथा । चंद्रहास्यकथा बोलवीं ॥**

शेवटच्या ओव्याही अशाच गोड असून त्यांवरून कवीची निरभिमानता व्यक्त होते—

**दुष्ट तेचि सज्जन होती । रामदास कृपा करिती ।**
**अभक्त भक्तीसी लागती । होती कैसे भाविक ॥**
**रामदासाचा चरणरज । सद्गुरु आमुचें परमगुज ।**
**अनन्य भावें गरुडध्वज । पूजिजे परम सद्भावें ॥**

बाळकराम सद्गुरूचा । अंकित रामदासाचा ।
वरद असतां समर्थांचा । काय येक नव्हे ॥
वाचीजे कथा पुण्यपावन । बाळक रामदासीं शरण ।
यथामति बोलिलों जाण । श्रोते सर्व रामाचे ॥
नव्हे बाळकराम वदता । तरी कथा आली हाता ।
प्रीतीनें जालों अर्पिता । रामदासगुरूसी ॥
अबध सुबध सज्जनीं । नीट करा जोडितों पाणी ।
निष्ठुर तरी ताता जननी । श्री ते बाळकरामाचे ॥

शंकरविवाह या प्रकरणाच्या शेवटच्या तीन ओव्या —

गुरु रामीरामदास । त्यासी उभये ऐक्यीं विश्वास ।
निरसूनि पिंडब्रह्मांडास । निरंजनीं वास गुरुभक्तां ॥
बाळक रामदासीं शरण । जालें दोघांचें एकपण ।
सद्गुरुकृपेनें लग्न । गेलें लागोनि निश्चळीं ॥
लोक म्हणती रामठेंग्यासी । वदणें नाहीं हरासी ।
म्हणोनी गुरु रामदासीं । शिवकथेसी बोलविलें ॥

या शेवटच्या ओवीवरून असें दिसतें कीं, 'तूं शंकराचें नांव कधीं घेत नाहींस' असें गांवांतले लोक बाळकरामास म्हणाले व म्हणून हें 'शंकरविवाह' प्रकरण त्यांनीं रचिलें.

श्रीसमर्थांनीं बाळकरामास जो उपदेश केला तो त्यांनीं ५४ श्लोकांत गोंवला आहे. या प्रकरणाच्या अंतीं बाळकराम म्हणतात —

गुरूनें कसा रामविश्वास केला । अभिमान हा सर्व गीळूनि ठेला ।
तयाकारणें काय आतां पुसावें । समर्था गुरूकारणें काय द्यावें ॥
गमेना रघूनायकावीण कांहीं । असे गूज तें सद्गुरूनाथपाईं ।
तयाकारणें काय आतां पुसावें । समर्था गुरूकारणें काय द्यावें ।
मनीं कल्पना राम होऊनि गेली । गुरूच्या पदीं वासना लुब्ध जाली ।
तयाकारणें काय आतां पुसावें । समर्था गुरूकारणें काय द्यावें ॥

**मोहो दूरि केला गुरूराजयानें । सदानंद आनंद केला कृपेनें ।**
**तयाकारणें काय आतां पुसावें । समर्था गुरूकारणें काय द्यावें ॥**
**दिल्हें बाळरामासि ऊपासनेसी । बहु लागली आवडी रामदासीं ।**
**तयाकारणें काय आतां पुसावें । समर्था गुरूकारणें काय द्यावें ॥**

पण या कवितांपेक्षां बाळकरामाचीं पदें व अभंग अधिक सरस आहेत. नमुन्यादाखल थोडींशीं देतों :—

**पदें**

**रामदासें कैसें आतां केलें रे ।**
**ज्योतिरूपें न देखों कोण जाले रे ।**
**जड कोठें धन्य हें अपूर्व रे ।**
**अवघा मीच माझीच अवघी सत्ता रे ॥ ध्रु० ॥**
**मूळरूपीं रंगलें मन माझें रे ।**
**दिसे चैतन्यघन सदोदित रे ।**
**चंचळाचें न दिसे कांहीं भान रे ।**
**निश्चळासी पाहतो आहे कोण रे ॥ १ ॥**
**दृश्य द्रष्टा कोणें कल्पावें तयासी रे ।**
**माया जड म्हणते कोण तीसी रे ।**
**धन्य तोचि सद्गुरु रामदासी रे ।**
**बाळकरामीं स्थापिलें प्रत्ययासी रे ॥ २ ॥**

**२**

**जय जया मोक्षपाणी । गुरुराजा उदारा ।**
**उपकार काय मानूं । केला मज दातारा ।**
**तुझेनि कृपादृष्टी । मज मीच सोयरा ।**
**मीपण पाइं तुझां । तुझा तूंचि तूं खरा ॥ ध्रु० ॥**
**सद्गुरुबोधअर्का । तमअज्ञाननाशा ।**
**प्रकाश तूंचि तूं कीं । नये बोलतां भाषा ।**
**बोलणें हारपलें । नये बुद्धीच्या लेशा ।**
**स्फुरते अल्प कांहीं । गुरु तूंचि सर्वेशा ॥ १ ॥**

तूंचि तूं पूर्णपणें । कोण दुसरें आहे ।
आवडी बोलतां कीं । धृति कुंठित ठाये ।
तेंचि हें निजरूप । रामदासासि पाहें ।
बाळक रामपायीं । पुजूं उरले पाये ॥

## अभंग

ब्रीद तां राखावें रामा धांवसीना ।
गिळिती वासना कामक्रोधें ॥ १ ॥
क्रोध हा नावरे काम अनावर ।
आतां रघुवीर कृपा करो ॥ २ ॥
दास सीघ्रकोपी जालों मी राघवा ।
वेगीं आवरावा बाळराम ॥ ३ ॥

२

ब्रीद तां राखावें राखियेलें आतां ।
बुझावीत आतां निजदास ॥ १ ॥
प्रेमामृतपान्हा भूक बोळविली ।
करितो साउली निजलोभें ॥ २ ॥
अध्यात्मश्रवण कुंडलें श्रवणीं ।
राघोबानें लेणीं लेवविलीं ॥ ३ ॥
रामदासहात शिरीं पिंपळपान ।
कुरवाळी प्रीतीनें रामराये ॥ ४ ॥
ऐसी रामदासी माउली स्नेहाळ ।
घडे घडे बाळराम पाहे ॥ ५ ॥

बाळकरामाचे पुत्र व शिष्य **रोकडाराम** यांचा उल्लेख पूर्वीं आलाच आहे. यांचीही फारशी माहिती उपलब्ध नाहीं. कारंजें येथील मठांत जीं सांप्रदायिक बांधकामें झालेलीं आहेत तीं बहुतेक रोकडारामांनीं करविलेलीं होत. हीं सर्व कामें त्यांनीं केवळ भिक्षेच्या बळावर केलीं.

**सीताराम लक्षुमण भरत भाऊ।**
**महाराज शत्रुघ्न हा देवराउ।**
**हनूमंत हा स्वामि देवाधिदेउ।**
**बरी भीक या देउळा काम लाऊं ॥ १ ॥**

**बहू फीरतों पाहिले फार गाउ।**
**बरे लोकही पाहिले म्या सदेउ।**
**सदा सर्वदा रोकडा राम गाऊं।**
**बरी भीक द्या देउळा काम लाऊं ॥ २ ॥**

असा सवाल करीत साऱ्या भरतखंडभर रोकडारामांनीं संचार केला.

**नित्य नूतन हिंडावें। उदंड देशाटण करावें।**
**तरीच भिक्षा मागतां बरवें। श्लाघ्यवाणें ॥**

—दासबोध द० २, स० ८

या समर्थांच्या आदेशास अनुसरून रोकडारामांनीं सारा देश पालथा घातला. रामनवमीच्या महोत्सवाचा खर्च चालवितांना त्यांना घरांतलीं भांडींकुंडींदेखील गहाण ठेवावीं लागलीं! ते म्हणतात—

**मोहछवालागुनि कूप केला। पैशा दिढास्या रुपयात जाला।**
**याकारणें जी करितों करूणा। भीकेसि द्या कां पाहतां निदाना ॥**
**मोडोनि कुडक्या मुदिलागिं आतां। भांडींकुंडीं गहाण जी अनंता।**
**खर्चास जाले विपरीत जाणा। भीकेसि द्या० ॥**
**पिशाच्य मी फार भ्रमिष्ट आहें। घरीं मनुष्यें मज बोलताहे।**
**श्रीराघवा काय कीजे सुजाणा। भीकेसि द्या० ॥**
**आतां करूं काय जि रामराया। तुम्हाविणा कोण असे बुझाया।**
**हे रोकडा-वीनति कां न माना। भीकेसि द्या० ॥**

अशा रीतीनें देवाला व लोकांना आळवीत रोकडारामांनीं सर्व देशभर संचार केला व अनेक तीर्थेंक्षेत्रें पाहिलीं. त्या वेळीं त्यांचें वयही

फार नव्हतें. कांहीं कांहीं यात्रांच्या वेळीं घरची मंडळी व इतर गांवकरी लोक त्यांजबरोबर असत. काशीयात्रेला निघाले असतां प्रयागास कांहीं दिवस त्यांचा मुक्काम झाला होता, त्या प्रसंगास अनुलक्षून त्यांनीं पांच श्लोक रचिले ते असे —

**प्रयागराजा पहातां त्रिवेणी । अघें पळालीं सुखरूप प्राणी ।**
**हा माधउ पूजुनियां सुखेसी । आहोंत वाराणशितीर्थवासी ॥**

**विश्वेश्वरु काशिस देवदेव । पाहूं चला सत्वर शीवराव ।**
**भागीरथीदर्शन पुण्यराशी । आहोंत वाराणशितीर्थवासी ॥**

**गयेस गेल्या पितरुरिणासी । मुक्तीस ते पूर्वज विष्णुवासी ।**
**शास्त्रीं असे बोलत निश्चयेंसी । आहोंत० ॥**

**खर्चास द्या लक्षुमि पाहिजे कीं । कुटुंब बावीस मनुष्य हें कीं ।**
**चिंता वसे राघवरायजीसी । आहोंत० ॥**

**हा रोकडा बालकरामजीचा । बुद्धि नसेही नुतनु वयाचा ।**
**इच्छीतसे येक सितावरासी । आहोंत० ॥**

रोकडारामाची कविता फारशी उपलब्ध नाहीं; कांहीं श्लोक, पदें व आरत्या आहेत.

## रामदासस्तव—श्लोक

**कृष्णातिरीं गड असे परळीच नाम ।**
**तेथें निवास करिती अवतार भीम ।**
**तारी समस्त जग पूर्ण करोनि आशा ।**
**हा मस्तकू निजपदीं गुरु रामदासा ॥**

**गुणावेगळा स्वामि पूर्णप्रतापी ।**
**रघूनाथऊपासना भव्यरूपी ।**
**जना उद्धरी रामनामेंचि तोषा ।**
**नमस्कार माझा तया रामदासा ॥**

खरें ज्ञानवैराग्य सामर्थ्य ज्याचें ।
रघूनायकावीण वगत्रुत्व कैंचें ।
असे ग्रंथ हा दासबोधू बरासा ।
नमस्कार माझा तया रामदासा ॥
सदा कीर्तिडंका जयाचा असा हा ।
महाराज योगी न आसक्त तो हा ।
बहू सौख्य आनंदही सर्व शिष्यां ।
नमस्कार माझा तया रामदासा ॥
बहू सांप्रदायासि तां वाढवीलें ।
मोहोछाव देवासि आनंदवीलें ।
उभा रोकडा हात जोडोनि ऐसा ।
नमस्कार माझा तया रामदासा ॥

रोकडाराम हे कारंजा येथें चैत्र वैद्य १३ शके १६८८ रोजीं मुत्यु पावले. त्यांचे अनेक शिष्य होते, त्यांपैकीं विठ्ठल किंकर व माधव यांनीं रोकडारामासंबंधानें कांहीं स्तुतिपर कविता केलेली आहे.

## ६ कल्याण

कल्याण हे समर्थांचे पट्टशिष्य म्हणून प्रसिद्ध आहेत, पण कवि या नात्यानें त्यांची फारशी प्रसिद्धि नाहीं. आणि याचें कारण त्यांची म्हणण्यासारखी कविता उपलब्ध नाहीं हें होय.

भोगूरचे पटवारी कृष्णाजीपंत म्हणून होते, त्यांची स्त्री वारल्यावर त्यांना वैराग्य प्राप्त होऊन ते तीर्थाटणास निघाले. मार्गांत कोल्हापूर येथें महालक्ष्मीच्या देवालयांत त्यांचा मुक्काम झाला. त्या वेळीं बरवाजीपंत या नांवाचे एक गृहस्थ कोल्हापूर येथें सुभेदार होते, त्यांनीं आपली बहीण कृष्णाजीपंतांस देऊन त्यांचा विवाह केला. मुलीचें नांव रखुमाबाई ठेविलें. या दांपत्यास एकंदर तीन अपत्यें झालीं. वडील मुलाचें नांव अंबाजी, दुसऱ्याचें दत्तात्रेय. तिसरी कन्या होती. हीं तीन मुले झाल्यावर

कृष्णाजीपंत तीर्थयात्रेस गेले ते परत आले नाहींत. त्यामुळें त्यांच्या तीन्ही मुलांचें संगोपन त्यांच्या मामानेंच केलें. हीं मुलें दहा बारा वर्षांचीं झालीं असतील तों समर्थांची स्वारी कोल्हापुरास आली. तेथें अंबाजीचें सुंदर हस्ताक्षर पाहून, हा मुलगा आम्हास द्यावा अशी बरवाजीपंतांपाशीं त्यांनीं मागणी केली. पंतांची अनुमति मिळतांच अंबाजी व दत्तात्रेय हे दोन्ही बंधु समर्थांपाशींच राहिले. अंबाजीचें नांव समर्थांनीं पुढें 'कल्याण' असें ठेविलें. कल्याणस्वामींचें एकंदर चरित्र पाहिलें म्हणजे 'गुरुभक्ति' हें त्यांच्या चरित्राचें रहस्य होय हें स्पष्ट दिसतें. समर्थांचे ते लेखक होते. त्यांचा हातचा दासबोध धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केला आहे. डोमगांव येथील मठाचे ते अधिपति होते. समर्थांनीं सज्जनगडावर समाधि घेतली त्या वेळीं कल्याण डोमगांवीं होते. पुढें कल्याणस्वामी प्रतिवर्षी परळीस जात पण गडावर जात नसत. सर्वच सज्जनगड त्यांस गुरुरूप भासे. कल्याणस्वामींच्या चरित्रांतील गुरुनिष्ठेचा शेवटचा चमत्कार म्हणजे असा कीं, श्रीसमर्थांच्या अस्थि चाफळ येथून काशीस नेण्यासाठीं वृंदावनांतून काढण्याची बुद्धि कल्याणशिष्य केशवस्वामीस १६३६ च्या अधिक आषाढ शुद्ध १३ स झाली व त्याच दिवशीं इकडे डोमगांवीं कल्याणांनीं आपला देह ठेविला! केशवस्वामी फार कष्टी झाले. उभयतां गुरुशिष्यांच्या अस्थि एकत्र घेऊन ते काशीस गेले. कल्याणस्वामींनीं समर्थस्तुतिपर लिहिलेलीं कांहीं पद्यें 'समर्थांचा जयजयकार' या सदरांत आरंभींच दिलीं आहेत. कल्याणाचे बंधु **दत्तात्रेय** यांचीही कांहीं कविता डोमगांव मठांत आहे. कल्याणाचे अनेक शिष्य होते व त्यांपैकीं कित्येकांची कविता उपलब्ध आहे.

कल्याणस्वामींचें आणखी एक पद येथें देतों —

**अपराधाच्या कोटी। हेचि माझी खोटी।**
**फेरे फिरलों जन्मकोटी। नीच अविवेकी हीण कोटी ॥ १ ॥**

**शरण आलों श्रीगुरुराया । हा भवनिधि उतराया ।**
**दावीं आपुल्या पायां । हे काया निववाया ॥ ध्रु० ॥**
**विधिहरसुरवर ध्याती । नारद तुंबर गाती ।**
**संतवृंदें गर्जताती । धन्यसद्गुरुमूर्ति ॥ २ ॥**

**न लगे द्रव्यदारा । मज न लगे हा पसारा ।**
**माईक लटिका सारा । घेऊं नेदी उपसारा ॥ ३ ॥**

**बोधमूर्ति अंगिकारी । दास कल्याण हा पुकारी ।**
**नाना परी मी विकारी । परी तुझाचि टेहलकरी ॥ ४ ॥**

कल्याणस्वामींची समाधि डोमगांव येथें आहे. समाधिमंदिरापुढें मुधोबावा ऊर्फ मुद्गलस्वामी यांच्या समाधीचे मंदिर आहे. ही मठपरंपरा ब्रह्मचाऱ्यांची असून तींत आजवर खालील मठपति होऊन गेले —

श्रीरामदास
|
कल्याण (पुण्यतिथि आषाढ शु० ३ शके १६३६)
|
मुधोबावा ( ,, ज्येष्ठ शु० १४ शके १६७१)
|
भिवाजी
|
महारुद्र ( ,, पौष वद्य ७ शके १७३३)
|
हनुमंतबावा ( ,, पौष शु० १५ शके १७८१)
|
अंबादास ( ,, आषाढ शु० १० शके १८२६)
|
पुत्र श्रीराम (विद्यमान शके १८२५)

कल्याणस्वामींच्या मठाखालील पोटमठ बरेच आहेत. **तडवळ्याचा जगन्नाथमहाराजांचा** मठ याच मठाखालील होय. **जगन्नाथमहाराज**

हे कल्याणस्वामींचे शिष्य असून त्यांची कांहीं कविता उपलब्ध आहे. कल्याणनमनाचे त्यांनीं रचलेले चार श्लोक येथें देतों —

**कल्याण होणें जरि तूज आहे। कल्याणपायीं मन स्थीर राहे।**
**कल्याणवाणी पडतां सुकानीं। कल्याण जाले बहुसाल प्राणी ॥ १ ॥**
**अविनाश हें नाम कल्याण ज्यांचें। करी सर्व कल्याण सर्वा जिवांचें।**
**समर्थें जना ऊतरायासि पारीं। अशी ठेविली मूर्ति कल्याणकारी ॥२॥**

**श्रमहरिणितटाकीं स्वामि कल्याण राजा**
**परम दिनदयाळु नांदतो स्वामि माझा।**
**सदय हृदय ज्याचें ध्यान हें आठवीतां।**
**परम सफळ येतो मोक्षकल्याण हातां ॥ ३ ॥**

**बहू मत्तमत्तांतरें दाटि झाली। तयाचे पदीं वृत्ति निवृत्ति ठेली।**
**जगज्जीवनाचा प्रभू जो अनामी। नमस्कार माझा श्रीकल्याणस्वामी ॥४॥**

वरील परंपरेपैकीं मुधोबावा ऊर्फ मुद्गलस्वामी यांचा, शाहूमहाराजांच्या पत्नी सकवारबाई यांस अनुग्रह होता, असें कागदपत्रांवरून दिसतें. महाराणी सकवारबाई यांजकडून कल्याणस्वामीचे पुण्यतिथीस दरसाल २३६५ रुपये येत असत. मठाला उत्पन्न बरें आहे.

**दत्तात्रेयस्वामी** हे कल्याणाचे ज्येष्ठ बंधु. यांचा मठ शिरगांव येथें आहे. चाफळ व शिरगांव यांच्या दरम्यान फक्त एकच डोंगर आडवा आहे. कल्याण व दत्तात्रय हे आपल्या मातुःश्रीसह कोल्हापुराहून समर्थांबरोबर येऊन प्रथम शिरगांवीं राहिले. पुढें दत्तात्रेयस्वामी व मातुश्री यांस शिरगांवीं कायमचे ठेवून कल्याणस्वामी समर्थांबरोबर नेहमीं संचार करीत. श्रीसमर्थांच्या ग्रंथांच्या प्रती करावयाच्या असल्या म्हणजे कल्याणस्वामी ग्रंथ घेऊन शिरगांवास येत व उभयतां बंधु प्रती करीत. कल्याणस्वामी श्रीसमर्थांप्रमाणें ब्रह्मचारी राहिले व दत्तात्रेय वंशधर झाले. त्यांचे वंशज शिरगांवीं आहेत. दत्तात्रेयस्वामींचे पुत्र राघोस्वामी, त्यांचे पुत्र यशवंत व

अनंत. यशवंतस्वामींचे तिघे पुत्र भिमाजी, लक्ष्मण व मनोहर असे होते. **भिमाजी** उर्फ **भीमस्वामी** यांनीं शके १७१९ त 'भक्तलीलामृत' नामक अभंगबद्ध ग्रंथ लिहिला तो छापून प्रसिद्ध झाला आहे. त्यासंबंधानें विशेष माहिती पुढें येईल.

दत्तात्रेयस्वामींची समाधि शिरगांवीं असून त्यांच्या मठाला उत्पन्न चांगलें आहे. ह्याही मठाच्या शाखा पुष्कळ ठिकाणीं पसरलेल्या आहेत. दत्तात्रेयस्वामींची म्हणण्यासारखी काव्यरचना नाहीं. वरील परंपरेंतील लक्ष्मणस्वामी यांचा मठ ग्वालेरीस असून त्यांत दत्तात्रेयस्वामींच्या हातची दासबोधाची प्रत आहे. ग्वालेर मठास शिंदे सरकारकडून वार्षिक ५००० रु. नक्त नेमणूक आहे.

## ७ उद्धवस्वामी

हे श्रीसमर्थांचे अगदीं पहिले शिष्य होत. नाशिक-पंचवटीपासून सुमारें तीन मैलांवर टाकळी नामक गांव आहे तेथें यांचा मठ आहे. गांव अगदीं लहान असून तो नंदिनी नदीच्या कांठीं आहे. तेथून जवळच नंदिनी व गोदावरी यांचा संगम आहे. या संगमोदकांतच बारा वर्षें दररोज सकाळपासून दुपारपर्यंत पाण्यांत उभें राहून समर्थांनीं पुरश्चरण केलें. उद्धवांच्या जन्माची हकीकत पूर्वीं समर्थचरित्रांत दिलीच आहे. त्यांचा जन्म नाशिकनजीक दशकपंचक गांवीं झाला. नंतर आठ वर्षें ते समर्थसान्निध्यांत होते. समर्थ तीर्थयात्रेस जाण्यास निघाले तेव्हां आपणास बरोबर घेऊन जाण्यासाठीं उद्धवांनीं हट्ट घेतला, परंतु समर्थांनीं त्यांची समजूत करून त्यांना तेथेंच ठेविलें. पुढें समर्थ तीर्थयात्रेहून शके १५६६ सालीं कृष्णातीरीं आले तेव्हां शके १५६७ सालीं उद्धवांस त्यांनीं आपल्याजवळ बोलावून नेलें. त्यानंतर ते समर्थसमाधीपर्यंत बराच काल समर्थांच्या सहवासांत होते व समर्थसमाधीनंतरही कांहीं दिवस सज्जनगडीं होते. उद्धवस्वामींनीं एक 'समर्थचरित्र' लिहिलें असल्याचा उल्लेख ग्रंथांतरीं

सांपडतो, परंतु तो ग्रंथ अद्याप उपलब्ध झाला नाहीं. उद्धवस्वामींचा मुख्य मठ मोगलाईत इंदूरबोधन गांवीं आहे. टाकळी व इंदूरबोधन या दोन्ही मठांची परंपरा ब्रह्मचाऱ्याची आहे. टाकळी मठाची परंपरा—उद्धवस्वामी– भीमस्वामी– शिवरामस्वामी– रामचंद्रस्वामी– गोविंदस्वामी–रघुनाथस्वामी–गंगारामस्वामी–नारायणस्वामी ( विद्यमान शके १८५५ ). इंदूरबोधन मठाची परंपरा —उद्धवस्वामी –माधवस्वामी –गोविंदस्वामी–अनंतस्वामी–नरसिंहस्वामी–रामकृष्णस्वामी–रामचंद्रस्वामी– जयरामस्वामी–आत्मारामस्वामी–वामनस्वामी–केशवस्वामी ( विद्यमान शके १८५५ )

उद्धवस्वामींची खरी समाधि टाकळीस आहे, परंतु इंदूरबोधन मठांत नित्यपूजेसाठीं त्यांची एक समाधि बांधली आहे.

उद्धवस्वामींनीं म्हणण्यासारखी काव्यरचना केल्याचें दिसत नाहीं. शिवाजीमहाराजांचें निर्याण झालें त्या वेळीं उद्धवांनीं त्यांच्यासंबंधानें लिहिलेला एक श्लोक मागें दिला असून, ‘ समर्थांचा जयजयकार ’ या प्रकरणांत त्यांच्या एका समर्थस्तुतिपर पद्याचा भाग दिला आहे.

## ८ देवदास

अहमदनगरापासून पूर्वेस १४ कोसांवर दादेगांव असून तेथें देवदासांचा मठ आहे. देवदासांची बरीच मराठी व हिंदी कविता उपलब्ध आहे. रा० शं० श्री० देव लिहितात, “ निजामशाहीची सत्ता डळमळीत करण्यास देवदासांचे प्रयत्न बरेच कारणीभूत झालेले असावेत असें दिसतें. ”. देवदासांना देवरावही म्हणत असत. समर्थांच्या महंतांपैकीं हे एक होत. व्यंकटेशस्तोत्रकर्त्या देवदासांहून हे देवदास निराळे. साडेगांव, जळगांव, गोगलगांव, मांदलमोही वगैरे ठिकाणीं दादेगांव मठाचे पोटमठ आहेत. देवदासांच्या मठाची गादी ब्रह्मचाऱ्यांची असून शिष्यपरंपरा चालत आली आहे ती अशी—

श्रीरामदास
|
देवदास ( पुण्यतिथि माघ व० ३ )
|
कृष्णाजीबुवा
|
जनार्दनबावा
|
दाजीबुवा
|
आत्मारामबावा
|
नारायणबावा ( विद्यमान शके १८२९ )

देवदास हे आपले शिष्य कृष्णाजी यांच्यासह काशीस गेले असतां तेथेंच निधन पावले, अशी माहिती मठपति सांगतात. देवदासांनीं जरी काशी येथें देह ठेविला तरी दादेगांव येथेंच त्यांची समाधि बांधली असून ती गांवापासून एका हांकेच्या अंतरावर आहे. समाधीमागें मारुति आहे. देवदासांनीं समर्थांचें वर्णन खालील पद्यांत केलें आहे—

**समर्थ रामदास हा । उदास दास तो पहा ।**
**जनांत नाकळे स्थिति । मनास नाकळे गति ॥**
**प्रपंच वारिला सळें । विवेक लाधला बळें ।**
**समस्त हेत साधला । रिपू बळेंचि मारिला ॥**
**भला समर्थ दास हा । प्रयोजितांचि या पहा ।**
**उदास वृत्ति फारसी । जनांत वृत्ति गाइसि ॥**
**जनांत रामदास रे । बहुत मान्य त्यास रे ।**
**तया पदींच वास रे । करीत देवदास रे ॥**

संभाजी व राजाराम यांच्या काळीं देवदासांनीं काढलेले त्वेषाचे उद्गार आज जरी महत्त्वाचे नाहींत तरी ते तत्कालीन महाराष्ट्रीयांच्या मनोवृत्तीचे निदर्शक असल्यामुळें त्यांतील कांहीं उद्गार येथें देतों—

## श्लोक

अहा रे अहा तूं मुसलमान वेडा । मशीदींत जाऊनि कां हांक फोडा ॥
हका मारितां ऐकतो काय अल्ला । मुलाना उगा वडवडौंचि मेला ॥
अहा व्यर्थ तुर्का कळेनाचि मूर्खा । तुम्ही पांच वेळां जिकिर्ते करा कां? ॥
नमस्कार कां रे दिशे पश्चिमेसी । तिनीही दिशा ओस झाल्या तुम्हांसी?॥
अरे ऐक तुर्का जिबेका करीतां । जिता जीव तो गाय मारोनि खातां ॥
अम्हांसारिखें अन्नही भक्षितां रे । तरी कां तुम्ही जीवहत्या करा रे ? ॥

देवदासांनीं मुसलमानांस उद्देशून हिंदुस्थानी भाषेंतही कांहीं श्लोक रचिले आहेत —

कही बात येही सही बह्मनोकी । अछीसी भली है रहा बी इनोकी ॥
तुमारा हमारा खुदा येक भाई । कहे देवदासो नहीं बे जुदाई ॥
हमारे गुरूनें अकलसें बताया । निराकार अल्ला मुजोमें मिलाया ॥
तनोमें नियाराम बोसे किया है । कहे देवदासा इलायी सही है ॥

देवदासांच्या अभंगांचा नमुना—

१

वाराणसी क्षेत्र थोर । तेथें लोक जाती फार ॥ १ ॥
परि तेथें अधिक काय । ऐसें विचारोनी पाहें ॥ २ ॥
जेथें तेथें देव धोंडा । तो कां आपुले गांवीं सांडा ॥ ३ ॥
येथें लोक तेथें लोक । अवघें एकचि उदक ॥ ४ ॥
देवदास म्हणे वेडें । तीर्था धांवे अवघ्यांपुढें ॥ ५ ॥

२

दाढी डोई भादरिती । केंस मागुते निघती ॥ १ ॥
शुचिष्मंत जाला कैसा । विवेक पाहाना कां ऐसा ॥ २ ॥
देवासाठीं तीर्था जाती । तरि कां मागुते फिरती ॥ ३ ॥
देवदास म्हणे भ्रम । ज्ञानेवीण अवघा श्रम ॥ ४ ॥

## ९ भीमस्वामी ( तंजावर मठपति )

भीमस्वामी हे मूळ शहापूरचे रहिवासी. शके १५६७ त समर्थांनीं त्यांस शहापूर येथें उपदेश दिला. त्यानंतर बरींच वर्षें भीमस्वामी शहापुरास होते. समर्थ तंजावरास गेले त्या वेळीं व्यंकोजीराजे यांनीं त्यांचा अनुग्रह घेतला व त्यांस तंजावर येथें राहण्याचा आग्रह केला. तेव्हां तेथें समर्थांनीं मठस्थापना केली व आपण तेथें थोडे दिवस राहून भीमस्वामींची तेथील मठांत कायमची योजना केली. शहापुरांत अनुग्रह झाल्यावर भीमस्वामी बरेच दिवस कृष्णातीरीं समर्थसान्निध्यांत होते. समर्थचरण सोडून दूर राहण्याचें त्यांना फार वाईट वाटलें. त्यांना समर्थांचा वियोग असह्य झाल्यामुळें तंजावराहून समर्थांस त्यांनीं एक पत्र पाठविलें, त्यांतील पुढील श्लोकावरून समर्थदर्शनाची त्यांना किती उत्कंठा लागली होती हें दिसून येतें —

**अखंडीत हे वासना भेटि व्हावी।**
**प्रभूपाइंची धूळ माथां पडावी ॥**
**मनींचें मनीं जाणिसी स्वामिराया।**
**किती वाढवूं हा सविस्तार वायां ॥**

या भीमस्वामींच्या पत्रास समर्थांनीं जें उत्तर पाठविलें त्यांत पुढील ओव्या आहेत —

**चित्रकला नाना नाटक। म्हणोनि नामें कर्नाटक।**
**तेथें जे रामउपासक। पत्र त्यांसी ॥**
**तुम्ही पत्र पाठविलें। वाचूनि आश्चर्य वाटलें।**
**परम समाधान जालें। देव जाणे ॥**
**प्रवृत्तीसी पाहिजे राजकारण। निवृत्तीसी पाहिजे विवरण।**
**जेथें अखंड श्रवणमनन। धन्य तो काळ ॥**
**...तुम्हासि प्रपंच आहे कांहीं। आम्हासि तुम्हांवेगळें नाहीं।**
**पत्रदर्शन सर्वही। स्मरणें होतें ॥**

भीमस्वामी प्रापंचिक होते. भीमस्वामींनीं समर्थांचें लघुचरित्र लिहिलें असून तें धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेनें छापून प्रसिद्ध केलें आहे. समर्थांनीं सज्जनगडावर समाधि घेतली त्यानंतर तीनच दिवसांनीं भीमस्वामी तंजावराहून गडावर आले आणि समर्थांचें निर्याण कसें झालें यासंबंधाची इत्थंभूत हकीकत तेथील मंडळीकडून समजून घेऊन तो वृत्तांत ५० ओव्यांत त्यांनीं वर्णन केला. या ओव्या वरील सभेनें प्रसिद्ध केलेल्या श्रीसांप्रदायिक विविध विषय या ग्रंथांत दिल्या आहेत. तंजावरास समर्थ-संप्रदायाचे एकंदर पांच मठ आहेत. भीमस्वामींचा मुख्य मठ, त्यांच्या तीन शिष्यांचे तीन मठ, व अनंतमौनीच्या परंपरेंतील सेतुरामबावांचा एक मठ. भीमस्वामींचे मठांत भीमस्वामींच्या हातचा दासबोध आहे त्याला वस्त्रांचीं अकरा वेष्टनें आहेत. मठांत श्रीसमर्थ व भीमस्वामी यांच्या तसबिरी आहेत. भीमस्वामींची समाधि मठापासून दोन मैलांवर आहे.

श्रीसमर्थ पहिल्यानें मसूर येथें येऊन राहिले त्या वेळीं बाह्यतः ते थोडेसे पिसाटासारखे वागत असत. त्या त्यांच्या वर्तनाचें भीमस्वामींनीं केलेलें वर्णन —

### कडका

**लावी चटक पळे। पाठीं कटक मिळे।**
**धरूनि नेती बळें। पूजिति देती फळें।**
**न भक्षितां जातो सळें। येकायेकीं त्याचि काळें।**
**कृष्णेच्या तीरा आले। पिसें जसें तसें बोले।**
**परीक्षितां मना मिळे। ग्रामवासी बाळें मुलें।**
**त्यांत ब्रह्मानंद खेळे। पदांबुजीं देह गळे।**
**तेचि खूण बरी पूर्ण। पाहोनियां रामध्यान।**
**सतीबाईनें वोळखिलें रे॥**

ही सतीबाई शहापूर येथील कमळाजीपंत नामक गृहस्थांची पत्नी. समर्थांचें खरे स्वरूप या बाईनें पहिल्यानें ओळखलें. या सतीबाईची समर्थांच्या ठायीं किती अनन्यभक्ति होती हें भीमस्वामींच्या पुढील अभंगांवरून ध्यानांत येतें —

**मुख्य भक्तराज मूळारंभ बाई । तिचेनि सर्वही परमार्थ ॥**
**देह पडो झडो आणि मोडो बुडो । परी दास्य घडो अखंडित ॥**
**काया वाचा मन अनन्य शरण । सद्गुरुवचन नुलंघेच ॥**
**ब्रह्मांड पालथें होय कदाचित । बाईचा भावार्थ पालटेना ॥**
**धन्य वंश तुझा धन्य धन्य बाई । मन रामपाईं निरंतर ॥**
**तिचा वंशवृक्ष देवा विस्तारावा । परमार्थ घडावा तिजऐसा ॥**

समर्थप्रेमानें ओथंबलेलें भीमस्वामींचें आणखी एकच पद्य येथें देतों —

**कैं मी पाहेन आतां सद्गुरु समर्था ।**
**निशिदिन चिंतन करतां धणी न पुरे या चित्ता ।**
**तळमळ तळमळ जीव करित अति ।**
**न धरत धीर पळ विकळ अवस्था ॥ ध्रु० ॥**
**तनमन धन गेहो ठावो कारण भावाभावो ।**
**स्वरूपीं सकळहि वावो भेटल्यां सद्गुरुरावो ।**
**चरणकमळीं मस्तक वाहीन ।**
**विलया जाइल जन्मकथा ॥ १ ॥**
**सज्जनगड जो वासी केव्हां जाइन त्यापासीं ।**
**दुर्लभ पादुका दृष्टीसी अवलोकीन अहर्निशीं ।**
**निश्चय हा मज अंतरिंचा परि ।**
**प्रारब्ध कैसें न कळे पाहतां ॥ २ ॥**
**समर्थसमाधि जेथें सुकृति जन बहु तेथें ।**
**सर्वस्व चित्तें वित्तें पूजिती पूर्ण ब्रह्मातें ।**
**धन्य धन्य भाग्यवंत सहवास घडला ।**
**दुर्लभ जाला मज असतां ॥ ३ ॥**

श्रवणीं सद्गुण परिसे निजरूप पैसे ।
सुमनीं तन्मय सरिसें वदनीं कीर्तन विलसे ।
मुनिमनमोहन माझेंहि जीवन ।
करुणार्णवघन भीमवरदाता ॥

## १० त्रिंबकराज

मोगलाईत सुकना नदीच्या तीरीं भालगांव या नांवाचें एक सुंदर खेडें आहे. तेथें समर्थशिष्य त्रिंबकराज यांचा मठ आहे. मठाला तीन हजारांचें उत्पन्न आहे. मठाची परंपरा अशी —




त्रिंबकराजांच्या समाधीचें वृंदावन मठापासून सुमारें एक कोस, एका डोंगरावर आहे. त्रिंबकराज व त्यांचे शिष्य हरिहर यांची थोडीशी कविता मठांत आहे. त्रिंबकराजांच्या कवितेचा नमुना —

### पद

— १ —

हरिकथानिरोपण । श्रवण मनन मन ।
नित्यानित्यविवरण । निजध्यासें समाधान ॥ ध्रु० ॥
सर्व काळ घडे ज्याला । परमार्थ लाभें त्याला ।
आणिक साधन मला । न दिसे कवि वदला ॥ १ ॥
सायोज्यमुक्तीचा हेतु । न सांडिजे हा हो तंतु ।
संतसंगें घ्यावी मातु । तरीच पाविजे प्रांतु ॥ २ ॥
वादवेवाद खोटा । अहंपणें भरे फांटा ।
क्रोध हा संचरे मोठा । त्रिंबक म्हणे धाकुटा ॥ ३ ॥

— २ —

पतितपावन देवा । करावी म्यां तुझी सेवा ।
आवडी लागली जीवा । नावडे आणीक गोवा ॥ ध्रु० ॥
प्रपंच वाटतो फिका । विवेक तोचि तो सखा ।
जनलोकां होतो धका । पाहात जातसे देखा ॥ १ ॥
ऐसें हें जाणतें मन । जाणोनि त्यागिले जन ।
उतावेळ हे नयन । पाहेन तुझे चरण ॥ २ ॥
त्रिंबका अंतरीं येक । तोडीजे संसारदुःख ।
देइं देइं भजनसुख । हेंचि मागतों देख ॥ ३ ॥

त्रिंबकराजांचे शिष्य **हरिहर** यांनीं त्रिंबकराजांवर दोन व समर्थांवर एक अशा तीन आरत्या लिहिल्या आहेत. त्यांनीं समर्थांचें एक लघुचरित्रही लिहिलें आहे, पण त्याचीं कांहीं त्रुटित पत्रें मिळालीं आहेत. त्रिंबकराजांचे **विठा** नामक एक शिष्य होते त्यांनींही त्रिंबकराजांवर एक गोड पद लिहिले आहे.

## ११ शिवराम

या समर्थशिष्याचा मठ तेलंगणांत असल्याचा उल्लेख गिरिधरकृत ‘ समर्थप्रताप ’ ग्रंथांत सांपडतो, पण या मठाचा पत्ता अद्याप लागला नाहीं. इंदूरबोधन मठांत शिवरामस्वामींचीं कांहीं पद्यें सांपडलीं आहेत त्यांतलें डफगाणें या नांवाचें एक सुंदर पद्य येथें देतों —

देवें लग्न केलें नाहीं । म्हणुनी पोर झालें नाहीं ।
पोराचेंही लग्न नाहीं । म्हणउनि बरें ॥ १ ॥
पोर होउनि मेलें नाहीं । सून होउनि मेली नाहीं ।
तीस पोर जालें नाहीं । म्हणउनि बरें ॥ २ ॥
आणि कन्या तीही नाहीं । अथवा विधवा झाली नाहीं ।
तिला पोर झालें नाहीं । म्हणउनि बरें ॥ ३ ॥
पोरालाही पोर नाहीं । पोरासाठीं कर्ज नाहीं ।
कर्जासाठीं व्याज नाहीं । म्हणउनि बरें ॥ ४ ॥
व्याजासाठीं दिवाण नाहीं । दिवाणाचा दंड नाहीं ।
दंडासाठीं मालें नाहीं । म्हणउनि बरें ॥ ५ ॥
माल्यासाठीं विदेश नाहीं । दांत विचकणेंही नाहीं ।
करुनी द्या हो कांहीं नाहीं । म्हणउनि बरें ॥ ६ ॥
मागण्यासाठीं येळीत नाहीं । म्हणउनि प्राण देत नाहीं ।
एकासाठीं एक नाहीं । म्हणउनि बरें ॥ ७ ॥
योगी सर्वस्वी मोकळा । पाहतां त्याची अकळ कळा ।
पाहतां दुनियांहूनि निराळा । सर्वस्वेंसी ॥ ८ ॥
धन्य धन्य महापुरुष । तेच्चि ईश्वराचे अंश ।
शुकासारिखे उदास । म्हणती त्यांसी ॥ ९ ॥
शिवरामा तारिलें । जन्मापासुनि मुक्त केलें ।
भक्त लोक मुक्त केले । रामराजें ॥ १० ॥

## १२ मेरुस्वामी रामदासी

समर्थांचे तंजावराकडील शिष्य अनंत मौनी यांचे शिष्य हे मेरुस्वामी होत. त्यांनीं आपल्या ‘रामसोहळा’ नामक ग्रंथांत स्वतःसंबंधानें जी थोडीशी माहिती दिली आहे ती अशी ——कृष्णातीरीं मेरुलिंग या नांवाचें तीर्थस्थान आहे ती मेरुस्वामींची जन्मभूमी होय. तेथून ‘दैविक गतीनें’ ते फिरत फिरत व तीर्थें करीत पंपासरोवरीं व तेथून मूळबागळ येथें गेले. तेथून नीलगिरीजवळ आल्यावर अरुणाचल गांवीं त्यांची व अनंत मौनींची

गांठ पडली. **अनंत** मौनी हे समर्थानुग्रहीत होते. ते अत्रिगोत्री देशस्थ ब्राह्मण. ते वेदपाठक, वेदान्तवक्ते, षट्शास्त्रज्ञ असे होते. "भव्यरूप प्रसन्नवदन। आजानुबाहो आरक्तनयन। कंबुग्रीवा वक्षस्थळ विशाळ। स्वसुखाचें दोंद वर्तुळ। आटीव सर्वांग सुनीळ। कुळकुळीत तेजें" असें अनंत मौनींचें वर्णन मेरुस्वामींनीं केलें आहे. अनंत मौनी हे अरुणाचल येथें रहात असत; तेथें मेरुस्वामींची व त्यांची गांठ पडल्यावर अनंत मौनी यांनीं मेरुस्वामींस आपल्याजवळ ठेवून घेतलें आणि क्रमशः संप्रदायाचा मार्ग दाखवून चांगला बोध केला. या कामीं अनंत मौनींच्या पत्नीनेंही अत्यंत चांगली कामगिरी केली असा फार कृतज्ञतापूर्वक उल्लेख मेरुस्वामींनीं केला आहे. याप्रमाणें अनंत मौनी व मेरुस्वामी यांचा संबंध जडल्यावर पुढें मेरुस्वामी तीर्थयात्रा करीत दक्षिणद्वारकेस गेले; व त्यांच्यामागोमाग अनंत मौनीही तेथें जाऊन मठ स्थापून राहिले. ही दक्षिणद्वारका म्हणजे मन्यारगुडी नामक गांव होय. या ठिकाणीं मेरुस्वामी गुरूपाशीं कांहीं दिवस राहिल्यावर शके १६१५ त गुरूंनीं अवतार समाप्त केल्यामुळें मन्यारगुडीच्या मठाचें आधिपत्य मेरुस्वामींकडे आलें. मेरुस्वामींनीं हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व तीर्थयात्रा केल्या होत्या. मेरुस्वामींचा जन्ममृत्युकाल उपलब्ध नाहीं.

मेरुस्वामींनीं भीमोपदेश, आत्मसाक्षात्कार, भगवद्गीता, स्वानंदलहरी, § मानसपूजा, अनुभवसार, मेरुबोध, तत्त्वपट, पूर्णामृत, षोडशकळा, रामसोहळा, समर्थाष्टक, श्रीरामपंचरत्न आणि संतमाला असे ग्रंथ लिहिले आहेत. यांपैकीं रामसोहळा आणि भीमोपदेश हे दोन ग्रंथ धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेनें छापून प्रसिद्ध केले आहेत. वरील ग्रंथांशिवाय मेरुस्वामींचीं पदें वगैरे फुटकळ कविता आहे.

---

§ याच नांवाची, रंगनाथ मोगरेकर यांची भगवद्गीतेवरील टीका प्रसिद्ध आहे.

'रामसोहळा' ग्रंथारंभीं जो प्रस्तावनालेख छापला आहे त्याचे लेखक रा० के. ल. ओगले म्हणतात —

" मेरुस्वामींचें संस्कृतग्रंथावलोकन बरेंच असलें पाहिजे असें त्यांच्या ग्रंथांवरून दिसतें. त्याचप्रमाणें ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, दासबोध इत्यादि प्रासादिक मराठी ग्रंथांशींही त्यांचा परिचय असावा हें अगदीं उघड दिसतें. याशिवाय वर्ण्य विषयाशीं तादात्म्य पावून दृष्टांतांच्या मालिकेनें तो विशद करण्याची जी हातोटी ज्ञानेश्वर व एकनाथ यांच्या उपरि-निर्दिष्ट ग्रंथांत दृष्टीस पडते तीच हातोटी मेरुस्वामींच्या ग्रंथांतही दृष्टोत्पत्तीस येते. फरक एवढाच कीं, त्यांच्या लिहिण्यांत पुष्कळ ठिकाणीं अलंकारिक गूढपणा असल्यामुळें त्यांतील मजकूर चटकन् लक्षांत येत नाहीं. मेरुस्वामी हे बरेच अर्वाचीन कवि असतां त्यांच्या कवितेंतजुने मराठी शब्द पुष्कळच सांपडतात. मेरुस्वामींचें भाषाप्रभुत्व व वर्णनप्रभुत्वही चांगलें आहे. योग्य ठिकाणीं योग्य शब्दयोजना त्यांनीं केलेली आहे व त्यामुळेंच कित्येक ठिकाणीं आज अपरिचित वाटणारे शब्द त्यांना योजावे लागलेले दिसतात. एकाच कल्पनेनें नाना ढंग दाखविण्यासाठीं विविध शब्दांचा उपयोग करण्यांत त्यांचें भाषाप्रभुत्व चांगले दिसून येतें. या बाबतींत गीतार्णवकर्ते दासोपंत यांच्याशीं त्यांचें बरेंच साम्य दिसतें.

गुणांबरोबर आधुनिक चिकित्सकांना मेरुस्वामींच्या ग्रंथांत दोषही दिसतील. त्यांत अतिशय पुनरुक्ति, विषयाची वाटेल तशी रचना, क्रमपरंपरेचा अभाव इत्यादि दोष उघड दिसतात.

मेरुस्वामी हे समर्थपरंपरेंतील असल्यामुळें संप्रदायाचें उपास्यदैवत श्रीराम, आद्यगुरु समर्थ आणि स्वतःचे गुरु अनंत मौनी यांचें अत्यंत आदरपूर्वक व भाविकपणें वर्णन मेरुस्वामींनीं केलें आहे तें योग्यच आहे; परंतु समर्थांबरोबर शिवाजीमहाराजांचा एकदांही उल्लेख केलेला नाहीं. इतकेंच नव्हे, तर महाराष्ट्रधर्म व आनंदवनभुवन यांविषयीं जो

एवढा आटोकाट प्रयत्न समर्थांनीं केला त्याबद्दलही मेरुस्वामींनीं अवाक्षर काढलेलें नाहीं.

‘रामसोहळा’ हा ग्रंथ दासबोधापेक्षांही थोडासा मोठा असून त्याची ओवीसंख्या ९४२७ आहे. हा ग्रंथ चरित्रात्मक नाहीं, किंवा एखाद्या विषयाचें विशेष प्रतिपादन करण्याच्या उद्देशानेंही लिहिलेला नाहीं, तर तो एक सर्वसंग्रहात्मक ग्रंथ आहे. त्यांत समर्थांचें चरित्र आलें आहे, वेदांत आला आहे, वर्णाश्रमधर्माच्या स्मृतिविहित आचारांचें वर्णन आलें आहे, ग्रंथकर्त्याच्या तीर्थयात्रांचा वृत्तांत आला आहे. षड्दर्शनांचें सार यांत सांगितलें आहे, तसाच भक्तीचाही खुलासा केला आहे. देवतास्तवन, गुरुवर्णन, मायाप्रभाव, इ० ठरींव विषयांचें नित्यपरिपाठाप्रमाणेंच पण काव्यरसपूर्ण असें दर्शन येथें घडतें. यांतील विविध विषयांच्या विवेचनाला भगवद्गीता, योगवासिष्ठ, उपनिषदें, स्मृति, भागवतादि पुराणें, दासबोधादि सांप्रदायिक प्रासादिक ग्रंथ इत्यादिकांचा अवश्य तेथे आधार घेतलेला आहे. आमची मति या ग्रंथाच्या उद्देशासंबंधानें अशी धांवते कीं, हा ग्रंथ म्हणजे गुरूनें आपल्या शिष्यांना वेळोवेळीं विविध विषयांवर दिलेल्या व्याख्यानांचें व कांहीं किरकोळ टिपणांचें हें एक बाड आहे. संप्रदायाचे प्रमुख ग्रंथ दासबोधादि पूर्वी होतेच. तसे ग्रंथ लिहिण्याचें अर्थात् प्रयोजन नव्हतें. पण स्थानिक गरजा पुरविण्याची त्या त्या पीठाच्या गुरूवर जबाबदारी असल्यामुळें अशा ग्रंथाची निपज होणें जरूर होते. या ग्रंथाचा त्या त्या मठाबाहेर जो मुळींच प्रसार झालेला दिसत नाहीं, याचें झालें तरी त्याचें स्थानविशिष्टत्व हेंच मूळ कारण असलें पाहिजे.”

स्वतः ग्रंथकार आपल्या ग्रंथासंबंधानें काय म्हणतात तें आतां पाहूं.

**“सायुज्यतेचा जिव्हाळा । ग्रंथ अनुभवाचा आगळा ।**
**संभविसी रामसोहळा । रसाळ प्रमेय ॥”**

असें मेरुस्वामींनीं देवाला उद्देशून म्हटलें आहे. ग्रंथांत काय सांगितलें आहे म्हणाल तर—

**“मुख्यें स्वरूपाचा निश्चितार्थ । मायानिरासें होयेजे कृतार्थ ।**
**अन्वयव्यतिरेकें परमार्थ । प्रांजळ केला ॥ ”**

* * * *

**निरोपिलें तत्त्वज्ञान । अभिन्न आत्मज्ञान खुणें ।**
**वेदांतसंमति गहन । वेदवाक्यें ॥**
**साही दर्शनांचीं प्रमेयें । षण्मतांचीं रूपें निश्चयें ।**
**अठरा पुराणें निःसंशय । संमतीसि आलीं ॥**
**अद्वैतबोध गीतार्थ । उपनिषदांचे मथितार्थ ।**
**सकळ तात्पर्यें अनुग्रहार्थ । आलीं गर्भीं ॥**

ग्रंथाचें स्वरूप दोन ओव्यांत ग्रंथकारानें सांगितलें आहे—

**समुद्रावगाहनीं तीर्थें । आतुडती फळे सुकृतार्थ ।**
**तैसा येकचि ग्रंथ सर्वार्थें । संपन्न होय ॥**
**आणि हा अंखडैकरस । ग्रंथ द्राक्षापाक सौरस ।**
**दाशरथी राम हृदयास । होय उद्घाटिता ॥**

रामसोहळ्याचे ११ रुद्र आणि प्रत्येक रुद्राचे ११ उल्लास असे १२१ भाग आहेत. मंगलाचरणानंतर कवीने समर्थचरित्र दिले आहे. समर्थ पंढरीस गेले असतां पांडुरंगानें त्यांना रामरूपानें दर्शन दिलें अशी जी कथा आहे तिचा उल्लेख मेरुस्वामींनीं खालील ओवींत केला आहे—

**“विठ्ठलमूर्तीसी रोकडें । समर्थीं रामचि केलें निवाडें ।**
**औटघटिका रामरूपडें । पाहिलें सर्वत्र ॥ ”**

समर्थ जिकडे जिकडे जात तिकडे तिकडे आपल्या व्यक्तित्वाची छाप समाजावर कशी पाडीत याविषयीं मेरुस्वामी म्हणतात—

**सूर्य जया देशासि गेला । तेउता प्रकाशचि जाला ।**
**प्रकाशघन समर्थकीर्तीला । काय म्हणोनि वर्णावें ! ॥**

मेरुस्वामींनीं समर्थांचा उपदेश स्वतः ऐकिला असावा. ते म्हणतात—

**समर्थकृपाप्रबोधार्कें। अनंत अनुग्रह संपर्कें।**
**बाणलें समाधान तें सुतर्क। तर्कितां तर्कवेना॥**

'रामसोहळा' ग्रंथासंबंधाचें विस्तृत विवेचन सदर ग्रंथास रा० ओगले यांनीं जी ३१ पृष्ठांची मार्मिक प्रस्तावना लिहिली आहे तींत जिज्ञासूंनीं पहावें. प्रस्तुत लेखही याच प्रस्तावनेच्या आधारें लिहिला आहे. आतां रामसोहळा व भीमोपदेश या मेरुस्वामीकृत दोन ग्रंथांतील थोडेसे वेंचे येथें देतों.

मेरुस्वामींच्या वाणीची ओजस्विता आणि त्यांचें वक्तृत्व यांची कांहींशी कल्पना शारदास्तवनाच्या पुढील ओंव्यांवरून वाचकांस होईल—

**अनंत ब्रह्मांडफळाची धात्री। अनंतविधि बोध अधिष्ठात्री।**
**अनंत धृतिकारण धरित्री। प्रसन्न होईं मज॥**
**विस्मरणाचें जन्मस्थान। स्मरणाचें अधिष्ठान।**
**स्मरणविस्मरणातीत जाण। स्वरूप तुझें॥**
**दुजें कैंचे तुजवीण। तुझी तूं अपरोक्ष निर्वाण।**
**हाही निश्चयो प्रमाण। कवणें कीजे॥**
**स्वप्नींच्या मृगजळाचे पूर। तरले निश्चयाचे गिरिवर।**
**काय म्हणोनि साचार। भाविजे कवणें॥**
**तुझीच कृपा सनातन। तरी निवळे तें अर्थज्ञान।**
**परावाचाचि होऊन। प्रबोधिसी॥**
**तूंचि परेचें निजमूळ। अनुग्रहीसी तत्त्व अकळ।**
**स्वरूप अनुभविसी केवळ। सहज स्थितीनें॥**
**मुळींच होसी तूं अमूळ। विशेष बोधें करिसी निर्मूळ।**
**संकल्पाचें सुमनफळ। द्विभाग करिसी॥**
**सद्भाव कर्पूराची पेटी। माजि ज्ञानाची पूर्ण दिवटी।**
**तत्त्वमसीची त्रिपुटी। नुरेचि काळिमा॥**

मायानिशीच्या अंधकारें । दाटलें हृदयाकाश सारें ।
चिदादित्यप्रभा निर्धारें । सूर्योदय केला ॥
भिन्नपणें नमस्कारासि नुरे । अभिन्नप्रत्ययें नमस्कारें ।
तुझाचि मी या निर्धारें । समर्पलों तुज ॥

सद्गुरुस्तुति —

तुझिया कृपेचा महिमा । न कळेचि आगमादिनिगमा ।
तो तूं प्रसन्न होऊनि आम्हा । सांगसी स्वमुखें ॥
आमुच्या सुकृतासि पार नाहीं । जे प्रत्यक्ष जालासि तूं सर्वही ।
तुजवांचूनि नसेचि कांहीं । प्रतीतीच्या बळें ॥
रंकासी राज्यपदवी ये । तयाच्या तोषासि सांगणें काय ।
तैसेपरीच अभिनव होय । अमृतसिंधूचें भरितें ॥
आमुच्या दैवें पार टाकिला । दैवदशेचा योग फळला ।
आजि सभाग्यवंताचा केला । मुगुटमणि ॥
भाग्याचा उदय जाला । सुखें अमृतहोरा वाहिला ।
मनोरथसिद्धीचा उंचावला । कळस आजि ॥
अकळ स्वभावेंचि कळलें । अद्वय प्रतीतीसि आलें ।
अभंग समाधान जालें । सद्गुरुवर्या ॥
वाचेसी फिटली दैन्यदशा । सरली कल्पनेची दुर्दशा ।
देवाधिदेवा आदिपुरुषा । अनुग्रहें तुझ्या ॥

*　*　*　*

सृष्टीचें विचित्र वैभव । दृष्टीवीण जाय सर्व ।
तेविं तुझ्या कृपेविना कांहीं पूर्व । न कळे सर्वथा ॥

इतर सर्व रामदासी कवींपेक्षां मेरुस्वामींचें भाषाप्रभुत्व विशेष आहे यांत संशय नाहीं. कवित्वाचा भागही ध्यांच्या ग्रंथांत आधिक्यानें आढळतो. उपमा, दृष्टांतादि अलंकारांचेंही प्राचुर्य आहे. मेरुस्वामींची एकंदर रचनाशैली रामदासी थाटाची नसून ज्ञानेश्वरी पद्धतीची आहे. पुढील ओव्या पहा —

श्रीराम समर्थ आनंदघन। बोधें वरुषतसे सनातन।
हृद्यभूमिका संपूर्ण। निववली ॥
अकल्पित सुखपडिभरें। वरुषों लागला निर्धारें।
नित्य उद्बोधगजरें। गंभीर गर्जे ॥
चिद्ंबर सुखसागर। तेचि घनवटुनि निरंतर।
सिंधूचि कृपाजलधर। वर्षे आपआपणावरी ॥
चिदंबर होय श्रीराम। अनुभवसिंधु समर्थ परम।
स्वानंद्घन अनुक्रम। अनंत सद्गुरु ॥
आत्मप्रतीति निजजीवन। बोधशुंडा अनुभव सेऊन।
चिदंबरद्शा संपूर्ण। पैसघन धरी ॥
तापत्रयें आहाळले जन। नित्य तळमळती जीवनेंवीण।
मुमुक्षु चातकें मुखें पसरून। करुणा करिती ॥
ऐकोनि ते चातककरुणा। कृपा आली करुणाघना।
अमृतधाराधर जीवना। प्रमाण टाकिलें ॥
अकाळ ज्ञानवृष्टि संपूर्ण। नेणों टाकील सृष्टि बुडवून।
अखंड दंडायमान। धारा सोडिल्या ॥
कृपेचा सुशीतळ वारा। त्रिविध ताप उपशम सारा।
अवचट आनंदाच्या गारा। कोसळती ॥
पर्वतातुल्य नभींहुनी। पडती गारा संख्यात धरणीं।
अहंतेचे वृक्ष मोडोनी। चूर्ण होती ॥
भवभ्रांति महानगरें। गारावृष्टीनें येकसरें।
होतीं नव्हतीं विस्तारें। तळासी जाती ॥
आज्ञानवस्तीचीं कुग्रामें। वायुवेगें विक्रमें।
घरेंचि उडोनि जाति संभ्रमें। झंझावात ऐसा ॥
ऐसा कडकडाट बोधाचा। आवर्त ज्ञानप्रळयींचा।
प्रळयवायु पृथ्वीचा। पद्र उडवी ॥
अभावपर्वत विखरोनि गेले। भवगिरि तैसेचि उरले।
तयांच्या आश्रयें राहिले। भाविक किती ॥

भक्तमयूरें प्रेमळें। पिच्छ उभउनियां सोज्वळें।
सुश्यामवर्ण सकळें। नृत्य करिती॥
स्वानंदघनतुषारें। टाहो फोडिती सुखगजरें।
नाना पक्षी वनचरें। वसती आश्रयें त्या॥
गंभीरगिराकडकडाटें। वैराग्याचा खडक फुटे।
अवचिता झळक लखलखाटे। ज्ञानविद्युद्गर्भे॥
रिचवतसे अखंड पाणी। धारा अनुस्यूत गगनीं।
धरणी बुडाली जीवनीं। संपूर्णतेनें॥

—रुद्र २, उल्लास ४

या ओव्यांवर ज्ञानेश्वरी थाटाची कशी झांक मारते हें सहृदय वाचकांच्या लक्षांत येईलच. मेरुस्वामींनीं एखाद्या पौराणिक आख्यानावर ग्रंथ लिहिला असता तर तो याहून विशेष काव्यप्रचुर आणि हृदयंगम उतरला असता यांत संशय नाहीं.

आतां मेरुस्वामींच्या ‘ श्रीभीमोपदेश ’ या दुसऱ्या मोठ्या ओंवीबद्ध ग्रंथाचें निरीक्षण करूं. हा ग्रंथ ‘ रामसोहळा ’ ग्रंथापेक्षांही सरस आहे. इतकेंच नव्हे, तर जुन्या मराठी वाङ्मयांतल्या प्रमुख व महत्त्वाच्या ग्रंथांत त्याचा समावेश करावा लागेल इतक्या योग्यतेचा तो आहे. मेरुस्वामींचे हे दोन ग्रंथ लक्षपूर्वक पाहिल्यावर, समर्थांच्या पश्चात् त्यांच्या संप्रदायांत मेरुस्वामींच्या तोडीचा विद्वान् कवि झाला नाहीं असें म्हणणें भाग पडतें.

भीमोपदेशाचे १२ सूर्य असून प्रत्येक सूर्यांत १२ कला, म्हणजे एकंदर ग्रंथांत १४४ कला आहेत. ग्रंथांत नाना विषय आणि नाना कथा आल्या आहेत. मुमुक्षुदशा, अद्वैतरामायण, मारुतीचें अभ्यंतर, शतमुखरावणाख्यान, राममारुतिसंवाद, सद्गुरुसहवास, पतितपावनकथा, अध्यात्मज्ञान, भक्तिरहस्य, अद्वैतानुभव, नवविधाभक्ति, संतमहिमा, तत्त्वबोध, निःशब्द असे अनंत विषय या ग्रंथांत मेरुस्वामींनीं विस्तारेंकरून

वर्णिले आहेत. उपमादृष्टांतादि अलंकारांची सर्वत्र रेलचेल आहे. विस्तार-भयास्तव फक्त एकच लहानसा उतारा देतों.

### अज्ञानवर्णन

प्रत्यक्ष असोनि मी नित्यमुक्त । भ्रांतीनें बंधन केलें अयुक्त ।
अज्ञानाचे अभिनव युक्तायुक्त । सुचोंचि नेदिती ॥ ४४ ॥
प्रत्यक्ष जग हें निद्सुरें । स्वरूपीं जागृत नव्हे निर्धारें ।
पडिलें भ्रांतीचें भुररें । बरळे अव्हा सव्हा ॥ ४५ ॥
तें पाहतां भ्रांतिबंधन । दुःखें फुटत अंतःकरण ।
जन्ममरणादि दारुण । दुःखें अनुभविती ॥ ४६ ॥
स्वप्नींचें दुःख जागृती भासे । तैसें हें साक्षत्व पिसें ।
वंध्या कुमाराचें जैसें । संततिजात ॥ ४७ ॥
जात्यंधाची परीक्षा । तैसी हे अज्ञानाची दीक्षा ।
याचि दीक्षेनें प्रत्यक्षा । प्रमाण करीत आले ॥ ४८ ॥
जनदृष्टिसंस्कारें । पूर्वचर्याकृत अपस्मारें ।
अज्ञानसंपर्कविकारें । कांहीं झळंब होय ॥ ४९ ॥
भय उत्पन्न होय सरिसें । निर्भयपण ज्ञान प्रकाशे ।
अद्यापिवरी मज उमसे । हा स्वभाव ॥ ५० ॥
अंधकाराचें प्रबळ । होतां काय करील चक्षुबुबुळ ।
वाठारूनि पाहतां सजळ । होय परि प्रकाशेना ॥ ५१ ॥

* * *

यापरी अज्ञानामुळें । मोहती विचाराचे डोळे ।
सर्वेचि स्वरूपाच्या अनुमेळें । बोध निवळती ॥ ५४ ॥

—सूर्य ७, कला १

## १३ हरिबुवा भोंडवे

ज्यांची शिष्यशाखा मोठी व ग्रंथरचना प्रचंड असतांही ज्यांची विशेष प्रसिद्धि झाली नाहीं अशा संतकवींपैकीं हरिबुवा भोंडवे हे एक होत. हल्लींचे वारकरी आपल्या भजनांत रामदासस्वामींच्या कवितेचा उच्चारही

करीत नाहींत, परंतु हरिबुवा हे रामदाससांप्रदायी असूनही पंढरीचे वारकरी होते. इतकेंच नव्हे, तर त्यांची पालखी अद्यापि प्रतिवर्षी नेमानें पंढरीस जाते व तेथें तिचा उजव्या बाजूचा मान आहे.

हरिबुवांनीं १,६०,००० अभंग रचिले व त्यांतले ६८,००० अभंग अद्याप उपलब्ध आहेत. यांपैकीं ३०० अभंगांत व आपल्या 'ज्ञानसागर' ग्रंथाच्या शेवटच्या अध्यायांत त्यांनीं आपलें चरित्र दिलें आहे तें येणेंप्रमाणें:—

अहमदनगर जिल्ह्यांत पारनेर येथें हरिबुवांचा जन्म शके १६३०च्या सुमारास झाला. हे जातीनें शिंपी असून वैष्णवमताचे होते. यांचें आडनांव भोंडवे. पत्नीचें नांव गोडाई. यांना रखमाबाई व ताराबाई अशा दोन मुली होत्या. रखमाबाईनेंही कांहीं अभंग रचिले आहेत. हरिबुवांच्या वडिलांचें नांव केरेश्वर व आईचें बचाई. गुरुपरंपरा—

१ परमात्मा—२ वसिष्ठ—३ श्रीरामचंद्र—४ श्रीसमर्थ रामदास—५ माधवदास—६ केशवदास—७ पुरुषोत्तम—८ शिवराम—९ हरिबुवा.

हरिबुवांनीं आपले गुरु शिवराम यांचा उल्लेख आपल्या ग्रंथांत पुष्कळ ठिकाणीं केला आहे. पुढील ओव्या पहा:—

**धन्य शिवराम सद्गुरु । हरि तयाचा दास किंकरु ।**
**तयानें उतरिला पैलपारु । भवसागरु तारोनियां ॥**
**शिवरामसद्गुरुकृपेनें । ग्रंथ समाप्तीसी आला जाण ।**
**जे कां करिती श्रवण मनन । निजात्मज्ञान त्यांसी होय ॥**
**आतां असो हें बोलणें । शिवरामकृपें हरि म्हणे ।**
**कळसा आलें निरूपण । श्रोतीं सावधान मनें परिसावें ॥**

हे शिवरामस्वामी टाकळी मठाच्या परंपरेंतले होत. याच मठाचे अनुयायी बालकराम§ व हरिबुवा हे बरोबरच टाकळी मठांत होते, व

§ पूर्वी ज्यांची माहिती दिली आहे त्यांहून हे बालकराम निराळे.

बालकरामाच्या समागमासाठींच हरिबुवा पारनेरहून पुणें जिल्ह्यांतील नारायणगांवीं जाऊन राहिले.

हरिबुवा कीर्तन करीत त्या वेळीं गैबी, संतु ‡ तेली, काशीपतिबुवा, कामराजबुवा, केरेश्वरबुवा, मल्हारबुवा, विठोबा, नथोबा, सदाशिव, खंडोबा व जानबा हे त्यांचे शिष्य त्यांच्यामागें उभे राहून टाळ धरीत. यांत हरिबुवांचे दोन बंधूही होते. हरिबुवा लहानपणापासूनच शिवण-कामावर आपल्या बंधूंसमवेत आपला चरितार्थ चालवीत असत. पुढें कांहीं दिवसांनीं त्यांस भेदिक लावण्या रचण्याचा नाद लागला; परंतु लवकरच हा नाद वाईट असून कलियुगांत भवसागर तरून जाण्यास हरिनाम-स्मरणासारखा सुलभ मार्ग नाहीं ही गोष्ट त्यांच्या लक्षांत येऊन त्यांनीं पंढरीची वारी घेतली व अभंगरचनेस प्रारंभ केला. त्यांनीं आपली वारी कधीं चुकविली नाहीं. वारकरी झाल्यापासून बुवांचें लक्ष शिवणकामाकडे असावें तसें नसे, परंतु भगवत्कृपेनें तें काम त्यांजकडून फार चांगल्या रीतीनें होत असल्यामुळें जहागीरदार व शेटसावकार वगैरे श्रीमंत लोक आपलीं शिलाईचीं कामें बहुधा त्यांजकडेच देत असत. हरिबुवांचा हा उत्कर्ष त्यांच्या शेजारच्या ज्ञातिबंधूंस खपत नसे त्यामुळें ते त्यांना विनाकारण पुष्कळ वेळां त्रास देत असत. परंतु 'निंदा आणि स्तुति। आम्हा समानचि चित्तीं' असें मानणाऱ्या हरिबुवांनीं निंदकांच्या कृत्यांकडे कधीं लक्षही दिलें नाहीं. कुटुंबपोषणापुरतें काम करून इतर वेळांत श्रीहरीचें एकांतभजन करण्यासाठीं पारनेराजवळ पाराशर नामक डोंगर आहे त्यावर हरिबुवा दोन दोन तीन तीन दिवस जाऊन रहात असत. ते डोंगरावर असतां त्यांची पत्नी त्यांचें जेवण तेथें घेऊन जात असे. साधुश्रेष्ठ तुकारामबुवा भंडारा डोंगरावर व श्रीसमर्थ रामदासस्वामी डोंगराच्या घळींत बसून ईश्वराराधन करीत असत हें प्रसिद्धच आहे व

‡ तुकारामबुवांच्या टाळकऱ्यांतले संतु तेली निराळे.

यावरून परमार्थमार्गात एकांतभक्तीचें माहात्म्य विशेष आहे हें सिद्ध होतें. संसार, घरदार सोडून परमार्थसाधनासाठीं रानावनांत जाऊन राहणें हल्लींच्या कांहीं सुशिक्षित लोकांस आक्षेपास्पद वाटतें. परंतु चित्तवृत्ति हातीं येण्यास व मनाची एकाग्रता होण्यास पवित्र नदीकांठ, पर्वतांचीं उत्तुंग शिखरें, अरण्यांतल्या प्रचंड गुहा आणि सत्पुरुषांच्या पदस्पर्शानें पुनीत झालेले भूप्रदेश यांसारखीं अनुकूल स्थळें नाहींत हें सगळ्या साधुसंतांनीं स्वतःच्या अनुभवानें लिहून ठेवलें आहे. आतां, स्वतःच्या उद्धारासाठीं सगळा जन्म रानांत घालविणें निराळें आणि आत्मोद्धार होऊन लोकोद्धार करण्याइतका अधिकार संपादन करण्यासाठीं कांहीं दिवस अरण्यवास स्वीकारणें निराळें हें मात्र लक्षांत ठेवलें पाहिजे.

हरिबुवांचे ग्रंथ पाहिले म्हणजे हे मोठे प्रेमळ हरिभक्त आणि ज्ञानी पुरुष होते ही गोष्ट तत्काळ लक्षांत येऊन त्यांच्यासंबंधानें मनांत मोठी पूज्यबुद्धि उत्पन्न होते. हरिबुवांनीं केलेल्या अद्भुत चमत्कारांच्या पुष्कळ कथा उपलब्ध आहेत, त्यांतली फक्त एकच कथा येथें देतों—

हरिबुवा एकदां पंढरीस असतां, ते कवित्व करतात म्हणून इतर वारकरी त्यांचा द्वेष करूं लागले. एका कुटिल मनुष्यानें तर अशी अफवा उठविली कीं, हरिबुवा पंढरींत अभंग रचून म्हणेल तर त्यास चावडीवर नेऊन कैदेंत ठेवण्यांत येणार आहे. हें वर्तमान गोडाईकडून बुवांस कळतांच ‘मी आजपासून अभंग करणार नाहीं’ असें म्हणून ते राऊळांत गेले व केलेल्या कवित्वाबद्दल पांडुरंगाची त्यांनीं क्षमा मागितली. हरिबुवांची सप्रेम भक्ति व प्रेमळ काव्य पाहून पंढरिनाथ फार संतुष्ट झाले होते; लोकांच्या निंदेस भिऊन हरिबुवांनीं कवित्व करण्याचें सोडून द्यावें ही गोष्ट भगवंतास रुचली नाहीं. म्हणून हरिबुवांना स्वप्नांत दर्शन देऊन “तूं कवित्व करण्याचें सोडूं नकोस” अशी आज्ञा देवानें त्यांस

केली व त्याप्रमाणें हरिबुवांनीं स्वप्नावस्थेंतच पांच अभंग रचून ते देवास म्हणून दाखविले. ते ऐकून पांडुरंगास मोठें समाधान वाटलें. मग तुळसी व बुका हरिबुवांस देऊन पंढरिनाथ म्हणाले, "तुझी कविता प्रासादिक आहे, ती रचण्याचें तूं सोडूं नकोस." बुवांनीं ही आज्ञा शिरसामान्य केली. जागृत झाल्यावर आपला ग्रंथलेखनक्रम चालू ठेवण्याचा त्यांनीं निश्चय केला व पुढें हजारों अभंग रचिले. पारनेरास आल्यावर आतां हें गांव सोडून एखाद्या रम्य तीर्थस्थानीं वास करावा या हेतूनें बुवा जुन्नराजवळ नारायणगांवीं जाऊन राहिले. त्यांचे गुरुबंधु बालकराम हेही तेथेंच रहात होते हें पूर्वीं सांगितलेंच आहे.

हरिबुवांनीं आपल्या अंतकाळीं आपल्या 'ज्ञानसागर' ग्रंथाचा २१ वा अध्याय वाचविला व तुकोबांप्रमाणें आपल्या शिष्यवर्गास उपदेश केला. निर्याणापूर्वीं कित्येक दिवस 'आमची देहावसानाची वेळ जवळ आली' अशी सूचना त्यांनीं आपल्या आप्तेष्टांस दिली होती. शके १६९९ हेमलंबी नाम संवत्सरीं, वैशाख शुद्ध १ गुरुवारीं दोन प्रहरीं बुवांनीं देहत्याग केला. 'गोडाईसहित विमानांत बसून ते श्मशानांत गेले' असें म्हटलें आहे, यावरून त्यांची पत्नी गोडाई हिनें सहगमन केलें असावें असें दिसतें. त्या वेळीं नारायणगांवीं मीना नदीच्या वाळवंटांत हजारों लोक जमले होते व हरिनामाचा गजर सारखा चालू होता. हरिबुवांच्या समाधीचा वरचा चिरा बाळकराम रामदासी यांच्या हातचा आहे. समाधीनंतरही सहा महिन्यांनीं हरिबुवांनीं पारनेर येथील एका भाविक न्हाव्यास दर्शन दिलें होतें. हरिबुवांच्या केंसावर त्या न्हाव्यानें पारनेरास समाधि बांधली. आळंदी येथील अर्वाचीन सत्पुरुष व कै० अण्णासाहेब पटवर्धन यांचे गुरु श्रीनृसिंहसरस्वतीस्वामी हे दोन दोन महिने नारायणगांवीं जाऊन हरिबुवांच्या समाधीपाशीं रहात व त्यांच्या ग्रंथांचें परिशीलन करीत. नृसिंहसरस्वतींची समाधि नारायणगांव येथेंच हरिबुवांच्या समाधीच्या डाव्या बाजूस आहे.

हरिबुवांनीं लिहिलेले ग्रंथ येणेंप्रमाणें —

ज्ञानसागर, ओवीबद्ध, अध्याय २८ ओवीसंख्या १७,३५४
हरिबोध „ „ १८ „ २५९९
पंचीकरण
संसारतोडा
स्वरोदय
स्फुट अभंग, हे सुमारें ६८,००० उपलब्ध आहेत.

हरिबुवांची कविता प्रासादिक, अधिकारसंपन्न व व्याकरणदृष्ट्या प्रायः शुद्ध अशी आहे. हरिबुवांनीं दुसरे कितीही चमत्कार केले असले तरी ज्ञानसागरासारखा महत्त्वाचा अध्यात्मग्रंथ त्यांनीं रचिला हा सर्वांत मोठा चमत्कार होय. ज्ञानसागर ग्रंथांत अध्यात्मविद्येचें व योगशास्त्राचें विवेचन इतक्या उत्तम प्रकारें केलें आहे कीं, हा ग्रंथ छापून प्रसिद्ध न होतां कालांतरानें नष्ट झाला तर पारमार्थिक महाराष्ट्रवाङ्मयाची मोठी हानि होईल. ज्ञानसागर हा ग्रंथ हरिबुवांनीं केवळ गुरुप्रसादप्राप्त स्वानुभवानेंच लिहिला आहे. येरवीं, ते मोठे व्युत्पन्न होते असें दिसत नाहीं. त्यांचे सर्व ग्रंथ स्वयंस्फूर्तीनें रचलेले आहेत. 'माझ्या तोंडून देव हें सगळें वदवितो' असें त्यांनीं पुनः पुनः सांगितलें आहे. हें त्यांचे सर्व वाङ्मय नारायणगांवीं यांच्या वंशजांपाशीं आहे.

हरिबोध ग्रंथ दासबोधाच्या पद्धतीवर गुरुशिष्यसंवादरूपानें लिहिला आहे. बुवांचे हे ग्रंथ त्यांच्या सांप्रदायी लोकांतच प्रसिद्ध आहेत, इतरत्र त्यांची फारशी प्रसिद्धि नाहीं. हरिबुवांनीं ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, व तुकाराम-रामदासांची कविता पुष्कळ वेळां लक्षपूर्वक वाचून आत्मसात् केली होती असें त्यांच्या ग्रंथांवरून दिसतें. त्यांच्या ग्रंथांतल्या कित्येक उपमा ज्ञानेश्वरींतल्या व दासबोधांतल्या उपमाशीं अगदीं सदृश आहेत. ज्ञानसागर हा ग्रंथ अध्यात्मज्ञानानें आणि नाना प्रकारच्या उपमादृष्टांतांनीं भरलेला

आहे. १९ व्या अध्यायांत दिवसाची रात्र आणि रात्रीचा दिवस करून दिवसा फिरणाऱ्या लोकांस चोर समजून सुळावर चढविणाऱ्या बेबंद राजाची गोष्ट दिली आहे ती फार मनोरंजक व बोधप्रद आहे. ज्ञानसागर ग्रंथ पारनेर येथें शके १६९५ ( इ० स० १७७३ ) विजयनाम संवत्सरीं मार्गशीर्ष वद्य ११ शुक्रवार या दिवशीं पुरा झाला. त्याच्या शेवटच्या अध्यायांत हरिबुवांनीं आपल्या वंशाचा वृत्तांत दिला आहे. त्यावरून असें दिसतें कीं, हरिबोध ग्रंथ शके १६९० त पुरा झाल्यावर भगवदाज्ञेनें ज्ञानसागर ग्रंथ हरिबुवांनीं लिहिला. हरिबुवांनीं आपला व आपल्या पत्नीचा उल्लेख 'हरि' आणि 'हरीची गोडी' ह्या शब्दांनीं केला आहे. स्त्रीपुरुष हा भेद देहांचा आहे पण अंतरंग एकच आहे, त्याची ताटातूट होऊं शकत नाहीं, अशी स्त्रीपुरुषसमता बुवांनीं प्रस्थापित केली आहे.

महीपति, निरंजनमाधव, अमृतराय, मोरोपंत, देवनाथ, सोहिरोबा, शिवदिन केसरी हे संतकवि हरिबुवांचे समकालीन होत.

ज्ञानसागर ग्रंथारंभीं हरिबुवांनीं गणेशस्तवन न करितां एकदम परब्रह्म पुराणपुरुषाचेंच आवाहन केलें आहे—

**जयजया जी निर्गुण निराकारा । तूंचि परात्पर सोयरा ।**
**अक्षयपदींचिया दातारा । चिदंबरा विलासिया ॥**
**क्षयातीत तूं निर्गुण । निश्चळ निर्मळ तूं पूर्ण ।**
**सर्वांठायीं चैतन्यघन । व्यापुनी त्रिभुवन नांदसी ॥**
**तुजसी नाहीं मूळ ना डाळ । कैंचे जाति वर्ण कुळ ।**
**तुजवांचूनि रितें स्थळ । अळुमाळ असेना ॥**
**कांहीं नाहीं तें तुझें रूप । तेंचि म्हणावें स्वरूप ।**
**निखळ कोंदाटलें अमूप । पुण्यपाप ज्यासि नाहीं ॥**
**जेव्हां कांहींच नव्हतें । तेव्हां तुझें रूप होतें ।**
**स्वयंभू संचलें आइतें । परात्पर तें निजरूप ॥**

तुझी अघटित करणी । नव्हतीं आकाश धरणी ।
नव्हतीं तेज पवन पाणी । चारी खाणी त्या कैंच्या ॥
चंद्र सूर्य नव्हते दोन । कैंचे तेथ तारागण ।
ग्रह नक्षत्रांचें प्रमाण । न दिसे जाण कोठेंही ॥
अवघा होता धुमधुमकार । नव्हता ब्रह्मा हरिहर ।
कैंचें तेथ चराचर । नाहीं आधार म्हणोनी ॥
नव्हते सप्तही सागर । कैंचा मेरु आणि मांदार ।
कैंचे गिरि पर्वत थोर । धरेसी आधार नव्हता ॥
पदार्थमात्र जें जें कांहीं । तुजवांचूनि जालेंचि नाहीं ।
तूंचि होउनि सर्व देहीं । नांदसी पाहीं अभिन्नत्वें ॥
तुझे रूपीं सकल देव राहती । ब्रह्मा विष्णु उमापति ।
असंख्यात होती जाती । न करवे गणती तयांची ॥
अनंत ब्रह्मांड रचती खचती । कल्पांतही होती जाती ।
तुझें स्वरूप अपरिमिति । आदिअंतीं नाशेना ॥
बीजापोटीं वृक्ष असे । वृक्षबीज वेगळें नसे ।
तैसे जग आणि जगदीश । एकचि असे सर्वां ठायीं ॥

संतस्तवन—

तैसे तुम्ही संतसाधुजन । माझे मनोरथ पुरवून ।
म्हणोनि तुम्हांसि आलों शरण । अभयदान द्यावें मज ॥
द्यावा प्रसाद आपुला । उच्छिष्टाचा वांटा मजला ।
थोर अथवा धाकला । पाहिजे केला संभाळ ॥
द्यावा उच्छिष्टाचा वांटा । लहान अथवा मोठा ।
तुमचा चाकर मी धाकुटा । झाडितों वाटा संतांच्या ॥
तुमची जे कां चरणधुळी । तीर्थें म्हणोनि मी करितों आंघोळी ।
तुमचे मोचे वाहें शिरकमळीं । कदाकाळीं विसंबेना ॥
जालों संतांचा चाकर । म्हणवीतसें वाहनधर ।
म्हणोनि केला अंगिकार । अभयवर दीधला ॥

भक्तिमार्गाचें सौलभ्य हरिबुवा वर्णितात —

नवविधा भक्तीचीं लक्षणें । एकापरीस एक गौण ।
भक्ति करितां जोडे भगवान । सुलभ साधन सांगतों आतां ॥
भक्ति करितां देव जोडे । भक्ति करितां परमार्थ घडे ।
भक्ति करितां निवारे सांकडें । बंधन रोकडें तुटोनि जाय ॥
भक्तीवांचोनि नाहीं गति । भक्तीवांचोन न होय मुक्ति ।
भक्तिवांचून नाहीं विश्रांति । परमप्राप्ति भक्ति केल्या ॥
भक्तियोगें मोक्ष जोडे । भक्तिस्तव माया विघडे ।
भक्ति करितां वैकुंठीं चढे । पद जोडे सायुज्यता ॥
भक्ति करितां सद्गुरु प्रसन्न । प्राप्त होय ब्रह्मज्ञान ।
न राहेचि संसारभान । ऐसें महिमान भक्तीचें ॥
भक्ति करितां विरक्ति बाणे । शांति प्रगटे येऊनि आपण ।
हृदयमंदिरीं बैसे ठाणें । नांदती येऊन क्षमा दया ॥
म्हणोनि भक्तिध्वज उभारा । लावा वैकुंठीं फरारा ।
वाचे हरिनाम उच्चारा । कीर्तन करा निशिदिनीं ॥
शुद्ध करोनियां मन । करावें श्रवण मनन ।
मग जाय निदिध्यास लागून । प्रगटे आपण साक्षात्कार ॥
भावें विश्वास धरोनि मनीं । अखंड गर्जावें नामकीर्तनीं ।
लागावें संतांचे चरणीं । तरी चक्रपाणि कृपा करी ॥

ज्ञानसागराच्या शेवटच्या अध्यायांत आपल्या वंशाचा वृत्तांत हरिबुवांनीं दिला आहे तो येणेंप्रमाणें—

नामा शिंपी याची कुळी । तेचि आमुची वंशावळी ।
विठ्ठल-रुक्मिणी मायबाप समूळीं । ऐका वेगळीं नामाभिधानें ॥
आजा पंजा बाप माय । नातू पंतू उणा काय ।
एकचि भगवंत अद्वय । परी मायामय सांगणें लागे ॥
पहा ते आजापंजापासून । हरिभक्तीचीं लक्षणें ।
करिती भगवंताचें नामस्मरण । कथाकीर्तन सर्वकाळ ॥
करिती पंढरीची वारी । असोनि घराश्रमी संसारी ।
टाळ दिंडी पताका वीणे घरीं । शोभे द्वारीं तुळशीवृंदावन ॥

**भक्तीचा तोडा मूळींहूनि असे । म्हणविती हरिचे दास ।**
**परंपरा ऐसाचि वंश । जगदीशें चालविला ॥**
**बापें नाहीं सोडिली पंढरी । म्हणवी विठोबाचा वारकरी ।**
**नित्यकाळ कथाकीर्तन करी । उल्हास अंतरीं धरोनियां ॥**
**त्याचे पोटीं जन्म झाला । पूर्वठेवा फळासि आला ।**
**म्हणोनि संतसंग घडला । भगवंत जोडला अविनाश ॥**

× × × ×

**व्हावा ब्रह्मज्ञानी गुंडा । ज्याचा तिहीं लोकीं झेंडा ।**
**ऐक्यपणें पिंड–ब्रह्मांडा । नातळे बंडा मायेच्या हो ॥**

ही शेवटली ओवी आणि 'पुत्र व्हावा ऐसा गुंडा । ज्याचा तिहीं लोकीं झेंडा' हा तुकोबांचा अभंग यांचें साम्य वाचकांच्या लक्षांत येईलच. हरिबुवांचे वडील केरेश्वर हे मोठे हरिभक्त होते, तेव्हां त्यांच्या पोटीं हरिबुवांसारखा ब्रह्मज्ञानी गुंडा निपजला यांत कांहीं आश्चर्य नाहीं. वंशशुद्धि आणि परंपरा यांचें महत्त्व असल्या उदाहरणांरून सिद्ध होतें.

आळंदीक्षेत्राचा उल्लेख करतांना हरिबुवा म्हणतात—

**गांवापासोनियां दुरी । सप्तयोजनें असे तरी ।**
**नैऋत्य कोणीं अळंकापुरी । इंद्रायणीचे तीरीं वसलीसे ॥**
**तचि ज्ञानराजाचें नगर । अजानवृक्ष दारासमोर ।**
**चक्रतीर्थ पुण्यपवित्र । यात्रा भरे कार्तिक एकादशी ॥**
**अनन्य भावेंसी पैं जाण । तया ज्ञानेश्वरा माझें नमन ।**
**साष्टांग करकमळ जोडून । दास दीन म्हणवीतसें ॥**

हरिबुवांचे अभंगही फार प्रासादिक आणि बोधप्रद आहेत. पुढील अभंग पहा —

१

**उंबरांत जीव जाण । म्हणती आमुचें त्रिभुवन ॥ १ ॥**
**ऐसी परी जाली ज्यासी । ज्ञान कळेना तयासी ॥ २ ॥**
**केळ टाकूनियां दूर । हातीं घेतलें गाजर ॥ ३ ॥**

ऐसे ठकले बहुत । नकळे भगवंताचा अंत ॥ ४ ॥
सोनें असोनी पदरीं । भीक मागे दारोदारीं ॥ ५ ॥
स्वतःसिद्ध मोक्ष आहे । भ्रांतीमुळें बद्ध होय ॥ ६ ॥
गुरुकृपेचा नवलावो । हरि म्हणे भेटवी देवो ॥ ७ ॥

२

करोनि दळभार राजा चालियेला। डाव जो मांडिला बुद्धिबळाचा ॥१॥
हत्ती आणि घोडा उंट चालविला । फर्जी मारविला प्याद्याहातीं ॥ २ ॥
काष्ठा तंव काय असे भिन्नभेद । पूर्वकर्म शुद्ध काय तया ॥ ३ ॥
तैसा बंध मोक्ष लटका संसार । असोनि साचार ब्रह्मरूप ॥ ४ ॥
डाव जिंकोनियां लावियेली मात । मृगजळाआंत कोण भिजे ॥ ५ ॥
हरि म्हणे वर्म सांपडलें हातीं । धन्य तेचि होती खेळणार ॥ ६ ॥

३

मेलें मेलें म्हणती काय त्याचें मेलें । असे तें संचलें स्वतःसिद्ध ॥ १ ॥
तरि कां चंचळत्व अचेतन जाला । व्यापार राहिला इंद्रियांचा ॥ २ ॥
आयुष्याचें उदक आटोनियां गेलें । मग दिसों राहिलें सूर्यबिंब ॥ ३ ॥
सूर्य रश्मिकळा न होय वेगळी। तैसी वस्तु चाली प्राणालागीं ॥ ४ ॥
हरि म्हणे प्राण आकाशीं मिळाला । आत्मा विसांवला मूळ ठायां ॥ ५ ॥

४

मोक्ष नाहीं मुक्ति नाहीं नाहीं प्राचीन ।
काळ वेळ कांहीं नाहीं नाहीं जन्ममरण ॥ १ ॥
पाप नाहीं पुण्य नाहीं नाहीं स्वर्ग नरक ।
यम नाहीं दूत नाहीं नाहीं कुंभिपाक ॥ २ ॥
काम नाहीं क्रोध नाहीं नाहीं माया बंड ।
दृश्य हें कांहीं नाहीं लटकें थोतांड ॥ ३ ॥
लोभ नाहीं दंभ नाहीं नाहीं अलंकार ।
कांहीं नाहीं तेंचि आहे ब्रह्म निर्विकार ॥ ४ ॥
कांहीं नाहीं कांहीं तेंचि शोधुनियां पाहें ।
हरि म्हणे कांहीं नाहीं तेंचि होउनियां राहें ॥ ५ ॥

५

**न दिसे संसार अवघेंचि ब्रह्म । सांडीं मायाभ्रम विषयांचा ॥ १ ॥**
**तरंग समुद्रीं जैशा जललहरी । विरालिया तरी सिंधु होय ॥ २ ॥**
**ब्रह्मापासोनियां विश्व अवघें जालें । ब्रह्मींच मिळालें ब्रह्मपणीं ॥ ३ ॥**
**आपणचि एक दुजा नाहीं कोणी । अवघा जनीं वनीं एक आत्मा ॥ ४ ॥**
**आपणचि विश्व आपणचि ब्रह्म । हरि म्हणे वर्म कळलिया ॥ ५ ॥**

## १४ राघवस्वामी रामदासी शिरगांवकर

कल्याणस्वामींचे बंधु दत्तात्रेयस्वामी यांचे हे राघवस्वामी पुत्र होत. यांचा व्रतबंध श्रीसमर्थांच्या अंकीं झाल्याचा उल्लेख सांपडतो. हे मोठे वैराग्यशील व ब्रह्मसाक्षात्कारी होते. त्यांच्या शिरगांव मठांत अतिथि-अभ्यागतांचा मोठा खर्च पाहून शाहूमहाराजांनीं त्यांना दोन गांव इनाम देऊं केले; पण श्रीसमर्थांनीं आपणास २०५ गांवांची ( मनाच्या श्लोकांची ) झोळी दिली आहे असें म्हणून त्यांनीं सनद परत केली. माघ शु० २ वृष संवत्सर, शके १६८३ रोजीं यांचें देहावसान झालें. यांची फुटकळ कविता बरीच आहे.

पद

**भावें भजतां भीम मदनारी ॥ ध्रु० ॥**
**मायाजाळीं तारी भवभ्रम हारी ।**
**निरूपण करितां मंदवारीं ॥ १ ॥**
**अंतरनिष्ठा वरीं बहु प्रेम करीं ।**
**हरि भेटवि कोदंडधारी ॥ २ ॥**
**आठविल्या सारी भग्न विघ्नकोटि ।**
**राघव वंदितो दीनोद्धारी ॥ ३ ॥**

'सुंदरानना पिंगलोचना' हें सुप्रसिद्ध भीम-अष्टक याच राघवस्वामींचें होय. 'साक्ष बाणली राघवा मना । हे दयानिधे वायुनंदना' हा त्या अष्टकाचा शेवटचा चरण आहे.

## १५ भीमस्वामी ऊर्फ भीमाजीबावा शिरगांवकर

कल्याणस्वामींचे बंधु दत्तात्रेयस्वामी यांचे हे पणतू होत. यांची परंपरा अशी —

दत्तात्रेयस्वामी
|
राघवस्वामी
|
यशवंतस्वामी
|
भीमस्वामी ऊर्फ भीमाजीबावा

हे शिरगांवचे मठपति होते. याहून यांची विशेष माहिती उपलब्ध नाहीं. यांनीं 'भक्तलीलामृत' या नांवाचा एक बराच मोठा अभंगवृत्तात्मक ग्रंथ रचिला असून त्यांत, त्या वेळेपर्यंत होऊन गेलेल्या सुमारें ४० सत्पुरुषांच्या आख्यायिका दिल्या आहेत. आरंभींच समर्थांचें चरित्र १२१ अभंगांत दिलें असून पुढें कल्याणस्वामी, दत्तात्रेयस्वामी, राघवस्वामी, यशवंतस्वामी, भानुदास, एकनाथ, वामन, केशवस्वामी, निरंजनस्वामी, आनंदमूर्ति, मालोपंत, उद्धवचिद्घन, नामदेव, तुकाराम, संतोबा पवार, माणकोजी बोधले, अनंत दामोदरदेव, महामुद्गलभट, अंबाबाई, जनाबाई, रामभट पोळे, निपट निरंजन, मच्छिंद्रनाथ, परिसा भागवत, सांवता माळी, गोरा कुंभार, जन जसवंत, कृष्णाजीपंत, अर्जुन, जगमैत्र नागा, नरसिंह सरस्वती, जोगा परमानंद, मध्वमुनीश्वर, अमृतराय, वडवाळसिद्ध नागेश, शमनामीर पीर, व चोखामेळा इतक्या संतांची त्रोटक माहिती दिली आहे. कालक्रम मुळींच नाहीं. महीपतींचे संतचरित्रविषयक ग्रंथ भीमस्वामींनीं पाहिल्याचें दिसत नाहीं व भीमस्वामींचा हा ग्रंथ महीपतींच्याही अवलोकनांत आल्याचें दिसत नाहीं. महीपतींचा

'भक्तलीलामृत' याच नांवाचा मोठा ओंवीबद्ध ग्रंथ आहे तो जर भीमस्वामींनीं पाहिलेला असता तर तेंच त्यांनीं नांव आपल्या ग्रंथास ठेवलें नसतें.

भीमस्वामींच्या ग्रंथाची रचना अगदीं सामान्य प्रतीची आहे. विद्वत्त्व किंवा कवित्व त्यांत फारसें नाहीं. मात्र, महीपतींच्या ग्रंथांत न आलेल्या कांहीं संतकथा यांत सांपडतात. हा ग्रंथ शके १७२० च्या सुमारास भीमस्वामींनीं लिहिला. नमुन्यादाखल त्यांतले दोन तीन अभंग उद्धृत करितों.

१

एके दिसीं स्वामी तारळखोऱ्यांत । गेले अकस्मात आनंदानें ॥
कोंकणींचे शूद्र सांगती स्वामीसी । घळ आपणासी आहे तेथें ॥
परी पंचानन व्याघ्र आहे तेथ । तये स्थानीं जात नाहीं कोणी ॥
दत्तोबासी तेव्हां बोलिले वचन । जाऊन तें स्थान पाहा आधीं ॥
व्याघ्रासी आमुचा सांगावा निरोप । स्थान द्यावें कोप सांडूनियां ॥
तेथें आम्ही स्नानसंध्या करूं ऐसी । इच्छा हे मानसीं जाली आहे ॥
आज्ञा वंदोनियां गेले भीत भीत । तंव त्या घळींत व्याघ्र होता ॥
भयाभीत तया निरोप सांगती । नेत्र हे झांकिती बैसोनियां ॥
गर्जना करूनी गेला निघोनियां । स्वामी तया ठाया आले मग ॥
कांहीं येक दिवस तेथेंचि राहिले । पुन्हां जाते जाले चांफळासी ॥
अद्यापि घळींत व्याघ्र नाहीं येत । ऐसी केली ख्यात भीम म्हणे ॥

२

तुकाराम येक्या गांवीं गेले होते । भजन करीत अहर्निशीं ॥
तेथें एक संत मोठे दंभधारी । देवार्चन भारी होतें त्यांचें ॥
माळा मुद्रा सोंग बहुत पाहोन । जाले शिष्य जाण सर्व जन ॥
त्यांच्या दर्शनासी आले तुकाराम । अंतरीं निष्काम पुढें उभे ॥
त्यानें तोंडावरी घेवोनियां वस्त्र । ध्यान हें तत्पर करिताहे ॥
मनामध्यें म्हणती गांव शिष्य जाला । इनाम सर्वांला मागूं जातां ॥

तयामध्यें ऊंस लावितां पिकेल । गूळही होईल बहुतचि ॥
परी एक ऊंस धर्म करूं नये । ऐसें मनीं होय कल्पनेसी ॥
नेत्र उघडितां यांनीं नमन केलें । त्यांनींही पुसिलें केव्हां आलां ॥
ऊंस न जायचि एकही धर्मासी । आलों त्या संधीसी दर्शनासी ॥
ऐसें ऐकतांचि घाली लोटांगण । म्हणे नारायण दुजा नाहीं ॥
तयासही बोध करून केला भक्त । महिमा अद्भुत भीम म्हणे ॥

३

येकनाथस्वामीपाशीं शिष्य येक । येवोनियां देख पूजा केली ॥
अपूर्व मंदील दिधला तयानें । मस्तकीं बांधोन भावयुक्त ॥
गांवाच्या बाहेर गेले शौच्या तेथें । आडावरी होतें श्वान येक ॥
तृषाक्रांत जालें स्वामींनीं पाहिलें । मंदील बांधिलें तांब्यालागीं ॥
न पुरे म्हणोनि मध्येंच फाडिती । उदक काढिती आडांतूनी ॥
उताणें पाडोनि पोट खोलावोनी । पाजोनियां पाणी स्वस्थ केलें ॥
ऐसे दयावंत मंदील फाडीत । आत्माच्च पाहात भीम म्हणे ॥

रामदास संप्रदायाशिवाय, इतर संप्रदायांत होऊन गेलेल्या संतांचींही चरित्रें भीमस्वामींनीं गायिलीं आहेत. यावरून त्यांना स्वसंप्रदायाचा दुरभिमान व इतर संप्रदायांविषयीं तुच्छता बिलकुल वाटत नव्हती हें उघड दिसतें.

## १६ उद्धवसुत

हे एक समर्थांचे चरित्रकार होत. यांनीं लिहिलेलें ओंवीबद्ध रामदास-चरित्र इ. स. १८९१ त कै० बाबाजी अनंत तेंडोलकर यांनीं छापून प्रसिद्ध केलें आहे. हे कोणत्या कालीं होऊन गेले हें समजण्यास कांहीं साधन उपलब्ध नाहीं. परंतु यांच्या रामदासचरित्राचा अंदाजी लेखनकाल श्री० देव यांनीं 'शके १६९६ च्या पूर्वी' असा दिला आहे.

उद्धवसुतांनीं सदर ग्रंथाच्या ५० व्या व ५१ व्या अध्यायांत थोडेंसें आत्मचरित्र दिलें आहे तें असे—उद्धवसुतांचे पितामह त्र्यंबकपंत हे

मल्हारी मार्तंडाचे मोठे भक्त होते. त्यांना एक मुलगा झाला त्याचें नांव मल्हारी. सातव्या वर्षी त्याचें मौजीबंधन होऊन पुढें लवकरच लग्नही झालें. एका मुसलमानी राज्यांत तो एका व्यापाऱ्याचा कारकून होता. पुढें त्याला वैराग्य उत्पन्न झालें, तेव्हां त्यानें आईबापांपाशीं तीर्थयात्रेस जाण्याची आज्ञा मागितली. तरुण बायको घरांत आहे तिला टाकून तीर्थयात्रेस जाणें योग्य नव्हे असें वडिलांनीं सांगितलें, परंतु त्यांचें न ऐकतां मल्हारी निघाला आणि घोडेगांवीं आला. तेथें त्रिरात्र राहून त्यानें ब्राह्मणसंतर्पण केलें व पुढें भीमातीरीं पेडगांव येथें जाऊन वास्तव्य केलें. तेथें समर्थ-शिष्यांचा मेळा भिक्षेस आला होता त्याच्यासमवेत मल्हारी सज्जनगडावर गेला व तेथें त्यानें श्रीसमर्थांचें दर्शन घेतलें. त्यांनीं त्याच्या नांवागांवाची चौकशी केली तेव्हां त्यानें सांगितलें कीं, "मी वऱ्हाडांतील सुर्जी अंजन-गांवचा रहिवासी." पुढें मल्हारी समर्थांच्या सहवासांत बरेच दिवस राहिला. नित्य ग्रंथश्रवणाच्या योगानें त्याचें वैराग्य वाढत चाललें. पुढें एके दिवशीं त्यानें आपणास उपदेश देण्याविषयीं समर्थांस विनंति केली. तेव्हां स्वामींनीं विचारलें, "तुझीं कोण कोण माणसें आहेत?" मल्हारीनें सांगितलें, "माझे येथें कोणी नाहीं; मी एकटाच आहें." स्वामी म्हणाले, "तूं अगदीं तरुण दिसतोस. तुझे आईबाप, भाऊ, घरीं तुझी काळजी करीत असतील." हा म्हणाला, "माझे कोणीच नातेवाईक नाहींत. माझें नांव मल्हारी. गोत्र अत्री." हें ऐकून समर्थांनीं त्याला उपदेश दिला.

इकडे त्याचे आईबाप त्याच्या शोधास निघाले. घोडेगांवीं आल्यावर, तेथें त्यांना समजलें कीं, मल्हारी पेडगांवास गेला. तेव्हां तीं पेडगांवांस आलीं. तेथील लोकांनीं त्यांना मल्हारी सज्जनगडावर गेल्याचें सांगितलें. तेव्हां त्यांनीं सज्जनगडास येऊन समर्थांचें दर्शन घेतलें. तेथें पुष्कळ शिष्य होते, त्यांत त्यांना मल्हारी कोठें दिसेना. समर्थांनीं त्यांची विचार-पूस केली तेव्हां त्यांनीं आपला सर्व वृत्तांत त्यांस सांगितला व आमचा

मुलगा मल्हारी हा आपल्यापाशीं येऊन राहिला आहे असें समजल्यावरून आम्ही आलों आहों असेंही सांगितलें. तेव्हां समर्थांनीं मल्हारीस बोलावून आणलें व आपले कोणी नातेवाईक नाहींत असें त्यानें खोटेंच सांगितल्याबद्दल त्याला शासन केलें. पुढें समर्थांच्या आज्ञेवरून मल्हारपंत आईबापांबरोबर आपल्या गांवीं आले व घरसंसार पाहूं लागले. कांहीं दिवसांनीं त्यांना एक पुत्र झाला त्याचें नांव त्यांनीं 'उद्धव' ठेवलें. पुत्र झाल्यावर, समर्थदर्शनास जाण्याची मल्हारपंतांस मोठी उत्कंठा लागली, परंतु इतक्यांत त्यांना समर्थ समाधिस्थ झाल्याचें कळलें. तेव्हां अतिशय दुःखित होऊन ते काशीस गेले व तेथें राम, लक्ष्मण, सीता व हनुमंत यांच्या मूर्ति स्थापून त्यांच्या भजनपूजनांत आपला काळ व्यतीत करूं लागले. रामनवमी व समर्थांची पुण्यतिथि हेही उत्सव ते करीत असत. पुढें ह्या मूर्ति त्यांनीं आपल्या घरीं पाठवून दिल्या व स्वतः संन्यासदीक्षा घेतली.

इकडे, मल्हारपंतांचे पुत्र उद्धव यांनीं त्या मूर्तींची आपल्या घरीं स्थापना केली व ते रामनवमीचा उत्सव करूं लागले. ते मोठे सदाचारी आणि भजनशील होते. पुढें वऱ्हाडांतील एका शहरीं कांहीं व्यवसायानिमित्त ते गेले असतां तेथें केशवस्वामी नामक सत्पुरुषाचे त्यांस दर्शन झालें व त्यांनीं त्यांचा उपदेश घेतला. हेच उद्धव रामदासचरित्रकर्ते उद्धवसुत होत. त्यांचें नांव उद्धव असतां ते आपणास उद्धवसुत कां म्हणतात याचा उलगडा त्यांनीं दिलेल्या माहितीवरून होत नाहीं; त्याचप्रमाणें त्यांचा जन्ममृत्युकालही उपलब्ध नाहीं. ते समर्थांचे परमभक्त होते एवढें मात्र त्यांच्या ग्रंथावरून निर्विवाद सिद्ध होतें. रामदासचरित्राशिवाय त्यांचे अभंग, पदें वगैरे स्फुट कविता बरीच असावी असें वाटतें. स्वतःचीं कांहीं पद्यें त्यांनीं रामदासचरित्रांत मधून मधून दिलीं आहेत, त्यांतलीं कांहीं येथें देतों.

## अभंग

**रामदासस्वामींचे चरणीं । शरण जाई कर जोडोनी ॥**
**निशिदिनीं स्मरतां अंतरीं । प्रगटेल तुझिया अंतरीं ॥**
**लावितां लय ज्ञानाचा प्रकाश । होईल जाणा माना हा विश्वास ॥**
**रामदास येकचि स्वरूप । उद्धवसुत भावें चिद्रूप ॥**

२

**रामदास महाराज । भक्ति वैराग्याचा ध्वज ॥**
**उद्धरिलें हीनदीनां । लावियेलें रामभजना ॥**
**दासबोध ग्रंथ केला । वेदशास्त्र मथियेला ॥**
**म्हणे उद्धवसुत मुक्ति । तेथें चाऱ्हीही नांदती ॥**

३

**रामदास सद्गुरुस्वामी । तव शरणागत आम्ही ॥**
**तुझिया वैराग्याची सीमा । नये आणिक उपमा ॥**
**म्हणे उद्धवसुताचा । अवतार हनुमंताचा ॥**

उद्धवसुतकृत रामदासचरित्र हा ग्रंथ बराच मोठा असून त्याचे ५१ अध्याय आहेत. समर्थांच्या चरित्रासंबंधाने कवीस जेवढी माहिती मिळाली तेवढी सगळी या ग्रंथांत त्यानें मोठ्या भाविकपणानें संग्रहीत केली आहे. रचना अगदीं साधी आहे. कवीच्या गुरूंचे गुरु माधवस्वामी हे समर्थांचे शिष्य होते. त्यांची जी माहिती कवीने दिली आहे ती फार चमत्कारिक आहे. हे माधवस्वामी आईच्या उदरांत असतांनाच आई मरण पावली. तिचें प्रेत दहनार्थ स्मशानांत नेल्यावर तेथें प्रेताचें पोट चिरून मूल बाहेर काढलें तें जिवंत निघालें. त्याचें नाळ कापून त्याला दुर्डीत घालून कापसांत ठेवलें. त्या वेळीं तें मूल सात महिन्यांचें होतें. पुढें त्याचें बारसें करून त्याचें नांव माधव ठेविलें. पुढें तो मोठा झाल्यावर तीर्थयात्रा करीत फिरत असतां एके ठिकाणीं समर्थांची व त्याची भेट झाली व त्यांनीं त्याला अनुग्रह दिला. त्यांचे शिष्य केशवस्वामी व केशवस्वामींचे शिष्य उद्धवसुत.

## १७ आत्मारामहाराज येक्केहाळीकर

'श्रीदासविश्रामधाम' या प्रचंड ग्रंथाचे हे कर्ते होत. बेदर जिल्ह्यांत येक्केहाळी या नांवाचें एक लहानसें टुमदार शहर आहे, तेथें आत्माराम-महाराजांचा मठ आहे. 'रंक' हें टोपण नांव धारण केलेल्या त्यांच्या एका शिष्यानें 'आत्मलीला' या नांवाचें त्यांचे एक चतुर्दश प्रकरणात्मक चरित्र लिहिलें होतें. त्याची एक अर्धवट आणि अपूर्ण अशी प्रत श्री. देव यांस सदर मठांत मिळाली. या चरित्रावरून असें समजतें कीं, "आत्मारामाचे मूळ नांव तिपण्णा. आत्माराम हें नांव त्यांच्या गुरूनीं ठेविले. ते मूळचे राहणारे नाघोर गांवचे. तिपण्णांच्या वडिलांचें नांव निर्वाणी-पंत व मातुःश्रीचें उमा. भुजंग या नांवाचे आत्मारामांचे कोणी बाळमित्र होते. आत्मारामहाराजांना श्रीसमर्थांचे अवतार समजत. मुंजीला ते जरा मोठे म्हणजे अकरा वर्षांचे झाले होते. मौजीबंधनानंतर वैराग्य बाणलें. त्यांच्या हातीं नेहमीं जपमाळ असे. एकांताची त्यांना विशेष आवड वाटूं लागली. शेतांत, रानांत डोंगरांत कोठें तरी बाहेर एकांतांत जाऊन आत्मचिंतनांत ते काळ कंठूं लागले. अष्टभाव वारंवार दाटून येऊं लागले. उदासवृत्तीनें आत्माराम काळ कंठीत असतां एके दिवशीं आपचंद मठपति रामचंद्रमहाराज यांचें नाघोरास आगमन होऊन या मुलावर त्यांची कृपा झाली. पुढें नाघोराहून आत्माराम आपचंदास वारंवार जाऊं लागले. नाघोर गांवचे सारे लोक त्यांच्या भजनीं लागले. लोकोद्धारार्थ त्या प्रांतीं त्यांनीं सर्वत्र संचार केला." याहून अधिक माहिती वरील चरित्रांत मिळत नाहीं. आत्मारामहाराजांचे काळोबा या नांवाचे एक शिष्य होते. ते सुमारे ५० वर्षांपूर्वी ९६ वर्षांचे होऊन वारले.

समर्थांचे पट्टशिष्य कल्याणस्वामी यांचा असा परिपाठ असे कीं, दुसरें कांहीं काम नसलें म्हणजे त्यांनीं श्रीसमर्थांच्या लीला प्रेमभरानें सांगाव्या. कल्याणांचे प्रमुख शिष्य दोन—(१) आपचंद मठपति शिवरामस्वामी व

( २ ) तडवळें मठपति जगन्नाथमहाराज. कल्याणाच्या मुखानें या दोघांनीं समर्थचरित्र ऐकावें व अंतरीं सांठवावें. त्या दोघांपासून तें पावन चरित्र रामचंद्रांना ऐकावयास मिळालें. रामचंद्र हे शिवरामस्वामींचे शिष्य. त्यांचें बाळपण शिवरामस्वामींच्या व तरुणपण जगन्नाथमहाराजांच्या संगतींत गेलें. येक्केहाळीकर आत्मारामहाराज हे रामचंद्रांचे शिष्य.

आत्मारामहाराजांच्या 'दासविश्रामधाम' या ग्रंथाविषयीं श्री. देव लिहितात—"कोणाही ऐतिहासिक विख्यात साधूचें किंवा राजकारणी थोर पुरुषाचें एवढें मोठे चरित्र मराठींत लिहिलेलें माझ्या पाहण्यांत नाहीं. धन्य आत्मारामहाराजांची! आत्मारामहाराज श्रीसमर्थांचें चरित्र लिहावयास बसले. तें लिहीत असतां जेथें जेथें इतर शेंकडों ज्ञात आणि अज्ञात सत्पुरुषांचा प्रसंगानुरोधानें संबंध आला तेथें तेथें त्या त्या पुरुषांचा त्यांनीं गौरव केला आहे व त्यांचीं पदपदांतरें ऐकविलीं आहेत. चरित्र सांगतां सांगतां 'मग समर्थांनीं मनाचे श्लोक लिहिले, मग दासबोध ग्रंथ लिहिला' असें म्हणून त्या त्या ठिकाणीं मनाचे श्लोक, दासबोध, वगैरे श्रीसमर्थकृत ग्रंथ त्यांनीं उतरले आहेत. मूळ चरित्रग्रंथाचीच ओवीसंख्या १६३०२ असून शिवाय स्वतः आत्मारामकृत व इतर कविकृत पदें, अभंग, श्लोक वगैरे असंख्य आहेत! या ग्रंथाचें हें सर्वव्यापी स्वरूप पाहून मी त्याचें Encyclopædia Ramadasika म्हणजे रामदासी संप्रदायाचा विश्वकोश असें नांव ठेविलें आहे."

आत्मारामहाराजांच्या 'दासविश्रामधाम' ग्रंथाच्या प्रचंडपणाची आणि एकंदर स्वरूपाची कांहीशी कल्पना श्री० देवकृत वरील वर्णनावरून होईल. हा ग्रंथ चार खंडांत धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केला आहे. ग्रंथ जरी ओवीवृत्तांत रचिला आहे तरी तो गद्यासारखाच असून त्याचा एकंदर थाट रामदासी वाङ्मयास शोभेल असाच आहे. या ग्रंथांतले वेंचे देण्याची तर मुळींच सोय नाहीं; म्हणून आत्मारामहाराजांनीं जीं शेंकडों

स्वकृत पद्यें यांत समाविष्ट केलीं आहेत त्यांतलीं फक्त चार पांच पद्यें येथें उतरून घेतों.

## अभंग

१

सर्वत्याग होता संन्यास तो भला । गुंता गोंवा त्याला काय आतां ॥
त्रिपदा ग्रासूनियां क्रीडतां श्वानंदीं । स्वरूपीं जाली बुद्धि तदाकार ॥
ब्रह्मविद्या साधी ब्राह्मण तो होय । घेणें विहित आहे संन्यासत्व ॥
महावाक्यशोधें आत्मा स्वयें जाला । वंदावें तयाला सर्व भावें ॥

२

ज्ञान म्हणावें तें कांहींच नहोनि । स्वयेंचि स्वध्यानीं आत्मज्ञान ॥
संसारपदार्थपरीक्षा करणें । जना वाटे ज्ञान परि तें नव्हे ॥
तुर्येचें जाणणें तें ज्ञान पदार्थ । तें हे वदे मात भिन्नत्वानें ॥
आत्माराम स्वयें आपणांत रमे । ज्ञानी तो परम परमहंस ॥

३

धन्य हें रामाचें ध्यान सौख्यकारी । ठाव निर्विकारीं मिळतसे ॥
निवाला तो शंभु बहुतां हा लाभु । घडाया विलंबु न लगेचि ॥
ध्यानाचें महिमान जाणती जे योगी । विकल्पाच्या धगीं न पडती ॥
आत्माराम स्वयें ध्यानरूप आहे । हे जाणती सोय भक्तजन ॥

## पदें

न कळे नेणवे करणी देवाजीची ॥ ध्रु० ॥
वेदादि बहु शिणले वानितां ।
ठकले शेषादि विरंचि ॥ १ ॥
दाऊनि माइक माया साचचि ।
लीळा दावितो बहुताचि ॥ २ ॥
आत्माराम तो अज अविनाशी ।
चिंता वाहतो भक्ताची ॥ ३ ॥

२

**तो मनमोहन सांवळा। अघटित ज्याची लीला ॥ ध्रु० ॥**
**पाहतां जयातें भ्रांति नुरे। भवभव माया विरे ॥ १ ॥**
**खेळे जनमन भरोनि। लावण्याची खाणी ॥ २ ॥**
**भजतां सप्रेमें सुखधाम। भाळे आत्माराम ॥ ३ ॥**

दासविश्रामधाम ग्रंथांत आलेली माहिती व निरनिराळ्या संतकवींचीं उद्धृत केलेलीं असंख्य पद्यें पाहिलीं म्हणजे आत्मारामहाराज यांचें ग्रंथावलोकन केवढें दांडगें होतें याची कल्पना होऊन मन आश्चर्यानें थक्क होतें. महाराजांनीं आपलें आयुष्य केवळ संप्रदायाच्या सेवेंत वेंचून दासविश्रामधामाच्या रूपानें समर्थचरित्रलेखनाचें एक मोठें साधन निर्माण करून ठेवलें आहे यांत संशय नाहीं.

आत्मारामहाराजांचे शिष्य '**रंक**' यांचा उल्लेख पूर्वीं आला आहे. त्यांचीही कांहीं कविता उपलब्ध आहे. एकच पद येथें देतों.

**झडकरि तूं फडक मना लाग गुरुपायीं ॥ ध्रु० ॥**
**पळपळ हें आयुष्य जात। न ये पुन्हां फिरुनि परत।**
**लागवेग तूं त्वरित। पदीं सावध होईं ॥ १ ॥**
**घडि घडि तुज सांगुं काय। वेगिं धरिं स्वहितसोय।**
**काळ टपत नेउं पाहे। करुणा त्यासि नये ॥ २ ॥**
**सोडविता नसे कोणी। आत्मारामा तुजवांचोनि।**
**तूंचि किं बा रंकधनी। येऊनि राहीं हृदयीं ॥ ३ ॥**

## १८ आत्मारामबुवा चरेगांवकर

यांनीं शके १७८९ त लिहिलेलें एक समर्थचरित्र सुमारे ५५ वर्षांपूर्वी कै. बाबाजी अनंत तेंडोलकर यांनीं छापून प्रसिद्ध केलें आहे. तें ओंवीबद्ध असून त्याचे ७८ अध्याय आहेत. रचना अगदीं सामान्य आहे. ह्या आत्मारामबुवांचा मठ चरेगांवीं आहे. रामदासचरित्र हा ग्रंथ

वाईक्षेत्रीं लिहून पुरा झाला. धुळें येथील श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील बाडांक ६२५ यांत या आत्मारामबोवांविषयीं पुष्कळच माहिती आहे. त्यांचे ४००।५०० अभंग व १८।२० लघुप्रकरणें त्या बाडांत आहेत.

असो. येथपर्यंत बहुतेक रामदासी कवींची त्रोटक माहिती दिली. यांशिवाय, अनंतकवि, रघुनाथ पंडित, तंजावराकडील माधव, हंसराज वगैरे कवीही याच संप्रदायांतले होत, पण ते मोठे प्रसिद्ध कवि असल्यामुळें त्यांची विस्तृत माहिती व त्यांच्या कवितेचें विवेचन '**स्वराज्यांतील कवि**' ह्या पुढील खंडांत देणेंच उचित होईल.

---

# ह० भ० प० पांगारकरांचीं पुस्तकें



**१ भक्तिमार्गप्रदीप** ( सुधारून वाढविलेली सोळावी आवृत्ति )—यांत साधुसंतांच्या प्रसिद्ध भूपाळ्या, आरत्या, श्लोक, अभंग, पदें वगैरे सर्व यथानुक्रम दिलीं आहेत. नित्यप्रार्थनेचें सर्वलोकप्रिय पुस्तक. किं० कागदी ८ आणे, कापडी १२ आणे.

**२ ज्ञानेश्वरचरित्र व ग्रंथविवेचन** ( आवृत्ति दुसरी )—"या ग्रंथाची भाषा भक्तिरसानें ओथंबलेली व वक्तृत्वपूर्ण असून विवेचन रसभरित आहे" ( केसरी ). किं. रु. १॥.

**३ तुकारामचरित्र** ( आवृत्ति दुसरी )–"हा वारकरीसंप्रदायाचा रहस्य-ग्रंथच आहे. पांगारकरांची वाणी प्रसंगानुसार प्रेमळ पण सणसणीत, भाविक पण चिकित्सक, सरळ पण भेदक, व साधी पण वेधक अशी आहे. ग्रंथ फार सुरस व हृदयंगम झाला आहे." ( वि० ज्ञा० विस्तार ). किं० रु. २

**४ मुक्तेश्वरचरित्र आणि काव्यविवेचन**—कवीच्या चरित्राची व त्याच्या काव्यांतील गुणविशेषांची माहिती यांतील विवेचनावरून व मार्मिक उताऱ्यां-वरून सहज होणार आहे. सुंदर सृष्टिवर्णनें, कुस्त्यांचीं वर्णनें, सर्वत्र विखुरलेलीं नीतितत्त्वें, सर्व कांहीं यांत आहे. किं० रु. १

**५ संतचरित्रमाला**—यांत कांहीं प्राचीन, कांहीं अर्वाचीन व कांहीं समकालीन अशा ४३ संतांचीं चरित्रें दिलीं आहेत. किं० रु. १८८

**६ मोरोपंती वेंचे** ( दुसरी आवृत्ति )—पंतांच्या अगाध कवितासमुद्रांतील विविध विषयांवरचे उत्कृष्ट वेंचे एका ग्रंथांत पहावयाचे असल्यास हा ग्रंथ अवश्य संग्रहावा. काव्यशास्त्रावर प्रस्तावना देऊन पंतांचें संक्षिप्त चरित्रही नवीन जोडलें आहे. किं० रु. १८१२

**७ सार्थ मनोबोध**—समर्थांचे मनाचे श्लोक सविस्तर विवरणासह दिले असून मनाचें रूप, श्लोकांची संगति व श्लोकांचें वर्गीकरण दिलें आहे. किं० ८१२

**८ कविरामायण**—संस्कृत व प्राकृत रामायणें व शेंकडों स्फुट प्रकरणें यांतून उत्कृष्ट वेंचे संगतवार देऊन हें स्वतंत्र रामायण तयार केलें आहे. किं० ८४

**९ आनंदलहरी** ( कवितासंग्रह )—ह्यांत पांगारकरांच्या कवितेपैकीं ४० स्फुट प्रकरणें दिलीं आहेत. १८ स्तोत्रें, ८ प्रकरणें महाराष्ट्र, संत व सद्ग्रंथ ६ प्रासंगिक व ८ उपदेशपर. किं० ८१२

**१० नारदभक्तिसूत्रें**—८४ मूळ संस्कृत सूत्रें, त्यांचा अर्थ व त्यांवरील विस्तृत विवरण देऊन भक्तिशास्त्राचा यांत सांगोपांग विचार केलेला आहे. वाचकांस भक्तिप्रेमोदधि सांपडल्याचा आनंद होईल. कि० ८८

**११ नवविधाभक्ति**—यांत नवविधाभक्तीचें नऊ प्रबंधांत सविस्तर स्पष्टीकरण केलें आहे. कि० ८६

**१२ पारिजातकाचीं फुलें** ( तिसरी आवृत्ति )—परमार्थविचारांची संतति उत्पन्न करणारे सूत्रप्राय, अर्थगंभीर, स्वतंत्र व स्फुट विचार विषयवारीनें दिले असून पुस्तक विवेचक भाविकांस प्रिय झालें आहे. कि० ८८

**१३ भक्तिमणिमाला**—मूळ भागवतांतील उत्तमोत्तम अशा ५५० श्लोकांची निवड करून मूळ श्लोक व त्यांचा कथासंदर्भ देऊन साधुसंतांच्या वचनाधारें त्यांचें सविस्तर विवरण केलें आहे. किं० १८८

**१४ मारुति-उपासना**—प्रथम मारुतिरायाचें समग्र व सुंदर चरित्र दिलें असून पुढें भीमरूपी स्तोत्रें, अभंग, जन्माध्याय, पदें, श्लोक, आरत्या वगैरे सर्व दिल्या आहेत. ( सुधारलेली आवृत्ति पांचवी ). कि० ८४.

**१५ मुमुक्षूंतील निवडक निबंध** ( भाग १, २ व ३ )—प्रत्येक भाग किं० रु० १८८. मुमुक्षु साप्ताहिकांत पहिल्या २० वर्षांत जे संपादकीय लेख आले त्यांतील निवडक लेख या तीन भागांत प्रसिद्ध केले आहेत. हे जवळ असले म्हणजे २० वर्षांच्या ' मुमुक्षू ' चा समागम केल्याचा लाभ होणार आहे. तीनही भागांत मिळून ९० वर निबंध आहेत.

**१६ सार्थ दासबोध** ( दुसरी आवृत्ति )—वर शुद्ध केलेल्या मूळ ओव्या व खालीं सरळ अर्थ. कल्याणस्वामींचे बंधू शिरगांवमठाचे अधिकारी दत्तात्रेयस्वामी यांच्या हातची शके १६०६ च्या भाद्रपदमासांत लिहून तयार झालेली मूळ प्रत ग्वाल्हेरीस आहे. तेथें जाऊन अक्षरशः तपासून घेऊन रा० पांगारकर यांनीं ही प्रत तयार केली आहे. उत्तम ठळक टाईप, सोनेरी कापडी बांधणी, किं० रु. ४

**१७ सटीप दासबोध**—( नवीन आकारांतील नवीन आवृत्ति ) संशोधित शुद्ध प्रत. ग्रंथारंभीं श्रीराम, श्रीहनुमान व श्रीसमर्थ यांचीं सुंदर रंगीत चित्रें, सोनेरी बांधणी, किं. १॥ रुपया.

**१८ निबंधमाला–तिचें स्वरूप आणि कार्य**—निबंधमालेची पुरी ओळख या निबंधानें होईल. प्रथम शास्त्रीबोवांचें संक्षिप्त चरित्र दिलें आहे. मालेंतील मुख्य व अवांतर विषय, गुणदोषविवेचन इ० यांत आहे. किं० ८१०

**१९ निरंजनमाधवांची कविता**—भाग १ किं० रु. १ व भाग २।३ एकत्र किं० रु. १८८. पहिले बाजीराव पेशवे यांच्या वेळचा हा कवि. याचीं स्तोत्रें, सांप्रदायपरिमळ ऊर्फ आत्मचरित्र, ज्ञानेश्वरविजय, चिद्बोधरामायण, स्फुट प्रकरणें हीं संशोधन करून त्यांचा जीर्णोद्धार केला आहे.

**२० तुकारामचरितामृत**—तुकोबांचें प्रेमळ चरित्र अभंगांत गाइलें असून नित्यपाठास उपयुक्त आहे. किं० ८५

**२१ समर्थग्रंथभांडार**—यांत दासबोधाशिवाय बाकीची समर्थांची सर्व कविता प्रकरणें पाडून व्यवस्थित दिली आहे. किं० रु. २८८

**२२ ज्ञानेश्वरांची प्रभावळ**—श्रीज्ञानेश्वरमहाराज व त्यांचे समकालीन नामदेवराय, जनाबाई, चोखामेळा इ० सर्वजातीय २८ संत यांच्या ग्रंथांतील नित्यपाठाच्या उपयोगी असे निवडक सुंदर वेंचे विषयवारीनें दिले आहेत. यांत ज्ञानेश्वरांच्या २५०० ओव्या व सर्व संतांचे ४०० उत्कृष्ट अभंग दिले आहेत. टीपा भरपूर; प्रस्तावना सुंदर. किं० रु. २

**२३ मराठी वाङ्मयाचा इतिहास-खंड पहिला-अर्थात् ज्ञानेश्वर-नामदेवांचा काल**—वेदविद्या, उपनिषद्विद्या, गीता, भागवत, शिवविष्णु-संप्रदाय व भक्तिमार्गाचें अनादित्व, बुद्धापासून रामदेवराव-जाधवापर्यंतचा अडीच हजार वर्षांचा भरतखंडाचा इतिहास, तामीळांचें साम्राज्य, तामीळ संत व तामीळ आचार्य, हीं सात प्रकरणें पूर्वार्धांत असून उत्तरार्धात महाराष्ट्र देश व मराठे लोक, महाराष्ट्री उर्फ मराठी भाषा, आदिकवि मुकुंदराज, महानुभावपंथाचें मराठी वाङ्मय, गोरक्षनाथ व नाथपंथ, श्रीज्ञानेश्वरदर्शन, भक्त नामदेवांचें चरित्र, संतमेळा व त्याचें अभंगवाङ्मय, ज्ञानेश्वरीचें अंतरंग, ज्ञानेश्वरी सृष्टि व नामदेवांची पंजाबांतील कामगिरी अशी अकरा प्रकरणें आहेत. पृ० सं० ८३२, किंमत रुपये चार.

**२४ मराठी वाङ्मयाचा इतिहास-खंड दुसरा-एकनाथतुकारामांचा काल**—तीनशें वर्षांत झालेल्या संतकवींच्या काव्यांचा संपूर्ण इतिहास. नाथांस सात व तुकोबांस पांच प्रकरणें दिलीं आहेत. पृ० सं० ८१६ किं० रु. ३८८

**२५ चरित्रचंद्र** ऊर्फ पांगारकरांचें आत्मचरित्र. पृ० सं० ५५० किं० रु. २

**केशव भिकाजी ढवळे,**

**श्रीसमर्थ-सदन**
**गिरगांव, मुंबई**